# श्री एकनाथ महाराज

यांच्या

# अभंगांची गाथा

॥ श्रीविठ्ठल ॥

विषयवर्गीकरण केलेली

# श्री एकनाथ महाराज
## यांच्या
# अभंगांची गाथा

[ श्रीभानुदास व श्रीजनार्दन यांच्या अभंगांसह सांप्रदायिक ]

ब्रह्मीभूत श्रीनानामहाराज साखरे

ज्ञानेश्वरी-भाषांतरकार

यांच्या संग्रहांतील पुरातन हस्तलिखित वह्यांवरून

पाठ दुरुस्त करून तयार केलेली.

आवृत्ति चवथी

शके १८७४-सन १९५२

इंदिरा प्रकाशन

२७० सदाशिव, पुणें २

किंमत आठ रुपये

# प्रस्तावना

माझे आजोबा परमपूज्य त्र्यंबक हरी आवटे यांनीं संत ग्रंथ प्रकाशनाच्या हेतूनें सन १८८५ सालीं इंदिरा प्रेसची सुरवात केली. आणि पांच सहा वर्षात श्री तुकाराम महाराज यांचा गाथा सन १८९१ सालीं प्रसिद्ध करून संत ग्रंथ प्रकाशनास आरंभ केला. त्यानंतर श्रीज्ञानेश्वरमहाराज, श्रीएकनाथमहाराज, श्रीनिळोबामहाराज व श्रीनामदेवमहाराज यांच्या अभंगांच्या गाथा प्रकाशित केल्या. वरील पांच संतांच्या व इतर सुमारें ४० संतांच्या गाथांचें एकत्र पुस्तक करून त्यास गाथापंचक अर्थात सकल संत गाथा हें नांव दिलें. हा मोठा ग्रंथ सन १८९८ सालीं प्रसिद्ध झाला. पुढें अनेक धार्मिक पुस्तकें प्रकाशित केल्यामुळें संत ग्रंथ प्रकाशनास चांगलेंच बाळसें आलें.

श्रीगुरु नानामहाराज साखरे यांनीं एका विशिष्ट परंपरेनें अभंगांची जुळणी केली त्यामुळें प्रासादिक म्हणून ह्या गाथा वारकरी सांप्रदायांत लोकप्रिय झाल्या.

श्री. एकनाथ महाराज यांच्या अभंगांची गाथा प्रथम सन १८९८ सालीं प्रकाशित झाली. पुढें १५ वर्षांनीं म्हणजे सन १९१४ मध्यें श्री. एकनाथ महाराजांच्या अभंगांच्या गाथेची दुसरी आवृत्ति प्रकाशित झाली. नंतर १५ वर्षांनीं म्हणजे सन १९२९ सालीं तिसरी आवृत्ति प्रकाशित झाली. ती: आवृत्ति २–३ वर्षांत संपून गेली. म्हणजे गेलीं वीस वर्षे श्रीएकनाथ महाराज यांच्या अभंगांची गाथा दुर्मिळ झाली होती. वाचकांचीं अनेक पत्रें गाथेच्या मागणीसाठीं येतच होतीं. म्हणून थोडा अवसर मिळतांच आम्हीं आतां श्रीएकनाथमहाराजांच्या गाथेची ही चवथी आवृत्ति आमच्या प्रेमळ वाचकांच्या हवाली करीत आहोंत.

सन १९३१ नंतर सुमारे १५।१६ वर्षे इंदिरा छापखान्याचें काम बंद होतें. माझे वडील तीर्थरुप शंकर त्र्यंबक आवटे यांनीं, १९४७ सालीं छापखान्याची पुन्हां जुळवाजुळव करून उदारपणानें छापखाना माझे स्वाधीन केला. मध्यंतरीच्या २–३ वर्षांत १ सार्थ गौळणी, २ चांगदेव पासष्टी, ३ शनीमाहात्म्य, ४ ज्ञानदेवकृत हरिपाठ वगैरे छोटीं धार्मिक प्रकाशनें करून नंतर असलें मोठें पुस्तक प्रकाशित करण्याचा उत्साह निर्माण झाला. अशा रितीनें पितामहांनीं सुरू केलेल्या कार्याला पुन्हां आरंभ केला. अर्थात वडिलांनी जर छापखान्याची जुळवाजुळव करून दिली नसती तर हा आरंभ करतां आला नसता. त्याचप्रमाणें पितृतुल्य ती. ज. शं. मेढेकर यांनी अडीअडचणींना तोंड देऊन सदर ग्रंथाच्या प्रकाशनास प्रोत्साहन दिलें. या कामीं त्यांना किती त्रास झाला हें त्यांचें त्यांना माहित. माझे पितामह त्र्यंबक हरी आवटे, ब्रह्मीभूत श्रीगुरू नानामहाराज साखरे यांच्या पुण्याइने व माझे वडिल ती. शंकर त्र्यंबक आवटे व पितृतुल्य ती. ज. शं. मेढेकर यांचे आशीर्वादानें व इंदिरा प्रेसच्या कामगारबंधूंच्या सहकार्यानें आजचा हा योग आला आहे असें मला वाटतें. ३०–४० वर्षापूर्वीं धार्मिक प्रकाशनास व त्याच्या खपास जी अनुकूलता होती तितकी अनुकूलता हल्लीं नाहीं. इतकेंच नव्हे तर प्रतिकूलताच निर्माण होण्याइतकी सामाजिक मनाची बैठक बदलली आहे. असें असूनही केवळ एका विशिष्ट श्रद्धेनें मी हा ग्रंथ प्रकाशित करण्याचें धाडस करीत आहे. धाडस म्हणण्याचे कारण पुस्तकास लागणाऱ्या सर्व साहित्याची महर्गता हें होय. पूर्वी जो ग्रंथ २॥–३ रुपयांस देणें परवडत होतें तोंच ग्रंथ हल्ली ७–८ रुपयास देणें भाग पडत आहे. एवढी मोठी किंमत वाचकांना डोईजड वाटण्याचा संभव आहे.

कसेंही असलें तरी श्रीएकनाथमहाराजांची ही गाथा प्रकाशित करून कार्यास आरंभ तर केला आहे. जनताजनार्दनाकडून जसजसे प्रोत्साहन मिळेल तसतसें इतर संतवाङ्मयही छापून प्रसिद्ध करण्याची मनीषा बाळगिली आहे. निव्वळ धार्मिक प्रकाशनें करणें परवडणारें नाहीं त्यास मदत म्हणून इतर शालोपयोगी अगर बालोपयोगी पुस्तकें प्रकाशित करणें जरूर आहे. अशीं सर्व प्रकारचीं पुस्तकें प्रकाशित करीत असल्यानें **संत ग्रंथ प्रकाशन** या नांवाऐवजीं आम्हीं **इंदिरा प्रकाशन** असें नांव प्रकाशन संस्थेला दिलें आहे. अर्थात इंदिरा प्रकाशनामधें संत ग्रंथ प्रकाशन समाविष्ट आहे हें वाचक जाणतीलच.

आषाढ शुद्ध एकादशी
शके १८७४
शुक्रवार ४ जुलै १९५२

आपला कृपाकांक्षी
**जयवंत शंकर आवटे**

# श्रीएकनाथमहाराज यांचें चरित्र

श्रीएकनाथमहाराज यांचा जन्म शके १४७० सालीं पैठण येथें झाला. यांचे मूळपुरुष भास्करपंत हे होत. भास्करपंत हे प्रसिद्ध भगवद्भक्त भानुदास यांचे वडील. भानुदासांच्या आईचें नांव सावित्रीबाई. विजयनगरच्या राजांनीं श्रीविठ्ठलाची मूर्ति नेली होती, ती भानुदासांनीं आपल्या भक्तिभावानें पंढरपुरास चालत आणिली. या भगवद्भक्ताच्या पोटीं चक्रपाणी या नांवाचे विष्णुभक्त निर्माण झाले. यांच्या पत्नीचें नांव सरस्वतीबाई. यांच्या पोटीं सूर्यनारायण जन्मले. सूर्यनारायणांच्या पत्नी रुक्मिणीबाई यांच्या उदरीं श्रीएकनाथमहाराज अवतीर्ण झाले. यांच्या बाल्यावस्थेंतच सूर्यनारायण व रुक्मिणीबाई निवर्तल्या. तेव्हां एकनाथमहाराजांचें संगोपन करण्याचा भार चक्रपाणी व सरस्वतीबाई यांजवर पडला. त्यांनीं श्रीएकनाथाचें मौजीबंधन करून त्यांजकडून वेदाध्ययन करविलें. त्यांत तें फार प्रवीण झाले. कथापुराण श्रवणाची त्यांस फार आवड होती. ब्रह्मज्ञानविषयक गोष्टी त्यांस फार आवडत. ब्रह्मज्ञानाची प्राप्ती आपणांस कोणाकडून होईल याविषयीं श्रीएकनाथमहाराज नेहमीं चिंतन करीत असत.

जनार्दनपंत हे देशस्थ अश्वलायन शाखेचें ब्राह्मण-गृहस्थ चाळीसगांव येथें देशपांडेपणाचें काम करीत होते. हे फार हुशार असल्यामुळें दौलताबाद येथील बादशहाच्या दरबारीं त्यांस मुत्सद्दीगिरीची जागा मिळाली. शत्रुबरोबर लढण्यास त्यांनीं प्रथम पुढें व्हावें, यामुळें दरबारांत त्यांचें फार वजन वाढलें. इतक्या बिकट कामगिरीवर जरी ते होते, तरी पण त्यांनीं दत्तात्रेयाची पूजाअर्चा वगैरे नित्यनेमांत कधींहि अंतर पडूं दिलें नाहीं. त्यांनीं आपल्या अद्भूत भक्तिप्रभावानें मोंगल दरबारावर छाप बसवून गुरुवारच्या दिवशीं दत्तात्रेयाची पूर्ण आराधना करता यावी म्हणून गुरुवार हा सुट्टीचा दिवस ठरवून घेतला. यांची दत्तात्रेयाचे ठिकाणीं इतकी भक्ति होती कीं, प्रत्यक्ष दत्तात्रेयानें दर्शन देऊन अनुग्रह करून ब्रह्मज्ञानाचा यथार्थ बोध केला. त्याविषयीं जनार्दनस्वामींची गुरुपरंपरा श्रीएकनाथमहाराजांनीं खालीलप्रमाणें वर्णन केली आहे--

**जो निर्गुण निराभास। जेथून उद्भव शबल ब्रह्मास। आदिनारायण म्हणती ज्यास। तो सर्वांस आदिगुरु ॥ १ ॥ तयाचा ब्रह्मा अनुग्रहीत। ब्रह्मा अत्रीस उपदेशीत। अत्रीपाद प्रसादीत। श्रीअवधूत दत्तात्रय ॥ २ ॥ दत्तालय परंपरा। सहस्रार्जुन यदु दुसरा। जनार्दन शिष्य तिसरा। केला खरा कलियुगीं ॥३॥ जनार्दन कृपेस्तव जाण। समूळ निरसलें भवबंधन। एका जनार्दनीं शरण। झाली संपूर्ण परंपरा ॥ ४ ॥**

श्रीएकनामहाराजांस जनार्दपंतांची हकीगत कळतांच ते पैठणाहून निघून अत्यंत हालअपेष्टा सोसून देवगडास आले व जनार्दनपंताची गांठ घेतली. जनार्दनपंतांनीं श्रीएकनाथमहाराजांची आठ वर्षांची वामनमूर्ति पाहून सद्गदित अंतःकरणानें विचारिलें, बाळा तूं कां आलास? तेव्हां श्रीएकनाथमहाराजांनी आपली ब्रह्मज्ञान संपादनाची उत्कट इच्छा प्रदर्शित केली. त्यावरून तुला पात्रता आल्यावर उपदेश करूं असें सांगून त्यांस आपल्याजवळ रहाण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां श्रीएकनाथमहाराजांस आनंद होऊन ते जनार्दनस्वामींच्या नित्य सान्निध्यांत राहिले.

एके कालीं जनार्दनपंतांनीं हिशेबतपासणीचें काम श्रीएकनाथमहाराजांस सांगितलें तेव्हां तें काम करीत असतां पाव आण्याची चूक पडली. ती शोधण्याकरितां श्रीएकनाथमहाराज रात्रीं जागत बसले. अशा स्थितीत जनार्दनपंत तेथें येऊन पहातात तों श्रीएकनाथमहाराज हिशेबतपासणीच्या कामांत अगदीं निमग्न झाले आहेत असें पाहिलें. श्रीएकनाथमहाराजांस जनार्दनस्वामी आले आहेत ह्याचे भानहि राहिलें नाहीं. इत-

क्यांत हिशेबांतील चूक श्रीएकनाथमहाराजांच्या लक्षांत आली. त्यामुळें त्यांस आनंद होऊन त्यांनीं टाळी पिटून हंसण्यास आरंभ केला. तों जनार्दस्वामी दृष्टीस पडले. तेव्हां श्रीएकनाथमहाराज चपापून उभे राहून मोठ्या लीनतेनें हिशेबाची हकीगत जनार्दनस्वामींस सांगूं लागले. ती ऐकतांच जनार्दनस्वामींस गहींवर आला व त्यांनीं श्रीएकनाथमहाराजांवर अनुग्रह करून ब्रह्मज्ञानाचा बोध केला. ही गुरुपरंपरा कोठून आली, याबद्दल श्रीएकनाथमहाराजांनीं खालीलप्रमाणें वर्णन केलें आहे——

**करी जो सृष्टीचें रचन । तया न कळे ब्रह्मज्ञान । तो श्रीनारायण । शरण रिघे ॥ १ ॥ न कळे न कळे ब्रह्मज्ञान । म्हणोनी धरितसे चरण। नारायण परिपूर्ण। उपदेशी ब्रह्मा ॥ २ ॥ ब्रह्मा अत्रीते सांगत। ब्रह्मज्ञान दयीं भरित। अत्री पूर्ण कृपेस्थित । दत्तात्रया सांगतसे ॥ ३ ॥ दत्तात्रय कृपे पूर्ण । जनार्दनीं पूर्णज्ञान । जगचि संपूर्ण । एकरुपी तयांसी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पूर्ण । ब्रह्मज्ञानाची खूण । बांधोनियां संपूर्ण । मेळाविले आपणीया ॥ ५॥**

श्रीएकनाथमहाराजांस श्रीदत्ताचें दर्शन व्हावें म्हणून श्रीजनार्दनपंतांनीं दौलताबादेनजीकच्या एका पर्वतावर नेलें. सहस्र पार्थिव लिंगें करून श्रीदत्ताची षोडशोपचारें पूजा केली; व जनार्दनस्वामींनीं श्रीएकनाथमहाराजांस जवळच एका जाळींत बसावयास सांगून आपण एका व्याघ्रांबरावर बसून समाधी लाविली. इतक्यांत औदुंबर वृक्षांतून एक मंगलमूर्ति प्रगट झाली. ती भयंकर मूर्ति श्रीएकनाथमहाराजांनीं पाहतांच त्यांस भय वाटूं लागलें. जनार्दन स्वामींच्या व त्या मूर्तीच्या प्रेमानें आत्मसुखाच्या गोष्टी चालल्या. त्या ऐकून श्रीएकनाथमहाराजांस आनंद झाला. त्या भरांत ते श्रीदत्तात्रयाचें पायांवर लोटांगण घालण्याकरितां धांवत आले, तों जनार्दन स्वामींनीं त्यांस उचलून श्रीदत्तात्रयाचे पायीं घातलें. इतक्यांत दत्तात्रयांनीं त्यांस उचलून घेतलें व मस्तकावर हात ठेवून आशिर्वाद देऊन म्हटलें, तुझ्या कवित्वाची लोकोत्तर कीर्ति वाढून भागवतावरील टीका, रामायण व अभंगरूपीं अमृतवचनें फार उत्तम होऊन त्यायोगें जनसुधारणेचें यश संपादन करशील. असा वर देऊन श्रीदत्तात्रयाची मूर्ति अंतर्धान पावली.

पुढें जनार्दनस्वामी व श्रीएकनाथमहाराज नाशिक त्र्यंबकेश्वरीं देवदर्शनास गेले. तेथें पंचवटींत गुर्वाज्ञेवरून श्रीएकनाथमहाराजांनीं चतु:श्लोकी भागवत केलें. याप्रमाणें श्रीएकनाथमहाराज बारा वर्षे सद्गुरुच्या सान्निध्यांत राहून त्यांच्याच आज्ञेनें पैठणास पुन: परत जाऊन आजाआजीची शुश्रुषा करून गृहस्थाश्रमी होऊन अमानुष कृती जगास दाखवून कालक्रमण करूं लागले.

श्रीएकनाथमहाराजांनीं एकनाथी भागवत, स्वात्मसुख, चतु:श्लोकी भागवतावरील टीका, हस्तामलक, आनंदलहरी व अभंग असे अध्यात्मविषयक ग्रंथ केले. तसेंच भावार्थरामायण व रुक्मिणीस्वयंवर असे चरित्रविषयक ग्रंथ केले. ज्ञानेश्वराची ज्ञानेश्वरी ही यांनींच जगाच्या निदर्शनास आणिली. ज्ञानेश्वराच्या गुरुपरंपरेचा ओघ जनार्दनस्वामींकडे व आपणाकडे कसा लागला आहे हें त्यांच्या खालील अभंगावरून लक्षांत येईल——

**ध्यानीं बैसोनी शंकर। जपे रामनाम सार ॥१॥ पार्वती पुसे आवडी। काय जपतां तांतडी ॥२॥ मंत्र तो मज सांगा। ऐशी बोलतसे दुर्गा ॥३॥ एकांती नेऊन। उपदेशी राम अभिधान ॥४॥ तेंचि मच्छिंद्रा लाधलें। पुढें परंपरा चालिले ॥५॥ तोचि बोध एका जनार्दनीं। लागतसे चरणीं ॥६॥**

श्रीएकनाथमहाराजांस गिरजाबाईच्या पोटीं हरिपंत या नांवाचा पुत्र, गोदुबाई व गंगाबाई या नांवाच्या दोन मुली झाल्या. शके १५२१ फाल्गुन शुद्ध ६ स श्रीएकनाथमहाराज पैठण येथें गोदावरी नदींत अंतर्धान पावले. त्या दिवशीं पैठण येथें दरसाल मोठा उत्सव भरतो. याचे गुरु जनार्दन व पूर्वज भानुदास यांनीं अभंग केले आहेत. ते या गाथ्याच्या आरंभीं जोडले आहेत.

विजया दशमी
शके १८५१ }

**त्र्यंबक हरी आवटे**

# अनुक्रमणिका

## श्रीभानुदासमहाराज.



## श्रीजनार्दनमहाराज.



## श्रीएकनाथमहाराज.

कामाच्या घाईमुळें या ग्रंथांत अनेक चुका झाल्या आहेत याची जाणीव आहे. त्याबद्दल क्षमा करावी.


पहिली आवृत्ति सन १८९८
दुसरी आवृत्ति सन १९१४
तिसरी आवृत्ति सन १९२९
चवथी आवृत्ति सन १९५२

॥ श्री विठ्ठल ॥

# श्रीभानुदासमहाराज

## यांचे अभंग

### अद्वैत.

१ उद्भवला ॐकार त्रिमातृकेसहित । अर्ध मातृके परतें प्रणवबीज ॥१॥ माया महतत्त्व जाले तिन्ही गुण । चौ देहांची खूण वोळखावी ॥ २ ॥ अंतःकरणीं जाला तत्त्वांचा प्रसव । पंचतत्त्वें सर्व रूपा आलीं ॥ ३ ॥ पांचहि गुण जाले पंचवीस । परी भानुदास वेगळाची ॥ ४ ॥

२ षट्विकार आणि सप्त चक्रावळी । अष्ट भिन्न जाली प्रकृती ते ॥ १ ॥ नावनाडी रचना दश इंद्रियांची । अकराव्या मनाची गति तूंची ॥ २ ॥ विषय इंद्रिय वासना उत्पत्ती । तुजमाजी येती जाती सर्व ॥ ३ ॥ चिन्मयाचा दीप साक्षित्वासी आला । भानुदास त्याला नाम जाले ॥ ४ ॥

३ वाचा आणि अवस्था भोग अभिमानी । पुरुषार्थ खाणी चारी मुख्य ॥ १ ॥ कीटक भ्रमर जंगम स्थावरत्व । भरलें महतत्त्व कोंदाटोनी ॥ २ ॥ चेतविता याला कोण आहे येथें । ओहं सोहं भाते लाऊनियां ॥ ३ ॥ फुंकितो तो कोण आणिक दुसरा । वर्म गुरुपुत्रा न कळेची ॥ ४ ॥ सूर्याचा उभारा केला तो संकल्प । भानुदास दीप प्रज्वाळिला ॥ ५ ॥

४ तुजपासाव सर्व परी तूं नोहेसि । ऐसें आपणासी बुझे बापा ॥ १ ॥ कर्तृत्व करूनि आहे तो निराळा । परब्रह्म निर्मळा मळ नाहीं ॥ २ ॥ देहाचिये ऐसी करूनि निराशा । स्वस्वरूपीं ठसा ठसलासि ॥ ३ ॥ चिन्मयरूप मूळ ॐकार बीज । भानुदासीं निज लाधलें तें ॥ ४ ॥

५ जोडीचें घोंगडें येव्हढीये राती । कानींचीं कुंडलें करी जगा ज्योती ॥ १ ॥ वोळखिला वोळखिला खुणा । वोळखिला माय पंढरीचा राणा ॥ २ ॥ होये न होये ऐसा संशय गमला । निर्धारितां विश्वव्यापक देखिला ॥ ३ ॥ हृदयमंदिरीं दाटोनी धरावा । ही खूण सांगे भानुदास देवा ॥ ४ ॥

६ तुज पाहूं जातां नये कांहीं हातां । असत्सी तत्त्वतां साध्य नाहीं ॥ १ ॥ तुझा तूंचि मागें परतोनि पाहें । तुजपाशीं आहे भुलूं नको ॥ २ ॥ पिंडीं तें ब्रह्मांडीं बोलताती वेद । होईं तूं सावध भुलूं नको ॥ ३ ॥ भुललिया माया भ्रम तुज झाला । फिरसी वेळोवेळां चौऱ्यांयशी ॥ ४ ॥ चौऱ्यांयशी आवर्तनें होतीं गा तुज । सांगतसे गुज जीवीं धरा ॥ ५ ॥ भानुदास म्हणे सद्गुरु कारणें । पुरवील तुमचें पेणें निश्चयेंसी ॥ ६ ॥

७ अवतारादिक जाले कर्मभूमीं आले । विश्व जनीं देखिले आपुले डोळां ॥ १ ॥ देखिल्या स्वरूप तुझरे काय जन । तें काय म्हणोन सांगों स्वामी ॥ २ ॥ उद्धरत काय नाहीं आत्मज्ञान । देखिलें तें जाण सर्व वाव ॥ ३ ॥ वाव म्हणों तरी कोंदलें स्वरूप । लाधलिया माप मोजवेना ॥ ४ ॥ देखत देखत वेडावल जन । रूप डोळेवीण पाहूं जाती ॥ ५ ॥ भानुदास म्हणे सद्गुरूच्या लोभें । आहोचि तें उभें विटेवरी ॥ ६ ॥

## श्रीविठ्ठलमाहात्म्य.

८ अनादि परब्रह्म जें कां निजधाम । तें ही मुर्ति मेघःशाम विटेवरी ॥ १ ॥ जें दुर्लभ तिहीं लोकां न कळे ब्रह्मादिकां । तपें पुंडलिका जोडलेंसे ॥ २ ॥ जयातें पहातां श्रुती परतल्या नेति नेति । ती हे परब्रह्म मूर्ति विटेवरी ॥ ३ ॥ वेदां मौन्य पडे श्रुतीसी सांकडें । वर्णितां कुवाडें पुराणांसी ॥ ४ ॥ ज्ञानियाचें ज्ञान मुनीजनांचें ध्यान । ते परब्रह्म निधान विटेवरी ॥ ५ ॥ पुंडलिकाचे तपें जोडलासे ठेवा । भानुदास देवा सेवा मागे ॥ ६ ॥

९ अद्वय आनंद तो हा परमानंद । शोभे सच्चिदानंद विटेवरी ॥ १ ॥ सांवळें रूपडें गुणा अगोचर । उभा कटीं कर ठेऊनि विटे ॥ २ ॥ पीतांबर परिधान चंदनाची उटी । रुळे माळ कंठीं वैजयंती ॥ ३ ॥ भानुदास म्हणे ब्रह्म अगोचर । नेणवे विचार ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

१० वेदीं सांगितलें श्रुतीं अनुवादिलें । तें ब्रह्म कोंदलें पंढरीये ॥ १ ॥ वाळुवंटीं बुंथी श्रीविठ्ठलनामें । सनकादिक प्रेमें गाती जया ॥ २ ॥ भानुदास म्हणे तो हरि देखिला । हृदयीं सांठविला आनंदभरित ॥ ३ ॥

११ चंद्रभागेतीरीं उभा विटेवरी । विठ्ठल राज्य करी पंढरीये ॥ १ ॥ ऋद्धिसिद्धि धृती वोळंगती परिवार । न साहाती अवसर ब्रह्मादिकां ॥ २ ॥ सांडोनि तितुलें यथाबीजें केलें । कवणें चाळविलें कानडीयासी ॥ ३ ॥ उष्णोदक मार्जन सुगंधचर्चन । भीवरा चंदन पाट वाहे ॥ ४ ॥ रंभा तिलोत्तमा ऊर्वशी मेनिका । कामारी आणिका येती सर्व ॥ ५ ॥ कनकाचे परियेळीं रत्नाचे दीपक । सुंदर श्रीमुख ओवाळिती ॥ ६ ॥ संत भागवत सकल पारुषले । निःशब्द होऊनि ठेले तुजविण ॥ ७ ॥ रुक्मिणीबाई ती जाहलीसे उदास । पुंडलिका कैसें पडिलें मौन ॥ ८ ॥ येसी तरी येई पंढरीच्या राया । अगा कृपावर्या पांडुरंगा ॥ ९ ॥ धन्य पंढरपूर विश्रांति माहेर । धन्य भीमातीर वाळुवंट ॥ १० ॥ भानुदास म्हणे चला आम्हांसवें । वाचा ऋण देव आठवावें ॥ ११ ॥

१२ जैसा उपनिषदांचा गाभा । तैसा विटेवरी उभा । अंगींचिया दिव्य प्रभा । धवळिलें विश्व ॥ १ ॥ उगवती या सुरज्या । नवरत्नें बांधू पूजा । मुगुटीं भाव पैं दुजा । उपमा नाहीं ॥ २ ॥ दोन्ही कर कटीं । पीतांबर माळ गांठी । माळ वैजयंती कंठीं । कौस्तुभ झळके ॥ ३ ॥ कल्पद्रुम छत्राकार । तळीं त्रिभंगी बिढार । मुरली वाजवी मधुर । श्रुती अनुरागें ॥ ४ ॥ वेणुचेनि गोडपणें पवन पांगुळला तेणें । तोही निवे एक गुणें । अमृतधारीं ॥ ५ ॥ अहो लेणियाचें लेणें । नावरूखासी पैं उणें । विश्व बोधिले येणें । गोपाळवेषें ॥ ६ ॥ पुंडलिकाचेनि भावें । श्रीविठ्ठल येणें नांवें । भानुदास म्हणे दैवें । जोडलें आम्हां ॥ ७ ॥

१३ शंख चक्र गदाधरु । कासे सुरंग पीतांबरु । चरणीं ब्रीदाचा तोडरु । असुरावरी काढितसे ॥ १ ॥ बरवा बरवा केशिराजु । गरुडवहन चतुर्भुजु । कंठीं कौस्तुभ झळके बिजु । मेघःशाम देखोनी ॥ २ ॥ करी सृष्टीची रचना । नाभीं जन्म चतुरानना । जग हें वाखाणी मदना । तें लेकरूं तयाचें ॥ ३ ॥ कमळा विलासली पायीं । आर्त तुळशीचें ठायीं । ब्रह्मादिकां अवसरु नाहीं । तो यशोदे वोसंगा ॥ ४ ॥ उपमा द्यावी कवणे अंगा । चरणीं जन्मली पैं गंगा । सोळा सहस्र संभोगा । नित्य न पुरती कामिनी ॥ ५ ॥ अधिष्ठान गोदातीरीं ऋद्धिसिद्धि तिष्ठती द्वारीं । भानुदास पूजा करी । वाक्पुष्पें अनुपम्य ॥ ६ ॥

१४ लावण्य रूपडें पहा डोळेभरी । मूर्ति हे गोजिरी विटेवरी ॥ १ ॥ राही रखुमाई सत्यभामा आई । गरुड हनुमंत ठायीं उभे असती ॥ २ ॥ चंद्रभागा तीर्थ पुंडलीक मुनी । दक्षिणवाहिनी शोभतसे ॥ ३ ॥ वेणुनादीं काला गोपाळ करिती । भानुदासा तृप्ति पाहूनिया ॥ ४ ॥

१५ देखतांचि रूप विटेवरी गोजिरें । पाहतां साजिरें चरणकमळ ॥ १ ॥ पाहतां पाहतां दृष्टी धाये जेणें । वैकुंठीचें पेणें सहज हातीं ॥ २ ॥ भानुदास म्हणे लावण्य पुतळा । देखियेला डोळा पांडुरंग ॥ ३ ॥

१६ चतुर्भुज मूर्ति लावण्य रूपडें । पाहतां आवडे जीवा बहु ॥ १ ॥ वैजयंती माळा किरीट कुंडलें । भूषण मिरवलें मकराकार ॥ २ ॥ कासे सोनसळा पितांबर पिवळा । कस्तुरीचा टिळा शोभे माथे ॥ ३ ॥ शंख चक्र हातीं पद्म तें शोभलें । भानुदासें वंदिलें चरणकमळ ॥ ४ ॥

१७ गोड साजिरें रूपस । उभा आहे हृषिकेश । योगी ध्याती जयास । तो हा सर्वेश साजिरा ॥ १ ॥ रूप मंडित सगुण । शंख चक्र पद्म जाण । गळां वैजयंती भूषण । पीतांबर मेखळा ॥ २ ॥ कस्तुरी चंदनाचा टिळा । मस्तकीं मुकुट रेखिला । घवघवीत घनसांवळा ।

नंदरायाचा नंदनु ॥ ३ ॥ हरुषें भानुदास नाचे । नाम गातसे सदा वाचे । प्रेम विठोबाचें । अंगीं वसे सर्वदा ॥ ४ ॥

१८ उन्मनी समाधी नाठवे मनासी । पहातां विठोबासी सुख बहु ॥ १ ॥ आनंदाआनंद अवघा परमानंद । आनंदाचा कंद विठोबा दिसे ॥ २ ॥ जागृती स्वप्न सुषुप्ती नाठवे । पाहतां साठवे रूप मनीं ॥ ३ ॥ नित्यता दिवाळी नित्यता दसरा । पाहतां साजिरा विठ्ठलदेव ॥४॥ भानुदास म्हणे विश्रांतीचें स्थान । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ५ ॥

१९ जन्मोजन्मीं आम्हीं बहु पुण्य केलें । म्हणोनि विठ्ठलें कृपा केली ॥ १ ॥ जन्मोनी संसारीं जाहलों त्याचा दास । माझा तो विश्वास पांडुरंगीं ॥ २ ॥ आणिका दैवता नेघे माझें चित्त । गोड गातां गीत विठोबाचें ॥ ३ ॥ भ्रमर मकरंदा मधासी ती माशी । तैसें या देवासी मन माझें ॥ ४ ॥ भानुदास म्हणे मज पंढरीसी न्या रे । सुखें मिरवा रे विठोबासी ॥ ५ ॥

२० आलों दृढ धरुनी जीवीं । तो गोसवी भेटला ॥१॥ जन्ममरण हरला पांग । तुटला लाग प्रपंचा ॥ २ ॥ इच्छा केली ती पावलों । धन्य जाहलों कृतकृत्य ॥ ३ ॥ भानुदास म्हणे देवा । घ्यावी सेवा जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

२१ वेदशास्त्रांचें सार । तो हा विठ्ठल विटेवर ॥१॥ पुढें शोभे चंद्रभागा । स्नानें उद्धार या जगा ॥२॥ पद्मतळें गोपाळपूर । भक्त आणि हरिहर ॥३॥ भानुदास जोडोनी हात । उभा सामोरा तिष्ठत ॥ ४ ॥

## पंढरीमाहात्म्य.

२२ हेंचि साधकांचें स्थळ । भोळे वंदिती निर्मळ । अभाविक जे खेळ । तयां नावडे सर्वथा ॥१॥ तें हें जाणा पंढरपूर । मोक्ष मुक्तीचें माहेर । करती जयजयकार । वैष्णव ते आनंदे ॥२॥ टाळघोळ चिपुळ्या नाद । दिंड्या पताका मकरंद । गाती विठ्ठलनाम आल्हाद । अट्टाहास्य करूनी ॥३॥ भानुदास अहोरातीं । देवा करितसे विनंती । या वैष्णवांचे सांगाती । मज जन्म देई देवा ॥ ४ ॥

२३ न येसी योगियांच्या ध्याना । न बैससी मुनीजनांच्या मना । तो तूं पंढरीचा राणा । भीमातीरनिवासी ॥१॥ साक्ष असससी सर्वांभूतीं । असूनी न दिसे जगतीं । पांडुरंग बाळमुर्ति । प्रगट उभी विटेवरी ॥२॥ न कळे शास्त्रिकां संवाद । शब्दीं न सापडे बोध । तो तूं उभा परमानंद । पुंडलीक द्वारीं ॥३॥ वेदा अचोज आंबुला । श्रुती करती गलबला । तो तूं घननीळ सांवळा । भानुदासा अंतरीं ॥ ४ ॥

२४ आगम निगमांचें स्थान । सर्वां हेंचि प्रमाण । मुनिजनांचें ध्यान । ती ही मूर्ति विटेवरी ॥१॥ धन्य धन्य पंढरपूर । सर्व तिर्थांचें माहेर । जडजीवा उद्धार । पांडुरंग पाहतांची ॥२॥ उत्तम तीर्थ चंद्रभागा । स्नान करितां दोषभंगा । मध्यें पुंडलीक उभा । दरुशनें तारी जगत्र ॥३॥ भानुदास विनंती करी । प्रेमें नाचा महाद्वारीं । विठ्ठल डोळेभरी । पाहतां मुक्ति प्राणियां ॥ ४ ॥

२५ दांभिकाचा देव प्रतिमा धातूची । अज्ञान जनाची निष्ठा तेथें ॥१॥ योगियांचा देव हातांपायांविण । भक्तांचा सगुण विटेवरी ॥२॥ मानसीक पूजा कर्मठालागीं । केले कर्म भोगी निश्चयेसी ॥३॥ आमुचा हा देव दोहीं विलक्षण । निरालंब खूण आहे त्याची ॥४॥ साक्षीवाही साक्षी आनंद जिव्हाळा । भानुदास लीळा गुज सांगे ॥५॥

२६ देखोनिया पंढरपूर । जीवा आनंद अपार ॥१॥ टाळ मृदंग वाजती । रामकृष्ण उच्चारिती ॥२॥ दिंड्यापताकांचा मेळ । नाचती हरुषें गोपाळ ॥३॥ चंद्रभागा उत्तम स्थान-स्नानें पतीतपावन ॥४॥ पुंडलिका लागतां पायां । चुके येरझार वांयां ॥५॥ पाहतां विठ्ठलमूर्ती । भानुदासासी विश्रांती ॥ ६ ॥

२७ न मागतां कांहीं न करिता सेवा । आलासी गा देवा पंढरीये ॥१॥ तूं गा मायबाप विश्वासी तारक । तुवा पुंडलिक सुखी केला ॥२॥ चारिता गोधनें आलासी वा पायीं । पुंडलिक कांहीं न बोलेची ॥३॥ चिन्मयाचा दीप साक्षीत्वासी आला । भानुदास त्याला नाम झालें ॥४॥

२८ पंढरीचें सुख पुंडलिकासी झालें । तेणेंही वांटिलें भक्तांलागीं ॥१॥ भुक्तिमुक्ति वरदान दिधलें । तें नाहीं ठेविलें आपणापाशीं ॥ २ ॥ चंद्रभागे तीरीं आश्रम पुंडलिकाचा । तो विसावा तिर्थांचा तीर्थराव ॥ ३ ॥ एकें गुप्तरुप म्हणोनी मौनाचि धरिलें । एकीं चोहटा उभें केलें परब्रह्म ॥ ४ ॥ कटीं कर विराजित उभा असे निवांत । समचरण शोभत ध्यान मुद्रे ॥ ५ ॥ समदृष्टी साजिरी कमळनयन वरी । पितांबरधारी शामप्रभा ॥ ६ ॥ ऐसा बरवाया बरवंट उभा असे नीट । मस्तकीं मुगुट तेजःपुंज ॥ ७ ॥ भक्तिज्ञानवैराग्य दिधलें भजना । वैकुंठींचा राणा भाग्यवंतु ॥ ८ ॥ ऐसा सुखाचा सागरू । विठ्ठल कल्पतरु । पुंडलिक थोरु

भक्तराज ॥ ९ ॥ भानुदासस्वामी तपें पूर्ण झाला । तो भक्तजना झाला मायबाप ॥ १० ॥

२९ परलोकींची वस्तु पंढरीसी आली । ती दैवें फावली पुंडलिका ॥ १ ॥ घेतां देतां लाभ बहुतांसी जाला । विसावा जोडला पांडुरंग ॥ २ ॥ न करितां सायास वस्तुची आयती । वैष्णवीं बहुतीं वेटाळिलीं ॥ ३ ॥ भानुदासस्वामी कृपेचा सागरू । विठ्ठल कल्पतरु घोळला आम्हां ॥ ४ ॥

३० माणिकाचें तारूं चंद्रभागे आलें । भूषण तें जालें सनकादिका ॥ १ ॥ पंढरपूर हें नीळियाची खाणी । नवलाव साजणी देखियेला ॥ २ ॥ अवघिया देशांसी न्यावया पुरलें । आगरीं उरलें जैसें तैसें ॥ ३ ॥ भानुदास म्हणे नीळ हा चोखडा । सुजड़ हा जडा जीवन मुद्रा ॥ ४ ॥

३१ धन्य धन्य हें नगर । भूवैकुंठ पंढरपूर ॥ १ ॥ धन्य धन्य चंद्रभागा । मध्यें पुंडलिक उभा ॥ २ ॥ धन्य धन्य वेणुनाद । क्रीडा करितो गोविंद ॥ ३ ॥ धन्य पद्माळ्याची पाळी । गाई चारी वनमाळी ॥ ४ ॥ धन्य पंढरीचा वास । देवा गाये भानुदास ॥ ५ ॥

३२ भाविकासाठीं उभा । विठु कैवल्याचा गाभा ॥१॥ युगें झालीं अठ्ठाविस । उभा पुंडलिका पाठीस ॥ २ ॥ न मानी कांहीं शीण । उभा तिष्ठत अज्ञेन ॥ ३ ॥ ऐसा कृपाळु दीनाचा । भानुदास म्हणे साचा ॥ ४ ॥

३३ पंढरीचें सुख पाहतां अलौकिक । वैकुंठनायक उभा जेथें ॥ १ ॥ देवां जें दुर्लभ भक्तांसी सुलभ । रुक्मिणीवल्लभ उभा विटे ॥ २ ॥ वैष्णवांचा मेळ करिती गदारोळ । त्यामाजीं गोपाळ सप्रेमें नाचे ॥ ३ ॥ जिकडे पाहे तिकडे होय ब्रह्मानंद । भानुदास आनंदें गात असे ॥ ४ ॥

३४ धर्मशास्त्रीं आहे नीत । पुनीत क्षेत्र सप्तपुऱ्या ॥ १ ॥ काशी आदि असती सप्त । परि पवित्र पंढरी ॥ २ ॥ न बाधीच पापलेश । ऐसा उल्हास नामाचा ॥ ३ ॥ सदाकाळीं वैष्णवजन । गाती पावन रामहरी ॥ ४ ॥ धन्य त्यांचा रहिवास । नित्य गातो भानुदास ॥ ५ ॥

३५ आंवडोनि कर कटीं । पाऊलें नेहटीं विटेवरी ॥ १ ॥ त्याचा छंद माझे जीवा । नाहीं हेवा आणिक ॥ २ ॥ कांया वाचा आणि मन । लोभलें सगुण रूप देखतां ॥ ३ ॥ भानुदास म्हणे दृष्टी । पहातां गोमटी मूर्ति ते ॥ ४ ॥

## नाममहिमा.

३६ आमुचिये कूळीं पंढरीचा नेम । मुखीं सदा नाम विठ्ठलाचें ॥ १ ॥ न कळे आचार न कळे विचार । न कळे वेव्हार प्रपंचाचा ॥ २ ॥ असो भलते ठायीं जपूं नामावळी । कर्माकर्म होळी होय तेणें ॥ ३ ॥ भानुदास म्हणे उपदेश आम्हां । जोडिला परमात्मा श्रीराम हा ॥ ४ ॥

३७ जपतां नाम विठ्ठलाचें । भय नाहीं हो काळाचें ॥ १ ॥ नाममंत्र त्रिअक्षर । करी सदा तो उच्चार ॥ २ ॥ विठ्ठलनामें सुख आनंद । भानुदासा परमानंद ॥ ३ ॥

३८ तुमचें नाम गोड नाम गोड । पुरवी कोड जीवाचें ॥ १ ॥ वाचे सुलभ नामावळी । महादोषां होय होळी ॥ २ ॥ सुख अनुपम्य गातां नाम । भानुदास म्हणे आम्हां विश्राम ॥ ३ ॥

३९ नामाचा महिमा शुक सांगे । परीक्षिती राजा जाणे अंगें ॥ १ ॥ जपतांचि रामकृष्ण नामें । दहन होती कर्माकर्में ॥ २ ॥ नामें दया शांति क्षमा । नामें शीतळ शंकर उमा ॥ ३ ॥ नाम जप ध्यानीं मनीं । भानुदास वंदितो चरणीं ॥ ४ ॥

४० एक नामापरतें साधन । नाहीं नाहीं दुजें आन ॥ १ ॥ वायां धावती बराडी । करती संसाराची जोडी ॥ २ ॥ न चुके जन्ममरण वेरझारा । हें तो न कळे पामरा ॥ ३ ॥ नामावांचुनी जें जें कर्म । अवघा जाणा तो अधर्म ॥ ४ ॥ भानुदास प्रेमें नाचे । सदा नामघोष वाचे ॥ ५ ॥

४१ चार युगांमाजीं पावन । कलिमाजीं सोपें भजन ॥ १ ॥ मना दृढ करूनि साचा । विठ्ठल विठ्ठल वदे वाचा ॥ २ ॥ संकल्प विकल्प नको भिन्न । तेणें पावे हरिचरण ॥ ३ ॥ नामें जीवींचा जिव्हाळा । भानुदासा जीवनकळा ॥ ४ ॥

४२ तारक नाम सोपें साचें । विठ्ठल विठ्ठल वदतां वाचे ॥ १ ॥ जन्ममृत्यूचें खंडन । पापातापाचें दहन ॥ २ ॥ नामें निजध्यास देखा । भानुदासा सुखें सुखा ॥ ३ ॥

## रामनाममहिमा.

४३ श्रीराम आम्हां सोयरा सांगाती । नाहीं पुनरावृत्ति जन्म कर्म ॥ १ ॥ तुटती यातना देहाचा संबंध । श्रीराम बोध ठसतां जीवीं ॥ २ ॥ वेरझार खुंटली वासना तुटली । वृत्ती हे जडली श्रीरामपायीं ॥ ३ ॥ भानुदास म्हणे कुळींचें दैवत । श्रीराम समर्थ अयोध्येचा ॥ ४ ॥

४४ भवसिंधू तरावया सोपें हें वर्म । मुखीं तो श्रीराम जप सदा ॥ १ ॥ यमाची यातना न घडे बंधन । तुटेल हें जाण कर्माकर्म ॥ २ ॥ योग याग तपें घडती तीर्थाटन । मुखीं गातां नारायण जोडे सर्व ॥ ३ ॥ भानुदास म्हणे कलिमाजीं सोपें । नामस्मरण जपे श्रीविठ्ठलाचें ॥ ४ ॥

४५ बैसोनी अनुष्ठान रामनाम ध्यान । यापरि साधन नेणें कांहीं ॥ १ ॥ एकाविध भाव दृढता हें मन । यापरि साधन आन नाहीं ॥ २ ॥ परद्रव्य परदारेचा विटाळ । यावीण निर्मळ तप नाहीं ॥ भानुदास म्हणे रामनाम गुडी । लावली चोखडी कलियुगीं ॥ ४ ॥

४६ पशुपक्षी श्वापद कीटक भ्रमर । रामनामें उद्धार एकाचि होय ॥ १ ॥ म्हणोनियां करा नामाचें चिंतन । तुटेल बंधन यमपाश ॥ २ ॥ सोपें वर्म तुम्हां सांगितलें गुज । भानुदास निज जप करी ॥ ३ ॥

४७ शरणागत जाहलिया उपेक्षीना देव । हा आहे अनुभव माझे देहीं ॥ १ ॥ हो का राव रंक कुळ यातिहीन । करतां नामस्मरण न वंची देव ॥ २ ॥ भानुदास म्हणे स्मरा त्या रामासी । चुकेल चौऱ्यांयशी वेरझार ॥ ३ ॥

४८ कल्पना अविद्या सांडोनिया गोडी । रामनाम जोडी करी बापा ॥ १ ॥ येर ते मायीक नको पडूं छंदा । आठवीं गोविंदा एकपणें ॥ २ ॥ द्वैताची ते वाढी छेदूनियां काढी । नामाची तूं गुढी उभवीं सदा ॥ ३ ॥ भानुदास म्हणे सांडोनी कल्पना । चिंतीं तूं चरणा विठोबाच्या ॥ ४ ॥

## मुमुक्षूस बोध.

४९ ये संसारी बहुता वाटा । सिद्धा साधका सुभटा । दीप देहींचा गोमटा । तंवची ठाका सुपंथू ॥ १ ॥ मग आयुष्याच्या अस्तमानीं । पडलिया काळाच्या वदनीं । ते वेळें न राखे मायराणी । वडघा जंखिणी प्राणियां ॥ २ ॥ मार्गु सांपडला निगुती । ध्रुव प्रल्हाद परीक्षिती । आम्ही तयाचे सांगाती । भावें भक्ती अनुसरलों ॥ ३ ॥ लहाना आणि सहाना । इडा पिंगळा सुषुम्ना । पवनपंथें योगी जाणा । ब्रह्मस्थाना न्यावया ॥ ४ ॥ तेथें सप्त धातूंची आटणी । या नांव बोलिजे कुंडलिनि । ती तंव असाध्य कहाणी । तुम्ही त्या पंथें नव जावें ॥ ५ ॥ एक यज्ञाचेनि बळें । इच्छी स्वर्गांचीं फळें । दिवस चारी सोहळे । पुरती इंद्रियांचे ॥ ६ ॥ तप वेंचलिया पुढती । मागुती मृत्यूलोकीं लोटिती । तेथें आहे पुनरावृत्ती । तुम्ही त्या पंथें नव जावें ॥ ७ ॥ नाना बळिदानें देती । गळां वोखदें बांधिती । क्रूर दैवतें पूजिती । ते काय पुरविती इच्छिलें ॥ ८ ॥ तैसा नव्हे लक्ष्मीपती । त्याची कोणी न करिती भक्ती । मूढ सितरले नेणों किती । तया होय गती यमपंथु ॥ ९ ॥ तीर्थे तीर्थे प्रदक्षिणा । क्षमा नाहीं अंतःकरणा । कोप आलिया उगाणा । होय केलीया पुण्याचा ॥ १० ॥ तैसीच प्रतिज्ञा मतें । गर्वें वाहवलीं बहुतें । तुम्हीं नव जावें तया पंथें । साधुसंगती अनुसरा ॥ ११ ॥ हरिश्चंद्र सूर्यवंशी । तेणें ठाकिली हो काशी । अर्थ दिधला महंतासी । स्त्रीपुत्रांसी विकुनी ॥ १२ ॥ तैसेंच बळी बिभीषण । हनुमंत उद्धव अक्रूर जाण । रुक्मांगद सुलक्षण । येणेंचि पंथें उद्धरले ॥ १३ ॥ मेघ वर्षती धारा प्रबळा । तेणें वाहाती नदी नद वोहळा । त्या मीनलीया सिंधु जळा । अगाधपण पावती ॥ १४ ॥ तैसी ही विद्या पाहा हो । श्रीगुरुचरणीं प्रेमभावो । भानुदास म्हणे हा उपावो संसार वावो निस्तरेल ॥ १५ ॥

५० मनासी करीं पां रे बोध । आतां लवकरी होईं सावध । सांडी द्वैत भेदाभेद । वाचे उच्चारी रामकृष्णगोविंद ॥ १ ॥ व्रत करीं एकादशी । नेमें जाई पंढरीसी । आषाढी आणि कार्तिकीसी । दोन्हीं वारीसीं चुकों नको ॥ २ ॥ सोपें वर्म म्हणे भानुदास । नाचा गातां माना उल्हास । आणिक नको बा हव्यास । साधीं साधन हेंचि सोपें ॥ ३ ॥

५१ योगाचिया आटी नको धरूं पोटीं । वायां शीण तळवटीं तुज होय ॥ १ ॥ यज्ञाचिया आटी नको धरूं पोटीं । वांया शीण तळवटीं तुज होय ॥ २ ॥ जपाचिया आटी नको धरूं पोटीं । वांया शीण तळवटीं तुज होय ॥ ३ ॥ तपाचिया आटी धरूं नको पोटीं । वांया शीण तळवटीं तुज होय ॥ ४ ॥ अनुष्ठानाचिया

आटी नको धरूं पोटीं। वायां शीण तळवटीं तुज होय ॥ ५ ॥ भानुदास म्हणे रामनामें गोष्टी। धन्य तूं सृष्टीमाजीं होई ॥ ६ ॥

५२ कामाचिया सोसें पडशी पतनीं। यमाची जाचणी बहु असे ॥ १ ॥ क्रोधाचिया सोसें पडशी पतनीं। यमाची जाचणी बहु असे ॥ २ ॥ मदाचिया सोसें पडशी पतनीं। यमाची जाचणी बहु असे ॥ ३ ॥ लोभाचिया सोसें पडशी पतनीं। यमाची जाचणी बहु असे ॥ ४ ॥ भानुदास म्हणे सांडोनिया सोस। होई रे उदास सर्व भावें ॥ ५ ॥

५३ आशेचिया सोसें गुंतसी पामरा। न चुकती वेरझारा चौऱ्यांशीच्या ॥ १ ॥ मदाचिया सोसें गुंतसी पामरा। न चुकती वेरझारा चौऱ्यांशीच्या ॥ २ ॥ तृष्णेचिया सोसें धांवशी पामरा। न चुकती वेरझारा चौऱ्यांशीच्या ॥ ३ ॥ कल्पनेच्या मागे धांवशी कल्पका। न पावसी सूखा बुडसी वांयां ॥ ४ ॥ भानुदास म्हणे सर्व हें सोडुनी। एक चक्रपाणी सखा करीं ॥ ५ ॥

५४ साधनाच्या अटी नको रे कपाटीं। पंढरी वैकुंठ पाहें डोळां ॥ १ ॥ मंत्राच्या आटी पडशील व्यसनीं। पंढरी जाउनि पाहे डोळां ॥ २ ॥ तपाचिया आटी पडशी डोंगरीं। पाहे पां पंढरी डोळेभरी ॥ ३ ॥ यज्ञाच्या आटी फिरूं नको देशा। पंढरीनिवासा पाहे डोळां ॥ ४ ॥ भानुदास म्हणे नामाचा हव्यास। पंढरी सुखास पात्र होशी ॥ ५ ॥

५५ भांवावसी कां रे माझें माझें म्हणसी। कोण हे कोणासी कामा आले ॥ १ ॥ घेई तूं अनुभव कोणाचे ते कोण। अंतकाळीं जाण पारखे होती ॥ २ ॥ जवळी असतां धन कांहीं रुका। तेव्हां म्हणती सखा दादा भाई ॥ ३ ॥ हीनपणें म्हणती अभागी करंटा। जन्मला फुकटा मरतां बरें ॥ ४ ॥ भानुदास म्हणे ऐसें हे जन। परी माझें माझें जाण करिती वांया ॥ ५ ॥

५६ नको फिरूं रानीं वनीं तूं दुर्गघाट। सोपी आहे वाट पंढरीची ॥ १ ॥ नको करूं जप तप अनुष्ठान। सोपी आहे जाण पंढरी हे ॥ २ ॥ नको जाऊं तीर्था मनाच्या हव्यासें। जाई तूं उल्हासें पंढरीसी ॥ ३ ॥ नको करूं योग अष्टांग निर्वाण। सोपें तें भुवन पंढरी जगीं ॥ ४ ॥ भानुदास म्हणे सोपें वर्म राम। कासयासी श्रम करिसी बहु ॥ ५ ॥

## करुणा.

५७ जें आकाश घर पडों पाहे। ब्रह्मगोळ भंगा जाये। वडवानळ त्रिभुवन खाये। तरी तुझीच वाट पाहें गा विठोबा ॥ १ ॥ न करीं आणिकांचा पांगिला। नामधारक तुझाचि अंकिला ॥ ध्रु. ॥ सप्त सागर एकवट होती। जैं हे विरूनी जाय क्षिती। पंचमहाभुतें प्रलय पावती। परि मी तुझाचि सांगाती गा विठोबा ॥ २ ॥ भलतैसें वरपडो भारी। नाम न संडों टळों निर्धारी। जैसी प्रतिव्रता प्राणेश्वरी। विनवी भानुदास म्हणे आधारी गा विठोबा ॥ ३ ॥

५८ अगा पंढरिनाथा ऐसें काय केलें। मज उपेक्षिलें अनाथासी ॥ १ ॥ त्रैलोक्याचे ठायीं मज नसे कोणी। ऐसें चक्रपाणी ठावें तुज ॥ २ ॥ कोणाचे आधारें असावें म्यां येथें। जन्मविलें व्यर्थ कां गा मज ॥ ३ ॥ आम्हांसी क्लेशांत बहु पाडियेलें। काय हातां आलें तुझ्या देवा ॥ ४ ॥ आमुच्या भक्तीचे अर्थ करितां पूर्ण। भानुदास म्हणे जाण दुजा कोण ॥ ५ ॥

५९ तुम्ही कराल जें काय एक नोहे। ब्रह्मांड अवघे हें उभाराल ॥ १ ॥ तुझिया सत्तेनें सकळांचा प्राण। चालतसे जाण ब्रह्मांड हें ॥ २ ॥ तुझिया सामर्थ्या नाहीं अंतपार। तेथें मी किंकर काय जाणें ॥ ३ ॥ सर्व अपराधी शरण मी पतित। उपेक्षा त्वां मातें न करावी ॥ ४ ॥ भानुदास म्हणे पुरवा मनोरथ। तुम्ही अनाथनाथ पांडुरंगा ॥ ५ ॥

६० चंचळ हें मन नावरे माझ्यानें। कामाच्या व्यसनें पीडितसे ॥ १ ॥ अविवेकाचें बळ झालें असे फार। धांवती षड्विकार सैरावैरां ॥ २ ॥ विवेकाची शक्ति होऊनिया क्षीण। सत्कर्मासी हीन बुद्धि झाली ॥ ३ ॥ चित्ताचा चालक अगा सूत्रधारी। भानुदासा हरी कृपा करीं ॥ ४ ॥

६१ अधोगती आम्हीं जावें पंढरीनाथा। ऐसें तुझ्या चित्ता आलें काय ॥ १ ॥ पडिलों पदरीं अन्यायी मी दीन। नेई सांभाळून कैसें तरी ॥ २ ॥ मज अनाथाची परिसावी विनंती। भानुदास स्तुति करीतसे ॥ ३ ॥

६२ ऐशियासी कृपा करावी त्वरित। पुरवा मनोरथ सर्व माझे ॥ १ ॥ काकुळती कवणा येऊं तुजाविण। दुःख निवारण कोण करी ॥ २ ॥ त्रैलोक्य पालन करिसी सर्वकाळ। त्याहुनि आगळें होंचि काय ॥ ३ ॥

तुझिया पायांचा मजला आधार। कैंवि तूं निष्ठुर जाहलासी ॥ ४ ॥ आमुचे अन्याय न धरावे चित्तीं। सर्व कृपामूर्ति पोटीं घाली ॥ ५ ॥ कर्म धर्म माझें उत्तम आचरण । न न पाहें पावन करीं मज ॥ ६ ॥ भानुदास म्हणे कृपेचें पोसणें । परि नारायणें सांभाळावें ॥ ७ ॥

६३ देवा कोठवरी अंत पाहतोसी । प्राण कंठापाशीं ठेवियेला ॥ १ ॥ पळमात्र चित्ता नाहीं समाधान । चिंतेनें व्यापून घेतलेंसे ॥ २ ॥ नानापरीचें दुःख येवोनी आदळत । शोकें व्याकुळ चित्त होत असे ॥ ३ ॥ यासी तो उपाय न कळेचि मज । शरण आलों तुज देवराया ॥ ४ ॥ इच्छा पुरवुनी सुखरूप ठेवी। भानुदास पायीं ठाव मागे ॥ ५ ॥

६४ मज निरविलें कोणाचिये हातीं । वैकुंठीं श्रीपती राहिलासी ॥ १ ॥ कोणी नाहीं मज ठाऊक तुजला। संकटाचा घाला कैसा केला ॥२॥ दुरी टाकुनियां केलें निष्ठुर । दुःखानें बेजार केलें मज ॥ ३ ॥ काय राग आला तुझिया मनांत। तयामुळें शोकांत पाडियेलें ॥४॥ अन्यायाची राशी देहाचि सगळा। हा राग गोपाळा न मानावा ॥५॥ क्षमा करीं माझे सर्व अपराध । न धरावा भेद कांहीं देवा ॥ ६ ॥ भानुदास म्हणे अंगिकार त्वरित । करुनी आनंदांत ठेवा पायीं ॥ ७ ॥

६५ कोठवरी धांवा करूं तुझा देवा । श्रम झाले जीवा फार माझ्या ॥ १ ॥ अझुनियां कां गा न येसी त्वरित । दुःखानें बहूत जाकळिलों ॥ २ ॥ कंठ रोधियेला श्वासावरी श्वास । घालुनी नेत्रास नीर वाहे ॥ ३ ॥ दाही दिशा मज वाटती उदास । झाला कासाविस प्राण माझा ॥ ४ ॥ हीन कर्म माझें फुटकें अदृष्ट। म्हणवोनि संकट ऐसें झालें ॥ ५ ॥ भानुदास म्हणे पहातां चरण । तळमळ जाण शांत झाली ॥ ६ ॥

६६ दीनबंधु ब्रीद भले । जरी त्वां चरणीं बांधिले। तरी कां आम्हां उपेक्षिले । सांगे पंढरीराया ॥ १ ॥ जळ बुडवी पाषाण । जडकाष्ठ तारी पूर्ण । आपण वाढविलें म्हणोन । सांगे पंढरीराया ॥ २ ॥ जीवनीं हा अभिमान । तूं तंव जगाचें जीवन । ब्रीद आपुलें सांभाळी पूर्ण । पंढरीराया ॥ ३ ॥ माता ती क्रोध दृष्टी । परते बाळकासी लोटी । तरी तें चरणीं घाली मिठी । पंढरीराया ॥ ४ ॥ सबळ काष्ठ कोरी भ्रमर। परि कमळ रक्षी निर्धार । तैसा तूं प्रीतिकर । पंढरीराया ॥ ५ ॥ शरण निजभावेंसी । भानुदास सेवेसी । तया तूं नुपेक्षिसी । सांगे पंढरीराया ॥ ६ ॥

६७ पतीत म्हणोनि जाहलों शरणागत । अनाथाचा नाथ म्हणती तुम्हां ॥ १ ॥ तें आपुलें ब्रीद सांभाळी अनंता । नको पा परता दास तुझा ॥ २ ॥ तुझा दास म्हणोनि जगीं जाहली मात । अनाथांचा नाथ तूंतें म्हणती ॥ ३ ॥ भानुदास म्हणे सांभाळी वचन । पतीतपावन ब्रीद जगीं ॥ ४ ॥

६८ अनाथांचा नाथ भक्तांचा कैवारी । ऐसें चराचरीं ब्रीद गाजे ॥ १ ॥ तें आम्हां सांपडलें सोपें धर्म हातां । म्हणोनि अच्युता बोलतसों ॥ २ ॥ आम्हीं पतितांनीं घालावें सांकडें । उगवणें कोडें तुमचे हातीं ॥ ३ ॥ भानुदास विनवी चरणीं ठेवूनि माथा । सांभाळी अनाथनाथा आम्हांलागीं ॥ ४ ॥

६९ दीन आम्हीं रंक पतीत पतीत । पावन तूं अनंत स्वामी माझा ॥ १ ॥ धरला भरवंसा नामावरी चित्त । नाहीं दुजा हेत मनीं कांहीं ॥ २ ॥ देणें घेणें नको पुरला मनोरथ । बोलणें ती मात वेगळी असे ॥३॥ भानुदास म्हणे अहो पंढरीराया । कृपा करी सखया धरी हातीं ॥ ४ ॥

७० अहो श्रीरामा पतीतपावना । तारी मज दीना रंकपणें ॥ १ ॥ गाजे त्रिभुवनीं उदार ती ख्याती । वेदही वर्णिती महिमा तुझा ॥ २ ॥ भानुदास म्हणे श्रीरामा दयाळा । पाळा बरवा लळा उदारपणें ॥ ३ ॥

७१ भाकितों करुणा पंढरीच्या राया। अगा यादवराया श्रीकृष्णरामा ॥१॥ तूं माय माउली जीवीं जीवनकळा। भक्तांचा लळा पुरविसी ॥२॥ आवडे सावडे भक्तांचें कीर्तन । नाचसी येऊन निरभिमानें ॥ ३ ॥ भानुदास म्हणे पुरवी माझे लळे। विठ्ठले सांवळे माऊलीये ॥४॥

७२ अहो पांडुरंगा पतीतपावना । आमुची विज्ञापना एक असे ॥ १ ॥ नामाचा उच्चार संतांचा सांगात। पुरवावा हेत जन्मोजन्मीं ॥ २ ॥ भलतीये याती भलतीये कुळीं । जन्म दे निर्धारीं देवराया ॥ ३ ॥ भानुदास म्हणे दुजा नको धंदा । रात्रंदिवस गोविंदा वाचे नाम ॥ ४ ॥

७३ वेदांत सिद्धांत ऐकोनियां गोष्टी । मन जाहलें चावटी देवराया ॥ १ ॥ परि त्याचा बोध नये कांहीं चित्ता । फजिती तत्त्वतां मागें पुढें ॥ २ ॥ संसाराचें

जाळें पडतसे गुंती। करितां कुंथाकुंथी न निघेची ॥३॥ भानुदास म्हणे सांवळ्या श्रीरामा । देई तुझा प्रेमा दुजें नको ॥ ४ ॥

७४ माझा तो भरंवसा तुझे नामीं आहे। येणें कार्य होय आमुचें देवा ॥ १ ॥ तूं जगाचें जीवन मनाचें मोहन । ब्रह्म सनातन तूंचि देवा ॥ २ ॥ स्थावर जंगम जगीं प्रकाशला । हा अचोज अबोला दिसे देवा ॥ ३ ॥ भानुदास म्हणे विश्रांतीसी स्थान । पंढरीवांचून दुजें नाहीं ॥ ४ ॥

७५ तुझिया रूपाची आवडी मज देवा । वाचेसी तो हेवा रामनाम ॥ १ ॥ श्रवणीं ऐकेन तुमचे पोवाडे । दुजें वाडेंकोडें न करी कांहीं ॥ २ ॥ चरणें प्रदक्षिणा घालीन लोटांगणा । वंदीन चरणा संतांचिया ॥ ३ ॥ भानुदास म्हणे हीच मति स्थिर । रामराम निर्धार गाईन मुखीं ॥ ४ ॥

७६ श्रवणीं कीर्ती ऐकेन मुखें नाम गाईन । डोळे-भरी पाहीन श्रीमुख देवा ॥ १ ॥ चरणें करीन प्रदक्षिणा नमन चरणा। घालीन लोटांगणा संतद्वारीं ॥ २ ॥ एकादशी व्रत जागर निराहारी। द्वादशी क्षीरापती निर्धारी सेवीन मी ॥ ३ ॥ भानुदास म्हणे हाचि माझा नेम। दुजा कांहीं श्रम न करी आन ॥ ४ ॥

७७ इहीं श्रवणीं तुझे गुणनाम ऐकेन। इहीं चरणीं तीर्थपंथे चालेन ।नाशिवंत देह कवणीये काजा। ऐसी प्रेमभक्ति देई सहजा ॥१॥ अखंड तुझे नाम उच्चारी। तेणें संसारा होय उजरी ॥ ध्रु. ॥ शालीग्राम तीर्थे करीन आंघोळी।हरिदासाचे चरणरज लावीन कपाळीं। कंठमंडित तुळशी माळी। तन मन प्राण तुम्हते वोवाळी ॥ २ ॥ उदरव्यथेलागीं मी न करी धंदा। उच्छिष्ट प्रसादें हरावी हे क्षुधा। आपली स्तुति आणि परावीया निंदा। हे दोन्ही आतळों नेदी गोविंदा॥ ३॥ सर्वाभूती रामा तूंतेंचि देखे। तुझेनि प्रसादें सदा संतोषे। देवा भानुदास मागे इतुकें। चाड नाही आम्हां वैकुंठ लोके ॥ ४ ॥

७८ एकाचिये घरीं द्वारपाळ होय । एकासि ते पाहे खांदा वाहे ॥ १ ॥ एकाचिया घरीं उच्छिष्ट ते काढी। एकाची आवडी उभा राहे ॥ २ ॥ एका घरीं कण्या आवडीनें खाय। एका घरीं न जाय बोलावितां ॥ ३ ॥ एकाचिये घरीं उच्छिष्ट भातुकें। खाय कौतुकें मिटक्या मारी ॥ ४ ॥ भानुदास म्हणे आवडीच्या सुखा। भुलोनियां देखा लोणी खाये ॥ ५ ॥

७९ शेबडीं वाकुडीं गौळियांचीं पोरें। तेथें नाचे निर्धारें आवडीनें ॥ १ ॥ जाणते वेदांती न करिती तिकडे तोंड। म्हणे हे तों होती भांड शाब्दिक ते ॥ २ ॥ चोरितांना लोणी बांधिती गौळणी। तेथें काक-ळूनि पाय धरी ॥ ३ ॥ यज्ञाचे ठायीं अवदान नेघे। विदुरासी मागे आणि कण्या ॥ ४ ॥ भानुदास म्हणे जाणते नेणते। दोनी ते सरते होता पायीं ॥ ५ ॥

८० जें सुख क्षीरसागरीं पेकिजे। तें या वैष्णवा मंदिरीं देखिजे ॥ १ ॥ धन्य धन्य ते वैष्णवमंदिर। जेथें नाम घोष होय निरंतर ॥ २ ॥ दिंडीपताका द्वारीं तुळशीवृंदावनें। मन निवता हे नामसंकीर्तनें ॥ २ ॥ ज्याच्या दरुशनें पापताप जाय। भानुदास तयासी गीतीं गाये ॥ ४ ॥

८१ तुम्ही कृपानिधी संत। मी पतीत अन्यायी ॥ १ ॥ सलगी बोलियेलों फार। न कळे निर्धार योग्यता ॥ २ ॥ म्हणवीं दास तुमचा देवा। करितों हेवा पुढिल्याचा ॥ ३ ॥ उच्छिष्ट प्रसादाची आस। म्हणे भानुदास तुमचा ॥ ४ ॥

## बालक्रीडा.

८२ उठी तात मात भये प्रात रजनी सो तीमीर गई। मीलत बाल सकल ग्वाल सुंदर कान्हाई ॥ १ ॥ जागो गोपाला लाल जागो गोविंदलाल जननी बल जाई ॥ ध्रु. ॥ संगीत-सब फीरत बयन तुमबीन नहीं छुटत नहीं दयन। त्यजो शयन कमलनयन सुंदर मुख भई ॥ २ ॥ मुखती पट दूर किजो जननीकु दर्श दीजो। दधीं खीर मांगली जो खीर खांड मिठाई ॥ ३ ॥ जमत जमत शामराम सुंदरमुख सदा राम। थाथी कीं छुट कछु भानुदास पायीं ॥ ४ ॥

## गौळण.

८३ वृंदावनीं वेणू कवणाचा माये वाजे। वेणूनादें गोवर्धनू गाजे। पुच्छ्र बसरूनि मयोर विराजे। मज पाहतां भासती यादवराजे ॥ १ ॥ तृण चारा चरूं विसरली। गाई व्याघ्र एके ठायीं जालीं। पक्षी कुळें निवांत राहिलीं। वैरभाव समुळ विसरली ॥ २ ॥ यमुना जळ स्थिर स्थिर वाहे। रविमंडळ चालतां स्तब्ध होय । शेषकूर्म वराह चकित राहे। बाळा स्तन देऊं विसरली माय ॥ ३ ॥ ध्वनी मंजुळ मंजुळ

उमटती । वांकी रुणझुण रुणझुण वाजती । देव विमानीं बैसोनि स्तुती गाती । भानुदासा फावली प्रेम भक्ती ॥ ४ ॥

८४ जमुनाके तट धेनू चरावत । राखत है गइया ॥ १ ॥ मोहन मेरा सांइया ॥ धृ. ॥ मोरपत्र शिरी छत्र सुहावे । गोपी धरत बहीया ॥ २ ॥ भानुदास प्रभु भगतनको वत्छल । करत छत्र छाइया ॥ ३ ॥

## फुगडी.

८५ ऐक साजनी वो बाई । तुम्हा एवढें थोर नाहीं । भाव केला घरजांवाई । खावयासी तूप सेवाई ॥ १ ॥ फु फु फु फू फुगडी गे । तुम्ही आम्ही खेळु दोघी गे ॥धृ.॥ प्रपंच केला गोड सगळा गे । ज्ञान फुगडीवर समला गे । प्रेम तिचा चांगट गे । सुंदर पहांता अलगट गे ॥ २ ॥ शांती सोयरी सखी माझी गे । तिची बरी संगत काजी गे । तिचा हात धरितां गेली माझी गे । मोह ममतेची बीज माजी गे ॥ ३ ॥ फुगडी खेळतां हात शिणला गे । अंतरीचा द्वैत भेद गेला गे । हृदयीं प्रकटला ज्ञानदीप गे । गेली अज्ञानाची झोंप गे ॥ ४ ॥ दया क्षमा तिची बहीण गे । तिशी म्यां धरीले कवळुन गे । फुगडी खेळतां आला शीण गे । गरगर भोंड गेली जिरुन गे ॥५॥ ऐशी फुगडी खेळले गे । परब्रह्मीं सुख आगविले गे । भानुदास म्हणे रंगलों गे । जन्ममरण हरलों गे ॥ ६ ॥

## काला.

८६ अवघ्या सोडियेल्या मोटा । आजीचा दहींकाला गोमटा ॥ १ ॥ घ्या रे घ्या रे दहींभात । आम्हां देतो पंढरीनाथ ॥ २ ॥ मुद्रा घेऊनियां करीं । पेंद्या वांटितो शिदोरी ॥ ३ ॥ भानुदास गीतीं गात । प्रसाद देतो पंढरीनाथ ॥ ४ ॥

८७ गुढीयेसी सांगूं आलें । कंस चाणूर मार्दिले ॥१॥ हर्षें नाचताती भोजें । जिंकियेले यादवराजे ॥ २ ॥ गुढी आली वृंदावना । मथुरा दिली उग्रसेना ॥ ३ ॥ जाला त्रिभुवनीं उल्हास । ललीत गाये भानुदास ॥४॥

८८ गाई गोप विप्राचार संध्यावंदन । अपूज्य लिंगा पूजन साधू दरुशन ॥ १ ॥ जयजय सुशब्द बोलती जन । कोटि युगें राज्य करी रघुनंदन ॥ २ ॥ भरत शत्रुघ्न जवळी लक्ष्मण । शौर्य विद्या साजे रघुनंदन ॥ ३॥ कौसल्या सुमित्रा वोवाळिती रामातें । देवा भानुदास गुण गातसे तेथें ॥ ४ ॥

८९ अशिर्वाद देती भार्गव तो राम । विजय मेघः-श्याम होई सुत्रें ॥ १ ॥ राज्य करी बळें सर्वत्रीं आनंद । नाहीं दुजा शब्द रामा तुर्शी ॥ २ ॥ भानुदास म्हणे आनंदें श्रीराम । सुखरूप आत्माराम अयोध्या-धीश ॥ ३ ॥

९० रायें कंठमाळ देवासी घातली । देवें त्या दिधली भानुदासा ॥ १ ॥ कोणीं नेली माळ करती त्याचा शोध । देखिली प्रसिद्ध याचे गळां ॥ २ ॥ राजदूतीं नेला म्हणती गे हे चोर । रायानें विचार नाहीं केला ॥ ३ ॥ सुळीं द्यावया भानुदास नेला । तेणें आठविला पांडुरंग ॥ ४ ॥

९१ कोरडिया काष्ठीं अंकुर फुटले । येणें येथें जाले विठोबाचे ॥ १ ॥ समर्थाचा आम्हीं धरिला आधार । जाणोनीं सत्वर आला येथें ॥ २ ॥ माझिये संकटीं आलासी धांऊनी । भानुदास चरणीं लागतसे ॥ ३ ॥

९२ सांडोनि तितुकें यथाबीज केलें । कैसें चाळविलें कानडीयानें ॥ १ ॥ रखुमाई आई ती जालीसे उदास । पुंडलीका कैसें पडिलें मौन ॥ २ ॥ कनकाचे ताटीं एलाचे दीपक । सुंदर श्रीमुख वोवाळती ॥ ३ ॥ भानुदास म्हणे चला मजसवें । घात्रा ऋणदेवें सांभाळावें ॥ ४ ॥

## माभळभट.

९३ कंसराय चिंता करी । नवल बालकाची परी । या गोकुळामाझारीं एक अरिष्ट वर्तलें ॥ १ ॥ आमुच्या सकळिका प्रधाना । माजीं बलिवंत पूतना । विष भरोनियां स्तना । पाजूं तया पाठविली ॥ २ ॥ तंव तो वेताळ कीं पिशाच्च । काळभैरव कीं राक्षस । त्यानें केला तिचा ग्रास । विषासहित शोषिलें ॥ ३ ॥ तो अवतरला गोकुळीं । दैत्य दानव मर्दन बळी । जिनें बाळकें शोषिलीं । तेहि शोषिली पूतना ॥ ४ ॥ आम्हीं दुष्टबुद्धि केली । बहिण देवकी पीडिली । तिचीं बाळकें वधिलीं । आपुलें अरिष्ट चुकवावया ॥ ५ ॥ तंव ते न चुकतां पातलें । विघ्न मसतांचि उगवलें । आम्ही जाणतों इतुलें । तरी कृष्ण आणा बांधुनी ॥ ६ ॥ तंव

माभळभट उठिला । तेणें विडा मागितला । निरंजनीं सांडवीन तान्हुला । जो गोकुळीं वाढतसे ॥ ७ ॥ ऐसें वचन ऐकोनी । विडा दिधला तत्क्षणीं । आपुल्या आश्रमा जाऊनी । काय करिता जाहला ॥ ८ ॥ मग बोले स्त्रियेसी । आम्ही जातों गोकुळासी । बाळक जालें यशोदेसी । तें सांडवीन निरंजनीं ॥ ९ ॥ ऐसें बोलोनी निघाला । मार्गीं जातसे एकला । तंव श्रीकृष्ण हासिन्नला । हा विप्र भ्रमित जालासे ॥ १० ॥ गोकुळ ठाकिलें बिढारें । देखे उपलिया धवलारें । तेथींचीं माणसें अति नागरें । लेणीं लुगडीं मिरवती ॥ ११ ॥ कृष्ण वेधें वेधलीं । अवघीं देवरूप जाहलीं । वाचेसी सरस्वती आली । तैसें मधुर बोलती ॥ १२ ॥ आला नंदाच्या मंदिरा । उपमा दिसे क्षीरसागरा । तेथींचिया गौळणी असती सुंदरा । परिये देती कृष्णातें ॥ १३ ॥ वृद्ध बहुकाळ ज्योतिषी । देखोनि हारिखली मानसीं । यशोदा लागली पायासी । साउमेयासी म्हणीतलें ॥ १४ ॥ पाट बैसकेचा घातला । पुढें तिवरा ठेविला । येरें आशिर्वाद दिधला । मग कुशलता पुसिली ॥ १५ ॥ तंव त्या कृष्णातें दाविती । पहा हो याची जन्मतिथी । येरें उकलिती प्रीती । चक्रांकिता साजिरी ॥ १६ ॥ शनि मंगळ राहु केतु । दुष्ट ग्रह ऐसें सांगतु । रोहिणी नक्षत्रु अष्टमी आंतु । मिन्नरात्रीं उपजला ॥ १७ ॥ पुढें विघ्न असे थोर । मागें एक चुकलें गंडांतर । कंसरायाचें भय फार । या बाळकासी असे ॥ १८ ॥ दैत्य कांपती चळवळा । मेघवर्षती शिळा । गोकुळ सांडून अवघे पळा । ऐसा अनर्थ होईल ॥ १९ ॥ पुत्र नव्हे हो लहाणा । हा तुम्ही वोळा कां पोसणा । हांसिन्नला यादवराणा । मग विंदान मांडिलें ॥ २० ॥ होता बैसकेचा पाटु । तेणें घेतला उचाटु । पिढीयाचा खडखडाटु । घरोघरीं सूटला ॥ २१ ॥ भट वाचित होता पाताडें । तें तंव मुखीं आदळलें पिढें । येर सुजविलें थोबाडें । मग भयाभित पळतु ॥ २२ ॥ रागें सांडितसे पाताडें । म्हणे गौळिये लाताडें । आम्हां जोशियां केव्हडें । पिढेंदान दिधलें ॥ २३ ॥ तंव त्या विशाळ काथवटी । लागती माभळभटापाठीं । तिवया सिराळीं तिखटीं । पाठीं पोटीं रुपताती ॥ २४ ॥ तेला तुपाचीं मापें । डवले खोडवे आमुपें । बडगे खुंटे भालिया कोपें । पूजा बांधती मस्तकीं ॥ २५ ॥ थोर आवेशा चढले चाटु । म्हणती यातें सगळें घाटु । लाटणें म्हणती भोईसी लाटू । ऐसा दुष्ट काय कीजे ॥ २६ ॥ शाळिग्राम गडबडिले । देवपाट साह्य आले अर्गळांचे सळ सुटले । खिळखिळिलें खिळखंबे ॥ २७ ॥ थोर विसुरा केला डांगीं । मार्गे रुधिला चौरंगीं । मुसळें कांडावयालागीं । भोंवता वेढा घातला ॥ २८ ॥ होते रवियांचे नाथलें । देह नवनीतें माखिलें । तें येऊन सर्वांगीं बैसलें । हिंवें ऐसें मवाळ ॥ २९ ॥ नव्हे नव्हे गा जोशी । राख राख हृषिकेशी । उखळा मुसळांचिया राशी । दाही दिशा व्यापिल्या ॥ ३० ॥ पाठीं पिढियांचे मेळ । तिहीं झांकिलें रविमंडळ । गजबजिलें लोकपाळ । नव्हे गोकूळ सोपारें ॥ ४१ ॥ माभळभटाचिया झडपणीं । देखोनि पळालिया गौळणी । दह्या दुधाचिया सांजवणीं । पिढा भरणी फुटती ॥ ३२ ॥ देखे मांदियाचे थाट । त्यामाजीं शीरे माभळभट । म्हणे गोकुळींचा शेवट । दैवयोगें पातलों ॥ ३३ ॥ शेतीं होती तिफणीं । नांगर कुळवांची रुमणीं । पाठीं लागलिया दणाणी । भटजी आमुचा स्वयंपाक ॥ ३४ ॥ ब्राह्मण म्हणोनि राखिला । धोत्रें पाताड्या मुकला । मथुरा प्रांत ठाकिला । नग्न हिंडे राजबिदीं ॥ ३५ ॥ देखोनी दैत्यसभा घनदाट । उठा उठा आले पाट । धापा फुटो पाहे पोट । पुसे वाट घराची ॥ ३६ ॥ कंसासी सांगितला वृत्तांतु । अझून काय रे निश्चितु । बळिया वैकुंठींचा नाथु । तो गोकुळीं वाढतसे ॥ ३७ ॥ ते वेळीं कागासुर बकासूर । तृणावर्त दैत्य आघासूर । मुष्टिक चाणूर वीर । तिहीं विडे मागितले ॥ ३८ ॥ थोर बोलती पैजा । आम्ही निर्दाळूं वोजा । ये कथेसी चित्त दीजा । विनवी तुम्हां संतांनो ॥ ३९ ॥ देवा भानुदास म्हणे । श्रोते कोपतील झणें । पंढरीरायाचे योगानें । हा विनोद गाईला ॥ ४० ॥

## पंढरिनाथ व कूर्मदास यांची भेट

९४ आले वारकरी करिती जयजयकार । गरुडटके भार असंख्यात ॥ १ ॥ त्या सुखाचा पार जाणें तोचि एक । भक्त पुंडलिक भाग्यवंत ॥ २ ॥ प्रेमें महाद्वारीं घालुनी लोटांगण । देती आलिंगन एकमेकां ॥ ३ ॥ निडारले नयन पीतांबरधारी । देखिलें विटेवरी पांडुरंग ॥ ४ ॥ शिणली सासुरवासी माउली देखे । तये चित्त पोखे जीवनकळा ॥ ५ ॥ तैसें तें श्रीमुख देखोनि निवालें । आलिंगना निघाले लवडसवडीं ॥ ६ ॥ विटेसहित मिठी घातलीसे पायीं । शरिरीं शुद्धि नाहीं

मीपणाची ॥ ७ ॥ अनंता जन्मींचे विसरलों संताप । विठोबा मायबाप देखियेला ॥ ८ ॥ एक म्हणती स्वामी देवा दीनवत्सला । कृपेचा कोंवळा पांडुरंग ॥ ९ ॥ म्हणती कूर्मदास आर्त करूनियां । तुम्हां भेटावया बोलाविलें ॥ १० ॥ माझिये हातींचा चरणीं माथा ठेवा । निरोप सांगावा पंढरीनाथा ॥ ११ ॥ कृपेचा कोंवळा दीन दयानिधी । येऊनि मज आधीं सांभाळावें॥ १२ ॥ नाहीं कर चरण न घडे दर्शन । मन आहे शरण तुमचे पायीं ॥ १३ ॥ चातक जलधरा चिंतितां मानसीं । चकोर चंद्रासी भावें जैसा ॥ १४ ॥ तैसी मनीं आवडी उचलली तूंतें । ध्यातुसे तुमतें देवराया ॥ १५ ॥ स्मरे वत्स जैसें माउली लागुनी । पिलीं तें पक्षिणी लागीं जैसीं ॥ १६ ॥ तैसा मी तुमतें चिंती वेळोवेळां । देखावया डोळां चरण स्वामी ॥ १७ ॥ गोत वित्त धन मज नाहीं आधारू । तुमचा निर्धारू आहे देवा ॥ १८ ॥ करुणासिंधु ऐसें म्हणवितां जनीं । येऊन मजलागुनी सांभाळावें ॥ १९ ॥ अनाथांचा नाथ सर्वज्ञाचा रावो । जाणसी निजभावो अंतरींचा ॥ २० ॥ ऐसें कूर्मदासें विनविलें आहे । अहर्निशीं पाहे वाट तुझी ॥ २१ ॥ ऐकोनी पंढरीराव झाला उत्कंठित । केव्हां तो निजभक्त आलिंगीन ॥ २२ ॥ अंतरींचे मनोरथ होती परिपूर्ण । उल्हासती नयन देखलीया ॥ २३ ॥ भक्त इष्टमित्र भक्त सुखसिंधु । भक्त आर्तबंधुथोर मज ॥ २४ ॥ बोलाविला नामा आणि ज्ञानदेवो । सांगितला भावो तयाप्रती ॥२५॥ आर्त करूनी वाट पाहातसे कूर्मा । बोलाविलें आम्हां भेटीलागीं ॥२६॥ जाऊं समागमें तुम्ही आम्हीं तेथ । करणें सनाथ भक्तराया ॥२७॥ म्हणोनि दोघाजणां धरूनियां हातीं । चालिले श्रीपति चरणें चालीं ॥२८॥ म्हणे ज्ञानदेवो अहो जी पूर्णकामा । जाणां तुमचा महिमा तुम्हीं देवा ॥२९॥ करता करविता सर्व तुझी सत्ता । सकळांची चाळिता चित्तवृत्ती ॥३०॥ नामदेवें चरणीं ठेवियेला माथा । बरवें दिनानाथा विचारिलें ॥३१॥ संतांचें दर्शन होईल संयोग । निवती अष्टांग चरणस्पर्शें ॥३२॥ विकासिले नयन स्फुरण आलें बाहीं । दाटलें हृदयीं करुणाभरतें ॥३३॥ आतां मार्गीं भक्त देवाचा आवडता । होता तो सांवता जीवन्मुक्त ॥३४॥ त्याचें सुख घ्यावें म्हणोनि भाव केली देवें । कौतुक दाखवावें नामयासी ॥३५॥ तयांप्रती काय बोले केशवराज । लागलीसे मज थोर तृषा ॥३६॥ नामा ज्ञानदेव राहिले बाहेरी । मळीयाभीतरीं देव गेला ॥३७॥ तंव तो परमानंद बोधें नित्य तृप्त । केलें-विण करीत न ये काया ॥३८॥ माथा ठेवोनि हात केला सावधान । दिधलें आलिंगन बाहुभुजीं ॥३९॥ देखोनियां मिठी घातली चरणीं । वोसंडले नयनीं प्रेम-जळ ॥४०॥ करितसे विनवणी स्वामी चक्रपाणी । जनक जननी तूंचि माझी ॥४१॥ तूंचि माझें सर्व वैभव गौरव । हृदयींचा भाव जाणसी तूं ॥४२॥ चरणीं ठेउनी माथा विनवितसे सांवता । बैस पंढरीनाथा करीन पूजा ॥४३॥ म्हणती देवराव कैंचें पूजन तुझें । राख राख माझे प्राण आतां ॥४४॥ तस्कराची मांदी लागलीसे पाठीं । चुकवी त्याची दृष्टी लपवीं मज ॥४५॥ कोठें तुज लपवूं अगा सगुणरूपा । माझ्या मायबापा पांडुरंगा ॥४६॥ ऐसा कोण रिता ठाव न दिसे मज । तेथें तुझें तेज झांकोळेल ॥४७॥ बाहेर भीतरीं तुझाचि प्रकाश । गगनासी अवकाश तुझे पोटीं ॥४८॥ मग कटीचें खुरपें सत्वर काढिलें । हृदय फाडिलें तत्क्षणीं ॥४९॥ याचें पंढरीनाथा रिघावें भीतरीं । सुखरूप निर्धारी रहावें येथें ॥५०॥ बैसोनियां देव हृदयसंपुटीं । करी सुखगोष्टी स्वभक्तासी ॥५१॥ एवढ्या उपकारा काय तुज द्यावें । कैसें तुज व्हावें उतराई ॥५२॥ अवघा मीचि घेई अवघा मीचि घेई । यापरतें कांहीं न दिसे मज ॥ ५३ ॥ तंव म्हणे सांवता जीवाहूनि परता । न करी तूं चिंता विठ्ठलस्वामी ॥ ५४ ॥ नामदेव मनीं करितसे चिंतनीं । नयेचि अझूनि विठ्ठल माझा ॥ ५५ ॥ वाट पाहतां बहु वाडवेळ झाला । कोठें गुंतयेला स्वामी माझा ॥ ५६ ॥ माझा पांडुरंग सर्व सुखधन । दाखविल कोण प्राण-सखा ॥ ५७ ॥ अवस्थे भरे प्रेम बहु असे स्फुंदतु । विठ्ठल विठ्ठल म्हणतु वेळोवेळां ॥ ५८ ॥ देह जातो चावरी भेटीलागीं आर्त । पाउलें उमगीत विठोबाची ॥ ५९ ॥ तृषाक्रांत कैसें जीवनातें गिवसी । कीं बाळ मातेसी क्षुधातुर ॥ ६० ॥ हरिणीचें पाडस चुकलें हरिणीसी । तैसें दाही दिशा पाहे देवा ॥ ६१ ॥ पाझर सुटला दृष्टी वोसंडला पोटीं । हृदय तें पिटी करकमळीं ॥ ६२ ॥ देह टाकी धरणीं नामाचें बोभाटीं । म्हणे देई भेटी प्राण जातो ॥ ६३ ॥ सांडोनि जातोसी ऐसें जरी जाणतें । तरी कां विसंबतें तुजलागीं ॥ ६४ ॥ मिठी पीतांबरीं घालूनी मुरारी । येतो चरणावरी रुळत सरसा ॥ ६५ ॥ ऐसें विलपत अंतर अवस्था ।

देखिला सांवता सुखराशी ॥ ६६ ॥ चरणीं घालूनी मिठी पुसतसे मातु । माझा पंढरीनाथु केउता गेला ॥ ६७ ॥ तो विसरला देहभावा आर्तभूतमनें । होउनी संधानें हरीच्या रूपा ॥ ६८ ॥ प्रेम उचंबळतु आनंदें डुल्लतु । वाचेसी जपतु रामकृष्ण ॥ ६९ ॥ देखोनि त्याची स्थिति विठ्ठल माझा आहे । त्याजपाशीं पाहे पुढतोपुढती ॥७०॥ त्याचें पूर्ण सुख देखियेलें मनें । हर्षयुक्त चिन्हें याचे देहीं ॥७१॥ मज दुबळ्याचा ठेवा गिळियेला तुवां । सुखाचा विसांवा पंढरीराव ॥७२॥ क्षणभरी दाखवी धरीन मी जीवीं । जाताती वांचवी प्राण माझे ॥ ७३ ॥ वेगीं मजसी भेटे करी सुखगोष्टी । म्हणे करीन भेटी विठोबाची ॥ ७४ ॥ तोचि शकुन गांठी बांधली पालवीं । माझ्या माथां ठेवीं अभयकर ॥७५॥ ऐकोनि पंढरीनाथ म्हणे सांवत्यातें । मज माझ्या नाम्यातें भेटी करीं ॥ ७६ ॥ शिणलें बाळक होत कासाविसी । दिसतें परदेशी मजवीण ॥ ७७ ॥ मग म्हणे सांवता परिसी हरिभक्ता । कृपा पंढरीनाथा आली तुझी ॥ ७८ ॥ म्हणोनि उतावेळ झाले कमळापति । भेटोनि विश्रांति द्यावी मज ॥ ७९ ॥ जवळींच देखसी सावधान पाहे । देती पंढरीराय आलिंगना ॥ ८० ॥ न कळे तुवां काय केल्या पुण्यराशी । वाटे भजिन्नलासी सर्वांभूतीं ॥ ८१ ॥ जेणें सुख पावोनि माझा पंढरीनाथ । झाला वेळाईत तुजलागीं ॥ ८२ ॥ खांदीं गरुड टका घेउनी निरंतरीं । चालविली वारी पंढरीची ॥ ८३ ॥ संतचरणरज वंदियेले माथां । म्हणोनि पंढरीनाथा आर्त तुझें ॥ ८४ ॥ दशमी दिंडीपुढें नाचती बागडे । गाईल सावडे हरीचें नाम ॥ ८५ ॥ तेणें पंढरीनाथा वाटला आनंदु । मग तो कृपासिंधु बोळला तुज ॥ ८६ ॥ कायावाचामनें होऊन तल्लीन । केलें हरिकिर्तन एकादशी ॥ ८७ ॥ तेथें तिष्ठत होता पंढरीचा रावो । प्रसन्न हा देव झाला तुज ॥८८॥ अनंत जन्मीं देह करवती घातले । कां उग्र तप साधिलें महातीर्थीं ॥ ८९ ॥ परोपकारी प्राण वेंचियेला तुवां । पंढरी येतां केशव धाला तेणें ॥ ९० ॥ आतां तुझें भाग्य महिमा तो अद्भुत । जाणे पैं समर्थ पंढरीराव ॥ ९१ ॥ म्हणोनियां चरणीं ठेऊनिया माथा । गहिंवरें सांवता भक्तराज ॥ ९२ ॥ प्रेमें आलिंगन झालें उभयतां । मग झाला बोलता विष्णुदास ॥ ९३ ॥ सुखाचा सोयरा तूंचि गा तत्वता । माझा प्राणदाता भक्तराज ॥ ९४ ॥ सांगितला शकुन साच करी वहिला । मज माझ्या विठ्ठला भेटी करीं ॥ ९५ ॥ आतां मज धीरु न धरवे सर्वथा । स्फुंदता हे अवस्था चित्त माझें ॥ ९६ ॥ कडप्याचे खुरपे काढूनिया येरें । हृदय फाडिलें तये वेळीं ॥ ९७ ॥ तंव तो पांडुरंग निघाला बाहेरी । नामा पाय धरी धांऊनियां ॥ ९८ ॥ येरें संबोखुनी पितांबर आंचळें । पुसिलें मुखकमळ नामयाचें ॥ ९९ ॥ देऊनि आलिंगन हांसे पंढरीनाथ । पुसतसे वृत्तांत काय झालें ॥१००॥ येरें तंव मिठी घातली चरणीं । म्हणे जनकजननी तूंचि देवा ॥ १ ॥ कवण्या मोहें माझें पाळिसी तूं लळे । हें मज न कळे केशवराजा ॥ २ ॥ भेटोनिया मातें म्हणे ज्ञानदेव । कूर्माही पहावो लवलाही ॥३॥ तरीच माझ्या मना वाटे समाधान । निवती लोचन देखिलीया ॥ ४ ॥ भेटीचें पैं आर्त आहे माझे मनीं । चाल वेगे करूनि करूणारसें ॥ ५ ॥ आनंदाचा मार्ग संतांचे संगतीं । आनंदें नाचती पांडुरंग ॥ ६ ॥ स्फुरती भुजा दंड आणि वक्षस्थळ । सुखाब्धी मिळेल मना आजी ॥७॥ नामा ज्ञानदेव नवल करिती कैसें । कूर्म्याचें पैं ऐसें प्रेम देवा ॥ ८ ॥ वोसरली धेनु वत्सालागीं जाय । तैसे पंढरीराय चालियेले ॥ ९ ॥ लवताती लोचन स्फुरताती बाहे । येती माझी माय भेटीलागीं ॥ ११० ॥ आला पंढरीराव कूर्मा घाली लोटांगण । दिधलें आलिंगन चतुर्भुजीं ॥ ११ ॥ पाडियेली मिठी न सोडी सर्वथा । मीनला पंढरीनाथा सद्भावेंसी ॥ १२ ॥ कूर्मा म्हणे माझें थोर भाग्य आतां । म्हणोनि पंढरीनाथा भेटी तुझी ॥ १३ ॥ तरी आतां तुवां न जावें येथुनी । जोडला चरणीं स्थिर राहे ॥ १४ ॥ देव आणि भक्त एकरूप झाले । मग दोघे आले आश्रमासी ॥ १५ ॥ देव म्हणे भक्तां कर्मी तूं झालासी । तुझीये उपकारासी काय वानूं ॥ १६ ॥ भानुदासा नयनीं पूर्ण जळें दाटलें । मग आलिंगिलें पांडुरंगें ॥ ११७ ॥

---

|| श्रीविठ्ठल ||

# || श्रीजनार्दनमहाराज ||

## यांचे अभंग

### गुरुस्तुति.

१ ॐ अनंत निर्गुण सर्वांठायीं पूर्ण । न करीं निर्वाण दासालागीं ॥ १ ॥ हाके बरोबरी धांवोनी सत्वरीं । भक्तालागीं तारी गुरुनाथ ॥ २ ॥ सुंदर ते ध्यान वसे औदुंबरीं । व्याघ्रचर्मधारी शोभतसे ॥ ३ ॥ काषाय अंबर दंडकमंडलु । डमरु त्रिशुळु शंखचक्र ॥ ४ ॥ किरीट कुंडलें रुद्राक्षाच्या माळा । वैजयंती गळा हार रुळे ॥ ५ ॥ सूर्य चंद्र नेत्र शेषफणी छत्र । पीतांबर वस्त्र परिधान ॥ ६ ॥ गुरुचरणीं सर्व तीर्थांची मिराशी । म्हणोनि जगासी उद्धरिती ॥ ७ ॥ जनार्दन म्हणे नलगे ब्रह्मज्ञान । गुरुचरणीं मन राहो सदा ॥ ८ ॥

२ जन्मा आलों मी संसारीं । सखी मानिली अंतुरी । निंदा केली द्विजवरीं । कैसा सद्‌गुरु जोडेल ॥ १ ॥ नाहीं पूजिले गुरुवरा । नाहीं नमिले द्विजवरा । नाहीं केलें भजन सारा । कैसा भव हा आटेल ॥ २ ॥ जालों परधर्मी रत । अधर्म करितां वाटे हित । जन्ममरणाची खंत । कैसी आर्ता वाटेल ॥३॥ संसारीं मी कुखावलों । त्रिविध तापें मी पोळलों । दुःखी होऊनिया आलों । औदुंबरीं या ठाया ॥४॥ अंकलखोप कृष्णातीरीं । गुरु वसती औदुंबरीं । भक्तवत्सल तारी तारी । म्हणवूनि चरण वंदिलें ॥ ५ ॥ जनार्दन पापराशी । करूनी आला तुजपाशीं । तारिशील या भरवंसीं । धरणें घेतलें दारांत ॥ ६ ॥

३ दासां दुःख जालें फार । वेगें करा प्रतिकार ॥ १ ॥ सुख मानिलें संसारीं । परि दुःख झालें भारी ॥ २ ॥ सोडूनियां मी स्वधर्म । आचरलों नीच कर्म ॥ ३ ॥ सेवा केली हीन याती । द्रव्यलोभें यातायाती ॥ ४ ॥ अन्नग्रास न पडे मुखीं । पश्चात्ताप झाला शेखीं ॥ ५ ॥ पुण्यस्थान मी पावलों । गुरुचरणीं विश्रांतलों ॥ ६ ॥ स्वामी विनंति अवधारा । दीनबंधु करुणाकरा ॥ ७ ॥ कर जोडूनियां शिर । ठेवियेलें पायांवर ॥ ८ ॥ जनार्दन जन्मनाम । मुखीं राहो गुरुनाम ॥ ९ ॥

४ नरहरी गुरुराया । दीनबंधु सखया । करिसी दासां अंतराया । काय वाटे वडिवार ॥ १ ॥ निशिदिनीं हाका । वियोगानें वाढे शोका । निराश वाटे सेवका । निद्रा आली तुज काय ॥ २ ॥ किंवा कोठें गुंतलासी । किंवा येथूनि गेलासी । किंवा आम्ही पापराशी । म्हणवूनि लपसी गुरुराया ॥ ३ ॥ तरी आम्हीं कोठें जावें । कवण्या देवा आराधावें । दत्ता कृपावंता अवघें । शून्याकार त्रैलोक्य ॥ ४ ॥ गुरो मौन त्वां धरिलें । आम्हा दुःखानें व्यापिलें । जनार्दनास आवरिलें । नाहीं सद्‌गुरु दीनबंधु ॥ ५ ॥

५ आतां गुरुराया परिसा विज्ञापना । दासाची करुणा येऊं द्यावी ॥ १ ॥ नेणोनिया सोय फिरलों दिशा दाही । झालें दुःख देहीं बहुसाल ॥ २ ॥ तुमची ब्रिदावळी पतीतपावन । कीर्ति हे ऐकोन शरण आलों ॥ ३ ॥ माझा मायबाप गणगोत बंधू । तूंचि कृपासिंधु गुरुराया । ॥ ४ ॥ आतां कांहीं नेणें तुमच्या पायांवीणें । संसाराचें पेणें दूर केलें ॥५॥ जोडोनिया हात शिर पायांवरी । ठेविलें निर्धारीं जनार्दनें ॥ ६ ॥

६ कंठीं राहो नाम हा माझा नवस । पुरवावी आस गुरुराया ॥ १ ॥ वसोनी अंतरी बोलवीं उत्तर । जेणें हा संसार सार होय ॥ २ ॥ सर्व चराचरीं दृष्टी ऐसी करी । दावीं रूप हरी अखंडीत ॥ ३ ॥ ऐशिया वासनें स्वामी साह्य होणें । काल वांया जाणें ऐसें न हो ॥ ४ ॥ तुज ऐसा नाहीं त्रिभुवनीं उदार । कृपें देई वर जनार्दना ॥ ५ ॥

७ देवां सांपडलें वर्म । स्मरण झालें वर्म कर्म । दुर्घट आचरलों धर्म । ऐकूनि घेई गुरुराया ॥ १ ॥ जन्मोजन्मीं जें जें केलें । भलें आजी तें सुचलें । कळतां मन संतोषलें । करितों आतां विस्तार ॥ २ ॥ बाल-विधवे आलिंगिलें । एकासनीं बैसविलें । तिशीं रमतां मानिलें । स्वर्गी सुख तृणतुल्य ॥ ३ ॥ दृष्टी नसतां ते भामिनी । वियोग दुःख वाटे मनीं । सन्निध नसतां भोजनीं । ग्रास नवजे उदरांत ॥ ४ ॥ मायबहीण मीं सोडिली । इंद्रियें तीं सुखावलीं । शेवटीं ऐसी गती झाली । गलित कुष्ट मी झालों ॥ ५ ॥ प्राप्त झालें अंगीं घर्ण । दुर्गंधीनें दिशा पूर्ण । शेवटीं बधिर झाले कर्ण । कीर्तन श्रवण मग कैंचें ॥ ६ ॥ ऐसीं कर्मे जन्मोजन्मीं । करूनि आलों नीच योनीं । सर्व साक्ष येते मनीं । किती म्हणोनि वर्णावी ॥ ७ ॥ दैवयोगें उत्तम वर्ण । झालों याती मी ब्राह्मण । नाम जनार्दन जाण । सद्‌गुरु-चरणीं पावलों ॥ ८ ॥

८ करूनी ऐसें आचरण । प्राप्त जालें यमपट्टण । तेथील दुःख तें दारुण । एकी वाचा वदवेना ॥ १ ॥ कुंभीपाकीं बुडविलें । तप्तभूमीं चालविलें । असीपत्र वनीं फिरविलें । कल्पकोटी संवत्सर ॥ २ ॥ जळत खांबा पोळविलें । तिखट शस्त्रें मार दिले । नरककुंडीं मज घातलें । अनंतकोटी कल्पवरी ॥ ३ ॥ ऐसे भोग म्यां भोगिले । पूर्वपुण्य आठविलें । सद्‌गुरु दयाळें पोकिलें । म्हणऊनि आलों या ठाया ॥ ४ ॥ माझी दया ती येईल । शरणागता उद्धरील । जनार्दना आपुला करील । म्हणऊनि चरण वंदिले ॥ ५ ॥

९ गुरुसख्या तुजविण । जाऊं पाहे माझा प्राण ॥ १ ॥ कां हो काठिण केलें मन । पाहें नेत्र उघडून ॥ २ ॥ माता पिता म्हणविलें । तरी कां निर्वाण मांडिलें ॥ ३ ॥ आतां यावें लवकरी । भेट द्यावी वा सत्वरीं ॥ ४ ॥ यश घेई गुरुराया । जनार्दन ठेवीं पायां ॥ ५ ॥

१० अहो सद्‌गुरु दातारा । म्हणविसी करुणा-करा ॥ १ ॥ राज्य देऊनि रजकासी । शेखीं नेलें पायापाशीं ॥ २ ॥ ब्रह्मग्रहा दिलें ज्ञान । केलें आपणा-समान ॥ ३ ॥ काय तुम्हीं आराधिलें । काय देवासी अर्चिलें ॥ ४ ॥ त्यासी तुम्ही तारियेलें । श्रीदवत्सल मिरविलें ॥ ५ ॥ लीला दाविली लाघवा । शुष्क काष्ठासी पल्लवा ॥ ६ ॥ जनार्दना कृपा करा । राखें पायांपें किंकरा ॥ ७ ॥

११ अहो सद्‌गुरू अनंता । फार काय बोलूं आतां ॥ १ ॥ नारायणा कृपावंता । असो द्यावी माझी चिंता ॥ २ ॥ भलते याती दो कां जन्म । परी आवडो गुरूनाम ॥ ३ ॥ नामें पतीत तारिले । पशू पक्षी मोक्षा नेले ॥ ४ ॥ मातंगाचे मुखीं वेद । लीलें करविला संवाद ॥ ५ ॥ जरी करिसी अंगिकार । तरी काय माझा भार ॥ ६ ॥ जनार्दन विंती भावें । यांचें स्मरण असो द्यावें ॥ ७ ॥

१२ मुळीं नाहीं गुण म्हणोनि निर्गुण । ब्रह्म परि-पूर्ण गुरुनाथ ॥ १ ॥ ज्याचे गुण गातां वेद मौनावला। शेष वोढावला झाला शय्या ॥ २ ॥ ब्रह्मादिक ज्याचे जाले आज्ञाधर । मानव पामर कोण पुढें ॥ ३ ॥ तोचि कृष्णा-तीरीं वसे औदुंबरीं । दासां कृपा करी तारावया ॥ ४ ॥ राव रंक याति वर्ण न विचारी । भाविका अंतरी राहे सदा ॥ ५ ॥ स्मरतां येतो ऐसे वेद बोभाइला । तया तो श्रीदाला रक्षितसे ॥ ६ ॥ जया चित्तीं ठेवा कल्याण असावें । गुरूसी रिघावें शरण वेगीं ॥ ७ ॥ ऐसी वेद वाणी ऐकोनियां कानीं । जनार्दना मनीं निश्चय झाला ॥ ८ ॥

१३ धन्य कृष्णातीरीं धन्य औदुंबर । जेथें गुरुवर वसतसे ॥ १ ॥ धन्य तेचि नर येती जे यात्रेसी । दर्शनमात्रें त्यांसी मोक्ष जोडे ॥ २ ॥ अनंत जन्मांचीं पातकें संचित । नुरती किंचित तीर्थ घेतां ॥ ३ ॥ वाचितां चरित्र सद्‌गुरु स्वामीचें । निर्मूलन भवाचें सत्य होय ॥ ४ ॥ नामस्मरणें ज्याच्या सद्‌गुरूचें होणें । व्यर्थ चिंता वाहणें संसाराची ॥ ५ ॥ गुरु गीतीं गावा भावें चित्तीं ध्यावा । सगुण पहावा डोळे-भरी ॥ ६ ॥ जनार्दन म्हणे तीर्थे त्याचे पायीं । चारी मुक्ती दासी होती त्याच्या ॥ ७ ॥

१४ तुमचा प्रसाद लाधला मस्तकीं । श्रीदत्तराया तेणें झालों मीं सुखी ॥ १ ॥ वाचे वदें नाम दत्त दत्त आवडी । हीच माझी जोडी न करी दुजी ॥ २ ॥ पायांचा आठव द्यावा सर्वकाळ । अखंड कल्लोळ नाम-

घोष ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन एकनाथा परियेसी । ध्यान अहर्निशीं दत्तात्रय ॥ ४ ॥

## एकनाथमहाराजांस जनार्दनस्वामींचा उपदेश.

१५ संकल्प विकल्प यावरी घालीं शून्य । मन करी निमग्न हरीपायीं ॥ १ ॥ उपासना दृढ संतांचे चरणीं । तेचि पैं निर्वाणीं तारक तुज ॥ २ ॥ पडतां जडभारी संत साहाकारी । सर्वभावें हरी तेचि होती ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन एकनाथा न विसंबे । सोपा मार्ग ऐकें सर्वभावें ॥ ४ ॥

१६ नको गुंतू लटिक्या प्रपंचासी बापा । मार्ग आहे सोपा पंढरीचा ॥ १ ॥ नलगे पुसावें आटाआटी कांहीं । आणिके प्रवाहीं गुंतूं नको ॥ २ ॥ भांवावल्यापरी जन झाले मूढ । विसरले दृढ विठोबासी ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन एकनाथा निकें । साधी तूं कौतुकें हेंचि वर्म ॥ ४ ॥

१७ देह शुद्ध करूनी भजनीं भजावें । आणिकाचे नाठवावें दोषगुण ॥ १ ॥ साधनें समाधी नको पा उपाधी । सर्व समबुद्धी करी मन ॥ २ ॥ म्हणे जनार्दन घेई अनुताप । सांडी पा संकल्प एकनाथा ॥ ३ ॥

१८ तीर्थपर्यटन कायसा करणें । मन शुद्ध होणें आधीं बापा ॥ १ ॥ तीर्था जाऊनि काय मन शुद्ध नाहीं । निवांतची पाही ठायीं बैसे ॥ २ ॥ मन शुद्ध जालिया गृहींच देव असे । भाविकासी दिसे बैसल्या ठायीं ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन हाचि बोध एकनाथा । याहुनि सर्वथा श्रेष्ठ नाहीं ॥ ४ ॥

१९ एकविध भाव सर्वा ठायीं धरीं । द्वैताचि ती उरी उरवूं नको ॥ १ ॥ हाचि अनुभव सुगम सोपारा । ययाचि निर्धारा तरले बहू ॥ २ ॥ ध्रुव उपमन्यु बिभीषण नारद । गाई गोपवृंद सरते झाले ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन एकनाथा निजखूण । विटेवरी समचरण पाहे दृष्टी ॥ ४ ॥

२० मुख्य ती उपासना भक्ती । ज्ञान विरक्ति तेणें जोडे ॥ १ ॥ हेंचि एक परमार्थ सार । आणिक विचार करूं नये ॥ २ ॥ योगयाग तपतां तप । न जाय संकल्प मनीचा ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन एकनाथा सावध । हृदयीं गोविंद आठवी सदा ॥ ४ ॥

२१ आणिक या सृष्टी साधन पैं नाहीं । घेई पा लवलाही नाम वाचे ॥ १ ॥ उभा दिगंबर कटीं ठेवूनी कर । शोभतसे तीर चंद्रभागा ॥ २ ॥ पुंडलिकें निज साधिलें साधन । तें तूं हृदयीं जाण धरीं भावें ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन एकनाथा हृदयीं । विठ्ठलमंत्र ध्यायीं सर्वकाळ ॥ ४ ॥

२२ न करीं आळस हरीचिया भजनीं । तेणें तुज निर्वाणीं सुख होय ॥ १ ॥ नाम गाय सोपें नाम गाय सोपें । चुकतील पापें जन्मोजन्मीं ॥ २ ॥ म्हणे जनार्दन एकनाथा सोपें । कळिकाळाचीं मापें रितें होय ॥ ३ ॥

२३ विधिनिषेध थारा आवरीं पसारा । न जाय तूं सैरा आणिकें पंथा ॥ १ ॥ पंथ सोपा जाणा पंढरी पावन । याहूनियां आन वंद्य कोण ॥ २ ॥ सर्वोत्तम तीर्थ देव आणि नाम । पुरती सर्व काम विठ्ठलपायीं ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन ऐकें एकनाथा । शरण तत्त्वतां संतां रिघे ॥ ४ ॥

२४ तुळशीवृंदावन विष्णूचें पूजन । भक्तीसी कारण मुख्य हेंची ॥ १ ॥ सर्वांभूतीं दया भेद नोहे चित्ता । साधीं परमार्थ हाचि एक ॥ २ ॥ व्युत्पत्ति विचार न करीं निर्धार । व्यर्थ वांयां भार काय करिसी ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन एकविध भजन । सांगितलें जाण एकनाथा ॥ ४ ॥

२५ सर्वांभूतीं भाव नको ठेऊं दुजा । तेणें गरुडध्वजा समाधान ॥ १ ॥ संतांसी नमन आलिया अन्नदान । यापरतें कारण आणिक नाहीं ॥ २ ॥ सर्वभावें वारी पंढरीची करीं । आणिक व्यापारीं गुंतूं नको ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन घेई हाचि बोध । सांडोनी सर्वदा द्वेष भेद ॥ ४ ॥

२६ आलिया अतिथा द्यावें अन्नदान । याहुनी साधन आणिक नाहीं ॥ १ ॥ ज्ञातीसी कारण नाहीं पैं तत्त्वतां । असो पैं भलता अन्न द्यावें ॥ २ ॥ अन्न परब्रह्म वेदांतीं विचार । साधीं हाचि निर्धार प्रेमतत्त्वें ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन यापरतें आणिक । नाहीं दुजें देख एकनाथा ॥ ४ ॥

२७ सागरीं वर्षला घन । वृथा जाय तें जीवन ॥ १ ॥ योगियासी शीण तैसा । आदी आभासा अवसानीं ॥ २ ॥ अनुभवुनी पहातां योग । नोहे व्यंग मग कांहीं ॥ ३ ॥ म्हणे जनार्दनीं एका । योग निका रामनाम ॥ ४ ॥

२८ बोडक्या लाडक्या झाली भेटी। दैन्य गेलें उठाउठी ॥ १ ॥ उभयतांची एकचि राशी। बोडके लाडक्यासी संतोषी ॥ २ ॥ बोडका देव लाडका भक्त। उभयलोकीं त्यांची मात ॥ ३ ॥ म्हणे जनार्दन समरसलें। एकनाथी रंगलें हृदयामाजीं ॥ ४ ॥

२९ उदय समाधी लागो तीन वेळ। अवघा ब्रह्मांड गोळ उदयो होतो ॥ १ ॥ चक्रामध्यें चक्र येती व्योमाकार। आदी मध्य हेर ज्योती त्याची ॥ २ ॥ द्वितीय प्रहरीं समाधि कैसी परी। गुरुपुत्रा हारी येणें रुपें ॥ ३ ॥ प्रथम समाधीं निबिड सर्पाकार। त्या मध्यें आकार चक्राचे ते ॥ ४ ॥ झळकती माणिक दिव्य रत्नखाणीं। अविनाश देखणी चिन्मयाची ॥ ५॥ उदयाची ज्योती द्वितीयेचा मणी। हीं दोन्हीं देखणीं झाला बापा ॥ ६ ॥ उदयाच्या तीन द्वितीयेच्या तीन। अविनाश देखणें संध्याकाळीं ॥ ७ ॥ संध्याकाळीं संदेह टाकूनियां द्यावें। त्यावेनि पैं घ्यावें समाधिसुख ॥ ८ ॥ एक चक्र येती आभासा येव्हडी। त्या मध्यें चौकडी मोतीयांच्या ॥ ९ ॥ मानी ज्योती संध्याकाळीं जे वानिती। ते लावण्यदीप्ति पाजळल्या ॥ १० ॥ म्हणे जनार्दन एकनाथा घेई। सोहं याची देहीं समाधिसुख ॥ ११ ॥

३० देहाची समाधी लागे तीन वेळां। आपुली जीवनकळा शोधावी हे ॥ १ ॥ कर्णी घालुनियां बोटें अंगळ्या नेत्रांत निकटे। तेणें विकाशुनी भेटे शुभ्र वर्ण ॥ २ ॥ तयाचें हें नाम बिंब जीवदशा। तेणें स्वरूप दिशा भरुनी येती ॥ ३ ॥ तितुक्यामध्यें न सोडावी समाधी। त्याचेपुढें शोधी गुरुपुत्रा ॥ ४ ॥ स्वामीनें पुसिलें कैसें काय झालें। कैसें तुज भासलें आत्मरूप ॥ ५ ॥ शिष्य म्हणे स्वामी धरितां कान डोळे। एकाएकीं उमाळे आदित्याचे ॥ ६ ॥ विकासिला निर्मळ जैसा चंद्र दिसे। येतां हे प्रकारें आत्माराम ॥ ७ ॥ म्हणे जनार्दन नव्हे एकनाथा। समाधी पहातां आळस केला ॥ ८ ॥

३१ शिष्य म्हणे स्वामी पुढें कैसें पहावें। रिघत हें जावें अभ्यासासी ॥ १ ॥ स्वामी म्हणे बापा समाधी घेई आतां। तुझिया विकल्पता निवावितां ॥ २ ॥ अशंका जे झाली तुझी तुज ठेली। आम्हीं नाहीं विचारिली समाधी तुज ॥ ३ ॥ प्रथम विकास पहावा शुभ्रवर्ण। त्याचें पुढें चांदणें चकचकीत ॥ ४ ॥ खद्योताचे वाणीं सूर्य तारांगण। पुढें शोध जाण घेत जावा ॥ ५ ॥ बैसावें निश्चळ त्याचे अग्रीं डोळे। पहावें केवळ हंसू तैसें ॥ ६ ॥ त्यामध्यें रिघावें स्वरूप पहावें। परि समाधीहि जीवें सोडूं नये ॥ ७ ॥ जिवाचा हा शिव देहाचा कुळस्वामी। तो अविनाश खाणीं प्रगटतो ॥ ८ ॥ म्हणे जनार्दन त्या पोटीं रिघावें। एकनाथा पहावें आत्मरूप ॥ ९ ॥

३२ मन स्वस्थ निश्चल मध्यरात्री। गुरुगुह्याचे एकांती रिघावें हो ॥ १ ॥ हंसा अंगींचा डोळा विकाशुनी कमला। त्याचे मध्यस्थला हेरीत जावें ॥ २ ॥ चिन्मय अविनाश प्रगटती ज्योत। तोची प्राणनाथ देहाचा हा ॥ ३ ॥ त्यापुढें आभास दिसे नीलवर्ण। तेंचि स्वरूप जाण विराटाचें ॥ ४ ॥ जें ब्रह्मांडीं असे तेंचि पिंडीं दिसे। बोलायाचा भास नाहीं पुढें ॥ ५ ॥ प्रथम समाधी बाहेर घ्यावी आधीं। तेंही स्वरूप वेधी समरसावें ॥ ६ ॥ यापुढें समाधी दुजी सांगेल कोण। त्यासी होईल पतन निश्चयेसी ॥ ७ ॥ म्हणे जनार्दन एकनाथापाशीं। हेंचि भरून घेसी ओहं सोहं ॥ ८ ॥

---

॥ श्रीविठ्ठल ॥

# श्रीएकनाथमहाराज

## यांचे अभंग

भाग ] मंगलचरण. [ १ ला

१ ॐनमो सद्गुरुनिर्गुणा । पार नाहीं तंव गुणा । बसोनि माझिया रसना । हरिगुणा वर्णवी ॥ १ ॥ हरिगुण विशाळ पावन । वदवीं तूं कृपा करून । मी मूढमती दीन । म्हणोनि कींव भाकितसें ॥ २ ॥ तुमचा प्रसाद जाहलिया पूर्ण । हरिगुण वर्णीन मी जाण । एका वंदितसें चरण । सद्गुरूचे आदरें ॥ ३ ॥

२ नमो व्यासादिक कवी हे पावन । जे परिपूर्ण धन भांडाराचें ॥ १ ॥ करुनी उपदेश तारिलें बहुतां । उपदेश तत्त्वतां चालतसे ॥ २ ॥ एका जनार्दनीं तुमचा मी दास । येवढी ही आस पुरवावी ॥ ३ ॥

३ परा पश्यंती मध्यमा वैखरी । नमियेली खरी आदिमाया ॥ १ ॥ वसोनियां जिव्हे वदावें कवित्व । हरिनामीं चित्त निरंतर ॥ २ ॥ आणिक संकल्प नाहीं माझे मनीं । एका जनार्दनीं वंदितसें ॥ ३ ॥

४ श्रीगुरुराया पार नाहीं तव गुणीं । म्हणोनि विनवणी करीतसों ॥ १ ॥ मांडिला व्यवहार हरिनामीं आदर । सादरा सादर वदवावें ॥ २ ॥ न कळेचि महिमा उंच नीचपणें । कृपेचें पोसणें तुमचे जाहलों ॥ ३ ॥ एका जनार्दनी करुनी स्तवन । घातिलें दुकान मोलेंविण ॥ ४ ॥

### बाळक्रीडा. ( कृष्णजन्म )

५ असतां बंदिशाळे । देवकी डोहळे । गर्भे घननिळे आथियला ॥ १ ॥ गुज पुसे भ्रतारा । आनु नेणें दुसरा । आवडी अवधारा । जिवा होय ॥ २ ॥ मेळवुनि लेंकुरें । खेळ खेळावा साकार । गोकुळीं अवतार । गौळिया घरीं ॥ ३ ॥ वर्षतां शिळाधारीं । उचलावा महागिरी । वेणु पावे करीं । वाजवीत ॥ ४ ॥ जळीं रिघ करावा । भवसर्प नाथावा । वरि बैसो बरवा । भाव माझा ॥ ५ ॥ कंसादिक वीर । त्यांचा करावा संहार । कीजे राज्यधर । उग्रसेना ॥ ६ ॥ एका यश द्यावें । त्रैलोक्य जिंकावें । कनकपूर बसवावें । सिंधूमाजीं ॥ ७ ॥ एका जनार्दनीं । डोहाळे संपूर्ण पुरवी नारायण वासनेचे ॥ ८ ॥

६ देवकी निज उदरीं । गर्भाची पाहे थोरी । तंव सबाह्य अभ्यंतरीं । व्यापक श्रीकृष्ण ॥१॥ अगे हा स्वतः सिद्ध हरी । स्वयंप्रकाश करीं । मीपणा माझारीं । गर्भु वाढे ॥ २ ॥ आतां नवल कैसें परी । आठवा गर्भु धरी । त्याहि गर्भा माझारीं । मज मी देखे ॥ ३ ॥ दाहीं इंद्रियां माझारीं । गर्भाची वाढे थोरी । कर्मे तदाकारीं । इंद्रिय वृत्ति ॥ ४ ॥ चित्प्रकाशासी डोहळे । सद्रूप सोहळे । आनंदकल्लोळें । गर्भु वाढे ॥ ५ ॥ तेथे स्वस्वरूपस्थिती । सुखरूप प्रसूती । आनंद त्रिजगतीं । परिपूर्ण ॥ ६ ॥ एका जनार्दनीं । ज्ञानगर्भु सार । चिद्रूप चराचर । निखळ नांदे ॥ ७ ॥

७ देवकी करी चिंता । केवीं आठवा वांचेआतां । ऐसी भावना भावितां । जिवीं तळमळ ॥ १ ॥ तंव न दुखतांचि पोट । वेण न लगतां उध्दट । कृष्ण झाला प्रगट । स्वयें अयोनिया ॥ २ ॥ हरि सुनीळ सांवळें । बाळ निजतेजे तेजाळें । देखोनि वेल्हाळें । स्वयें

विस्मीत ॥ ३ ॥ ऐसें देखोनि श्रीकृष्णासी । मोहे आच्छादूं जाय त्यासी । तंव प्रकाशु तियेसीं । कैसा आंवरेना ॥ ४ ॥ वेगीं वसुदेवातें म्हणे । तुम्हीं गोकुळासी न्या तान्हें । एका जनार्दनें । कृपा केली ॥ ५ ॥

८ देवकी म्हणे वसुदेवासी । वेगीं बाळक न्यावें गोकुळासी । घवघवीत तेजोराशी । देखे श्रीकृष्ण ॥ १ ॥ पूर्ण प्रकाश निजतेजें । पाहतां न दिसे दुजें । तेथें कैचें माझें तुझें । लपणें छपणें ॥ २ ॥ सरसर अरजे दुरी । परब्रह्म आम्हां करीं । अहं कंसाचें भय भारी । बाधी कवणा ॥ ३ ॥ सर्वेचि पाहे लीळा । मुगुट कुंडलें वनमाळा । कंठीं कौस्तुभ तेजाळा । कटी तटी सूत्र ॥४॥ क्षुद्र घंटिका किंकणी । बाहु भूषणें भूषणीं । विद्रुल्लें महामणी । वीर कंकणें ॥ ५ ॥ कमलवदन हरी । कमल नेत्रधारी । लीला कमळें करी । झेलीतसे ॥ ६ ॥ करकमळीं कमळा । सेवी चरणकमळा । ऐशी वसुदेव देखे डोळां । दिव्य मूर्ति ॥ ७ ॥ लक्ष्मी डवलूनियां जाण । हृदयीं श्रीवत्सलांछन । द्विजपदाचें महिमान । देखे दक्षिणभागीं ॥ ८ ॥ शंख चक्रादि आयुधें चारी । पीतांबर धारी । सगुण निर्गुण हरी । समसाम्य ॥ ९ ॥ ऐसें सगुण निर्गुण भाका । पहात पहात देखा । भिन्न भेदाची न रिघे रेखा । कृष्णपर्णी ॥ १० ॥ एका जनार्दनीं खरें । निजरूप निर्धारें । अहं कंसाचें वावरें । मिथ्या भय ॥ ११ ॥

९ देवकी वसुदेवाकडे पाहे । तंव तो स्वानंदे गर्जताहे । येरी धांवोनि धरी पाये । उगे रहा ॥१॥ जळो जळो हे तुमची बुद्धी । सरली संसारशुद्धी । कृष्ण लपवा त्रिशुद्धी । जग प्रगट न करावा ॥२॥ आतां मी करूं कैसें । भ्रतारा लागलें पिसें । मज मायेच्या ऐसें । पुरुष ममता न धरी ॥३॥ मज मायेची बुद्धी ऐसी । म्यां आच्छादिलें श्रीकृष्णासी । वेगें होईन तुमची दासी । अति वेगेंशीं बाळ न्यावें ॥४॥ येरु म्हणे नवल जालें । तुज कृष्णें प्रकाशिलें । त्वां केवीं आच्छादिलें । कृष्णरूप ॥५॥ सरसर अरजे मूढे । बोलसी तितुकें कुडें । कृष्णरूप वाडें कोडें । माया कैंची ॥६॥ येरी म्हणे सांडा चावटी । कोरड्या काय सांगूं गोष्टी । गोकुळासी उठाउठी । बाळ न्यावें माझें ॥७॥ अवो कृष्णीं चिंतिसी जन्ममरण । हेंचि तुझें मूर्खपण । कृष्णनामें जन्ममरण । समूळ निर्दळिलें ॥८॥ सरा बहू बोलाचा बडिवारु । परि निर्धारु न धरवे धीरु । या लागीं लेंकरूं । गोकुळा न्यावें ॥९॥ तुम्हीं न माना माझिया बोला । वेणेंवीण उपजला । नाहीं योनिद्वारां आला । कृष्णनाथु ॥१०॥ आतां मी काय करूं वो । वसुदेव म्हणे नवलावो । तुझ्या बोलाचा अभिप्रावो । तुझा तुजची न कळे ॥११॥ चोज कैसेंवीण । ज्या नाहीं जन्ममरण । त्यासी मारील कवण । समूळ वावो ॥१२॥ जेणें मीपण आभासे । तेणें माझें मूर्खपण तुम्हां दिसे । हें अंगींचें निजरूप पिसें । न कळे तुम्हां ॥१३॥ कृष्ण निजबोधु सुंदरा । यासी जीवें जतन करा । जाणिवेच्या अहंकारा । गुंता झणीं ॥१४॥ आतां काय मीं बोलूं शब्दू । ऐसा करितां अनुवादू । बोले खुंटला शब्दू । प्रगटला कृष्ण ॥ १५ ॥ प्रकृति पुरुष दोन्ही । मीनली एकपणीं । एका जनार्दनीं । वंदी मोक्ष ॥ १६ ॥

१० श्रीकृष्ण न्यावा गोकुळा । पायीं स्नेहाच्या शृंखळा । कायाकपटीं अर्गळा । मोहममतेच्या ॥१॥ कृष्णीं धरितां आवडी । स्वयें विराली स्नेहाची बेडी । मुक्तद्वार परवडी । नाहीं अर्गळा शृंखळा ॥२॥ कृष्ण जंव नये हातां । तंवचि बंधनकथा । पावलीया कृष्णनाथा । वंदी मोक्ष ॥३॥ ते संधि रक्षणाईते । विसरली रक्षणातें । टकमकीत पहाते । स्वयें कृष्ण नेतां ॥४॥ श्रीकृष्ण अंगशोभा । नभत्व लोपलें नभा । दिशेची मोडली प्रभा । राखते कवण ॥ ५ ॥ अंधारामाजी सूर्य जातु । श्रीकृष्णासी असे नेतु । सत्व स्वभावें असे सांगतु । कृष्णकडिये पडियेला ॥६॥ अंध ते बंधन गेलें । राखतो राखणे ठेलें । एका जनार्दनीं केलें । नित्य मुक्त ॥ ७ ॥

११ तीरा आणिला श्रीकृष्ण । हरिखे यमुना झाली पूर्ण । चढे स्वानंदजीवन । चरण वंदनार्थ ॥ १ ॥ वसुदेव म्हणे कटकटा । यमुना रोधिली वाटा । कृष्ण असतां निकटा । मोहें मार्ग न दिसे ॥ २ ॥ कृष्ण असतां हातीं । मोहें पडली भ्रांती । मोहाचिये जाती । देव नाठवे वा ॥ ३ ॥ मैळी मुकी वेताळ । मारको मेसको वेताळ । आजी कृष्ण राखा सकळ । तुम्ही कुळदेवतांनो ॥ ४ ॥ अगा वनींच्या वाघोबा । पावटेकीच्या नागोबा । तुम्ही माझिया कान्होबा । जीवें जतन करा ॥ ५ ॥ हातींचा कृष्ण विसरून । देव देवता होतो दीन । मोहममतेचें महिमान । देवा ऐसें आहे ॥६॥ मोहें कृष्णाची आवडी । तेथें न पडे शोक सांकडीं । एका जनार्दनीं पावले परथडी । यमुनेच्या ॥ ७ ॥

१२ गोकुळीं ठेवितां श्रीकृष्णनाथ । वसुदेवास माया प्राप्त । तेणें पावला त्वरित । देह बंदिशाळे ॥१॥ तंव

तुटली जडली वेडी । कपाटा पडली कडी । भव भयाच्या कडाडी । अहं कंस पावे ॥ २ ॥ श्रीकृष्ण सांडिला मागें । पंचमहाभूत पाठी लागे । मिथ्या बंधन वाउगें । उठी मरण भये ॥ ३ ॥ कंस पुसे लव-लाह्या । काय प्रसवली तुझी जाया । म्हणोनी आणिली योगमाया । वसुदेवें ॥ ४ ॥ वेगें देवकी म्हणे । कंस पुसेल जेव्हां तान्हें । तेव्हां तुवां देणें । हे तया हातीं ॥ ५ ॥ ते देतां देवकीजवळी । गर्जे ब्रह्मांड किंकाळी । टाहो फुटली आरोळी । दैत्यानिधींची ॥ ६ ॥ तेणें दचकलें दुर्धर । कामक्रोधादि असुरा । कंस पावला सत्वर । धरावयासी ॥ ७ ॥ वेगीं आठवा आणवी । तंव हातां आली आठवी । कंस दचकला दुर्धर जीवीं । नोहें जालेंचि विपरीत ॥ ८ ॥ आठवा न दिसे डोळां । आठवी पडली गळां । कर्म न सोडी कपाळा । आलें मरण मज ॥ ९ ॥ परासि मारितां जाण । मारित्या मारी मरण । कंस भीतसे आपण । कृष्ण भय करी ॥ १० ॥ आठवी उपडितां तांतडी । तंव तें ब्रह्मांड कडाडी । हातांतून निघ्राली हडवडी । कंस भयाभीतु ॥ ११ ॥ तंव ते गर्जली अंबरीं । पैल गोकुळीं वाढे हरी । तुज सगट वोहरी । करील दैत्य-कुळाची ॥ १२ ॥ वधितां देवकीचीं बाळें । माझें पाप मज फळलें । माझें निजकर्म बळें । आलें मरण मज ॥ १३ ॥ भय संचलें गाढें । तेणें पाऊल न चले पुढें । पाहतां गोकुळाकडे । मूर्च्छित कंस वा ॥ १४ ॥ आसनीं भोजनीं शयनीं । भये कृष्ण देखे नयनीं । थोर भेदरा मनीं । जनीं वनीं हरी देखे ॥ १५ ॥ कृष्ण भयाचें मथित । कंसपणा विसरे चित्त । एका जना-र्दनीं भक्त । भयें जीवन्मुक्त ॥ १६ ॥

## अवतीर्ण काल परिस्थिति व श्रीकृष्ण भगवान प्रगटता.

१३ गोकुळीं आनंद जाहला । रामकृष्ण घरा आला । नंदाच्या दैवाला । दैव आलें अकस्मात ॥ १ ॥ श्रावण वद्य अष्टमीसीं । रोहिणी नक्षत्र ते दिवशीं । बुधवार परियेसी । कृष्णमूर्ति प्रगटलीं ॥ २ ॥ आनंद न समाये त्रिभुवनीं । धांवताती त्या गौळणी । वाण भरुनी नंदराणी । सदनाप्रती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अगळ । न कळे ज्यावें लाघव सकळ । तया म्हणती बाळ जो म्हणती बाळ । हालविती ॥ ४ ॥

१४ एक धांवूनी सांगती । अहो नंदराया म्हणती । पुत्रसुख प्राप्ती । मुख पहा चला ॥ १ ॥ सर्वे घेऊनि ब्राह्मण । पहावया पुत्रवदन । धांवूनियां सर्वजण । पहावया येती ॥२॥ बाळ सुंदर राजीवनयन । सुहास्य-वदन घनश्यामवर्ण । पाहूनियां धालें मन । सकळि-कांचे तटस्थ ॥ ३ ॥ पाहूनि परब्रह्म सांवळा । वेधलें मन तमालनीळा । एका जनार्दनीं पाहतां डोळा । वेधें वेधिलें सकळ ॥ ४ ॥

१५ वेधल्या गोपिका सकळ । गोवळ आणि गोपाळ । गायी म्हशी सकळ । तयां कृष्णाचें ध्यान ॥१॥ नाठवे दुजें मनीं कांहीं । कृष्णावांचुनी आन नाहीं । पदार्थमात्र सर्वही । कृष्णातें देखती ॥२॥ करितां संसाराचा धंदा । आठविती त्या गोविंदा । वेधें वेधल्या कृष्णछंदा । रात्रंदिवस समजेना ॥३॥ एका जनार्दनीं छंद । हृदयीं तया गोविंद । नाहीं विधि आणि निषेध । कृष्णावांचुनी दुसरा ॥ ४ ॥

१६ गोकुळींच्या जना ध्यान । वाचे म्हणती कृष्ण कृष्ण । जेवितां बैसतां ध्यान । कृष्णमय सर्व ॥ १ ॥ ध्यानीं ध्याती कृष्णा । आणिक नाहीं दुजी तृष्णा । विसरल्या विषयध्याना । सर्व देखती कृष्ण ॥ २ ॥ घेतां देतां वदनीं कृष्ण । आन नाहीं कांहीं मन । वाचा वाच्य वाचक कृष्ण । जीवेंभावें सर्वदा ॥ ३ ॥ कृष्णरूपीं घेघली वृत्ती । नाहीं देहाची पालट स्थिती । एका जनार्दनीं देखती । जागृति स्वप्नीं कृष्णातें ॥ ४ ॥

## गर्गाचार्यांचें जातक.

१७ व्रजांत कोणे एक वेळेशी । आले गर्गाचार्य ऋषी । त्यासी दाखवितां कृष्णासी । चिन्हें बोलता झाला ॥ १ ॥ यशोदेबाई ऐक पुत्राचीं लक्षणें ॥ ध्रु. ॥ मध्यें मुख्य यशोदा बाळा । सन्मुख रोहिणी वेल्हाळा । भोंवता गोपिकांचा पाळा । त्या गोपाळा दाखविती ॥ २ ॥ करील दह्या दुधाची चोरी । भोगिल गौळि-यांच्या पोरी । सकळ सिंदळांत चौधरी । निवडेल निलाजरा ॥ ३ ॥ चोरुनी नेईल त्यांची लुगडीं । त्यांचे संगें घेईल फुगडी । मेळवुनी गोवळ गडी । सुगडीं फोडी शिंकींचीं ॥ ४ ॥ पांडव राजियाचे वेळीं । काढील उष्टया पत्रावळी । ढोरें तुमच्या घरचीं वळी । निवडेल निलाजरा ॥ ५ ॥ यावरी कलवंडतील झाडें । लत्ता खळाळ हाणील घोडे । महा हस्ती धरील

सोंडे । परी ती विघ्नें मावळतीं ॥ ६ ॥ याचरी गाडा एक पडावा । अथवा डोहामाजीं बुडावा । वावटुळीनें उडुनी जावा । सांपडावा वैरियाला ॥ ७ ॥ कारण सच्चिदानंदाचें । बीज नोहे हें नंदाचें । जन्मांतर गोविंदाचें । नव्हे कथिल्या मथिल्याचें ॥ ८ ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । ब्राह्मणलत्तेचें भूषण । हा होईल ब्राह्मण जन । एका जनार्दनीं घरींचा ॥ ९ ॥

## श्रीकृष्ण आळ.

१८ निळी कांच भुमीं खेळे वनमाळी । पाहिलें प्रतिबिंब कृष्ण तया न्याहाळीं ॥ १ ॥ रडूं घेतलें रडूं घेतलें । समजावी यशोदा परी रडूं घेतलें ॥ २ ॥ दे मज खेळावया भानु । आन नको कांहीं दुजा छंद मनु ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव छंद धरी गा । समजावी यशोदा परी न राहे उगा ॥ ४ ॥

१९ शुद्ध स्फटीके आपुलें रूप देखे । कृष्ण तेणें हारिखें डोलतसे ॥ १ ॥ देहविदेहा आलिंगन स्वानंदें चुंबन । तये संधीं मन हारपत ॥ २ ॥ स्वस्वरूपीं भेटीं थोर उल्हास पोटीं । उन्मळीत दृष्टी निजरूप पाहे ॥ ३ ॥ हें जाणोनि माया धांवे लवलाह्या । उचलोनि कान्हया दृश्य दावी ॥ ४ ॥ माझें रूप मज देई घालितो लोळणी । जननी नानागुणी बुझावीत ॥ ५ ॥ माया मोहें गुणाचें खेळणें । येथें कृष्ण म्हणे जीवेंभावें ॥ ६ ॥ देहघटाबाहेरी न वचें मी मुरारी । श्रद्धा उष्ण भरी तावितसे ॥ ७ ॥ विषय पंचधारा देईन वा साकर । नाथिली करकर कां करिसी ॥ ८ ॥ घेई स्तनपान वोरसु इंद्रियां गोरसु । मायेसी उदास् हसूं नको ॥ ९ ॥ इच्छा माउलीची साय सावकाश खाय । गोगोरसाची माय मज चाड नाहीं ॥ १० ॥ तो तंव ठाईच्या ठाईं म्यां तव कांहीं नेलें नाहीं । निजरूप पाही जैसें तैसें ॥ ११ ॥ तुझी पडलीया पडसाई असतांचि जालें नाहीं । नास्तिक तेचि डोई सबळ जाले ॥ १२ ॥ तुझीया सांगातें करणें आणि भुतें । अहंकारें थितें चोरूनि नेलीं ॥ १३ ॥ दुजेपणें पाहतां धरितां नये हातां । निजरूप तत्त्वतां काढोनि देई ॥ १४ ॥ होसी चक्रचाळ घालिसी आळ । बाळलीळा खेळ निर्वाणीचा ॥ १५ ॥ मज मायेवेगळा नवचे वा गोपाळा । आपरूपीं खेळा खेळूं नको ॥ १६ ॥ नेणों कैशी आवडी माया म्हणसी कुळी । भुली नव्हे खोडी तान्हुलिया ॥ १७ ॥ हें नायके उत्तर म्हणे । परती सर । निजरूपीं साचार दावीं मज ॥ १८ ॥ यापरी कान्हया स्वरूपीं थाया । बुझावितां माया वेढोनि गेली ॥ १९ ॥ आपुलीया स्वप्रभा आपण पावे शोभा । सबाह्य कृष्ण उभा एकपणें ॥ २० ॥ माया मोहकता गुणाची वार्ता । कृष्ण कृष्णपणीं तत्त्वतां एकत्वेंची ॥ २१ ॥ एका जनार्दनीं निजीं निज मिळणीं । सगुणी निर्गुणीं कृष्ण एक ॥ २२ ॥

## नंदास विश्वरूप दर्शन.

२० एके दिनीं नवल जालें । ऐकावें भावें वहिलें ॥ १ ॥ घरीं असतां श्रीकृष्ण । योगीयाचें निजध्यान ॥ २ ॥ नंद पुजेसी बैसला । देव जवळी बोलाविला ॥ ३ ॥ शाळीग्राम देखोनि । मुखांत घाली चक्रपाणी ॥ ४ ॥ नंद पाहे भोंवतालें । एका जनार्दनीं बोले ॥ ५ ॥

२१ म्हणे कृष्णराया शाळीग्राम देई । येरु लवलाही वदन पसरी ॥ १ ॥ चवदा भुवनें सप्त तीं पाताळें । देखियलीं तात्काळें मुखामाजी ॥ २ ॥ स्वर्गींचे देव मुखामाजी दिसती । भुलला चित्तवृत्ति नंदराव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाठवे भावना । नंद आपणा विसरला ॥ ४ ॥

२२ घालुनी माया म्हणे नंदराया । भजे यादवराया कयावाचा ॥ १ ॥ संसारसुख भोगाल चिरकाल । परब्रह्म निर्मळ तया भजे ॥ २ ॥ नंद म्हणे देव दूर आहे बापा । आम्हासी तो सोपा कैसा होये ॥ ३ ॥ ऐकतांचि वचन काय करी नारायण । प्रगटरूप जाण दाखविलें ॥ ४ ॥ शंख चक्र गदा पद्म तें हस्तकीं । मुगुट मस्तकीं शोभायमान ॥ ५ ॥ ऐसा पाहतां हरी आनंद पैं झाला । एका जनार्दनीं भेटला जीवेंभावें ॥ ६ ॥

## श्रीकृष्ण भगवानाचें चौर्यकर्म.

२३ सांवळें सानुलें म्हणती तान्हुलें । खेळे तें वहिलें वृंदावनीं ॥ १ ॥ नागर गोमटें शोभे गोपवेषें । नावत सौरसें गोपाळासीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं रुपासी वेगळें । अहं सोहमा न कळे रूप गुण ॥ ३ ॥

२४ वेदादिक श्रमले न कळे जया पार । शास्त्रांसी निर्धार न कळेची ॥ १ ॥ तो हा श्रीहरी नंदाचिया घरीं । क्रीडे नानापरी गोपिकांसी ॥ २ ॥ चोरावया निघे गोपिकांचें लोणी । सौंगडे मिळोनी एकसरें ॥ ३ ॥

एका जनार्दनीं खेळतसे खेळ। न कळे अकळ आगमनिगमां ॥ ४ ॥

२५ मेळवोनि मुलें करावी हे चोरी। पूर्ण अवतारी रामकृष्ण ॥ १ ॥ पाळती पाहती एका जाणविती। सर्व जाऊनी खाती दहींदूधा ॥ २ ॥ सांडिती फोडिती भाजन ताकाचें। कवळ नवनीताचे झेलितातीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाटकी तो खेळ। न कळे अकळ वेदशास्त्रां ॥ ४ ॥

२६ पाळतोनि जाती घरासी तात्काळ। खेळ तो अकळ सर्व त्याचा ॥ १ ॥ गोपाळ सवंगडे मेळवोनि मेळा। मध्यें तो सांवळा लोणी खाय ॥ २ ॥ निजलियाच्या मुखा माखिती नवनीत। नवल विपरीत खेळताती ॥ ३ ॥ न कळे लाघव करी ऐशी चोरी। एका जनार्दनीं हरी गोकुळांत ॥ ४ ॥

२७ मेळवोनि मेळा गोपाळांचा हरी। निघे करावया चोरी गोरसाची ॥ १ ॥ धाकुले सवंगडी घेऊनि आपण। चालती रामकृष्ण चोरावया ॥ २ ॥ ठेवियलें लोणी काढिती बाहेरी। खाती निरंतरीं सवंगडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तयाचें कौतुक। न पडे ठाऊके ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

## गौळणींचा श्रीकृष्ण धरण्याविषयींचा विचार.

२८ मिळती गौळणी दारवटां बैसती। धरूं आतां निश्चिती घरामध्यें ॥ १ ॥ येतो जातो हें न कळे त्याची माव। वाउगीच हांव धरिताती ॥ २ ॥ पांच सात बारा होऊनियां गोळा। बैसती सकळां टकमक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न सांपडेचि तयां। योगी ध्याती जया अहर्निशीं ॥ ४ ॥

२९ अहर्निशीं योगी साधिती साधन। तयांसी महिमान न कळेची ॥ १ ॥ तो हा श्रीहरी बाळवेषें गोकुळीं। खेळे वनमाळी गोवळियांसीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं न कळे महिमान। तटस्थ तें ध्यान मुनीजनीं ॥ ३ ॥

३० न सांपडे हातीं वाउगी तळमळ। म्हणोनि विव्हळ गोपी होती ॥१॥ बैसती समस्ता धरू म्हणोनि धावे। तंव तो नेणवे हातालागीं ॥२॥ समस्ता मिळोनी बैसती त्या द्वारें। नेणवेचि खरे येतो जातो ॥३॥ एका जनार्दनीं न सांपडेचि तयां। बोभाट तो वांयां वाउगाची ॥ ४ ॥

## श्रीकृष्ण विंदान.

३१ वाउगे ते बोल बोलती अबळा। कवण ते गोपाळा धरूं शके ॥ १ ॥ प्रेमावीण कोण्हा न सांपडे हरी। वाउगी वेरझारी घरामध्यें ॥ २ ॥ एका जनार्दनीं गोपीकांसी शीण। म्हणोनि विंदान करीतसे ॥३॥

३२ नवल ती कळा दावी गोपिकांसी। लोणी चोरायासी जातो घरा ॥ १ ॥ धाकुले सवंगडे ठेवुनि बाहेरी। प्रवेशे भीतरीं आपणची ॥ २ ॥ द्वार झांकोनियां बैसती गोपिका। देखियला सखा गोपाळांचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धांवुनि धरिती। नवल ते रीती करीतसे ॥ ४ ॥

३३ गोपी धांवुनियां धरिती तयातें। उगा पाहे बहुतें न बोले कांहीं ॥ १ ॥ करिती गलबला मिळती सकळां। बोलती अबला वाईट तें ॥२॥ कां रे चोरा आतां कसा सांपडलासी। म्हणोनि हातासी धरियलें ॥ ३ ॥ वोढोनिया नेती यशोदे जवळी। आहे वनमाळी कडेवरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं यशोदेचे करीं। उभा श्रीहरी लोणी मागे ॥ ५ ॥

३४ घरोघरीं कृष्ण धरिला बोभाटा। घेऊनि येती धीटा राजद्वारीं ॥ १ ॥ पाहती तों उभा यशोदे जवळी। वाउगी ती कळी दिसताती ॥ २ ॥ गोपिका धांवती घेऊनियां कृष्ण। न कळे विंदान कांहीं केल्या ॥ ३ ॥ घेऊनिया येती तटस्थ पाहती। विस्मित त्या होती आपुले मनीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दावीत लाघव। न कळेचि माव ब्रह्मादिकां ॥ ५ ॥

३५ मिळाल्या गोपिका यशोदे जवळा। तटस्थ सकळां पाहताती ॥ १ ॥ यशोमती म्हणे आलती कासया। वाउगें तें वांयां बोलताती ॥ २ ॥ एका जनार्दनीं बोलण्याची मात। खुंटली निवांत राहिल्या त्या ॥ ३ ॥

३६ आपुलिया घरां जाती मूकवत। नाहीं दुजा हेत चित्तीं कांहीं ॥ १ ॥ परस्परें बोल बोलती अबळा। कैसी नवल कळा देखियली ॥ २ ॥ धरूनियां करीं जाती तयवरी। उभा असे हरी जवळींच ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न कळे लाघव। तटस्थ गोपी सर्व मनामाजीं ॥ ४ ॥

३७ आपुल्या मनासीं करिती विचार। न धरवे साचार कृष्ण करीं ॥ १ ॥ योगीयांचे ध्यानीं न संपडे

कांहीं । तया गोपिकाही धरूं म्हणती ॥ २ ॥ धरितां न धरवे लागली तळमळ । वाउगा कोल्हाळ करिती वांयां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शुद्ध भक्तीविण । न पवे नारायण कवणा हातीं ॥ ४ ॥

३८ अभाविकांसी तो जवळीचा दुरी । दुरीचा जवळी हरी भाविकांसी ॥१॥ म्हणोनि अभावें ठकती गोपिका । त्या यदुनायका न धरती ॥ २ ॥ वाउगे ते कष्ट मनींचा तो सोस । सायासें सायास शिणताती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शीण गोपीकांसी । तेणें हृषीकेशी हांसतसे ॥ ४ ॥

३९ न कळती भावेवीण रामकृष्ण । गोपिकांसी शीण बहुतची ॥१॥ बहुत मिळती बहुतांच्या मतां । तैशा गोपी तत्वतां शिणताती ॥ २ ॥ एका जनार्दनीं प्रेमावीण देव । नकळे लाघव श्रीहरीचें ॥ ३ ॥

४० भाविका त्या गोपी येतो काकुळती । तुमचेनि विश्रांती मजलागीं ॥ १ ॥ मज निराकारा आकारासी येणें । तुमचें तें ऋण फेडावया ॥ २ ॥ दावितो लाघव भोळ्या भाविकांसी । शाहाणे तयासी न संपडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाविकांवांचून । प्राप्त नोहे जाण देव तया ॥ ४ ॥

४१ भोळे ते साबडे गोपिका ते भावें । चुंबन वरवें देती तया ॥ १ ॥ यज्ञमुखीं तोंड करी जो वांकुडें । तो गोपिकांचें रोकडें लोणी खाये ॥ २ ॥ घरां नेऊनियां घालिती भोजन । पंचामृत जाण जेवविती ॥३॥ एका जनार्दनीं व्यापक तो हरी । गोकुळा माझारीं खेळ खेळे ॥ ४ ॥

४२ खेळतसे खेळ सवंगडियांसहित । गोपिकांचे हेत पुरवितसे ॥१॥ जयाचिये चित्तीं जे कांहीं वासना । तेचि नारायणा पुरविणें ॥ २ ॥ जया जैसा हेत पुरवी तयांचा । विकला काया वाचा भाविकांचा ॥ ३॥ एका जनार्दनीं भाविकांच्या पाठीं । धांवे जगजेठी वनोवनीं ॥ ४ ॥

## वेणी-दाढीची ग्रंथी.

४३ गोकुळामाजीं कृष्णें नवल केलें । स्त्री आणि भ्रतारा विंदान दाविलें ॥ १ ॥ खेळ मांडिला हो खेळ मांडिला हो । न कळे ब्रह्मादिकां अगम्य त्याची लीळा वो ॥२॥ एके दिनीं गृहा गेले चक्रपाणी । बैसोनी ओसरी पाहे पाळतोनी लोणी ॥ ३ ॥ गौळणी आली घरां म्हणे शारंगपाणी । चोरीचें विंदान पाळती पाहसी मनीं ॥४॥ चोरी करावया जरी येसी सदनीं । कृष्णा धरुनी तुझी शेंडी बांधीन खांबालागुनीं ॥ ५ ॥ एका जनार्दनीं ऐसे बोल व्रजबाळी । दाविलें लाघव ब्रह्मादिकां न कळे ते काळीं ॥ ६ ॥

४४ उठोनि मध्यरात्रीं तेथें आला सांवळा । सुखसेजे पहुडली देखे गोपी बाळा ॥ १ ॥ पती आणि गौळणी एके सेजे पहुडली । बैसोनियां सेजे विपरीत करणी केली ॥ २ ॥ धरूनी गोपी वेणी दाढी पतीची बांधिली । न सुटे ब्रह्मादिकां ऐशी गांठ दिधली ॥ ३ ॥ करुनी कारण आले आपुले मंदिरा । यशोदा म्हणे कृष्णा काय केलें सुंदरा ॥ ४ ॥ जाहला प्रातःकाळ लगबग उठे कामिनी । वोढतसे दाढी जागा झाला ते क्षणीं ॥ ५॥ कां गे मातलीस दिली दाढी वेणी गांठी । एका जनार्दनीं आण वाहे गोरटी ॥ ६ ॥

४५ उभयतां बैसोनि क्रोधें बोलती । कैशी जाहली करणी एकमेक रडती ॥ १ ॥ गोदोहन राहिलें दिवस आला दुपारी । धाउनी शेजारी येती पहाती नवलपरी ॥ २ ॥ शस्त्रें घेऊनिया ग्रंथी बळें कापिती । कापितांचि शस्त्र न कांपे कल्पांतीं ॥ ३ ॥ घेऊनियां अग्नि लाविताती दाढी वेणी । न जळेचि वन्ही ऐशी केली कृष्णें करणी ॥ ४ ॥ ऐसा समुदाव लक्षावधि मिळाला । बोल बोलती बोला भलतेंचि बरळा ॥ ५ ॥ धांवूनियां नंदरायातें सांगती । एका जनार्दनीं नवल विपरीत गती ॥ ६ ॥

४६ नंदें आणविलें उभयतां राजबिंदीं । गोवळे आणि गोवळी भोंवतीं जनांची मांदी ॥ १ ॥ येवोनि चावडीये उभयतां रडती । म्हणे नंदराव कैशी कर्माची गती ॥ २ ॥ अंकावरी बैसोनि सांवळा गदगदां हांसे । विंदान दाविलें देवें तुज बांधिलें असे ॥ ३ ॥ आमुची तूं शेंडी काल बांधीन म्हणसी । न कळे देवाची भाव देवें बांधिलें तुजसी ॥ ४ ॥ आतां माझी गती कैशी हरी ते सांगा । करुणाभरीत देखोनि गेलें लाघव वेगा ॥ ५ ॥ एका जनार्दनीं करुणाकर मोक्षदानी । सहज दृष्टी पाहतां सुटली ग्रंथी दोनी ॥६॥

४७ आल्हादयुक्त गोपिका आली आपुलें सदनीं । नंदासहित मोक्षदानी प्रवेशले भुवनीं ॥ १ ॥ म्हणे यशोदा बा कृष्णा न करी तूं खोडी । बोलती गोपिका

वाईट त्या जगझोडी ॥ २ ॥ एका जनार्दनीं माझा अपराध नाहीं । जया जैसा भाव तया तोचि देहीं ॥३॥

## श्रीकृष्ण–गोपींचीं परस्परांविरुद्ध गाऱ्हाणीं.

४८ उठोनि प्रातःकाळीं गोपी येती घरा । आवरीं आवरीं यशोदे आपुलिया पोरा ॥ १ ॥ थोर पीडियेलें सांगतां नये आम्हां । दहीं दूध तूप लोणी नासिलें सीमा ॥ २ ॥ लेकी सुना पोरें वेडाविलीं सकळ । चोरी करिताती भुलविलें सबळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आवरीं आपुला कान्हा । तुझा तुज गोड वाटे हांसतीस मना ॥ ४ ॥

४९ येकीपुढें येक सरसावोनि गोपिका । सांगती गाऱ्हाणीं तुज नाहीं ठाऊका ॥ १ ॥ रात्रीं मंचकावरी पहुडतां साजणी । अवचिता येउनी बांधी दाढी आणि वेणी ॥ २ ॥ नाहतां आपुले अंतरसदनीं । येऊनियां पुढें बैसे शारंगपाणी ॥ ३ ॥ ऐसा कंटाळा आणियला येणें । एका जनार्दनीं तुझें आवडतें तान्हें ॥४॥

५० दुजी येऊनी पुढें बोले ऐके वो बाई । घुसळण घुसळितां डेरा फोडिला पाही ॥ १ ॥ धांवुनि आली सासु मारितसे मजला । हांसतसे आपण तेथोनि पळाला ॥ २ ॥ वांसुरें तीं सोडी मुलां चिमुरे घेतो । घ्या रे नवनीत म्हणोनि तया मारितो ॥ ३ ॥ लपविलें ठायीं उरों नेदी कांहीं । एका जनार्दनीं पुरे आतां बाई ॥ ४ ॥

५१ धांवुनी तिजी गोपिका म्हणे वो बाई । येथें रहावया लाग उरला नाहीं ॥ १ ॥ जात होतें पाण्या यमुने पाहाटीं । अवचित येऊनियां पाठी थापटी ॥ २ ॥ एका जनार्दनीं आणियला त्रास । नको हें गोकुळ आम्ही जाऊं मथुरेस ॥ ३ ॥

५२ एकी पुढें एक सांगती गाऱ्हाणीं । लिहितां पृथ्वी न पुरेचि धणी ॥ १ ॥ म्हणे यशोदा कृष्णा काय हें कैसें । खोडी नको करूं हरी बोलतसे ॥ २ ॥ मज नेती गृहांत दहा पांच मिळती । नग्न होऊनियां मज पुढें नाचती ॥ ३ ॥ म्हणती रे पोरा तूं दिससी साना । हृदयीं धरुनी करी देती स्तना ॥ ४ ॥ ऐसें याचें तुज सांगूं म्हणतां माते । एका जनार्दनीं नवल वाटे तूतें ॥ ५ ॥

५३ मिळोनि धमकटी दहीं दूध ते खाती । मी खेळतां राजबिदीं घरांत नेती ॥ १ ॥ नग्न होऊनियां नाहतां अबळा । डोळे झांक म्हणती मज त्यां सकळां ॥ २ ॥ न झांकितां डोळे लोणी देती मजसी । खादलें म्हणोनि सांगती तुजसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोलतां हांसती बाळा । रागावुनी मग बोल बोलती सकळां ॥ ४ ॥

५४ काय याचे बोलें तुज वाटतसे कोड । बोलतो सांवळा अवघे वितंड ॥ १ ॥ पुरे तुझें गांव नको आतां वस्ती । आम्ही जाऊं सर्व मिळूनि मथुरेप्रती ॥ २ ॥ नाहीं तसे बोल बोलतसे वांयां । एका जनार्दनीं हा तुझा कान्हया ॥ ३ ॥

५५ नको करूं आतां कृष्णा तूं खोडी । नाहीं म्हणोनियां दोनी हात जोडी ॥ १ ॥ काल इचे गृहीं थोडें खादलें नवनीत । म्हणोनि राधिकेचे स्तनीं ठेवी हात ॥ २ ॥ येवढाचि गोळा काढिला बाहेरी । सत्य म्हणोनियां आण वाहतो हरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विश्वव्यापक सांवळा । न कळे ब्रम्हादिकां याची अगम्य कळा ॥ ४ ॥

५६ हासोनियां राधा बोले यशोदेशी । पहा वो हा चोर बोले विश्वासी ॥ १ ॥ आण वाहतसे लटकीची मामिसे । याचिया वचनीं सर्वांस विश्वासे ॥ २ ॥ खोडी न करी ऐशी वाहे तूं आण । गोरसावांचुनि चोरी न करीं तुझी आण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोले विनोद वाणी । यशोदेसह हांसती गौळणी ॥ ४ ॥

५७ घरोघरीं चोरी करितो हृषीकेशी । गाऱ्हाणें सांगती येऊनी यशोदेसी ॥ १ ॥ भली केली गोविंदा भली केली गोविंदा । निजभक्तालागीं दाखविसी लीला ॥ २ ॥ कवाड उघडोनि शिंकें वो तोडिलें । दहीं दूध भक्षूनि ताक उलंडिलें ॥ ३ ॥ अंतर बाहेर मजव्यापियेलें माया । एका जनार्दनीं म्हणे न सोडी पायां ॥४॥

५८ मिळोनि अबळा बैसती परसद्वारीं । येरेंयेरे कृष्णा म्हणोनि बाहाती व्रजनारी ॥ १ ॥ ऐशा लांचावल्या नंदनंदना । घरींच बैसती लक्ष लावीत कान्हा ॥ २ ॥ वेदश्रुतीसी न कळे जयांची शुद्धी । तो नवनीत खावया लाहे लाहे घरामधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ब्रह्म परिपूर्ण । तणें वेधें वेधिलें आमुचें मनाचें मन ॥ ४ ॥

५९ मार्गी जातां विस्मय करी । कैसें विंदान केलें नवल परी । आम्हीं अबला घालितो चोरी । श्रीहरी परापश्यंती वेगळा ॥१॥ नवल जाहलें काय सांगू माये । चोरी करितां धरिला पाहे । घरां घेऊनि जातां

उभा आहे। न कळे विंदान सये काय सांगू ॥२॥ एका जनार्दनीं परिपूर्ण व्यापक सर्वांठायीं संपूर्ण। जनींवनीं जनार्दन। पाहतां महिमान न कळे ॥ ३ ॥

६० ऐसें नानापरी सांगती गार्‍हाणें। ऐकतां घडे कोटी अश्वमेघ यज्ञ ॥ १ ॥ पुनरपी संसारा नयेची मागुती। शंख चक्र गदा पद्म ऐसे जन्म होती॥२॥ एका जनार्दनीं ऐकतां चोरकिर्म ॥ कर्म आणि धर्म पावती विश्राम ॥ ३ ॥

६१ जो न कळे वेदशास्त्रां गे माये। तो गोकुळीं चोरूनी लोणी खाये ॥ १ ॥ ऐशी भाविकांची आवडी देखा। टाकूनी आला वैकुंठ सुखा ॥ २ ॥ एका जनार्दनीं ब्रह्म परिपूर्ण। तया घालिती यशोदा भोजन॥३॥

६२ बाळ कृष्ण रांगे नंदाघरीं। चोरी करी घरोघरीं। गौळणी धरूनिया करीं। घेऊनि नंदमंदिरीं आली ॥ १ ॥ गार्‍हाणें सांगती अबळा। नवलविंदान तयाची ती कळा। हांसत उभा यशोदे जवळा। पाहूनियां बाळा चाकाटली ॥ २ ॥ राहिलें बोलणें चालणें निवांत। कृष्णरूपी वेधलें चित्त। एका जनार्दनीं समाधिस्त। द्वैताद्वैत विसरली ॥ ३ ॥

६३ एकमेक गौळणी करिती विचार।चोरी करी कान्हा नंदाचा कुमर ॥ १ ॥ नायके वो बाई करूं गत काई। धरूं जातां पळून जातो न सांपडेचि बाई ॥ २ ॥ दहीं दूध लोणी चोरी करूनियां खाये। पाहूं जातां कवाड जैसे तैसे आहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न कळे लाघव तयाचें। न कळेची ब्रह्मादिकां वेडावले साचें ॥ ४ ॥

६४ काय सांगूं यशोदे बाई। आम्ही घरांत बैसलों पाहीं। कृष्ण आला लवलाही। म्हणे मज भूक लागली ॥ १ ॥ ऐसा लाघवी हा हरी। खोडी करी नानापरी। धरितां न धरवे निर्धारीं। जातो पळूनिया दुरी ॥ २ ॥ माझी सून एकली घरीं। नाहात होती परसद्वारीं। आपण येउनि झडकरी। उभा पुढें राहिला ॥३॥ तवं ती म्हणे कां आलासी। कृष्ण म्हणे तूं परियेसी। मी खेळत होतों विदीसीं। चेंडु उडोनियां आला ॥ ४ ॥ तंव ती म्हणे पाहे कृष्णा। क्रियाहीन नष्ट तूं कान्हा। घाली मिठी धरी स्तना। कां गे चेंडू देईना ॥ ५ ॥ तंव ती म्हणे परता सर। कृष्ण म्हणे दे चेंडू सत्वर। एका जनार्दनीं निर्धार। परा भक्ति हे साचार ॥ ६ ॥

६५ आम्ही असतां माजघरीं। रात्र झाली दोन प्रहरीं। मी असतां पतिशेजारीं। अवचित हरी तुझा आला ॥ १ ॥ काय सांगूं सखये बाई। वेदशास्त्रां अगम्य पाहीं। आगमनिगमां न कळे कांहीं। मन पवन पांगुळले गे बाई ॥ २ ॥ आम्ही असतां निदसुरी। मुंगुस घेउनी आपुले करीं। सोडियलें दोघां माझारीं। तंव तें बोचकरी आम्हांतें ॥ ३ ॥ आम्ही भ्यालों उभयतां। चीर फिटलें बाई तत्त्वतां। नग्नचि जाहलें मी सर्वथा। भूतभूत म्हणोनि भ्यालें ॥ ४ ॥ ऐसें करूनि आपण पळाला। जाउनी माये आड लपला। एका जनार्दनीं म्हणे भला। आतां सांपडतां न सोडी त्याला ॥ ५ ॥

६६ गौळणी बारा सोळा। होउनी येके ठायीं मेळा। म्हणती गे कृष्णाला। धरूं आजीं ॥ १ ॥ कवाड लाउनीं। बैसल्या सकळजणी। रात्र होतांचि माध्यानीं। आला कृष्ण ॥ २ ॥ दहीं दूध तूप लोणी। यांचीं भाजनें आणुनी। रितीं केलीं तत्क्षणीं। परी तयां न कळे ॥ ३ ॥ थोर लाघव दाविलें। सकळां निद्रेनें व्यापिलें। द्वार तें नाहीं उघडिलें। जैसें तैसेंची ॥ ४ ॥ खाउनी सकळ। मुखा लाविलें कवळ। आपण तात्काळ। पळे बाहेरी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं। ऐशी करूनि करणी। यशोदे जवळी येउनी। बोसंगा बैसे ॥ ६ ॥

६७ उदय सूर्याचा जाला। मिळाला गौळणींचा मेळा। धाउनी सकळां। आलीया अंगणीं ॥ १ ॥ बोलती अति सक्रोधें। थोर पीडिलें बाळकें। चोरी करूनियां देखे। आला पळोनी ॥ २ ॥ आमुचीं फोडिलीं भाजनें। दहीं दूध खादलें येणें। एका जनार्दनीं तान्हें। यशोदे तुझें ॥ ३ ॥

६८ येणें कृष्णें आमुचें खादलें दूध दहीं। फोडोनि टाकिलीं भाजनें पाहीं ॥ १ ॥ आवरीं आवरीं बाई आपुला कान्हा। न कळे याची करणी ब्रम्हादिकां। नये ध्याना ॥ २ ॥ घेऊनियां पोरें घरामध्यें येतो पाहे। चोरी करूनियां पळुनी जातो लवलाहें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं किती सांगूं गार्‍हाणें। पुन्हां आलिया यासी शीक लावीन सत्य जाणे ॥ ४ ॥

६९ गौळणी सांगती गार्‍हाणीं। रात्रीं आला चक्रपाणी। खाऊनी दहीं दूध तूप लोणी। फोडिलीं अवघीं विरजणीं ॥ १ ॥ हा गे बाई कोणासी आवरेना। यशोदे बाळ तुझा कान्हा। कोठवर सोसूं धिंगाणा ॥ धृ. ॥ दुसरी आली धांवत। यानें बाई काय केली मात। मुखाशीं मुखचुंबन देत। गळ्या-

मधी हात घालीत । धरूं जातां सांपडेना ॥ २ ॥ तिसरी आली धांउनी । म्हणे गे बाई काय केली करणी । पतीची दाढी माझी वेणी । दोहींसी गांठ देउनी । गांठ बाई कोणा सुटेना ॥ ३ ॥ मिळोनि अवघ्या गौळणी । येती नंदाच्या अंगणीं । जातों आम्ही गोकुळ सोडोनी । आमुच्या सुना घेउनी । हें बाई आम्हांसी पहावेना ॥ ४ ॥ ऐसीं ऐकतां गाऱ्हाणीं। यशोदेनयनीं आलें पाणी । कृष्णा खोड दे टाकुनी। एका जनार्दनीं चरणीं । प्रेम तया आवरेना ॥ ५ ॥

७० गौळणी गाऱ्हाणें सांगती यशोदेसी । दहीं दूध खाऊनीयां पळुनी जातो हृषीकेशी ॥ १ ॥ लाडका हा कान्हा बाई तुझा तुला गोड वाटे । याच्या खोडी किती सांगूं महीपत्र सिंधु आटे ॥ २ ॥ मेळवोनि गोपाळ घरामध्यें शिरे कान्हा । धरूं जातां पळुनी जातो यादवांचा राणा ॥ ३ ॥ ऐसें मज यानें पिसें लाविलें सांगूं काई । एका जनार्दनीं कायावाचमनें पायीं ॥ ४ ॥

७१ यशोदेसी गौळणी सांगती गाऱ्हाणें । नट नाटक कपटी सांभाळ आपुलें तान्हें । किती खोडी याच्या सांगूं तुजकारणें ॥ १ ॥ सहस्रमुख लाजला। निवांतचि ठेला । वेद परतला । गाती अनुछंदें ॥ वेध लाविला गोविंदें । परमानंदें आनंदकंदें ॥ धृ. ॥ एके दिवशीं मी गेलें यमुनातट जीवना । गाई गोप सांगातें घेऊनि आला कान्हा । करीं धरी पदरा न सोडी तो जाणा । एकांत घातली मिठी । न सुटे गांठी पाहिला दृष्टी । नित्य आनंदु ॥ वेध लाविला ॥ २ ॥ माझ्या घरासी एकदां आले शारंगपाणी । दहीं दुध भक्षुनी रितीं केलीं दुधाणीं । अज्ञान मडकीं टाकिलीं निष्टुनी । पाहिला हरी । पळाला दुरी । घरा भीतरीं बाई यशोदे । वेध लाविला ॥ ३ ॥ किती खोडी याच्या सांगूं तुज साजणी । गुण यांचे लिहितां न पुरे मेदिनी । रुप सुंदर पाहतां न पुरे नयनीं । एका जनार्दनीं देखिला । ध्यानीं धरिला । मनीं बैसला । सच्चिदानंद ॥ वेध लाविला ॥ ४ ॥

७२ ऐके ऐके बाई यशोदे । नवल केलें तुझ्या गोविंदें । आमुचीं मुलें तुडविलीं पदें । आतां यासी बांधीन ॥ १ ॥ आवरीं आवरीं आपुला कान्हा । नासियल्या आमुच्या सुना । अझुनि लाज नये तुझ्या मना । तुझा तुला गोड वाटे कान्हा ॥ २ ॥ येतो आमुचे घरासी । धमकावितो लेकीसुनांसी । कोठें लोणी सांग आम्हांसी । न सांगतां वासुरें सोडी बिदीसी ॥ ३ ॥ आपण खातो दहीं दूध लोणी । हात पुसतो सुनेच्या मुखालागुनी । एका जनार्दनीं करी करणी । जातो पळोनि तेथोनी ॥ ४ ॥

७३ मिळोनि गौळणी । देती यशोदे गाऱ्हाणीं । खोडी करी चक्रपाणी । ऐक साजणी यशोदे ॥ १ ॥ परवां आला आमुचे घरा । दारीं निजला होता म्हातारा । घेऊनि ताकाचा हो डेरा । फोडिला सेरा त्यावरी ॥ २ ॥ दुसरी बोले बाई यशोदे । कांहीं सांगतें तुझीया मुकुंदें । आमुचे घरा येऊनि गोविंदें । नवल केलें साजणी ॥ ३ ॥ सून होती माझी गर्भिणी । तीस पुसे चक्रपाणी । कैसी जाहलीस हो गर्भिणी । तंव ती हांसू लागली ॥ ४ ॥ जवळ बैसला जाऊनी । पोट पाहे चांचपुनी । न कळे ईश्वराची करणी । तंव ती झिडकावी ॥ ५ ॥ ऐशा खोडी नानापरी । किती म्हणोनि सांगूं सुंदरी । एका जनार्दनीं आवरी । आपुलियां कृष्णातें ॥ ६ ॥

७४ गोकुळीं चोरी करितो चक्रपाणी । गवळणी येउनी सांगती गाऱ्हाणीं । येणें माझें भक्षिलें दहीं दूध लोणी । पळोनियां येथें आला शारंगपाणी वो ॥ १ ॥ आवरीं आवरीं यशोदे आपुला कान्हा । याच्या खोडी किती सांगूं जाणा । याचें लाघव न कळे चतुराननां । यासी पाहतां मन नुरे मीपणा वो ॥ २ ॥ एके दिवशीं मी आपुलें मंदिरीं । मंथन करितां देखिला पूतनारी । जवळी येवोनि रवीदंड धरी । म्हणे मी घुसळितों तूं राहे क्षणभरी वो ॥ ३ ॥ परवां आमुचे घरासी आला । संगें घेउनी गोपाळांचा मेळा । नाचतें ऐकत धरीं पाहे अचला । धरूं जातां तो पळोनियां गेला वो ॥ ४ ॥ ऐसें बहु लाघव केलें येणें । किती सांगावें तुज गाऱ्हाणें । एका जनार्दनीं परब्रह्म तान्हें । यासी ध्यातां खुंटलें येणें जाणें वो ॥ ५ ॥

७५ माझा कृष्ण देखिला काय । कोणी तरी सांगा गे ॥ धृ. ॥ हातीं घेऊनियां फूल । अंगणीं खेळत आलें मूल । होतें सारवित मी चूल । कैसी भूल पडियेली ॥ १ ॥ माथां शोभे पिंपळपान । मेघवर्ण ऐसा जाण । त्याला म्हणती श्रीभगवान । योगी ध्यान विश्रांती ॥ २ ॥ संगे घेऊनि गोपाळ । बाळ खेळे आळुमाळ । पायीं पोल्हारे झळाळ । गळा माळ

वैजयंती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं माय । घरोघरांप्रती जाय । कृष्णा जाणावें तें काय । कोणी सांगा गे ॥४॥

## यशोदा राधा संवाद.

७६ नानापरी समजावितें न परी राहे श्रीहरी । दहीं-भात कालवोनि दिला वेगीं झडकरीं । कडेवरी घेऊ-नियां फिरलें मी द्वारोद्वारीं ॥१॥ राधे राधे राधे राधे घेई शामसुंदरा । नेई आतां झडकरीं आपुलिया मंदिरा ॥ धृ. ॥ क्षणभरी घरीं असतां करी खोडी शारंगपाणी । खेळावया बाहेरी जातां आळ घेती गौळणी । थापटोनि निजवितां पळोनि जातो राज-द्वारा ॥ २ ॥ राधा घेऊनि हरीला त्वरें जात मंदिरीं । हृदयमंचकीं पहुडविला श्रीहरी । एका जनार्दनीं हरीला भोगी राधा सुंदरा ॥ ३ ॥

७७ करूं देईना मज दूध तूप बाई । मथितां दधि तो धरी रवी ठायीं ठायीं । हट्ट हा कदापि नुमजे समजाविल्यास काई । समजाउनी यातें तुझ्या घरांत नेई नेई ॥ १ ॥ राधे हा मुकुंद कडिये उचलोनि घेई घेई । रडतांना राहिना करूं यास गत काई काई ॥धृ.॥ हरिसी आनंदें राधा मृदु मृदु बोलवीते । पाळण्यांत तुला कृष्णा निजवोनी हालवितें । गृहा नेऊनियां दहीं भात कालवितें । यशोदेसी सोडीं कान्हा माझ्याजवळीं येई येई ॥ २ ॥ हट्ट मोठा घेतो मला छळितो गे राधे पाहाणें । असाच हा नित्य राधे हरि घरा नेत जाणें । जगावि हा निश्चळ कैसा राहे त्वां समजावल्यानें । तुझी धरितें हनुवटी यासी गृहां नेई नेई ॥३॥ गोविंदा गोपाळा कृष्णा मुकुंदा शेषशाई । जगज्जीवना गोकुळ-भूषणा गोपी भुलवणा बाई । उगा नको रडूं कृष्णा यशोदेसी सोडीं तूंही । एका जनार्दनीं शरण राधे। घेऊनी यासी जाई जाई ॥ ४ ॥

## राधाविलास.

७८ एके दिनीं प्रातःकाळीं । कृष्णें घेतलीसे आळी । देखोनियां उदय मेळीं । सूर्यबिंब ॥ १ ॥ देई देई मज तें आई । रडत बैसला हो बाई । काय सांगों हो सई । या बाळातें ॥ २ ॥ मांडिलें विंदान । न कळे कोणा महिमान । रडतां राहिना पूर्ण । तों देखे राधिका ॥ ३ ॥ राधा म्हणे कृष्णासी । का रे घोरा रडतोसी । वेरु म्हणे गोळा दे मजसी । मग मी न रडे ॥ ४ ॥ उचलोनी काखेसी घेतला । तंव तो रडतां राहिला । यशोदा म्हणे राधिकेला । नेई घरा कृष्णातें ॥ ५ ॥ घेऊनियां झडकरी । घरा आली सत्वरीं । सुमनांचे सेजेवरी । पहुडविलें कृष्णा ॥ ६ ॥ घरी देखोनी एकांत । चुंबन देउनी बोले मात । असली धाकुटा बहुत । नचले कांहीं ॥ ७ ॥ तंव बोले वनमाळी । थोर होतो होवि वेळीं । डोळे झांकीं तूं वेल्हाळी । दावी विंदान ॥ ८ ॥ नेत्र झांकितां ते क्षणीं । जाहला निमासुर तरूणी । षोडष वर्षी मोक्ष-दानी । देखे राधिका ॥ ९ ॥ धांउनी घातलीसे मिठी । हरुष न समाये पोटीं । शयन सुखें गोष्टी । करी कृष्णासी ॥ १० ॥ असतां सुखें एकांतासी । भ्रतार आला ते समयासी । उभा राहूनि द्वारासी । हांक मारी ॥ ११ ॥ ऐकतां भ्रताराचें वचन । घाबरलें राधि-कचें मन । धरी कृष्णाचें चरण । सान होई ॥ १२ ॥ कृष्ण बोले हास्यमुखें । मंत्र विसरलों या सुखें । आतां होणार तें सूखें । होवो यावरी ॥ १३ ॥ भजावें मानसींचा घोर । पाहूनियां तो विचार । पूर्ववत साचार होऊनि रडे ॥ १४ ॥ दहीं भात कालवुनी । ठेविला पुढें आणुनी । बोले आनयासी प्रती वचनीं । क्षणभरी बैसा ॥ १५ ॥ जेवितसे कृष्णनाथ । क्षणभरी बैसा स्वस्थ । ऐकतांचि ऐशी मात । निवांत बैसे ॥ १६ ॥ मग द्वार उघडिविलें । राया कृष्णातें देखिलें । मन तें मोहिलें । आनयाचें ॥१७॥ आनया बोले राधिकेसी । गृहीं न गमे तुजसी । क्षणभरी कृष्णासी । आणीत जाई ॥ १८ ॥ तुमची आज्ञा प्रमाण । म्हणोनि वंदिले चरण । एका जनार्दनीं समाधान । पावले दोघे ॥ १९ ॥

७९ एके दिवशीं शारंगपाणी । खेळत असतां राज-भुवनीं । तेव्हां देखिली नयनीं । गौळणी ते राधिका ॥ १ ॥ मीस करुनी पाणीयाचें । राधा आली तेथें साचें । मुख पहावया कृष्णाचें । आवड मोठी ॥ २ ॥ देव उचलोनि घेतला । चुंबन देउनि आलंगिला । सुख संतोष जाहला । राधेलागीं ॥ ३ ॥ यशोदा म्हणे राधिकेसी । क्षणभरी नेई गे कृष्णासी । कडे घेउनी वेगेंशीं आणिला घरा ॥ ४ ॥ हृदयमंचकीं बैसविला । एकांत समय देखिला । हळूच म्हणे कृष्णाला । लहान असशी ॥ ५ ॥ कृष्ण म्हणे राधिकेसी । मंत्र आहे मजपाशीं । थोर होतों निश्चयेंसी । पाहें पा आतां ॥ ६ ॥ वैकुंठीचा मनमोहन । सर्व जगाचें जीवन । एका जना-र्दनीं विंदान । लाघव दावीं ॥ ७ ॥

८० हर्ष न माये अंबरीं । येऊनियां झडकरी । द्वार उघडी निर्भरीं । आनंदमय ॥ १ ॥ वृद्धा येऊनियां पाहे । उचलोनि लवलाहे । मुख चुंबिलें तें पाहे । कृष्णाचें देखा ॥ २ ॥ मोहिलें वृद्धेचें मन । नाठवे आपपर जाण । लाघवी तो नारायण । करूनियां अकर्ता ॥ ३ ॥ दोहीं करें उचलिला । राधिकेजवळीं तो दिला । म्हणे राधेसी ते वेळां । यासी नित्य आणी॥ ४ ॥ तुज न गमे एकटी । आणीत जाई जगजेठी । एका जनार्दनाचे भेटी । नुरे कांहीं विकल्प ॥५॥

८१ निमासुर वदन । शंखचक्रांकित भूषण । शोभतसे राजीवनयन । राधेजवळी ॥ १ ॥ नवल मांडिलें विंदान । वेदां न कळे महिमान । वेडावली दरुशनें । न कळे तयां ॥ २ ॥ रत्नजडित पर्यंकीं । पहुडले हर्ष सुखीं । नवल जाहलें तें ऐकीं । सासू आली घरां ॥३॥ वृद्धा म्हणे राधेशीं । द्वार उघड वेगेंशीं । गुह्य गोष्टी बोलसी । कवणाशीं आंत ॥ ४ ॥ राधा म्हणे मामिसे । गृहामध्यें कृष्ण असे । मज गमावया सरिसें । आणिला घरीं ॥ ५ ॥ क्षणभरी स्थिर रहा । भरले पायीं आंत न या । भोजन जाहलीया । उघडितें द्वार ॥ ६ ॥ म्हणे कृष्णा आतां कैसें । द्वारीं वृद्धा बैसलीसे । लज्जा जात अनायासें । उभयतांची ॥७॥ कृष्ण म्हणे राधेसी। मंत्र नाठवे मजसी । काय उपाय गोष्टीसी । सांगे तूं मज ॥ ८ ॥ नेणो कैशी पडली भुली । मंत्र चळला या वेळीं । ऐकोनि राधा घाबरली । दीनवदन ॥ ९ ॥ करुणा वचनें बोले राधा । विनोद नोहे हा गोविंदा । माझी होईल आपदा । जगामाजीं ॥ १० ॥ भक्तवत्सल मनमोहन । शरण एका जनार्दन । ऐकोनि राधेचें वचन । सान जाहला ॥ ११ ॥

८२ थुरकत थुरकत चालतु । राधिकेचे गळां मिठी घालितु । तयेसी चुंबन आवडी देतु । पाहतां यशोदेसी मग रडतु ॥ १ ॥ देई देई म्हणे चेंडुवातें । म्हणोनि आसडी निरीतें । यशोदा म्हणे राधे परते । कां गे रडविसी कृष्णा ॥ २ ॥ राधिका म्हणे ऐका मामिसे । याचा चेंडू मजपाशीं नसे । हा कियानष्ट बोले भलतैसें । चेंडू मजपाशीं नाहीं आण तुमची असे ॥ ३ ॥ कृष्ण म्हणे झाडूनी चीर दावी । राधा झाडिता चेंडू पडिला लवलाहीं । म्हणे पाहे वो माझे आई । चेंडू घेउनी आण वाहेती पाहीं ॥ ४ ॥ यशोदेनें उचलोनि घेतिला कडेवरी । चेंडू झेलितसे सव्य अपसव्य करीं । एका जनार्दनीं भाव न कळे निर्धारीं । लाजोनी ती राधा आली आपुले घरीं ॥ ५ ॥

८३ मथुरेसी गोरस विकूं जातां नितंबिनी । तयामाजीं देखिली राधिका गौळणी । जवळी जाऊनियां धरिली तिची वेणी ॥ १ ॥ सोडीं सोडीं कान्हा शारंगपाणी । माझीया संसारा घातिलें पाणी । नांव रूप माझें बुडविलें जनीं ॥ २ ॥ राधा म्हणे येथोनियां बहु चाट होसी । घरीं चोरी करूनिया घाटे आडविसी । ओढोनिया नेते आतां तुज मातेपाशीं ॥ ३ ॥ धरिलीं पदरीं राधा न सोडीच निरी । दान दे आमुचें म्हणे मुरारी । भोंवताली हांसती व्रजसुंदरी ॥ ४ ॥ भक्तांचियां पोटीं राधा समरस जाली । कृष्णरूप पाहूनियां देहभावा विसरली । एका जनार्दनीं राधा शेजे पहुडली ॥ ५ ॥

८४ फणस जंबीर कर्दळी दाटा । हातीं घेऊनि नारंगी फाटा ॥ १ ॥ वारियानें कुंडल हाले । डोळे मोडीत राधा चाले ॥ २ ॥ राधा पाहून भुलले हरी । बैल दुभे नंदाघरीं ॥३॥ हरी पाहूनि भुलली चित्ता राधा घुसळी डेरा रिता ॥ ४ ॥ मन मिनलेसें मना । एका भुलला जनार्दना ॥ ५ ॥

८५ आल्या पांच गौळणी पांच रंगांचे शृंगार करुनी ॥ धृ. ॥ पहिली गौळण रंग सफेत । जशी चंद्राची ज्योत । गगनीं चांदणी लखलखित । ऐका तिची मात । मंथन करीत होती दारांत । धरून कृष्णाचा हात। ऐशा आल्या पांच गौळणी॥ १ ॥ दुसरी गौळण भाळीभोळी । रंग हळदीहूनि पिवळी । पिवळा पितांबर नेसून आली । अंगीं बुट्टेदार चोळी । एक लहान तनु उमर कवळी । जशी चांपयाची कळी । ऐशा आल्या पांच गौळणी ॥ २ ॥ तिसरी गौळण रंग काळा । नेसून चंद्रकळा । काळें काजळ लेऊन डोळां । रंग तिचा सांवळा । काळी गरसोळी लेऊन गळां । आली राजसबाळा। ऐशा आल्या पांच गौळणी ॥३॥ चवथी गौळण रंग लाल । लाल लालही लाल । कपाळीं कुंकुम चिरी लाल । भांगीं भरून गुलाल। मुखीं विडा रंग लाल । जसें डाळिंबीचें फूल । ऐशा आल्या पांच गौळणी ॥ ४ ॥ पांचवी गौळण हिरवा रंग । अवघ्या झाल्या दंग । हिरव्या कांकणांचा पहा रंग। जसें आरशींत जडलें भिंग । फुगडी खेळतां कृष्णासंग। एकनाथ अभंग। ऐशा आल्या पांच गौळणी ॥५॥

८६ देखे देखे गे जशोदा मायछे । तोरे छोरीयानें मुजे गारी देवछे ॥ १ ॥ जमुनाके पानीयां मै ज्यावछे। बीच भीलके घागरीया फोडछे ॥ २ ॥ मैनें ज्याके हात पकरछे । देखे आपही रोवछे मायना ॥ ३ ॥ एका जनार्दन गुन गावछे । फेर जन्म नही आवछे मायना ॥ ४ ॥

८७ देवरे देवरे मोरी घागरीया लालसे । मै बोलुंगी जशोदा मायछे ॥१॥ हाम रहीनें दुसे नामछे । तारो भीड नही मारो कामछे ॥२॥ आकर पकरीयो मोरे आंगछो । मै लाजे न आइगे मा अवछो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तोरे पुत्रनें हामछे । फजितीन मानली आइछे ॥ ४॥

८८ मै ज्यावगी छोरकर तोरे गांवछे ॥ तूं खोरी मतकर मोरे लालछे ॥ १ ॥ मोरे घर तूं आकर लालछे । माखन चुरावत आपने हातछे ॥ २ ॥ मै कहुंगी तोरे मातछे । किसननें चोरी करी मोरी घरछे ॥ ३ ॥ कहे एक जनार्दन लालछे । चरण पकरू मो तुमछे ॥ ४ ॥

८९ माई मोरे घर आयो शामछे । गावढी छोडी मोरे मनछे ॥ १ ॥ दधीं दूध माखन चुरावें हमछे । छोकरीया खिलावन देवछे ॥ २ ॥ मारी सुसोवन लगीछे। बालन उनके पकड लीनछे ॥ ३ ॥ एका जनार्दन थारो छोडछे । वेड लगाये माई हामछे ॥ ४ ॥

९० हामे आपले सोवेते घरछे । रात आयो थारो शामछे ॥ १ ॥ मारी वेनी पकड करी हातछे । दाढी वांधी गाठछे ॥ २ ॥ मोरी घागरीया फोर करछे । भागन गयो आप घरछे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तोरे शामछे । मोरो संसारको नाशछे ॥ ४ ॥

९१ दे दे दे मोरी कन्हया लाल साडीछे । तुम भलो नंदजी नंदन लालसे ॥ १ ॥ मैतो आई मथुरा हाटछे । धिगरी तूं क्या घेर घाटछे कन्हया ॥ २ ॥ ज्याकर बोलुंगी जशोदा नंदछे । तारी खोड तारुंगी हातछे कन्हया ॥ ३ ॥ एका जनार्दन बिनती करतछे । दोनो हात जोडकरछे कन्हया ॥ ४ ॥

९२ मैं दधी बेचन चलि मथुरा । तुम कैव थारे नंदजीको छोरा ॥ १ ॥ भाजि का आचला पकडा हरी । मत खेचो मोरी फारी चुनरी ॥ २ ॥ अहंकारको मेरा गगरा फोरा । व्हाको गोरस सबही गिरा ॥ ३ ॥ द्वैतनकी मोरी आंगीया फारी । क्या कहूं मै नंगी नार उघारी ॥ ४ ॥ एका जनार्दन ज्यासो भेटा । लागन पगसे कबु नही छुटा ॥ ५ ॥

९३ मारी गावढी चुकलीसे भाई । देखन देखन त्रिभुवनसे आई । उन शोधन लागछे भाई । अब कैसी गत करूछे आई ॥ १ ॥ मथुरा लमानीन मारो नामछे । गावढी देखत आई गांवछे । दृष्टी देखन नहीं मनछे । कैसे भुलाय कन्हयानछे ॥ २ ॥ भूली भूली आई मानछे । कहीं मिलन मोरे ध्यानछे । एका जनार्दनसे पगछे । अखंड चित्त जडो गावढीछे ॥ ३ ॥

९४ भूली भटकी आई कान्हा तोरे गांवछे । मारो नंदनंदन चित्त जडे तोरे पावछे लालना ॥ १ ॥ चली आई परपंच हाटसे । तूं केव धरीयो मेरे वाटछे ॥ २ ॥ आब तूं नंदनंदन लालछे । मै गारी देऊं तुजसें लालना ॥ ३ ॥ एका जनार्दन नाम तोरे गांवछे। पीरीत वसे तोरे चरणछे लालना ॥ ४ ॥

९५ हो भलो तुम नंदन लालछे । मुजे गांवढी बतावछे ॥ १ ॥ आगल पिछिल ध्यानमें आवछे । मंगल नाम तोरा मे गांवछे ॥ २ ॥ तारो सुंदर रुप मोरे मनछे । प्रीत लगी कान्हा हमछे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तोरे नामछे । गावत ध्यावत हृदयमेछे ॥ ४ ॥

९६ याहांकी बात नहीं मेरी आवछे। तोरे चरण कमल मै ध्यावछे ॥ १ ॥ सुंदरतनु नंदनंदन लालछे । गळां शोभे वैजयंती मालछे ॥ २ ॥ पीत पीतांबर घोंगरीयाछे । गोपाल नाचती तोरे सातछे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रखत गावढीछे । चित्त जडे मोरे पावडीछे ॥ ४ ॥

९७ गोकुळीं गोमाई गवळणी । तिच्या सुना चवघी जणी । यमुने गेल्या एके दिनीं । त्यांनीं कृष्ण पाहिला ॥ १ ॥ कृष्ण पाहतां मधुसूदन । मोहिलें चवघींचें मन । कृष्ण कृष्ण लागलें ध्यान । देहभान विसरल्या॥२॥ सर्व एक होती शेजारीण । आली सदनासी धांवून । गोमाईसी वर्तमान । अवघे विदित केलें ॥ ३ ॥ राखी लपवी आपुल्या सुना । सुनेचें नख दृष्टी पडूं देईना । जर कां येशील माझे सदना । नासिका चुना तीन बोटें ॥४॥ कृष्ण काय म्हणे तिसीं । येणें जाणें नाहीं आम्हांसी । जें कां वदली रसनेसी । तिची प्राप्ती तुजलागीं ॥५॥ देव ब्राह्मणीचा वेष । धरितां जाला जगन्निवास । हा रस ऐकतां सायास । मूढ जन उद्धरती ॥ ६ ॥ पांढऱ्या पातळाची कासोटी । जीर्ण चीट वेष्टिलें कंठीं । हाता घेउनी धाकुटी । काठी धरुनी चालिली ॥ ७ ॥ वाऱ्यासारखी चाचरी जाये । तोल सांभाळुनी

उभी राहे । अवसान धरूनियां पाहे । गोमाईनें देखिली ॥ ८ ॥ गोमाई म्हणे अहो ब्राह्मणी । कोठें जातेस आलीस कोठुनी । आशापाश नाहीं कोणी । माझी मीच एकली ॥ ९ ॥ करून आले वाराणशी । पुढें जाणें रामेश्वरासी । आणिक जाणें बहु तीर्थासी । ऐसीं गोमाईसी बोलली ॥ १० ॥ येथल्या नगरामध्यें कोणी । दयाळु नाहीं तुजवांचुनी । जागा देई वृंदावनीं । रातचे रात करमीन ॥ ११ ॥ अस्ता गेला वासरमणी । सुखें राहे वृंदावनी । आज्ञा केली इंद्रालागुनी । सत्वर मेघा पाठवी ॥ १२ ॥ वीज लवली मेघमंडळीं । ढग निवाला तेच काळीं । मेघानें मांडली फळी । जनलोक पाहतसे ॥ १३ ॥ मेघानें सोडिल्या धारा । थंडगार सुटला वारा । शामाई कांपतसे थरथरां । गोमाईनें देखिली ॥ १४ ॥ गोमाई म्हणे अहो साजणी । आंत येई वो ब्राह्मणी । मरुनी जाशील वृंदावनीं । प्रायाश्चित्त मजवरी येईल ॥ १५ ॥ मरुनि जाईल वृंदावनीं । परी मी येईना कोणाचे सदनीं । देव राखील मजलागुनी । ऐसी शामाई बोलली ॥ १६ ॥ इतुका मेघ वर्षला थोर । भिजलें नाहीं तुझें वस्त्र । शामाई म्हणे आम्हांवर । ईश्वराची बहू कृपा ॥ १७ ॥ तुम्ही शुद्ध गे ब्राह्मणी । देव तुम्ही केला ऋणी । आम्ही नरदेहासी येऊनी । प्रपंचसदनीं बुडालों ॥ १८ ॥ दारावाटे बोलावून । नेत्रीं पाहे अवलोकून । चक्रपाणी ओळखून । चरणीं ठाव मज देई ॥ १९ ॥ आतां उठवेना करूं काई । हातीं धरुनि उठवी गोमाई । कवाड उघडोनि लवलाही । बळें सदनीं लोटलीं ॥ २० ॥ बळें सदनीं लोटिलें मला । मजवर बलात्कार केला । मी सांगेन नंदजीला । म्हणोनि गलबला करीतसे ॥ २१ ॥ सदनीं जातां तत्क्षणी । चवघी उद्धरल्या कामिनी । दारापाशीं येउनी । हाकां मारी गोमाई ॥ २२ ॥ गोमाई येऊनी लागे चरणां । पुनीत केल्या आमुच्या सुना । नासिका लावियेला चुना । पाहून पळे गोविंद ॥ २३ ॥ गोमाई उद्धरली कथा । आपण होऊनि श्रोता वक्ता । एका जनार्दनीं दाता । सत्य वार्ता ही माझी ॥ २४ ॥

९८ दहीं दुध चोरुनी दे सर्वांना । ऐसें मज सांगताती । आई मज मारूं नको । नाहीं नाहीं म्यां पाहिली माती ॥ १ ॥ तें न ऐकिलें म्हणोनि मजवर । रुसले सांगाती । बळीरामही जो भेटला । तोही माझा पक्षपाती ॥ २ ॥ एका जनार्दनीं पूर्ण कृपेनें । आम्ही भजूं दीनराती ॥ ३ ॥

९९ बाळ रांगणें रांगतु । दुडदुडां पुढें पळतु । धरितां तो न कळे मातु । वेदशास्त्रीं जया ॥ १ ॥ तो बाळरूपें नंदाघरीं । खेळ खेळे नानापरी । न कळे लाघव निर्धारीं । इंद्रादिकां गे माय ॥ २ ॥ लोणी चोरावया घरोघरीं जाय । दहीं दूध तूप लोणी आपण खाय । त्यांचे सुनेचे मुखा हात पुशी वो माय । ऐसें करूनियां पळोनी जाय ॥ ३ ॥ वासुरें सोडी घरीं जाऊन । मुलांसि उठवी चिमटून । माथणी रांजणा करी चूर्ण । ऐसें विंदान करुनी पळे ॥ ४ ॥ शेजे असतां उभयतां । जाय सोंवळ्यांतून तत्त्वतां । दाढी वेणी बांधी सर्वथा । जाय परता पळोनी ॥ ५ ॥ ऐशा खोडी करी नानापरी । नटनाटक वैकुंठ विहारी । एका जनार्दनीं नवल परी । आगमां निगमां न कळे परोपरी ॥ ६ ॥

१०० दिसे सगुण परि निर्गुण । आगमां निगमां न कळे महिमान । परा पश्यंती खुंटलीया जाण । त्याचें न कळे शिवासी महिमान ॥ १ ॥ पहा हो सांवळा नंदाघरीं । नवनीताची करीतसे चोरी । गौळणी गाऱ्हाणीं सांगती नानापरी । त्याचें महिमान न कळे श्रमले ब्रह्मचारी ॥ २ ॥ कोणी म्हणती यासी शिंक लावूं । कोणी म्हणती आला बाऊ । दाखवी लाघव नवलाऊ । अगम्य खेळ ज्याचा कवणा न कळे कांहीं ॥ ३ ॥ चोरी करितां बांधिती उखळी दावें । येतां काकुळती माते मज सोडावें । एका जनार्दनीं दावीं सोंग बरवें । ज्याची कीर्ति ऐकतां अघ नासे सर्व ॥ ४ ॥

१०१ आवरीं आवरीं आपुला हरी । दुर्बळ्याची केली चोरी । घरा जावयाची उरी । कृष्णें ठेविली नाहीं ॥ १ ॥ गौळणी उतावेळी । आली यशोदेजवळी । आवरीं आपुला वनमाळी । प्रळय आम्हां दिधला ॥ २ ॥ कवाड भ्रांतीचें उघडिलें । कुलूप मायेचें मोडिलें । शिंके अविद्येचें तोडिलें । बाई तुझिया कृष्णें ॥ ३ ॥ होती क्रोधाची अर्गळा । हळूचि काढिलीसे बळां । होती अज्ञानाची खिळा । तीहि निर्मूळ केली ॥ ४ ॥ डेरा फोडिला दंभाचा । त्रिगुण तिवईस ठाव कैसा । प्रपंच सडा हा ताकाचा । केला तुझिया कृष्णें ॥ ५ ॥ अहंकार होता ठोंबा । उपडिला घुसळखांबा । तोहि टाकिला स्वयंभा । बाई तुझिया कृष्णें ॥ ६ ॥ संचित हें

शिळें लोणी । याची केली धूळधाणी । संकल्प विकल्प दुधाणीं । तींही फोडिलीं कृष्णें ॥ ७ ॥ प्रारब्ध हें शिळें दहीं । माझें खादलें गे बाई । क्रियमाण दूध साई । तींही मुखीं घोतिली ॥ ८ ॥ द्वेष रांजण सगळे । स्पर्शे होती हात काळे । होतें कामाचें तें पाळें । तेंहि फोडिलें कृष्णें ॥ ९ ॥ सुचित दुश्चित घृत घागरी । लोभें भरल्या होत्या घरीं । त्याही टाकिल्या बाहेरी । तुझिया कृष्णें ॥१०॥ कल्पनेची उतरंडी । याची केली फोडाफोडी । होती आयुष्याची दुरडी । तेही मोडिली कृष्णें ॥११॥ पोर रे अचपळ आमुची । संगती धरली या कृष्णाची । मिळणी मिळाली तयांची । संसाराची शुद्ध नाहीं ॥ १२ ॥ ऐशी वार्ता श्रवणीं पडे । मग मी धांवोनि आलें पुढें । होतें द्वैताचें लुगडें । तेंही फिटोनि गेलें ॥ १३ ॥ आपआपणा विसरलें । कृष्णस्वरूपीं मिळालें । एका जनार्दनीं केलें । बाई नवल चोज ॥१४॥

१०२ ब्रह्मादिक वेडे जयासाठीं होती । तो गोकुळीं श्रीपती लोणी चोरी ॥ १ ॥ कवाड ते जैसें आहे तैसापरी । येतो जातो हरी न कळेची ॥ २ ॥ पाळती पाहतां ब्रह्मांड सकळ । तयाचा प्रतिपाळ करीतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चोरीचें तें मीस । हरित सारांश नवनीत ॥ ४ ॥

## गौळणीस श्रीकृष्णाचा वेध.

१०३ येणें छंदें छंद लागली नव्हाळी । हा कान्हो वनमाळी वेध याचा ॥ १ ॥ सरितां सरेना बैसला हृदयीं । तो आतां ठाईंचे ठायीं जडलासे ॥ २ ॥ एका जनार्दनीं नोहेची परता । संपूर्ण पुरता भरला देहीं ॥३॥

१०४ चंद्राहुनी शीतळ रवीहूनी सोज्वळ । तेणें मज केवळ वेधियलें ॥ १ ॥ वेध कैसा मज लागला वो बाई ॥ ध्रु. ॥ अमृताहुनी स्वादु गगनाहुनी मृदु । रूपेंविण आनंदु देखिला बाई ॥ २ ॥ एका जनार्दनीं आनंदु परिपूर्ण । काया वाचा मनें वेधिलें वो बाई ॥३॥

१०५ दुडीवरी दुडी गौळणी साते निघाली । गौळण गोरस म्हणों विसरली ॥ १ ॥ गोविंदु घ्या कोणी दामोदरु घ्या गे । तंव तंव हांसती मथुरेच्या गे ॥ २ ॥ दुडीया माझारीं कान्होबा झाला भारी । उचंबळे गोरस सांडे बाहेरी ॥३॥ एका जनार्दनीं सबलस गौळणी । ब्रह्मानंदु न समाये मनीं ॥ ४ ॥

१०६ गौळणींचा थाट निघाला मथुरे हाटालागीं । तें देखोनि जगदीश धांवला गोप घेऊनी वेगीं ॥ १ ॥ कान्हया सरसर परता नको आरुता येऊं । तुझा संग झालिया मग मी घरा कैसी जाऊं ॥ ध्रु. ॥ सासुरवासिनी आम्ही गौळणी जाऊं दे रे हरी । बहु वेळ लागतां सासु सासरे कोपतील घरीं ॥ २ ॥ आम्हीं बहुजणी येकला तूं शारंगपाणी दिससी येथें । हृदयमंदिरीं ठेऊनी तूंतें जाऊं मथुरापंथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ब्रह्मवादिनी गोपीया वरवंटा । कृष्णपदीं त्या लीन झाल्या पूर्णपणें तन्निष्ठा ॥ ४ ॥

१०७ ऐक एक सखये बाई नवल मी सांगूं काई । त्रैलोक्याचा धनी तो हा यशोदेसी म्हणतो आई ॥ १ ॥ देवकीनें वाईला यशोदेनें पाळिला । पांडवांचा बंदीजन होऊनियां राहिला ॥ २ ॥ ब्रह्मांडाची सांठवण योगीयाचें निजधन । चोरी केली म्हणऊनी उखळासी बंधन ॥ ३ ॥ सकळ तीर्थें जया चरणीं सुलभ हा शूलपाणी । राधिकेसी म्हणे तुझी करीन वेणीफणी ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं कैवल्याचा मोक्षदानीं । गाई गोप गोपीबाळां मेळवीले आपुलेपणीं ॥ ५ ॥

१०८ भिंगाचें भिंगुलें खांद्यावर आंगुलें । नाचत तान्हुलें यशोदेचें ॥१॥ येती गौळणी करीती बुझावणी । लागती चरणीं कान्होबाच्या ॥ २ ॥ गोविंद बाळिया वाजविती टाळिया । आमुचा कान्हया देवराज ॥ ३ ॥ कडदोरा बिंदली वाघनखें साजिरीं । नाचत श्रीहरी यशोदेचा ॥ ४ ॥ पायीं घागरीया वाक्या साजरीया । कानींच्या बाळया ढाळ देती ॥ ५ ॥ एका जनार्दनीं एकत्व शरण । जीवें निंबलोण उतरती ॥ ६ ॥

१०९ कृष्णमूर्ती होय गे कळों आली सोय गे । प्राणाचाही प्राण पाहतां सुख सांगूं काय गे ॥ १ ॥ तुळशी माळ गळां गे कस्तुरीचा टिळा गे । अर्धांगीं रुक्मिणी विंझणें वारित गोपी बाळा गे ॥ २ ॥ पीतांबराची कास गे कसिली सावकाश गे । नारद तुंबर गायन करती पुढें निजदास गे ॥ ३ ॥ भक्त कृपेची माय गे वोळखिली विठाई गे । एका जनार्दनीं विटे जोडियेले पाय गे ॥ ४ ॥

११० ब्रह्म कैसें वेडावलें गे बाईये ॥ ध्रु. ॥ निर्गुण होतें सगुण आलें । त्रिभुवन उद्धरिलें बाईये ॥ १ ॥ घेऊनि वसुदेवें गोकुळा नेलें । यशोदेनें खेळविलें गे बाईये ॥ २ ॥ एका एकपण तेंही नेलें । जनीं जनार्दनें केलें गे बाईये ॥ ३ ॥

१११ कृष्णाला भुलविलें गोपीनें ॥ ध्रु. ॥ यशोदे तुझा हा कान्हा राहीना । मी मारीन कोयानें ॥ १ ॥

नंदजी तुमचा कृष्ण लाडका। हाका मारितो मोठ्यानें ॥ २ ॥ वेताटी घेउनी नावेंत बैसला । वांचविलें देवानें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण कृपेनें । माहीं ऐकिलें मातेनें ॥ ४ ॥

११२ देखिला अवचिता डोळां सुखाचा सागरु । मन बुद्धि हारपली झाले एकाकारु । न दिसे काया माया कृष्णीं लागला मोहरू ॥ १ ॥ अद्वया आनंदा रे अद्वया आनंदा रे । वेधियल्या कामिनी अद्वया आनंदा रे ॥ २ ॥ खुंटलें येणें जाणें घर सासुर । नाठवे आपपर वेधियेलें सुंदर । आंत सबाह्य व्यापिलें कृष्ण परात्पर नागर वो ॥ ३ ॥ सावजी कळलें आतां लोधलें निर्गुणा । एका जनार्दनीं कृपा केली परिपूर्णा । गगनीं गिळियेलें येणें उरी नुरेचि आपणा ॥ ४ ॥

११३ दिव्य तेज झळकती रत्नकीळा फांकती । अगणीत लावण्य तेज प्रभा दिसती गे माये ॥ १ ॥ कानडा वो सुंदर रूपडा गे । अंतरीं बाहेरीं पाहतां दिसे उघडा गे ॥ २ ॥ आलिंगनालागीं मन उतावीळ होय । क्षेम देतां माझें मीपण जाय ॥ ३ ॥ मागें पुढें चहूंकडे उघडें पाही । पाहावयासी गेलें मजला ठक पडले बाई ॥ ४ ॥ बाहेरी पाहूं जातां अंतरीं भासे । जें जें भासे तें तें येकींयेक समरसे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं जिवींचा जिव्हाळा । एकपणें पाहतां न दिसे दृष्टीवेगळा ॥ ६ ॥

११४ सुंदर बाळका म्हणती गोपिका यशोदा रोहिणी सन्मुखा । आदि नाटका नाच व्यापका मिळालिया अनेका । सर्व पाळका सकळ चाळका सुखदाता सकळिका । धिमी धिमी बाळा नाचे वहिला म्हणती मायादिका ॥ १ ॥ कृष्णा नाच रे व्यापका । म्हणताती गोपिका ॥ धृ. ॥ दणदण मेदिनी वाजत वाम चरण निघातें । थोंगीत थोंगीत थाक तोडीत चित्त अनुकारें संगीतें । टाळछंदें मन वेधें टाळी वाजे अनुहातें । धिम धिम धिमतांग थोंकीत ताळछंदें सांवळें नाचतें ॥ २ ॥ गुप्त प्रगटीत थाक दावित स्थूळ सूक्ष्म आनंदें । धिगीतां धिगीतां वाजती गजरें शास्त्रांचेनी विवादें । घटतनं घटतनं शब्दें बोलती तार्किक गेले भेदें । गर गर गर गर भोंवरी देत अवतार संबंधें ॥ ३ ॥ रणुझुणु रणुझुणु वाजती श्रुति नेति नेति उच्चारी । आत्मा हा व्यापक नाटक त्रैलोक्य पडलें फेरी । यशोदा रोहिणी वृद्ध गौळणी नाचत देह विसरी । पक्षी चारा विसरले पवन मुख पसरे अंबरीं ॥ ४ ॥ देव विमानीं पहाती गगनीं ब्रह्मा नाचताहे येउनी । इंद्र ऐरावत नाचत जवळील बृहस्पती तो मुनी । गण गंधर्व देव सर्व तेहतीस कोटी मिळोनी । कुबेर पोटा नाचत मोठा कृष्णछंदें घेउनी ॥ ५ ॥ शेष वासुकी नाचत वेगीं चवदा भुवनें माथां । वराह गाढा पृथ्वी दाढां नाचे विसरुनि चिंता । तृणें तरुवरें पर्वत कुंजर लावावले अनंता । सगुण निर्गुण जंगम स्थावर वेधले अच्युता ॥ ६ ॥ घुळु घुळु घुळु घुळु कंकण वाजती बाहुभूषित भूषणां । तो परात्पर त्रैलोक्य सुंदर जगाचिया जीवना । खुण खुण संत बोलती संत घांगुरले हरिचरणा । दृष्टी देखिला सबाह्य निवाला एका शरण जनार्दना ॥ ७ ॥

११५ गोकुळीं लाघव दावितो चक्रपाणी । भोंवत्या वेष्टित बैसल्या अवघ्या गौळणी । मध्यें सुकुमार सांवळा शारंगपाणी । चिमणा पितांबर पिवळा । गळां वैजयंती माळा । घवघवीत घनसांवळा । पाहे नंदराणी ॥ १ ॥ नाच रे तूं कृष्णा मज पाहूं दे नयनीं ॥ धृ. ॥ नाचतो सांवळा सुंदर निमासुर वदन । वाळे घोळ घागरीयांचा झणत्कार पूर्ण । आकर्ण नयन सुहास्य वदन पाहुनी भुले मदन ॥ हातींच्या मुद्रिका झळकती । क्षुद्र किंकिणी सुस्वर गाती । वाकी नेपुरें ढाळ देती । पहाती गौळणी ॥२॥ स्वर्गीं पाताळें नाचती हरीचिया छंदें । आकाश धरणी स्वर्गीं देव नाचती आनंदें । गण गंधर्व देव सर्व अक्षर हरिपदें । वैकुंठ कैलास नाचती । चंद्र सूर्य रसनायक दीप्ती । ऋषिमंडळ धाक तोडिती । अद्भुत हरिकरणी ॥ ३ ॥ नाचती हरिपदें चतुर्दशलोकपाळ । शेष वासुकी नाचती सर्वही फणीपाळ । परिवारेंसी नाचती पृथ्वीचे भूपाळ । मेरु पर्वत भोगी नायक । वनस्पति नाचती कौतुक । वेदशास्त्र पुराण पावक । नाचत शूळपाणी ॥ ४ ॥ नाचती गोपाळ गोपिका सुंदर मंदिरें । उखळें जाती मुसळें पाळीं आणि देव्हारे । धातुमूर्ति नाचूं लागल्या एकसरें । गौळणी अवघ्या विस्मित । देहभाव हरपला समस्त । यशोदेसी प्रेम लोटत । धरिला धांउनी ॥ ५ ॥ शिणलासी नाचतां आतां पुरें करी हरी । विश्वरूप पाहतां गोपी विस्मित अंतरीं । यशोदेनें कृष्ण घेतला कडियेवरी । एका जनार्दनीं भक्तिभाव । अनन्य भक्ता दावी लाघव । निज भक्तांचें काज सर्व । करितां शिण न मानीं ॥ ६ ॥

११६ न माये चराचरीं त्रैलोक्य उदरीं । तो यशोदेचे कडेवरी शोभतो कैसा॥१॥गोपवेष मिसें ब्रह्मया लाविलें पिसें । तो गोपवत्सवेषें शोभतो कैसा ॥ २ ॥ एके घटिकेवरी सोळा सहस्र घरीं । नोवरा श्रीहरी शोभतो कैसा ॥ ३ ॥ अनंगेविण अंगे गोपी भोगिल्या श्रीरंगें । तो कृष्ण निजांगें शोभतो कैसा ॥ ४ ॥ सच्चिदानंदघन तान्हुलें आपण । एका जनार्दन शोभतो कैसा ॥ ५॥

११७ प्रथम मत्स्यावतारीं तुमचें अगाध चारित्र । न कळे ब्रह्मादिकां वैष्णव गाती पवित्र ॥ १ ॥ उठोनी प्रातःकाळीं गौळणी घुसळण घुसळिती । गाती कृष्णाचे पोवाडे हृदयीं परोपरी ध्याती ॥ २ ॥ द्वितीय अवतारीं आपण कच्छरूप झाला । सृष्टि धरुनी पृष्ठीं शेवटीं सांभाळ केला ॥ ३ ॥ तृतीय अवतारीं आपण वराहरूप झाला । धरणी धरुनी दाढे हिरण्याक्ष वधिला ॥ ४ ॥ चतुर्थ अवतारीं आपण नरहरि रूप । रक्षुनि प्रल्हाद वधिला हिरण्यकश्यप॥५॥पांचवे अवतारीं आपण वामन झाला । बळी घालुनि पाताळीं शेखीं द्वारपाळ ठेला ॥ ६ ॥ सहावे अवतारीं आपण परशुराम झाला। धरुनी परशु हातीं सहस्रभुजा वध केला ॥ ७ ॥ सातवे अवतारीं आपण दाशरथी राम । वधोनी रावण कुंभकर्ण सुखी देव परम ॥ ८ ॥ आठवे अवतारीं आपण वसुदेवा घरीं । वधोनि कंसादिक असुर मारिले भारी ॥ ९ ॥ नववे अवतारीं आपण बौद्धरूप झाला । धरूनियां मौन भक्ताघरीं राहीला ॥ १० ॥ दहावे अवतारीं आपण झालासे वारू । एका जनार्दनीं वर्णिला त्याचा बडिवारू ॥ ११ ॥

११८ अविद्या निशीचा लोटला पहार । रजेंसी लोपला तम अंधकार । सत्व शोधित शुद्ध समनहार। प्रबोध पाहातां परतला कृष्ण वीर वो ॥ १ ॥ आला रे आला रे म्हणती पहा कृष्ण । जैसा निर्जीवा मीनला जीवप्राण । श्रुति परतल्या आत्मसाक्षात्कार देखोनि । तैशा विठ्ठल गोपिका हरि पाहून वो ॥ २ ॥ कृष्णापाशीं मिनल्या व्रजनारी । कां हो निष्ठूर तूं जालासी हरी । स्नेह धरिती तयासी होसी दुरी । लोभु सांडिती त्यापाशीं निरंतरी वो ॥ ३ ॥ थोर शिणलाती तुम्हीं मजविण । माझे स्वरूपीं ठेविला जीव प्राण । माझे भेटीसी तंव नाहीं खंडन । सबाह्य अंतरी माझें अधिष्ठान वो ॥४॥ ऐसें वचन ऐकोनि हरीमुखें । थोर चुकल्या वियोगाचे दुःखें । आम्हां मारिलें शस्त्राविण वचन तिखें । शेखी हें ना तें केलें संगदोषें वो ॥५॥ कृष्णीं गोपिका वेधल्या एका मनें । माना मुरडिती प्रीति प्रेमाचें रुसणें । जेवीं श्रुति परतल्या नेति या वचनें । एका जनार्दनीं धरुनी ठेल्या मौन्यें वो ॥ ६ ॥

## गौळणींची विरहावस्था.

११९ आजी वो कां हो कृष्ण नाहीं आला । म्हणोनि खेद करी गौळणी बाळा । काय हो ऐसा देहीं लागला चाळा । कां रे न येसी बाळा नंदाचिया ॥ १ ॥ कवण देवा नवसीं नवसूं । कवणा गुरूतें मार्ग पुसूं । कैं भेटेल हा हृषिकेशू म्हणोनि । मन जाहलें उदासू ॥ २ ॥ हा कृष्ण आजी कां घरीं नये । आतां काय करूं यासी उपाय । एका जनार्दनीं धरूं जाय पाय । तैंच दरुशन होय आजी याचें ॥ ३ ॥

१२० वेधला जीव माझा भेटवा श्रीरंग । सर्व सांडियेला मोह ममता संग । जीवीं जिवलग जाला अनंग । भेटवा भेटवा मज श्रीरंग ॥ १ ॥ ऐशी विरहिणी बोले बोली । कां रे हरी तूं सांडीं केली ॥ध्रु.॥ समभाग तुज पहावया । मन आमुचें गुंतलें देवराया । तूं तंव मध्यें घालिसी माया । नको आतां विरह पायां ॥ २ ॥ आमुचा विरह कोण निवारी । विरहिणी बोले ऐशिया परी । एका जनार्दनीं विनवी श्रीहरी । जन्ममरणाचा विरह निवारी ॥ ३ ॥

१२१ कोण्या वियोगें गुंतला कवणें हातीं । परा पश्यंती मध्यमा जया ध्याती । श्रुति शास्त्र जया भांडती । तो कां हो रुसला श्रीपती ॥ १ ॥ येई येई कान्हा देई आलिंगन । भेटी देऊनि पुरवी मनोरथ पूर्ण । विरहाविरहा करी समाधान । दावी तूं आपुलें चरण ॥ २ ॥ येथें अपराध आमुचा नाहीं । खेळ सर्व तुझा पाहीं । एका जनार्दनीं नवल काई । एकदां येउनी भेटी देई ॥ ३ ॥

१२२ कसा मला टाकुनी गेला राम ॥ ध्रु. ॥ रामाविण जीव व्याकुळ होतो । सुचत नाहीं काम ॥ १ ॥ रामाविण मज चैन पडेना । नाहीं जीवासी आराम ॥२॥ एका जनार्दनीं पाहुनी डोळा । स्वरूप तुझें घनश्याम ॥ ३ ॥

१२३ विरहिणी विरहा विरहित बोले । कां वो पूर्वकर्म आड ठेलें । वाचे न येती नाम सांवळें । तथा

विरहा मन माझें वेधलें ॥ १ ॥ ऐशा परी बोलती गोपबाळा । कोठें गेला नेणो सांवळा । पहातां पहातां ठकविलें गोपाळां । ऐसा याचा विरह लागला ॥ २ ॥ नेणो कांहीं कर्म आड ठेलें । वियोग वियोगाचें वर्म ऐसें जालें । एका जनार्दनीं कौतुक बोले । ऐशा दुःखा विरहिणी बोले ॥ ३ ॥

१२४ नको नको रे दूर देशीं । आम्हां ठेवं ...णा-पाशीं । मग या विरहा कोण पुसी । ऐसी इच्छा देई आम्हांसी ॥ १ ॥ पुरे पुरे संसार विरह छंद । तेणें तूं अंतरसी गोविंद । द्वैताचा नको देऊं बाध । हृदयीं प्रगटोनी दावी बोध ॥ २ ॥ विरह हरी सत्वर देव-राया । परेपरता प्रगटोनि दावीं पायां । दुजें मागणें आणीक नाहीं काह्या । एका जनार्दनीं शरण तुझिया पायां ॥ ३ ॥

१२५ समचरणीं मन माझें वेधलें । तें वेगळें होतां विरह बोलें । हर्षामर्षा चित्त उन्मन ठेलें । म्हणोनि विरहिणी विरह बोले ॥ १ ॥ सांघळिया कान्हया नको जाऊं दुरी । राहे परेपरता परतोनि हरी । पश्यंती मध्यमा मरुनी वैखरी । चारी वाचा तटस्थ जाहल्या हरी ॥ २ ॥ तुझ्या वियोगाचा न व्हावा संग । अखंड नामीं असो अनुसंधान । शरण एका जनार्दन । काया वाचा मनें जाणोन ॥ ३ ॥

१२६ आशा मनीषाचा विरह लागला । तेणें सांवळा दुरी ठेला । जवळी असोनी बोलती अवला । कवणें गुणें कान्हु रुसला ॥ १ ॥ धांवे धांवे कान्हाई नंद-नंदना । पुरवीं तूं आमुची वासना । आणिक नको दुजी कल्पना । विरह निवारी देई दर्शना ॥ २ ॥ छंदें छंदें विरहिणी बोले । कां वो बोलण्या अबोलणें जालें । एका जनार्दनीं ऐसें केलें । नंदनंदना चित्त गुंतलें ॥ ३ ॥

१२७ जन्म जन्मांतरीं विरहिणी । होती दुश्चित अंतः-करणीं । दुःख सोशिलें होतें मागें जन्मीं । ये खेपे निरसलें स्थूळ कारणीं ॥ १ ॥ येउनी भेटी देहीं देहा-तीत । तयाचा विरह मजलागीं होत । मना समूळ मन पहात । तो भेटला गोपनाथ ॥ २ ॥ दुःख फिटलें सुख जालें थोर । हर्षें आनंदें आनंद तुषार । एका जनार्दनीं भेटला परात्पर । तेणें संसार विरह गेला निर्धार ॥ ३ ॥

१२८ काम क्रोध वैरी हे खेळ । लोभ अहंकार आशा बरळ । कर्म बळीवंत लागले सबळ । तेणें वेधिलें आमुतें निखळ ॥ १ ॥ नको नको वियोग हरी । येई येई तूं झडकरी । आम्हा भेटें नको धरूं दुरी । वियोग जाहला तो आवरीं ॥ २ ॥ तुझिया भेटीचें आर्त मनीं । याकारणें विरह बोलणें घाणी । एका शरण जनार्दनीं । वियोग गेला पाहतां समचरणीं ॥ ३ ॥

१२९ मागें विरह बहुतांशीं झाला । संसारश्रम वांयां केला । क्षणभरी विश्रांती नाहीं मला । तो सद्गुरु जिवलग भेटला ॥ १ ॥ आतां विरहाची सरली गांठीं । डोळेभरी पाहिल्या जगजेठी । जाउनी चरणीं घालावी मिठी । विरह गेला समूळ दृष्टी ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाहतां आनंदले । जन्मजन्मांतरींचें दुःख फिटलें । विरहा-विरहें हर खुंटलें । काया वाचा मनें वेधलें वो ॥ ३ ॥

१३० बहुत जन्में विरहें पीडली । नेणो कैसी स्थिर राहिली । मन आशा गोविंदीं वेधली । तों मध्यमा वैखरीये गुंतली वो ॥ १ ॥ चारी वाचा परता सांवळा । विरहिणीसी छंद लागला । चौपरता कोठें गुंतला । तें नेणों आम्ही अबला वो । विरह जाईल कैशा परी । पूर्वपुण्य सुकृत पदरीं । एका जनार्दनीं भेटल हरी । तैं विरह नोहे निर्धारीं ॥ ३ ॥

१३१ येई वो श्रीरंगा कान्हाबाई । विरहाचें दुःख दाटलें हृदयीं । कोण सोडवील यांतून पाहीं । दैवयोगें सांपडला सगुण देहीं ॥ १ ॥ सगुण निर्गुण याचा वेध । वेधें वेधलें मन झालें सद्गद । वाचा कुंठित हारपला बोध । नेणें आणिक परमानंद ॥ २ ॥ स्थिर स्थिर मति झाली । वृत्ति विरा..ि हारपली । समाधी उन्मनी स्थिरावली । ऐशी विरहाची मति ठेली वो ॥ ३ ॥ संगविवर्जित मन झालें । काया वाचा मन चित्त ठेलें । एका जनार्दनीं ऐसें केलें । विरह दुःख निरसिलें ॥ ४ ॥

१३२ भिन्न माध्यान्हीं रात्रीं नारी । विरह करी बैसोनि अंतरीं । केधवा भेटेल श्रीहरी । तों नवल जालें अंतरीं वो ॥ १ ॥ अवचित घडला संतसंग । विरहाचा झाला भंग । तुटोनि गेला द्वैतसंग । फिटला जन्ममरणाचा पांग वो ॥ २ ॥ एका जनार्दनीं संत-संग । फिटला संसारपांग । विरह गेला देहत्याग । सुखें सुख झालें अनुराग वो ॥ ३ ॥

१३३ विषय विरह गुंतले संसारीं । तया जन्म जन्मांतरीं फेरी । कोणी न सोडवी निर्धारीं । यालागीं

न गुंता संसारीं ॥ १ ॥ मज सोडवा तुम्ही संतजन । या विषयविरहापासोन ॥ धृ. ॥ क्षणिक विषय संसार । भरला दिसे भवसागर । यांतुनी उतरीं पैलपार । संतसंग मिळलिया ॥ २ ॥ यासी शरण गेलियावांचुनी । संतसंग न जोडे निमुखनीं । शरण एकाभावें जनार्दनीं । विरह गेला समूळ निरसोनी ॥ ३ ॥

१३४ ऐशीं निर्धारें विरहिणी करी । परोपरता देखेन श्रीहरी । मन पवन साधन न करीं । संतसंग घडालिया धन्य संसारीं ॥ १ ॥ धन्य धन्य संतमहिमा । विरह गेला पावलें सुखधामा ॥ धृ. ॥ नामविरहित विरह तो कोण । विषय विरह शुंकीन मी जाण । नामावांचुनी नेणें साधन । तो विरह न व्हावा पूर्ण ॥ २ ॥ एका जनार्दनीं सत्य वचन । विरहाविरह गेला मुळींहून । नाम जपतां स्थिर झालें मन । विरह गेला त्यागून ॥ ३ ॥

१३५ रात्रंदिवस मन रंजलें । हरीचरणीं चित्त जडलें । विरहाचें दुःख फिटलें । धन्य झालें संसारीं ॥ १ ॥ विरह गेला सुख झालें वो माय । पुढतोपुढती आनंद न समाये ॥ धृ. ॥ संतसंग घडला धन्य आजीं । मोह ममता तुटली माझी । भ्रांती फिटोनि गेली सहजीं । विरह गेला सुख झालें आजीं ॥ २ ॥ धन्य धन्य संतसंगती । अवघी झाली विश्रांती । एका जनार्दनीं चित्तीं । विरहभ्रांति निरसली ॥ ३ ॥

१३६ अनुतापें विरहिणी बैसे । कां वो कर्म बळिवंत दिसे । संगवर्जित मज झालें ऐसें । कोणे योगें भेटी नसे ॥ १ ॥ मज भेटवा संतसंगती । तेणें निवारेल सर्व भ्रांती ॥ धृ. ॥ विरहें बहुत पीडिली बाळा । कोण शांतवी तया अबळां । येथें श्रीरंग जीवीं लागला । तया भेटलीया सुख होईल तयाला ॥ २ ॥ नेणें आपपरावें दुजे कांहीं । विरहें विरह जडला हृदयीं । कोण सोडवी गुरु मज देहीं । या विरहा अंतपार नाहीं ॥ ३ ॥ ऐसा विरह करितां दुःख । दैव योगें घडलें संतसुख । तापत्रय विरह गेला देख । सुखें सुख अपार झालें देख ॥ ४ ॥ संतसंगें निरसे विरह । पावन देह झाला विदेह । एका जनार्दनीं आनंद पाहे । विरह निरसला सुख झालें गे माय ॥५॥

१३७ युगायुगीं पीडिली विरहिणी । आठवी ध्यानीं मनीं चक्रपाणी । म्हणोनि वियोगाची आयणी । तो भेटला संतसंग साजणी ॥ १ ॥ विरह गेला सुख झालें अपार । जन्मोजन्मींची तुटे वेरझार वो ॥ धृ. ॥ घडतां संतसंग विश्रांती । तुटली माया पडळभ्रांति । भव संसार याची झाली शांती । संतमहिमा वर्णावा किती ॥ २ ॥ महिमा वर्णितां विरहा फिटलें । एका जनार्दनीं तया भेटलें । सुख अनुभवें अंतरीं दाटलें । विरहाचें बीज भाजिलें वो ॥ ३ ॥

१३८ बोला बोल विरहिणी बोले । गगनीं चांदणें शुद्ध शोभलें । त्यामाजीं घनसांवळा खेळे । कर्मवशें वियोग जाला बळें ॥ १ ॥ दावा गे दावा गे कृष्णवदन । विरहाचें दुःख दारुण । कोण्या कर्में झालें खंडन । कां हो यदुनंदन न बोले ॥ २ ॥ विरहतापें तापलें भारी । कोण आतां दुजा निवारी । श्रीगुरु भेटला झडकरी । एका जनार्दनीं दाविला श्रीहरी ॥ ३ ॥

## वनक्रीडा.

१३९ उठोनि एके दिनीं म्हणे यशोदा कान्हया । गोधनें घेऊनियां जाई वनासी लवलाह्या ॥ १ ॥ सवें मिळाले चिमणे सवंगडी । शिदोरी काठी कांबळी जाळी घेती आवडी ॥ २ ॥ एका जनार्दनीं गाई सोडिल्या साऱ्या । रामकृष्ण सवंगडीया देव येती पहावया ॥ ३ ॥

१४० घेउनी गोधनें जाती यमुने तटीं । नानापरी खेळ खेळताती जगजेठी ॥ १ ॥ मेळवोनि गोपाळ मध्यें खेळे कान्हा । न कळेचि महिमान ऐसा यादवांचा राणा ॥२॥ नानापरीचे खेळ खेळती गोपाळ । नाचती गदारोळ मिळोनि सकळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खेळे मदनपुतळा । नंदरायाचा कमरु म्हणताती सांवळा ॥४॥

१४१ आनंद सोहळा वृंदावनीं पाहीं । नंदजीचा कृष्ण तेणें केला नवलाचो ॥ १ ॥ धाकुले सवंगडे गौळणींचा थाट । वेणु पांवा वाजविती नाचती दाट ॥ २ ॥ एका जनार्दनीं वेधलें मन । पाहतां पाहतां चित्त जालें उन्मन ॥ ३ ॥

१४२ सैराट गोधनें चालती वनां । तयामागें चाले वैकुंठीचा राणा ॥ १ ॥ सांवळे चतुर्भुज मेघश्याम वर्ण । गाईगोपाळां समवेत खेळे मनमोहन ॥ २ ॥ यमुनेचे पाबळीं मिळोनियां सकळीं । खेळे चेंडूफळी गडियांसम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मदनपुतळा । देखियेला डोळां नंदरायाचा ॥ ४ ॥

१४३ विष्णुमूर्ती चतुर्भुज शंख चक्र हातीं । गदा पद्म वनमाळा शोभती ॥ १ ॥ गाई गोपाळ सवंगडे

वनां। घेऊनियां जाय खेळे नंदाचा कान्हा ॥ २ ॥ विटी दांडू चेंडू लगोरी नानापरी । खेळ मांडियेला यमुनेचे तीरीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहतां तन्मय । वेधलें मन वृत्तिसहित माय ॥ ४ ॥

१४४ जो परिपूर्ण परब्रह्म व्यापक गे माये। तो गोकुळीं गाई चारिताहे ॥ १ ॥ पहा हो भुलला भक्ति प्रेमासी । शिदोर्‍या चोरूनी खाये वेगेसीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं व्यापक देखा । तो गोकुळीं चोरी करी कौतुका ॥ ३ ॥

१४५ जयाच्या दरुशनें शिवादिकां तृप्ती । योगी हृदयीं सदा जया ध्याती । सहा चार अठरा जया वर्णिती । सहस्रमुखा न कळे जयाची गती ॥ १ ॥ तो हा नंदनंदनु यशोदेचा तान्हा । सवंगडे गोपाळ म्हणती कान्हा । परापश्यंती मध्यमा वैखरी नातुडे जाणा । वेडावले जया ठायीं रिघाले साधना ॥ २ ॥ अष्टांग साधन साधितां आटी । नोहे नोहे मुनिजनां ज्याची भेटी । एका जनार्दनीं हातीं घेऊनि काठी । गोधनें चारी आवडीं जगजेठी ॥ ३ ॥

१४६ परब्रह्म सांवळा खेळे यमुना तीरीं । सर्वे घेउनी गायी गोपवत्स नानापरी ॥ १ ॥ कान्होबा यमुनेसी जाऊं । आदरें दहींभात खाऊं ॥ २ ॥ नाचती गोपाळ एक एकाच्या आवडी । परब्रह्म सांवळा पहा-तसें सवंगडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ब्रह्म साराचें सार । धन्य भाग्य गौळियांचें कृष्ण खेळे परिकर ॥ ४ ॥

१४७ उठोनि प्रातःकाळीं म्हणे यशोदा मुरारी। गोपाळ वाट पहाती उभे तुझ्या द्वारीं ।शिदोरी घेउनि वेगीं जाय रानीं ॥ १ ॥ यमुनेचे तीरीं खेळ खेळतो कान्हा । नानापरी क्रीडा करी यादवांचा राणा ॥ धृ. ॥ मागें पुढें गोपाळ मध्यें चाले हरी । सांवळा सुकुमार वाजवी मुरली अधरीं । पुच्छ वर करुनी गाई नाचती नाना ॥ २ ॥ मुरलीचा नाद न समाय त्रिभुवनीं । किती एक नादें भुलल्या गौळणी । देह गेह सांडोनि चालताती वनीं ॥ ३ ॥ खग मृग गायी व्याघ्र नसे दुजा भाव। सकळीं उच्चारण एक कृष्ण नांव । काया वाचा मनें शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

## मुरली.

१४८ मनमोहन मुरलीवाला । नंदाचा अलबेला॥१॥ मदनमूर्ती तो जगजेठी । कुब्जेसी रत झाला ॥ २ ॥ विदुरा घरच्या भक्षुनि कण्या । परमानंदें धाला ॥३॥ भक्तिसुखें सुखावला । एका जनार्दनीं निमाला ॥ ४ ॥

१४९ नंदनंदन मुरलीवाला । याच्या मुरलीचा वेध लागला ॥ १ ॥ प्रपंच धंदा नाठवे कांहीं । मुरलीचा नाद भरला हृदयीं ॥ २ ॥ पती सुताचा विसर पडिला। याच्या मुरलीचा छंद लागला ॥ ३ ॥ स्थावर जंगम विसरूनि गेले। भेदभाव हारपले ॥ ४ ॥ समाधि उन्मनी तुच्छ वाटती । मुरली नाद ऐकतां मना विश्रांती ॥ ५ ॥ एका जनार्दनीं मुरलीचा नाद । ऐकतां होती त्या सद्गद ॥ ६ ॥

१५० मुरली मनोहर रे माधव ॥ धृ० ॥ श्रीवत्सवलांछन हृदयीं विलासन । दीन दयाघन रे ॥ १ ॥ सुरनर किन्नर नारद तुंबर । गाती निरंतर रे ॥ २ ॥ एका जनार्दनीं त्रिभुवनमोहन । राखीत गोधन रे ॥३॥

१५१ तुझ्या मुरलीचा ध्वनी । अकल्पित पडली कानीं । विव्हळ जालें अंतःकरणीं । मी घरधंदा विसरलें ॥ १ ॥ अहा रे सांवळीया कैसी वाजविली मुरली ॥ धृ. ॥ मुरली नोहे केवळ बाण । तिनें हरीला माझा प्राण । संसार केला दाणादीन । येऊनि हृदयीं संचरली ॥ २ ॥ तुझ्या मुरलीचा सूर तान । मी विसरलें देहभान । घर सोडोनि धरिलें रान । मी वृंदावनीं गेले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गोविंदा। पतितपावन परमानंदा । तुझ्या नामाचा मज धंदा । वृत्ति तंव पदीं निवर्तली ॥ ४ ॥

१५२ तुझें श्रीमुख सुंदर । कुसुम शुभकांति नागर। कांसे पीतांबर मनोहर । पाहुनि भूल पडली । करुणाघना ॥ १ ॥ मुरली नको वाजवूं मनमोहना ॥ धृ. ॥ सरपरता होय माघारा । देहभाव बुडाला सारा । माझी संसारासी थारा । भेदभ्रम गेला । कमलनयना ॥ २ ॥ ध्वनि मंजुळ ऐकिली कानीं । सर्व सुखां जाली धणी। एका जनार्दनीं ध्यानीं मनीं । एकपण जगजीवना ॥ ३ ॥

१५३ मुरली धरुनी अधरीं । वाजवी छंदें नानापरी। भोंवतें गोपाळ नाचती गुजरीं । यमुनातीरीं आनंदें ॥ १ ॥ तो हा नंदनंदन गे माये । त्याचा वेध लागला मज सये । कांहीं केलीया तो न राहे । नाठवे देह गेह गे माय ॥ २ ॥ स्थूल सूक्ष्म कारणांपरतां । चहु वाचा वेगळा तत्त्वतां । आगमां निगमांही परतां । ज्याचा वेध शिवाचिया चित्ता गे माय ॥ ३ ॥ अचोज वेद

चोजवेना । श्रुतीशास्त्रां नेय अनुमाना । शरण एका जनार्दना । एकपणें जाणा सर्वा ठायीं ॥ ४ ॥

१५४ भुलविलें वेणुनादें । वेणु वाजविला गोविंदें ॥१॥ पांगुळलें यमुनाजळ । पक्षी राहिले निश्चळ ॥२॥ तृणचरें लुब्ध जालीं । पुच्छ वाहूनियां ठेलीं ॥ ३ ॥ नाद न समाये त्रिभुवनीं । एका भुलला जनार्दनीं ॥४॥

१५५ कशी जाऊं मी वृंदावना । मुरली वाजवी कान्हा ॥ धृ. ॥ पैलतीरीं हरी वाजवी मुरली । नदी भरली यमुना ॥ १ ॥ कांसे पितांबर कस्तुरी टिळक । कुंडल शोभे काना ॥ २ ॥ काय करूं बाई कोणाला सांगूं । नामाची सांगड आणा ॥ ३ ॥ नंदाच्या हरीनें कौतुक केलें । जाणे अंतरींच्या खुणा ॥ ४॥ एका जनार्दनीं मनीं म्हणा । देवमहात्म्य कळेना कोणा ॥ ५॥

१५६ तुझी संगती नाहीं कामाची । मी सुंदरा कोवळ्या मनाची । मज दृष्टी होईल साची । मग तुझी घेईन बर्या ॥ १ ॥ कसें वेड लाविलें कान्हो गोवळीयां ॥ धृ. ॥ माझा वंश आहे मोठ्याचा । तूं तंव यातीहीन गौळ्याचा । ऐक्य जालीया नांवरूपाचा । ठावचि पुसलीया ॥ २ ॥ तुझ्या अंगींची घुरट घाणी । तनु काय दिसती वोंगळघाणी । मुरली वाजविसी मंजुळवाणी । मनमोहन कान्हया ॥ ३ ॥ तुझ्या ठिकाणीं अवगुण मोठा । चोरी करुनी भरिसी पोटा । व्रजनारी सुंदरा चावटा । अडविसी अवगुणीया ॥ ४ ॥ सर्व सुखाची कृष्णसंगती । वेणुनादें गाई गोप वेधती । एका जनार्दनीं हरिरूपीं रमती । त्या व्रज सुंदरीया ॥ ५॥

१५७ सुंदर मुख साजिरें कस्तुरी मळवटीं । मुरली वाजवीत उभा यमुनेचे तटीं । गोपवेष शोभे खांदा कांबळी हातीं काठी । तो नंदनंदन देखीला जगजेठी वो ॥ १ ॥ मंजुळ मंजुळ वाजवी मुरली । ऐकतां माझी चित्तवृत्ति हरली ॥ धृ. ॥ चारी वेद जया गाताती आनंदें । तो गोकुळीं गाई चारी परमानंदें । श्रुतिशास्त्रें वेधलीं जयाचीया छंदें । तया गोवळ म्हणती कान्हा आनंदें ॥ २ ॥ ऐशी आवडी भक्तीची देखा । उच्छिष्ट खातां कांहीं न धरी शंका । एका जनार्दनीं भुलला तयाचिया सुखा । वैकुंठ नावडेचि देखा ॥ ३ ॥

१५८ काळी घोंगडी हातीं काठी । लागला धेनूचे पाठीं ॥ १ ॥ अरे हरी व्रज वांकुडा कीं तुजसाठीं । बैसला यमुनेचे तटीं ॥ २ ॥ राधा गोरटी हातीं वाटी । लागली कृष्णाचे पाठी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं झाली दाटी । घातली पायांवर मिठी ॥ ४ ॥

१५९ भाक्ति गोकुळीं नवविधा नारी । गजरें चालती भारी वो । सुनीळ जळीं अति संतोषें । क्रीडती यमुनातीरीं वो ॥ १ ॥ स्थिर स्थिर माधवा विचार धरीं । आम्ही परात्पर परनारी । वासना वास अलक्ष लक्षोनी । दह्याची करिसी चोरी रे ॥ २ ॥ आकंठ मग्न सुनीळ निरी । घनसांवळा देखोनि वरी । येथोनि निघतां लाज मोठी । विनोद न करी रे ॥३॥ लाज सांडोनि धरा चरण । तंव मी होईन प्रसन्न । एका जनार्दनीं निःशंक झाल्या । जीवींची जाणूनि खूण वो ॥ ४ ॥

१६० यमुनेचे तीरीं नवल परी वो । तेथें गोपाळ वत्सें स्वयें झाला हरी वो ॥ १ ॥ नवल देखा ठक तिन्ही लोकां । भुली ब्रह्मादिकां पार नाहीं सुखा ॥२॥ कृष्णवत्साची ध्वनी गाई पान्हा । तेथें बोळलें निराळे विस्मयो गौळीजनां ॥ ३ ॥ गोपाळांचे वचनीं सुखें सुखा भेटी । तेथें वोसंडला आनंद माय कृष्णीं भेटी ॥ ४ ॥ ऐसा रचिला आनंदु देखोनि निवाडा । तेथें सृष्टीकर्ता तोहि झाला वेडा ॥ ५ ॥ ऐसें अचोज पैं मना नये अनुमाना । अचुंबीत करणें एका जनार्दना ॥६॥

१६१ कृष्णरूपीं भाळल्या गोपिका नारी । नित्य नवा कृष्ण जीवा आवडतो भारी । पवन वेगीं चालिल्या कालिंदीतीरीं । चिदानंद भावें भोगावा श्रीहरी ॥ १ ॥ वाजती गाजती अनुहत टिपरी । बारा सोळा मिळोनी गौळ्याच्या नारी । प्रातःकाळीं जाती यमुनातीरीं । कृष्ण-प्राप्तिलागीं पूजिती गौरी ॥ २ ॥ एकमेकींतें खुणाविती दृष्टी । हरिरूपीं आवड जीवा लागली मोठी । समयीं एकांत होईल काय भेटी । मनींचें आर्त सांगूं गुज गोष्टी ॥ ३ ॥ कृष्णरूपीं वेधल्या विसरल्या अन्नपान । माया विलास नेणे अंजन चंदन । रात्र आणि दिवस कृष्णाचें ध्यान । एका जनार्दनीं चरणीं वेधलें मन ॥४॥

१६२ देह गेह कर्म सारुनी । शेजे पहुडली निज समाधानीं । कृष्ण वेणु गीत ये श्रवणीं । वृत्ति उचलली भेटी लागुनी वो ॥ १ ॥ जीवीं लागलें हरीचें ध्यान । कांहीं केलिया न राहे मन । प्रेम एडीभरें येतसे स्फुंदोन । हरिचरणीं तें वेधिलें मन वो ॥ २ ॥ लाज सांडोनि जालें निर्लज्ज । सासू सासऱ्यासी नाहीं मज काज । माया माहेर अंतरलें सहज । हरिचरणीं

तों वेधलें । निज वो ॥ ३ ॥ चिदाकाशींचें स्वच्छ चांदिणें । कृष्णप्रभा ते चंद्र परिपूर्णे । ध्येय ध्यातां खुंटलें तेणें गुणें । एका जनार्दनीं सहज एकपणें वो ॥ ४ ॥

१६३ गोधनें चाराया जातो शारंगपाणी । मार्गीं भेटली राधिका गौळणी । कृष्ण दान मागे निरी आसडोनी । तंव ती देखिली यशोदा जननी ॥ १ ॥ यशोदा म्हणे नाटका हृषिकेशी । परनारीसी कैसा रे झोंबसी । येरु रुदत सांगतो मातेपाशीं । माझा चेंडु लपविला निरीपाशीं ॥ २ ॥ राधिका म्हणे यशोदे परियेशी । चेंडू नाहीं नाहीं वो मजपाशीं । परि हा लटिका लबाड हृषिकेशी । निरी आसडितां चेंडू पडे धरणीसी ॥ ३ ॥ यशोदा म्हणे चाळका तुम्ही नारी । मार्गीं बैसतां क्षण एक मुरारी । एका जनार्दनीं विनवी श्रीहरी । नाम घेतां पातकें जाती दूरी ॥ ४ ॥

१६४ कृष्णालाजे ती राधिका राहे घरीं । जीवनालागीं जिवें जीव भारी । कृष्णदृष्टी तो माझी नुरे उरी । यमुने जातां सन्मुख देखे हरी ॥ १ ॥ कृष्ण पावलावो हरी पावलावो ॥ ध्रु. ॥ एकाएकी एक हा एकट्टु । माझ्या संसारा झाला शेवट्टु । मी पतिव्रता तो झोंवतो आलगट्टु । आपपर नाहीं तूं होसी क्रियानष्टु ॥ २ ॥ दृश्य न दिसे तंव जाली दुपारी । रळीया वासना ते वास फेडी हरी । सुटली लिंग देह गांठी अभ्यंतरीं । सर सर निर्लज्जा मी परात्पर नारी वो ॥ ३ ॥ कृष्णा मागे मागे ते माया आली जाणा । पुसे यशोदा वा काय जालें कान्हा । येरु स्फुंदस्फुंदे करितो रुदना । भावचेंडु चोरिला गोपांगना वो ॥ ४ ॥ गोपी म्हणती हा कर्मनष्ट कुडा । क्रिया प्रमाणेंसी बोल याचा खुडा । हा बोलतसे आवडीच्या चाडा । कृष्ण म्हणे तूं माग इसी झाडा वो ॥५॥ वासना वास तें फेडी प्रमदा । भाव चेंडूवातें तंव देखे यशोदा । हरी कृष्ण येरु हांसे खदखदां । स्वेदु रोमांचित वरी कांपत गदगदां घो ॥ ६ ॥ नष्ट गवळणी विजन व्यभिचारी । परा रातली या निर्लज्ज निर्धारी । दैवें आलीये मा चुकली कुमरी ॥ ७ ॥ कृष्णें लाघव तें कैसें केलें पाहे । गोपी उपरमोनि पाठिमोरी राहे । माथा वंदीतसे कान्ह्याचे पाय । एका जनार्दनीं दोष नाहीं वो माय ॥ ८ ॥

१६५ ज्ञातिकुळ सांडिलें आम्हीं वेगीं । माया माहेर त्याजिलें तुजलागीं । अंग अर्पिलें अंगीचिये अंगीं । दोघीं रतलासि दासी कुब्जेलागीं ॥ १ ॥ सर सर निर्गुणा तूं अगुणाचा हरी । जवळीं असतां जालासीं कैसा दुरी । चित्त उतटे चिंतितां निरंतरीं । मन मावळलें न दिसे दृश्याकारी ॥ २ ॥ तुजलागीं सांडिला देहसंग । तुजविण विटला विषयभोग । जळो तुझा उपदेश सांगसी योग । आम्हां देईं सप्रेम संयोग ॥ ३ ॥ एक म्हणती गे सांडा शब्द आटी । शब्दा नातुडे कोरड्या ज्ञानगोष्टी । आजिचा सुदीन श्रीकृष्णीं झाली भेटी । हरुषें निर्भर स्वानंद भरली सृष्टी ॥ ४ ॥ एक म्हणती गे सांडा शब्दज्ञान । ध्येय जोडलें काईसें आतां ध्यान । भज्य भजक एक झालें भजन । गेली त्रिपुटी मिथ्या मोक्षबंधन ॥ ५ ॥ एक म्हणती गे चला मांडु रासु । म्हणे उगवेल मायामय दिवसु । दैवें जोडला गे कृष्ण परमहंसु । शोधा निजतत्त्व सांडोनि आळसु ॥ ६ ॥ गोपी मंडळी मिळाली कृष्णापाशीं । जैशा रश्मि मिनल्या रविबिंबासी । कृष्ण भोगितां नाठवे दिननिशीं । एका जनार्दनीं ऐक्यता प्रेमेसी ॥ ७ ॥

## रासक्रीडा.

१६६ वनामाजीं नेती गोपिका तयांसी । रासक्रीडा खेळावयासी एकांतीं ॥ १ ॥ जैसा जया चित्तीं हेत आहे मनीं । तैसा चक्रपाणी खेळतसे ॥ २ ॥ जया जैसा भाव तैसा पुरवणें । म्हणोनि नारायणें अवतार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं घेउनी अवतार । भक्तांचें अंतर जैसें तैसें ॥ ४ ॥

१६७ जैसा केला तैसा होय आपेआप । संकल्प विकल्प न धरी कांहीं ॥ १ ॥ न म्हणे उंच नीच यातीकुळ । वर्ण व्यक्ति शील न पाहेची ॥ २ ॥ उच्छिष्ट तें प्रिय गौळियांचें खाय । हमामा हुंबरी नाचतसे घाये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांडोनियां थोरपण । खेळतांही न्यून न बोले कांहीं ॥ ४ ॥

१६८ चला बाई वृंदावनीं रासक्रीडा पाहूं । नंदाचा बाळ येणें केला नवलाऊ ॥ १ ॥ कल्पनेची सासु इचा बहुतांचि जाचु । देहभाव ठेऊनी पायीं ब्रह्मपदीं नाचूं ॥ २ ॥ सर्व गर्व सोडूनी बाई चला हरीपाशीं । द्वैतभाव ठेवुनी पायीं हरीरूप होसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विश्वव्यापक हा देव । एक एक पाहतां अवघें स्वप्नवत् वाव ॥ ४ ॥

१६९ पहा हो पहा वृंदावनीं आनंदु । क्रीडा करी यशोदेचा बाळ मुकुंदु ॥ १ ॥ गोपाळ गौळणी मिळवोनि गोधनें । काला वाटी हमामा खेळे मांडोनि देहुडें

ठाणें ॥ २ ॥ रासमंडळ रची आडवितसे गौळणी । जाऊनियां घरीं राधिकेची वेणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धन्य सुख तयांचें । वाउग्या ते क्रोध आणुनी बोलती वाचे ॥ ४ ॥

१७० खांद्यावरी कांबळी हातामधीं काठी । चारितसे धेनु सांवळा जगजेठी ॥ १ ॥ राधे राधे राधे राधे मुकुंद मुरारी । वाजवितो वेणू कान्हा श्रीहरी ॥ २ ॥ एकएक गौळणी एकएक गोपाळा । हातीं धरूनि नाचती रासमंडळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रासमंडळ रचिलें । जिकडे पाहे तिकडे अवघें ब्रह्म कोंदलें ॥ ४ ॥

१७१ गोपिका त्या बोल बोलती आवडी । ऐकताती गडी सभोंवतें ॥ १ ॥ सभोंवतें तयां न कळेची खूण । पहाती विंदान श्रीहरीचें ॥ २ ॥ गोपिका कामातुर त्या मनीं । जाणोनि चक्रपाणी रास खेळे ॥ ३ ॥ षण्मास खेळ खेळती अबला । एका जनार्दनीं कळा न कळे कोण्हा ॥ ४ ॥

१७२ रासक्रीडा खेळ खेळोनियां श्रीहरी । येती परोपरी गोकुळासी ॥ १ ॥ न कळेची कवणा कैसें हें विंदान । वेदादिकां मौन पडिलेंसे ॥ २ ॥ तें काय कळे आणिकां जीवांसी । ऋषी मुनी तापसी धुंडिताती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा खेळे खेळां । परब्रह्म पुतळा नंदाघरीं ॥ ४ ॥

१७३ रासक्रीडा करुनी आलिया कामिनी । कृष्णीं लांचावल्या आन न रिघे मनीं ॥ १ ॥ जें जें दृष्टी दिसे तें तें कृष्ण भासे । गोपिका समरसें नित्य बोधु ॥ २ ॥ आसनीं शयनीं भोजनीं गमनागमनीं । सर्व कर्मीं सदा कृष्णमय कामिनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं व्यभिचार परवडी । गोपिका तारिल्या सप्रेम आवडीं ॥ ४ ॥

## गोपींचे खेळ. ( जातें–दळण )

१७४ येईं हो कान्हाई मी दळीन एकली । एकली दळीतां शिणले हात लावी वहिली ॥ धृ. ॥ वैराग्य जातें मांडुनी विवेक खुंटा थापटोनी । अनुहत दळण मांडुनि त्रिगुण वैरणी घातलें ॥ येईं० ॥ १ ॥ स्थूळ सूक्ष्म दळियेलें देहकारणासहित । महाकारण दळियेलें औट मात्रेसहित ॥ येईं० ॥ २ ॥ दश दोनी दळिल्या द्वैत अद्वैतासहित । दाही व्यापक दळियेलें अहं सोहं सहित ॥ येईं० ॥ ३ ॥ एकवीस स्वर्ग दळियेलें चवदा भुवनांसहित । सप्त पाताळें दळियेलीं सप्त सागरांसहित ॥ येईं० ॥ ४ ॥ बारा सोळा दळियेल्या सत्ताविसहित । चंद्र सूर्य दळियेलें तारांगणांसहित ॥ येईं० ॥ ५ ॥ नक्षत्र वैरण घालूनी नवग्रहांसहित । तेहतीस कोटी देव दळियेलें ब्रह्मा विष्णूसहित ॥ येईं० ॥ ६ ॥ ज्ञान अज्ञान दळियेलें विज्ञानासहित । मीतूंपण दळियेलें जन्ममरणासहित ॥ येईं० ॥ ७ ॥ ऐसें दळण दळियेलें दोनी तळ्यांसहित । एका जनार्दनीं कांहीं नाहीं उरलें द्वैत ॥ येईं० ॥ ८ ॥

१७५ माया जिवलग जातां बैसली कृष्ण म्हणे गे आई । दळण दाळितां शिणलिसी हात लावूं गे आई । समान तळी तळीवरी ठेवी पावो ठायीं । क्षणामाजी मी वो दळीन तूं कौतुक पाहीं ॥ धृ. ॥ येईं गे येईं गे येईं गे कान्हाई हात लावी तूं वहिली । जातीये जातां शिणलीये किती दळूं एकली । विसावा निजाचा तूं माझा विश्रांति साऊली । येईं गे येईं गे कान्हाई ॥ १ ॥ ब्रह्माहमस्मि टाकिया उकटा द्वैत दळी । अधिष्ठान खुंटा निश्चळ दोहीं एकची बोली । पाहिले चारी निरसोनी निज नित्य न्याहाळीं । सहाही वैरण वैरुनी अठराही दळी ॥ २ ॥ पंच भूतें पंच धान्यें दळियेलें जातां । शशी सूर्य दोन्ही दळिले प्राणाच्या समता । ध्येय ध्याता ध्यान दळियेलें धारणा धरितां । पंच विषय तेही दळियेलें वैराग्यें राहतां ॥ ३ ॥ वैकुंठ कैलास दळिलें गती एक देशी । क्षीरसागर तोही दळियला शेषशयनेसी । ध्रुव तोहि जातां वैरिला अढळ पदेसी । जें जें देखें तेही दळियलें दृश्यादृश्यासी ॥ ४ ॥ वासना मिथ्या भाजूनि वैरिलिया जातां । मेळवणी गुण घातले समान समता । गुणा गुणातेंहि दळियेलें पहातें पहातां । ब्रह्मा विष्णु रुद्र दळिलें ओवीया गातां ॥ ५ ॥ कर्माकर्म कैसें दळिलें जन्ममरणेसी । मीतूंपण दोन्ही दळियलें जीवशिवेसी । पुढें वैरिणिया कांहीं न दिसे पहातां चौपाशी । माया तेहि जातां दळिली दळते दळणेसी ॥ ६ ॥ वृत्ती तेहि निवर्तली पाडियली ठका । समाधि उत्थाना दळियलें देहबुद्धीसी देखा । दळितें जातें तेंहि दळियलें कवतुक देखा । स्वभावें लीला हे खेळे जनार्दनीं एका ॥ ७ ॥

## कांडण.

१७६ विवेक कांडणीं कांडितें साजणी । निजबोध स्मरणी फिरतसे ॥ १ ॥ देह हें उखळ मन हें मुसळ । कांडिले तांदूळ विवेकाचे ॥ २ ॥ एका जनार्दनीं कांडण कांडितां । ब्रह्म सायुज्यता प्राप्त झाली ॥ ३ ॥

## पिंगा.

१७७ पिंगा बाई पिंगा गे । अवघा धांगडधिंगा गे ॥ १ ॥ सांडोनी संतांची गोडी गे । कासया पिंगा जोडी गे ॥ २ ॥ नको घालूं पिंगा गे । तुम्ही रामरंगीं रंगा गे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पिंगा गे । कायावाचा गुरुचरणीं रंगा गे ॥ ४ ॥

१७८ निराकाराचा आकार झाला । त्यांतच माझा पिंगा जन्मला । निराकारासी घेऊन आला ॥१॥ माझा पिंगा घालितो धिंगा ॥ ध्रु. ॥ पिंग्यापासून शंकर झाला । ढवळ्या नंदीवर बसून आला । माझ्या पिंग्यानें धक्का दिला ॥ माझा० ॥ २ ॥ पिंग्यापासून मच्छ झाला । शंकासुराचा प्राण घेतला । चारी वेद घेउनी आला ॥ माझा० ॥ ३ ॥ पिंग्यापासून कूर्म झाला । पर्वत पाठीवर घेतला । चौदा रत्नें घेऊन आला ॥ माझा० ॥ ४ ॥ पिंग्यापासून वराह झाला । हिरण्याक्षाचा प्राण घेतला । पृथ्वी वरती घेऊन आला ॥ माझा० ॥ ५ ॥ पिंग्यापासून नरसिंह झाला । हिरण्यकश्यप दैत्य वधिला । प्रल्हाद भक्त रक्षिला ॥ माझा० ॥६॥ पिंग्यापासून वामन झाला । बलीदान मागूं लागला । बळी पाताळीं घातला ॥माझा० ॥७॥ पिंग्यापासून भार्गव झाले । मातेचें शिर छेदियेलें । अवघे राजे नाहींसे केले ॥ माझा० ॥ ८ ॥ पिंग्यापासून राम झाले । पितृवचन सांभाळिलें । रावण कुंभकर्ण मारिले ॥ माझा० ॥ ९ ॥ पिंग्यापासून कृष्ण झाला । कंसाचा प्राण घेतला । गोकुळ सोडुन मथुरेसीं आला ॥ माझा० ॥ १० ॥ पिंग्यापासून बौद्ध झाला । दिलें जगन्नाथ नांव त्याला । भक्तांनीं दहींभात चारिला ॥ माझा० ॥ ११ ॥ ऐसा निराकाराचा पिंगा । त्यांत माझा श्रीरंगा । एका जनार्दनीं पांडुरंगा । माझा पिंगा घालितो धिंगा ॥ १२ ॥

## फुगडी.

१७९ फुगडी घाली मीपणाची । वेणी गुंफी त्रिगुणांची ॥ १ ॥ चाड नाहीं कोणाची । आण सद्गुरूचरणांची ॥ २ ॥ फुगडी घाली आज गे । नाचूं सहजा सहज गे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निज गे । वंदूं संतचरणरज गे ॥ ४ ॥

## गोपांचे खेळ.

१८० खेळ मांडिला वो खेळ मांडिला वो । या संसाराचा खेळ मांडिला वो ॥ १ ॥ पंचप्राणांचे गडी वांटिले । तेथें जीवशिव नाम ठेविलें वो ॥ २ ॥ एका जनार्दनीं खेळ मांडिला । शाहणा तो येथें नाहीं गुंतला वो ॥ ३ ॥

१८१ यमुने तटीं मांडिला खेळ । मेळवोनी गोपाळ सवंगडे ॥ १ ॥ जाहले गडी दोहींकडे । येकीकडे रामकृष्ण ॥ २ ॥ खेळती विटीदांडू चेंडू । भोंवरे लगोऱ्या उदंडू ॥ ३ ॥ ऐसा खेळ खेळे कान्हा । एका जनार्दनीं जाणे खुणा ॥ ४ ॥

## टिपरी.

१८२ खेळसी टिपऱ्या घाई रे । वाचे हरिनाम गांई रे । टिपरीस टिपरी चुकूं जातां भाई । पडसी यमाच्या घाई रे ॥ १ ॥ सहा चार अठरा गड्यांचा मेळा रे। टिपरीयांचा खेळ खेळा रे। एका खेळा दोन्ही गुंतला । यमाजी घालील डोळा रे ॥२॥ वांयां खेळ खेळतोसी बाळा रे। सावध होई पाहें डोळां रे । एका जनार्दनीं शरण जातां । चुकशील कळिकाळा रे ॥ ३ ॥

१८३ अनुहत टिपरी घाई खेळूं जाणे तो भाई रे। खोटा खेळ खेळोनि काय स्वतः अनुभव घेई रे ॥ ध्रु.॥ मत्स्येंद्र कुळीं एक गोरख जाला । तो बहुत खेळ खेळला रे । पवन साधुनि अष्टांग योगें तेणेंचि बळें मातला रे । खेचरी भूचरी चाचरी धरुनी अगोचरीं मिळाला रे । गोल्हाट योग साधुनि तेणें काळ तो जिंकुनि गेला रे ॥ १ ॥ निवृत्तीचा पोर एक ज्ञाना जाण तो खेळियामाजी शहाणा रे । कवित्व केला प्रकाश मातला प्रवृत्ति गाळिली घाणा रे । असोनि भेला नसोनि गेला काळ केला आंकणा रे। भले भले गडी मिळविले तेणें काय सांगूं कवणा रे ॥ २ ॥ जनार्दनाची सात पांच पोरें त्यांमाजी लाडका येका रे। एकही साधन न करी परी तो बळेंचि मातला फुका रे । आपपर देहीं कांहींच नेणें रायासी म्हणे तो रंका रे । भले भले गडी मेळवोनि तेणें खेळ दाविला असका रे ॥ ३ ॥ तिघां जणांचें खेळणें जालें चवथें एक उठविलें रे । अनन्यभावें सद्गुरुचरणीं गुरुसी शरण गेलें रे । भवासी न भ्यालें कळलें म्हणोनि तिघांचि समान जालें रे । आपण जैसें पूर्ण तैसें एका जनार्दनीं केलें रे ॥ ४ ॥

## विटीदांडू—चेंडू.

१८४ आबक दुबक तिबक पोरा त्रिगुण खेळ मांडूं ।

खेळे विटीदांडू पोरा खेळे विटीदांडू ॥ १ ॥ सत्त्व विटी घेऊनि हातीं धीर धरी दांडू । भाववळें टोला मारी नको भिऊं गांडू ॥ २ ॥ ब्रीदबळें खेळ खेळूं लक्ष लावीतिसी । मूर्खापाशीं युक्ति नाहीं उडोनि गेली उशी ॥ ३ ॥ चकट लेंड मूंड नाल पुढें आणी लेका । भावबळें खेळ खेळे जनार्दन एका ॥ ४ ॥

१८५ बारा सोळा अठरा गडियांचा मेळा । मांडियेला डाव कोण आवरीं तयाला ॥ १ ॥ खेळा भाई विटीदांडू खेळा भाई विटीदांडू । खेळ खेळतां परी बरा नोहे सहज दांडू ॥ २ ॥ पांच सात बारा नव तेरा यांची नका धरूं गोडी । खेळ खेळतां दांत विचकून पडाल घशीं तोंडीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं काया वाचा शरण रिघां पायीं । खेळ तो अवघा सोपा मग प्रेमा उणें नाहीं ॥ ४ ॥

१८६ एक पांच सात मिळोनि खेळती विटीदांडू । डाव आलिया पळूनि जातां तया म्हणती गांडू ॥१॥ खेळों विटीदांडू खेळों विटीदांडू ॥ धृ. ॥ मुळींचा दांडू हातीं धरूनि भावबळें खेळूं खेळा । भावबळें टोला मारूं न भिऊं कळीकाळा ॥ २ ॥ आपुली याची सांडोनि आस जावें गुरूसी शरण । काया वाचा मनें चरणीं लोळे एका जनार्दन ॥ ३ ॥

१८७ विटीदांडू खेळसी वांयां । चौऱ्यांयशी वेरझारा होती पाया ॥ १ ॥ नको विटीदांडू सांडीं हा छंदू । आवडी वदे रामगोविंदू ॥२॥ किती वेरझारी करीसी पा वांयां । शरण रिघे एका जनार्दन पायां ॥३॥

१८८ विटीदांडू चेंडू भला रे । मनीं समजोनी मारा टोला रे ॥ १ ॥ खेळूं विटीदांडू चेंडू । काळा नका भिऊ गांडू रे ॥ धृ. ॥ सहा चार एकत्र करूनी अवघे पुढें रहा । सावध होऊनि धरा चेंडू कोणी कोणाकडे न पहा ॥ २ ॥ प्रपंचाचे घाई धन वित्त म्हणतां भाई । हातीचा चेंडू सोडूनी देई पुढें मारील डोई ॥ ३ ॥ खेळ खेळा परी मनीं धरा जनार्दन । तेणें चुके जन्ममरण शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

## चेंडूफळी.

१८९ मिळवोनी पांच सात गडी मेळीं । डाव खेळती चेंडूफळी ॥ १ ॥ खेळ चेंडूचा झेला रे झेला बाळा । विचारूनी खेळ खेळां न पडूं प्रवाही काळा ॥ २ ॥ यंदु यरडु मोरु नाकु मिळालेती गडी । एका जनार्दनीं शरण अनुपम्य धरा गोडी ॥ ३ ॥

१९० सहज तो चेंडू समान फळी । झेलूं जाणेतो खेळिया बळी ॥ १ ॥ झेला रे भाईनो झेला रे । सद्गुरूवचनें झेला रे ॥ धृ. ॥ अवघे गडी समान रहा । येतां यावा सावध पहा ॥ २ ॥ सुटे सुटे तंव सरिसाचि पावे । लक्ष जाणें तो माघारा नव्हे ॥ ३ ॥ गडियानें गडियाची न धरावी आस । आपुलिया बळें घाकाधी कास ॥ ४ ॥ अभिमाना चढे तो बाहेरी पडे । हातींचें जाय मग उगलाचि रडे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं येकची बोली । भावार्थी तो सद्गुरूवचनें झेली ॥ ६ ॥

## लगोरी.

१९१ खेळ मांडिला लगोरी । खेळताती नानापरी । चेंडू घेऊनि आपुले करीं । खेळताती एकमेक ॥ १ ॥ देती आपुलाला डाव । ज्याचा जैसा आहे भाव । तोचि जिंकीतसे वैभव । आणिक पहाती उगेवाच ॥ २ ॥ बरोबर करूं गडी । नाहीं विषमता जोडी । चेंडू हाणती तांतडी । येती हरीया बैसती गडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कान्होबा भला । खेळा गोविलें कीं सकळां । आपण असोचि निराळा । नवल कळा पाहे डोळा ॥ ४ ॥

१९२ त्रिगुणात्मक मांडियेला डाव । सहा चार अठरा गडी वांटिले ऐका त्याचें नांव ॥ १ ॥ कान्होबा खेळूं लगोरीचा खेळ । तुम्ही आम्ही मिळूं एका ठायीं सहज होईल मेळ ॥ २ ॥ चौदा बारा सोळा पंचविसांचा करूनी मेळ । एक एका पुढें पळती अवघा हलकल्लोळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे कान्होबा खेळ तूं आवरीं । खेळ खेळतां शिणलों आम्हीं पुरे बा वेरझारी ॥ ४ ॥

## भोंवरा.

१९३ भ्रम धरूनियां वांयां कासया खेळसी भोंवरा । यम मारी कुच्चा फिरशील चौऱ्यांशी घरां ॥ १ ॥ पुढें शुद्धि करीं वाचे स्मरे हरी । वांयां भ्रमें फिरशी गरगरां पडसी मायाफेरी ॥ २ ॥ एकावरी एक मारिताती घाय । दया नाहीं येत कोणा-खालीं न ठेविती पाय ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं तरीच चुके फेरा । नाहीं तरी फिरशी गरगरां ॥४॥

*** मेळवीं संवगडे खेळतसे बिन्दीं। शोभतसे मांदी गोपाळांची ॥ १ ॥ सांवळ सुंदरा वैजयंती हार। चिन्मय परिकर पीतांबर ॥ २ ॥ मुगुट कुंडलें चंदनाचा टिळा। झळके हृदयस्थळीं कौस्तुभमणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेधलेंसे मन। नाहीं भेद भिन्न गौळणींसी ॥४॥

१९४ खेळे भावरा गे बाई भोंवरा। राधिकेचा नवरा ॥ धृ. ॥ माझ्या भोंवऱ्याची अरी। सप्त पाताळें त्यावरी। फिरे गरगरां। राधिकेचा नवरा ॥खेळे० ॥१॥ भोंवरा बनला निर्गुणीं। त्यावर चंद्र सूर्य दोनी। जाळी शंकर गवरा। राधिकेचा नवरा ॥ खेळे० ॥ २ ॥ एका जनार्दनीं खेळिया। भोंवरा खेळून पाहे चेलिया। नाद देतो हरिहरा। राधिकेचा नवरा ॥ खेळे० ॥ ३ ॥

## लपंडाई.

१९५ कृष्णा कैशी खेळूं लपंडाई। अनंत लोचन तुझे पाही। तेथें लपावें कवणे ठायीं। तुझें देखणें लागलें पाहीं ॥१॥ कान्होबा पाववी आपुल्या खुणा ॥धृ. ॥ लपूं ममतेच्या पोटीं। जेथें तेथें तुझीच दृष्टी। तेथें लपायाची काय गोष्टी। तुझें देखणें लागलें पाठीं ॥२॥ लपूं गिरीं कपाटीं कडवसा। जेथें तेथें तुझाचि ठसा। एका जनार्दनीं सरिसा। तेणें मोडली खेळायाची आशा ॥३॥

१९६ उघड जगीं दिसोनियां कां झांकितोसी डोळा। पहातां पहातां खेळामध्यें वरपडा होसी काळा ॥१॥ नको खेळूं लपंडाई नको खेळूं लपंडाई। मिळाले ते गडी जाती पळूनि पडाल दांत विचकून भाई ॥२॥ उगाचि डोळे झांकुनी कां रे होसी अंध। संसार-मायामोह याचा टाकी बा छंद ॥३॥ शरण एका जनार्दनीं जातां चुके हा खेळ। नाहीं तरी पडसी गुंतोनि कोण करील कळवळ ॥ ४ ॥

## सुरकांडी.

१९७ घेऊनियां हातीं काठी। पोरा खेळसी सुरकांडी रे ॥ १ ॥ खेळे सुरकांडी पोरा खेळे सुरकांडी। विषयांची वासना धरुनी चढसी प्रपंचाचे झाडीं ॥२॥ बुडापासून शेंडा रे चढसी फांदोफांदी रे। कामक्रोध पोरें लागती पाठीं म्हणती माझा दादा रे ॥ ३ ॥ धरीं एका जनार्दनीं गोडी तरी खेळ जोडा रे। वांयां खेळ खेळूं जातां होईल भुरकवडी रे ॥ ४ ॥



## वावडी.

१९८ अलक्ष केली वावडी। लक्षाचा दोर परवडी। उडविती बारा चौदा गडी। भरली ती गगनीं उडी ॥१॥ भली चंग वावडी। दादांनों भली चंग वावडी ॥ धृ. ॥ औट हात सोडोनी दोरा। मध्यें कामटी लाविल्या बारा। आत्मस्थितीचा चंग उबारा। वावडी उडती अंबरा ॥ २ ॥ साहा चार मिळवोनी गडी। अठराजण सोडिती वावडी। एका जनार्दनीं त्याची जोडी। जनार्दनाचे पायीं गोडी ॥ ३ ॥

## ऐकीबेकी.

१९९ एकीबेकी पोरा सांग झडकरी। एकी म्हणतां जिंकीशी बेकी म्हणतां हरी ॥ धृ. ॥ नव्हे काई बाई तेथें झालें एक शून्य। त्यासी फाटां फुटतां मग लेखा आलें जाण ॥ एकी० ॥ १ ॥ एक दोन तीन पांच विस्तारिला जाण। दहापासूनी सहस्रवरी एक झाली पूर्ण ॥एकी० ॥ २ ॥ एक ब्रह्म पूर्ण तेथें फाट झाली माया। एका जनार्दनीं नित्य लक्ष लावीं पायां ॥ एकी० ॥ ३ ॥

२०० खेळ खेळूं सुरकवडी। कान्होबा उगाचि पाहे गोडी ॥१॥ एकीबेकी पोरा खेळ भला बेकी। सांडुनि एकीबेकी धरितां शेवटीं होईल फुकी ॥२॥ एक दोन तीन चार पांच सहाच्या पडों नको डाई। सहस्र लक्ष कोट गेले उगाचि शीण पाहीं ॥३॥ एका जनार्दनीं म्हणे कान्होबा वाउगा नको गाऊं। जेणें करुनी संसार खेळ तुटोन लक्ष तुझे पायीं लाऊं ॥४॥

२०१ वांयां खेळ एकीबेकी। पडलीस काळाचे मुखीं ॥ १ ॥ आधींच एक निर्गुण रे। मायेनें केलें सगुण रे ॥ २ ॥ एकीबेकी म्हणतां एकलें रे। दोन म्हणतां सर्व आटलें रे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकलें रे। एकपण अवघें फिटलें रे ॥ ४ ॥

## पटपट सांवली.

२०२ पटपट सांवली खेळूं या रे। सावध गड्यांनो कां वेळु लावा रे। भीड तया सोडोनी सहा गडी मारूं या रे ॥ १ ॥ निजानंदीं खेळोनी मित्रतनया हारूं या रे ॥ धृ. ॥ अवघे गडी एकवटोनी जाऊं दे या रे। बहु कष्टें फेरे फिरतां मन तेथें लावा रे ॥ २ ॥ एका जनार्दनीं खेळतां ब्रह्मरूप काया रे। जेथें पाहे तेथें दिसे जनार्दनीं छाया रे ॥ ३ ॥

## झोंबी.

२०३ तारुण्याचें मदें घेशी एकमेकां झोंबी । वांयां जाईल नरदेह धरीं हरीशीं झोंबी ॥ १ ॥ तरीच खेळ भला रे वांयां काय गलवला । एकावरी एक खालीं पडतां मारी यमाजी टोला रे ॥ २ ॥ हातीं हात धरूनियां घालिसी गळां गळखोडा रे । फजीत होसी खालीं पडतां हांसतील पोरें रांडा रे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे खेळ नोहे भला रे । आपण न पडतां दुजियासी पाडी तोचि खेळिया भला रे ॥ ४ ॥

## चिकाटी.

२०४ धरितां हातीं हात न सुटे चिकाटी । पडली ती मिठी नोहे कदा सुटी ॥ १ ॥ वांयां काय बळ वेंचितोसी मूढा । न सुटतां हातीं हात वांयां जिणें दगडा ॥ २ ॥ ऐशी मिठी घालीं एकदां जनार्दन पायीं । न सुटेचि काळत्रयी सर्वत्र देती ग्वाही ॥ ३ ॥ कायावाचामनें शरण एका जनार्दनीं । मिठी पडली ते न सुटे भावें चरणीं ॥ ४ ॥

## उमान.

२०५ बैसोनिया निवांत घालिसी उमान । एका हरीविण सर्व वांयां न धरीं गुमान ॥ १ ॥ नको खेळ खोटा सांडीं मनाचा ताठा । उमान गुमान दोन्ही न कळे होतील जगीं चेष्टा ॥ २ ॥ उ म्हणणें उकार रे मा म्हणणें मकार रे । न म्हणणें नश्वर देह या तिहींचा आकार रे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उमान रे । सांगों जातां न कळे खूण तया म्हणिजे गुमान रे ॥ ४ ॥

## हमामा.

२०६ हमामा पोरा हमामा । घुंबरी वाजे घमामा ॥ १ ॥ हमाम्याचे नादानीं । घुंबरी वाजली रानीं ॥ २ ॥ हमाम्याची शीतळ शाई । पोरा मेली तुझी आई ॥ ३ ॥ काम क्रोध पोरा नाशी । अहंकार तोंड वासी ॥ ४ ॥ एका जनार्दनाशीं । पोरा वहिल्या गांवा जाशीं ॥ ५ ॥

२०७ हमामा बाळा घालीं । नको पडों काळाचे चालीं ॥ १ ॥ हमामा पोरा हमामा ॥ धृ. ॥ हमामा घालीं वरव्यापरी । क्रोधकामा सारुनी दुरी ॥ २ ॥ हमामा घालीं नेटें । धरीं भक्तीचें बळ मोठें ॥ ३ ॥ हमामा घालसील जरी । एका जनार्दनाचे चरण धरीं ॥ ४ ॥

२०८ हमामा घालूं सोई । सांभाळूं शिवा दोही ॥ १ ॥ हमामा रे भाई हमामा । कान्होबाचे बळें घालूं हमामा ॥ २ ॥ हमामा घालूं ऐसा । भक्तिबळें कान्होबा वैसा ॥ ३ ॥ हमामा घालूं नेटें । एका जनार्दनाचें बळ मोठें ॥ ४ ॥

२०९ हमामा मांडिला कान्होबा भाई । हमामा खेळूं भाई कान्होबा तुझे पायीं ॥ १ ॥ हमामा रे हमामा । कान्होबा खेळूं हमामा ॥ धृ. ॥ हमामा खेळा वेगीं । सांडुनी द्वैताच्या संगीं ॥ २ ॥ हमामा खेळूं नेटें । कान्होबाचें बळ मोठें ॥ ३ ॥ हमामा खेळो सोई । एका जनार्दनाचे पायीं ॥ ४ ॥

२१० हमामा घाली राम अवतारीं । कैकईची भीड तुला भारी । प्रस्थान ठेविलें लंकेवरी ॥ १ ॥ हमामा तूं घालीं । कान्होबा हुतुतु खेळूं ॥ धृ. ॥ हमामा घाली नंदाघरीं । मिळोनि गोळियांच्या नारी । गोपाळ नाचती गजरीं ॥ २ ॥ हमामा घाली पंढरपुरीं । पुंडलीकाची भीड भारी । गोपाळ नाचती गजरीं ॥ ३ ॥ हमामा आषाढीकार्तिकीचा । साधुसंत गर्जती वाचा । एका जनार्दनीं म्हणे त्याचा ॥ ४ ॥

२११ हमामा बोला बाळा । खोटा सोडुनी घावा चाळा ॥ १ ॥ बोला हमामा बोला हमामा ॥ धृ. ॥ हमामा बोला हाटीं । बुद्धि सांडोनि घावी खोटी ॥ २ ॥ हमामा बोला भाई । पुन्हां जन्मा येणें नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनाचे पायीं । भावें ठेवियेली डोई ॥ ४ ॥

२१२ कान्होबा खेळ खेळूं रानीं । तुम्ही आम्हीं दोघे मिळोनी ॥ १ ॥ हमामा रे भाई हमामा ॥ धृ. ॥ हमामा घाली मत्स्य अवतारीं । शंखासुरा धरुनी मारी ॥ २ ॥ हमामा घाली समुद्रतीरीं । धरुनी पर्वत पाठीवरी ॥ ३ ॥ हमामा घाली नानापरी । पृथ्वी धरुनी दाढेवरी ॥ ४ ॥ हमामा घाली हिरण्यकश्यपाघरीं । प्रगटुनी स्तंभामाझारीं ॥ ५ ॥ हमामा घाली बळिचे द्वारीं । आपण होऊनि भिकारी ॥ ६ ॥ हमामा घाली परशु हातीं । निःक्षत्री पृथ्वी केली जगतीं ॥ ७ ॥ हमामा घाली लंकेवर । केला बिभीषण राज्यधर ॥ ८ ॥ हमामा घाली नंदाघरीं । गोपाळ नाचती गजरीं ॥ ९ ॥ हमामा घाली भीमातटीं । उभाचि धरूनि कर कटीं ॥ १० ॥ एका जनार्दनीं खेळ । नानापरीचा आकळ ॥ ११ ॥

## हमामा-हुंबरी.

२१३ हमामा भाई हुंबरी । खेळों भाई हमामा

हुंबरी ॥ १ ॥ राम रावण हमामा घालिती । हनुमान बळें खेळिया निज ज्योती ॥ २ ॥ अर्जुन भीष्म हमामा खेळती । कृष्णें सुदर्शन धरिलें हातीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हमामा जाहला । अवघा खेळ आसोनि ठेला ॥ ४ ॥

२१४ हमामा हुंबरी घालूं नका एक भावें । जेथें वसे कान्होबा तें घर आम्हां ठावें ॥ १ ॥ हमामा घालूं आवडीं । कान्होबा तूं आमुचा गडी ॥ २ ॥ हमामा घालूं सोई । आमुचा कान्होबा भाई ॥ ३ ॥ हमामा घालूं रानीं । एका जनार्दनाचे चरणीं ॥ ४ ॥

२१५ हमामा भाई हुंबली । गोपाळ वासुरें कान्होबा जाला ना ब्रह्ममाया बोंवली रे ॥ १ ॥ हमामा भाई बार कोंडे । वासुरें लेंकुरें कान्होबा जाला ठकविले ब्राह्मण चहूं तोंडें ॥ २ ॥ हमामा भाई बारकोंडा । कंसाच्या केशीया कान्होबा मारिला हांसत आला होऊनियां घोडा रे ॥ ३ ॥ हमामा भाई खोल पाणी । यमुनेमाझारीं कान्होबा पोहतां कुटिला कालिया फणी रे ॥४॥ हमामा भाई तोंड वासी । शिंक्याचें लोटकें कान्होबें भेदिलें लागली धार गोड कशी रे ॥ ५ ॥ हमामा भाई तोंड वासी । औटाचि मात्रा कान्होबें भेदिली लागली गोड कैसी रे ॥ ६ ॥ हमामा भाई घाट वाटे । चोरीचें दूध गोड मोठें ॥ ७ ॥ हमामा भाई गटगोळे । स्वर्गींच्या देवां लाळ गळे ॥ ८ ॥ हमामा भाई गट गोळी । गोपाळ जेविती खेळींमेळीं ॥ ९ ॥ हमामा भाई मिठी मिठी । आजचें भोजन गोड सुटी ॥ १० ॥ एका जनार्दनीं तृप्त झाला । ब्रह्मदेव लाळ घोटी ॥ ११ ॥

२१६ न लगे विषय गोपांच्या पाठीं । न संडूं स्वात्म घोंगडें काठी । विषयभोगें होईल तुटी । कृष्ण जगजेठी अंतरे ॥ १ ॥ म्हणवोनि हुंबली वोधाची । कृष्णेसी आमुची ॥ धृ. ॥ न टाकूं प्रेम शिदोरी कुरुधनें । भेटों सायुज्य पळसपानें । विषय तारींचें मिष्टान्न । तेणें जनार्दन न भेटे ॥ २ ॥ ब्रह्म देवूं करुनी ठोमा । एका जनार्दनीं गोविलें कामा । अष्ट भोग भुलवी रमा । तोही आम्हां श्रीकृष्ण ॥ ३ ॥

२१७ राम रावण हुंबली खेळती । खेळीया हनुमान तीरे ॥ १ ॥ खेळ मांडिला खेळ मांडिला कान्होबाचे बळें खेळ मांडिला ॥ धृ. ॥ राम कृष्ण हुंबली खेळती । खेळ्या अर्जुन झाला रे ॥ २ ॥ अठरा अक्षौहिणी कौरव मारिले । शिशुपाळसह वक्रदंत वधिले रे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खेळतां हुंबली आनंद बहु जाला । खेळ खेळतां अवघे निमाले मीतूंपणा ठाव नाहीं उरला ॥५॥

## हुतुतु.

२१८ मांडियेला डाव पोरा हुतुतुतुतु । नको घालूं फेरा पोरा हुतुतुतुतु ॥ १ ॥ लक्ष चौऱ्याशींचा डाव खेळ मांडियेला । लक्ष जाणे तोचि तेथोनि सुटला ॥ २ ॥ सहा चार अठरा यांचे पडों नको डाईं । एका जनार्दनीं संतां शरण जाईं ॥ ३ ॥

२१९ विवेक वैराग्य दोघे भांडती । ज्ञान अज्ञान पाहाती रे । आपुले स्वरूपीं होऊनि एक चित्त झाली सकळ सृष्टी रे ॥ १ ॥ हुतुतुतुतुतु खेळूं रे गडीया हुतुतुतुतुतु खेळूं रे । रामकृष्ण गोविंद हरी नारायण निशिदिनीं भजन करा रे ॥ धृ. ॥ हिरण्यकश्यप प्रल्हादपुत्र खेळतां आले हातघाई रे । बळेंचि आला फळी फोडुनी गेला पित्यासि दिधलें डायां रे ॥ २ ॥ राम रावण सन्मुख भिडतां बरवा खेळ मांडिला रे । कुंभकर्ण आखया इंद्रजितासी तिघांसी पाडिलें डायां रे ॥ ३ ॥ कौरव पांडव हुतुतु खेळती खेळिया चक्रपाणी रे । कामक्रोध जीवें मारिला उरूं दिला नाहीं कोणी रे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हुतुतु खेळतां मन जडलें हरी पायीं रे । विवेक सेतु त्यांनीं बांधिला उतरून गेलें शायी रे ॥ ५ ॥

२२० अंगीचिया बळें खेळसी हुतुतु । वृद्धपण आलिया तोंडावरी थुथुथु ॥१॥ कासया खेळसी बायां भजें गुरुराया । चुकविल डाया हुतुतुतु ॥२॥ एका जनार्दनीं हुतुतु नको भाई । मन जिंकुनियां लागे कान्होबाचे पायीं ॥३॥

२२१ गाई राखतां दिससी काना । तें म्हणों यशोदेचा कान्हा । आतां न मानिसी अवघ्या गणना । तूं ना कळसी ध्यानामना रे कान्होबा ॥ १ ॥ कान्होबा आमुचा सखा होसी । देसी नाम नवा दिससी रे कान्होबा ॥ धृ. ॥ गाई राखितां लागली सवे । तें जेऊं आम्हां तुजसवें । तूं मिटक्या मारिसी लाघवें । तुझी करणी कैशी होये ॥२॥ धांगडतुतु खेळूं सुरक्या । डायीं आलीया मारूं बुक्या । आतां महिमा ये देख्या । काय कीर्ति वर्णावी सख्या ॥३॥ तूं ठायींचा लाडाड होसी । तूं शोकिली बा मावशी । आतां माया गिळूं पाहासी । उबगलों तुझ्या बा पोटासी ॥ ४ ॥ तुज

लक्षितां पारुषे ध्यान । ध्यातां ध्येय हारपलें मन । एका अवलोकीं जनार्दन । तुझें हुंबलीनें समाधान रे कान्होबा ॥ ५ ॥

२२२ मांडियेला खेळ हमामा हुंबरी । मारुनी हिरण्यकश्यपु प्रल्हाद खेळिया करी ॥ १ ॥ हुतुतुतु हुमरी हुतुतुतु हुमरी ॥ धृ. ॥ जाउनी लंकेवर खळ मांडियेला। रावण कुंभकर्ण वधोनि शरणागत रक्षिला ॥ २ ॥ मांडियेला खेळ खेळे अर्जुनाचे रथीं । मारुनी कौरव खेळे नानापरींची गती ॥ ३ ॥ धरुनी गोपवेष मारियेला कंसमामा । नानापरी खेळ खेळे गोपाळांसी हमामा ॥४॥ येउनी पंढरपुरा पुंडलिकासाठीं । एका जनार्दनीं कर ठेवुनी उभा राहिला कटीं ॥ ५ ॥

२२३ हमामा हुंबरी खेळती एक मेळा । नानापरींचे गोपाळ मिळती सकळां ॥ १ ॥ एक धावे पुढें दुजा धावे पाठीं । एक पळे एकापुढें एक सांडोनी आटी ॥ २ ॥ ऐसें गुंतले खेळा गाई धांवती वनीं । परतेनाची कोण्हा एका जनार्दनीं ॥ ३ ॥

२२४ अगम्य तुझा खेळ न कळे अकळ । ब्रह्मादिक वेडे जाले तेथें आम्हां कैचें बळ ॥१॥ कान्होबा भला भला तूं होसी । चोरी करूनि दिसों न देसी रे कान्होबा ॥२॥ चोरुनी शिदोऱ्या आमुच्या खासी । शेखीं बळतीया धाडिसी रे कान्होबा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आमुचा होसी । दास्यत्व करुनी दिसों न देसी रे कान्होबा ॥४॥

२२५ बहू खेळतां खेळ । कळों आले सकळ । शेवटीं तें निर्फळ । जालें बाळकृष्णा ॥ १ ॥ कान्होबा पुरे पुरे आतां खेळा । येतां जातां श्रम जाला रे कान्होबा ॥ धृ. ॥ आम्हीं न खेळूं विटीदांडू । भोंवरा लगोऱ्या रे चेंडू । एकीबेकीतें सांडूं । मीतूंपण अवघें खंडूं रे कान्होबा ॥२॥ लक्ष लावूं तुझे खेळां । न गुंतूं आणिका चाळा । एका जनार्दनीं पाहूं डोळां । तुझ्या खेळाची अगम्य लीला रे कान्होबा ॥३॥

२२६ तुझिया खेळा बहु भ्याले । नेणों ब्रह्मादिक ठकले ॥१॥ कान्होबा आमुचा तूं गडी । न सोडिसी आपुली खोडी ॥२॥ चोरी करितां गौळणी बांधिती । तुझी न कळे वेदशास्त्रां गती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । आम्हीं न सोडूं तुझे चरण रे कान्होबा ॥४॥

२२७ गाई चारी कान्होबा । गोपाळा सांगाती उभा। अनुपम्य त्याची शोभा । नाचती प्रेमानंदें । गाताती भोगित छंदें । मन वेधिलें परमानंदें रे कान्होबा ॥ १ ॥ भला कान्होबा भला । भला कान्होबा भला ॥ धृ. ॥ गौळियांचीं आंधळीं पोरें । गाईपाठीं धांवती सैरें । हरि म्हणे रहा स्थिरें । तुमची आमची बोली । पहिलीच आहे नेमिली । त्वां बरीच ओळखी धरली रे कान्होबा ॥ २ ॥ तुझी संगती खोटी । आम्हां धाडिसी गाईचे पाठीं । तूं बैससी जगजेठी । तुझें काय केलें आम्हीं । तूं जगाचा हा स्वामी । तुझा महिमा आगमनिगमीं । कांहीं न कळे रे कान्होबा ॥ ३ ॥ माझी गाय आहे दुधाची । तुला सांपडली फुकाची । मला चोरी काय लोकांची । कां पडलासी आमुचे डायीं । भिन्न भेद नाहीं । एका जनार्दनीं मन पायीं रे कान्होबा ॥ ४ ॥

२२८ कान्होबा सांभाळी आपुलीं गोधनें । तुझ्या भिडेनें कांहीं न म्हणे ॥ १ ॥ तूं बैससी कळंबाखालीं। वळती देतां आमुचे पाय गेली ॥ २ ॥ तुझीं गोधनें बा अचाट । धांवती देखोनी विषय हिरवट ॥ ३ ॥ तूं बैसोनी करिसी काला । आमुच्या शिदोऱ्या करूनी गोळा ॥ ४ ॥ खातोसी दहींभाताचा गोळा । आम्हांकडे न पहासी उचलोनी डोळा ॥ ५ ॥ वेधिलें आमुचें जीवपण । ठकविलें आम्हांकारण ॥ ६ ॥ एका जनार्दनीं परमानंदा । आम्ही भुललों तुज गोविंदा ॥७॥

२२९ नको तूं आमुचे संगतीं । बहु केलीसे फजिती । हें तुज सांगावें पा किती । ऐकतां तूं नायकसी रे कान्होबा ॥ १ ॥ जाई तूं आपुलीं निवडीं गोधनें । आम्हां न लगे तुझें येणें जाणें रे कान्होबा ॥ धृ. ॥ तुझी संगती ठाउकी आम्हां । त्वां मारिला आपुला मामा । मावशी धाडिली निजधामा । जाणों ठावा आहेसी आम्हा रे कान्होबा ॥ २ ॥ तुझे संगती नाश बहु । पुनः जन्मा न येऊं । एका जनार्दनीं तुज ध्याऊं । आवडीनें लोणी खाऊं रे कान्होबा ॥ ३ ॥

२३० गडी मिळाले सकळ । यमुनेतटीं खेळ खेळती ॥ १ ॥ धांवती ते सैरावैरा । खेळ बरा म्हणती ॥ २ ॥ विसरले तहान भूक । देखोनी कौतुक खेळाचें ॥ ३ ॥ भुलले सवंगडी देखोनी । एका जनार्दनीं म्हणतसे ॥ ४ ॥

२३१ ऐकतां वचन कान्हया म्हणती गडी । काय खेळायाची आतां न धरूं गोडी ॥ १ ॥ लावियेला चाळा त्वां जगजेठी । आतां आम्हां सांगसी तूं ऐशा गोष्टी ॥ २ ॥ एका जनार्दनीं कान्होबा खेळ पुरे आतां। मांडू रे काला आवडी अनंता ॥ ३ ॥

## काला.

२३२ ऐसे नित्यकाळ जाताती वना । गोपाळ रामकृष्ण खेळती खेळ नाना ॥ १ ॥ यमुनेचे तटीं कळंबा तळवटीं । मांडियला काला गोपाळांची दाटी ॥ २ ॥ आणिती शिदोऱ्या आपआपल्या । जया जैसा हेत तैशा त्या चांगल्या ॥ ३ ॥ शिळ्या विटक्या भाकरी दहीं भात लोणी । मिळवोनी मेळा करी चक्रपाणी ॥४॥ एका जनार्दनीं अवघ्यां देतो कवळ । ठकविलें तेणें ब्रह्मादिक सकळ ॥ ५ ॥

२३३ वैकुंठीचा हरी गोपवेष धरी । घेऊनि शिदोरी जाय वनां ॥ १ ॥ धाकुले सवंगडे संगती बरवा । ठाईं ठाईं ठेवा गोधनांचा ॥ २ ॥ बाळ ब्रह्मचारी वाजवी मोहरी । घेताती हुंबरी एकमेकां ॥ ३ ॥ दहीं भात भाकरी लोणचें परोपरी । आपण श्रीहरी वाढीतसे ॥ ४ ॥ श्रीहरी वाढिलें गोपाळ जेविलें । उच्छिष्ट सेविलें एका जनार्दनीं ॥ ५ ॥

२३४ बैसोनी कळंबातळीं । गडी मिळाले सकळीं । मिळोनी गोपाळीं । करती काला ॥ १ ॥ नानापरींचीं पक्कान्नें । वाढिताती उत्तम गुणें । सर्वां परिपूर्णें । मध्यें शोभे सांवळा ॥ २ ॥ वडजा वांकुडा पेंदा । आणि सवंगडी बहुधा । काल्याच्या त्या मुदा । घेतो आपुलें करीं ॥ ३ ॥ लोणचें तें नानापरी । वाढिताती कुसरीं । सर्व वाढिलें निर्धारी । परिपूर्ण अवघींयां ॥ ४ ॥ एका जनार्दनीं म्हणे । कृष्णा कवळ तूं घेणें । गडियांसी देव म्हणे । तुम्हीं घ्यावा आधीं ॥५॥

२३५ गडी म्हणती सकळ । कृष्ण तूं घेईं कवळ । हरी म्हणे उतावीळ । घ्यावा तुम्ही ॥ १ ॥ गडी नायकती सर्वथा । हरी म्हणे मी नेघें आतां । म्हणोनी रुसोनी तत्वतां । चालिला कृष्ण ॥ २ ॥ कृष्णा नको जाऊं जाण । तुझें ऐकूं वचन । म्हणोनि संबोखून । आणिला कृष्ण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं । लाघव दावी चक्रपाणी । भक्ता वाढवुनी । महिमा वदवी ॥ ४ ॥

२३६ काळ्या कांबळ्याची घडी । घालिताती सवंगडी बैसवूनि हरी । कवळ घेती ॥ १ ॥ कृष्ण आपुलेनी हातें । कवळ घाली गडियातें । तयांचीं उच्छिष्ट शितें । घालितसे मुखीं ॥ २ ॥ मुखामाजीं कवळ । सवंगडे घालिती सकळ । वैकुंठीचा पाळ । ब्रह्मानंदें डुल्लत ॥ ३ ॥ तृप्त झाला जनार्दन । एका वंदीतसे चरण । काया वाचा मन । खूण भक्त जाणती ॥४॥

२३७ मिळोनी गोपाळ सकळीं । यमुनेतटीं खेळे चेंडुफळी । गाई बैसाविल्या कळंबातळीं । जाहली दुपारीं खेळतां ॥ १ ॥ काला मांडिला वो काला मांडिला वो । नवलक्ष मिळोनी काला मांडिला वो ॥ध्रु.॥ नानापरींचें शोभती दहींभात । पंक्ती बैसाविल्या पेंदा बोबडा वाढीत । जो जया संकल्प तें तया मिळत । अनाधिकारिया तेथें कोणी न पुसत ॥ २ ॥ पूर्वसंचित खालीं पत्रावळी । वाढती भक्तिभावाची पुरणपोळी । नामस्मरणाची क्षुधा पोटीं आगळी । तेणें तृप्ती होय सहजीं सकळीं ॥ ३ ॥ ऐसे तृप्त जाहले परमानंदें । कवळ कवळावे निजछंदें । एका जनार्दनीं अभेदें । शुद्ध समाधिबोधें मुखसंवादें ॥ ४ ॥

२३८ अनंत नामाचा हा काला । पुराणें म्हणती पाहूं चला ॥ १ ॥ हरिनामाचा कवळु घेतां । तेणें धालों पैं सर्वथा ॥ २ ॥ एका कवळासाठीं । गणिका बैसविली वैकुंठीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कवळ । सेवूं जाणती ते प्रेमळ ॥ ४ ॥

२३९ बैसविती हरी वस्त्र घडीवरी । पूजा करती बरी पुष्पपत्रें ॥ १ ॥ धाउनी गळां पाले माळा त्या वाहाती । गजरें नाचती पुढें येक ॥ २ ॥ टिरीया मांडिया वाजविती पाय । हरुषें नाचताहे देवराय ॥ ३ ॥ ऐसें नित्यानित्य क्रीडा ते करिती । देव ते पहाती विमानीं तें ॥ ४ ॥ म्हणताती देव वंचलों या सुखा । एका जनार्दनीं देखा गोवियलें ॥ ५ ॥

२४० देवा परीस उदार । भक्त जाणा निर्धार ॥ १ ॥ याजसाठीं धावे पाठीं । देत लंगोटी आपुली ॥ २ ॥ आपण दिगंबरची असे । भक्त वस्त्र भूषणें सौरसें ॥३॥ म्हणोनि भक्ताचा अंकित । एका जनार्दनीं तिष्ठत ॥४॥

२४१ देव भक्त दोनी करिताती काला । तयांच्या सुखाला वर्णी कवण ॥ १ ॥ धन्य भाग्य त्यांचें गोकुळ जनांचें । ठेवणें सदाशिवाचें खेळतसे ॥ २ ॥ उच्छिष्ट तें खाय तयाचेनी हातें । नाहीं कंटाळत तयालागीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्ताची आवडी । वाढवीत गोडी नित्य नवी ॥ ४ ॥

२४२ नित्य तो सोहळा करिताती काला । तो पहावयाला देव येती ॥१॥ अंतरीं सुरवर विचार करिती । काला श्रीपती करीत स्वयें ॥ २ ॥ उच्छिष्ट प्रसाद सेवूं धणीवरी । मत्स्यरूप निर्धारी घेती सर्व ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जाणतसे खूण । म्हणोनि विंदान आरंभिलें ॥ ४ ॥

२४३ गोंवियेलें देवें आम्हांसी अभिमानें । नामरूप येणें अंतरलों ॥ १ ॥ करिती विचार इंद्रादि देव । हें सुखवैभव न मिळे आम्हां ॥ २ ॥ शेष उष्टावळी मिळतां आम्हांसी । पावन जन्मासी होऊं आम्ही ॥ ३ ॥ ऐसा विचार करूनियां देव । मत्स्यरूप सर्व धरिताती ॥ ४ ॥ गोपाळांसी सांगे वैकुंठीचा रावो । आजी नवलावो तुम्ही करा ॥ ५ ॥ कवळ खाउनी हात टिरी पुसा । यमुनें स्नाना जाऊं नका ॥ ६ ॥ कां तो सांगे हरी न कळे तयांसी । एका जनार्दनासी गुज पुसे ॥ ७ ॥

२४४ गडियासी सांगे वैकुंठीचा राव । आजी आला भेवो यमुनेंत ॥ १ ॥ जीवनालागीं तेथें कोण्ही पैं न जावें । बाऊ आला आहे तया ठायीं ॥ २ ॥ तयाचें बोलणें लागे सर्वां गोड । म्हणोनि धरिती चाड सर्व-गडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐकोनि वचन । पुढती वचन पेंदा बोले ॥ ४ ॥

२४५ गोपाळ म्हणती कान्हया कृष्णातें । आजी यमुनेचें जळ वर्जा कां जी ॥ १ ॥ हरी म्हणे तयातें तेथें बाऊ आला । म्हणोनि तयां स्थळा नवजावें ॥२॥ ऐकोनियां पेंदा नाचतो दुपांडी । गडियांची मांदी सवें घेत ॥ ३ ॥ बाऊ पहावया गडे हो अवघे चला । या कृष्णबोला राहूं नका ॥ ४ ॥ एका मागें एक गडी ते निघाले । एका जनार्दनीं आले यमुनेतटीं ॥ ५ ॥

२४६ नव लक्ष गोपाळ यमुनेतटीं । उभे राहुनी दृष्टी पाहताती ॥ १ ॥ खळाळाचा शब्द कानीं तो ऐकिला । पेंदा पुढें झाला सरसाउनी ॥ २ ॥ पेंदा म्हणे गडिया आपणां पाहुनी यमुना । हुंबरी घेतो जाणा पहा पहा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहूनियां देव । करिता उपाव नवलाचा ॥ ४ ॥

२४७ आजी कांहो कृष्णा वर्जिली यमुना । बाऊ तो जाणा कोठोनि आला ॥ १ ॥ केसा आहे बाऊ पाहीन तयातें । म्हणोनि त्वरित उठिलासे ॥ २ ॥ वारितां वारितां पेंदा पैं गेला । पहातसे उगला यमुनेंत ॥ ३ ॥ बाऊ तो न दिसे कोठें खळाळ वाजत । पेंदा तया म्हणत क्रोधयुक्त ॥ ४ ॥ म्हणतसे पेंदा यमुनेसी जाण । स्त्री तूं होऊन हुंबरी घेसी ॥ ५ ॥ मी कृष्णदास घेसी तूं हुंबरी । तुज निर्धारी बळ बहु ॥ ६ ॥ मी काय निर्बळ घेसी तूं हुंबरी । आतांची निर्धारी पाहें माझें ॥ ७ ॥ म्हणोनियां पेंदा तेथेंची बैसला । हुंबरी तो तयाला घालीतसे ॥ ८ ॥ पेंदा कां नये काय जाहलें त्याला । कृष्णें पाठविला दुजा एक ॥ ९ ॥ तोहि मीनला तयांसी तत्काळ । गडी तों सकळ आले तेथें ॥ १० ॥ उरलेसे दोघे कृष्ण आणि राम । गुंतले सकाम गडी तेथें ॥ ११ ॥ काय जाहलें म्हणोनि आले उभयतां । पाहुनी तत्वतां हांसताती ॥ १२ ॥ सावध करितां न होती सावध । लागलासे छंद घुमरीचा ॥ १३ ॥ एका जनार्दनीं कौतुकें कान्हया । आली असे दया भक्ताची ते ॥ १४ ॥

२४८ गुडघेमेटी बैसले तोंडा खरस आले । ते असे देखिले रामकृष्णें ॥ १ ॥ मोहरी काढोनि लावियली मुखा । नादें तिहीं लोकां मोहियेलें ॥ २ ॥ तयामध्यें म्हणे गडे हो ऐका । पळालासे देखा भिउनी तुम्हां ॥३॥ मोहियेलें मन सर्वांचें भावें । एका जनार्दनीं देवें नवल केलें ॥ ४ ॥

२४९ पाहूनियां हरी गोपाळांचें चोज । म्हणे येणें तो निर्वाणीचें निज मांडियेलें ॥ १ ॥ मठा खुंटी येउनी हुंबरी घालिती । खर तोंडाप्रती येती जाहली ॥ २ ॥ कळवळला देव जाहलासे घाबरा । मुरली अधरा लावियेली ॥ ३ ॥ मुरलीस्वरें चराचरीं नाद तो भरला । तेणें स्थिर झाला पवनवेगीं ॥ ४ ॥ यमुनाहि शांत झाली तेच क्षणीं । म्हणे चक्रपाणी सावध व्हा रे ॥ ५ ॥ पेंदियानें तो शब्द ऐकिला कानीं । एका जनार्दनीं स्थिर झाला ॥ ६ ॥

२५० ऐकतां तो नाद मोहिलेंसे मन । न कळे विंदान तिहीं लोकां ॥ १ ॥ सावध होउनी गडी ते पहाती । स्थिर पैं होती यमुना ते ॥ २ ॥ एका जना-र्दनीं ऐसा दासाचा कळवळा । म्हणोनि भक्त लळा पाळितसे ॥ ३ ॥

२५१ येवोनि गोपाळ कृष्णासी बोलती । यमुनेचा बाऊ पळाला वो श्रीपती ॥ १ ॥ धन्य बळिया आम्हीं कीं वो त्रिभुवनीं । धन्य धन्य कृष्णा म्हणोनि नाचती अवनीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं ऐकोनि तयांचे बोल । आनंदें गोपाळ तयाशीं खेळे ॥ ३ ॥

२५२ पेंदा म्हणे देवा बाऊ तो पळाला । आमुचें भेणें गेला देशोधडी ॥१॥ देव म्हणे गोपाळा धन्य तुम्हीं बळी । पळविला बळी बाऊ तुम्हीं ॥२॥ ऐसें समाधान करी मनमोहन । एका जनार्दनीं चरणीं लागे ॥ ३ ॥

२५३ वाऊगे तें वांयां । कुंथाकुंथी खेळावया ॥१॥ हा खेळ नोहे रे बरा । गाई आधीं ते आवरा ॥ २ ॥ करा आपले स्वाधीन । तेणें तुटेल बंधन ॥ ३ ॥ नका गुंतूं वांयां । एका जनार्दनीं लागे पायां ॥ ४ ॥

२५४ खेळतां सांवळा गडियांसी म्हणे । खेळ तो पुरे गाई जमा करणें ॥१॥ आपुलाल्या आपण वळाव्या गाई । नवल तो तेणें खेळ सांडावया भाई ॥ २ ॥ धांवती सवंगडी पाठोपाठ लवलाह्या । गुंतल्या त्या गाई वळती न येती वळाया ॥ ३ ॥ येवोनि दीनमुख करिती हरीपुढें । एका जनार्दनीं तया पाहतां प्रेम वाढे ॥ ४ ॥

२५५ गोपाळ म्हणती कान्हा । सांभाळीं आपुल्या गोधना । पळतां सैराट धांवती राना । गेल्या ठल्या त्या तुम्हीं जाणां ॥ १ ॥ कान्होबा पुरे पुरे तुझी गडी। आम्हां गाईनें केली ओढाओढी ॥ धृ. ॥ तूं वैसली टेकावरी । आम्हीं श्रमतां वेरझारीं । ऐसें कैसें तुझें मुरारी । आपुलें गोधनें जतन करीं ॥ २ ॥ तुझ्या न लगती आम्हां गाई । तुझी संगती पुरे भाई । जरी कोपेल तुझी आई। तरी करील आमुचें काई रे ॥३॥ तुझीं गोधनें सैराटें । दाही पळती दाही वाटें । वळितां कष्ट होताती मोठे । ठेचा लागुनी फुटलीं बोटें ॥ ४ ॥ पैल श्रवणा पाहे गाये । ते स्वाद होये तिकडे जाये । उभी क्षणभरी न राहे । वळितां जाती आमुचे पाय ॥ ५ ॥ पैल सांवळी डोळे सुटी । देखोनि धांवे हिरवटी । वळितां धाप न साहे पोटीं । ती तूं सांभाळीं जगजेठी ॥ ६ ॥ पैल हुंगी कैसी सुजाण । स्वाद घे परी न खाये तृण । इसी हिंडावया थोडकें रान । वळितां जाती आमुचे प्राण ॥ ७ ॥ पैल थोरटी रसाळ रंगी । कळप सांडोनि वाढ वेगीं । वळितां न वळे ती आम्हांलागीं । तुझी संगत नको वेगीं ॥ ८ ॥ पैल सर्वांग सुकुमार मोठी । चहूंकडे ती धांवत खोटी । मऊ रान देखोनियां अंग लोटी । तिसी वळितां जालों हिंपुटी ॥ ९ ॥ पैल लोभिष्ठ हुंबरे कैसी । उगी न राहे हुंबरे द्वेषी। वळितां न वळे ती आम्हांसी । ती तूं सांभाळी हृषिकेशी ॥१०॥ पैल हाताळ वोढाळ येकी । तेणें पाते गुड हाकी । ऐसी खट्याळ नाहीं आणिकी । वळितां वळित्या घेती जिकी ॥११॥ पैल पाय करिती भारी । उभी न राहे क्षणभरी । वळतां शिणलों बहु मुरारी । तें तूं आपुलें जतन करीं ॥१२॥ पैल पोटफुगी खादाड । कैसी खाउनी हागे वाड । धुतां कधींच नव्हे धड । तुझीं गोधनें न लगती गोड ॥१३॥ पैल मुतरी मुंजी लांडी । कैसी सांचली घेत होडी । धांवे जेथें गोड लागे तोंडीं । वळतां पडती आमुची मुरकुंडी ॥१४॥ पैल मनमोहन सुंदर । कोणें काळीं नव्हे स्थिर । इसी हिंडावया थोर वावर । हांव धरुनी धांवती फार ॥१५॥ ऐसीं गोधनें आमुच्या माथां । घालूं पहातोसी अनंता । एका जनार्दनीं विनवितां । कृपा आली आलिंगी निजभक्ता ॥ १६ ॥

२५६ काकुलती गोपाळ म्हणती रे कान्हया । गाई न येती माघारी कोण वळी कासया ॥ १ ॥ आमुची खुंटली गति आम्हीं तूं हरी । तुजवांचूनी कोण सखा आमुचा कैवारी ॥२॥ नको वेरझारा पुरे आतां हरी । एका जनार्दनीं ऐशी करुणा करीं ॥ ३ ॥

२५७ गडियांचें उत्तर ऐकोनी सांवळा । वेधियलें मन तटस्थ सकळां ॥ १ ॥ घेउनी मोहरी गाई पाचारी सकळां । नवल तें जाहलें गोपाळां सकळां ॥ २ ॥ येउनी गाई अवघ्या जमा होती । पाहूनियां कृष्णा त्या हुंबरती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विश्वाचा निवारी । गाई आणि गोपाळां वेधिलें सर्वांसी ॥ ४ ॥

२५८ [illegible] न धरीच मान । खाय भाजीपाला [illegible] ॥ १ ॥ उच्छिष्टाची आस धरुनीयां जीवीं । गोकुळीं तें दावी चोज सर्व ॥ २ ॥ खेळे विटीदांडू हमामा हुंबरी । वाजवी मोहरी सवंगडियांसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्तांचा अंकित । म्हणोनि तिष्ठत उभा असे ॥ ४ ॥

२५९ काळे गोरे एकापुढें एक । धांवताती विंदो विंदीं देख । अलक्ष लक्ष्या नये सम्यक । तो नंदनंदन त्रिभुवननायक गे माय ॥ १ ॥ गाईचरु नेताती वनां । गोपाळ म्हणती अरे कान्हा । जो नये वेदां अनुमाना। ज्यासी चतुरानन ध्यानीं ध्यातसे ॥ २ ॥ जें योगिजनांचें ध्येय ध्यान । ज्याकारणें अष्टांग योगसाधन । तयांसि नोहे कर्मी दृश्यमान । तो गोळयांचें उच्छिष्ट खाय जाण गे माय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं व्यापक । सर्वां ठायीं समसमान देख । अरिमित्रां दोणें ज्याचें एक । तो हा नायक वैकुंठींचा ॥ ४ ॥

२६० कृष्ण देखतांचि गेलें ज्ञान । शेंगीं बुडविलें माहिमान ॥ १ ॥ भली केलें हे कृष्णगती । सर्व पळविले रागानी ॥ २ ॥ मायेचा करविला वेढु । शमदमादि पळविले वैंधु ॥ ३ ॥ द्रष्टा दृश्य आदि दर्शन । तिन्ही सांडिले पुसून ॥ ४ ॥ ब्रह्माहमस्मि शुद्ध जाण । तथील शून्य केला अभिमान ॥ ५ ॥ एका जनार्दनाची प्राप्ती । ज्ञान अज्ञान हारपती ॥ ६ ॥

२६१ करूनियां काला सर्व आले गोकुळा । गोपाळांसहित गाईवत्स [illegible] ॥ वोवाळिती श्रीगुरु

कुर्वंडी करिती । रामकृष्णातें सर्व घोवाळिती ॥ २ ॥ जाहला जयजयकार आनंद सकळां । एका जनार्दनीं धणी पाहतां डोळां ॥ ३ ॥

२६२ जाहला अस्तमान आले गोकुळां । घोवाळिती आरत्या गोपिका बाळां ॥ १ ॥ जाती स्वंगडी आपुलाले घरां । रामकृष्ण दोघे आले मंदिरां ॥ २ ॥ नानापरीचीं पक्वान्नें वाढिती भोजना । यशोदा रोहिणी राम आणि कृष्णा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पहुडले देव। गोकुळामाजीं दावी ऐसें लाघव ॥ ४ ॥

२६३ अस्तमान जालिया ग्रामांत परतले । गोपाळ ते गेले घरोघरीं ॥ १ ॥ आपुलिया गृहीं रामकृष्ण आले । यशोदेनें केलें निंबलोण ॥ २ ॥ षड्रस पक्वान्नीं विस्तारिलें ताट । जेविती वैकुंठ नंदासवें ॥ ३ ॥ नंदासवें जेवी वैकुंठीचा हरी । ब्रह्मादिक सरी न पावती ज्याची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसी लीला खेळे । परब्रह्म सांवळें कृष्णरूप ॥ ५ ॥

## श्रीकृष्णाचें मथुरेस झालेल्या प्रयाणानें गोकुळवासी गौळणींचा आकांत.

२६४ गौळणी म्हणती यशोदेला। कोठें गे सांवळा । कां रथ शृंगारिला । सांगे वो मजला । अक्रूर उभा असे बाई गे साजणी ॥ १ ॥ या नंदाच्या आंगणीं। मिळाल्या गौळणी ॥ धृ. ॥ बोले नंदाची पट्टराणी । सद्गदीत होउनी । मथुरेसी चक्रपाणी । जातो गे साजणी ॥ विव्हळ झालें मन वचन ऐकोनी ॥ २ ॥ अक्रूरा चांडाळा । तुज कोणीं धाडिला । कां घात करूं आलासी । वधिशी सकळां । अक्रूरा तुझें नाम तैसीच करणी ॥ ३ ॥ रथीं चढलें वनमाळी । आकांत गोकुळीं । भूमि पडल्या व्रजबाळी । कोण त्या सांभाळी ॥ नयनांच्या उदकानें भिजली धरणी ॥ ४ ॥ देव बोले अक्रूरासी वेगें हांकी रथासी । या गोपींच्या शोकासी । न पहावें मजसी । एका जनार्दनीं रथ गेला निघोनि ॥ ५ ॥

## श्रीकृष्णाच्या आगमनानें मथुरेंतील गौळणींची धांदल.

२६५ कृष्ण आला परिसुनी मथुरे नारी । चपळा धांवती अति सुंदरी । एकीं त्या भोजन कवळ करीं । एकीं त्या आलीया मार्जन शिरीं ॥ १ ॥ अरे कृष्णा अरे कान्हा मनमोहना । गोपिका भाळल्या तुझिया गुणा । जय जय मानस मनमोहना । जीवीं जीवें गुंतल्या नंदनंदना ॥ २ ॥ कृष्णदृष्टी पहावया प्राणपिसा । एकी त्या आलिया मुक्तकेशा । ऐकी त्या आलिया विगुंतवासा । देह गेह नाठवे कृष्णमानसा ॥ ३ ॥ कृष्णदृष्टी पहावया वेगू कामिनी । अस्ताव्यस्त इंद्रिया बाणलीं लेणीं । एकी त्या आलिया कर्म सांडोनी । तनुमन वेधिल्या सारंगपाणी ॥ ४ ॥ एकी त्या काजळ सूदल्या मुखीं । जावड कुंकुम लाविती नाकीं । तांबुल विडीया खोविती मस्तकीं । कृष्णदृष्टी इंद्रिया नाहीं वोळखी ॥ ५ ॥ एकी त्या तानवड लेइल्या पायीं । पायींचीं पोल्हारे कानीं वो बाई । वाळे वाक्या बांधिल्या कंठाचे ठायीं । लाहे लाहे नेपुरें बांधिली डोई ॥ ६ ॥ एकी त्या आलिया चोखणा शिरीं । नागवें शरीर नेणे सुंदरी । मोतियाचे हार नेसल्या नारी । पाटाऊ विसरल्या घरच्या घरां ॥ ७ ॥ एकी त्या अर्धांगी लेइल्या चोळी । गुढगिया बांधिली मोतिया जाळी । नाकींचे मुक्ताफळ खोविती भाळीं । देह गेह नाठवे कृष्ण स्नेहाळी ॥ ८ ॥ एकी त्या कडीये घेतिल्या झारी । बाळकें विसरल्या घरींच्याघरीं । दृष्टीं सम दृश्य न दिसे नारी । पुत्र स्नेहें नाठवे देखोनी हरी ॥ ९ ॥ रंगीं रंगल्या आल्हादें भारी । आपपर नाठवे तया सुंदरी । एका जनार्दनीं वेधल्या नारी । परतोनी संसारा नुरेची उरी ॥ १० ॥

## गोकुळवासी जनांचें शांतवन करण्याविषयीं श्रीकृष्णाची उद्धवास आज्ञा.

२६६ उद्धवासी एकांतीं बोले गुज सांवळा । गोकुळासी जाऊनी बोधीं सुंदरी गोपीबाळा । रथीं बैसोनी निघाला वेगीं पावला गोकुळां । तो उद्धव देखोनी दृष्टी गोपींनीं वेढिला ॥ १ ॥ उद्धवा जाय मथुरेला । आणी लौकरी हरीला ॥ धृ. ॥ मुख सुंदर शोभे कपाळीं टिळक रेखिला । नवरत्नजडित मुद्रिका हार कंठीं घातिला । झळकती कुंडलें कानीं शिरीं मुगूट शोभला । मुरली धरुनी अधरीं नाचे यमुना तीरीं देखिला ॥२॥ मथुरेसी राहिला हरी विसरोनी आम्हांसी । कुब्जेनें मोहिला भाळला तिच्या रूपासी । डोळे पिचके खुरडत जे चाले काय वानूं सूखासी । शुद्ध भाव देखोनी तिचा अनुसरला तियेसी ॥ ३ ॥ रासमंडळी नाचे मुरारी कधीं भेटेल तो न कळे । वेणू वाजवी सुस्वर सोज्वळ पदकमळें । धणी न पुरे तया पाहतां

मन आमुचें वेधिलें ॥४॥ हा अक्रूर कोठोन आला हरी गेला घेउनी । तो वियोग जाळी न जाय जीव आमुचा अझुनी । घरदार सोडोनी जावें गोकुळ हें सांडोनी । उद्धवा कधीं भेटविसी हरीला आणुनी ॥५॥ घडी घडी घरां येतो चोरितो श्रीहरी । तो झडकरी दाखवीं उद्धवा लौकरी । धन्य प्रेम तयाचें सद्गदित अंतरीं । एका जनार्दनीं हरिरूपीं वेधल्या नारी ॥६॥

## कंसाच्या कपटरूपी राक्षसांचा वध, उग्रसेन राज्यस्थापना व वसुदेवदेवकी बंधमुक्तता.

२६७ कपटें पयपानसी । मोहें मोहन राशी । विषय विष स्तनासी । देवों आली ॥ १ ॥ तंव तो सावध निजमुखीं । जिवासहित शोखी । सायुज्याच्या समसुखीं । समाधान वा ॥ २ ॥ स्वरूपीं घडोघडीं । म्हणे वापा सोडीं । कृष्णमुखीं कुडी । सरती झाली वा ॥ ३ ॥ योगियां न कळे चित्तीं । सिद्धा दुर्लभ प्राप्ती । अंतीं कृष्णमूर्ती । हृदयावरी वा ॥ ४ ॥ पाजूं आली विष । तियेसी परमसुख । कृष्णभजनीं दुःख । कवणा नाहीं वा ॥ ५ ॥ भक्ता परम प्राप्ती । द्वेषियां तेचि गती । एका जनार्दनीं प्रीती । वैरियां चाऱ्ही मुक्ती वा ॥ ६ ॥

२६८ निज पैसा समरसें । गोकुळा आली द्वेषें । कृष्णामुखीं विषें । निर्विष जाली ॥१॥ सोडीं सोडीं वा कान्हा । आक्रंदे पूतना । मागुती जनार्दना । मी न ये येथें ॥२॥ कृष्ण स्वानंदाचा कंद । कंसारी विरोधु । विषय विषा पाजुं । पूतना आली ॥३॥ मी म्हणे बाळ तान्हें । त्वां शोषिलें जीवें प्राणें । मागुतें येणें जाणें । खुंटलें वापा ॥४॥ ऐसा कैसा रे हासी । मी तुझी रे माउशी । परतोनि गोकुळासी । मी नये वापा ॥ ५ ॥ ऐसा कैसा बाळ । माझ्या शोखिल्या जीवनकळा । येशोदा वेल्हाळा । वांचली कैसी वा ॥६॥ एका जनार्दना । द्वेषाच्या भावना । सायुज्यसदना । अरि वैरी ॥७॥

२६९ अहं तृणावर्त बळी । प्रवेशला गोकुळीं । मोहममतेची राहाटोळी । भवंडीतसे ॥ १ ॥ रज उधळले तेणें बळें । झाकोळले बुद्धीचे डोळे । कृष्ण आहे नाहीं हें न कळे । सकळिकांसी हो ॥२॥ श्रद्धा यशोदा म्हणे । माझा कृष्ण नेला कोणें । न दिसे रजोगुणें । माये काय करूं वो ॥३॥ कैसें निबीड दाटलें रज । मीचि न देखें मज । तेथें कृष्ण सोय निज । कवण दावी ॥४॥ तळमळिताहे मन । गेलें निधान । संतां सोय सविघ्न । बाधीना वा ॥५॥ बाळ सांवळें देखोनियां दिठीं । आला धांवोनि उठाउठीं । कृष्णें घातली मिठी । अद्वैतपणें ॥६॥ वेगें नेला गगनावरी । कृष्णाची गगनभरी । यावया जावया तिळभरी । वावो नाहीं वा ॥७॥ जडला कृष्ण अंगीं । कृष्णाचि जाला वेगीं । द्वैतभाव भंगीं । गेला त्याचा ॥८॥ संकल्प विकल्प पांख । उपडिले दोन्ही देख । येणें जाणें निःशेष । खुंटलें त्याचें ॥९॥ कृष्णकरणी हें दुर्घट । आली भुलविली वाट । जिवनीं जेवीं मीठ । विरोनि जाय ॥ १० ॥ तृणावर्ता आवर्तु । भवंडी कृष्णनाथु । करणें देहा घातु । करुनी ठेला ॥११॥ पाहतां वेदविधी । द्वैत दुष्टबुद्धि । एका जनार्दनीं । बैसाविली निजपदीं ॥१२॥

२७० गोकुळींचा कान्हा अवतरला तान्हा । प्रथम पूतना शोषियेली ॥ १ ॥ जन्मला वोखट घालूं आला वीट । पिठें महाबळभट पिटविला ॥ २ ॥ वारा वाजे थोर सुटला आवर्तु । कृष्णें तृणावर्तु मर्दियेला ॥ ३ ॥ पाय हाणोनिया मोडिला शकटु । कृष्ण अलगटु देवकीचा ॥ ४ ॥ मृत्तिका खादली वारितां पैं देख । उदरीं तिन्ही लोक दाखविले ॥ ५ ॥ दहीं दूध चोरी आली बा मुरारी । माया दावें वरी बांधितसे ॥ ६ ॥ नऊ लक्ष गोप न पुरती उदरा । माया दामोदरा बांधीतसे ॥७॥ दावा दामोदरु बांधिला मायेनें । विमलार्जुन दोन्ही उद्धरिले ॥ ८ ॥ वत्साचेनि रूपें आला पैं असुर । झाडीं वत्सासुर झोडियेला ॥ ९ ॥ ध्यानस्थाचें परी बैसलासे तीरीं । बका दोन्ही चिरी केल्या कृष्णें ॥१०॥ चेंडु वाचे मिसें नाथिला काळिया । फणीरंगीं कान्हया नृत्य करी ॥ ११ ॥ इंद्रा मान हरी गोवर्धन करीं । धरोनि श्रीहरी वज्र राखे ॥ १२ ॥ ताडफळासाठीं धेनुक उठिला । कृष्णें निवटिला क्षणमात्रें ॥ १३ ॥ वणवा गिळिला राखिले गोपाळ । संतोषें सकळ नाचताती ॥ १४ ॥ गोपाळ वासुरें अघासुर गिळी । कृष्णें दोन्ही केली पाहिल्या ऐसीं ॥ १५ ॥ वत्स वत्सपाळ नेले सत्य लोकां । अवघीं कृष्ण देखा होऊनि ठेला ॥ १६ ॥ वळितां गोधनें गोपाळांशीं खेळे । पाहतां निवती डोळे गोपिकांचे ॥ १७ ॥ शरदृतु शोभा शोभली रजनी । कृष्ण वृंदावनीं वेणु वाहे ॥ १८ ॥ वेणुनादध्वनी वेधिल्या कामिनी । कृष्णनादें हरिणी दीपयेल्या ॥ १९ ॥ गोपीप्रती गोपी कृष्ण एक एकू । सहस्रघटीं अर्कू नसोनि दिसे ॥ २० ॥ वेणुनाद ध्वनि

वेधिल्या गोपिका। रंगीं त्या मायिका नाचविल्या ॥२१॥ अरिष्टा अरिष्ट झाला कृष्णनाथु। केशिया आघातु केला तेणें ॥ २२ ॥ गोकुळीं दैत्यासी केला आडदरा। थोर कंसासुरा धाक पडे ॥ २३ ॥ गोकुळा अक्रूर पाठविला रागें। म्हणे आणी वेगें रामकृष्णा ॥ २४ ॥ भाग्य भाग माझा कंसाचिया काजा। वैकुंठीचा राजा देखेन आजीं ॥ २५ ॥ गाईचे रे खूर विष्णुपदांकित। पृथ्वी शोभत अक्रूर देखे ॥ २६ ॥ ध्वजवज्रांकुश कुंकुमांकित पदें। अक्रूर आनंदें डोलतसे ॥ २७ ॥ तृणतरुवरां घाली लोटांगण। पुढती कृष्णचरण कैं देखेन॥२८॥ पावला गोकुळां तंव वैकुंठ थोकडें। व्रज तेणें पाडें कृष्णमुखें ॥ २९ ॥ देखोनियां कृष्ण विसरलां आपणां। अक्रूर श्रीकृष्ण चरणीं लोळे ॥ ३० ॥ जाणोनि त्याचा भावो वेगीं निघे देवो। चला मथुरा पाहों आजीं आम्ही ॥ ३१ ॥ व्रजीच्या अंगना करिताती रुदना। मागुता कैं कान्हा देखों आतां ॥ ३२ ॥ रथारूढ हरी पाहाती नरनारी। यमुना परतीरीं उतरले ॥ ३३ ॥ मारुनी रजक घेतलीं लुगडीं। गोपाळ आवडी श्रृंगारिले ॥ ३४॥ पाटाउ परिकर नेसले पितांबर। कासे मनोहर नाना मेचु ॥ ३५ ॥ अक्रूरें जाउनी कंसा आणविलें। मथुरेसी आले रामकृष्ण ॥ ३६ ॥ ऐसें ऐकोनी कंस दचकला मनीं। सर्व रूप नयनीं कृष्ण देखे ॥ ३७ ॥ चंदन कचोळा भेटली कुब्जा। वैकुंठीचा राजा चार्चियेला ॥ ३८ ॥ कुब्जा म्हणे हरि चला माझे घरीं। सुमनेंही वरी श्रृंगारिलीं ॥ ३९ ॥ हातीं धरोनी बरी ते केली साजिरी। कंस भेटीवरी येईन घरां ॥४०॥ माळियें सुमनें श्रृंगारिला हरी। वैकुंठ पायरीं केली तया ॥ ४१ ॥ मुक्त मुमुक्ष विषयीं हे लोक। पाहाती कौतुक कृष्णलीला ॥ ४२ ॥ मथुरे चोहाटाचा वालिला राजवाटा। ठाकिला दारवंटा धनुर्याग ॥ ४३ ॥ तेथें अतिबळें कुवलया उन्मत्त। पेली महावतु कृष्णावरी ॥ ४४ ॥ त्यासी हाणोनियां लात उपडिले दोन्ही दांत। घायें महावात मुक्त केलें ॥ ४५ ॥ यागीचें कोदंड ते केलें दुखंड। बळी ते प्रचंड रामकृष्ण ॥ ४६ ॥ घेऊनि गजदंत पावले त्वरित। मारिले अमित वीर कृष्णें ॥४७॥ न धरत पै वेगीं आला मल्लरंगीं। कंस तो तवकीं चाकाटला ॥ ४८ ॥ माल मल्लखडा करीतसे रगडा। कृष्ण तो निधडा एकपणें ॥४९॥ मुष्टीक चाणूर घायें केला घातु। कोपला अनंतु कंस पाहे ॥ ५० ॥ चाणूर मुष्टीक हातें निवटिले। दैत्य धुमसिले अनुक्रमें ॥ ५१ ॥ रणीं रणरगडा अखुड्याचा सडा। कृष्ण कंसा कडा उठावला ॥ ५२ ॥ न लगतां घायें धाकें सांडी देहो। मथुरे केला रावो उग्रसेन ॥ ५३ ॥ सोडिलीं पितरें तोडिलीं बंधनें। एका जनार्दनें मुक्त केलीं ॥ ५४ ॥

२७१ जो साक्षात् परब्रह्म। करूं निघाला चोरीकर्म। धरूनी बाळलीला संभ्रम। आवडी परम नवनीताची ॥ १ ॥ सवें नवलक्ष सवंगडे। पशुपाल वेडे बागडे। सुदामा बोले बोबडें। ते आवडे गोविंदा ॥ २ ॥ थोगला अत्यंत वांकुडा। जो निजाचा निजगडा। कृष्ण गुज सांगे त्या पुढां। होई गाढा चोरीकर्मा ॥ ३ ॥ घ्या रे सामुग्री चोखट। खडे सराटे निकट। माजीं बांधारे बळकट। शब्द कांहीं करूं नका ॥ ४ ॥ वस्त्र गाळिव मृत्तिका। घेउनी प्रवेशतां शंकूं नका। सकळ गृहींचा आवांका। मज ठाऊक समाचार ॥ ५ ॥ गोपाळ म्हणती चक्रपाणी। चोरीकर्म ऐकिलें श्रवणीं। परी खडे सराटे मृत्तिका घेउनी। न देखो कोणीहि रिगाले ॥ ६ ॥ कृष्ण म्हणे ऐका निघाडे। रचिताती पात्रांचे उतरंडे। पाहतां न दिसती दृष्टीपुढें। जैं अंधार पडे रजनीचा ॥ ७ ॥ भीतरी प्रवेशोनी एकीकडे। सव्य अपसव्य टाकावे खडे। पात्रीं नाद उमटती धडाडे। जाउनी रोकडे आणावे ॥ ८ ॥ शिंकीं लांबविलीं अंतराळीं। काठी टोंचुनी पाडावी दुळी। धार लागेल मोकळी मिळोनी सकळीं प्राशन करा ॥ ९ ॥ साचल ऐकतील गौळणी। कवाडें धरतील धांवोनी। सराटे पसरा आंगणीं। पायीं चुंबकोनि गुंतती ॥ १० ॥ तेहि चुकवोनि येती अबला। तरी मृत्तिका घाला त्यांचे डोळां। नेत्र चोळतील तंव तुम्ही पळा। नवलकळा सांगितली ॥ ११ ॥ हांसें आलें कृष्णांतरीं। मग प्रवेशले घरोघरीं। कवाडें उघडोनि भीतरीं। अंतरीं प्रवेशले ॥ १२ ॥ हळूंहळूं ठेविती पाउलें। तंव गर्जती वांकीया वाळे। जन ऐकतील म्हणोनि गोपाळें। कर्णीं अंगोळी घातली ॥१३॥ कृष्ण नायके तंव जग बधीर। कृष्ण न देखे तंव अंध जगत्रय। कृष्ण न चाले तंव पांगुळ सर्वत्र। चालक सर्व श्रीकृष्ण ॥ १४ ॥ सांचलें दहींपात्रें काढिती। थिजलें घृत करीं घेती। कांहीं भाक्षिती कांहीं खाती। तोंडा माखिती निजल्यांच्या ॥ १५ ॥ एकापुढें एक धांवती। एक एकाचें लोणी हिरोनी घेती। एक एकातें झोंबती। वांटा मागती चिम-

टोनी ॥ १६ ॥ देखोनीं नवनीताचीं भांडीं । पेंदा नाचे दुपांडीं । उगा पोरा म्हणोनी धरी शेंडी । गोळा तोंडीं लाविला ॥ १७ ॥ शिंकें उंच न पावे कर । काठी टोचोनी पाडिलें छिद्र । कृष्ण निजमुखीं लावी धार । देखोनी गोपाळ गजबजिले ॥ १८ ॥ गोपाळ म्हणती कृष्णासी । जाई बा सकळ दूधतुपेंसी । येरु म्हणे लागा रे कोपराशी । घ्या रे सावकाशी दोहींकडे ॥ १९ ॥ तंव वांकुड्यानें केली टवाळी । टांचें तुडवोनि पोरें उठविलीं । ती मातेसी बोभाईली । तंव वत्सें सोडिलीं वडजानें ॥ २० ॥ वत्सें करिती स्तनपान । बाळकें करिती रुदन । गोपी उठल्या गजबजोन । तंव नवनीतें वदन माखलें ॥ २१ ॥ वृद्धा सांडोनि शेजेसी । उठतां देखिलें सुनेसी । सासू देखतां तोंड पुसीं । येउनी केशी धरियेली ॥ २२ ॥ तूंचि भक्षिसी नवनीत । आणि दुसऱ्याचें नांव सांगत । ऐशा सासु सुना भांडत । आपण तेथोनी निघाले ॥ २३ ॥ मग पळाले सकळ । दुजे गृहीं प्रवेशले गोपाळ । गौळणी निद्रे व्यापिल्या सकळ । टवाळी नवल मांडियेली ॥ २४ ॥ शिंकीं लांबविलीं दुरी । यत्न करिती परी न येती करीं । मग वेंघोनी एक एकाच्या खांद्यावरी । उतरती दहींपात्रें ॥ २५ ॥ उतरंडी दुरी लाविल्या न कळती । सव्य अपसव्य खडे टाकिती । पात्रीं लागतां नाद उठती । तेंचि घेउनी येती हरिपाशीं ॥ २६ ॥ सुखसेजे गोपी बाळी । निद्रिस्त देखोनि अंबरें फेडिलीं । तरुण देखोनी मुली । टवाळी थोर मांडिली ॥ २७ ॥ तंव गजबजोनी सुंदरा । एके करें सांवरी चिरा । जाउनी धरी मधलीया द्वारा । सकळ चोरां कोंडिलें ॥ २८ ॥ तंव पुढें देखोनी वनमाळी । म्हणे भला रे सांपडलासी ये वेळा । तंव धरूं धांवे वेल्हाळी । नयनीं गुरळी घातली ॥ २९ ॥ नेत्र चोळी व्रजकामिनी । आपण तिचा हात धरुनी । गोपाळातें खुणवोनी । सकळ तेथोनी पळाले ॥ ३० ॥ येरी धांवे पाठोपाठ । तंव पायीं चुबकले सराटे । वाम करीं धरूनि बोटें । बैसे गुंतोनी धरणीवरी ॥ ३१ ॥ तंव दुसरी धांवली गोपिका । तिच्या नयनीं घातली मृत्तिका । नेत्र चोळीत अधोमुखा । देखोनि यदुनायक हांसतसे ॥ ३२ ॥ मग चोरीकर्म सोडोनि । सकळ प्रवेशले सदनीं । प्रातःकाळ झालिया गौळणी । गाऱ्हाणां सांगों आलिया ॥ ३३ ॥ यशोदे म्हणती सकळां । तुझिया पुत्राची नवलकळा । कानीं न ऐकिली न देखों डोळां । सुना सकळां विटंबिल्या ॥ ३४ ॥ एक म्हणती यशोदे सुंदरे । तुझी गांवची वस्ती पुरे । उठवितो निजलीं पोरें । फेडी चिरें करी नग्न ॥ ३५ ॥ खालीं ठेवोनि नवनीत । मांजरामुखीं चाटवीत । आपण खदखदां हांसत । ऐसें विटंबित नानापरी ॥ ३६ ॥ एक म्हणे गौळणी । माझें भक्षिलें क्षीर लोणी । उच्छिष्ट मुखासी लावोनी । आपण तेथोनि पळाला ॥ ३७ ॥ एक म्हणे माझीं सोडिलीं वासुरें । उठविलीं निजलीं पोरें । शिंकीं तोडिलीं एकसरें । फोडिल्या त्वरें माथणी ॥ ३८ ॥ गोपिकांसी बुझवितें सुमती । म्हणे निर्गुणासी गुण लाविती । तुमचें खादलें किती निश्चिती । सांगा तितुकें देईन ॥ ३९ ॥ किती भक्षिलें रे गोविंदा । तंव कृष्णापुढें आली राधा । तिचे स्तन धरून हांसे गदगदां । म्हणे येवढा मुद्दा होता तिचा ॥ ४० ॥ हांसों आलें राधिकेसी । गौळणी गेल्या घरासी । यशोदा म्हणे कृष्णासी । सोडी वेगेंसी गोधनें ॥ ४१ ॥ जो वेदांसी अगोचर । श्रुतीसी न कळे ज्याचा पार । वर्णितां श्रमला फणीवर । तो गुण गंभीर श्रीकृष्ण ॥ ४२ ॥ माथां मुगुट तेजःपुंज । नयन श्रवणीं सांगे गुज । ललाटीं कस्तुरी वोज । तळपे तेज तळवीया ॥ ४३ ॥ वैजयंती वनमाळा । सुरंग गुंजाहार गळां । कंठीं मिरवे मेखळा । झळके कळा कौस्तुभाची ॥ ४४ ॥ मुगुटा सुमनें वेष्टिलीं । मयूरपिच्छें शिरीं खोविलीं । मग चालिले तये वेळीं । जाळीं पृष्ठीवरी टाकिलीं ॥ ४५ ॥ काळी कांबळी खांद्यावरी । कासे खोविली शृंग मोहरी । जाला नंदाचा खिलारी । हांकिली झडकरी गोधनें ॥ ४६ ॥ बळिराम राजीवनयनु । अलंकारमंडित शुद्ध तनु । चालिले गोपाळ घेऊनी धेनु । दोघे बाळ नंदाचे ॥ ४७ ॥ सवें नव लक्ष सवंगडे । पशुपाळ वेडेबागडे । गोरज उधळले चहूंकडे । पावले थडीं यमुनेच्या ॥ ४८ ॥ गाई सोडिल्या सैरावैरा । भ्रमती सुखें खाती चारा । वडज्या म्हणे पेंद्या पोरा । आणी सत्वर पळसपत्रें ॥ ४९ ॥ मथुरेचें मीष करुनी । हाटा निघालिया गौळणी । माथां दहीं दूध घृत लोणी । त्यामाजीं मुख्य राधा ॥ ५० ॥ गगन गर्जे वाक्या वाळे । घनदाट चालती उतावेळे । मनीं इच्छिती कृष्णसोहळे । तंव दाविलें वडज्यानें ॥ ५१ ॥ टाळी पिटोनी उठ वोज । म्हणे कृष्ण आलें खाजें । धांवोनी आला गोपीसमाजे । उभ्या थोकविल्या

गौळणी ॥ ५२ ॥ तंव वडज्या करी झगडा । एकसरें धांवला वांकुडा । पात्रें फोडिलीं कडाडा । धरुनी रोकड्या आणिल्या ॥ ५३ ॥ कृष्णें राधा धरली करीं। एका करें लोणी चोरी । एका करें फेडी निरी । एका करें कंचुकी ॥ ५४ ॥ हांसों आले राधिकेसी । सोडी गोवळ्या सलगी कायसी । भुलली कृष्णरूपा झाली पिसी । लोणी पुसी कृष्णमुखा ॥ ५५ ॥ ऐसा विनोद विचित्र केला । करीतसे घननीळ सांवळा । घ्या रे आतां सामुग्री चला । अति क्षुधा लागली ॥ ५६ ॥ पाहुनी कल्पतरूची छाया । घडिया घालिती बैसावया । बैस म्हणती यदुराया । करूं काला आवडीं ॥ ५७ ॥ पेंदा घाली पत्रावळी । वडज्या सोडी मोटा जाळीं । वांकुडा बैसवी गोपाळमंडळी । वाढिताती पत्रशोखा ॥ ५८ ॥ नानापरींचीं पक्वान्नें । षड्रस बहुत अन्नें । गोडी सांगतां अनन्यें । पसरती पदर इंद्रादिकीं ॥ ५९ ॥ सकळां वाढिलें परिपूर्ण । सकळ म्हणती ब्रह्मार्पण । संतांसी कळली खूण । घालिती ग्रास कृष्णमुखीं ॥ ६० ॥ तंव जेवितां केली टवाळी । कृष्णापुढें होती गूळपोळी । ती उचलोनी पत्रावळी । न राहे जवळी दुरी गेला ॥ ६१ ॥ वाकुल्या दावी कृष्णापुढां । नेत्रा खुणावितसे गाढा । वाकुड्यातें हाणोनी थोबाडा । धरुनी रोकडा आणिला ॥ ६२ ॥ धरिली वांकुड्याची शेंडी । उच्छीष्ट घाली तया तोंडीं । पेंदा नाचे दुपांडीं । थोंगला गडी सांपडला ॥ ६३ ॥ सरलें पुढलें पक्वान्न । कृष्णें आणिलें दध्योदन । मग पेंदा म्हणे आपण । कृष्णासी दें ॥ ६४ ॥ आवड वडज्याची थोरी । पेंदा म्हणे टाका दुरी । कां टाकितां म्हणोनी रुदन करी । बुझावी श्रीहरी स्वानंदें ॥ ६५ ॥ एकासी दाउनी शेखीं । घालितो दुसऱ्याचे मुखीं । कां रे पोरें म्हणोनी तवकी । डोळे रोखी वांकुडा ॥ ६६ ॥ ऐसे खेळती सकळ मिळोनी । तंव देव पहाती विमानीं । वंचलों म्हणती अभिमानी । कृष्णशेष न मिळेची ॥ ६७ ॥ नोहे श्रीकृष्णाची शेषप्राप्ती । मग एकमेकांसी बोलती । गोपाळ यमुनेतीरां येती । चला शीघ्र गती जाऊं तेथें ॥ ६८ ॥ विमानें ठेवोनी अंतराळीं । कृष्ण शेषालागीं ते वेळीं । देवी मत्स्यरूपें धरलीं । यमुनेमाजीं रिगती ॥ ६९ ॥ ब्रह्मादिक मत्स्य जाले । हें श्रीकृष्णासी कळलें । जाणोनी गोपाळां बोले । म्हणे हात धुवूं नका ॥ ७० ॥ सहज उदकाची वाटाळी । अकर्मकार गोवळी । हात पुसिले कांबळी । एक टिरीसीं पुसती ॥ ७१ ॥ उठले वांगडीया झाडोनी । खेळ खेळत आले वृंदावनीं । तुळशी प्रदक्षिणा करुनी । खोविल्या शिरीं मंजुरीया ॥ ७२ ॥ तंव इतक्यांत लोपला माध्यान्ह । अस्तमान गेला दिनमान । श्रीकृष्ण म्हणे वचन । चला जाऊं घराप्रती ॥ ७३ ॥ देहुडा उभा राहुनी । गायी खुणविल्या वेणुध्वनी । टवकारिल्या चारा विसरुनी । आल्या मुरडोनी त्वरित ॥ ७४ ॥ गाई मेळविल्या हरी । गोपाळ घालती हुंबरी । डांगा झलिती अंबरीं । पांवे मोहरी वाजविता ॥ ७५ ॥ सुदामा जाला वेत्रधारी । ऐसे गोपाळ गजरीं । चालिले मग झडकरी । पेंदा धरी छत्र तरूचें ॥ ७६ ॥ वडजा घेऊनि अशोक डाहाळी । वारीतसे मुखावरील धुळी । वांकुडा फोडी कौतुकें आरोळी । ग्रामाजवळी पातले ॥ ७७ ॥ रामकृष्ण आले एकोनी । उतावीळ झाल्या गौळणी । रांगोळ्या नानापरी आंगणीं । घालिताती सप्रेमें ॥ ७८ ॥ नव लक्ष आरत्या करीं । घेऊनि उभ्या गोपिका नारी । भावें ओंवाळिला श्रीहरी । लोण उतरी यशोदा ॥ ७९ ॥ गाई निघाल्या गोठणी । गोपाळ गेले आज्ञा घेउनी । आपण प्रवेशले निजभुवनीं । सिंहासनीं बैसले ॥ ८० ॥ ऐसा बालक्रीडेचा सोहळा । आनंद जाहला सकळां । एका जनार्दनीं देखिला । श्रीबालक्रीडा संपविली ॥ ८१ ॥

## श्रीकृष्णमाहात्म्य.

२७२ ॐकारा परतें निर्गुणा आरुतें । भक्तांसी निरुतें गोकुळीं वसे ॥ १ ॥ सांवळें सगुण चैतन्य परिपूर्ण । सावंगडियांसी जाण क्रीडा करी ॥ २ ॥ आदि मध्य अंत न कळे ज्या रूपाचा । तोचि बाळ नंदाचा म्हणताती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेगळाचि पाहीं । हृदयीं धरुनी राहीं सांवळियासी ॥ ४ ॥

२७३ सांवळा श्रीकृष्ण राखितो गाई । वेधियेलें मन आमुचें तें पायीं ॥ १ ॥ नवल लाघव न कळे ब्रह्मादिकां । वेदश्रुती शिणल्या ठक पडलें सकळिकां ॥ २ ॥ साही दरुशनें वेडावलीं जयासाठीं । खांदीं घेऊनी कांबळा गोधन राखी जगजेठी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ब्रह्म गोकुळीं उघडें । पाहतां पाहतां चित्त तेथें वेधलें ॥ ४ ॥

२७४ निर्गुण सगुण श्रुतीसी वेगळें । तें रूप सांवळें गोकुळीं वसे ॥ १ ॥ डोळियांची धणी पाहतां न पुरे ।

तयालागीं झुरे चित्त माझें ॥ २ ॥ वेडावलीं दरुशनें भांडती अखंड । वेदांसी तें तोंड स्तब्ध जाहलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांवळें सगुण । खेळतसे जाण वृंदावनीं ॥ ४ ॥

२७५ ब्रह्मादिकां न कळे तें रूप सुंदर । गोकुळीं परिकर नंदाघरीं ॥ १ ॥ रांगणा रांगतु बाळलीला खेळतु । दुडदुडां धांवतु गायींपाठीं ॥ २ ॥ गौळणींचे घरीं चोरूनि लोणी खाय । पिलंगतां जाये हातीं न लगे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं त्रैलोक्या व्यापक । गाई राखे कौतुक गौळियांसी ॥ ४ ॥

२७६ जाणते नेणते होतु ब्रह्मज्ञानी । तयांचे तो ध्यानीं नातुडेची ॥ १ ॥ सुलभ सोपारा गोकुळामाझारीं । घरोघरीं चोरी खाय लोणी ॥ २ ॥ न कळे ब्रह्मादिकां करितां लाघव । योगियांची धांव खुंटे जेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चेंडुवाचे मिसें । उडी घालितसे डोहामाजीं ॥ ४ ॥

२७७ विश्वाचा व्यापक विश्वंभर साक्षी । नये अनुमानासी वेदशास्त्रां ॥ १ ॥ नवल गे माय नवल गे माय । चोरूनियां खाय नवनीत ॥ २ ॥ धरिती वांधती गौळणी बाळा । वोढोनि सकळां आणिताती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं येतो काकुलती । न कळे ज्याची गति वेदशास्त्रां ॥ ४ ॥

२७८ *** हा अभंग पान ४९ वर कॉलम १ च्या सुरवातीस पहा.

२७९ मिळती सकळां गौळणी ते बाळा । लक्ष लाविती डोळां कृष्णमुखा ॥ १ ॥ धन्य प्रेम तयांचें काय वानूं वाचें । न कळे पुण्य त्यांचें आगमनिगमां ॥ २ ॥ आदरें गृहा नेती मुख पैं धुताती । जेवूं पैं घालिती दहींभात ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रेमाची पैं लाठी । धांवुनी इठी मिठी घेतो वळें ॥ ४ ॥

२८० पाहुनी कृष्णासी आनंद मानसीं । प्रेमभरित अहर्निशीं कृष्णनामें ॥ १ ॥ आजीं कां वो कृष्ण आला नाहीं घरां । करती वेरझारा नंदगृहीं ॥ २ ॥ भलतीया मिसें जातीं त्या घरासी । पाहतां कृष्णासी समाधान ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेधल्या गौळणी । तटस्थ त्या ध्यानीं कृष्णाचिया ॥ ४ ॥

२८१ वेधल्या त्या गोपी नाठवे आपपर । कृष्णमय शरीर वृत्ति जाहली ॥ १ ॥ नाठवे भावना देह गेह कांहीं । आपपर त्याही विसरल्या ॥ २ ॥ एका जनार्दनीं व्यापला हृदयीं । बाहेर मिरवी दृष्टिभरित ॥ ३ ॥

२८२ जगाचें जीवन ब्रह्म परिपूर्ण । जनीं जनार्दन व्यापक तो ॥ १ ॥ तो हरी गोकुळीं रांगणा नंदाघरीं । गौळणी त्या सुंदरी खेळविती ॥ २ ॥ वेद गीतीं गाती शास्त्रें विवादती । खुंटलीसे मति शेषादिकांची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चहूं वाचांपरता । उच्छिष्ट सर्वथा भक्षी सुखें ॥ ४ ॥

२८३ परब्रह्म सगुण असे परात्पर । वेदादिकां पार न कळे ज्याचा ॥ १ ॥ पाहतां पाहतां वेधलेंसे मन । नये अनुमोदन शास्त्रादिकां ॥ २ ॥ एका जनार्दनीं व्यापुनी वेगळा । त्यासी गौळणी बाळा झकविती ॥ ३ ॥

२८४ आकार निराकार विश्वरूपाचा ॐकार । तो हा सर्वेश्वर बाळरूपें ॥ १ ॥ रांगणारांगतु हळूच पिलंगतु । आनंदभरितु नंदराय ॥ २ ॥ अंगणा धांवतु सर्वांचि वेगतु । अचोज दावितु भक्तालागीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नित्य निरामय । न कळे वो माय काय वोलूं ॥ ४ ॥

२८५ चहूं वाचांपरता चहूं वेदां निरुता । न कळे तत्त्वतां चतुर्वक्त्रा ॥ १ ॥ चौवारा खेळतु सौंगडी सांगातु । लोणी चोरूं जातु घरोघरीं ॥ २ ॥ चौसष्टा वेगळा चौदांसी निराळा । अगम्य ज्याची लीळा सनकादिकां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चहूं देहांवेगळा । संपुष्टीं आगळा भरला देव ॥ ४ ॥

२८६ लक्षांचें जें लक्ष तो दिसे अलक्ष । तो असे प्रत्यक्ष नंदाघरीं ॥ १ ॥ बाळरूप गोजिरें वाळे वांकी साजिरें । पाहतां दृष्टीचे पुरे कोड सर्व ॥ २ ॥ ध्यानाचें निज ध्यान मनाचें अधिष्ठान । व्यापक विधान महेशाचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शब्दासी नातुडे । गौळणी वाडेंकोडें जेवविती ॥ ४ ॥

२८७ अबोलणें बोल कुंठीत पैं जाहलें । तें निधान देखिलें नंदाघरीं ॥ १ ॥ अधिष्ठान मूळ व्यापक सकळ । जगाचें तें कुळ कल्पद्रुम ॥ २ ॥ एका जनार्दनीं बिंबीं बिंबाकार । सर्वत्र श्रीधर परिपूर्ण ॥ ३ ॥

२८८ शेषादिक श्रमले न कळे ज्याचा पार । आगमांनिगमां निर्धार न कळेची ॥ १ ॥ तें हें बाळरूप यशोदे वोसंगा । पाहतां दोषभंगा जाती त्या ॥ २ ॥ करितसे चोरी खोडी नानापरी । यशोदा सुंदरी कोड वाटे ॥ ३ ॥ बांधिती गौळियां धांवोनी दाव्यानें । नका नका म्हणे दीनवाणी ॥ ४ ॥ त्रिभुवनासी ज्याचा धाक तो ब्रह्मांडीं । त्यासी म्हणती भांडी आला बाऊ ॥ ५ ॥ भिऊनियां

लपे यशोदे वोरंगा । ऐशा दावी सोंगा भाविकांसी ॥ ६ ॥ एका जनार्दनीं दाविती लाघव । ब्रह्मादिकां माव न कळे ज्याची ॥ ७ ॥

२८९ तिहीं त्रिभुवना ज्याची सत्ता वाहे । तो चोरी करिताहे घरोघरीं ॥ १ ॥ न कळे न कळे लाघव तयाचें । ब्रह्मादिक ऱ्हाचे वेडावती ॥ २ ॥ वेद शास्त्र श्रुती कुंठित पैं होती । तया गौळणी बांधिती धरूनियां ॥ ३ ॥ योग मुद्रा साधन योगी साधिताती । तयांसि नोहे प्राप्ति हेंचि रूप ॥ ४ ॥ तें बाळरूप घेऊनि वोसंगा । हालविती पैं गा बाळकृष्णा ॥ ५ ॥ जयाचेनि होय तृप्ति पैं सर्वांसी । तो मागे यशोदेसी दहींभात ॥ ६ ॥ दहींभात लोणी खाउनी न धाय । घरोघरीं जाय चोरावया ॥ ७ ॥ एका जनार्दनीं न कळे वैभव । दावितसे माव भोळ्या जनां ॥ ८ ॥

२९० राखितो गोधनें मनाचेनि मनें । न पुरे अघसरु धांवण्या धांवणें । कुंठित जाहली गति पवनाची तेणें । तो हा नंदाचा नंदन यशोदेचें तान्हें ॥ १ ॥ देखिला देखिला मंडित चतुर्भुज । वैकुंठीचा भूपती तेजःपुंज । पहातांचि तया नावडे कांहीं दुजें । ऐसें लाघव याचें सहज ॥ २ ॥ चित्त चैतन्य पडिली मिठी । कामिनी मनमोहना जगजेठी । तुझ्या वेधें ध्यानस्थ धुर्जटी । ऐसा गोवळु योगीयांसी नोहे भेटी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शब्दांवेगळा । आगमांनिगमां कांहीं न कळे लीळा । सोहं कोहं शब्दां वेगळा । पहा पहा परब्रह्म पुतळा ॥ ४ ॥

२९१ सानुले तानुले राम आणि कृष्ण । गोकुळीं विंदान दाविताती ॥ १ ॥ गाई राखिताती लोणी चोरिताती । अकळ खेळताती नानापरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं नये अनुमाना । ब्रह्मादिक चरणां वंदिताती ॥ ३ ॥

२९२ धन्य भाग्य गोकुळींचे राज्य । जेथें क्रीडा केली यादवराजें ॥१॥ काय तें धानूं सुख आनंदु । सुख संतोष गोकुळीं परमानंदु ॥ २ ॥ एका जनार्दनीं जगाचें जीवन । मूर्ति पाहतां दिसे सगुण निर्गुण ॥ ३ ॥

२९३ योगी शिणताती साधनकपाटीं । तया नोहे भेटी कांहीं केल्या ॥ १ ॥ तो हरी गोकुळीं बाळवेषें खेळे । पुरती सकळ मनोरथ ॥ २ ॥ गोपिका तयासी कडेवरी घेती । वालादुला म्हणती माझें माझें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जया जैसा हेत । तैसा पुरवीत देवराव ॥४॥

२९४ यशोदेचा हरी जाय यमुनातीरीं । वाजवितो मुरली पोवा नानापरी ॥ १ ॥ छंदें छंदें वाजे वृंदावनीं फुंजे । वेधलें मन माझें नाठवे कांहीं ॥ २ ॥ ऐसें येणें पिसें लाविलें गे माये । एका जनार्दनीं पाहिला यादवराय ॥ ३ ॥

२९५ रूपें सुंदर सांवळा गे माये । वेणू वाजवी वृंदावना गोधनें चारिताहे ॥ १ ॥ रुणझुण रुणझुण वाजवी वेणु । वेधीं वेधलें आमुचें तनमनु वो माये ॥ २ ॥ गोधनें चारी हातीं घेऊनि काठी । वैकुंठीचा सुकुमार गोपवेषें जगजेठी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भुलवी गौळणी । करिती तनुमनाची वोवाळणी वो माये ॥ ४ ॥

२९६ आदि नाटक सर्व व्यापक व्यापुनी निराळा । गोप गोधनें गौळणीयांसी लाविला चाळा ॥ १ ॥ मनमोहन कृष्ण यशोदेचा बाई । चोरी करी नानापरी धरितां न सांपडे बाई ॥ २ ॥ जयाचें विंदान न कळे ब्रह्मादिकां वो माये । ठकविलें देवां आपणचि काला खाये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा चौदेहां वेगळा । पुराणें वेडावलीं न कळे अगम्य ज्याची लीला गे माये ॥ ४ ॥

२९७ पांघुरला घोंगडें काळें । वृंदावनीं गोपाळांमाजीं खेळे । काला घाटीं निजांगें गोपाळ । खेळ खेळे नानापरी ॥ १ ॥ पाहतां देव बैसोनि विमानीं । ब्रह्मादिक ध्याती जया मनीं । आराध्यदैवत सनकादिकांचें हृदयभुवनीं । शिवादि पायवणी वंदिती ॥ २ ॥ नानापरी विटीदांडु चेंडू । हमामा हुमरी लगोऱ्या मांडु । नव लक्ष मिळाले सवंगडु । यमुनेथडीं कळंबातळीं ॥ ३ ॥ गोधनें ठाईं ठाईं बैसविलें । गोपाळ सवंगडे भोंवते शोभले । मध्यें घननीळ ते सांवळे । नंदरायाचें गोठुलें गे माये ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । पाहतां देहीं विरालें देहपण । संपूर्ण जनीं जनार्दन । पाहतां पाहतां गेलों भुलोन गे माये ॥ ५ ॥

२९८ चतुर्भुज शामसुंदर । गळां गुंजांचे हार । निढळीं चंदन शोभे परिकर । मिरवे नंदरायाचा किशोर ॥ १ ॥ हातीं काठी खांदां कांबळी । गाई राखे यमुनेचे पाबळी । नाचती गोपाळ धुमाळी । पुष्टी जाळी दहींभात ॥ २ ॥ जें निगमांचे ठेवणें । सनकसनंदाच घोसुलें येणें । शंभूचें आराध्यदैवत केणें । तें चारित गोधनें नंदाचीं ॥ ३ ॥ ऐसा अकळ नाकळे हरी । वेणू वाजवी छंदें नानापरी । एका जनार्दनीं गोपवेषें निर्धारीं । वांटी शिदोरी गोपाळां ॥ ४ ॥

२९९ खेळे कान्हा यमुनेचे तटीं । राखितो गोधनें घेउनी हातीं काठी ॥ १ ॥ पांघुरला घोंगडें रत्नजडित गे माये । नंदरायाचा खिल्लारी तो होये ॥ २ ॥ गोप गोधनें सवंगडे नानापरी । दहींभात काला वांटितो शिदोरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खेळे नानापरी । वेधोनि नेलें मन नाठवे निर्धारीं ॥ ४ ॥

३०० लाहे लाहे सोडीत गोधनें । भोंवतें गोपाळ वेष्टित तारांगणें । शोभला तो बाळवेषें परिपूर्ण । वेधु लाविला आम्हांसी तेणें वो ॥ १ ॥ छंदें छंदें वाजवितो वेणू । आमुचा गुंतला तेथें जीवप्राणू । नाठवे दुजा हेत कांहीं आनू । तो हा नंदनंदनु यशोदेचा ॥ २ ॥ खेळ खेळे यमुनेचे तटीं । सुकुमार सांवळा जगजेठी । खांदां घोंगडें शोभे हातीं काठी । गोपाळांसी वळत्या दे सये घाली मिठी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कळंवातळीं । मिळोनियां गोपाळमंडळी । काला मांडियेला मिळोनि सकळीं । लाहे लाहे वांटी शिदोरी ॥ ४ ॥

३०१ राखीत गोधनें भक्तांचिया काजा । उणीव सहजा येवो नेदी ॥ १ ॥ आपुलें थोरपण सारुनी परतें । भक्तांचें आरुतें काम करी ॥ २ ॥ उच्छिष्ट काढणें सारथ्य करणें । उच्छिष्ट तें खाणें तयांसवें ॥ ३ ॥ चुकतां वळती आपण बोळणें । एका जनार्दनीं पुण्य धन्य त्यांचें ॥ ४ ॥

३०२ नीच कामें न धरी लाज । धांवे देखोनि भक्तांचें काज । ऐसा सांवळा चतुर्भुज । रूप धरी गोजिरें ॥ १ ॥ उच्छिष्ट गोपाळांचें खाये । वळत्या त्यांचे देणें आहे । राखुनी गोधनें माय । मागें मागें हिंडतसे ॥ २ ॥ काला करी यमुनेतीरीं । स्वयें वांटितो शिदोरी । उच्छिष्टाची भारी । हाव अंगे स्वीकारी ॥ ३॥ ऐसा कृपेचा कोंवळा । उभा यमुनेचे पावळा । एका जनार्दनीं लीळा । अगम्य ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

३०३ न देखतां कृष्णवदन । उन्मळती तयांचे नयन । न घेती अन्नजीवन । कृष्णमुख न पाहतां ॥ १ ॥ कोठें गुंतला आमुचा कृष्ण । ऐशी जया आठवण । गायी हुंबरती अधोवदन । कृष्णमुख न पाहतां ॥ २ ॥ सवंगडे ठायीं ठायीं उभे । कृष्णीं दृष्टी ठेवुनी लोभें । आजीं कृष्ण कांहो नये । आम्हांशीं खेळावया ॥ ३ ॥ ऐशी जयांची आवडी । तयां पडा नेदी सांकडी । एका जनार्दनीं उडी । अंगे घाली आपण ॥ ४ ॥

३०४ सांवळा देखिला नंदाचा । तेणें आनंदाचा पूर आला ॥१॥ काळीं घोंगडी हातामध्यें काठी । चारितो यमुनातटीं गोधनें तो ॥ २ ॥ एका जनार्दनीं सांवळा श्रीकृष्ण । गौळणी तल्लीन पाहातां होती ॥३॥

३०५ पाहिला नंदाचा नंदन । तेणें वेधियलें मन ॥१॥ मोरमुकुट पितांबर । काळ्या घोंगडीचा भार ॥ २ ॥ गोधनें चारी आनंदें नाचत । करी काला दहींभात ॥३॥ एका जनार्दनीं लडीवाळ बाळ तान्हा । गोपाळांशीं कान्हा खेळे कुंजवना ॥४॥

३०६ जयाचें उदारपण काय वानूं । उपमेसी नये कल्पतरू कामधेनु । वेधीं वेधियेलें आमुचें मनु । तो हा देखिला सांवळा श्रीकृष्ण ॥१॥ मंजुळ मंजुळ वाजवी वेणू । श्रुतीशास्त्रां न कळे अनुमानु । जो हा परापश्यंती वेगळा वामनु । तया गोवळ म्हणती कान्हु ॥ २ ॥ रूप अरूपाशीं नाहीं ठाव । आगमांनिगमां न कळे वैभव । वेदशास्त्रांची निमाली हांव । एका जनार्दनीं देखिला स्वयमेव ॥३॥

३०७ गोकुळीं गोपाळांसवें खेळतसे देव । ऐका प्रेमभाव तयांचा तो ॥ १ ॥ गोधनें राखणें उच्छिष्ट खाणें । कालाहि करणें यमुनेतीरीं ॥ २ ॥ सवंगडियांचे मेळीं खेळ वनमाळी । घोंगडी ते काळी हातीं काठी ॥ ३ ॥ त्रैलोक्याचा धनी वाजवी मुरली । भुलवी गौळणी प्रेमभावें ॥ ४ ॥ घरोघरीं चोरी करितो आदरें । एका जनार्दनीं पुरे इच्छा त्यांची ॥ ५ ॥

३०८ त्यांचिया इच्छेसारखें करावें । त्यांच्या मागें जावे वनांतरीं ॥ १ ॥ वनासी जाऊनी नानापरी खेळे । हमामे हुतुतु वळें गडी घेती ॥ २ ॥ सर्वांघटीं संतां सर्वांवरिष्ठ देव । तयावरी डाव गडी घेती ॥ ३ ॥ अंगावरी डाव आला म्हणती गोपाळ । देई डाव सकळ आमुचा आम्हां ॥ ४ ॥ पाठीवरी बैसती देवातें म्हणती । वांकेर श्रीपती वेगीं आतां ॥ ५ ॥ एका जनार्दनीं गडियांचे मेळीं । खेळे वनमाळी मागें पुढें ॥ ६ ॥

३०९ मागें पुढें उभा हातीं घेउनी काठी । वळत्या धांवे पाठीं गाईमागें ॥१॥ गोपाळ बैसती आपण धांवे राणा । तयाच्या वासना पूर्ण करी ॥ २ ॥ वासना ते देवें जया दिली जैशी । पुरवावी तैसी ब्रीद साच ॥३॥ ब्रीद तें साच करावें आपुलें । म्हणोनियां खेळे गोपाळांत ॥ ४ ॥ एका जनार्दनीं खेळतो कान्हया । ब्रह्मादिकां माया न कळेची ज्याची ॥५॥

३१० तिहीं त्रिभुवनीं सत्ता जयाची । तो गोपाळांचे

उच्छिष्टें खाय ॥ १ ॥ खाउनी उच्छिष्ट तृप्तमय होय । यज्ञाकडे न पाहे वांकुडें तोंडें ॥२॥ ऐसा तो लाघव गोपाळांसी दावी । एका जनार्दनीं कांहीं कळों नेदी ॥३॥

३११ न कळे लाघव तयां मागें धांवे । तयाचें ऐकावें वचन देवें ॥१॥ देव तो अंकित भक्तजनावा । सदोदित साचा मागें धांवे ॥ २ ॥ गोपाळ आवडी म्हणती कान्हया । बैसे याची छाया सुखरूप ॥ ३ ॥ सुखरूप बैसे वैकुंठींचा राव । भक्ताचा मनोभाव जाणोनियां ॥ ४ ॥ जाणोनियां भाव पुरवी वासना । एका जनार्दना शरण जाऊं ॥ ५ ॥

३१२ भक्तांचा पुरवी लळा । तो सांवळा श्रीकृष्ण ॥ १ ॥ उचलिला पर्वतगिरी । नाथिला काळया यमुनेतीरीं ॥ २ ॥ अगबग केशिया असुर । मारिला तो कंसासुर ॥ ३ ॥ उग्रसेन मथुरापाळ । द्वारका वसविलीं सकळ ॥ ४ ॥ द्वारकेमाजीं आनंदघन । शरण एका जनार्दन ॥ ५ ॥

३१३ कमळगर्भीचा पुतळा । पाहतां दिसे पूर्ण कळा । शशी लोपलासे निराळा । रूपासही ॥ १ ॥ वेधक वेधक नंदनंदनु । लाविला अंगीं चंदनु । पुराणपुरुष पंचाननु । सांवळा कृष्ण ॥ २ ॥ उभे पुढें अक्रूर उद्धव । मिळाले सर्व भक्तराव । पहाती मुखकमळभाव । नाठवे द्वैत ॥ ३ ॥ रूप साजिरें गोजिरें । दृष्टी पाहतां मन न पुरे । एका जनार्दनीं झुरे । चित्त तेथें सर्वदा ॥ ४ ॥

३१४ द्वारकेभीतरीं । कामधेनु घरोघरीं ॥ १ ॥ केशी बरवेपणाची शोभा । पाहतां नयनां निघतां जिभा ॥ २ ॥ घरोघरीं आनंद सदा । रामकृष्ण वाचे गोविंदा ॥ ३ ॥ ऐशी द्वारकेपरी । एका शरण श्रीहरी ॥ ४ ॥

३१५ जगाचें जीवन भक्तांचें मोहन । सगुण निर्गुण ठाण शोभतसे ॥ १ ॥ तें रूप गोकुळीं नंदाचिये घरीं । यशोदे मांडीवरी खेळतसे ॥ २ ॥ इंद्रादी शंकर ध्यान धरती ज्याचें । तो लोणी चोरी गौळ्याचे घरोघरीं ॥३॥ सर्वांवरी चाले जयाची ते सत्ता । त्यासी बागुल आला म्हणतां उगा राहे ॥ ४ ॥ एकाचि पदें बळी पाताळीं घातला । तो उखळीं बांधिला यशोदेनें ॥५॥ जयाचेनी तृप्त त्रिभुवन सगळें । तो लोणीयाचे गोळे मागून खाय ॥ ६ ॥ एका जनार्दनीं भरुनी उरला । तो असे संचला विटेवरी ॥ ७ ॥

३१६ खेळसी तूं लीळा । तुझी अनुपम्य कळा ॥१॥ बरवा बरवा श्रीमुकुंद । गाई गोपाळां लावला वेध ॥ २ ॥ खेळसी बाळपणीं । बांधिताती तुज गौळणी ॥ ३ ॥ ऐसा नाटकी हरी । उभा ठेला विटेवरी ॥ ४ ॥ विटे उभा समचरणीं । शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

३१७ अर्जुनाचे रथीं श्रमला जगजेठी । म्हणोनि कर ठेउनी कटीं उभा येथें ॥ १ ॥ धरुनी गोवर्धन उभा समदीन । म्हणोनि कर जघन ठेउनी उभा ॥२॥ कंसादी मल्ल मारी जरासंध । ते चरणारविंद उभे विटे ॥ ३ ॥ धर्माघरीं उच्छिष्टपात्र काढी करें । म्हणोनि श्रमें निर्धारें ठेविले कटीं कर ॥ ४ ॥ पुंडलीक भक्त देखोनि तल्लीन जाला । एका जनार्दनीं ठेविला कटीं कर ॥ ५ ॥

## पंढरीमाहात्म्य.

३१८ द्वारकेचा सोहळा । परणियली भीमकबाळा ॥१॥ सोळा सहस्र युवती । अष्टनायका असती ॥ २ ॥ पुत्र पौत्र अपार । भागवतीं तो विस्तार ॥ ३ ॥ करूनिया राधामीस । देव येती पंढरीस ॥ ४ ॥ रुक्मिणी रूसली । ती दिंडीर वनां आली ॥ ५ ॥ तया मागें मोक्षदानी । येतां जाला दिंडीर वनीं ॥ ६ ॥ गाई गोपाळांचा मेळा । गोपाळपुरीं तो ठेविला ॥ ७ ॥ आपण गोपवेष धरी । एका जनार्दनीं श्रीहरी ॥ ८ ॥

३१९ जेथें वाजविला वेणु शुद्ध । म्हणोनि म्हणती वेणुनाद ॥ १ ॥ सकळीक देव आले । ते भोंवती राहिले ॥ २ ॥ जोडिलें जेथें समपद । तया म्हणती विष्णुपद ॥ ३ ॥ भोंवताली पदें उमटलीं । तेथें गोपाळ नाचती ॥ ४ ॥ जेथें उभे गाईचे भार । ते अद्यापि दिसत खुर ॥ ५ ॥ गोपाळांचीं पदें सामग्र । ठाईं शोभत सर्वत्र ॥ ६ ॥ एका जनार्दनीं हरी शोभले । कर कटावरी ठेऊनि भले ॥ ७ ॥

३२० पूर्वापार परंपरा । संत सोयरा वानिती ॥ १ ॥ सागे कृष्ण उद्धवासी । सुखमिरासी पंढरी ॥ २ ॥ स्वयें नांदे सहपरिवार । करीत गजर भक्तांचा ॥३॥ संतसनकादिक येती । भावें वंदिती श्रीचरण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं वेधलें मन । नुठे बैसलें तें तेथून ॥५॥

३२१ द्वारका समुद्रांत बुडविली । परी पंढरी राखिली अद्यापि ॥ १ ॥ द्वारकेहूनि बहुत सुख । पंढरीये अधिक एक आहे ॥ २ ॥ भीमातीरीं दिगंबर । करुणाकर विठ्ठल ॥ ३ ॥ भक्तांसाठीं निरंतर । एका जनार्दनीं कटीं धरिले कर ॥ ४ ॥

३२२ जो हा उद्धार प्रसवे ॐकार । तें रूप सुंदर विटेवरी ॥ १ ॥ ध्याता ध्यान ध्येय जेथें पैं खुंटलें । तें रूप प्रगटलें पंढरीये ॥ २ ॥ ज्ञेय ज्ञाता ज्ञान प्रेमाचें आथिलें । तें रूप सानुलें पंढरीये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रूपाचें रूपस । वैकुंठनिवास पंढरीये ॥ ४ ॥

३२३ जाश्वनीळ सदां ध्याये ध्यानीं मनीं । बैसोनि स्मशानीं निवांतपणें ॥ १ ॥ तें हें उघडें रूप विठ्ठल साचार । निगमाचें माहेर पंढरी हें ॥ २ ॥ न बुडे कल्पांती आहे तें संचलें । म्हणोनी म्हणती भले भूवैकुंठ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कल्पाचें निर्धारी । निर्विकल्प पंढरी उरतसे ॥ ४ ॥

३२४ रमा रमेश मस्तकीं हर । पुढें तीर चंद्रभागा ॥ १ ॥ मध्यभागीं पुंडलीक । सुख अलोलिक न वर्णवे ॥ २ ॥ बहुता वैष्णवांचा मेळ । गदारोळ नामाचा ॥ ३ ॥ वामभागीं रुक्मिणी राही । एका जनार्दन तेथें पाही ॥ ४ ॥

३२५ धन्य पृथ्वी दक्षिण भाग । जेथें उभा पांडुरंग । मध्यें शोभे पुंडलीक लिंग । सन्मुख चांग भीमरथी ॥१॥ काय वानूं तो महिमा । दृष्टी पाहतांचि भीमा । पैलथडी परमात्मा । शिवास जो अगम्य ॥२॥ दोन्ही कर धरूनि जघनीं । वाट पाहे चक्रपाणी । एका शरण जनार्दनीं । भक्तांसाठीं घाबरा ॥ ३ ॥

३२६ सारांचें सार गुह्याचें निजगुह्य । तें हें उभें आहे पंढरीये ॥ १ ॥ चहूं वाचांपरतें वेदां जें आरुतें । तें उभे आहे सरतें पंढरीये ॥ २ ॥ शास्त्रांचें निज सार निगमां न कळे पार । तोचि हा परात्पर पंढरीये ॥३॥ एका जनार्दनीं भरूनि उरला । तोचि हा देखिला पंढरीये ॥ ४ ॥

३२७ गाई गोपांसमवेत गोकुळींहून आला । पाहूनि भक्तीं भुलला वैष्णवाला ॥ १ ॥ मुगुटमणी धन्य पुंडलिक निका । तयालागीं देखा उभा गे माय ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस जालीं परी न बैसे खालीं । मर्यादा धरली प्रेमाची गे माय ॥ ३ ॥ ऐसा व्यापक जगाचा जीवन । एका जनार्दनीं शरण गे माय ॥ ४ ॥

३२८ त्वंपद तत्पद असिपद यांवेगळा दिसे । खोल बुंथी घेऊनी विटेवरी उभा असे गे माय ॥ १ ॥ वेडावला पुंडलिकें उभा केला । तथोनी कोठें न जाय गे माय ॥ २ ॥ भक्तां अभयकार देतुसे अवलीळा । मेळवोनी मेळा वैष्णवांचा गे माय ॥ ३ ॥ पुंडलिकें मोहिला उभा उघाडचि केला । एका जनार्दनीं ठसावला रूपेंविण गे माय ॥ ४ ॥

३२९ जयाकारणें श्रमले भांडती । वेदादिकां न कळे मती । तो वोळला सगुण मूर्ती । पुंडलिकाकारणें ॥ १ ॥ धन्य धन्य पावन देख । पुण्यभूमि पावन सुरेख । तया गातां होतसे हर्ष । प्रेमानंदे डुल्लती ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण । पाहतां पाहतां वेधलें मन । मोक्ष मुक्ति कर जोडून । उभे तिष्ठती सर्वदा ॥ ३ ॥

३३० उदंड भक्त भाग्यवंत देखिले । परी निधान दाविलें पुंडलिकें ॥ १ ॥ धन्य धन्य केला जगाचा उध्दार । नाहीं लहानथोर निवडिले ॥ २ ॥ एका जनार्दनीं दावियेला तारू । सुखाचा सागरु विठ्ठल देव ॥ ३ ॥

३३१ पुंडलिकापुढें सर्वेश्वर । उभा कटीं ठेऊनी कर ॥ १ ॥ ऐसा पुंडलिकापुढें हरी । तो पुजावा षोडशोपचारीं ॥ २ ॥ सभोंवता वेढा संतांचा । आनंद होतो हरिदासांचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव । उभा विटेवरी स्वयमेव ॥ ४ ॥

३३२ पंढरीचें सुख पुंडलीक जाणे । येर सोय नेणे तेथील पैं ॥ १ ॥ उत्तम हें स्थळ तीर्थ चंद्रभागा । स्नानें पावन जगा करितसे ॥ २ ॥ मध्यभागीं शोभे पुंडलीक मुनी । पैल ते जघनीं कटीं कर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल बाळरूप । दरुशनें ताप हरे जगा ॥ ४ ॥

३३३ पूर्वापार श्रीविठ्ठलमूर्ती । ऐसे वेद पैं गर्जती ॥१॥ भक्त पुंडलीका निकट । वसतें केलें वाळवंट ॥ २ ॥ गाई गोपाळांचा मेळ । आनंदें क्रीडे तो गोपाळ ॥ ३ ॥ ऐसा स्थिरावला हरी । एका जनार्दनीं निर्धारीं ॥ ४ ॥

३३४ वैकुंठींचें वैभव पंढरीसी आलें । भक्तीं सांठविलें पुंडलिकें ॥ १ ॥ बहुतांसी लाभ देतां घेतां जाहला । विसांवा वोळला पांडुरंग ॥ २ ॥ योग याग साधनें करिती जयालागीं । तो उभाचि भक्तालागीं तिष्ठतसे ॥ ३ ॥ हीन दीन पापी होतुका भलते याती । पाहतां विठ्ठलमूर्ती मुक्त होती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सुखाचें माहेर । बरवें भीमातीर उत्तम तें ॥ ५ ॥

३३५ तीन अक्षरीं जप पंढरी म्हणे वाचा । कोटी या जन्मांचा शीण जाय ॥ १ ॥ युगायुगीं महात्म्य व्यासें कथियेलें । कलियुगीं केलें सोपें पुंडलिकें ॥ २ ॥ महा पापराशी त्यांची होय होळी । विठ्ठलनामें टाळी

वाजवितां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं घेता पैं दर्शन । जड जीवां उद्धरण कलियुगीं ॥ ४ ॥

३३६ अनुपम्य सप्तपुऱ्या त्या असती । अनुपम्य त्या सरती पंढरीये ॥ १ ॥ अनुपम्य तीर्थे सागरादि असती । अनुपम्य सरती पंढरीये ॥ २ ॥ अनुपम्य देव उदंडे असती । अनुपम्य विठ्ठलमूर्ति पंढरीये ॥ ३ ॥ अनुपम्य संत वैष्णवांचा मेळ । अनुपम्य गदारोळ पंढरीये ॥ ४ ॥ अनुपम्य शरण एका जनार्दनीं । अनुपम्य चिंतनीं डुल्लतसे ॥ ५ ॥

३३७ अनुपम्य क्षेत्र अनुपम्य देव । नसे तोचि ठाव पंढरीये ॥ १ ॥ अनुपम्य वाहे पुढें चंद्रभागा । अनुपम्य भंगा दोष जाती ॥ २ ॥ अनुपम्य होय पुंडलीक भेटी । अनुपम्य कोटी सुखलाभ ॥ ३ ॥ अनुपम्य संत नामाचा गजर । अनुपम्य उद्धार जडजीवां ॥ ४ ॥ अनुपम्य शोभा विठ्ठलचरणीं । एका जनार्दनीं गात गीतीं ॥ ५ ॥

३३८ अनुपम्य वाचे वदतां पंढरी । होतसे बोहरी महत्पापा ॥ १ ॥ अनुपम्य ज्याचा विठ्ठलीं जो भाव । अनुपम्य देव तिष्ठे घरीं ॥ २ ॥ अनुपम्य सदा कीर्तनाची जोडी । अनुपम्य गोडी मनीं ज्याच्या ॥ ३ ॥ अनुपम्य संग संतांचा विसांवा । अनुपम्य भावा पालट नाहीं ॥४॥ अनुपम्य शरण एका जनार्दनीं । कायावाचामनीं छंद यासी ॥ ५ ॥

३३९ अनुपम्य वास पंढरीस ज्याचा । धन्य तो दैवाचा अनुपम्य ॥ १ ॥ अनुपम्य घडे चंद्रभागे स्नान । अनुपम्य दान नाम वाचे ॥ २ ॥ अनुपम्य घडे क्षेत्र प्रदक्षिणा । अनुपम्य जाणा नारीनर ॥ ३ ॥ अनुपम्य सोहळा नित्य दिवाळी । अनुपम्य वोवाळी विठोबासी ॥ ४ ॥ अनुपम्य शरण एका जनार्दनीं । अनुपम्य ध्यानीं एक नाम ॥ ५ ॥

३४० अनुपम्य नारीनर ते दैवाचे । अनुपम्य त्यांचें पुण्य देखा ॥ १ ॥ अनुपम्य वास जयांसी पंढरी । प्रत्यक्ष वैकुंठपुरी अनुपम्य ॥ २ ॥ अनुपम्य पहाती विठ्ठलरायातें । दरुशनें पावती मुक्तीतें अनुपम्य ॥ ३ ॥ अनुपम्य भक्त नांदती दैवाचे । अनुपम्य त्यांचें सुख देखा ॥४॥ अनुपम्य एका जनार्दन चरणीं । अनुपम्य विनवणी करितसे ॥ ५ ॥

३४१ अनुपम्य उपासना । अनुपम्य चरणां संतांचिये ॥ १ ॥ अनुपम्य भक्ति गोड । अनुपम्य लिगाड तुटत ॥ २ ॥ अनुपम्य पंढरीचा वास । अनुपम्य दैवास दैव त्याचें ॥ ३ ॥ अनुपम्य नाचती वैष्णव । अनुपम्य गौरव तयाचें ॥ ४ ॥ अनुपम्य एका जनार्दनीं । अनुपम्य चरणीं संतांचिये ॥ ५ ॥

३४२ अनुपम्य उद्धार नाम । अनुपम्य सकाम संत ते ॥ १ ॥ अनुपम्य पंढरीसी जाती । अनुपम्य नाचती वाळुवंटीं ॥ २ ॥ अनुपम्य टाळ घोळ । अनुपम्य रसाळ वाद्यें वाजती ॥ ३ ॥ अनुपम्य संतमेळ । अनुपम्य प्रेमळ नाम घेती ॥ ४ ॥ अनुपम्य एका जनार्दनीं । अनुपम्य आयणी चुकले ॥ ५ ॥

३४३ अनुपम्य पुराणें सांगती सर्वथा । अनुपम्य तत्त्वतां पंढरीये ॥ १ ॥ अनुपम्य योग अनुपम्य याग । अनुपम्य अनुराग पंढरीये ॥ २ ॥ अनुपम्य ध्यान अनुपम्य धारणा । अनुपम्य पंढरीराणा विटेवरी ॥ ३ ॥ अनुपम्य क्षेत्र तीर्थ तें पवित्र । अनुपम्य गोत्र उद्धरती ॥ ४ ॥ अनुपम्य शरण एका जनार्दनीं । अनुपम्य भुवनीं नांदतसे ॥ ५ ॥

३४४ उपदेश अनुपम्य खूण । विटे समचरण शोभले ॥ १ ॥ अनुपम्य सदैव भाग्य ज्यांचें । अनुपम्य वाचे नाम गाती ॥ २ ॥ अनुपम्य जाती पंढरीये । अनुपम्य वस्ती होय पंढरीये ॥ ३ ॥ अनुपम्य ते भाग्याचे । विठ्ठल वाचे आळविती ॥ ४ ॥ अनुपम्य एका जनार्दनीं । अनुपम्य वदनी गाती नाम ॥ ५ ॥

३४५ अनुपम्य ज्ञान अनुपम्य मतें । अनुपम्य सरतें पंढरीये ॥ १ ॥ अनुपम्य वेद अनुपम्य शास्त्र । अनुपम्य पवित्र पंढरीये ॥ २ ॥ अनुपम्य भक्ति अनुपम्य मुक्ति । अनुपम्य वेदोक्ती पंढरीये ॥३॥ अनुपम्य कळा अनुपम्य सोहळा । अनुपम्य जिव्हाळा पंढरीये ॥ ४ ॥ अनुपम्य दया अनुपम्य शांती । अनुपम्य विरक्ती एका जनार्दनीं ॥ ५ ॥

३४६ अनुपम्य भाग्य नांदतें पंढरी । विठ्ठल निर्धारीं उभा जेथें ॥ १ ॥ अनुपम्य वाहे पुढें चंद्रभागा । दोष जाती भंगा नाम घेतां ॥ २ ॥ अनुपम्य मध्यें पुंडलीक मुनी । अनुपम्य चरणीं मिठी त्याच्या ॥ ३ ॥ संत शोभती दोही बाहीं । अनुपम्य देहीं सुख वाटे ॥ ४ ॥ अनुपम्य एका जनार्दनीं ठाव । अनुपम्य पंढरीराव विटेवरी ॥ ५ ॥

३४७ अनुपम्य घनदाट । करिती बोभाट अनुपम्य ॥ १ ॥ पंढरीसी जाती अनुपम्य । धन्य जन्म अनुपम्य त्यांचा ॥ २ ॥ अनुपम्य त्यांच्या पुण्या नाहीं पार ।

अनुपम्य निर्धार सुख त्यांसी ॥ ३ ॥ अनुपम्य दशा आली त्यांच्या दैवा । अनुपम्य देवा चुकले ते ॥ ४ ॥ अनुपम्य शरण एका जनार्दनीं । पंढरी सांडोनि नेम नाहीं ॥ ५ ॥

३४८ पंचक्रोशीचे आंत । पावन तीर्थ हें समस्त ॥१॥ धन्य पंढरीचा महिमा । नाहीं द्यावया उपमा ॥ २ ॥ तीर्थ क्षेत्र देव । ऐसा नाहीं कोठें ठाव ॥ ३ ॥ नगर प्रदक्षिणा । शरण एका जनार्दना ॥ ४ ॥

३४९ इच्छिताती देव पंढरीचा वास । न मिळे सौरस तयां कांहीं ॥ १ ॥ ऐसें श्रेष्ठ क्षेत्र उत्तमा उत्तम । याहुनी सुगम आहे कोठें ॥२॥ जनार्दनाचा एका म्हणतसे भावें । तीर्थ तें वंदावें पंढरी सदा ॥ ३ ॥

३५० प्रयागादि क्षेत्रें आहेत कल्पकोडी । तयां आहे खोडी एक एक ॥ १ ॥ मुंडन ती काया निराहार राहणें । येथें न मुंडणें काया कांहीं ॥ २ ॥ म्हणोनि सर्व तीर्थांमाजीं उत्तम ठाव । एका जनार्दनीं जीव ठसावला ॥ ३ ॥

३५१ उदंड मंत्र उदंड तीर्थें । परी पवित्र निर्धार पंढरीये ॥ १ ॥ उदंड महिमा उदंड वर्णिला । परी या विठ्ठलावांचुनी नाहीं ॥२॥ उदंड भक्त उदंड शिरोमणी । एका जनार्दनीं चरण उदंडची ॥ ३ ॥

३५२ बहुत तीर्थ क्षेत्रें बहुतापरी । न पावती सरी पंढरीची ॥ १ ॥ वाहे दक्षिणभाग भीमा । पैल परमात्मा विटेवरी ॥ २ ॥ मध्य स्थळीं पुंडलीक । दरुशनें देख उद्धार ॥ ३ ॥ वाहे तीर्थ चंद्रभागा । देखतां भंग पातकां ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सार । क्षराक्षर पंढरी हे ॥ ५ ॥

३५३ उदंड तीर्थें क्षेत्रें पाहतां दिठीं । नाहीं सृष्टीं तारक ॥ १ ॥ स्नानें पावती मुक्ति जगा । ऐशी चंद्रभागा समर्थ ॥ २ ॥ पुंडलिकां नमस्कार । सकळ पूर्वजां उद्धार ॥ ३ ॥ पाहतां राउळाची ध्वजा । मुक्ती सहजा राबती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल भेटी । मग लाभा नये तुटी ॥ ५ ॥

३५४ उदंड तीर्थीं महिमा वर्णिला । परी नाहीं भेटला पांडुरंग ॥ १ ॥ पंढरीसारखें तीर्थ महीवरी । न देखों बराबरी त्रैलोक्यांत ॥ २ ॥ ऐसा नामघोष संतांचा मेळ । ऐसा भक्तिकल्लोळ नाहीं कोठें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अनाथा कारण । पंढरी निर्माण भूवैकुंठ ॥ ४ ॥

३५५ प्रभासादि क्षेत्रें सप्तपुऱ्या असती । परी सरी न पवती पंढरीची ॥ १ ॥ दरुशनें चित्त निवे पाहतां बरवें । शंख चक्र मिरवे चहूं करीं ॥ २ ॥ पीतांबर परिधान वैजयंती माळा । शोभे सोनसळा अंगावरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहतां रूपडें । उभें तें उघडें विटेवरी ॥ ४ ॥

३५६ उदंड क्षेत्रांची पाहिली रचना । पंढरी ते जाणा भूवैकुंठ ॥ १ ॥ तीर्थ आणि देव संतसमागम । ऐसें सर्वोत्तम कोठें नाहीं ॥ २ ॥ सागरादि तीर्थें पाहतां पाहिलें । परी मन हें वेधलें पंढरीये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुखाची विश्रांती । पाहतां विठ्ठलमूर्ति लाभ बहु ॥ ४ ॥

३५७ उदंड तीर्थें उदंड क्षेत्रें । परि पवित्र पंढरी ॥ १ ॥ उदंड देव उदंड दैवतें । परी कृपावंत विठ्ठल ॥ २ ॥ उदंड भक्त उदंड संत । परी कृपावंत पुंडलीक ॥ ३ ॥ उदंड गातो एक एका । परी एका जनार्दनीं सखा ॥ ४ ॥

३५८ जें जें क्षेत्र जें जें स्थळीं । तें तें बळी आपुलें ठायीं ॥ १ ॥ परी ऐसें महात्म्य नाहीं कोठें । जें प्रत्यक्ष भेटे हरिहर ॥ २ ॥ ऐसा संतसमागम । ऐसा निरुपम नाममहिमा ॥ ३ ॥ दिंडी टके मृदंग नाद । नाहीं भेद यातीचा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निजसार । पंढरी माहेर भूलोकीं ॥ ५ ॥

३५९ बहु क्षेत्रें बहु तीर्थें । बहु दैवतें असतीं ॥१॥ परी नये पंढरीसम । वाउगा श्रम होय अंतीं ॥ २ ॥ देव भक्त आणि नाम । ऐसें उत्तम नाहीं कोठें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तिहींचा मेळ । पाहतां भूमंडळ पंढरीये ॥ ४ ॥

३६० गंगा सागरादि तीर्थें भूमीवरी । परी पंढरीची सरी न पवती ॥ १ ॥ श्रेष्ठांमाजीं श्रेष्ठ तीर्थ पैं समर्थ । दरुशनें मनोरथ पूर्ण होती ॥ २ ॥ ऐसी चंद्रभागा ऐसा पुंडलीक । ऐसे वैष्णव देख नाहीं कोठें ॥ ३ ॥ गाताती वैष्णव आनंदें नाचती । सदोदित कीर्ति विठ्ठलाची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पंढरीचा हाट । भूवैकुंठ पेठ पंढरी देखा ॥ ५ ॥

३६१ प्रयागादि तीर्थें आहेत समर्थ । परी पुरती मनोरथ पंढरीये ॥ १ ॥ बहुत ते साक्ष देती या स्थलासी । सदा तो मानसीं शिव ध्याये ॥ २ ॥ आनंद सोहळा त्रैलोक्य अगाध । पंढरीये भेदाभेद नाहीं

सत्य ॥ ३ ॥ एका जनार्दनीं क्षेत्रवासी जन । देवा ते समान सत्य होती ॥ ४ ॥

३६२ समुद्रवलयांकित पृथिवी पाहतां । ऐसें तीर्थ सर्वथा नाहीं कोठें ॥ १ ॥ भाविकांचें माहेर जाणा पंढरपूर । विठ्ठल विटेवरी उभा असे ॥ २ ॥ एका जनार्दनीं तयाचाचि ठसा । भरूनि आकाशा उरलासे ॥ ३ ॥

३६३ उत्तम तें क्षेत्र उत्तम तें स्थळ । धन्य तें राऊळ पाहतां डोळां ॥ १ ॥ एक एक तीर्थ घडती कोटी वेळां । चंद्रभागा डोळां देखिलिया ॥ २ ॥ गंगा प्रदक्षिणा समुद्राचें स्नान । परी हें महिमान नाहीं कोठें ॥३॥ वैष्णवांचा मेळ करिती गदारोळ । दिंडी पताका घोळ नोहे कोठें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं साराचें हें सार । पंढरी माहेर भाविकांसी ॥ ५ ॥

३६४ देव भक्त दोन्ही तीर्थ क्षेत्र नाम । ऐसा एक संभ्रम कोठें नाहीं ॥ १ ॥ प्रयागादि तीर्थें पाहतां पाहतां । न बैसे तत्त्वतां मन माझें ॥ २ ॥ पंढरीसी ऐसा आहे समागम । म्हणोनी भवभ्रम हरलासे ॥३॥ एका जनार्दनीं पाहतां विठ्ठल देव । फिटला तो भेव संसाराचा ॥ ४ ॥

३६५ सकळीक तीर्थें पाहतां डोळा । निवांत नोहे हृदयकमळा ॥ १ ॥ पाहतां तीर्थ चंद्रभागा । सकळ दोष गेले भंगा ॥ २ ॥ पाहतां विठ्ठल सांवळा । परब्रह्म डोळा देखियलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहोनी ध्यान । भुललें मन त्या ठायीं ॥ ४ ॥

३६६ पावन क्षेत्र पंढरपूर । पावन तीर चंद्रभागा ॥१॥ पावन संत पुंडलीक । पावन देव श्री विठ्ठल ॥ २ ॥ पावन देह गेलीया तेथें । होती जीवन्मुक्त सर्व जीव ॥३॥ एका जनार्दनीं पावन । पावन पंढरी अधिष्ठान ॥ ४ ॥

३६७ अवघें आनंदाचें । क्षेत्र विठ्ठल देवाचें ॥ १ ॥ अवघें हें पावन । तीर्थ चंद्रभागा स्नान ॥ २ ॥ अवघे संतजन । पुंडलिकासी वंदन ॥ ३ ॥ अवघा विठ्ठल देव । एका जनार्दनीं भाव ॥४॥

३६८ अवघें परब्रह्म क्षेत्र । अवघें तेथें तें पवित्र ॥१॥ अवघा पर्वकाळ । अवघे दैवाचे सकळ ॥ २ ॥ अवघीया दुःख नाहीं । अवघें सुखाचि तया ठायीं ॥ ३ ॥ अवघे आनंदभरित । एका जनार्दनीं सदोदित ॥४॥

३६९ अवघें क्षेत्र पंढरी । अवघा आनंद घरोघरीं ॥१॥ अवघा विठ्ठलचि देव । अवघा अवघिया एक भाव ॥२॥ अवघे समदृष्टी पहाती । अवघे विठ्ठलचि गाती ॥३॥ अवघे ते दैवाचे । एका जनार्दनीं साचे ॥ ४ ॥

३७० नाभीकमळीं जन्मला ब्रह्मा । तया न कळे महिमा ॥ १ ॥ पंढरी क्षेत्र हें जुनाट । भूवैकुंठ साजिरीं ॥ २ ॥ भाळे भोळे येती आधीं । तुटती उपाधी तयांची ॥३॥ एकपणें रिगतां शरण । एका जनार्दनीं तुटे बंधन ॥ ४ ॥

३७१ बहुता काळाचें हें क्षेत्र । सकळ देवांचें माहेर । सकळ संतांचें निजमंदीर । तें हें पंढरपूर जाणावें ॥१॥ धन्य पंढरीचा महिमा । नाहीं आणीक उपमा । जेथें वास पुरुषोत्तमा । रुक्मिणीसहित सर्वदा ॥ २ ॥ धन्य भक्त पुंडलीक । सकळ संतांचा नायक । एका जनार्दनीं देख । श्रीविठ्ठल आवडी ॥ ३ ॥

३७२ महाक्षेत्र पंढरपूर । नांदे विठ्ठल साचार ॥१॥ तया ठायीं सुख आहे । संत जाणती तो लाहे ॥२॥ विश्रांतीचें स्थान । भावाभावा समान ॥ ३ ॥ दुःख दरिद्र नाहीं । वाचे म्हणतां विठाबाई ॥ ४ ॥ नोहे बाधा काळाची । ऐसी मर्यादा संतांची ॥ ५ ॥ जनार्दनाचा एका म्हणे । घ्यावें पेणें तेथींचें ॥ ६ ॥

३७३ ऐसें पंढरीचें स्थान । याहुनि आणिक आहे कोण ॥ १ ॥ विष्णुसहित कर्पूरगौर । जेथें उभे निरंतर ॥ २ ॥ पुढें भीवरा शोभती । पुंडलिकाची वसती ॥ ३ ॥ ऐसें सांडोनि उत्तम स्थळ । कोठें वास करूं निर्मळ ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । प्रेमळ संत नांदती देखा ॥ ५ ॥

३७४ ऐसें विश्रांतीचें स्थान । आणिके ठायीं नाहीं जाण ॥ १ ॥ तें हें जाणा पंढरपूर । मुक्त मुमुक्षूंचें माहेर ॥ २ ॥ जगीं ऐसें स्थळ । नाहीं नाहीं हो निर्मळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निकें । भूवैकुंठ नेटकें ॥ ४ ॥

३७५ वेदाभ्यासें श्रमलें । पुराण वदो ते भागले ॥ १ ॥ तयां विश्रांतीस स्थान । अधिष्ठान पंढरी ॥ २ ॥ शास्त्राभ्यास नेहटीं । वादावाद दाटोदाटीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । पंढरी स्थान पेरिया ॥ ४ ॥

३७६ ज्या सुखा कारणें योगाभ्यास । शरीर दंड काया क्लेश । तें उभें आहे अपैस । भीमातीरीं वाळुवंटीं ॥ १ ॥ न लगे दंडन मुंडनीं आटी । योगायागाची कसवटी । मोकळी राहाटी । कुंथाकुंथी नाहीं येथें ॥२॥

न लगे अष्टांग धूम्रपान। वायु आहार पंचाग्नि साधन। नग्न मौन एकांत स्थान। आटाआटी न करणें ॥ ३ ॥ घरूनियां संतसंग। पाहें पाहें पांडुरंग। देईल सुख अव्यंग। एका जनार्दनीं निर्धारें ॥ ४ ॥

३७७ जप तपें तपतां कोटी। होती हिंपुटी भाग्यहीन ॥ १ ॥ तयां विश्रांतिसी स्थान। पंढरी जाण भूमंडळीं ॥ २ ॥ योगयाग धूम्रपान करिती। नोहे प्राप्ति तयासी ॥ ३ ॥ तो उभा कटीं कर ठेवुनी। समचरणीं विटेवरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पहातां दिठां। कंदर्प कोटी वोवाळिजे ॥ ५ ॥

३७८ दुस्तर मार्ग आटाआटी। पंढरी सृष्टी तारक ॥ १ ॥ कोणा न लगे दंडन। कायापीडन कष्ट ते ॥ २ ॥ नको उपवास विर्धीचा पडदा। शुद्ध अशुद्धा न पहावें ॥ ३ ॥ मुगुटमणी पुंडलीक। दरुशनें पातक हरतसे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निर्मळ। पंढरी स्थळ सर्वांसी ॥ ५ ॥

३७९ जें देवा दुर्लभ स्थान। मनुष्यासी तें सोपें जाण ॥ १ ॥ या ब्रह्मांडामाझारीं। सृष्टी जाणावी पंढरी ॥ २ ॥ एक एक पाऊल तत्त्वतां। घडे अश्वमेघ पुण्यता ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ठसा। विठ्ठल उभाची सरसा ॥ ४ ॥

३८० उभा देव उभा देव। निरसी भेव भाविकांचे ॥ १ ॥ न लगे कांहीं खटाटोप। पेठ सोपी पंढरी ॥ २ ॥ नको नको वेदपाठ। सोपी वाट पंढरी ॥ ३ ॥ शास्त्रांचीं तो भरोवरी। सांडीं दुरी पंढरीये ॥ ४ ॥ योगयाग तीर्थ तप। उघडतो अमुप पंढरीये ॥ ५ ॥ एका जनार्दनीं स्वयं ब्रह्म नांदे निष्काम पंढरीये ॥ ६ ॥

३८१ बहु मार्ग बहुतापरी। परी न पवती सरी पंढरीची ॥ १ ॥ ज्या ज्या मार्गें जातां वाटा। कर्म कर्मठा लागती ॥ २ ॥ जेथें नाहीं कर्माकर्म। सोपें वर्म पंढरीये ॥ ३ ॥ न लगे उपास तीर्थविधी। सर्व सिद्धी चंद्रभागा ॥ ४ ॥ म्हणोनि पंढरीसी जावें। जीवेंभावें एका जनार्दनीं ॥ ५ ॥

३८२ व्यास वाल्मिक नारद मुनी। नित्य चिंतिती चिंतनीं। येती पंढरपुरभुवनीं। श्रीविठ्ठलदरुशना ॥ १ ॥ मिळोनि सर्वांचा मेळ। गाती नाचती कल्लोळ। विठ्ठल स्नेहाळ। तयालागीं पहाती ॥ २ ॥ करिती भीवरेचें स्नान। पुंडलिका अभिवंदन। एका जनार्दनीं स्तवन। करिती विठ्ठलाचें ॥ ३ ॥

३८३ देखोनियां देवभक्त। सनकादिक आनंदत ॥ १ ॥ म्हणती जावें पंढरपुरा। पाहूं दीनांचा सोयरा ॥ २ ॥ आनंदें सनकादिक। पाहूं येती तेथें देव ॥ ३ ॥ विठ्ठलचरणीं। शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

३८४ देव भक्त एके ठायीं। संतमेळ तया गांवीं ॥ १ ॥ तें हें जाणा पंढरपूर। देव उभा विटेवर ॥ २ ॥ भक्त येती लोटांगणीं। देव पुरवी मनोरथ मनीं ॥ ३ ॥ धांवे सामोरा तयासी। आलिंगून क्षेम पुसी ॥ ४ ॥ ऐशी आवडी मानी मोठी। एका जनार्दनीं घाली मिठी ॥ ५ ॥

३८५ उभारुनी बाह्या पाहतसे वाट। पीतांबर नीट सांवरुनी ॥ १ ॥ आलीयासी इच्छा मिळतसे दान। जया जें कारण पाहिजे तें ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति तेथें लोळती अंगणीं। कोण तेथें मनीं वास नाहीं ॥ ३ ॥ कामधेनू कल्पतरु चिंतामणी। लोळती अंगणीं पंढरीये ॥ ४ ॥ एका जनार्दनीं महा लाभ आहे। जो नित्य न्हाये चंद्रभागे ॥ ५ ॥

३८६ जो परात्पर परेपरता। आदि मध्य अंत नाहीं पाहतां। आगमांनिगमां न कळे सर्वथा। तो पंढरीयें उभा राहिला ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग। भोंवतां शोभे संतसंग। धन्य भाग्याचे जे सभाग्य। तेचि पंढरी पाहती ॥ २ ॥ निरा भिवरापुढें वाहे। मध्यें पुंडलीक उभा आहे। समदृष्टी चराचरीं विठ्ठला पाहे। तेचि भाग्याचे नारीनर ॥ ३ ॥ नित्य दिवाळी दसरा। सदा आनंद पंढरपुरा। एका जनार्दनीं निर्धार। धन्य भाग्याचे नारीनर ॥ ४ ॥

३८७ तयां ठायीं अभिमान नुरे। कोड अंतरीचें पुरें ॥ १ ॥ तें हें जाणा पंढरपूर। उभा देव विटेवरी ॥ २ ॥ आलिंगनें काया। होतसे तया ठाया ॥ ३ ॥ चंद्रभागे स्नान। तेणें पूर्वजा उध्दरण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण। पंढरी भूवैकुंठ जाण ॥ ५ ॥

३८८ पंढरीये अन्नदान। तिळभरी घडतां जाण ॥ १ ॥ तेणें घडती अश्वमेघ। पातकापासोनी होती शुध्द ॥ २ ॥ अठरा वर्ण याती। भेद नाहीं तेथें जाती ॥ ३ ॥ अवघे रंगले चिंतनीं। मुखीं नाम गाती कीर्तनीं ॥ ४ ॥ शुध्द अशुद्धाची बाधा। एका जनार्दनीं नोहे कदा ॥ ५ ॥

३८९ वसती सदा पंढरीसी। नित्य नेमें हरी दरुशनासी। तयां सारखे पुण्यराशी। त्रिभुवनीं दूजें नाहींत ॥ १ ॥ धन्य क्षेत्र भीवरातीर। पुढें पुंडलीक समोर। तेथें स्नान करती नर। तयां जन्म नाहीं सर्वथा ॥ २ ॥ करती क्षेत्र प्रदक्षिणा। त्यांच्या पार नाहीं पुण्या। जगीं धन्य ते मान्य। एका जनार्दनीं म्हणतसे ॥ ३ ॥

३९० पाहूनियां पंढरपूर। मना आनंद अपार ॥१॥ करितां चंद्रभागे स्नान। मना होय समाधान ॥ २ ॥ जातां पुंडलिकाचे भेटी। न माय आनंद त्या पोटीं ॥ ३ ॥ पाहतां रखुमादेवीवर। मन होय हर्षनिर्भर ॥ ४ ॥ पाहा गोपाळपूर वेणुनाद। एका जनार्दनीं परमानंद ॥ ५ ॥

३९१ नित्य घडे चंद्रभागे स्नान। श्रीविठ्ठलदरुशन॥१॥ त्याच्या पुण्या नाहे लेखा। पहा दृष्टी पुंडलीका ॥२॥ उजवें घेतां राउळासी। जळती पातकांच्या राशी ॥३॥ संतांसवें कीर्तन करितां। आनंदें टाळी वाजवितां॥४॥ मोक्ष जोडोनियां हात। तयाची वाट तो पहात॥५॥ धन्य पंढरीचा संग। एका जनार्दनीं अभंग ॥ ६ ॥

३९२ भागीरथी आणि भीमरथी वदतां। समान तत्त्वतां कलीमाजीं ॥ १ ॥ प्रातःकाळीं नामस्मरण जो गाय। तीर्थीं सदा न्हाये पुण्य जोड ॥२॥ वदतां वाचें नाम घडतां एक स्नान। पुनरपि आगमन मृत्यूलोकीं ॥३॥ एका जनार्दनीं भीमरथी वदतां। प्रयागीं समता सरी न पवे ॥४॥

३९३ चंद्र पौर्णिमेचा दिसे पा सोज्वळ। तैसा श्रीविठ्ठल पंढरीये ॥ १॥ क्षीरसिंधुसम भीवरा ती वाहे। स्नान करितां जाय महत्पाप ॥ २ ॥ सनकसनंदनसम पुंडलीक। शोभा अलोलिक वर्णू काय ॥३॥ लक्ष्मी प्रत्यक्ष रखुमाई राही। एका जनार्दनीं पायीं लीन जाला ॥४॥

३९४ पुष्पावती चंद्रभागे। करितां स्नान भंगे दोष ॥ १ ॥ पाहतां पुंडलीक नयनीं। चुके जन्म नये अयनीं ॥ २ ॥ घेता विठ्ठलदरुशन। होती पातकी पावन ॥ ३ ॥ करितां प्रदक्षिणा। पुन्हा जन्म नाहीं जाणा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण। कळस पाहतां मुक्त जाण ॥ ५ ॥

३९५ अवलोकितां चंद्रभागा। सकळ दोष जाती भंगा ॥ १ ॥ स्नान करितां भीवरेसी। तरती पातकी अपैसी ॥ २ ॥ दृष्टीं पाहतां विठ्ठलदेव। न राहे काळाचें भेव ॥ ३ ॥ हरुषें वाहातां टाळी। एका जनार्दनीं मुक्त केलीं ॥ ४ ॥

३९६ दृष्टीं पाहतां भीमातीर। स्वर्गीं वास तया निरंतर ॥ १ ॥ ऐसा तेर्थीचा महिमा। आणिक नाहीं दुजी उपमा ॥ २ ॥ दक्षिण द्वारका पंढरी। वसे भीवरेचे तीरीं ॥ ३ ॥ जेथें वसे वैकुंठ देवो। एका जनार्दनीं गेला भेवो ॥ ४ ॥

३९७ जयां आहे मुक्ती चाड। तयांसी गोड पंढरी। ॥ १ ॥ देव तीर्थ क्षेत्र संत। चहूंचा होत मेळा जेथ ॥ २ ॥ कृष्णरामादि नामगजर। करिती उच्चार अट्टाहास्यें ॥ ३ ॥ स्त्रियाआदि नर बाळें। कौतुक लीळे नाचती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तयासंगीं। विठ्ठलरंगीं नाचतुसे ॥ ५ ॥

३९८ त्रिविधतापें तापले भारी। तया पंढरी विश्रांती ॥ १ ॥ आणीक सुख नाहीं कोठें। पाहतां नेटें कोटि जन्म ॥ २ ॥ काळाचेंहि न चले बळ। भूमंडळ पंढरीये ॥ ३ ॥ भूवैकुंठ पंढरी देखा। ऐसा लेखा वेदशास्त्रीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं धरुनि कास। पंढरीचा दास वारकरी ॥ ५ ॥

३९९ तापत्रयें तापलीया पंढरीसी यावें। दरुशनें मुक्त व्हावें हेळामात्रें ॥ १ ॥ दुःखाची विश्रांती सुखाचा आनंद। पाहतां चिदानंद विठ्ठल देव ॥ २ ॥ संसारीं तापले त्रितापें आहाळले। विश्रांतीये आले पंढरीसी ॥ ३ ॥ सर्वांचें माहेर भाविकांचें घर। एका जनार्दनीं निर्धार केला असे ॥ ४ ॥

४०० तिहीं त्रिभुवनीं पातकी पीडिले। ते मुक्त जाहले पंढरीसी ॥ १ ॥ पाहतां सांवळा अघघीयां विश्रांती। दरुशनें शांती पातकीयां ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाहतां रुपडें। कैवल्य उघडें विटेवरी॥ ३॥

४०१ पतित पातकी खळ दुराचारी। पाहतां पंढरी मोक्ष तयां ॥ १ ॥ स्वमुखें भक्तां सांगतो आपण। नका अनुमान धरूं कोणी ॥ २ ॥ चंद्रभागा दृष्टीं पाहतां नरनारी। मोक्ष त्यांचे घरीं मुक्तीसहित॥ ३ ॥ चतुष्पाद पक्षी कीटकें अपार। वृक्ष पाषाण निर्धार उद्धरती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं न घ्यावा संशय। दरुशनें जाय पापताप ॥ ५॥

४०२ गाढुनी पंढरीये जाण। जो नेघे विठ्ठलदरुशन ॥ १ ॥ महापातकी चांडाळ। त्याचा न व्हावा विटाळ

॥ २ ॥ जिताची भोगी नर्क । जो विठ्ठला विन्मुख ॥३॥ न करी स्नान चंद्रभागे । तो कुष्टी सर्वांगें ॥ ४ ॥ नेघे पुंडलीकदरुशन । एका जनार्दनीं तया बंधन ॥ ५ ॥

४०३ पापाची वस्ती जाणा । पंढरीसी नाहीं कोण्हा ॥ १ ॥ अवघे भाग्याचे सदैव । तेथें वसे विठ्ठल देव ॥ २ ॥ माहेर भाविका । देखिलीया पुंडलीका ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका म्हणे । पंढरी पेणें सुखवस्ती ॥ ४ ॥

४०४ पूर्व सुकृताची गांठोडी पदरीं । तरीच पंढरीं वास घडे ॥ १ ॥ कोटी यज्ञफळ भीमरथी पाहतां । मोक्ष सायुज्यता तत्क्षणीं ॥२॥ पृथ्वीचें दान असंख्य गोदानें । पुंडलीक दरुशनें न तुळती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठलाचे भेटी । वेरझारा तुटी जन्मोजन्मीं ॥४॥

४०५ पंढरीचा महिमा । आणिक नाहीं त्या उपमा ॥१ ॥ धन्य धन्य जगीं ठाव । उभा असे देवराव ॥ २ ॥ साक्ष ठेवुनी पुंडलिका । तारितसे मूढ लोकां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव । उभाउभीं निरसी भेव ॥ ४॥

४०६ अविनाश क्षेत्र पंढरी सर्वथा । आणीक ती वार्ता नये मना ॥ १ ॥ सर्व तीर्थ मार्ग विधियुक्त आहे । येथें उभा पाहे पांडुरंग ॥ २ ॥ आटणी दाटणी मुंडणी सर्वथा । नाहीं पैं तत्वतां यया तीर्थी ॥ ३ ॥ करावें तें स्नान पुंडलीक वंदन । देखावे चरण विठोबाचे ॥४॥ जनार्दनाचा एका पंढरी सांडुनी । न जाय अवनीं कवण तीर्थी ॥ ५ ॥

४०७ भाविकांसी नित्य नवें हें सोपारें । पंढरी उच्चार करितां वाचें ॥ १ ॥ हो कां अनामिक अथवा शुद्ध वर्ण । ज्ञातीसी कारण नाहीं देवा ॥ २ ॥ एका जनार्दनीं भलती ज्ञाती असो । परी पांडुरंग वसो हृदयामाजीं ॥ ३ ॥

४०८ पिकली पंढरी पिटिला धांडोरा । केणें आले घरा सभागियांच्या ॥ १ ॥ चंद्रभागे तीरीं उतरलें बंदर । आले सवदागर साधुसंत ॥ २ ॥ वैष्णव मिळोनि केला असे सांठा । न घेतो करंटा अभागीया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आलें गिन्हाईक । वस्तु अमोलिक सांठविली ॥ ४ ॥

४०९ सप्तपुर्‍यांमाजीं पंढरी पावन । नामघोष जाण वैष्णव करिती ॥ १ ॥ देव तो विठ्ठल देव तो विठ्ठल । आहे सोपा बोल वाचे म्हणतां ॥ २ ॥ आणिक कांहां नको यापरतें साधन । विठ्ठल निधान टाकूनियां ॥३॥ एका जनार्दनीं विठ्ठलावांचुनी । आन नेणें मनीं दुजें कांहीं ॥ ४ ॥

४१० धन्य चंद्रभागा धन्य वाळुवंट । तेथें सभा दाट वैष्णवांची ॥ १ ॥ ठायीं ठायीं कीर्तन होत नामघोष । जळताती दोष जन्मांतरींचे ॥ २ ॥ पहा तो नारद उभा चंद्रभागेंत । गायन करीत नामघोष ॥ ३ ॥ धन्य विष्णु पहा धन्य वेणुनाद । क्रीडा करी गोविंद सर्वकाळ ॥ ४ ॥ पौर्णिमेचा काला वेणुनादीं जाहला । वांटितो सकळां पांडुरंग ॥ ५ ॥ स्वर्गीचे सुरवर प्रसाद इच्छिती । नाहीं त्यांसी प्राप्ति अद्यापवरी ॥६॥ तुम्हां आम्हां येथें कैसें सांपडलें । उपकार केले पुंडलीकें ॥ ७ ॥ धन्य ते पद्माई धन्य ते पद्माळ । येऊनि सकळ स्नानें करिती ॥ ८ ॥ धन्य दिंडीर वन रम्य स्थळ फार । रखुमाई सुंदर वास करिती ॥ ९ ॥ चोखोबानें वस्ती केली ऐलथडी । उभारिली गुढी स्वानंदाची ॥१०॥ धन्य पुंडलीक भक्त शिरोमणी । तेणें चक्रपाणी उभा केला ॥ ११ ॥ मायबापाची सेवा तेणें केली सबळ । म्हणोनि घननीळ आतुडला ॥ १२ ॥ लोह दंड क्षेत्र धन्य पंढरपूर । उभा विटेवर पांडुरंग ॥ १३ ॥ त्रैलोक्याचा महिमा आणिला तया ठायां । तीर्थ व्रतें पायां विठोबाच्या ॥ १४ ॥ तिहीं लोकीं पाहतां ऐसें नाहीं कोठें । परब्रह्म नीट विटेवरी ॥ १५ ॥ एका जनार्दनीं ब्रह्म पाठीं पोटीं । ब्रह्मनिष्ठ येती तया ठायां ॥ १६ ॥

४११ धन्य धन्य पंढरपूर । वाहे भीवरा समोर ॥१॥ म्हणोनि नेमें वारकरी । करती वारी अहर्निशीं ॥२॥ पुंडलीकां दंडवत । पाहाती दैवत श्रीविठ्ठल ॥ ३ ॥ काला करती गोपाळपुरीं । मिळोनि हरी सवंगडे ॥४॥ तया हरिदासांचें रजःकण । शरण एका जनार्दन ॥५॥

४१२ तयाचे संगतीं अपार । विश्रांती घर पंढरी ॥१॥ म्हणोनि वारकरी भावें । जाती हावें पंढरीसी ॥ २ ॥ योगायागीं जो न संपडे । तो पुंडलिका पुढें उभा असें ॥ ३ ॥ शोभे चंद्रभागा उत्तम । धन्य जन्म जाती तेथें ॥ ४ ॥ घेऊनि आवडी माळ बुका । वाहाती फुका विठ्ठला ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भावें । हेंचि मागणें मज द्यावें ॥ ६ ॥

४१३ वारकरी पंढरीचा । धन्य धन्य जन्म त्याचा ॥१॥ जाय नेमें पंढरीसी । चुको नेदी तो वारीसी ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी । सदां नाम गाय मुखीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करी वारी । धन्य तोचि बा संसारीं ॥४॥

४१४ भाळे भोळे नरनारी । येती प्रती संवत्सरीं पंढरीये ॥ १ ॥ करती स्नान वंदिती चरणां । क्षेत्र प्रदक्षिणा करिताती ॥ २ ॥ टाळविणे मृदंग मोहरी । गरुड टके शोभती करीं ॥ ३ ॥ करती आनंद नामघोष । नाहीं आंस पायांवीण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कौतुकें । नाचतु सुखें भक्तगणा ॥ ५ ॥

४१५ घडती पुण्याचिया रासी । जे पंढरीसी जाती नेमें ॥ १ ॥ घडतां चंद्रभागे स्नान । आणि दरुशन पुंडलीक ॥ २ ॥ पाहतां विटेवरी जगदीश । पुराणपुरुष व्यापक ॥ ३ ॥ वारकरी गाती सदा । प्रेमें गोविंदा आळविती ॥ ४ ॥ तया स्थळीं मज ठेवा । आठवा अनीं जनार्दन ॥ ५ ॥ शरण एका जनार्दन । करा माझी आठवण ॥ ६ ॥

४१६ पंढरीस ज्याचा नेम । तो न करी अन्य कर्म ॥ १ ॥ सांडनियां विठ्ठल राजा । आणिक देव नाहीं दुजा ॥ २ ॥ सांडनियां चंद्रभागा । कोण जाय आणीके गंगा ॥ ३ ॥ सांडोनियां पुंडलीका । कोण आहे आणीक सखा ॥ ४ ॥ सांडोनिया वेणूनाद । कोण आहे थोर पद ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भाव । अवघा विठ्ठलचि देव ॥ ६ ॥

४१७ गोपाळपुरीं काला गोपाळ करिती । तेथील लाभा देव लाळ घोटिती ॥ १ ॥ ऐसा आनंद गे माय तया पंढरपुरीं । धन्य भक्त देवाचे वारकरी ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी नित्य नेमें जाण । जाउनी भीवरे करिताती स्नान ॥ ३ ॥ घेतां दरुशन पुंडलिकाचे भेटी । एका जनार्दनीं पुण्य न समाये सृष्टी ॥४॥

४१८ देव संत दोन्ही एकाचि मेळ । गदारोळ कीर्तनीं ॥ १ ॥ ती हे त्रिवेणी पंढरी । आहे भीवरेचे तीरीं ॥२॥ येती वारकरी । आनंदें नाचती गजरीं ॥३॥ म्हणे जनार्दनाचा एका । पुंडलिकें दाखविला निका ॥४॥

४१९ देव वसे पंढरीसी । येती सनकादिक ऋषी । वंदोनी पुंडलिकासी । चरण वंदिती विठ्ठलाचे ॥ १ ॥ करिती कीर्तन गजर । नाना वाद्यें परिकर । नाचती निर्धार । भाळे भोळे आवडीं ॥२॥ दिंडी जागरण एकादशी । क्षीरापती द्वादशी । करिताती आवडीसी । भक्त मिळोनी सकळ ॥ ३ ॥ मिळतां क्षीरापती शेष । तेणें सुख सुरवरास । एका जनार्दनीं दास । वैष्णवांचा निर्धारें ॥ ४ ॥

४२० मिळाले भक्त अपार । होतो जयजयकार भीमातीरीं ॥ १ ॥ वैष्णवांचे मेळ मृदंग वाजती । दिंड्या पताका शोभती ॥ २ ॥ एका जनार्दनीं कीर्तनीं । नाचतसे शारंगपाणी ॥ ३ ॥

४२१ पंढरीये पांडुरंग । भोंवता संग संतांचा ॥ १ ॥ चंद्रभागा वाळुवंट । आहे नीट देव उभा ॥ २ ॥ पुंडलीक वेणुनाद । होतो आनंद अखंड ॥ ३ ॥ पद्मतळें गोपाळपूर । संत भार आहे तेथें ॥ ४ ॥ वैष्णवांचा गजर मोठा । आषाढी चोहटा नाचती ॥ ५ ॥ जाऊं तेथें लोटांगणीं । फिटेल आयणीं गर्भवास ॥ ६ ॥ भाळे भोळे येती भक्त । आनंदें नाचत वाळुवंटीं ॥ ७ ॥ लोटांगण घालूं चरणीं । शरण एका जनार्दनीं ॥ ८ ॥

४२२ त्रैलोक्याचा जो धनी । समाचरणीं पंढरीये ॥ १ ॥ धरूनियां बाळरूपा । उभाचि पहा पा विटेवरी ॥ २ ॥ शोभताती संतभार । करतीं जयजयकार नामघोष ॥३॥ पुढें दक्षिणवाहिनी भीमा । ऐसा महिमा तेथींचा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं वेधलें मन । लागलें ध्यान विठोबाचें ॥ ५ ॥

४२३ धन्य ते भाग्याचे । वास करिती पंढरीचे ॥ १ ॥ करती नित्य प्रदक्षिणा । स्नान चंद्रभागे जाणा ॥ २ ॥ पुंडलिकाची भेटी । वेणुनाद पाहती दृष्टी ॥ ३ ॥ करिती एकादशी । जाग्रण आनंदें मानसीं ॥ ४ ॥ तया पुण्या नाहीं लेखा । म्हणे जनार्दन एका ॥ ५ ॥

४२४ हरीचे ते दास । ज्यांचा पंढरीसी वास ॥ १ ॥ येती नेमें पंढरीसी । दरुशन घेती विठ्ठलासी ॥ २ ॥ करिती चंद्रभागे स्नान । पूर्वजा उद्धरती जाण ॥ ३ ॥ करिती गोपाळकाला । गोपाळपुरीं मिळोनि मेळा ॥ ४ ॥ ऐसा जया घडे नेम । एका जनार्दनीं निष्काम ॥ ५ ॥

४२५ तुम्हीं पंढरीये जातां । तरी मी पायां लागेन आतां । चरणरजें जाली साम्यता । तुमचे पाऊल माझे माथां ॥ १ ॥ जेथें जेथें पाऊल बैसे । एका एकपणेंविण असे ॥ धृ. ॥ पंढरीचे वाटे । पसरिले ते मी गोटे । पाया लागेन अवचटें । तें सुख आहे मज मोठें ॥ २ ॥ जेथें पाउलांचा माग । तेथें माझें अखंड अंग । चरणरज आम्हां भोग । काय करशील वैकुंठ चांग ॥ ३ ॥ संत भेटतील वाडेंकोडें । तरी मी आहे पायांपुढें । हेहि आठवण न घडे । तरी मी वाळवंटींचे खडे ॥ ४ ॥ यात्रा दाटेल घसणीं । लागेन अवघियां चरणीं । एका जनार्दनीं कीर्तनीं । आठवा आसनीं शयनीं ॥ ५ ॥

४२६ उभा कर ठेउनी कटीं । अवलोकी दृष्टी पुंडलीक ॥ १ ॥ न्या मज तेथवरी । या वारकरी सांगातें ॥ २ ॥ पाहीन डोळे भरुनी हरी । दुजी उरी ठेविना ॥ ३ ॥ मीपणाचा वोस ठाव । पाहतां गांव पंढरी ॥ ४ ॥ वारकरी महाद्वारीं । कान धरुनी करीं नाचती ॥ ५ ॥ शरण एका जनार्दन । ते संत पावन पतीत ॥ ६ ॥

४२७ देव भक्त उभे दोन्ही एके ठायीं । चला जाऊं पायीं तया गांवा ॥ १ ॥ आवडीचा हेत पुरेल मनाचा । उच्चारितां वाचा विठ्ठल नाम ॥ २ ॥ करुनियां स्नान पुंडलिकाची भेटी । नाचूं वाळुवंटीं वाहूं टाळी ॥ ३ ॥ जाऊं महाद्वारां पाहूं ता सांवळा । वोवाळूं गोपाळा निंबलोण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मनोरथ पुरे । वासना ते नुरे मागें कांहीं ॥ ५ ॥

४२८ निंबलोण करूं पंढरीच्या सुखा । आणि पुंडलिका भक्तराया ॥ १ ॥ परलोकींचे येती परतोनि मागुती । सर्व सुख येथें पहावया ॥ २ ॥ अष्ट महासिद्धी जयाचिये द्वारीं । होऊनि कामारी वोळंगती ॥ ३ ॥ मुक्तिपद देतां न घे फुकासाठीं । ते हिंडे वाळुवंटीं दीनरूप ॥ ४ ॥ एका जनार्दनीं करी निंबलोण । विटेसहित चरण ओवाळावें ॥ ५ ॥

४२९ दक्षिण द्वारका पंढरी । शोभतसे भीमातीरीं ॥१॥ चला जाऊं तया ठायां । वंदूं संतांचिया पायां ॥२॥ नाचूं हरुषें वाळुवंटीं । पुंडलीक पाहुनी दृष्टीं ॥ ३ ॥ पद्मतळें पाहतां डोळां । सुखसोहळा आनंद ॥ ४ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल भेटी । लाभे लाभ दुणावे पोटीं ॥ ५ ॥

४३० आम्ही मागतों फुकाचें । तुम्हां देतां काय वेंचे ॥१॥ संतसंग देईं देवा । दुजा नको कांहीं गोवा ॥ २ ॥ पंढरीसी ठाव द्यावा । हेंचि मागतसें देवा ॥३॥ एका जनार्दनीं मागत । येवढा पुरवी मनींचा हेत ॥ ४ ॥

४३१ तुमचें देणें तुमचें देणें । नको वैकुंठ हें पेणें ॥१॥ नानामतें मतांतर । अंतर गोवूं नये तेथ ॥ २ ॥ देणें ठेवा पंढरीसी । अहर्निशीं नाम गाऊं ॥ ३ ॥ भाळे भोळे येती संत । बोलूं मात तयांसी ॥४॥ चरणरज वंदीन साचें । एका जनार्दनीं म्हणे त्यांचें ॥५॥

४३२ माझें माहेर पंढरी । विठ्ठल उभा विटेवरी ॥१॥ संत मिळाले अपार । करिताती जयजयकार ॥२॥ टाळघोष पताका । नाचताती वैष्णव देखा ॥३॥ विठ्ठल नामें गर्जती । प्रेमभरीत नाचती ॥४॥ एका जनार्दनीं शरण । विठ्ठलनामें लाधे पूर्ण ॥५॥

४३३ पाहतां विश्राम सुखवस्ती धाम । पंढरी पुण्यग्राम भूमीवरी ॥१॥ जावया उद्वेग धरिला माझ्या मनें । उदंड शाहाणें तये ठायीं ॥२॥ एका जनार्दनीं मानिला विश्वास । नाहीं दुजी आस पायांवीण ॥३॥

४३४ माझें माहेर पंढरी । आहे भीवरेचे तीरीं ॥१॥ बाप आणि आई । माझी विठ्ठल रखुमाई ॥२॥ पुंडलिक बंधू आहे । त्याची ख्याती सांगूं काय ॥ ३ ॥ माझी बहीण चंद्रभागा । करीतसे पाप भंगा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । करी माहेरीची आठवण ॥५॥

४३५ येणें पुरतें सर्व काज । विश्वास हा जाहला मज । सांपडलें तें निज । बहुकाळाचें ठेवणें ॥ १ ॥ केला पुंडलिकें उपकार । दाविला सोपा मार्ग निर्धार । जडजीवां उद्धार । नाममात्रें एकाची ॥२॥ तुटलीं बंधनें । मागा पाहा अनुभवणें । एका जनार्दनीं म्हणे । धन्य वास पंढरीये ॥ ३ ॥

४३६ जगीं धन्य एक नाम । गातां उत्तम सर्व नेम ॥ १ ॥ धन्य धन्य पंढरपूर । नांदे भीमातीर विठ्ठल ॥ २ ॥ धन्य धन्य वेणुनाद । वसे गोविंद ते स्थानीं ॥३॥ धन्य धन्य गोपाळपूर । करिती गोपाळ गजर काला ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पद्माळें । अखंड सोहळे तये गांवीं ॥५॥

४३७ मूर्ति अनुपम्य विटेवरी साजिरी । पाउलें गोजिरीं कोंवळीं तीं ॥१॥ तेथें माझें मन वेडावलें भारी । परत माघारी परतेना ॥ २ ॥ वेधलासे जीव सुखा नाहीं पार । माहेरा माहेर पंढरी देखा ॥३॥ एका जनार्दनीं सुखाची वसती । भाविकां विश्रांति पंढरीराव ॥४॥

४३८ आशा धरूनि आलों येथवरी । पाहतां पंढरी पावन झालों ॥१॥ आलीया जन्माचें सुफळ झालें काज । दृष्टी गरुडध्वज पाहतांचि ॥२॥ एका जनार्दनीं पावलों विश्रांति । पाहतां विठ्ठलमूर्ती भीमातटीं ॥ ३ ॥

४३९ या पंढरीचें सुख पाहतां डोळां । उभा तो जिव्हाळा योगीयांचा ॥१॥ म्हणोनियां मन वेधलें चरणीं । आणिक त्यागुनी बुद्धी दिली ॥ २ ॥ जना-

देनावा एका धांवे लोटांगणीं । करी वोवाळणी शरीराची ॥३॥

४४० ऐसे संतभार ऐसें भीमातीर । ऐसा जयजयकार सांगा कोठें ॥१॥ समुद्रवलयांकित तीर्थे असतीं पावन । परी ऐसें महिमान नाहीं कोठें ॥२॥ ऐसा नामघोष आनंद सोहळा । न देखे आणिके स्थळां माझे नेत्रीं ॥३॥ एका जनार्दनीं पंढरीवांचुनी । आनंद माझे मनीं नाहीं कोठें ॥४॥

४४१ श्रीमुखाचें सुख पाहतां पाहतां । नयन तत्त्वतां वेधले माझे ॥१॥ सांवळा सुंदर कटीं ठेवुनी कर । रूप तें नागर भीमातीरीं ॥२॥ नित्य परमानंद आनंद सोहळा । सनकादिक या स्थळां येती जाती ॥३॥ वैष्णवांचा थाट टाळ घोळ नाद । दिंड्या मकरंद हर्ष बहु ॥४॥ सन्मुख ती भीमा वाहे अमृतमय नीर । जडजीवां उद्धार स्नानमात्रें ॥ ५ ॥ एका जनार्दनीं मुक्तीचें माहेर । क्षेत्र तें साचार पंढरपूर ॥६॥

४४२ देहनिशा क्रमोनि मी तंव आलिये । इहीं वैष्णवीं आणिलें पंढरीये ॥ १ ॥ बाई वो मज ध्यान लागलें पंढरीचें । तें तंव जागृती स्वप्नीं नवचे ॥ २ ॥ नयन नाचती सुखाचा हा गोंधळ । साचे सन्मुख देखोनि श्रीविठ्ठलु ॥ ३ ॥ आनंदु आसमाय होतीं मन: पोटीं । नवल वालभें विठ्ठलीं जाली भेटी ॥ ४ ॥ मी आन न देखें वो नाइकें कर्णीं । ठसा ठसावला अभिन्नपणीं वो ॥ ५ ॥ जनीं नसतां संचारू जाला देखा । एका जनार्दनीं धरिला एकी एका वो ॥ ६ ॥

४४३ सारुनी दृश्य देखतां जालीसे ऐक्यता । पाहे कृष्णनाथा पंढरीये ॥ १ ॥ कर ठेउनी कटीं वुंथी वाळुवंटीं । वैजयंती कंठीं आर्ती माझी ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण त्याची कृपा पूर्ण । पाहतां पाहतां मन हारपलें ॥ ३ ॥

४४४ तेथें मुख्य हरिहर । शोभे चंद्रभागा तीर ॥१॥ जाऊं चला पंढरपुरा । भेटूं आपुल्या माहेरा ॥ २ ॥ आर्त सांगूं जीवाचा । पुनीत ठाव हाचि साचा ॥ ३ ॥ हरिहरां होय भेटी । वास तयांसी वैकुंठीं ॥४॥ एका जनार्दनीं शरण । पंढरी पुण्यठाव भीवरा जाण ॥ ५ ॥

४४५ साधन तें सार पंढरीची वारी । आन तूं न करी सायासाचें ॥ १ ॥ वेद तो घोकितां चढे अभिमान । नाडेल तेणें जाण साधन तें ॥ २ ॥ शास्त्रमत-वाद कासया पसार । करी सारासार वारी एक ॥ ३ ॥ पुराण सांगतां मन वेडावलें । निंदूं जें लागलें आणिकांसी ॥ ४ ॥ ग्रंथ पहावे तरी आयुष्य क्षणीक । व्यर्थ खटपट करुनी काई ॥ ५ ॥ एका जनार्दनीं साराचें पैं सार । विठ्ठल त्रिअक्षर जप करी ॥ ६ ॥

४४६ उदंड तीर्थें पृथ्वीच्या ठायीं । ऐसा महिमा नाहीं कोणें जागीं ॥ १ ॥ तया पुंडलिकें आम्हां सोपें केलें । परब्रह्म उभें ठेलें विटेवरी ॥ २ ॥ भूवैकुंठ पंढरी क्षेत्र । पवित्रां पवित्र उत्तम हें ॥ ३ ॥ म्हणोनी करा करा लाहो । एकदां जा हो पंढरीये ॥ ४ ॥ एका आगळें अक्षर । एका जनार्दनीं निर्धार ॥ ५ ॥

४४७ काशी क्षेत्र श्रेष्ठ सर्वांत पवित्र । परी तेथें वेंचे जीवित्व श्रेष्ठ तेव्हां ॥ १ ॥ तैसी नोहे जाणा पंढरी हे । पेठ वैकुंठा वैकुंठ जुनाट हें ॥ २ ॥ न लगे वेंचणें धन वित्त जीव । मुख्य एक भाव पुरे येथें ॥ ३ ॥ दरुशनें मुक्ति प्राणिया सर्वथा । चुकती नाना चळता पापांचीया ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पंढरीसी जा रे । प्रेमसुख मागा रे विठ्ठल देवा ॥ ५ ॥

४४८ सप्तपुऱ्या क्षेत्र पवित्र सोपार । तयांमाजीं श्रेष्ठ पंढरपूर ॥ १ ॥ जा रे आधीं तया ठाया । जेथें वास वैकुंठराया ॥ २ ॥ पुंडलीकाचे दरुशनें । तुटती प्राणीयांचीं बंधनें ॥ ३ ॥ स्नान करितां भीमेसी । पूर्वज उद्धरती सरसी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पावन । देव क्षेत्र तीर्थ उत्तम जाण ॥ ५ ॥

४४९ उत्तम स्थळ पंढरी देखा । उभा सखा विठ्ठल ॥ १ ॥ एकदां जा रे तये ठायां । प्रेमा उणें मग काई ॥२॥ भाग्य जोडेल सर्व हातां । त्रैलोकीं सत्ता होईल ॥३॥ मोक्षमुक्ती तुम्हांपुढें । दास्यत्व घडे तयांसी ॥४॥ एका जनार्दनीं त्याचे भेटी । सुखसंतोषा पडेल मिठी ॥ ५ ॥

४५० एकदां जा रे तेथवरी । पहा पुंडलीक हरी ॥ १ ॥ जन्मा आलीया विश्रांती । निरसेल अवघी भ्रांती ॥ २ ॥ विठ्ठल पायीं ठेवा भाळ । जन्म मग तुमचा सुफळ ॥ ३ ॥ पुंडलीका नमस्कार । विनवणी जोडोनि कर ॥ ४ ॥ म्हणे एका जनार्दनीं । पंढरी पुण्याची अवनी ॥ ५ ॥

४५१ पंढरीसी जा रे आधीं । कृपानिधी तो पहा ॥ १ ॥ संसाराची तुटेल बेडी । उबगे घडी पंढरीये ॥ २ ॥ गाताती भाळे भोळे । प्रेमें सांवळें नाचत ॥३॥

कुंचे पताका गरुड टके । वैष्णव निके मेळ मिळे ॥४॥ दिंडी कथा जागरण । एका जनार्दनीं ते पावन ॥ ५ ॥

४५२ पंढरीसी जा रे सदा । पुंडलीक वरदा येथें उभा ॥ १ ॥ तुम्हीं करा हाचि नेम । धरा संतसमागम ॥ २ ॥ देतो सकळांसि मोक्ष । न लगे ध्येय ध्यान लक्ष ॥ ३ ॥ जनार्दनें शिकविलें । एका जनार्दनीं लाधलें ॥ ४ ॥

४५३ गाती नाचती आनंदें वैष्णवजन । तें दाखवा भुवन पंढरी ॥१॥ आदरें येतो वारकरी । नानापरी सवंगडे ॥२॥ नरनारी एके ठायीं । पाहती विठ्ठल रखुमाई ॥ ३ ॥ सुख अद्भुत विश्रांती । एका जनार्दनीं धरा चित्तीं ॥ ४ ॥

४५४ संसारा आलिया जा रे पंढरपुरा । पांडुरंग सोयरा पहा आधीं ॥ १ ॥ पुरती मनोरथ इच्छिले ते साचे । अनंता जन्मांचे दोष जाती ॥ २ ॥ करितां स्नान भीमरथी तटीं । पुंडलीक दृष्टी लक्षूनियां ॥ ३ ॥ वेणुनाद गया पिंडदान फळ । गोपाळपूर सकळ देखिलिया ॥ ४ ॥ एका जनार्दनीं साराचें तें सार । पंढरी माहेर सकळ जीवां ॥ ५ ॥

४५५ जन्मासी येऊनि पहा रे पंढरी । विठ्ठल भीमातीरीं उभा असे ॥ १ ॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी । आलियांसी तारी दरुशनें एका ॥ २ ॥ पंचक्रोशी प्राणी पुनीत पैं सदा । ऐशी ही मर्यादा पंढरीची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कीर्तनगजर । ऐकतां उध्दार सर्व जीवां ॥ ४ ॥

४५६ हरी म्हणोनी टाकी पाय । तया लाभा उणें काय ॥ १ ॥ नेमें जाती पंढरीसी । आषाढी कार्तिकी वारीसी ॥ २ ॥ घनदाट पिकली पेठ । आलें चोखट ग्राहीक ॥ ३ ॥ वस्तु अमोल विटेवरी । एका जनार्दन अंगिकारी ॥ ४ ॥

४५७ निर्धारितां सुख पंढरीसी आहे । म्हणोनि उभारिती बाह्या वेदशास्त्रें ॥ १ ॥ साधन पसारा न करी हैरावैरा । जाय तूं निर्धारा पंढरीये ॥ २ ॥ एका जनार्दनीं धरुनी विश्वास । विठोबाचा दास होय वेगें ॥ ३ ॥

४५८ स्वहित हित विचारीं मानसीं । कां रे नागविसी देहाते या ॥१॥ सावधान होईं पाहे बा पंढरी । धरीं तूं अंतरीं संतसंग ॥ २ ॥ नको पडूं फेरी चौर्‍यांयशीं आवृत्ती । गाय तूं कीर्ति वैष्णवांची ॥ ३ ॥ तरले बहुत तरती भरंवसा । विश्वास हा बापा धरीं ऐसा ॥ ४ ॥ सुगम सोपा चुकती जेणें खेपा । एका जनार्दनीं जपा विठ्ठलनाम ॥ ५ ॥

४५९ करा करा लागपाठ । धरा पंढरीची वाट । पुंडलिकाची पेठ । सोपी आहे सर्वांसी ॥ १ । नाहीं कोठें गोवा गुंती । दुजा नको रे सांगाती । एक चित्तवृत्ति । दृढ करीं मानसीं ॥ २॥ नको माझें आणि तुझें । टाकी परतें कां रे ओझें । संतचरण रज । सेवीं कां रे आदरें ॥ ३॥ तुटती भवजाळ गुंती । सहज होतसे विरक्ती । एका जनार्दनीं प्रीती । धरा संतचरणां ॥४॥

४६० श्रीपांडुरंगाचें दरुशन । वास पंढरीसी जाण । कोटी यागांचें पुण्य । तया घडे नित्याची ॥ १ ॥ हाचि माना रे विश्वास । धरा संतवचनीं निजध्यास । मोक्षाचा सायास । न लगे कांहीं अणुमात्र ॥ २ ॥ न रिघा तयांचे हव्यासें । साधनांचे नको फांसे । कीर्तन सौरसें । प्रेमें नाचा रंगणीं ॥ ३॥ नका माझें आणि तुझें । टाका परतें उतरुनी वोझें । एका जनार्दनीं सहजें । विठ्ठलनामें मुक्त व्हां ॥४॥

४६१ न लगे करा खटपट । धरा पंढरीची वाट । विठ्ठलीं बोभाट । अट्टाहास्य करावा ॥ १ ॥ धरा संतांचा समागम । मुखीं उच्चारा रे नाम । आतां क्रोध आणि काम । दिगंतरीं पळाली ॥ २ ॥ आशा मनशांचें काज । सहज दूर होतें निज । घडतां सहज । विठ्ठलाचें दरुशन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । राखा पायीं तें नेमून । काया वाचा प्राण । तया पदीं होईजे ॥ ४ ॥

४६२ तरीच यावें जन्मा । ठेवा पांडुरंगीं प्रेमा ॥ १ ॥ नाहीं तरी श्वानसुकर । जन्मा आले ते अपार ॥ २ ॥ नेणे पंढरीची वारी । जन्मा आला तो भिकारी ॥ ३॥ संतसेवा दया नेणें । जन्मा आला तो पाषाण ॥ ४॥ कधीं करूं नेणें भजन । बैसे गृहीं मण्डुक जाण ॥ ५ ॥ नाहीं विश्वास मानसीं । एका जनार्दनीं म्हणे त्यासी ॥ ६ ॥

४६३ करुनी निर्धारा । जाय जाय पंढरपुरा ॥ १ ॥ उणें पडों नेदी कांहीं । धांवे देव लवलाहीं ॥ २ ॥ संकट कांहीं व्यथा । होऊं नेदी सर्वथा ॥ ३ ॥ शंख चक्र घेउनी करीं । एका जनार्दनीं घरटी करी ॥४॥

४६४ पंचक्रोशीं पाप नासे । ऐसा देव तेथें वसे ॥१॥ चला चला पंढरपुरा । दीन अनाथांच्या माहेरा

॥ २ ॥ चंद्रभागे करितां स्नान । होती कोटी कुळें पावन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भेटी । तुटे जन्ममरण गांठी ॥ ४ ॥

४६५ देशाविरहीत काळासी अतीत । ते देवभक्त पंढरीये ॥ १ ॥ जाऊनियां कोणी पहा । देवाधिदेवा विठोबासी ॥ २ ॥ जन्ममरणाचे तुटतील फांसे। पाहतां उल्हासें देवभक्तां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विटेवरी निधान। लेवुनी अंजन उघडे पहा हो ॥ ४ ॥

४६६ भाव धरुनी शरण येती । तयां मोक्ष सायुज्यप्राप्ती । ऐशी वेद आणि श्रुती । गर्जतसे सादर ॥ १ ॥ म्हणोनी न करा आळस । सुखें जा रे पंढरीस । प्रेम कीर्तनाचा रस। सुखें आदरें सेविजे ॥२॥ पाहतां नीरा भीवरा दृष्टीं । स्नानें वास त्या वैकुंठीं। पूर्वजही कोटी । उद्धरती सर्वथा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांग । भाक दिधली पांडुरंगें । धन्य संचित जें भाग्य । तेंचि योग्य अधिकारी ॥ ४ ॥

४६७ मार्ग ते बहुतां आहेत । सोपा पंथ पंढरीचा ॥ १ ॥ येचि मार्गें सुखें जातां । हरे संसाराची चिंता ॥ २ ॥ मार्गीं नाहीं गोवागुंती । पाहतां निवृत्ति क्रोधकामां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें वर्म । आहे तें सुधर्म सर्वांसी ॥ ४ ॥

४६८ जयां सुखाची आशा आहे । त्यांनीं जावें पंढरीसी ॥ १ ॥ अमुपासी अमूप देतां । परी भरले ते सर्वथा ॥ २ ॥ सुखाचिया भरल्या राशी। पाहिजे त्यासी त्यानें घ्यावें ॥ ३ ॥ न सरेचि ब्रम्हादिकीं । भरलें देखा भरतें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सुख । अलौकीक देख पंढरीये ॥ ५ ॥

४६९ जयां आहे मुक्तीचें कोडें । तें तें उघडें नांदत ॥ १ ॥ वेगीं जाय पंढरपुरा । मुक्ति सैरा फुकटची ॥ २ ॥ मोक्ष मुक्ति राबे द्वारीं । वैष्णवा घरीं कामारी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मुक्ति त्याग । वैष्णव पांग धरिती ॥ ४ ॥

४७० महादोषीयासी ठाव । एक पंढरीचा राव ॥१॥ तयावीण दुजा नाहीं । आणिका प्रवाहीं नको पडूं ॥ २ ॥ जाशी देशदेशांतरीं । कोठें ही सरी ऐसी नाहा ॥ ३ ॥ एका देव उभा विटे । दावा कोठें आहे तो ॥ ४ ॥ एका वैष्णवांचा मेळ । गदारोळ नामाचा ॥ ५ ॥ ऐसें चंद्रभागा तीर्थ । आहे समर्थ कोठें पां ॥ ६ ॥ ऐसा पुंडलीक संत । दरुशनें तारीत जडजीवां ॥ ७ ॥ एका जनार्दनीं ठाव । वैकुंठराव उभा जेथें ॥ ८ ॥

४७१ मोकळा मार्ग पंढरीचा । नाहीं साधन करणें साचा । योग अभ्यासाचा । श्रमचि नको ॥ १ ॥ जाय जाय पंढरपुरा । पाहे दिनांचा सोयरा । पुंडलिकें थारा । दिधला जया आवडीं ॥ २ ॥ तेथें करितां वसती । नाहीं तया पुनरावृत्ती । जन्ममृत्यूची खंती । न करी कांहीं ॥ ३ ॥ पावन तीर्थ महिवरी । समान या नाहीं दुसरी । एका जनार्दनीं निर्धारी । प्रेमें वारी करिती ॥ ४ ॥

४७२ पुंडलीक म्हणतां वाचें । पाप जातें रे जन्माचें । जिहीं देखिलें पद याचें । धन्य भाग्याचे नर ते ॥ १ ॥ जाती पंढरीसी आधीं । तुटे तयांची उपाधी । ऋद्धि सिद्धी मांदी । तिष्ठतसे सर्वदा ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति धांवती मागें । आम्हां अनुसरा वेगें । ऐसें म्हणोनि वेगें । चरणीं मिठी घालिती ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । विटे उभा मोक्षदानीं । लागतां तयाचे चरणां । पुनरावृत्ति न येती ॥ ४ ॥

४७३ विठ्ठल देवाधि देवो । भक्तजनांचें निवारी बिहो । तो पंढरीचा रावो । विटे उभा ठाकला ॥१॥ मना लागो त्याचा छंद । निरसोनि भेदाभेद । अवघाचि गोविंद । ठसावें हृदयीं ॥ २ ॥ स्नान केल्या चंद्रभागे । पातकें नासतील वेगें । संकल्प विकल्प त्याग । दरुशन घेतांची ॥ ३ ॥ ऐसा घडतां हा नेम । तयापाशीं पुरुषोत्तम । एका जनार्दनीं काम । देव करी स्वयें अंगें ॥४ ॥

४७४ जाणत्या नेणत्या एकाचि ठाव । तेणेंहि भजावा पंढरीराव ॥ १ ॥ नका पडूं आणिका भरीं । तेणें फेरी चौऱ्यांशीची ॥ २ ॥ लागा पंढरीच्या वाटे । तेणें तुटे बंधन ॥३॥ अनुभवें अनुभव पाहीं । येच देहीं प्रत्यक्ष ॥ ४ ॥ एका जनार्दनीं प्रचीत । विठ्ठलनामें मुक्त सत्य ॥ ५ ॥

४७५ रमेसह पंढरी आला । येऊनि भेटला पुंडलिका ॥ १ ॥ म्हणे उभारुनि बाह्या हात । तरतील नामें महापतित ॥ २ ॥ नका कांहीं आटाआटी । योग यागांची कसवटी ॥ ३ ॥ ब्रह्मज्ञान न राधे लोकां । मुखीं घोका विठ्ठला ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं । सांग वचनीं पुंडलीक ॥ ५ ॥

४७६ प्रेमळांसी विश्रांतिस्थान । महा मुक्ति कर

जोडोन । ऋद्धि सिद्धी वोळंगण । तिष्ठती जाण पंढरीये ॥ १ ॥ धन्य धन्य विठ्ठलराव । उभा देवांचा तो देव । दरुशनें निरसे भेव । यम काळ दूतांचें ॥२॥ नाम न विटेचि रसना । सुलभ हा पंढरीराणा । एका शरण जनार्दना । सदा वाचे उच्चारी ॥ ३ ॥

४७७ प्रभातेसी उठोनी । स्नान करिती अनुदिनीं । विठ्ठल दरुशनीं । प्राणी मुक्त संसार ॥ १ ॥ धन्य पंढरीचा वास । सुख मिळे अविनाश । कुळीं वैष्णव निःशेष । रामकृष्ण उच्चार ॥ २ ॥ करी नेमें एकादशी । जाय नेमें पंढरीसी । ऐसें या तीर्थासी । नेमें करितां जोडे ॥ ३ ॥ सर्व पर्वकाळ घडे । कोटी अश्वमेध जोडे । पुण्य तें उघडें । विठ्ठल रूपडें पाहतां ॥ ४ ॥ ऐसा जया नेम धर्म । न चुके वाचा नामस्मरण । एका जनार्दनीं स्मरण । विठ्ठलदेवो आवडी ॥ ५ ॥

४७८ नरनारी जातां पंढरीसी । सुकृतांची रासी ब्रह्मा नेणे ॥ १ ॥ अभाव भावना न धरी कल्पना । मस्तक चरणावरी ठेवी ॥४॥ एका जनार्दनीं पंढरी माहेर । आम्हासी निर्धार देवें केली ॥ ३ ॥

४७९ उभारुनी बाह्या सकळां आश्वासन । या रे अठरा वर्ण पंढरीसी ॥ १ ॥ दरुशनें एका मुक्ती जोडे फुका । साधनांचा धोका करूं नका ॥ २ ॥ माया मोह आशा टाकूनि परती । चरणीं चित्तवृत्ति जडों द्यावी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांगे लहान थोरां । पंढरीस बरा कृपाळु तो ॥ ४ ॥

## ( श्रीविठ्ठलमाहात्म्य )
## पुंडलिकभक्तिसामर्थ्य.

४८० द्वारकेहुनी जगजेठी । आला पुंडलिकाचे भेटी । पाऊलें सरळ गोमटीं । बाळ सूर्यापरी ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग । मूर्ति सावळी सवेग । गाई गोप संवगडे लाग । मिळोनि सकळांसहित ॥ २ ॥ पाहतां पुंडलिकाचें वदन । वेडावलें भक्तीचें भूषण । केलेंसे स्थापन । समचरणीं विटेवरी ॥ ३ ॥ न बैसे अद्यापि खालीं । ऐशी कृपेची माउली । एका जनार्दनीं आली । भक्तिकाजा विठ्ठल ॥४॥

## पुंडलिकाची जगदोद्धारार्थ विनवणी.

४८१ जोडोनियां हात दोन्ही । पुंडलीक मुनी विनवीत ॥१॥ आहा तैसें उगेचि रहा । माझिये पहा प्रेमासी ॥ २ ॥ जे जे येती ज्या ज्या भावें । ते ते तारावें कृपाळुवा ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं । बाह्या पसरुनि हरि बोले ॥ ४ ॥

## जगदोद्धारार्थ श्रीकृष्णानें दिलेला वर.

४८२ धन्य धन्य पुंडलिका । तारिले लोकां सकळां ॥१॥ तुझे भाकेगुंतुनी येथें । तारीन पतीत युगायुगीं ॥ २ ॥ भोळे भोळे येतील जैसे । दरुशनें ते तैसे वैकुंठीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देऊनी वर । राहे विटेवर मग उभा ॥ ४ ॥

४८३ निकट सेवे धांऊनि आला । पृष्ठीं राहिला उभाची ॥ १ ॥ ऐसा क्षीरसिंधुवासी । भक्तापाशीं तिष्ठत ॥ २ ॥ नाहीं मर्यादा उल्लंघन । समचरण विटेवरी ॥३॥ एका जनार्दनीं गोजिरें ठाण । धरुनी जघन उभा हरि ॥ ४ ॥

४८४ भक्तद्वारीं उभाचि तिष्ठे । न बोले न बैसे खालुता ॥ १ ॥ युगें जाहलीं अठ्ठावीस । धरुनी आस उभाचो ॥ २ ॥ जड मूढ हीन दीन । तारी दरुशनें एकाची ॥३॥ एका जनार्दनीं ऐसा वर । दिधला साचार भक्तांसी ॥ ४ ॥

४८५ एकरूप मन जालेंसे दोघांचें । देव आणि भक्तांचें रूप एका ॥ १ ॥ पुंडलीकाकारणें समुच्चय उभा । त्रैलोक्याची शोभा पांडुरंग ॥ २ ॥ ध्यातां चित्त निवे पाहतां ठसावें । एका जनार्दनीं सांठवें हृदयीं रूप ॥ ३॥

४८६ घेऊनियां परिवारा । आला असे पंढरपुरा ॥ १ ॥ भक्तां पुंडलिकासाठीं । उभा ठेवुनी कर कटीं ॥ २ ॥ केशर कस्तुरी चंदन टिळा । कानीं शोभे सोनसळा ॥ ३ ॥ वामांकीं शोभे रुक्मिणी । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

४८७ आवडीच्या सुखा सुखावला । वैकुंठ सांडोनीं पंढरीये आला ॥ १ ॥ देखोनियां पुंडलीका । उभा सम पाई देखा ॥ २ ॥ न बैसे खालीं । युगें अठ्ठावीस जालीं ॥ ३ ॥ ऐशी भक्तांची माउली । उभा तिष्ठत राहिली ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देव । उभा राहिला स्वयमेव ॥ ५ ॥

४८८ ऐशी आवडी मीनली सुखा । देव उभा भक्तद्वारीं देखा ॥ १ ॥ धन्य धन्य पुंडलीका । उभें केलें वैकुंठनायका ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस नीट । उभा विटे

कर धरूनियां कट ॥३॥ एका जनार्दनीं शरण जाऊं । काया वाचा मनें त्यासी ध्याऊं ॥ ४ ॥

४८९ विठ्ठल रुक्मिणी राही सत्यभामा । एकरूपी परमात्मा पंढरीये ॥ १ ॥ कैवल्य उघडें क्षीरसागर निवासी । तपें पुंडलिकासी वश्य जाहलें ॥२॥ अणुरेणुपासोनि भरुनि उरला । तो म्यां देखियेला पंढरीये ॥३॥ एका जनार्दनीं सांवळा श्रीकृष्ण । जनीं जनार्दन पूर्ण भरला ॥४॥

४९० कैसा पुंडलीका उभा केला । वैकुंठाहुनीं भरली चाळविला ॥१॥ नेणे रे कैसें बोळलें । अधीन केलें आपुलिया ॥२॥ दर्शनमात्रें प्राणियां उद्धार । ऐशी कीर्ति चराचर ॥३॥ एका जनार्दनीं म्हणे पुंडलिका । भक्त शिरोमणी तूंचि देखा ॥ ४ ॥

४९१ डोळियाची भूक हारपली । पाहतां श्रीविठ्ठल माउली ॥ १ ॥ पुंडलिकें बरवें केलें । परब्रह्म उभें ठेलें ॥ २ ॥ अठ्ठावीस युगें जालीं । अद्यापि न बैसे खालीं ॥ ३ ॥ उभा राहिला तिष्ठत । आलियासी क्षेम देत ॥४॥ ऐसा कृपाळु दीनाचा । एका जनार्दनीं साचा ॥ ५ ॥

४९२ युगें अठ्ठावीस जालीं । परी न बैसे तो खालीं ॥ १ ॥ कोण पुण्य न कळे माय । विटे लाधलें या विठ्ठलाचे पाय ॥ २ ॥ नाहीं बोलाचालीं मौन धरियेलें । कैसें चाळविलें पुंडलिकें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विटेवर । दोन्हीं कटीं ठेविले कर ॥ ४ ॥

४९३ म्हणती दक्षिण द्वारका । पुण्यभूमी वैकुंठ देखा । पाहूनियां पुंडलीका । राहिलासे उभा विटेवरी ॥ १ ॥ काय वर्णावा महिमा । न कळेचि आगम निगमां । वेदादिक पावले उपरमा । जयासी पैं वर्णितां ॥ २ ॥ तो आला आपुले पायीं । भक्त इच्छा धरुनी हृदयीं । एका जनार्दनीं सायीं । सर्वांवरी सारखी ॥ ३ ॥

४९४ ताराया भोळे भक्त । कृपावंत पंढरीनाथ ॥ १ ॥ करुनी मीस पुंडलिकाचें । उभा उगाचि विटेवरी दिसे ॥ २ ॥ ऐसा भक्तांसी भुलला । ताराया उभा ठेला ॥ ३ ॥ जनीं जनार्दन । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

४९५ उभा पुंडलिकापुढें । कटीं कर ठेउनी रूपडें ॥ १ ॥ पाहतां वेडावलें मन । शिवा लागलेंसे ध्यान ॥ २ ॥ सनकादिक वेडावले । ते पुंडलिकें भुलविले ॥ ३ ॥ भक्तां देखोनि भुलला । एका जनार्दनीं सांवळा ॥ ४ ॥

४९६ आला पुंडलिकासाठीं । उभा सम पाय विटीं ॥ १ ॥ विठु मदनाचा पुतळा । भुलवणा तो सकळां ॥ २ ॥ अराध्य दैवत शिवाचें । कीर्तनीं उघडाची नाचे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । वोवाळावें पायांवरून ॥ ४ ॥

४९७ सर्वांचें जें मूळ सर्वांचें जें स्थळ । ते पदयुगुल विटेवरी ॥१॥ साजिरें साजिरें कर दोन्ही कटीं । उभा असे तटीं भीवरेच्या ॥ २ ॥ नये ध्याना मना आगमाच्या खुणा । कैलासीचा राणा ध्यात जया ॥३॥ एका जनार्दनीं परे परता दुरी । पुंडलिकाचे द्वारीं उभा विटे ॥ ४ ॥

४९८ ॐकार सह मकार आदी अंत नाहीं जया । तें पुंडलिकें भुलवोनि आणिलें या ठायां ॥ १ ॥ भुललें वो माय पुंडलिकाप्रीतीं । उभाचि राहे परी खेद न करी चित्तीं ॥ २ ॥ अठरा पुराणांसी वाड शास्त्रें वेवादती । तो सांवळा श्रीकृष्ण उभा विटे पुंडलिकाचे भक्ती ॥ ३ ॥ वेद वेदांतरें मत मतांतरें न कळे श्रुती पैं वेवादती । तो एका जनार्दनाचे हृदयीं सांवळा घेऊनि बुंथी ॥ ४ ॥

४९९ अकार तो अकारु मकार तो मकारू । उकाराचा पालऊ शोभे गे माय ॥ १ ॥ आदि अंत नसे ज्या रूपा वेगळें । तें कैसें बोळलें पुंडलिका गे माय ॥ २ ॥ वेद उपरमला पुराणें कुंठीत । शास्त्रांची मती नेणत तया सुखा गे माय ॥ ३ ॥ जाणते नेणते सर्व वेडावले । ठकलेचि ठेले सांगूं काय गे माय ॥ ४ ॥ या पुंडलिकें वेडाविलें चालवूनि गोविलें । एका जनार्दनीं उभें केलें विटेवरी गे माय ॥ ५ ॥

५०० अकार उकार मकारांपरता सर्वेश्वर । कटीं धरुनी कर उभा विटे ॥ १ ॥ नीरा भीवरा संगम पुंडलीक मुनी । नारद वेणुनाद ऐसें स्थळ लक्षुनी ॥ २ ॥ योगियां हृदयींचें ठेवणें गोमटें । जोडलें उद्धटें पुंडलीका ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी आनंद सोहळा । संतांचा मेळा घनवट ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जनार्दन एकपणीं । त्रैलोक्याचा धनी विटेवरी ॥ ५ ॥

५०१ परात्पर परिपूर्ण सच्चिदानंदघन । सर्वां अधिष्ठान दैवताचें गे माय ॥ १ ॥ तें लाधलें लाधलें पुंडलिकाचे प्रीती । येत पंढरीप्रती अनायासें गे माय ॥ २ ॥ जगडंबर पसारा लपवोनि सारा गे माय ।

धरियेला थारा पुंडलिकाचेनि प्रेमें गे माय ॥ ३ ॥ ओहं मा न कळे कांहीं सोहं देती ग्वाही गे माय । कोहमाची तुटली बुंथी एका जनार्दनीं प्रीति गे माय ॥ ४ ॥

५०२ वार्णितां वेदमती कुंठित पैं जाली । पुराणें भागलीं विवादतां ॥ १ ॥ सोपारा सुगम पुंडलिकापाठीं । उभा जगजेठी विटेवरी ॥ २ ॥ लक्ष्मी ते स्वयें रुक्मिणी शोभत । विझणें वारीत सत्यभामा ॥ ३ ॥ सांडुनी रत्नकिळा गळां तुळसीमाळा । चंदनाचा टिळा केशरयुक्त ॥ ४ ॥ गोपाळ गजरें आनंदें नाचती । मध्यें विठ्ठलमूर्ति प्रेमें रंगें ॥ ५ ॥ मनाचें मोहन योगाचें निजधन । एका जनार्दनीं चरण विटेवरी ॥ ६ ॥

५०३ ज्याचे पुराणीं पोवाडे । तो हा उभा वाडेंकोडें ॥ १ ॥ कटीं कर ठेवून गाढा । पाहे दिगंबर उघडा ॥ २ ॥ धरुनी पुंडलिकाची आस । युगें जाहलीं अठ्ठावीस ॥ ३ ॥ तो हा देव शिरोमणी । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

५०४ स्थूळ ना सूक्ष्म कारण ना महाकारण । यापरता वेगळाचि जाण आहे गे माय ॥ १ ॥ पुंडलिकाचें प्रेमें मौनस्थ उभा । कोणा न बोले उगला उभा ठेला गे माय ॥ २ ॥ निंद्य वंद्य जगीं यावें भेटीलागीं । दरुशनें उद्धार वेगीं तया गे माय ॥ ३ ॥ ऐसा लाघवी खेळ खेळोनी निराळा । एका जनार्दनीं डोळां देखिला गे माय ॥ ४ ॥

५०५ पंचविसावा श्रीविठ्ठलु । चौविसांवेगळा तयाचा खेळू गे माय ॥ १ ॥ तो पुंडलीका कारणें येथवरी आला । उभा उगा ठेला विटेवरी गे माय ॥ २ ॥ जनीं जनार्दन करावया उद्धरण । एका जनार्दनीं समचरण साजिरे गे माय ॥ ३ ॥

५०६ सुंदरु बाळपणाची बुंथी घेऊनी श्रीपती । सनकादिकां गाती तेथें कुंठित गे माय ॥ १ ॥ ब्रह्म वेडावलें तें वेडावलें । पुंडलिकाधीन झालें गे माय ॥ २ ॥ इंद्र चंद्र गुरु उपरमोनी जया सुखा । तो वाळूवंटीं देखा संतांसवें गे माय ॥ ३ ॥ ऐसा नटधारी मनु सर्वांचे हरी । एका जनार्दनाचे करीं उच्छिष्ट खाय ॥ ४ ॥

५०७ अभक्त सभक्त दोघांसी सारखा दिसे । लवणीं जैसें न दिसे दुजेपण गे माय ॥ १ ॥ ऐसा परात्पर सोइरा पुंडलिकाचे पाठीं । मौन्य वाक्पुटीं धरूनी गे माय ॥ २ ॥ पुण्य पाप सर्व देखतसे दृष्टीं । चालवी सर्व सृष्टी गे माय ॥ ३ ॥ ऐसा वेषधारी उभा भीवरे तीरीं । एका जनार्दनीं अंतरीं दृढ ठसावे गे माय ॥ ४ ॥

५०८ ओहं सोहं यापरतें प्रमाण । जघन सघन विटेवरी ॥ १ ॥ भीवरासंगम पुंडलीक दृष्टी । सम कर कटीं उभा हरी ॥ २ ॥ वेदाचें जन्मस्थान विश्रांति पैं मूर्ती । त्रैलोक्य कीर्ति विजयध्वज ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पुराणासी वाड । पुरवितसे कोड भाविकांचें ॥ ४ ॥

५०९ विठ्ठल सांवळा पंढरीये उभा । धन्य त्याची शोभा शोभतसे ॥ १ ॥ पुंडलीका मागें कर ठेवुनी कटीं । समपाय विटीं देखियेला ॥ २ ॥ राही रखुमाई शोभती त्या वाहीं । वैष्णव दोही बाहीं गरुडपारीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहूनियां ध्यान । मनाचें उन्मन होत असे ॥ ४ ॥

५१० अणुरेणुपासोनी सबाह्य भरला । भक्तीं उरला संतांपुढें ॥ १ ॥ उघडाची दिसे सर्वां ठायीं वसे । मागणेंचि नसे दुजें कांहीं ॥ २ ॥ कर ठेऊनि कटीं निष्ठत रहाणें । वाट ते पहाणें मागेल कांहीं ॥ ३ ॥ चंद्रभागा तीर पुंडलिका समोर । एका जनार्दनीं हरिहर उभे राहाताती ॥ ४ ॥

५११ सकळीं ध्याइला सकळीं पाहिला । परी असे भरला जैसा तैसा ॥ १ ॥ युगानुयुगीं मीनले व्यापारी । परी न पवेचि हरी पुंडलीकां ॥ २ ॥ मापें केलीं परी नये अनुमाना । योगियांच्या ध्याना वोथंबला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मापाचि आटलें । मोजणें खुंटविलें पुंडलिकें ॥ ४ ॥

५१२ पुंडलिकें उभा केला । भक्त भावाचा अंकिला ॥ १ ॥ युगें जालीं अठ्ठावीस । उभा मर्यादा पाठीस ॥ २ ॥ सम पाउलीं उभा । कटीं कर कर्दळीगाभा ॥ ३ ॥ गळां वैजयंती माळ । मुगुट दिसतो तेजाळ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शोभा । विठ्ठल विटेवरी उभा ॥ ५ ॥

५१३ ध्वज वज्रांकुश शोभती चरणीं । तो उभा रंगणीं वैष्णवांचे ॥ १ ॥ झळकतसे हातीं पद्म आणि गदा । पुंडलिक वरदा उभा विटे ॥ २ ॥ चरणीं भागीरथी गंगा ती शोभली । भक्तांचीं क्षाळिलीं महत्पापें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सकळ तीर्थराव । उभा राहे प्रभव विटेवरी ॥ ४ ॥

५१४ सुकुमार हरीचीं पाउलें । सुंदर हरीचीं पाउलें ॥ १ ॥ भीमातटीं देखिलें । बोळलें तें पुंडलिका ॥ २ ॥

शेषशयनीं जीं पाउलें । लक्ष्मीकरीं तीं पाउलें ॥ ३ ॥ गरुडपृष्ठीं जीं पाउलें । बळीयागीं तीं पाउलें ॥ ४ ॥ विटेवरी जीं पाउलें । एका जनार्दनीं तीं पाउलें ॥ ५ ॥

५१५ या पाउलासाठीं लक्ष्मी पिसी । सनकादिक वेडावले मानसीं ॥ १ ॥ सुख जोडलें पुंडलिकासीं । विटेवरी हृषिकेशी ॥ २ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । धन्य धन्य पुंडलीका ॥ ३ ॥

५१६ चरण गोमटे विटे गे माय । पाहतां पाहतां मन न धाय । पुनरपि फिरुनी तेथें जाय । ऐसा वेध होय तयाचा गे माय ॥ धृ. ॥ नवल गे माय न कळे वेदां । अबोज विवादा शास्त्रांचिया ॥ १ ॥ पुराणें भागलीं दरुशनें वेडावलीं । कांहीं केलिया न कळे तयां ॥ २ ॥ तो पुंडलिकाचे आवडी विटे धरुनी मीस । युगें अठ्ठावीस उभा असे ॥ ३ ॥ परे परता परात्पर पश्यंती न कळे विचार । मा मध्यमा वैखरीचा निर्धार थकीत ठेला ॥ ४ ॥ एका जनार्दनीं आहे तैसा देखिला । सबाह्य भरला हृदयीं गे माय ॥ ५ ॥

५१७ जें या चराचरीं गोमटें । पाहतां वेदां वाट न फुटे । तें पुंडलिकाचे पेठे । उभें नीट विटेवरी ॥१॥ सोपारा सोपारा झाला आम्हां । शास्त्रें वर्णिती महिमा । न कळे जो आगमा निगमां । वंद्य पुराणां तिहीं लोकीं ॥ २ ॥ सहस्र मुखांचें ठेवणें । योगी ध्याती जया ध्यानें । तो नाचतो कीर्तनें । प्रेमभक्त देखोनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देखा । आम्हां झाला सुलभ सोपा । निवारुनी भवतापा । उतरीं पार निर्धारें ॥ ४ ॥

५१८ आनंदाचा कंद उभा पांडुरंग । गोपाळांचा संघ भोंवता उभा ॥ १ ॥ चंद्रभागा तीरीं शोभे पुंडलीक । संत अलोकिक गर्जताती ॥ २ ॥ भाळे भोळे जन गाती तें सावडें । विठ्ठला आवडे प्रेम त्यांचें ॥ ३ ॥ नारीनर मिळाले आनंदें गजर । होत जयजयकार महाद्वारीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं प्रेमळ ते जन । करिती भजन विठोबाचें ॥ ५ ॥

५१९ अनंताचे गुण अनंत अपार । न कळेचि पार श्रुतीशास्त्रीं ॥ १ ॥ तो हा महाराज विटेवरी उभा । लावण्याचा गाभा शोभतसे ॥ २ ॥ कटावरी कर ठेवी जगजेठी । पाहे कृपादृष्टी भक्तांकडे ॥ ३ ॥ पुंडलिकाचे तेजें जोडलासे ठेवा । एका जनार्दनीं सेवा देई देवा ॥ ४ ॥

५२० सुंदर तें ध्यान मांडीवरी घेउनी । कौसल्या जननी गीतीं गाये ॥ १ ॥ सुंदर तें ध्यान नंदाच्या अंगणीं । गोपाळ गौळणी खेळताती ॥ २ ॥ सुंदर तें ध्यान चंद्रभागे तटीं । पुंडलिकापाठीं उभें असे ॥ ३ ॥ सुंदर तें ध्यान एका जनार्दनीं । जनीं वनीं मनीं भरलासे ॥ ४ ॥

५२१ विटेवरी दिसे स्वानंदाचा गाभा । श्रीमुखाची शोभा काय वानूं ॥ १ ॥ कटीं पितांवर तुळशीचे हार । उभा सर्वेश्वर भक्तिकाजा ॥ २ ॥ लावण्य रूपडें पाहे पुंडलीक । आणीक सम्यक नये दुजा ॥ ३ ॥ पाहतां पाहतां विश्रांती पैं जाली । एका जनार्दनीं माउली संतांची ते ॥ ४ ॥

५२२ रूप गोजिरें तें सान । विटेवरी समचरण ॥ १ ॥ कांसे कसिला पीतांबर । रुळे वैजयंती हार ॥ २ ॥ सम कर ठेवुनी कटीं । पाहे पुंडलिका दृष्टी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रूपडें । पाहतां मन झालें वेडें ॥ ४ ॥

५२३ सर्वांघटीं बिंबला व्यापुनी राहिला । पुंडलिकें उभा केला विटेवरी ॥ १ ॥ सांवळा चतुर्भुज कांसे पीतांवर । वैजयंती माळ शोभे कंठीं ॥ २ ॥ कटावरी कर पाउलें साजिरीं । उभा तो श्रीहरी विटेवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बिंबें तो बिंबला । बिंब बिंबोनी ठेला देहामाजीं ॥ ४ ॥

५२४ परा पश्यंती मध्यमा । जो न कळे आगम निगमां । पुंडलिकालागीं धामा । पंढरीये आला तो ॥ १ ॥ नीरेभीवरेचे तटीं । कास घालुनी गोमटी । वैजयंती शोभे कंठीं । श्रीवत्सलांछन ॥ २ ॥ शंख चक्र मिरवे करीं । उटी चंदनाची साजिरी । खोप मिरवे शिरीं । मयूरपिच्छें शोभती ॥ ३ ॥ शोभे कस्तुरीचा टिळा । राजस सुंदर सांवळा । एका जनार्दनीं डोळा । वोधिलें मन ॥ ४ ॥

५२५ विठ्ठल पुंडलिकासाठीं । उभा राहिला वाळुवंटीं । कर ठेवूनियां कटीं । भक्तासाठीं अद्याप ॥ १ ॥ न कळे तयाचें महिमान । वेदां पडलेंसे मौन । शास्त्रांचें भांडण । परस्परें खुंटलें ॥ २ ॥ नेणवे तो सोळा बारा । आणीक साहा तें आठरा । पंचविसासी पुरा । न कळे बरा छत्तिसां ॥ ३ ॥ ऐसा त्रिवाचा वेगळा । परमानंदाचा तो पुतळा । एका जनार्दनीं डोळां । देखिला देव ॥ ४ ॥

५२६ सगुण रूपडें अद्वैत बुंथी । घेऊनि पंढरीप्रती

उभा विटे ॥ १ ॥ डोळियांची धणी पहातां न पुरे । मनचि वावरे पाहतां पाहतां ॥ २ ॥ रूप आकारलें पुंडलिकाचे भेटी । उभें असे तटीं भीवरेच्या ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उपाधी निराळा । उभा तो सांवळा विटेवरी ॥ ४ ॥

५२७ आदि मध्य अंत न कळे कोणासी । तो हृषिकेशी पंढरीये ॥ १ ॥ जया वेदादती साही दरुशनें । न कळे म्हणोन स्तब्ध जाहलीं ॥ २ ॥ वेडावल्या श्रुती नेती पैं म्हणती । तो पुंडलिकाचे प्रीतीं विटे उभा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आनंदाचा कंद । उभा सच्चिदानंद भीमातीरीं ॥ ४ ॥

५२८ पायाळासी अंजन असावें डोळा । मग धनाचा कोहळा हातां लागे ॥ १ ॥ तैसें पायाळपणें पुंडलीक धन्य । दाविलें निधान पंढरीसी ॥ २ ॥ एका जनार्दनीं चहूं वाचावेगळा । परापश्यंतीसी कळा न कळेची ॥ ३ ॥

५२९ ऐसे कीर्तीचे पोवाडे । जाहले ब्रह्मादिकां वेडे । श्रुतीशास्त्रां कुबाडे । न कळे कांहीं ॥ १ ॥ तो परात्पर श्रीहरी । पुंडलिकाचे उभा द्वारीं । युगें अठ्ठाविस जाहलीं परी । न बैसे तरी खालुता ॥ २ ॥ धरुनी भक्तीची मर्यादा । आहे पाठीमागें सदा । एका जनार्दनीं छंदा । विटेवरी उभाची ॥ ३ ॥

५३० अगाध चरणांचें महिमान । वाणितां वेदां पडिलें मौन्य ॥ १ ॥ पुराणें वर्णितां भागलीं । सहा शास्त्रें वेडावलीं ॥ २ ॥ तें पुंडलिकाचे लोभें । एका जनार्दनीं विटे उभें ॥ ३ ॥

५३१ एकाच्या कैवारें । कली मारिले सर्व धुरे । सर्वांसी ते बरे । आपणापाशीं ठेवी ॥ १ ॥ ऐसा कृपावंत कोहाळ । भरलें कीर्ति भूमंडळ । तया स्मरे हळाहळ । निशीदिनीं ॥ २ ॥ भक्ति भावाचेनि प्रेमें । द्वारपाळ जाहला समे । अद्यापि तिष्ठे नेमें । वचन तें नुल्लंघी ॥ ३ ॥ अंकितपणें तिष्ठत उभा । एका जनार्दनीं धन्य शोभा । पुंडलिकाच्या लोभा । युगें अठ्ठावीस ॥ ४ ॥

५३२ देतो मोक्ष मुक्ती वांटितसे फुका । ऐसा निश्चयो देखो करूनी ठेलो ॥ १ ॥ सांवळें रूपडें गोजिरें गोमटें । उभें पुंडलीकें पेठे पंढरीये ॥ २ ॥ वांटितसे इच्छा जयासी जे आहे । उभारुनी बाह्या देत असे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देतां न सरे मागें । जाहली असतीं युगें अठ्ठावीस ॥ ४ ॥

५३३ कल्पतरु दाता पुंडलीक मुनी । तयासाठीं परब्रह्म तिष्ठे अझुनी ॥ १ ॥ नवलाव गे माय नवलाव गे माय । विटे ठेऊनी पाय उभा असे ॥ २ ॥ शेष श्रमला शास्त्र भागलें । वेदादिती वाहिली अठरा ज्यासी ॥ ३ ॥ आदि अंत कोणा न कळे जयाचा । मौनावली वाचा वेदादिकीं ॥ ४ ॥ तो डोळेभरी पाहिला श्रीहरी । एका जनार्दनीं वेरझारी खुंटली देवा ॥ ५ ॥

५३४ क्षीरसागरींचें निजरूपडें । पुंडलिकाचेनि पडिपाडें । उभें असे तें रोकडें । पंढरीये गोजिरें ॥ १ ॥ पहा पहा डोळेभरी । शंख चक्र मिरवे करीं । कास कसिली पितांबरीं । हृदयावरी वैजयंती ॥ २ ॥ भीमरथी वाहे पुढां । करीत पापाचा रगडा । पुंडलिकाचे भिडा । उभा उगा राहिला ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । त्रैलोक्याचा धनी । नाचतो कीर्तनीं । भक्तांमागें सर्वदा ॥ ४ ॥

५३५ कोटी कंदर्प सांडा वोवाळुनी । ऐसा जगदानीं पंढरीये ॥ १ ॥ हेळू लोपला तेजें जें देखतां मन निवे । दरुशनें भागलें हेवा करतां गे माय ॥ २ ॥ मदन मनमोहन सनकसनंदन वंद्य । सर्वांठायीं व्यापूनी उभे विटे आनंद ॥ ३ ॥ सुखाची सुखमूर्ति पुंडलिकाचे भक्तीं । एका जनार्दनीं सगुण व्यक्तीसी आला ॥ ४ ॥

५३६ येऊनियां पंढरपुरा । उभा सामोरा पुंडलिका ॥ १ ॥ उभारुनी बाह्या हात । भक्तां इच्छिलें तें देत ॥ २ ॥ भलते याती नारी नर । दरुशनें उध्दार सर्वांसी ॥ ३ ॥ साक्ष भीमरथी आहे । एका जनार्दनीं पाही ॥ ४ ॥

५३७ बहुतीं वर्णिला बहुतीं ध्याईला । परी तो पाहिला पुंडलिका ॥ १ ॥ करुनी कैवाड उभा केला नीट । धरुनी दोन्ही कट करीं देखा ॥ २ ॥ पंचमहापातकी येताती ज्या भावें । दरुशनें त्या द्यावें वैकुंठपद ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्तांचा अंकीत । उभाचि तिष्ठत अठ्ठावीस युगें ॥ ४ ॥

५३८ सखी पुसे सखियेसी । युगें जालीं अठ्ठाविसी । उभा ऐकिला संतांमुखीं । अद्यापी वर । कटावरी कर । भीवरा तीर । वाळुवंटीं संतसभा स्थभा ॥ १ ॥ देव कांहो विटेवरी उभा उभा । ॥ ध्रु. ॥ पुसूं नका बाई ।

वेदासी काई । कळलेंचि नाही । शेष शिणला जाहल्या द्विसहस्र जिभा जिभा ॥ २ ॥ जेथ करीताती गोपाळकाला । हरीनामीं तयांचा गलबला । देव भावाचा भुकेला । मिळाले संत मदनारी । तो हरी आला । तयांचिया लोभा लोभा ॥३॥ हरी वैकुंठाहूनी । आला पुंडलिका लागुनी । उभा राहिला अझुनी । युगानुयुगें । भक्तांसंगे । एका जनार्दनीं संतशोभा शोभा ॥ ४ ॥

## रूपगुणवर्णन.

५३९ श्यामसुंदर मूर्ति विटेवरी साजिरी । पाउलें गोजिरीं कोंवळीं तीं ॥ १ ॥ ध्वजवज्रांकुश चिन्हें मिरवती । कटीं धरीले कर अनुपम्य शोभती ॥ २ ॥ ऐसा देखिला देव विठ्ठलु माये । एका जनार्दनीं त्यासी गाये ॥ ३ ॥

५४० चतुर्भुज साजरी शोभा । चिन्मात्र गाभा साकार ॥ १ ॥ शंख चक्र गदा कमळ । कांसे पीतांबर सोज्वळ ॥ २ ॥ मुगुट कुंडलें मेखळा । श्रीवत्स शोभे वक्षस्थळां ॥ ३ ॥ निर्गुण सगुण ऐसें ठाण । एका जनार्दनीं ध्यान ॥ ४ ॥

५४१ श्रीमुख साजिरें कुंडलें शोभती । शंख चक्र-हातीं पद्म गदा ॥ १ ॥ पीतांबर कांसे वैजयंती कंठीं । टिळक लल्लाटीं चंदनाचा ॥ २ ॥ मुगुट कुंडले झळके पाटोळा । घननीळ सांवळा विटेवरी ॥ ३ ॥ श्रीवत्सलांछन हृदयीं भूषण । एका जनार्दन तृप्त जाला ॥ ४ ॥

५४२ देव सुंदर घनसांवळा । कांसे सोनसळा नेसला॥१॥ चरणीं वाळे वाकी गजर । मुगुट कुंडलें मनोहर ॥२॥ बाही बाहुवटे मकराकार । गळां शोभे वैजयंती हार॥ ३ ॥ एका जनार्दनीं ध्यान । विटे शोभे समचरण ॥ ४ ॥

५४३ घनश्याम मूर्ति नीलवर्ण गाभा । कैवल्याची शोभा शोभे बहु ॥ १ ॥ कस्तुरी मळवट चंदनाची उटी । बाहुवटे कंठीं गोरेपणें ॥ २ ॥ एका जनार्दनीं चरणाची शोभा । अनुपम्य उभा भीमातटीं ॥ ३ ॥

५४४ रूप सांवळें सुकुमार । कानीं कुंडलें मकराकार ॥ १ ॥ तो हा पंढरीचा राणा । न कळे योगियांच्या ध्याना ॥ २ ॥ पीतांबर वैजयंती । माथां मुकुट शोभे दीप्ती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ध्यान । विटे पाउलें समान ॥ ४ ॥

५४५ मूर्ति चतुर्भुज वेल्हाळ । शंख चक्र गदा कमळ ॥ १ ॥ मुकुट शोभे कटीं मेखळा । कांसे मिरवे सोनसळा ॥ २ ॥ कौस्तुभ वैजयंती माळ । आकर्णा नयन विशाळ भाळ॥ ३ ॥ ऐसा सुंदर सांवळा । एका जनार्दनीं पाहे डोळां ॥ ४ ॥

५४६ वैजयंती वनमाळा गळां । टिळक रेखिला कस्तुरी ॥ १ ॥ अंगीं चंदन साजे उटी । शोभे कंठीं कंठसूत्र ॥ २ ॥ शंख चक्र पद्म मिरवे करीं । बाह्या उभारी भाविकां ॥ ३ ॥ वेधी वेधोनि आमुचें मन । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

५४७ रूप सांवळें गोमटें अंग । उटी चांग चंदनाची ॥१ ॥ वैजयंती वनमाळा । शोभे कस्तुरीचा टिळा ॥ २ ॥ शंख चक्र शोभे करीं । उभा वैकुंठीचा हरी ॥ ३ ॥ केलें पीतांबराचें परिधान । एका जनार्दनीं ध्यान ॥ ४ ॥

५४८ मूर्ति सांवळी गोमटी । अंगीं केशराची उटी ॥ १ ॥ मुगुट कुंडलें वनमाळा । टिळक रेखिला पिवळा ॥ २ ॥ कर्णी कुंडल मकराकार । गळां शोभे वैजयंती हार ॥ ३ ॥ नेत्र आकर्ण सुकुमार । एका जनार्दनीं । विटेवर ॥ ४ ॥

५४९ दोन्ही कर ठेवुनी कटीं । उभा भीवरेचे तटीं ॥ १ ॥ रूप सांवळें सुंदर । गळां वैजयंती हार ॥ २ ॥ कानीं कुंडलें मकराकार । तेज न समाये अंबर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उदार । भीमातीरीं दिगंबर ॥ ४ ॥

५५० परब्रह्म पुतळा कौस्तुभ गळां । वैजयंती माळा कंठीं शोभे ॥ १ ॥ शंख चक्र गदा पद्म शोभे करीं । पीतांबरधारी चतुर्भुज ॥ २ ॥ कटीं कडदोरा वाळे वाकथा पायीं। सुंदर रूप कान्हाई शोभतसे ॥३॥ लेणीयाचें लेणें भूषण साजिरें । एका जनार्दनीं गोजिरें चरण दोन्ही ॥ ४ ॥

५५१ चंद्र पौर्णिमेचा शोभतो गगनीं । तैसा मोक्षदानी विटेवरी ॥ १ ॥ बाळ सूर्य सम अंगकांती कळा। परब्रह्म पुतळा विटेवरी ॥ २ ॥ मृगनाभी टिळक मळवटीं शोभला । तो घननीळ सांवळा विटेवरी॥३॥ एका जनार्दनीं ध्यानाचें ध्यान । तें समचरण विटेवरी ॥ ४ ॥

५५२ अंगीं चंदनाची उटी । माथां शोभे मयोरवेटी ॥ १ ॥ शंख चक्र पद्म करीं । उभा विटेवरी

श्रीहरी ॥ २ ॥ भोंवते उभे सनकादिक । नारद तुंबरादि आणिक ॥ ३ ॥ ऐसा आनंद सोहळा । एका जनार्दनीं पाहे डोळां ॥ ४ ॥

५५३ शोभती दोनी कटीं कर । रूप सांवळें सुंदर । केशराची उटी नागर । गळां माळ वैजयंती ॥ १ ॥ वेधें वेधक हा कान्हा । पहा वेधतुसे मना । न वैसेचि ध्याना । योगियांच्या सर्वदा ॥ २ ॥ उभारूनी दोन्ही बाह्या । भाविकांची वाट पाहे । शाहाणे न लभती पाय । तया स्थळीं जाउनी ॥ ३ ॥ ऐसा उदार मोक्षदानी । गोपी वेधक चक्रपाणी । शरण एका जनार्दनीं । नाठवे दुजे सर्वदा ॥ ४ ॥

५५४ सगुण निर्गुण मूर्ति उभी असे विटे । कोटी सूर्य दाटे प्रभा तेथें ॥ १ ॥ सुंदर सगुण मूर्ति चतुर्भुज । पाहतां पूर्वज उद्धरती ॥ २ ॥ त्रिभुवनीं गाजे ब्रीदाचा तोडर । तोचि कटीं कर उभा विटे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नातुडे जो वेदां । उभा तो मर्यादा धरूनि पाठीं ॥ ४ ॥

५५५ कर कटावरी वैजयंती माळा । तो हरी डोळां देखियेला ॥ १ ॥ रूप सांवळें शोभे विटेवरी । तो हरी डोळेभरी देखियेला ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाहतां रूपडें । त्रिभुवन थोकडें दिसतसे ॥ ३ ॥

५५६ आल्हाददायक श्रीमुख चांगलें । पाहतां मोहिले भक्त सर्व ॥ १ ॥ गाई गोपाळ वेधिल्या गोपिका । श्रीमुख सुंदर देखा साजिरें तें ॥ २ ॥ आल्हाददायक तें मुखकमळ । वैजयंती माळ हृदयावरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहतां रूपडें । आनंदी आनंद जोडे आपेंआप ॥ ४ ॥

५५७ चंद्रभागे तीरीं समपदीं उभा । चैतन्याचा गाभा पांडुरंग ॥ १ ॥ कांसे पीतांबर गळा तुळशीहार । पदक हृदयावर वैजयंती ॥ २ ॥ एका जनार्दनीं लावण्य साजिरें । रूप तें गोजिरें विटेवरी ॥ ३ ॥

५५८ उभा भीमातीरीं कट धरुनी करीं । वैकुंठींचा हरी मौनरूप ॥ १ ॥ ठेवुनियां विटेसम पद दोन्ही । उभा चक्रपाणी मौनरूपें ॥ २ ॥ वैजयंती माळ किरीट कुंडलें । निढळ शोभलें केशरानें ॥ ३ ॥ कांसे पीतांबर दिसे सोनसळा । पदक आणि माळा कौस्तुभ ते ॥ ४ ॥ चरणींचा तोडर एका जनार्दन । करीत स्तवन भक्तिभावें ॥ ५ ॥

५५९ चंद्रभागा तटीं उभा वाळुवंटीं । वैजयंती कंठीं शोभतसे ॥ १ ॥ गोमटें साजिरें सुकुमार ठाण । धरिलें जघन करें दोन्ही ॥ २ ॥ राहीरखुमाई शोभती वामभागीं । शोभे उटी सर्वांगीं चंदनाची ॥ ३ ॥ मोरपिच्छ शिरीं शोभती ते वरी । केशर कस्तुरी शोभे भाळीं ॥ ४ ॥ शंख चक्र गदा पद्म ते शोभती । सांवळी हे मूर्ति विटेवरी ॥ ५ ॥ शोभती भूषणें चरणीं वाळे वाकी । जानु जंघा शेखीं शोभताती ॥ ६ ॥ एका जनार्दनीं वर्णितां ध्यान । मनाचें उन्मन सुखें होय ॥ ७ ॥

५६० भीमरथीचे तीरीं । उभा विठ्ठल विटेवरी ॥ १ ॥ रूप सांवळें सुंदर । कुंडलें कानीं मकराकार ॥ २ ॥ गळां शोभे वैजयंती । चंद्र सूर्य तेजें लपती ॥ ३ ॥ कौस्तुभ हृदयावरी । उटी केशर साजिरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निढळें । बरवें देखिलें साजिरें ॥ ५ ॥

५६१ व्यापक तो हरी पंढरीये राहीला । वेदादिकां अबोला जयाचा तो ॥ १ ॥ सांवळें नागर कटीं ठेउनी कर । वैजयंती हार तुळशी गळां ॥ २ ॥ एका जनार्दनीं विश्वव्यापक । उभाचि सम्यक विटेवरी ॥ ३ ॥

५६२ व्यापुनी जगीं तोचि उरला । तो विटेवरी देखिला गे माय ॥ १ ॥ चतुर्भुज पीतांबरधारी । गळां शोभे वरी वैजयंती गे माय ॥ २ ॥ हातीं शोभे शंख चक्र पद्म गदा । रुळे चरणीं सदा तोडर गे माय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मदनाचा पुतळा । देखियेला डोळां विठ्ठल वो ॥ ४ ॥

५६३ शिणले ते वेद श्रुती पैं भांडती । पुराणांची मती कुंठीत जाहली ॥ १ ॥ तो हा पांडुरंग उभा विटेवरी । पाउलें साजिरीं समचि दोन्ही ॥ २ ॥ कर कटावरी तुळशीच्या माळा । निढळीं शोभला मुकुट तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गोजिरें तें ठाण । शोभलें जघन करयुगुळीं ॥ ४ ॥

५६४ ज्याकारणें योगी शिणती कपाटीं । तो उभा असे तटीं चंद्रभागे ॥ १ ॥ सांवळें रूपडें गोजिरें गोमटें । धरिलें दोन्हीं विटे समचरण ॥ २ ॥ वैजयंती माळा तुळशीहार मिरवला । निढळीं शोभला चंदन वो माय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मौन्य धरूनी उभा । चैतन्याचा गाभा पांडुरंग ॥ ४ ॥

५६५ सकळ देवांचा नियंता । माझा विठ्ठल माता पिता ॥ १ ॥ तो हा उभा विटेवरी । कट धरुनियां करीं ॥ २ ॥ मिरवे वैजयंती माळा । केशर कस्तुरीचा टिळा ॥ ३ ॥ मकराकार कुंडलें । करीं शंख चक्र

शोभलें ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं । विठ्ठल पाहे ध्यानीं मनीं ॥ ५ ॥

५६६ गगनामाजीं जैसे शोभे तारांगण । तैसा विटेवरी शोभे समचरण ॥ १ ॥ देखतांचि मना समाधान होय । आनंदी आनंद होय ध्यातां जया ॥ २ ॥ चतुर्भुज शंख चक्र ते शोभती । गळां वैजयंती मिरवे शोभा ॥ ३ ॥ कांसे पीतांबर मेखळा झळाळ । एका जनार्दनीं भाळ पायावरी ॥ ४ ॥

५६७ मिळोनि बारा सोळा घोकणी घोकिती । तो हा श्रीपती पंढरीये ॥१॥ रूप तें सांवळें सुंदर शोभलें । गळां मिरविलें तुळशीहार ॥ २ ॥ मुगुट कुंडलें वैजयंती माळ । कौस्तुभ झळाळ हृदयावरी ॥ ३ ॥ शंख चक्र करीं दोन्हीं ते मिरवले । सुंदर शोभलें बाळरूप ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हृदयीं श्रीवत्सलांछन । वागवी भूषण भक्तांसाठीं ॥ ५ ॥

५६८ श्रीक्षेत्र पंढरी शोभे भीमातीरीं । विठ्ठल विटेवरीं उभा असे ॥ १ ॥ सांवळें रूपडें कटीं ठेउनि कर । भक्त जयजयकार करिताती ॥ २ ॥ एका जनार्दनीं गोजिरें तें ठाण । शोभती जघन कटीं कर ॥३॥

५६९ सकळ सुखाचें जें सुख । तेंचि सोलीव श्रीमुख ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठलीं शोभा । मिरवितसे स्वयंभा ॥ २ ॥ मीतूंपणाचा शेवट । तोचि मस्तकीं मुगुट ॥ ३ ॥ अधिष्ठान जें निर्मळ । तेंचि ल्लाट सोज्वळ ॥ ४ ॥ श्रुती विवेक ये विवेका । तेंचि श्रवण ऐका ॥ ५ ॥ जिव शिव एक ठसा । कुंडलें सर्वांग डोळसा ॥ ६ ॥ जें कां आदित्यीं तेज तेजाळें । तेंचि तया अंगीं झालें डोळे ॥ ७ ॥ चिच्छक्तीचें जाणेंपण । तेंचि नयनींचें अंजन ॥ ८ ॥ शोभा शोभवी जे बिक । तेंचि मुखींचें नासिक ॥ ९ ॥ वदन म्हणिजे सुखसागर । तळपती हिरिया ऐसे अधर ॥ १० ॥ सच्चित्पदाची जे माळा । माळा गुणें पडली गळां ॥११॥ कर्म कर्तव्य जें फळें । तेचि कर कटीं सरळ ॥ १२ ॥ कोहं सोहं मूस अटी । तेचि आटीव बाहुवटी ॥१३॥ कवणें व्यक्ती नये रूपा । हृदयीं पदक पहा पा ॥१४॥ नाभीका पूर्णानंदीं । तेचि नाभी तया दोंदी ॥ १५ ॥ निःशेष सारुनी अंबर । तो कांसे पीतांबर ॥ १६ ॥ महासिद्धी ज्या वाजंटा । त्याची मेखळ जडल्या घंटा ॥ १७ ॥ गती चालविती गती । तेचि समचरण शोभती ॥ १८ ॥ अहं सांडोनि अहंकार । तोचि चरणीं तोडर ॥१९॥ अर्थाअर्थीं जडली निकी । ते शोभती वाळे वाकी ॥ २० ॥ शंख चक्र पद्म गदा । चारी पुरुषार्थ आयुधा ॥२१॥ शून्याशून्य पायातळीं । तेचि विट हे शोभली ॥२२॥ दृश्य सारोनियां शोभा । समचरणीं विठ्ठल उभा ॥२३॥ चरणातळीं उर्ध्व रेखा । जाला जनार्दन एका ॥२४॥

५७० अनंताचे अनंत गुण । अपार पार हें लक्षण । तो समचरण ठेवून । विटे उभा राहिला ॥ १ ॥ करीं दास्यत्व काळ । भक्तजनां प्रतिपाळ । उदार आणि स्नेहाळ । तो उभा भीवरे ॥ २ ॥ धीर सर्वस्वें बळसागर । निद्रा करी शेषावर । लक्ष्मी समोर । तिष्ठत सर्वदा ॥३॥ खेळे कौतुकें खेळ । तोडी भक्तांचे मायाजाळ । एका जनार्दनीं कृपाळ । स्वामी माझा विठ्ठल ॥ ४ ॥

५७१ वेदें सांगितलें पुराणीं अनुवादलें । शास्त्र बोले बोलत पांगुळलें ॥ १ ॥ न कळेचि कोणा शेषादिकां मती । कुंठिता निश्चितीं राहियेल्या ॥ २ ॥ श्रुती अनुवादती नेति नेति पार । तोचि सर्वेश्वर उभा विटे ॥३॥ एका जनार्दनीं ठेवुनी कटीं कर । उभा असे तीरीं भीवरेच्या ॥ ४ ॥

५७२ वेदांचा विवेक शास्त्रांचा हा बोध । तो हा परमानंद विठ्ठलमूर्ती ॥ १ ॥ पुराणासी थाड साधनाचें कोड । तें गोडाचे गोड विठ्ठलमूर्ती ॥ २ ॥ ब्रह्मादि वंदिती शिवादि ज्या ध्याती । सर्वांसी विश्रांती विठ्ठलमूर्ती ॥ ३ ॥ मुनीजनांचें ध्यान परम पावन । एका जनार्दनीं पावन विठ्ठलमूर्ती ॥ ४ ॥

५७३ वेदीं जैसा वर्णिला । तैसा विटेवरी देखिला ॥१॥ पुराणें सांगती ज्या गोष्टी । तो विटेवरी जगजेठी ॥२॥ शास्त्रें वेवादती पाहीं । तोचि विटे समपायीं ॥ ३ ॥ न कळे न कळे आगमां । निगमांही न कळे सीमा ॥४॥ जाला अंकित आपण । एका जनार्दनीं शरण ॥ ५ ॥

५७४ जयाचिया अंगीं सकळ त्या कळा । तो परब्रह्म पुतळा पंढरीये ॥ १ ॥ वेदांती सिद्धांती थकले धादांती । परी एकाचीही मती चालेचिना ॥२॥ वानितां वानितां जाहलासे तल्पक । सहस्र मुखीं देख मौनावला ॥ ३ ॥ एक मुखें वानूं किती मी पामर । एका जनार्दनीं साचार न कळेची ॥ ४ ॥

५७५ जयाची समदृष्टी पाहूं धांवे मन । शोभतें चरण विटेवरी ॥ १ ॥ कानडें कानडे वेदांसी कानडें । श्रुतीसी जो नातुडे गीतीं गातां ॥२॥ पदात्पर साजिरें

बाळरूप गोजिरें । भाग्याचें साजिरे नरनारी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कैवल्य जिव्हाळा । मदनाचा पुतळा विटेवरी ॥ ४ ॥

५७६ वेदांचें सार निगमाचें माहेर । तो हा परात्पर उभा विटे ॥ १ ॥ शास्त्रांचें निजघर पुराणाचें निजसार । तो हा विश्वंभर उभा विटे ॥२॥ काळाचा तो काळ भक्तांचा प्रतिपाळ । तो हा दीनदयाळ उभा विटे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शोभे दीनमणी । भक्त भाग्य धणी पंढरीये ॥ ४ ॥

५७७ जया कारणें वेद अनुवादती । शास्त्रें पुराणें भांडती ॥ १ ॥ तो हा देवाधिदेव बरवा । विठ्ठल ठावा जगासी ॥ २ ॥ नये श्रुतीसी अनुमाना । तो देखणा पुंडलीका ॥ ३ ॥ आगम निगमां न कळे पार । एका जनार्दनीं निर्धार ॥ ४ ॥

५७८ रोकडेंचि ब्रह्म ब्रह्मज्ञानाचें गोठलें । तें उभें असे ठेलें पंढरीये ॥ १ ॥ नये अनुमाना वेदांत सिध्दांतिया । मा ब्रह्मज्ञानिया कोण पुसे ॥ २ ॥ चारी वाचा जेथें कुंठित पैं जाहल्या । मौन त्या राहिल्या वेदश्रुती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साराचें हें सार । परब्रह्म निर्धार पंढरीये ॥ ४ ॥

५७९ शेषादिक श्रमले वेद मौनावले । पुराणें भागलीं न कळे त्यांसी ॥ १ ॥ तोचि हा सोपा सुलभ सर्वांसी । विठ्ठल पंढरीसी उघडा डोळा ॥२॥ शास्त्रांचिया मता न कळे लाघव । तो हा विठ्ठलदेव भीमातीरीं ॥ ३ ॥ कर्म धर्म जयालागीं आचरती । ती ही उभी मूर्ति विटेवरी ॥ ४ ॥ आगमां निगमां न कळे दुर्गमा । एका जनार्दनीं प्रेमा भाविकांसी ॥ ५ ॥

५८० अंकित अंकिला भक्तांचा कैवारी । वेद निरंतरीं वाखाणिती ॥ १ ॥ तें रूप गोजिरें सांवळें साजिरें । उभें तें भीवरे पैलथडीं ॥२॥ योगीयांचे ध्यान पारूषलें मन । ते समचरण विटेवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चहूं अठरा वेगळा । न कळे ज्याची लीला सनकादिकां ॥ ४ ॥

५८१ घेऊनि मौनपणाचा वेष । उभा सावकाश विटेवरी ॥ १ ॥ न बोलेचि कोणा न बैसेचि खालीं । पुराणें वेडावलीं अष्टादश ॥ २ ॥ भागलीं दर्शनें शास्त्रें वेवादितां । मतितार्थ पुरता न कळे तयां ॥३॥ शेष जाणूं गेला तोही मौनावला । वेदादिकां अबोला पडोनि ठाके ॥ ४ ॥ संगती संतांचे भुलोनियां उभा । एका जनार्दनीं शोभा न वर्णवे ॥ ५ ॥

५८२ पाउलें गोजिरीं ध्यान विटे मिरवलें । शोभत तान्हुलें यशोदेचें ॥ १ ॥ न कळे पुराणां शास्त्रादि साम्यता । तो हरी तत्त्वतां पंढरीये ॥ २ ॥ एका जनार्दनीं ऐक्यरूप होउनी । भक्तांची आयणी पुरवितसे ॥ ३ ॥

५८३ परा ही पश्यंती मध्यमा वैखरी । वसे तो श्रीहरी पंढरीये देखा ॥ १ ॥ चारी वाचा तया सदोदित गाती । पुराणें भांडती अहोरात्र ॥ २ ॥ वेद श्रुति नेति नेति म्हणताती । तो पुंडलिकापुढें प्रीती उभा असे ॥ ३ ॥ सनकसनंदन जयासी पैं ध्याती । तो हरी बाळमूर्ती खेळतसे ॥ ४ ॥ योगियां ह्रदयींचें ठेवणें सर्वथा । एका जनार्दनीं तत्त्वतां वोळखिलें ॥५॥

५८४ परेहुनी परता वैखरीये कानडा । विठ्ठल उघडा भीमातटीं ॥ १ ॥ शिणलीं दरुशनें भागलीं पुराणें । शास्त्रांचिये अनुमानें न ये दृष्टी ॥ २ ॥ नेति नेति शब्दें श्रुति अनुवादती । तें हे विठ्ठलमूर्ति विटेवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चहूं वाचां वेगळा । तेणें मज चाळा लावियेला ॥ ४ ॥

५८५ योगियांचा योग साधन तें चांग । तो पांडुरंग विटेवरी ॥ १ ॥ मुमुक्षु संपदा ज्ञानीयाचा बांधा । तो पांडुरंग बोधा विटेवरी ॥ २ ॥ सच्चिदानंदनघन अमूर्त मधुसूदन । एका जनार्दन विटेवरी ॥ ३ ॥

५८६ कर्मी कर्मठपण धर्मीं धर्मिष्ठपण । हीं दोन्ही अनुसंधानें चुकती जगीं ॥ १ ॥ कर्माचें जें कर्म धर्माचा अधिधर्म । तो हा सर्वोत्तम विटेवरी ॥ २ ॥ निगमाचें निजसार आगमाचें भांडार । न कळे ज्याचा पार वेदशास्त्रां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं श्रुतीसी नाकळे । तो भक्तिबळें उभा विटे ॥ ४ ॥

५८७ जगासी भुलवणा भाविकांचें मन । तो जनार्दन विटेवरी ॥ १ ॥ कामारी कामारी ऋद्धीसिद्धी घरीं । तो परमात्मा श्रीहरी विटेवरी ॥ २ ॥ सनकसनंदन संपुष्टीं ध्याती । ती अंतर्ज्योती विटेवरी ॥ ३ ॥ सांवळें सगुण निर्गुणाचे गुण । एका जनार्दन विटेवरी ॥ ४ ॥

५८८ सिद्ध साधक जया ह्रदयीं ध्याती । तो गोपिकेचा पती विठ्ठलराव ॥१॥ सांवळें सांवळें रूप तें सांवळें । देखतांचि डोळे प्रेमयुक्त ॥ २ ॥ जीवाचें जीवन मनाचें उन्मन । तें चैतन्यघन पूर्ण विटेवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आनंद अद्वय । न कळे त्याची सोय ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

५८९ ध्यानाचें ध्यान ज्ञानाचें ज्ञान। ते समचरण। विटेवरी ॥ १ ॥ भावाचा तो भाव देवाचा तो देव। वैकुंठीचा राव विटेवरी ॥ २ ॥ कामाचा तो काम योगियां विश्राम। धामाचा तो धाम विटेवरी ॥ ३ ॥ वैराग्याचें वैराग्य मुक्ताचें माहेर। तो देव सर्वेश्वर विटेवरी ॥४॥ भोळीयाचा भोळा ज्ञानीयाचा डोळा। एका जनार्दनीं सोहळा विटेवरी ॥ ५ ॥

५९० सप्त दिन जेणें गोवर्धन धरिला। काळिया नाथिला देउनी पाय ॥ १ ॥ तो हा गोपवेषें आला पंढरपुरा। भक्त समाचारा विठ्ठल देवो ॥ २ ॥ बाळपणीं जेणें पूतने शोषिलें। अघ बघ मारिले खेळु खेळे ॥ ३ ॥ कंसचाणुराचा करूनियां घात। केला मथुरानाथ उग्रसेन ॥ ४ ॥ समुद्राचे तटीं द्वारके उभाविलें। सोळा सहस्त्र केलें कुटुंबांसी ॥ ५ ॥ धर्माचीये घरीं उच्छिष्ट काढिलें। दुष्टां त्या वधिलें कौरवांसी ॥ ६ ॥ एका जनार्दनीं ऐशी बाळलीला। खेळ खेळोनी वेगळा पंढरीये ॥ ७ ॥

५९१ भूतमात्र आकृति एकचि मूर्ती। अवघा अंतर्गति व्यापुनी ठेला ॥ १ ॥ जळीं स्थळीं काष्ठीं स्थावर जंगम। अवघा आत्माराम पूर्णपणें ॥ २ ॥ सायंप्रातमेध्यान्ह नाहीं अस्तमान। आणिक कारण नोहे दुजें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सबाह्य भरला। भरुनी उरला पंढरीये ॥ ४ ॥

५९२ अवघियांसी विश्रांतीस्थान। एक विठ्ठल चरण ॥ १ ॥ देह वाचा अवस्थात्रय। अवघें विठ्ठलमय होय ॥ २ ॥ जागृतीं स्वप्न सुषुप्तीं। अवघा विठ्ठलचि चित्तीं ॥ ३ ॥ जनीं वनीं विजनीं। शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

५९३ एकपणें देव विटेवरी उभा। चैतन्याचा गाभा पांडुरंग ॥ १ ॥ मानस मोहन भक्तांचें जीवन। योगियांचें ध्यान पांडुरंग ॥ २ ॥ अनाथा कोंवसा ध्यानीं नारायण। सुखाची सांठवण पांडुरंग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आनंदाचा कंद। पाहतां आनंद पांडुरंग ॥ ४ ॥

५९४ जयालागीं शिणती रात्रंदिन। यज्ञयागादी करिती हवन। ध्येय ध्यान धारणा अनुष्ठान। साधिती अष्टांग आणि पवन ॥ १ ॥ तो गे माय सोपा केला सर्वांसी। लांचावला देखोनि भक्तीसी। उभा राहिला युगें अठ्ठावीस विटेसी। न बोले न बैसे नुलंघी मर्यादेसी ॥ २ ॥ एका जनार्दनीं कृपेचा सागर। भक्त करुणाकर तारु हा दुस्तर। उभा भीवरेचे तीरीं कटीं धरुनी कर। जडजीवां दरुशनें उद्धार ॥ ३ ॥

५९५ होउनी आभारी। उभा राहिलासे द्वारीं ॥ १ ॥ समचरण विटेवर। कटीं धरूनियां कर ॥ २ ॥ मिरवी मस्तकीं भूषण। सिद्ध साधकांचें ध्यान ॥ ३ ॥ सुहास्य वदन चांगलें। एका जनार्दनीं वंदिलें ॥ ४ ॥

५९६ सर्वां आदि मूळ न कळे अकळ। तो भक्त प्रतिपाळ भीमातीरीं ॥ १ ॥ योगियांच्या ध्याना न ये अनुमाना। कैलासीचा राणा ध्यात ज्यासी ॥ २ ॥ शुकादिका ज्याचा वेध अहर्निशीं। तो उभा हृषिकेशी विटेवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ब्रह्म परिपूर्ण। सगुण निर्गुण तोचि एक ॥ ४ ॥

५९७ सगुण निर्गुण दुंधींचें आवरण। ब्रह्म सनातन पंढरीये ॥ १ ॥ तो हा श्रीहरी नंदाचा खिल्लारी। योगी चराचरीं ध्याती जया ॥ २ ॥ शिवाचें जें ध्येय मुनिजनांचें ध्यान। ब्रह्म परिपूर्ण पंढरीये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अठरां निराळा। लाविलासे चाळा सहां चहूंसी ॥ ४ ॥

५९८ अकार उकार मकार योगियांची स्थिती। हे प्रकाशज्योति विटेवरी ॥ १ ॥ सबाह्य परिपूर्ण भरुनी उरलें। अलक्ष्य तें जाहलें लक्ष्याकार ॥ २ ॥ सूक्ष्म सरळ दिसतें प्रबळ। एका जनार्दनीं सुढाळ विटेवरी ॥ ३ ॥

५९९ कैवल्याची राशी वैष्णवांचे घरीं। मुक्ति भुक्ति कामारी आहे जेथें ॥ १ ॥ तो हा विठ्ठल निधान परेपरता उभा। सांवळी ती प्रभा अंगकांती ॥ २ ॥ मुनिजनांचें ध्येय योगियांचें उन्मन। ज्या पैं माझें लीन चित्त जाहलें ॥ ३ ॥ जया अष्टांग योगां सांकडें साधित। तें उघडें पाहतां उभें विटेवरी ॥४॥ एका जनार्दनीं सगुण निर्गुण। यापरता चैतन्यघन उभा असे ॥ ५ ॥

६०० पूर्वी बहुतांचें धांवणें केलें। श्रमोनी ठेविले कर कटीं ॥ १ ॥ भक्तांसाठीं मनमोहन। धरिले जघन कर कटीं ॥ २ ॥ भाविकांची इच्छा मनीं। उभा धरुनी कर कटीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ध्यान। सांवळें ठेवून कर कटीं ॥ ४ ॥

६०१ एकाचीं काजें फिटलें सांकडें। उगविलीं कोडें बहुतांचीं ॥ १ ॥ तोचि हरी उभा चंद्रभागे तटीं।

कर ठेउनी कटीं अवलोकित ॥ २ ॥ पडतां संकट धांवतसे मागें । गोपाळांचिया संगें काला करी ॥ ३ ॥ चोरुनी शिदोरी खाय वनमाळी । प्रेमाचे कल्लोळीं आनंदानें ॥ ४ ॥ यज्ञ अवदानीं करी वांकुडें तोंड । लोणी चोरितां भांड गौळणी म्हणती ॥ ५ ॥ एका जनार्दनीं ठेवणें संतांचें । उभें तें साचें विटेवरी ॥ ६ ॥

६०२ एकाचिया द्वारीं भीकचि मागणें । उभेंचि राहाणें एका द्वारीं ॥ १ ॥ एकाचिया घरीं उच्छिष्ट काढणें । लोणी जें चोरणें एका घरीं ॥ २ ॥ एकाचिये घरीं न खाये पक्वान्न । खाय भाजी पान एका घरीं ॥ ३ ॥ एकाचिये घरीं व्यापुनी राहाणें । एकासी तो देणें भुक्तिमुक्ती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सर्वांठायीं असे । तो पंढरीये वसे विटेवरी ॥ ५ ॥

६०३ कृपाळु माउली अनाथा साउली । उभी ती राहिली विटेवरी ॥ १ ॥ भक्त करुणाकार कैवल्याचा दानी । उभा तो जघनी ठेवूनि कर ॥ २ ॥ मोक्ष मुक्ति फुका वांटितो दरुशनें । नाहीं थोर सानें तयासी तेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपणें उभा । कैवल्याचा गाभा पांडुरंग ॥ ४ ॥

६०४ उदीत तेथ परब्रह्म उभें । सहस्त्र कोंभ शोभे विटेवरी ॥ १ ॥ कोटी सूर्य तेज लोपलें ते प्रभे । तें असे उभे पंढरीये ॥ २ ॥ एका जनार्दनीं कैवल्य-पुतळा । पाहतां अधलीळा मन निवे ॥ ३ ॥

६०५ सकळ देवां शिरोमणी । सकळ तीर्थें वंदिती चरणीं । सकळांसी मुगुटमणी । तो उभा पंढरीये ॥ १ ॥ सकळ तेजाचा पुतळा । सकळ जयांच्या अंगीं कळा । सकळ जीवांचा आकळा । तो उभा राहिला विटेवरी ॥ २ ॥ सकळ मंत्रांचा मंत्र । सोपा सकळ पवित्र । सकळ पर्वकाळ परत्र । दर्शनेंचि घडती ॥ ३ ॥ सकळ अधिष्ठानांचें सार । सकळ गुह्यांचें माहेर । सकळ भक्तांचें जें घर । निजमंदिर पंढरी ॥ ४ ॥ सकळ वैराग्यांचा निधी । सकळां कृपेची तो मांदी । एका जनार्दनीं निरुपाधी । आशापाश विरहित ॥ ५ ॥

६०६ मौन्यचि आला मौन्यचि आला । मौन्य उभा ठेला विटेवरी ॥ १ ॥ मौन्यचि ध्यान गोजिरें गोमटें । मौन्यचि ठेविलें विटे समपद ॥ २ ॥ मौन्यचि पैं माथा धरिला शंकर । मौन्य ध्यान दिगंबर बाळवेष ॥ ३ ॥ मौन्यचि एका शरण जनार्दनीं । मौन्यचि चरणीं मिठी घाली ॥ ४ ॥

६०७ असोनि न दिसे वेगळाचि असे । तो पंढरीसी वसे विटेवरी ॥ १ ॥ कैवल्य उघडें राहिलेंसे उभें । कर्दळींचे गाभे समपदीं ॥ २ ॥ द्वैत अद्वैत विरहित सचेतनीं उभा । एका जनार्दनीं शोभा गोजिरी ती ॥ ३ ॥

६०८ जीव शिव व्यापूनि राहिला वेगळा । पर-ब्रह्म पुतळा विटेवरी ॥ १ ॥ तयाचिये पायीं वेधलें मन । झालें समाधान पाहतां रूप ॥ २ ॥ विश्रांति समाधि लोपोनियां ठेली । पाहतां सांवळी मूर्ति देखा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सर्वां वेगळा । तो बाळलीला खेळे कृष्ण ॥ ४ ॥

६०९ चैतन्याचा साक्षी सर्वांसी परीक्षी । अलक्षाच्या लक्षी न ये ध्याना ॥ १ ॥ बहुत भागले बहुत श्रमले । परी नाहीं लाभलें रूप ज्याचें ॥ २ ॥ भक्तांचेनि भावें पंढरीये उभा । आनंदाचा गाभा सांवळा तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तो सर्वव्यापक । उभा असे नायक वैकुंठीचा ॥ ४ ॥

६१० एकपणें एक पाहतां जग दिसे । योगियांसि पिसें सदा ज्याचें ॥ १ ॥ आनंद अद्वय नित्य निरा-मय । परापश्यंति वेगळा होय पंढरीये ॥ २ ॥ व्यापक विश्वंभर भरूनि उरला । तो प्रत्यक्ष संचला कीर्तन मेळीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं त्रिगुणांवेगळा । पहा पहा डोळां विठ्ठल देव ॥ ४ ॥

६११ आदि पुरुष सबरा भरीत भरला । भरूनि उरला पंढरीये ॥ १ ॥ अतळ वितळ सुतळ रसातळ । सप्तहि पाताळें भरूनि उरला ॥ २ ॥ वैकुंठ कैलास चतुर्दश लोक । भरलासे व्यापक दशदिशां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं स्थावर जंगमीं । भरलासे व्योमीं आदि अंतीं ॥ ४ ॥

६१२ वेडावला वेडावला । उभा ठेला मौन्यची ॥ १ ॥ ब्रह्मादिकां अंत न कळे रूपाची । तो माझे माझे साचा भक्ता म्हणे ॥ २ ॥ कमळाचरणीं विनटली न कळे तीस थोरी । ते चरण विटेवरी देखियेले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विश्वव्यापक हरी । सबाह्य अभ्यंतरीं कोंदलासे ॥ ४ ॥

६१३ समचरणीं उभा चैतन्याचा गाभा । त्रैलो-क्याची शोभा पांडुरंग ॥ १ ॥ भक्तांचें जीवन साध-कांचें साधन । सुखाचें निधान पांडुरंग ॥ २ ॥ मुक्ति कल्पद्रुम महाफळ उत्तम । गोपिकांचा काम पांडुरंग ॥ ३ ॥ एकाएकी विनटला तो सदा संचला । एका जनार्दनीं भेटला पांडुरंग ॥ ४ ॥

६१४ कैसी समचरणींची शोभा । अवघा जगीं विठ्ठल उभा ॥ १ ॥ येणें विठ्ठलें लाविलें पिसें । जिकडे पाहे तिकडे दिसे ॥ २ ॥ पाहातें पाहाणीया माझारी । पाहाते गेलें पहाण्यापरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकु । विठ्ठल अवलोकी लोकु ॥ ४ ॥

६१५ सुखकर मूर्ति रुप रेखेवीण । उभा असे व्यापून ब्रह्मांडीं गे माय ॥ १ ॥ वेधला जीऊ तयाचिया गुणा । क्षणभरी न विसंबे देवकीनंदना ॥२॥ सकळ विश्रांति घर चंद्रभागा तीर । एका जनार्दनीं मनोहर गोमटें गे माय ॥ ३ ॥

६१६ देवो न कळे अभाविकां । उघड पंढरीसी देखा । भोळे सकळां भाविकां । ठाऊका असे ॥ १ ॥ न कळे तयाचें विंदान । भेटी जातां वेधी मन । तोडित बंधन । संसाराचें क्षणार्धें ॥ २ ॥ रूप पाहतां गोजिरें । आवडे डोळियां साजिरें । चित्त तेथें झुरे पायांचें सकळ ॥ ३ ॥ नुरे काम आणि क्रोध । अवघा तो परमानंद । एका जनार्दनीं गोविंद । अभेदपणें पाहतां ॥ ४ ॥

६१७ भक्तांचिया गांवा येशी पैं धांवत । न बोलतां तिष्ठत उभा पुढें ॥ १ ॥ न बैससी खालीं न पाहे माघारें । मौन्य पैं निर्धारें धरुनि उभा ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्त वचनाधीन । बोलती पुराणें सत्य देवा ॥ ३ ॥

६१८ अनन्य शरण विठोबासी निघाले । ते जीवन्मुक्त जाले याचि देहीं ॥ १ ॥ देहीं याचि देवो विटेवरी पाहे । सबाह्य उभा आहे कर कटीं ॥ २ ॥ कर कटीं उभा लावण्याचा गाभा । श्रीमुखाची शोभा काय वानूं ॥ ३ ॥ कोटी रवीतेज वोवाळावे चरणीं । एका जनार्दनीं धन्य तोची ॥ ४ ॥

६१९ त्रिभुवनामाजी सोपें । चुकती खेपे पाहतां ॥१॥ तो हा बाळ दिगंबर । परात्पर सोयरा ॥ २ ॥ आलियासी देतो मुक्ती । नामस्मृती तात्काळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रूप । गोमटें अमूप श्रीविठ्ठल ॥ ४ ॥

६२० उभा विटेवरी । कट धरूनियां करीं । भीमा ती सामोरी । वहात आहे ॥ १ ॥ जाऊं तया ठाया । आनंद तेणें काया । वैष्णवांचिया पायां । लोटांगणी ॥ ३ ॥ कर्माकर्म नाहीं वाद । भेदभ्रम नाहीं भेद । वैष्णवांचा छंद । नाम गाती आनंदें ॥ ३ ॥ सुख अनुपम्य अभेदें । एका जनार्दनीं छंदें । गातां नाचतां आल्हादें । प्रेम जोडे ॥ ४ ॥

६२१ कानडा विठ्ठल कानडा विठ्ठल । कानडा विठ्ठल विटेवरी ॥ १ ॥ कानडा विठ्ठल नामें बरवा । कानडा विठ्ठल हृदयीं ध्यावा ॥२॥ कानडा विठ्ठल रूपें सांवळा । कानडा विठ्ठल पाहिला डोळां ॥ ३ ॥ कानडा विठ्ठल चंद्रभागे तटीं । कानडा विठ्ठल पहावा उठाउठी ॥४॥ कानडा विठ्ठल कानडा बोले । कानड्या विठ्ठलें मन वेधियेलें ॥५॥ वेधियेलें मन कानडीयानें माझें । एका जनार्दनीं दुजें नाठवेची ॥ ६ ॥

६२२ नाठवेचि दुजें कानड्यावांचुनी । कानडा तो मनीं ध्यानीं वसे ॥ १ ॥ कानडा कानडा विठ्ठल कानडा । कानडा कानडा विठ्ठल कानडा ॥ २ ॥ कानडियांचा वेध मनीं तो कानडा । कानडाची कानडा विठ्ठल माझा ॥ ३ ॥ एकपणें उभा कानडा विठ्ठल । एका जनार्दनीं नवल कानड्याचें ॥ ४ ॥

६२३ तीर्थ कानडें देव कानडे । क्षेत्र कानडें पंढरीये ॥ १ ॥ विठ्ठल कानडे भक्त हे कानडे । पुंडलीकें उघडें उभें केलें ॥ २ ॥ कानडीया देवा चालविलें भक्तें । कवतुकें तयातें उभें केलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्तांचिया चाडा । विठ्ठल कानडा विटेवरी ॥ ४ ॥

६२४ उतावेळपणें उभा । त्रैलोक्य शोभा पंढरीये ॥ १ ॥ मना छंद वेद्द वाचें । विठ्ठल साचें पाहूं डोळां ॥ २ ॥ गळां तुळशीच्या माळा । केशर टिळा ललाटीं ॥३॥ चंदनाची शोभे उटी वैजयंती कंठीं मिरवत ॥४॥ दृष्टी धाय पाहतां रूप । एका जनार्दनीं स्वरूप ॥५॥

६२५ जया कारणें योगयाग तपें करती । ती हे उभी बाळ विठ्ठल मूर्ती । अंगीं तेजाची न माय दीप्ती । कंठीं वैजयंती शोभती गे माय ॥ १ ॥ त्याचा वेधु लागला जीवीं । क्षण परता नोहे देहीं । काया वाचा मनें भावी । वेधें वेधकु गे माये ॥२॥ न माये त्रैलोकीं तो उभा विटीं । दोन्ही कर समपदें ठेवुनी कटीं । सर्वांगीं चंदन कस्तुरी उटी । वामभागीं रुक्मिणी गोमटी गे माय ॥ ३ ॥ पेला सर्व सुखांचा आगरु । उभारुनि बाह्या देत अभयकरु । एका जनार्दनीं निर्धारु विठ्ठलराज गे माय ॥ ४ ॥

६२६ अणुरेणु पासोनि ब्रह्मांडीं भरला । तो म्यां देखिला विटेवरी ॥ १ ॥ स्थावर जंगम भरुनी उरला । तो म्यां देखिला पंढरीये ॥ २ ॥ वेदशास्त्र पुराणें गाती ज्यासाठीं । तो पुंडलीका पाठीं उभा दिसे ॥३॥ वेडावल्या श्रुति न कळे म्हणती । तो उभा श्रीपती वाळुवंटी ॥ ४ ॥ संतांचा समागम गाती आनंदानें ।

तो हरी कीर्तनें नाचतसे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं सुखाचा सागरु। विठ्ठल कल्पतरू बोळला आम्हां ॥ ६॥

६२७ वैजयंती माळ किरीट कुंडलें। रूप तें सांवळें विटेवरी ॥ १ ॥ वेधलें वो मन तयाच्या चरणीं। होताती पारणीं डोळीयांची ॥ २ ॥ पुराणासी वाड शास्त्रासी तें गूढ। तें आम्हालागीं उघड परब्रह्म ॥३॥ ध्यानीं ध्याती मुनी चिंतिती आसनीं। तो हा चक्रपाणी सुलभ आम्हां ॥४॥ सन्मुख भींवरा मध्यें पुंडलीक। एका जनार्दनीं सुख धन्य धन्य ॥ ५ ॥

६२८ कमळगर्भींचा गाभा। तोचि उभा पंढरीये ॥१॥ वेधलें चरणीं मन माझें। नावडे दुजें तयाविण ॥ २ ॥ ध्यान बैसलें हृदयीं। तयाविण दुसरें नाहीं ॥ ३ ॥ बैसला तो नुठे मागें। एका जनार्दनीं गूज सांगें ॥ ४ ॥

६२९ न कळे जयाचें महिमान। वेदश्रुतीसी पडिलें मौन। वेडावलें दरुशन। जयालागीं पाहतां ॥१॥ तोचि उभा विटेवरी। भक्त करुणाकर हरी। रुक्मिणी निर्धारी। वामभागीं शोभती ॥ २॥ गरुड सन्मुख उभा। शोभे चैतन्याचा गाभा। नभीं लोपली तेजप्रभा। ऐसा उभा विठ्ठल ॥ ३॥ मन ध्यातां न धाये। दृष्टी पाहतां न समाये। एका जनार्दनीं पाय। वंदू त्याचे आवडीं ॥४॥

६३० अनादि सांवळा देखियेला डोळां। मनु माझा वेधिला सांगूं काय ॥ १ ॥ जीवाविरहित जालें देह हारपलें। शिवपणें गुंतलें गुरुकृपें ॥ २ ॥ जें शब्दासी नातुडे वैखरीयेसी कानडें। तें रूप उघडें पंढरीये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जीवींचें जीवन। विठ्ठल निधान विटेवरी ॥ ४ ॥

६३१ आजी नीलवर्ण कुसुमसम। देखिला मेघःशाम विटेवरी ॥१॥ अतसीकुसुम रंग रंगला श्रीरंग। भोंवता शोभे संग संतजन ॥ २ ॥ निळीया भासत तो रंग दिसत। शामांकित शोभत विठ्ठल देव ॥३॥ एका जनार्दनीं नीलवर्ण रूपडें। पाहतां चहूंकडे कोंदाटलें ॥ ४ ॥

६३२ पाहतां विठ्ठल रूप। अवघा निवारिला ताप ॥ १ ॥ ध्यानीं आणितां तें रूप। अवघा विराला संकल्प ॥ २ ॥ बैसलासे डोळां। एका जनार्दनीं सांपळा ॥ ३ ॥



६३३ आणिकांचे मतें सायास न करणें। आम्हांसी पाहुणे पंढरीराव ॥ १ ॥ डोळां भरूनियां पाहिलें देवासी। तेणें चौऱ्यायशीं चुकली सत्य ॥ २ ॥ एका जनार्दनीं देवाधि देव। देखिला स्वयमेव विटेवरी ॥ ३ ॥

६३४ स्वर्गसुख आम्ही मानूं जैसा ओक। सांडूनियां सुख पंढरीचें ॥ १ ॥ पंढरी पावन चंद्रभागा स्थान। आहे तो निधान विठ्ठल देव ॥ २ ॥ मध्यस्थळीं राहे पुंडलीक मुनी। तयाचे दरुशनीं पातक हरे ॥ ३ ॥ दोनी कर कटीं उभा जगजेठी। एका जनार्दनीं भेटी सुख होय ॥ ४ ॥

६३५ कैसे चरण गोमटे। देखिले विटे पंढरीये ॥१॥ पाहतांचि वेधलें मन। जाहलें समाधान जीवशीवां ॥ २ ॥ विश्रांतीचें विश्रांतिघर। आगम निगमांचें माहेर ॥ ३ ॥ म्हणे एका जनार्दनीं। काया कुरवंडी करुनी ॥ ४ ॥

६३६ आगमीं निगमीं पाहतां तो सुगमा। वेदादिकां दुर्लभ आम्हां तो सुगमीं ॥ १ ॥ नवचे वाचे बोल बोला तो वेगळा। व्यापूनि ब्रह्मांडा आहे तो उगला ॥ २ ॥ सार मथित काढोनि चैतन्य गाभा। पाहतां दिसे त्याची अनुपम्य शोभा ॥ ३ ॥ सांकडें नव्हे भेटी जातां लवलाहें। उभारुनि बाह्या आलिंगीताहे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सर्व सारांचें सार। उभा विटेवर परब्रह्म निर्धार ॥ ४ ॥

६३७ उंचा उंचपण नीचा नीचपण। तें नाहीं कारण विठ्ठलभेटी ॥१॥ उंच नीच याती असो भलते जाती। विठ्ठल म्हणतां मुक्ती जड जीवां ॥ २॥ उभारुनि बाह्या कटीं कर उभा। एका जनार्दनीं शोभा विटेवरी ॥ ३ ॥

६३८ काळें ना सांवळें गोरें ना पिवळें। वर्णव्यक्ती वेगळें विटेवरी ॥ १ ॥ आनंद स्वानंद नित्य परमानंद। आनंदाचा कंद विटेवरी ॥ २ ॥ निर्गुण सगुण चहूं घाचावेगळा। आदि अंत पाहतां डोळां न दिसे कांहीं ॥ ३॥ एका जनार्दनीं देखिला तो डोळां। त्रिगुणा वेगळा विटेवरी ॥ ४॥

६३९ जें जें देखिलें तें तें भंगलें। रूप एक उरलें विटेवरी ॥ १ ॥ डोळियाची धणी पाहतां पुरली। परी वासना राहिली चरणांजवळी ॥ २ ॥ एका जनार्दनीं विश्वास तो मनीं। संतांचे चरणीं सदा बैसो ॥ ३ ॥

६४० चित्त वेधियलें नंदाच्या नंदनें । मोहियेलें ध्यानें योगीराज ॥ १ ॥ सगुण सुंदर पाहतां मनोहर। सबाह्य अभ्यंतर व्यापियेलें ॥ २ ॥ एका जनार्दनीं सांपडलें चैतन्य । श्रीगुरूची खूण विटेवरी ॥ ३ ॥

६४१ बळीपृष्ठीं जें शोभलें । तें विटेवरी देखिलें ॥१॥ पुंडलीकें जें ध्याइलें । तें विटेवरी देखिलें ॥ २ ॥ सनकादिकीं जें पाहिलें । तें विटेवरी देखिलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वंदिलें । तें विटेवरी देखिलें ॥ ४ ॥

६४२ भीष्में जया ध्याइलें । तें विटेवरी देखिलें ॥१॥ धर्मरायें पूजियेलें । तें विटेवरी देखिलें ॥ २ ॥ शिशुपाळा अंतक जाहलें । तें विटेवरी देखिलें ॥३॥ एका जनार्दनीं पुजिलें । तें विटेवरी देखिलें ॥ ४ ॥

६४३ गोकुळीं जें शोभलें । तें विटेवरी देखिलें ॥१॥ काळया पृष्ठीं शोभलें । तें विटेवरी देखिलें ॥ २ ॥ पूतनेहृदयीं शोभलें । तें विटेवरी देखिलें ॥ ३ ॥ काळयवनें पाहिलें । तें विटेवरी देखिलें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भलें । तें विटेवरी देखिलें ॥ ५ ॥

६४४ जें द्रौपदीनें स्मरिलें । तें विटेवरी शोभलें ॥१॥ जें अर्जुनें स्मरिलें । तें विटेवरी शोभलें ॥ २ ॥ जेणें गजेंद्रा उद्धरिलें । तें विटेवरी शोभलें ॥ ३ ॥ जें हनुमंतें स्मरिलें । तें विटेवरी शोभलें ॥४॥ जें पुंडलिकें ध्याइलें । तें एका जनार्दनीं देखिलें ॥ ५ ॥

६४५ मुख सुंदर मंडित साजिरा । विंझणे वारिती राहीरखुमाई सुंदरा ॥ १ ॥ नवल वो हरी देखिला डोळां । पाहतां पाहतां मन विरालें अबळा ॥ २ ॥ नेणें तहान भूक लज्जा अपमान । वेधिलें देवकीनंदनें गे माय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहतां मुख । मुख पाहतां अवघें विसरलों दुःख ॥ ४ ॥

६४६ उघडा विठ्ठल विटेवरी उभा । अनुपम्य शोभा दिसतसे ॥ १ ॥ विटेवरी पाय जोडियेले सम । तेंचि माझें धाम हृदयीं राहो ॥२ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल सांवळा । देखियेला डोळां विटेवरी ॥ ३ ॥

६४७ जयाचें पाहतां श्रीमुख । हरे कोटी जन्म दुःख ॥ १ ॥ तो हा उभा विटेवरी । भक्तकाज म्हणवी कैवारी ॥ २ ॥ वेदासी जो दुर्गम । आम्हां कळलें तयाचें वर्म ॥ ३ ॥ ऐसा भक्तवत्सल तो एक दीनानाथ । एका जनार्दनीं तया ध्यात ॥ ४ ॥

६४८ ठेवणें अनंत जन्मांचें । सांपडलें आजी साचें ॥ १ ॥ पुंडलिकें तें पोखलें । जगा उपकार केले ॥२ ॥ महा पातकी चांडाळ । मुक्त होय दरुशनें खळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निश्चय । वेदादिकां हा आश्रय ॥ ४ ॥

६४९ भक्तीभावार्थे अर्पिलें । देवें आपणापाशीं ठेविलें ॥ १ ॥ नेदी कोणाचिये हातीं । भक्तांवांचुनी निश्चितीं ॥ २ ॥ जुनाट जुगादीचें । ठेवणें होतें तें संतांचें ॥ ३ ॥ पुंडलिकें करुनी वाद । ठेवणें केलें तें प्रसिद्ध ॥ ४ ॥ नेदी म्हणोनि उभा केला । एका जनार्दनीं अबोला ॥ ५ ॥

६५० साजिरें सुंदर श्रीमुख पाहतां । नाठवे ती चिंता संसाराची ॥ १ ॥ तो हा पांडुरंग विटेवरी उभा । त्रैलोक्याचा गाभा शोभतसे ॥ २ ॥ एका जनार्दनीं कर ठेवुनी कटीं । उभा वाळुवंटीं चंद्रभागे ॥ ३ ॥

६५१ कृपाळु उदार । उभा कटीं ठेवुनी कर ॥ १ ॥ सर्व देवांचा हा देव । निवारी भेव काळाचें ॥ २ ॥ निघतां शरण काया वाचा । चालवी त्याचा योग क्षेम ॥ ३ ॥ दृढ वाचे वदतां नाम । होय निष्काम संसारीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ठेवणें । खरें तें जाणें पंढरी ॥ ५ ॥

६५२ प्रत्यक्ष पहा रे जाऊन । विटेवरी ठेविले चरण ॥ १ ॥ रूप सुंदर गोजिरें । कानीं कुंडलें मकराकारें ॥ २ ॥ पुढें शोभे चंद्रभागा । मध्यें पुंडलीक उभा ॥ ३ ॥ ऐसें उत्तम हें स्थळ । भोळ्या भाविकां निर्मळ ॥ ४ ॥ तया ठायीं भेद नुरे । एका जनार्दनीं झुरे ॥ ५ ॥

६५३ काया वाचा मन एकविध करी । पाहे तो श्रीहरी पंढरीये ॥ १ ॥ ब्रह्मादिक जया ध्याती शिवादि वंदिती । ती विटेवरी मूर्ति पांडुरंग ॥ २ ॥ वेद पैं भागले शास्त्रें वेवादती । पुराणांसी भ्रांती अद्यापवरी ॥ ३ ॥ नेति नेति शब्दें श्रुती त्या राहिल्या । न कळे तयांला पार त्याचा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भक्तालागीं सोपा । भीमातटीं पाहे पां विठ्ठलासी ॥ ५ ॥

६५४ परब्रह्म मूर्ति विठ्ठल विटेवरी । चंद्रभागेतीरीं उभा असे ॥ १ ॥ तयाचे चरण आठवी वेळोवेळां । सर्व सुख सोहळा पावशील ॥ २ ॥ अविनाश सुख देईल निश्चयें । करीं पां लवलाहें लाहो त्याचा ॥ ३ ॥ श्रीविठ्ठलचरणीं शरण तूं जाई । एका जनार्दनीं पाही अनन्यभावें ॥ ४ ॥

६५५ अनंता जन्मींचें पुण्य बहुत । तैं देखे पंढरीनाथ ॥ १ ॥ वायां शिणताती बापुडीं । काय गोडी धरुनी ॥ २ ॥ पाहतां विठ्ठलाचें मुख । हरे सर्व पाप निवारे दुःख ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल उभा । त्रैलोक्याचा गाभा विटेवरी ॥ ४ ॥

६५६ हृदयस्थ आत्माराम नेणती । मूर्ख ते फिरती तीर्थाटणीं ॥ १ ॥ काय तया भ्रांति पडलीसे जीवा । देवाधिदेवा विसरती ॥ २ ॥ विश्वाचा तो आत्मा उभा विटेवरी । भक्तकाज कैवारी पांडुरंग ॥ ३ ॥ प्रणवा पैलीकडे वैखरीये कानडे । भाग्य तें केवढें पुंडलिकाचें ॥ ४ ॥ तयाचिया लोभा गुंतूनि राहिले । अठ्ठावीस युग जाले न बैसे खालीं ॥ ५ ॥ सन्मुख चंद्रभागा संतांचा सोहळा । एका जनार्दनीं डोळां पाहूं चला ॥ ६ ॥

६५७ भीमा दक्षिणवाहिनी । मध्यें पुंडलीक मुनी । विठ्ठल विटे समचरणीं । भक्तालागीं तिष्ठत ॥ १ ॥ न म्हणे लहान थोर कांहीं । याती वर्णा विचार नाहीं । प्रेम भाव पायीं । येवढेंचि पुरे तेथें ॥ २ ॥ दृढ धरुनी विश्वास । पाहे पंढरीनिवास । एका जनार्दनीं दास । सर्वभावें अंकित ॥ ३ ॥

६५८ भलते भावें शरण येतां । निवारी जन्ममरण चिंता । उदार लक्ष्मीचा दाता । साक्ष पुंडलीक करुनी सांगे ॥ १ ॥ येथें या रे लहान थोर । भावें नारी अथवा नर । मोक्षाचा विचार । न करणें कवणाही ॥ २ ॥ एका दरुशनें मुक्ती । पुन्हां नाहीं जन्मावृत्ती । एका जनार्दनीं चित्तीं । सदोदित तें सुख ॥ ३ ॥

६५९ उदार उदार । सखा पांडुरंग उदार ॥ १ ॥ ठेवा मन त्याचे पायीं । तुम्हां उणें मग कायी ॥ २ ॥ दुजीयासी कींव । कां रे भाकितसां जीव ॥ ३ ॥ तीं काय देतील बापुडीं । एका जनार्दनीं धरा गोडी ॥४॥

६६० आणिकांसि जातां शरण । हें तों तुम्हां उणीपण ॥ १ ॥ दास विठोबाचे व्हावें । तिहीं सर्व सुख भोगावें ॥ २ ॥ एका जनार्दनीं म्हणा दास । तुमची आस पुरवील ॥ ३ ॥

६६१ पुरवावया मनोरथ । उभा अनाथनाथ विठ्ठल ॥१॥ भोळेभाळे येती शरण । चुकवी त्यांचें जन्ममरण ॥ २ ॥ एका जनार्दनीं भाव । अर्पूनियां भाका कींव ॥ ३ ॥

६६२ जुनाट जुगादीचें नाणें । बहु काळाचें ठेवणें । पुंडलिकाचे पायाळपणें । उभें ठेलें विटेवरी ॥ १ ॥ युगें जाहलीं अठ्ठावीस । वास भीवरेतीरास । भक्तांचीं धरु आस । विटे उभा राहिला ॥ २ ॥ एका जनार्दनीं भाव । तया भेटतसे देव । अभागीयां भेव । सदा वसे अंतरीं ॥ ३ ॥

६६३ आणिकांचें मत नका पडूं तेथ । भजा पंढरीनाथ एकभावें ॥ १ ॥ काय होणार तें होईल देहाचें । नाशिवंत साचें काय हातीं ॥२॥ मृत्तिकेचा गोळा गोळाचि मृत्तिका । वाउगाचि देखा शीण वाहे ॥ ३ ॥ घट मठ जेवीं आकाश निराळें । एका जनार्दनीं खेळे अकळची ॥ ४ ॥

६६४ माझ्या वडिलांचें दैवत । कृपाळु हा पंढरीनाथ ॥ १ ॥ पंढरीसी जाऊं चला । भेटूं रखुमाईविठ्ठला ॥ २ ॥ पुंडलिकें बरवें केलें । कैसें भक्तीनें गोंविलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नीट । पायीं जडलीसे वीट ॥ ४ ॥

६६५ ॐकार स्वरूप सद्गुरू असंग । अक्षय अभंग पांडुरंग ॥१॥ नसे ज्याचे ठायीं द्वैताद्वैत भाव । ब्रह्म स्वयमेव पांडुरंग ॥ २ ॥ मस्तक हें माझें तयाचे चरणीं । असे जनीं वनीं पांडुरंग ॥ ३ ॥ सद्सद्भाव हे नसती ज्याचे ठायीं । नित्य तो मी गाई पांडुरंग ॥ ४ ॥ गुरूराज माझा दिनांचा दयाळ । तोडी मायाजाळ पांडुरंग ॥ ५ ॥ रवी शशी दीप्ती जेणें प्रकाशती । तो हा तेजमूर्ती पांडुरंग ॥ ६ ॥ वेद जयालागीं नित्य वाखाणिती । तो हा वेदमूर्ती पांडुरंग ॥ ७ ॥ श्रीमान हा माझा सद्गुरू समर्थ । देई मोक्ष स्वार्थ पांडुरंग ॥८॥ पांचा भूतांची जो करितो झाडणी । तो हा ज्ञानखाणी पांडुरंग ॥ ९ ॥ दुरकणी देई मोह पंचानन । करी त्या हनन पांडुरंग ॥ १० ॥ रंगे चित्त माझें तयाच्या स्वरूपीं । असे आप आपीं पांडुरंग ॥ ११ ॥ गर्व अभिमान सोडावा समूळ । भेटे तो दयाळ पांडुरंग ॥ १२ ॥ महा माया एके क्षणांत निरसी । सुखाची पैं राशी पांडुरंग ॥ १३ ॥ हाव ही धरी जो सद्गुरुपायाची । इच्छा पुरवी त्याची पांडुरंग ॥ १४ ॥ राजा त्रैलोक्याचा गुरूराजस्वामी । वसे अंतर्यामी पांडुरंग ॥ १५ ॥ जाया पुत्र धन तयासी अर्पील । सर्वस्व रक्षील पांडुरंग ॥१६॥ यमाची जाचणी तयासी चुकली । गुरुमूर्ति भेटली पांडुरंग ॥ १७ ॥ प्रभा हे जयाची पसरली जनीं । चिद्रूपाची खाणी पांडुरंग ॥ १८ ॥ भूतळीं या नसे दुजा कोणी पेसा । भक्तांचा कोंवसा पांडुरंग ॥१९॥

नेई भक्तांसी जो आपुल्या समीप । तो हा मायबाप पांडुरंग ॥ २० ॥ इति कर्तव्यता हीच दासालागीं । सेवावा हा जगीं पांडुरंग ॥ २१ ॥ तीकडी सांखळी त्रिगुणाची तोडी । भवांतूनि काढी पांडुरंग ॥ २२ ॥ उपमा तयासी काय देऊं आतां । सकळार्थ दाता पांडुरंग ॥ २३ ॥ परोपकारालागीं अवतार केला । आनंदाचा झेला पांडुरंग ॥ २४ ॥ नाम हें तयाचें जन्ममरण वारी । भक्त सहाकारी पांडुरंग ॥ २५ ॥ मन हें जडलें तयाचिया पदीं । उतरी भवनदी पांडुरंग ॥ २६ ॥ कायावाचामनें स्वरूपीं रहावें । नाम आठवावें पांडुरंग ॥ २७ ॥ यम नियम साधी साधन अष्टांग । होईल सर्वांग पांडुरंग ॥ २८ ॥ एका जनार्दनीं देह हारपला । होऊनि राहीला पांडुरंग ॥ २९ ॥

६६६ अगाध भगवंताचीं नामें । अगाध त्यांचीं जन्मकर्में ॥ १ ॥ शिणले ते वाखाणितां । शेषा न कळे तत्वतां ॥ २ ॥ रमा जाणों गेली । ती सुखें मौनावली ॥ ३ ॥ वेडावलीं दरूशनें । भांबावलीं तीं पुराणें ॥ ४ ॥ ऐसा उदार श्रीहरी । शोभतसे भीमातीरीं ॥ ५ ॥ शरण एका जनार्दन । मीनला एकपणें जाऊन ॥ ६ ॥

## श्रीविठ्ठलनाममहिमा.

६६७ अकार उकार मकार नामचि ठेविलें । शिवातेंहि केलें निराकार ॥ १ ॥ जीव शिव दोन्ही विराले ज्यामाजीं । तें नाम सहजीं विठ्ठल होय ॥ २ ॥ नामावीण नाहीं आणिकांसी ठाव । दुजा नाहीं भाव जीवां सर्वा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम घनदाट । भूवैकुंठ पेठ पंढरी देखा ॥ ४ ॥

६६८ अविनाश नाम स्वयंभ संचलें । तें उभें चांगलें विटेवर ॥ १ ॥ वर्णितां वेदांसी न कळेचि पार । तें उभें साचार विटेवरी ॥ २ ॥ मौन्यरूप श्रुती राहिल्या तटस्थ । तो आहे मूर्तिमंत विटेवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम अविनाश । गातां जाती दोष जन्मांतरींचे ॥ ४ ॥

६६९ जयालागीं करिती योगी सायास । तो हरी पंढरीस उभा असे ॥ १ ॥ न लगे साधन मांडणें तत्वतां । नाम गातीं गातां सोपा सर्वा ॥ २ ॥ नर अथवा नारी न म्हणे दुराचारी । दर्शनें उद्धरी जडजीवां ॥ ३ ॥ पुंडलिका भा[illegible] देऊनि सावकाश । पुरविते सौरस अद्यापिवरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं चैतन्याचा गाभा विटेवरी उभा भक्तांसाठीं ॥ ५ ॥

६७० तुमचें नाम आठवितां । धणी न पुरे पंढरीनाथा ॥ १ ॥ सुख अनुपम्य कल्प कोडी । युगा ऐसी एक घडी ॥ २ ॥ निजध्यास जडतां नामीं । सुखें सुख दुणावे प्रेमीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । श्रेष्ठ धामांचें हें धाम ॥ ४ ॥

६७१ अंकितपणें राहिला उभा । विठ्ठल चैतन्याचा गाभा । उजळली दिव्य प्रभा । अंगकांति साजिरी ॥ १ ॥ पीतांबर माळ कंठीं । केशर कस्तुरीची उटी । मुगुटा तळवटीं । मयुरपिच्छें शोभती ॥ २ ॥ सनकादिकांचें जें ध्यान । उभे विटे समचरण । भक्तांचें ठेवणें । जाप्य गौरीशिवाचें ॥ ३ ॥ तो देवाधिदेव विठ्ठल । वाचे वदतां न लगे मोल । एका जनार्दनीं बोल । फुकाचें तें वेचितां ॥ ४ ॥

६७२ श्रीविठ्ठलाचें नाम मंगल । अमंगल उद्धरले ॥ १ ॥ ऐसा याचा थोर महिमा । शिव उमा जाणती ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम ब्रह्म । सोपें वर्म जपतां ॥ ३ ॥

६७३ सर्वकाळ ज्यांचा नेम । वाचे श्रीविठ्ठलाचें नाम । दुजा नाहीं कांहीं श्रम । विठ्ठल विठ्ठल वदती ॥ १ ॥ धन्य पुण्य तया साचें । नामस्मरण नित्य वाचे । त्रीअक्षरी नाम वाचें । धन्य त्यांचें पुण्य तें ॥ २ ॥ ऐसा साधे जया नेम । तया सोय राखे आत्माराम । एका जनार्दनीं परम । प्रिय तो देवाचा ॥ ३ ॥

६७४ त्राहित त्राहित त्राहित । विठ्ठल देव तो त्राहित ॥ १ ॥ वेदवचनें निर्धार । नाम तारक हें सार ॥ २ ॥ तारक तारक श्रेष्ठ । पुराणीं हा बोभाट ॥ ३ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । नाम तारक हें देखा ॥ ४ ॥

६७५ नामामृत गोडी वैष्णव जाणती । येर चरफडती काग जैसे ॥ १ ॥ प्राकृत हे जन भुलले विषया । नामाविण वांया जाती देखा ॥ २ ॥ नामें साधे मुक्ति नामें साधे भुक्ति । नामेंचि विरक्ति होत आहे ॥ ३ ॥ नाम तेंचि जालें वर्णरुपातीत । अनाम सतत उभें असे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पूर्ण नामबोध । विठ्ठलनामीं छंद सदा असो ॥ ५ ॥

६७६ दीनाचिया काजा । धांवे वैकुंठीचा राजा ॥ १ ॥ तो हा हरी विटेवरी । समकर धरुनीं करीं ॥ २ ॥ भक्त पुंडलिका पाहे । उभारुनी दृढ बाहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । विठ्ठलनाम पतीतपावन ॥ ४ ॥

६७७ उभा चंद्रभागे तीरीं। कट धरुनियां करीं ॥ १ ॥ रूप सांवळें सुंदर। कानीं कुंडलें मकराकार ॥ २ ॥ तुळशीमाळा शोभे कंठीं। अंगीं चंदनाची उटी ॥ ३ ॥ भक्त आनंदें गर्जती। विठ्ठल विठ्ठल उच्चारिती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ध्यान। शोभे सगुण निर्गुण ॥ ५ ॥

६७८ कस्तुरीची उटी टिळक ललाटीं। सांवळा जगजेठी उभा विटे ॥ १ ॥ नाम हें चांगलें रूप हें चांगलें। दरुशन चांगलें विठोबाचें ॥ २ ॥ आला पंढरीसी पुंडलिकाचें भक्तीं। दरुशनें मुक्ति पातकी-यांसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आनंदाचा कंद। उभा तो गोविंद विटेवरी ॥ ४ ॥

६७९ गोमटीं गोजिरीं पाऊलें साजिरीं। कटी मिर-विलीं करें दोन्हीं ॥ १ ॥ वामभागीं शोभे भीमकतनया। राही सत्यभामा या जीवलगा ॥ २ ॥ गरुड हनुमंत जोडलें ते करी। उभे महाद्वारीं भक्तजन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आनंद भक्तांचा। जयजयकार साचा विठ्ठलनामें ॥ ४ ॥

६८० उभा विटेवरी कट धरुनियां करीं। पीतांबर साजिरी बुंथी शोभे ॥ १ ॥ विठोबा विठोबा नामाचा हा छंद। मन तें उद्बोध जडो पायीं ॥२॥ त्री अक्षर नाम जप हा परम। तो मंगळधाम विठ्ठल माझा ॥३॥ एका जनार्दनीं विठ्ठल कानडा। देखिला उघडा विटेवरी ॥ ४ ॥

६८१ अगम्य तुझा खेळ। ब्रह्मादिकां तो अकळ। नेणवेचि सबळ। वेदशास्त्रां ॥ १ ॥ तो वसे पंढरपुरीं। कट धरिले दोनी करीं। पीतांबर साजिरी। बुंथी शोभे तयासी ॥ २ ॥ तुळशीमाळा शोभती गळां। कांसे कासिला सोनसळा। पदक आणि वन-माळा। वैजयंती शोभती ॥ ३ ॥ वामभागीं ती रुक्मिणी। राही सत्यभामा दोन्ही। पुढें पुंडलीक मुनी। तीर्थ तें चंद्रभागा ॥४ ॥ वेणुनाद गोपाळपूर। पद्माळें तें परीकर। बिंदुतीर्थ सर्वेश्वर। सभोंवती शोभताती ॥ ५ ॥ गरुड हनुमंत दोन्ही। शोभताती राउळांगणीं। विठ्ठलमूर्ती धणी। पाहतांचि सुखावे ॥ ६ ॥ भक्त उभे सहपरिवार। करिती नामाचा गजर। एका जनार्दनीं परीकर। सेवा तेथें करीतसे ॥ ७ ॥

६८२ श्रीगुरुसारखा वंद्य नाहीं त्रिभूवनीं। तो कैव-ल्याचा धनी विटेवरी ॥ १ ॥ विटेवरी उभा आनंदें राहिला। वैष्णवांचा मेळा शोभे तेथें ॥ २ ॥ आनंद भीमातीरीं पुंडलिकापाशीं। नाम आनंदेसी गाऊं गीती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कैवल्याचा धनी। तो नंदाचे अंगणीं खेळे लीला ॥ ४ ॥

६८३ कैचें आम्हां यातीकुळ। कैचे आम्ही धर्म-शीळ ॥ १ ॥ तुझें नामीं अनुसरलों। तिहीं लोकीं सरते झालों ॥ २ ॥ कैची क्रिया कैचें कर्म। कैचा वर्णाश्रम धर्म ॥३॥ एका जनार्दनीं यातीकुळ। अवघा व्यापक विठ्ठल ॥४॥

६८४ जन्मांतर सुखें घेऊं। श्रीविठ्ठलनाम आठवूं ॥ १ ॥ नाहीं त्याचें आम्हां कोडें। विठ्ठल उभा मागें पुढें ॥ २ ॥ कळिकाळाचें भय तें किती। पाय यम-धर्म वंदिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सिद्धी। नामें तुटती उपाधी ॥ ४ ॥

६८५ व्यापक विठ्ठल नाम तेव्हांचि होईल। जेव्हां तें जाईल मीतूंपण ॥ १ ॥ आपलें तें नाम जेव्हां वोळखील। व्यापक साधेल विठ्ठल तेणें ॥२॥ आपले वोळखी आपणाचि सांपडे। सर्वत्राही जोडे विठ्ठल-नाम ॥ ३ ॥ नामाविण जन पशूच्या समान। एका जनार्दनीं जाण नाम जप ॥ ४ ॥

६८६ सर्वांमाजीं सार नाम विठोबाचें। सर्व साध-नांचें घर जे कां ॥ १ ॥ सहा चार अठरा वर्णिताती कीर्ती। नामें मोक्षप्राप्ती अर्धक्षणीं ॥ २ ॥ शुकादिकीं नाम साधिलेंसे दृढ। प्रपंच कावाड निरसिलें ॥३॥ एका जनार्दनीं जनीं ब्रह्मनाम। तेणें नेम धर्म सर्व होय ॥ ४ ॥

६८७ सदा सर्वकाळ मनीं वसे देव। तेथें नाहीं भेव कळिकाळाचा ॥ १ ॥ काळ तो पुढारी जोडितसे हात। मुखीं नाम गात तयापुढें ॥२॥ म्हणोनि आदरें वाचे नाम घ्यावें। रात्रंदिवस ध्यावें विठ्ठलासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जपतां नाम हाटीं। पूर्वजां वैकुंठीं पायवाट ॥ ४ ॥

६८८ नाम मुखीं सदा धन्य तो संसारीं। वांयां हाव भरी होऊं नये ॥ १ ॥ तारक तें नाम तारक तें नाम। तारक तें नाम विठ्याचें ॥ २ ॥ जडजीवां तारी दोषियां उद्धरी। एका जनार्दनीं निर्धारीं तारक नाम ॥ ३ ॥

६८९ उदार धीरनिधी। श्रीविठ्ठल नाम आधीं ॥ १ ॥ पतीतपावन सिद्धी। श्रीविठ्ठल नाम आधीं ॥२॥ सुखसागरनिधी। श्रीविठ्ठल नाम आधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बुद्धी। श्रीविठ्ठल नाम आधीं ॥ ४ ॥

६९० शंखचक्र पद्म विराजित करीं । बाप तो श्रीहरी उभा विटे ॥ १ ॥ रुक्मिणी सत्यभामा शोभतसे राही । गरुड हनुमंत दोघे दों ठायीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं सर्वांचें सार । विठ्ठल विठ्ठल वाचे जपा निर्धार ॥ ३ ॥

६९१ जयाचिया भेटी जातां । मोक्ष सायुज्यता पाठीं लागे ॥ १ ॥ ऐसा उदार पंढरीराणा । पुरवी खुणा मनींच्या ॥ २ ॥ एक वेळ दरुशनें । तुटतीं बंधनें निश्चयें ॥३॥ एका जनार्दनीं एक्याभावें । काया वाचा मनें गावें ॥ ४ ॥

६९२ सकळ सुरां मुकुटमणी । जो का त्रैलोक्याचा धनी । भक्तां अभयदानी । उदारपणें ठाकला ॥ १ ॥ आठवावा वेळोवेळां । भय नाहीं कळिकाळा । लागलासे चाळा । न फिरेचि माघारीं ॥ २ ॥ मागां बहुतां अनुभव । तारियेले पापी सर्व । एका जनार्दना स्वयमेव । पंढरीराव पुरवीत ॥ ३ ॥

६९३ न धरी लौकिकाची लाज । तेणें सहज नाम गावें ॥ १ ॥ अनायासें देव हातां । साधन सर्वथा दुजें नाहीं ॥ २ ॥ साधन ते खटपट । नाम वरिष्ठ नित्य गावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपा । विठ्ठलनाम मंत्र जपा ॥ ४ ॥

६९४ बोल बोलता वाचे । नाम आठवी विठ्ठलाचें ॥ १ ॥ व्यर्थ बोलणें चावटी । नामावांचुनी नको होटी ॥ २ ॥ नाम हें परमामृत । नामें पावन तिन्ही लोक ॥ ३ ॥ नाम सोपे भूमंडळीं । महापापां होय होळी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । नाम पतीतपावन ॥ ५ ॥

६९५ चांडाळादि ब्राह्मण सर्व नारीनर । सर्वांसी आधार नाम सत्य ॥ १ ॥ नामाविण गती नसेचि आणिक । वैकुंठनायक सुलभ देखा ॥ २ ॥ नाम विठोबाचें घ्यावें निशिदिनीं । चौऱ्यांशिची खाणी तेव्हां चुके ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्णता एकपणीं । नाम घ्या निशिदिनीं सर्वकाळ ॥ ४ ॥

६९६ विठ्ठलासी गाय विठ्ठलासी ध्याय । विठ्ठलासी पाहे वेळोंवेळां ॥ १ ॥ विठ्ठल विसावा सांडवण जीवां । म्हणोनि त्याच्या गांवां जावें आधीं ॥ २ ॥ विठ्ठलावाचुनि सोयरा जिवलग । विठ्ठलचि मार्ग जपा आधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठलावांचोनी । दुजा नेणे स्वप्नीं संग कांहीं ॥ ४ ॥

६९७ त्रैलोक्याचा मुगुटमणी । चक्रपाणी श्रीविठ्ठल ॥१॥ तयां गावें वेळोवेळां । आणीक चाळा विसरुनी ॥ २ ॥ संसाराचें नुरे कोड । पुरे चाड अंतरीची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । देव स्वयें तिष्ठे आपण ॥ ४ ॥

६९८ करावें पूजन मुखीं नामस्मरण । अनुदिनीं ध्यान संतसेवा ॥ १ ॥ आणिक न लगे यातायाती कांहीं । वाचे विठाबाई वदे कां रे ॥ २ ॥ एका जनार्दनीं संतांचे सांगात । त्याचे वचनें मात कळों येत ॥ ३ ॥

६९९ बरें वा वाईट नाम कोणी घोका । तो होय सखा विठोबाचा ॥ १ ॥ कोणत्या सहवासें जाय पंढरीसी । मुक्ति दारापाशीं तिष्ठे सदा ॥ २ ॥ विनोदें सहज ऐके कीर्तन । तया नाहीं पतन जन्मोजन्मीं ॥३॥ एका जनार्दनीं ऐशीं माझी भाष । धरावा विश्वास विठ्ठलनामीं ॥ ४ ॥

७०० धरा अंतरीं शुद्ध निष्ठा । पहा श्रेष्ठा विठ्ठला ॥१॥ वाचें उच्चारितां सहज । अधोक्षज तोषतो ॥ २ ॥ सहज अमृत पडतां मुखीं । होय शेखीं अमर तो ॥३॥ नामामृत घेतां वाचे । कोटी जन्मांचें सार्थक ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं । घेत नामामृत संजीवनी ॥ ५ ॥

७०१ विठ्ठल विठ्ठल वदतां वाचे । स्वरूप त्याचें ठसावें ॥ १ ॥हा तो अनुभवा अनुभव । निरसे भेव काळाचें ॥ २ ॥ रूप देखतां आनंद । जन्म कंद तुटे तेणें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । जडोन ठेलें चरणीं ॥ ४ ॥

७०२ ऐका ऐका वचन माझें । तुम्हीं वदा विठ्ठल वाचें ॥ १ ॥ नामापरतें साधन नाहीं । वेदशास्त्रें देती ग्वाही ॥ २ ॥ चार वेद सहा शास्त्र । अवघा नामाचा पसर ॥ ३ ॥ अठरा पुराणांचे पोटीं । नामेंविण नाहीं गोष्टी ॥ ४ ॥ नामें तारीले पातकी । मुक्त झाले इहलोकीं ॥ ५ ॥ अजामेळ तारिला । वाल्हा कोळी ऋषी केला ॥ ६ ॥ गणिका नेली निजपदा । रामनाम वदे एकदां ॥ ७ ॥ ऐसी नामाची ती थोरी । पुतना तारिली निर्धारीं ॥ ८ ॥ आवडीनें नाम गाय । एका जनार्दनीं वंदी पाय ॥ ९ ॥

७०३ अवघे दैवतां नका पाहूं । आदरें आवडी विठ्ठल गाऊं ॥ १ ॥ अवघे पोटाचे भिकारी । हिंडविती दारोदारीं ॥ २ ॥ अवघे ते घांयां जाय । काय भरूनि त्यांचे पाय ॥ ३ ॥ आपल्या पोटा जें रडतें ।

आणिकातें काय देतें ॥ ४ ॥ मागून खाती जना । काय पुरविती वासना ॥५॥ ऐसियासी देव म्हणणें । सदा आम्हा लाजिरवाणें ॥ ६ ॥ आम्ही आणिकां शरण जातां । लाज लागेल सर्वथा ॥ ७ ॥ ऐसें नका येऊं देऊं मना । शरण एका जनार्दना ॥ ८ ॥

७०४ आठवी गोविंद वेळोवेळां वाचे । तेणें या देहाचें सार्थक होय ॥१॥ विठ्ठल विठ्ठल मनीं निरंतर साचा । काया मनें वाचा छंद त्याचा ॥ २ ॥ त्याविण आणिक दैवत पैं नाहीं । आणिके प्रवाहीं गुंतूं नको ॥ ३ ॥ सर्व सुखाचा विठ्ठल सांगाती । एका जनार्दनीं भ्रांती काढी काढी ॥ ४ ॥

७०५ काढी काढी भ्रांती देहाची सर्वथा । प्रपंचाची चिंता नको तुज ॥ १ ॥ सर्वभावें शरण विठ्ठलासी जाई । ठायींचाचि ठायीं निवारील ॥ २ ॥ देह गेह माझें म्हणणें हें दुजें । सर्व विठ्ठलराजे समर्पी तूं ॥३॥ एका जनार्दनीं करी आठवण । चित्तीं तूं पावन परब्रह्म ॥ ४ ॥

७०६ जप तप मंत्र न लगे साधन । वाचे नारायण इतुका जप ॥ १ ॥ तुटेल बंधन खुंटेल पतन । जप जनार्दन एकाविध ॥ २ ॥ एका जनार्दनीं नको आणीक बोल । वाचेसी विठ्ठल जपे आधीं ॥३॥

७०७ दृढभाव हृदयीं धरा । वाचे स्मरा विठ्ठल ॥१॥ मग तुम्हां काय उणें । हाय पेणें वैकुंठ ॥ २ ॥ धरा सत्यसमागम आवडीं । कीर्तनपरवडीं नाचावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं श्रोते । एकात्मते पावाल ॥ ४ ॥

७०८ बहुतांची मतांतरें तीं टाकुनी । विठ्ठलचरणीं बुडी दे कां ॥ १ ॥ नव्हे तुज बाधा काळाची आपदा । ध्याई तूं गोविंदा प्रेमभरीत ॥ २ ॥ जनार्दनाचा एका लाहूनं चरणीं । बोलतसे वाणी करुणाभरीत ॥ ३ ॥

७०९ धन वित्त आशा धरूनी स्मरती । तेही मुक्त होती विठ्ठलनामें ॥१॥ प्रपंच परमार्थ धरुनियां हाव । गाती विठ्ठल देव आवडीनें ॥ २ ॥ तरती तरले हाचि भरंवसा । एका जनार्दनीं ठसा विठ्ठलनाम ॥३॥

७१० जाणत्यां नेणत्यां हाचि उपदेश । विठ्ठल वाचे जप सुखें करा ॥ १ ॥ न करा साधन वाउगाची शीण । विठ्ठलरूपीं मन निमग्न राहो ॥२॥ भलतिया परी विठ्ठलासी गाये । सुखा उणें काय तुजला आहे ॥ ३ ॥ जन्ममरण तुटे आधिव्याधी । विठ्ठलनामें सिद्धि पायां लागे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जपतां विठ्ठल । न लगे तया मोल धन कांहीं ॥ ५ ॥

७११ स्थिर करूनियां मन । वाचे गावा जनार्दन ॥ १ ॥ तुटतीं बंधनें । यमयातनेची ॥२॥ ऐशी विठ्ठल माऊली । वाचे स्मरा वेळोवेळीं । कळिकाळाची चाली । होऊं नेदी सर्वथा ॥ ३ ॥ कापलिया काळ । येथें न चले त्याचें बळ । वाउगा पाल्हाळ । सांडा सांडा परता ॥ ४ ॥ धरा विश्वास दृढ मनीं । लक्ष लावावें चरणीं । शरण एका जनार्दनीं । नुपेक्षी तो सर्वथा ॥ ५ ॥

७१२ जग तारिलें कीर्तनीं । श्रीविठ्ठल नामवाणी ॥ १ ॥ ऐसा मंत्र त्री अक्षरीं । विठ्ठल विठ्ठल निर्धारीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं । विठ्ठल पाहे ध्यानीं मनीं ॥ ३ ॥

७१३ लाहो करा लाहो करा । वाचे स्मरा विठ्ठल ॥ १ ॥ तुटेल बंधन उपाधी । बाधों न शके आधीव्याधी ॥ २ ॥ न लगे खटपट पसारा । वाचे विठ्ठल उच्चारा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें । विठ्ठल म्हणतां नुरती पापें ॥ ४ ॥

७१४ एकविध भावें हरी । वाचे उच्चारी सर्वदा ॥ १ ॥ सर्व साधनांचें सार । विठ्ठलमंत्राचा उच्चार ॥ २ ॥ असो सदा हेंचि ध्यान । विठ्ठलनामाचें चिंतन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जपा । विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा ॥ ४ ॥

७१५ एक वेळ गाय विठ्ठलाचें नाम । मोक्ष मुक्ति सकाम पुढें उभे ॥ १ ॥ आवडीनें घाली तया लोटांगण । संतांचे चरण वंदी माथां ॥ २ ॥ पंढरीची वारी संतांचा सांगात । पुरती सर्व हेत निश्चयेंसी ॥३॥ एका जनार्दनीं धरूनि विश्वास । संतांचा दास होय आधीं ॥ ४ ॥

७१६ बैसोनी एकांतीं । सदा ध्यावी विठ्ठलमूर्ती ॥१॥ तेणें चुकेर बंधन । आन न करी साधन ॥ २ ॥ हेंचि वेदशास्त्रांचें सार । आगमनिगमांचा पसर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रूप । पाहतां अमूपउद्धार ॥ ४ ॥

७१७ विठ्ठल म्हणतां विठ्ठलचि होसी । संदेह येविशीं धरूं नको ॥ १ ॥ सागरीं उठती नाना पैं तरंग । सिंधु तो अभंग विठ्ठल एक ॥ २ ॥ तैसें मन करीं द्वैत न धरी । सर्व चराचरीं विठ्ठल एक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठलावांचुनी । दुजा नेणों कोणी स्वप्नीं आम्ही ॥ ४ ॥

७१८ उघडा हा मंत्र विठ्ठल वदा वाचे । अनंता जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ न करी आळस आलिया संसारीं । वदा निरंतरीं विठ्ठलनाम ॥ २ ॥ साधेल साधन तुटतीं बंधनें । विठ्ठलनाम जाण जप करीं ॥३॥ एका जनार्दनीं आसनीं शयनीं । विठ्ठल निशिदिनीं जप करी ॥ ४ ॥

७१९ अखंडीत वाचे । विठ्ठल वदा साचें ॥ १ ॥ तेणें चुकती बंधन । कर्माकर्मी नाहीं पतन ॥ २ ॥ सदा विठ्ठल ध्यानीं मनीं । तोचि पुण्यपावन जनीं ॥ ३ ॥ जननी पवित्र तयाची हाव । एका जनार्दनीं धन्य सुख ॥ ४ ॥

७२० सांडी परापवाद खोडी । घेई विठ्ठलस्वरुपीं गोडी ॥ १ ॥ व्यर्थ टवाळाचे बोल। बोलूं नका म्हणा विठ्ठल ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल नेटका । भावें म्हणतां ब्रह्म फुका ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साचें । विठ्ठल विठ्ठल म्हणतां वाचे ॥ ४ ॥

७२१ अचुक साधन कष्ट नाहीं कांहीं । वाचे विठ्ठल-रखुमाई म्हणे सुखें ॥ १ ॥ जन्ममरणाच्या तुटतील खेपा । सोपा होय बापा मार्ग तुज ॥ २ ॥ बहुत मार्ग बहुत साधन । परी वाचा जाण शीण दुर्गम तें ॥३॥ एका जनार्दनीं कष्ट ना सायास। म्हणा वाचे विठ्ठलास जीवेंभावें ॥ ४ ॥

७२२ ज्ञान होय आधीं संतां शरण जातां। मग बोळखितां कळे रूप ॥ १ ॥ नामांचें जें मूळ रूपाचें रूपस। पंढरीनिवास हृदयीं धरी ॥ २ ॥ प्रपंचीं परमार्थी तारक हें नाम । ब्रह्मानंद प्रेम सर्व वसे ॥३॥ सच्चिदानंद खूण एका जनार्दन । स्वयं ब्रह्म जाण नाम असे ॥ ४ ॥

७२३ गायन तें सोपें गाऊं । वाचे ध्याऊं विठ्ठल ॥ १ ॥ तेणें सर्व होय सिद्धी । तुटे उपाधि जन्मजरा ॥ २ ॥ साधनांचा न करूं श्रम । गाऊं नाम आवडीं ॥ ३ ॥ शुकादिक रंगले रंगीं । त्याची मार्गी आम्ही जाऊं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं धणीवरी । उच्चारुं हरी संतसंगें ॥ ५ ॥

## श्रीरामनाममाहिमा.

७२४ शिवाचे हृदयीं नांदसी श्रीरामा । काय वर्णूं महिमा न कळे आगमानिगमां ॥ १ ॥ वेदशास्त्रें मौनावलीं पुराणें भांबावलीं । श्रुति म्हणती नेति नेति शब्दें खुंटली ॥ २ ॥ वाच्य वाचक जगन्नाथ स्वयें शिवाचा आत्माराम । एका जनार्दनीं सुख तयांसी गातां निष्काम ॥ ३ ॥

७२५ मानवा रामनामीं भजें । तेणें तुझें कार्य होतें सहजें ॥ १ ॥ अनुभव घेई अनुभव घेई । अनुभव घेई रामनामीं ॥ २ ॥ शंकरादि तरले वाल्मिकादि उद्धरले । तें तूं वहिलें घेई रामनाम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामाच्या परिपाठीं । दोष पातकें पळती कोटी ॥ ४ ॥

७२६ कासयासी हटयोग धूम्रपान । घालुनी आसन चितीं वेगीं ॥ १ ॥ सोपा रे मंत्र राम अक्षरें दोनी । जपतां चुके आयणी चौऱ्यांशीची ॥ २ ॥ मागें बहुतांचा उपदेश हाची । तरले रामनामेंचि पातकी जन ॥ ३॥ एका जनार्दनीं रामनाम ख्याती । जाहली पैं विश्रांति शंकरासी ॥ ४ ॥

७२७ देवाचें हें गूज सकळ मंत्रमय। जें कां निजध्येय शंकराचें ॥ १ ॥ तें हें रामनाम सेविती सर्वभावें । रामरूप व्हावें निश्चयेंसी ॥ २ ॥ नष्ट अजामेळाचें पतितत्व गेलें । दिव्यरूप जालें वाल्मिकीचें ॥ ३ ॥ शरीर संपत्ती बळें अपूर्व सकळ । जाला द्वारपाळ एका जनार्दनीं ॥ ४॥

७२८ सुख रामनामें अपार । शंकर जाणें तो विचार ॥ १ ॥ गणिका जाणें रामनाम । गजेंद्र उद्धरिला राम ॥ २ ॥ शिळा मुक्त केली । रामनामें पदा गेली ॥ ३ ॥ तारिले वानर। रामनामें ते साचार ॥ ४ ॥ रामनामें ऐसी ख्याती । एका जनार्दनीं प्रीती ॥ ५ ॥

७२९ भवभयनाशक रामनाम तारक । शंकर राजा सुख जाणतसे ॥१॥ योगयाग नको आणिक साधनें । नामापरतें पेणें आणिक नाहीं ॥ २ ॥ कलीमाजीं श्रेष्ठ रामनाम निज । यापरतें बीज आणिक नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम तारक थोर । तुटे वेरझार रामनामें ॥ ४ ॥

७३० आणिकाचे नामें कोण हो तरला । ऐसें सांगा मला निवडोनी ॥ १ ॥ या रामनामें पातकी पतीत । जीव असंख्यात उद्धरीले ॥ २ ॥ जुनाट हा पंथ शिवाचें हें ध्येय । रामनाम गाये स्मशानीं तो ॥३॥ गिरजेसी आवडी रामनामें गोडी । एका जनार्दनीं जोडी हेंचि आम्हां ॥ ४ ॥

७३१ रामनाम उच्चार होटीं । संसाराची होये तुटी ॥१॥ संसार तो समूळ जाय । राम उच्चारुनी पाहे

॥२॥ मागें अनुभवा आलें । गजेंद्रादि उद्धरिले ॥ ३ ॥ शिव ध्यातो मानसीं । रामनाम अहर्निशीं ॥४॥ एका जनार्दनीं राम । पूर्ण परब्रह्म निष्काम ॥ ५ ॥

७३२ श्रीराम जयराम वदतां वाचे । पातकें जाती कोटी जन्मांचीं ॥ १ ॥ जयजय राम जयजय राम । तुमचें नाम गाये शंकर उमा ॥ २ ॥ नाम थोर तिहीं लोकीं साजे । उफराटें वदतां पातक नासलें वाल्याचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम साराचें सार । नामस्मरणें तुटे भवबंध येरझार ॥ ४ ॥

७३३ रामनाम जपे शिव तो स्मशानीं । वाल्मिक तो मुनी नाम जपे ॥ १ ॥ गणिका तारिली रामनाम घेतां । पातकी तत्वतां उद्धरिले ॥ २ ॥ रामनाम सुख शिव जाणे तत्वतां । येरांसी महत्त्व न कळे नाम॥३॥ साधनांचें सार नाम मुखीं गातां । रामनाम म्हणतां कार्यसिद्धी ॥४॥ एका जनार्दनीं रामनाम जप । वैकुंठीचा सोपा मार्ग तुम्हां ॥ ५ ॥

७३४ नाम उत्तम चांगलें । त्रिभुवनीं तें मिरविलें । जें शंभूनें धरिलें । निजमानसीं आदरें ॥ १ ॥ धन्य मंत्र रामनाम । उच्चारितां होय सकाम । जन्म कर्म आणि धर्म । होय सुलभ प्राणियां ॥ २ ॥ एका जनार्दनीं वाचे । ध्यान सदा श्रीरामाचें । कोटी तें यज्ञांचें । फळ तात्काळ जिव्हेसी ॥ ३ ॥

७३५ एक नाम वाचे । सदा जपे श्रीरामाचें ॥ १ ॥ तेणें तुटेल बंधन । आन नाहीं पैं साधन ॥२॥ नामापरतें साधन । नाहीं नाहीं उत्तम जाण ॥ ३ ॥ नाम जपे चंद्रमौळी । जपी तपी ते सकळीं ॥४॥ एका जनार्दनीं नाम । हेंचि मोक्ष निजधाम ॥ ५ ॥

७३६ शिव सांगे गिरजेप्रती । रामनामें उत्तम गती ॥ १ ॥ असो अधम चांडाळ । नामें पावन होय कुळ ॥ २ ॥ नाम सारांचें पैं सार । भवसिंधु उतरी पार ॥ ३ ॥ नाम श्रेष्ठांचें पैं श्रेष्ठ । एका जनार्दनीं वरिष्ठ ॥ ४ ॥

७३७ जपतां रामनामावळी । महादोषां होय होळी ॥ १ ॥ ऐसा महिमा नामाचा । किती वर्णावा पैं वाचा ॥ २ ॥ बैसोनि स्मशानीं । शंभु जपे ध्यानीं मनीं ॥३॥ गिरजेसी वारंवार । सांगे रामनाम शंकर ॥४॥ तें हें उत्तम रामनाम । एका जनार्दनीं निजधाम ॥ ५ ॥

७३८ अहर्निशीं ध्यान शंकर धरी ज्याचें । तो श्रीराम वाचे कां रे नाठविसी ॥ १॥ रामनाम म्हणतां तुटेल बंधन । होईल खंडन कर्माकर्मीं ॥२॥ रामनामें गणिका नेली मोक्षपदा । तुटती आपदा गर्भवास ॥ ३ ॥ रामनाम जप नित्य तीं समाधी । एका जनार्दनीं उपाधि तुटोनि गेली ॥ ४ ॥

७३९ योगियांचा मुकुट म्हणती धूर्जटी । तो ही रामनाम कंठीं जपता हे ॥ १ ॥ स्मशानीं तो राहे रामनाम गाय । भोंवतें उभे पाहे ऋषी सर्व ॥ २ ॥ सदा समाधिस्त रामनामें रंगला । वाचे सदा चाळा रामनाम । एका जनार्दनीं श्रीरामावांचुनी । दुजा छंद मनीं नाहीं त्याचे ॥ ४ ॥

७४० रामनामें सुख अत्यंत जें आहे । म्हणोनि मना ध्यायें नित्य नाम ॥ १ ॥ सुखाचिया गोडी जया नाहीं ठावी । ते नर असोनिया देहीं प्रेतवत ॥२॥ शंकर जाणोनि स्मशानीं राहिला । अनुभव तो त्याला तोचि जाणे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुखाचें जें सुख । रामनाम देख पवित्र मुखीं ॥ ४ ॥

७४१ तरले तरती हा निर्धार । नामाचि सार घेतां वाचे ॥ १ ॥ तें हें श्रीरामनाम वाचा । शंकराचा विश्राम ॥ २ ॥ उणें पुरें नको कांहीं । वांया प्रवाहीं पडूं नको ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । पूर्ण चैतन्य निष्काम ॥ ४ ॥

७४२ श्रीरामनाम पावन क्षितीं । नामें दोषां होय शांती । नामेंचि उद्धरती । महा पातकी चांडाळ ॥१॥ नाम पावन पावन । शंभू राजा जपे जाण । इतरां ती खूण । न कळेचि कल्पांतीं ॥ २ ॥ नाम श्रेष्ठ तिहीं लोकीं । त्याची कीर्ति जो घोकी । जाय सत्यलोकीं । नाम घेतां प्राणी तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । पावविते निजधाम । स्त्रियादि अंत्यजां सम । सारिखेंचि सर्वांसी ॥ ४ ॥

७४३ गणिका नेली मोक्षपदां । रामनाम वदे एकदां ॥ १ ॥ धन्य नामाचा महिमा । वदतां शेषा उपरमा ॥ २ ॥ ध्यानीं ध्यातो शूळपाणी । रामनाम निशिदिनीं ॥ ३ ॥ रामनाम दोन अक्षर । एका जनार्दनीं निर्धार ॥ ४ ॥

७४४ आन नाहीं दुजा हेत । सदा रामनाम जपत ॥१॥ धन्य धन्य तें शरीर । पावन देह चराचर ॥२॥ अनुग्रहासाठीं । हरिहर लाळ घोटी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव । तेथें तिष्ठे स्वयमेव ॥ ४ ॥

७४५ अहर्निशीं म्हणतां । तेथें न बाधे काळ सत्ता ॥१॥ वरीष्ठा वरिष्ठ नाम। तिहीं लोकीं तें उत्तम ॥२॥ असो भलते याती । परी मुखीं नाम जपती ॥ ३ ॥ वंद्य होती हरिहरां । देवा इंद्रादिकां थोरां ॥ ४ ॥ ऐशी नामीं जया आवडी। एका जनार्दनीं गोडी ॥५॥

७४६ राम नाम वदे वाचे । धन्य मुख तयाचें । लोटांगणीं साचे । हरिहर पैं येती ॥ १ ॥ नाम चांगलें चांगलें । जड जीव उद्धरले । वैकुंठवासी केलें । कुडे कपटियांसी ॥ २ ॥ अजामेळादि पातकी । नामें तारिले महादोषी । यवनादि सुखी । नामें केलें ॥३॥ हास्य विनोदें नाम । घेतां पावे सर्वोत्तम । मा दृढ धरलीया प्रेम । देवचि होय ॥ ४ ॥ एका जनार्दनीं अनुभव । कलीमाजीं तारक सर्व । नामावांचुनी अन्यभाव । नाहीं नाहीं ॥ ५ ॥

७४७ जयजय रामचंद्रा जयजय रामचंद्रा । हर हरि जपे त्याचे हृदयीं मुद्रा ॥ १ ॥ सोपा जप अखंड वाचेसी वदतां । कामक्रोध लोभ पळे अहं ममता ॥ २ ॥ कासया जप तप अनुष्ठान वाउगा श्रम । नका गुंतूं संसारा वाचे म्हणा रामनाम ॥ ३ ॥ वाउगी उपाधी सांडोनी भजा श्रीरामा । एका जना र्दनीं वाचे वदा आत्मारामा ॥ ४ ॥

७४८ अखंड वाचे नाम । तया न बाधी क्रोध काम ॥ १ ॥ रामनाम वदतां वाचे । ब्रह्मसुख तेथें नाचे ॥ २ ॥ रामनाम वाचे टाळी । महादोषां होय होळी ॥ ३ ॥ दो अक्षरांसाठीं । ब्रह्मा लागे पाठोपाठीं ॥४॥ एका जनार्दनीं नाम । सहज चैतन्य निष्काम ॥ ५ ॥

७४९ वैखरी वाचा वदे रामकृष्ण । धन्य वंश संपूर्ण जगीं त्याचा ॥ १ ॥ आठवी नित्य नाम सदा वाचे । कळिकाळ त्याचे चरण चुरी ॥२॥ शिव विष्णु ब्रह्मा इंद्रादिक देव। करिती गौरव त्याचा बहु ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे उपाव । धरा नामीं भाव दृढ जनीं ॥ ४ ॥

७५० घ्या रे रामनामाची कावड भाई । शिव हर-हर वदा भाई । ॥ १ ॥ अकार उकार मकार तिचा पाया। उभारिलें त्रिगुण तनयां ॥२॥ हरिहर कावड घेतां खांदीं । तुटे जन्ममरण व्याधी ॥ ३ ॥ घेऊनि कावडी नाचे एका । एका जनार्दनीं आवडी देखा ॥४॥

७५१ श्रुतिशास्त्रां अति दुरी। तो परमात्मा श्रीहरी। तो दशरथाचे घरीं । क्रीडतु राम ॥ १ ॥ क्षण एक नमस्कारा । नातुडे सुरवरा । तो रिसां आणि वानर क्षेम देतो राम ॥ २ ॥ चरणीं शिळा उद्धरी । नामें गणिका तारी । तो कोळियाचे घरीं । पाहुणा राम ॥ ३ ॥ शिवाचें निजध्येय । वाल्मिकाचें गुह्य । तो भिल्लणीचीं फळें खाय । श्रीराम ॥ ४ ॥ न कळे ध्यानीं मनीं । तो नातुडे जो चिंतनीं । तो वानरांच्या कानीं । गोष्टी सांगे राम ॥५॥ एका जनार्दनीं एका । श्रीराम निजसखा । वानरें वनचरें फुका । तारि-येलीं ॥ ६ ॥

७५२ श्रीरामनामें तारिले पाषाण । नामाचें महि-मान कोण जाणें ॥ १ ॥ उफराटे नामें तारियेला कोळी । दोष जाहले होळी रामनामें ॥ २ ॥ तारियेली गणिका तारियेली देखा । पवित्र तो चोखा रामनामें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रामनाम जप । पवित्र तें देख रामनाम ॥ ४ ॥

७५३ रामनाम पावन । यापरतें थोर कोण ॥ १ ॥ जडशिळा ते सागरीं । नामें तरल्या निर्धारीं ॥ २ ॥ राम जप सदा । नोहे काळाची ती बाधा ॥ ३ ॥ नाम घेतां निशिदिनीं । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

७५४ चरणरज लागुनी उद्धरली आहिल्या बाळा । रामा तुझेनि प्रतापें तरली भवसागर शीळा ॥ १ ॥ जयजय रामरामा शामा भवभंजन नांवें । तुझें रूप ध्यातां उमा शिव निवे ॥ २ ॥ रामनामें कळिकाळ कापती सदा । रामनामें गणिका नेली निजपदा ॥ ३ ॥ रामनामें उद्धरले सुर नर वानर । एका जनार्दनीं सदा समाधि स्थिर ॥ ४ ॥

७५५ राम सर्वांघटीं व्यापक संचला । जैसा भाव तया तैसा भेटला ॥ १ ॥ रीस आणि वानर राक्षसहि पहाती । सर्वां एकची मुक्ति रामसंगे ॥ २ ॥ वैर अथवा सख्य वाचे वदे नाम । मुक्ति आम्हां राम स्वयें देती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वदतां निष्काम । स्वर्ग-सुख देत राजाराम ॥ ४ ॥

७५६ वैकुंठा जावया न लगे ते सायास । रामनामें पाश दृढ तुटती ॥ १ ॥ तारिलें वानर वनचरें रामें । गोपिका त्या कामें मुक्त केल्या ॥ २ ॥ गोपाळ संव-गडे नामेंचि तारिलें । जडजीव उध्दरिले कलियुगीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांगावें तें किती । रामनामें मती न लगे याची ॥ ४ ॥

७५७ राम राम म्हणतां वाचे । रामरुप होय साचें ॥ १ ॥ रामें तारिली शबरी । नित्य राम ती उच्चारी

॥२॥ रामें तारिली गणिका । केला अजामेळ सखा । ॥ ३ ॥ शिळा तारिल्या सागरीं । राम आहिल्या उध्दरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं । राम भरला जनीं वनीं ॥ ५ ॥

७५८ पक्षी जाला स्वयें जें वायु लेकरूं । त्याच्या क्रिया पारू केल्या रामें ॥ १ ॥ शबरीचीं फळें उच्छिष्ट तीं खाये । कैसा राम होय सर्वपर्णी ॥ २ ॥ एका जनार्दनीं श्रीराम सखा । भक्त अभक्तां निका सोडवण ॥ ३ ॥

७५९ जयजय राम नाम दो अक्षरीं । सहस्र नामावरी ब्रीद गाजे ॥ १ ॥ उफराटें अक्षरीं वाल्मिक वैखरी । सहस्र नामावरी उच्चारिलें ॥ २ ॥ पुंसा पढावितां नाम दो अक्षरीं । सहस्र नामावरी सिध्द झालें ॥ ३ ॥ अहं महिषासुर भेदिला जिव्हारीं । नामें दो अक्षरीं निर्दाळिला ॥ ४ ॥ सद्‌गुरु नारदें उफराटें केलें । बोधिलें लाधिलें वाल्मिकासी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं रामनाम घोष । त्रैलोकींचे दोष सरते जाले ॥ ६ ॥

७६० पूर्वीपासुनी ज्याचें देणें । वाल्मीका पेणें रामनामें ॥ १ ॥ अजामेळ पापराशी । नामेंचि त्यासी उध्दार ॥ २ ॥ गणिका व्यभिचारिणी नारी । सरती करी रामनामें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । जपा निष्काम गोमटें ॥ ४ ॥

७६१ नामेंचि क्षितीं उध्दरले । मुक्त जाहले पातकी ॥ १ ॥ अजामेळ गणिका नारी । मुक्त निर्धारी नामेंचि ॥ २ ॥ वाटपाडा वाल्मीक । नामें तरला निश्चयें देख ॥ ३ ॥ राम स्मरा दिननिशीं । ऋध्दि सिध्दि होती दासी ॥४॥ नाम तारक त्रिभुवनीं । शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

७६२ अनुभवें नाम गाताती गणिका । मोक्षपद देखा प्राप्त जालें ॥ १ ॥ उलट्या अक्षरीं वाल्हा तो तरला । उध्दार तो केला चोखियाचा ॥ २ ॥ यातीसी संबंध नाहीं नामस्मरणीं । जपोत पैं कोणी आदरें नाम ॥ ३॥ जनार्दनीं एका सांगतसे खूण । श्रीरामनाम पूर्ण सोडूं नये ॥ ४ ॥

७६३ रामनामाची धन्य ख्याती । पापी तरले पुढें तरती ॥ १ ॥ तरला कोळी अजामेळ । गणिका आणि ते सकळ ॥ २ ॥ नामें पावन स्त्रियादी याती । नामें सर्वां एकचि मुक्ति ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । नामें तिहीं लोकीं पावन ॥ ४ ॥

७६४ नामाच्या उच्चारें प्रल्हाद तारिला । अजामेळ गणिकेचा उध्दार केला ॥१॥ तें नाम सोपें श्रीरामाचें । निरंतर वाचे जप करी ॥ २ ॥ करी सर्व भावें रामनाम बोभाट । कळिकाळाचे थाट पुढें पळती ॥ ३ ॥ पळतील पातकें नाम उच्चारितां । एका जनार्दनीं म्हणतां रामनाम ॥ ४ ॥

७६५ हृदयीं सदा नाम जपे राम । तया बाधी ना क्रोध काम ॥ १ ॥ हें तो आलें अनुभवां । जीवां सर्वां कलियुगीं ॥ २ ॥ अजामेळादि पापराशी । नामें नेलें वैकुंठासी ॥ ३ ॥ गणिका तारिलीसे देखा । म्हणे जनार्दनीं एका ॥ ४ ॥

७६६ रामनामाच्या प्रतापें । जळती असंख्यात पापें ॥१॥ महा दोषांची दोष खाणी । नामें तारिली कुंटनी ॥२॥ नामें तरला अजामेळ । नष्ट गणिका अमंगळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । मंगल मंगल तें विश्राम ॥ ४ ॥

७६७ नामें ध्रुवा अढळपद । नामें गणिका मोक्षपद । नामें अजामेळ शुध्द । नामें वाल्हा उध्दरला ॥ १ ॥ धन्य धन्य नाम बळी । महा दोषां होय होळी । सोपें जपतां नामावळी । रामकृष्ण गोपाळ ॥ २ ॥ नामें भुक्ति आणि मुक्ती । नामें एकचि सर्वां गती । एका जनार्दनीं शांती । नामें होय सकळां ॥ ३ ॥

७६८ सहा शास्त्र चारी वेद । नामापासोनी प्रसिद्ध ॥ १ ॥ तें नाम गाऊं सदा । रामकृष्ण हरि गोविंदा ॥ २ ॥ कर्म धर्म पडतां न्यून । तें सांग हरिचिंतनें ॥३॥ योग याग तप तीर्थ । नामेंविण अवघें व्यर्थ ॥ ४ ॥ गणिका मोक्षपदा नेली । रामनामें उध्दरली ॥ ५ ॥ तारिले जड जीव । एका जनार्दनीं दृढ भाव ॥ ६ ॥

७६९ नारद ब्रह्मचारी । रामनामें नाचे निर्धारी ॥१॥ ब्रह्मवीणा घेऊनी खांदीं । रामनाम मुखीं समाधिस्थ ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम । श्रीरामें पाविजे निजधाम ॥ ३ ॥

७७० नारदादि वैष्णवजन । नामेंचि पावले समाधान । नामें जगासी मंडन । नाम पावन सर्वांसी ॥१॥ लाहो करा राम नाम । वावुगा सांडा भवभ्रम । अवघा कुळधर्म । नामें जाण साधतो ॥ २ ॥ नाम जपा दिननिशीं । आळस नका करूं मानसीं । एका जनार्दनीं सायासीं । नका पडूं दुजिया ॥ ३ ॥

७७१ व्यासादिक गाती ज्यासी । शुक सांगे परीक्षितीसी । श्रीकृष्ण उपदेशी उध्दवासी । नाम सार

कलींत ॥ १ ॥ तोचि वेध बैसला मना । ध्यानीं मनीं रामराणा । नाहीं दुजी उपासना । नामापरतें साधन ॥ २ ॥ वेदशास्त्र पुराणें । नामापरतें नाहीं घेणें । एका जनार्दनीं म्हणे । नाम उत्तम चांगलें ॥ ३ ॥

७७२ रामनामें तारिले । पशु पक्षी उद्धरिले ॥१॥ ऐसा रामनाम बोध । घेई कां रे तूं शुध्द ॥ २ ॥ तारिले तारिले । रामनामें उध्दरिले ॥ ३ ॥ शुकादिक योगी झाले । रामनामें ते रंगले ॥ ४ ॥ ब्रह्मज्ञानी महा मुनी । रामनाम जपती वाणी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं राम । मना करीं तूं विश्राम ॥ ६ ॥

७७३ नामेंचि पावले पैलपार । शुकादि साचार नामें जगीं ॥ १ ॥ तें नाम सोपें वाचे रामकृष्ण । उच्चारितां जाण वैकुंठ जोडे ॥ २ ॥ नामें पावले मोक्ष-पद गती । नाम हे विश्रांती सर्व जीवां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम हें तारक । वेदाचा विवेक रामनाम ॥४॥

७७४ मागें बहुतां गुणा आलें । रामनाम रसायन चांगलें ॥ १ ॥ बहुतीं सेविलें आदरें । तेणें तरले भवसागर ॥ २ ॥ शुकें उतरिलें निगुती । दिधलें असे परीक्षिती ॥ ३ ॥ सेवितां आरोग्य झाला । एका जनार्दनीं म्हणे भला ॥ ४ ॥

७७५ राम आठवितां नुरेचि पैं पाप । ऐसा दाखव मज पा कोणी एक ॥ १ ॥ नाम त्रिभुवनीं वरिष्ठ साचार । म्हणोनी निर्धार सनकादिकीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं जपतां निर्धारें। भवसिंधु तरे रामनामें ॥३॥

७७६ नामाचा नित्य जया छंद । त्याचा तुटे भव-बंध ॥ १ ॥ ऐसा माना रे विश्वास । घाला रामनामीं कास ॥ २ ॥ मागील पहा अनुभवें । नामें तारिलें दोषी वैभवें ॥ ३ ॥ स्त्रीपुत्रादिक अंत्यज । नामें पावन केलें सहज ॥ ४ ॥ यवनादि मोमीन । नामें तरले अधम जन ॥ ५ ॥ हाकारून नाम घोका । सांगे जनार्दन एका ॥ ६ ॥

७७७ रामानामीं भाव न धरिती कोणी । नाना मंत्र तंत्र घेती जनीं ॥ सकुडी कुंटणी वैकुंठासी नेली । अवचटें राम वदनीं ॥१॥ रामनाम न मानिती जनीं । सैर समाधि हरिकीर्तनीं ॥ धृ. ॥ धारितां नाम प्रल्हाद स्मरे । त्याचे चुकविले नाना घात ॥ कोरडीये काष्ठीं नर-मृग जाला । भक्तां साह्य जग-न्नाथ ॥ २ ॥ अभिलाषें नाम अजामेळ स्मरे । तो सोडिला यमकिंकरीं ॥ मागील किल्मिष निःशेष जाळिलें । ऐसी नामाची ही थोरी ॥ ३ ॥ उफराटे अक्षरीं रामु नारदमुनी । वाल्मिकासी उपदेशी ॥ नष्ट वाटपाडा पुनीत जाला । या महाकवि म्हणविती त्यासी ॥ ४ ॥ रामनाम कीर्तनीं कैसें सुख आहे । हें शिवची जाणे सावें ॥ दोंचि अक्षरीं काशी मुक्त केली । तारक ब्रह्म हें त्याचें ॥ ५ ॥ लाजेच्या संकटीं द्रौपदी नाम स्मरे । देवो वर्षला तिसी अंबरें ॥ वैरी-याचे शिरीं पाऊल आणिला । नामें भक्तकाज सरे ॥६॥ नामाचेनी बळें पाप पुढें पळे । कर्माकर्म तेथें जळे ॥ एका जनार्दनीं नाममात्रें । निजीं निजसुखाचे सोहळे ॥ ७ ॥

७७८ स्नानाचा परिकळा स्वरवर्ण अडथळा । सकळ मंत्री साचा पाहीं ॥ आसनीं शयनीं भोजनीं गमनागमनीं । राम म्हणतां दोष नाहीं ॥ १ ॥ श्री-राम जयराम श्रीराम जयराम । जपतां हें दो अक्षरीं नाम । संसारातें दळसी कळिकाळा तें कढसी । निरसेल कर्माकर्म ॥ धृ ॥ योग याग तपें तपताती बापुडीं । जन धन शिणताती वेडे ॥ निःशंख निर्लज्ज हरिनाम गातां । पायवाट वैकुंठा चढे ॥ २ ॥ गूढ गुह्य जपसी वाचे श्रीराम । ते नामें जयाचा भावो ॥ तेणें नामें भुलला वैकुंठ सांडुनी । कीर्तनीं नाचतो देवो ॥ ३ ॥ रामनामें घाचा गर्जती उठी । अमर येती त्याच्या भेटी ॥ तीर्थांचे समुदाय अंघ्रिरेणु वांछिती । श्रुति ऐका ठाती गोठी ॥ ४ ॥ सकल साधनांमाजीं वरिष्ठ हें भावें । जपा रामनाम ॥ एका जनार्दनीं संतोषला तो । पुरवील निष्काम काम ॥ ५ ॥

७७९ रामनाम वदतां वाचे । सुकृत जोडे पैं पुण्याचें ॥ १ ॥ ऐसा नामाचा महिमा । न कळेचि आगमां-निगमां ॥ २ ॥ नामें तारिलें पातकी । वंद्य जाहले तिहीं लोकीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । सुख चैतन्य निजधाम ॥ ४ ॥

७८० नाशिवंत सर्व एक नाम साचें । म्हणोनि वदा वाचे श्रीराम ॥ १ ॥ शरीर नासे संपत्ती नासे । नाम न नासे श्रीरामाचें ॥ २ ॥ आकार नासे निरा-कार नासे । नाम न नासे श्रीरामाचें ॥ ३ ॥ स्थूळ नासे सूक्ष्म नासे । नाम न नासे श्रीरामाचें ॥ ४ ॥ जें न नासे तें नाम वाचे । एका जनार्दनीं साचें जप करी ॥ ५ ॥

७८१ पापपुण्य दोन्हीं समानची गांठी । नाम जपा होटीं श्रीरामाचें ॥ १ ॥ तुटेल बंधन खुंटेल पतन ।

नाम तें पावन श्रीरामाचें ॥ २ ॥ भोग रोग नासे कल्पना दूर देशे । श्रीराम मुखीं वसे प्राणीयांसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामींच विश्वास । ठेवितां निश्चयास दोष भंगे ॥ ४ ॥

७८२ रकारासी कान्हा मकारपुढती । स्मरतां होय मुक्ति सर्व जनां ॥१॥ नारी अथवा नर हो कां दुराचारी । वाचे म्हणतां हरी सर्व मुक्त ॥ २ ॥ सायास तो नाहीं अनायासें काम । वाचे रामनाम सदां गावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धरा हेतू मनीं । श्रीराम वदनीं उच्चारावा ॥ ४ ॥

७८३ कायीक वाचीक मानसीक । सदां वसे राम एक ॥ १ ॥ तो नर अथवा नारी । हो कां पतीत दुराचारी ॥ २ ॥ सदा वसे राम ध्यानीं । आणिक कांहीं नाहीं मनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जनीं । राम पाहे मनीं ध्यानीं ॥ ४ ॥

७८४ नाम गोड श्रीरामाचें । अमृत फिकें जाहलें साचें ॥ १ ॥ हो कां उत्तम चांडाळ । अधम खळाहुनी खळ ॥ २ ॥ रामनाम वदतां वाचे । पवित्रपणें तोचि साचें ॥ ३ ॥ एका जनार्दनी नाम । मुक्ति सायुज्य निष्काम ॥ ४ ॥

७८५ संसार तो गज । राम पंचानन सहज ॥ १ ॥ शब्द ऐकतां तांतडी । गज जैसा प्राण सोडी ॥ २ ॥ धाके पळे महाभूत । राम म्हणे नित्यानित्य ॥ ३ ॥ न लगे जप माळ । राम वदे सर्व काळ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं राम । अखंड जपे हृदयधाम ॥ ५ ॥

७८६ सदोदीत गाय श्रीराम गुण । धन्य तो पावन नरदेहीं ॥ १ ॥ नरदेहीं आलीया रामनाम गावें । तरीच जन्मा यावें गुरुपुत्रा ॥ २ ॥ नरदेह उत्तम लागलासे हातीं । रामनामें विश्रांती देहीं याची ॥ ३ ॥ कन्यापुत्र माझे न करी सायास । रामनामें उदास वृत्ती करी ॥ ४ ॥ वृत्ती करी सदा समाधान । रामनामचिंतन निशिदिनीं ॥ ५ ॥ निशिदिनीं ध्यान एका जनार्दनीं । काया वाचा मनीं रामनाम ॥ ६ ॥

७८७ रामनामें तृप्त जे नर जाहले । पुनरावृत्ती न आले संसारासी ॥ १ ॥ जाणार जाणार सर्व हें जाणार । रामनाम साचार जप करीं ॥ २ ॥ अभ्राची छाया मृगजळाचें जळ । तैसा हा देह केवळ मिथ्या असे ॥ ३ ॥ मिथ्याचें सत्य मानिती गव्हार । रामनामीं विसर पडोनि ठेला ॥ ४ ॥ विसरुनी राम करिशी प्रपंच धंदा । भुललासी मतिमंदा नाशिवंता ॥ ५ ॥ नाशिवंतासाठीं रडतोसी काह्या । एका जनार्दनीं पायां शरण रिघे ॥ ६ ॥

७८८ आयुष्य जातें मागुतें येतें । रामनामें सरतें होय मुख ॥ १ ॥ देह जातें मागुतें होतें । रामनामें सरतें होय मुख ॥ २ ॥ आकार जातें मागुतें होतें । रामनामीं सरतें होय मुख ॥ ३ ॥ एका एकपण नाहीं जातें । एका जनार्दनीं सरतें होय मुख ॥ ४ ॥

७८९ रामनामें गणिका नेली वैकुंठासी । कलीमाजीं जनांसी तारक हेंची ॥ १ ॥ म्हणोनि आळस न करा वाचे । उच्चारण नामाचें करा वेगीं ॥ २ ॥ न लगे मान धन सोपें हें साधन । तुटतें पतन जन्मोजन्मीं ॥३॥ एका जनार्दनीं न करा आळस । रामनाम सौरस ध्यावें वाचे ॥ ४ ॥

७९० नको नको आळस करूं । वाचे श्रीराम उच्चारूं । तेणें सुफळ संसारूं । होय जनीं जाणिजे ॥ १ ॥ कां रे न करिसी उच्चार । किती सांगूं तुज विचार । न धरसी निर्धार । मनामाजीं पामरा ॥२॥ जासी भलतीया वाटा । पडसी दारीं आगी दरकुटा । नामावांचुनी सुटका । एका जनार्दनीं नोहेची ॥ ३ ॥

७९१ संकल्पें विकल्पें रामनाम घेतां । कोटिकुळें तत्वतां उद्धरती ॥ १ ॥ अमृत सहजीं थेंब मुखीं पडे । मृत्यूचें सांकडे चुके जेवीं ॥ २ ॥ तैशी परी होय रामनामें स्थिती । समाधि विश्रांति घर रिघे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रामनाम सार । न लगे विचार दुजा येथें ॥ ४ ॥

७९२ रामनामाचेनि बळें । ब्रह्म सर्वत्रैक मिळे ॥१॥ रामनामाची ही ख्याती । कर्माकर्माची निवृत्ती ॥ २ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद । म्हणतां प्रगट परमानंद ॥ ३ ॥ जों जों उच्चारी नाम । तों तों प्रगटे मेघःशाम ॥ ४ ॥ व्रत तप यज्ञ दान । रामनामासी साधन ॥ ५ ॥ एका जनार्दनीं कीर्ती । सहज चैतन्य विश्रांती ॥ ६ ॥

७९३ सकळ सुख रामनामीं आहे । परमामृत ध्याये रामनाम ॥ १ ॥ नामें न घडे कर्म नामें होय निष्कर्म । नाम परब्रह्म सार नाम ॥ २ ॥ नामें होय मुक्ति नामें होय भुक्ती । नामें स्वर्गप्राप्ति जपतीया ॥ ३ ॥ नामें होय बोध नामें जाय बाध । एका जनार्दनीं छंद नाम गातां ॥ ४ ॥

७९४ जागृतीं स्वप्नीं सुषुप्तीमाझारीं । जपे नाम श्रीहरी सर्वकाळ ॥ १ ॥ साधन आणीक न लगे सकळ ॥ २ ॥ रामनाम निखळ जपे आधीं ॥ २ ॥ पापाचे पर्वत छेदी नाम वज्र । हाचि पैं निर्धार ऋषीश्वर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम निजधीर । पावन साचार रामनाम ॥ ४ ॥

७९५ मुखें गावें नाम । तेणें पुरे सर्व काम ॥ १ ॥ सर्व साधनांचें सार । तेणें पावे पैलपार ॥ २ ॥ नामें बहुत तारिले । महा दोषी उद्धरिले ॥ ३ ॥ रामनाम बहु श्रेष्ठ । घेतां न लगती कष्ट ॥ ४ ॥ नाम नित्य ज्याचे मुखीं । तो जाणावा सर्व सुखी ॥५॥ रामनाम हेंचि सार । सत्य जाणा हा निर्धार ॥६॥ रामनाम निरसी ताप । पापें जाती आपेआप ॥ ७ ॥ रामनाम जो उच्चारी । सुख पावे तो संसारीं ॥ ८ ॥ एका जनार्दनीं नाम । पावविते परमधाम ॥ ९ ॥

७९६ सदा सर्वकाळ नाम मुखीं गाये । आणीक तें नये दुजा हेत ॥ १ ॥ धन्य त्याची माय पावन तें कुळ । धन्य तो निर्मळ वंश त्याचा ॥ २ ॥ जन्मजन्मांतरींचें सुकृत पदरीं । वाचे तो उच्चारी रामकृष्ण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सदा जपे नाम । तो देह उत्तम इहलोकीं ॥ ४ ॥

७९७ सकळ साधितां साधन । नामावांचून नाहीं पावन ॥ १ ॥ पहा विचारूनि ग्रंथ । नामें तरले असंख्यात ॥ २ ॥ दोषी सदोषियां उध्दार । रामनामें पैं साचार ॥ ३ ॥ कोटी कुळें तारी । एका जनार्दन निर्धारी ॥ ४ ॥

७९८ धन्य ते भाग्याचे । वासुदेव नामीं नाचे ॥१॥ सदा राम नामावळी । पाप तापां होय होळी ॥ २ ॥ सदा नामीं ज्याचें मन । जन नोहे जनार्दन ॥ ३ ॥ नामें रंगे ज्याची वाणी । एका जनार्दनीं तोचि जनीं ॥ ४ ॥

७९९ राम राम ध्वनी जयाचे मुखासी । धन्य पुण्यराशी पावन झाला ॥ १ ॥ सदोदित नाम जपे श्रीरामाचें । अनंता जन्मांचे दोष जाती ॥ २ ॥ राम राम वदे सदा सर्वकाळ । काळाचा तो काळ रामनामें ॥ ३ ॥ राम वदे ध्यानीं राम वदे मनीं । एका जनार्दनीं राम वंदे ॥ ४ ॥

८०० कोटि जन्मांची येरझारी । तें तो हरी रामनाम ॥ १ ॥ तें तूं वाचे सुगम वदें रामनाम । आणीक नको श्रम करूं वांया ॥ २ ॥ श्रम केलिया पडसी सांकडीं । जन्ममरण बेडी तोडी नाम ॥ ३ ॥ संतसमागम भावें करी भक्ती । एका जनार्दनीं वस्ती नामीं करी ॥ ४ ॥

८०१ श्रीरामनामें तुटती यातना । म्हणोनि रामराणा दृढ धरा ॥ १ ॥ यमाची यातना तुटेल निर्धारें चुकतील फेरे चौऱ्यांशींचे ॥ २ ॥ जन्ममरणाचा तुटेल तो बाध । ठसावतां बोध रामनाम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामापरतें थोर । नाहीं नाहीं निर्धार केला व्यासें ॥ ४ ॥

८०२ नाम जपे सर्वकाळ । त्यासी भयाभीत काळ । ॥ १ ॥ रामीं लीन ज्याची वृत्ती । त्याच्या दासी चारी मुक्ती ॥ २ ॥ रामनामीं जिव्हा रंगे । तोचि परब्रह्म अंगें ॥ ३ ॥ म्हणे एका जनार्दनीं । राम दिसे जनीं वनीं ॥ ४ ॥

८०३ रामनाम ज्याचे मुखीं । तो नर धन्य तिहीं लोकीं ॥ १ ॥ रामनाम वदतां वाचे । ब्रह्मसुख तेथें नाचे ॥ २ ॥ रामनामें वाजे टाळी । महादोषा होय होळी ॥ ३ ॥ रामनाम सदा गर्जे । कळीकाळ भय पाविजे ॥ ४ ॥ ऐसा रामनामीं भाव । तया संसाराचि वाव ॥ ५ ॥ आवडीनें नाम गाय । एका जनार्दनीं वंदी पाय ॥ ६ ॥

८०४ जो देवाचें पद सोडी । सदा गोडी अंतरीं ॥ १ ॥ पापें पळती रामनामें । खंडताती कर्माकर्में ॥ २ ॥ नामें कळिकाळासी धाक । यमदूतां न मिळे भीक ॥ ३ ॥ ऐसा नामाचा महिमा । नाहीं आणिक उपमा ॥ ४ ॥ आवडी जो नाम गाय । एका जनार्दनीं वंदी पाय ॥ ५ ॥

८०५ रामनाम मुखीं गाय । यम त्याचे वंदी पाय ॥ १ ॥ ऐसा नामाचा महिमा । सरी न पावेचि ब्रह्मा ॥ २ ॥ उत्तमाउत्तम नाम । सर्व सुखासी विश्राम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । भवसिंधु तारक धाम ॥ ४ ॥

८०६ या रे नाचूं प्रेमानंदें । रामनामाचेनि छंदें ॥ १ ॥ म्हणा जयराम श्रीराम । भवसिंधु तारक नाम ॥ २ ॥ ऐसी नामाची आवडी । काळ गेला देशोधडी ॥ ३ ॥ आवडीनें नाम घोका । म्हणे जनार्दन एका ॥ ४ ॥

८०७ उघड दृष्टि करुन पाहूं । रामकृष्णनामें ध्याऊं । अहोरात्र मुखीं गाऊं । राम हरी वासुदेव ॥ १ ॥ हेंचि अध्यात्मज्ञानाचें वर्म । येणें घडती कर्माकर्म । ब्रह्मविद्येचा आराम । येणें पावे सर्वथा ॥ २ ॥ सदा

वाचे नामावळी । महा दोषां होय होळी । कळिकाळ पायांतळीं ब्रह्मानंदें गर्जतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । भवसिंधु तारक धाम । साधकांचा श्रम । येणें दूर सर्वथा ॥ ४ ॥

८०८ नाहीं सायासाचें काम । वाचे वदा रामनाम ॥ १ ॥ बहु कर्मा सोडवण । वाचेसि न घडे मौन ॥ २ ॥ राम चिंता ध्यानीं मनीं । कळिकाळ वाहे पाणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं राम । वाचे उच्चारा निष्काम ॥ ४ ॥

८०९ जया हेत नामीं ध्यास । नेणें आणिक सायास । कोण लेखी संसारास । नामापुढें तृणवत ॥ १ ॥ आम्हा नामाचें भूषण । नामें सुखासी मंडण । नामें होतसें खंडण । नानापरी पापाचें ॥ २ ॥ जपतां नाम मंत्रावळी । काळ कांपतसे चळीं । एका जनार्दनीं नव्हाळी । रामनामें अतर्क्य ॥ ३ ॥

८१० कलीमाजीं सोपें घेतां रामनाम । नाहीं कांहीं श्रम जपतप ॥ १ ॥ न लगे साधन पंचाग्नी धूम्रपान । नामेंचि पावन युगायुगीं ॥ २ ॥ योगयाग यज्ञ न लगे वेरझारा । नाममंत्र पुरा जप आधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निश्चयो नामाचा । तेथें कळिकाळाचा रीघ नाहीं ॥ ४ ॥

८११ कलयुगीं नाम सोपें तें सुजाण । ऐशी भाषा जाण बहुतांची ॥ १ ॥ वाल्मिक सांगतु रामनाम जपा । तरले तरती सोपा राममंत्र ॥ २ ॥ पुराणकर्ता तो व्यास मुगुटमणी । म्हणे रामकृष्ण वदनीं सोपा मंत्र ॥ ३ ॥ बहुतांच्या मतें एका जनार्दनीं । रामनाम वाणी गाय सदा ॥ ४ ॥

८१२ नाम मुखीं सदा वाचे । कांपती कळीकाळ साचे ॥ १ ॥ दो अक्षरीं रामनाम । जपतां पावसी मोक्षधाम ॥ २ ॥ नामावांचूनि परिपाठीं । साधन नाहीं नाहीं नेहटीं ॥ ३ ॥ नाममंत्र श्रेष्ठ सार । जड जिवांसी उद्धार ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम । सुखधामाचा विश्राम ॥ ५ ॥

८१३ रामनामें नित्य जयासी आनंद । तया ठायीं भेदाभेद नुमटती ॥ १ ॥ ऐसे जे रंगले रामनामीं नर । चुकवी यमप्रहार जन्मोजन्मीं ॥ २ ॥ धरावी वासना रामनाम जप । दुजा तो संकल्प आन नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामापरता मंत्र । दुजें नाहीं शास्त्र कलियुगीं ॥ ४ ॥

८१४ सकळ तपांचें तें तप । सोपा राममंत्र जप ॥ १ ॥ नाहीं साधनाचें कोडें । राम म्हणा वाडेंकोडें ॥ २ ॥ न लगे जप तप अनुष्ठान । रामनामें सर्व साधन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणतां राम । नासे संसार भवभ्रम ॥ ४ ॥

८१५ राम कृष्ण हरी । नित्य वदे जो वैखरी ॥ १ ॥ तयापाशीं नुरे पाप । नासे त्रिविध हा ताप ॥ २ ॥ नाम तेंचि परब्रह्म । जप यज्ञ तो परम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जपा । रामकृष्ण मंत्र सोपा ॥ ४ ॥

८१६ वदतां वदनीं अहर्निशीं राम । उपदेश सुगम सोपा मंत्र ॥ १ ॥ दों अक्षरीं राम तेणें जोडे धाम । आणिक तो श्रम वांयां जाये ॥ २ ॥ सर्वांभूतीं समदृष्टीतें पहाणें । मग नाहीं येणें आन दुजें ॥ ३ ॥ दुजें येणें नाहीं एका जनार्दनीं । श्रीरामावांचुनी आन नेणें ॥ ४ ॥

८१७ रामनाम वसे ज्याचे मुखीं नित्य । त्याचेनि पतीत उध्दरण ॥ १ ॥ रामनाम मंत्र जपे नित्यकाळ । त्यासी कळिकाळ हात जोडी ॥ २ ॥ रामनामीं ज्याची जडली चित्तवृत्ती । वृत्तीची निवृत्ती झाली त्यासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जपे रामनाम । तेणें पूर्ण काम स्वयें झाला ॥ ४ ॥

८१८ उत्तम साधन रामनाम जाण । यापरतें निधान आणिक नाहीं ॥ १ ॥ नलगे समाधि रामानाम घेतां । उघडा जप तत्त्वतां सोपा राम ॥ २ ॥ न लगे विरक्ती नाम मंत्र तंत्र । रामनाम पवित्र जप सोपा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें रामनाम ध्यान । पवित्र पावन रामनाम ॥ ४ ॥

८१९ कर्म आणि धर्म अष्टांग साधन । नको यज्ञदान नाम जपें ॥ १ ॥ तुटेल बंधन खुंटेल पतन । नाममुखीं गर्जन सोपा मंत्र ॥ २ ॥ कलियुगामाजीं सोपें हें साधन । रामनाम खूण मुक्त वाट ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खुंटली उपाधी । सहज समाधी रामनामें ॥ ४ ॥

८२० कृतांताचे माथां देऊनियां पाय । वाचे नाम गाय अहर्निशीं ॥ १ ॥ उघडा रे मंत्र उघडा रे मंत्र । शिव जपे स्तोत्र रामनाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं न करी आळस । चौऱ्यांशींचा लेश नको भोगूं ॥ ३ ॥

८२१ सकाम निष्काम वदे नामावळी । सर्व दोषां होळी नाम मंत्रें ॥ १ ॥ सोपाचि मंत्र नाहीं अवघड । तें जपा उघड रामनाम ॥ २ ॥ यातीहिन असो भलते नारीनर । वाचे जो उच्चारी रामनाम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपणें शरण । वाचे नारायण जप करा ॥ ४ ॥

८२२ सकळ साधनांचें फळ। रामनामचि केवळ ॥१॥ जप तप अनुष्ठान । अंतीं नामचि प्रमाण ॥ २ ॥ नाना मंत्र यंत्रावळी । सोडवीना अंतकाळीं ॥ ३ ॥ महा पातकी पतित। नामें तरले असंख्यात ॥ ४ ॥ नाम साराचें हें सार । एका जनार्दनीं निर्धार ॥ ५ ॥

८२३ नाम तारक सांगडी । तेणें उतरूं पैलथडी ॥ १ ॥ रामनाम जप सोपा । तेणें नेणों पुण्यपापा ॥ २ ॥ सर्व साधनांचें सार । भवसिंधुसी उतार ॥ ३ ॥ ऐसा नामाचा प्रताप । एका जनार्दनीं नित्य जप ॥ ४ ॥

८२४ आवडीनें नाम वदा कीं रे राम। नासे भवभ्रम क्षणमात्रें ॥ १ ॥ सोपें हें साधन कलयुगामाझारीं । नामें पैठा हरी घरीं होय ॥ २ ॥ नाम मुखीं गातां कीर्तनीं नाचतां । तुटे भवव्यथा अनेक जन्म ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साराचें पैं सार । तुटे येरझार नाना योगीं ॥ ४ ॥

८२५ सोपें वर्म अति सुगम । मुखें स्मरा रामनाम ॥ १ ॥ ऐसा गजर नामाचा । कर्माकर्म लेश कैंचा ॥ २ ॥ नामें पाप निर्दाळिलें । वेद शास्त्र हेंचि बोले ॥ ३ ॥ पुराणाचें हें संमत । नाम मुख्य मतितार्थ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम । तेणें निरसे कर्माकर्म ॥ ५ ॥

८२६ नामें तारिले तारिले । महा पातकी उध्दरिले ॥१॥ ते हें सोपें रामनाम । जपतां निवारे क्रोध काम ॥ २ ॥ नामें पावन जाले क्षितीं । ऐसें पुराणें गर्जती ॥ ३ ॥ नाम साराचें हें सार । एका जनार्दनीं निर्धार ॥ ४ ॥

८२७ अभक्त पातकी अपार । नामें पैल पार पावले ॥ १ ॥ ऐसें सोपें रामनाम । आणिकांसी तो विश्राम ॥ २ ॥ नामें पावन होय त्रिजगतीं । वाचे जे वदतीं राम नाम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । हरे श्रम बहुतांचा ॥ ४ ॥

८२८ तारावया जड मूढ । आहे उघड उपाव ॥ १ ॥ सोपें रामनाम घेतां । नाहीं तत्वतां साधन ॥ २ ॥ आणिकांसी साधन कष्ट । होतीं फलकट शेवटीं ॥ ३ ॥ तैसें नोहे नाम हें निकें । गोडी फिकें अमृत ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सार । नामोच्चार सुलभ ॥ ५ ॥

८२९ नाम उत्तम चांगलें । मुक्त केलें पापियां ॥१॥ गातां मुखीं ज्याची कीर्ती । योगयाग घडती कोटी देखा ॥ २ ॥ घडती सकळ तीर्थ प्रदक्षिणा । वाचे रामराणा स्मरतांची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें । सुलभ हरावया पापें ॥ ४ ॥

८३० नाम पावन श्रीरामाचें । घेतां वाचे शुभची ॥ १ ॥ नाहीं तेथें गोवागुंती । नामेंची चढती वैकुंठीं ॥ २ ॥ भ्रमलियासी उध्दार। नाम सोपें जपतां सार ॥ ३ ॥ दोंचि अक्षरांचें काम । वाचे म्हणा रामनाम ॥४॥ नाम आवडीनें घोका । म्हणे जनार्दनीं एका ॥५॥

८३१ सोपी नामावळी । वाचे वदावी सकळीं ॥ १ ॥ उंच नीच वर्ण याती । रामनामें सर्वां मुक्ती ॥ २ ॥ हा तो पुराणीं अनुभव । तारियेले जीव सर्व ॥ ३ ॥ येतों काकुळती । रामनाम धरा चित्तीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं राम । वदती दोषी निष्काम ॥ ५ ॥

८३२ मागा बहुतांचें मत । नामें तरले पतीत । हीच सोपी जगीं नीत । रामनाम अक्षरें ॥ १ ॥ येणें तरले पुढें तरती । ऐशी नामाची थोर ख्याती । नाम धरा दृढ चित्तीं । एकाभावें आदरें ॥ २ ॥ नाम श्रेष्ठांचें साधन । नामें तुटे भवबंधन । शरण एका जनार्दन । रामनाम वदतसे ॥ ३ ॥

८३३ सुखासी विश्रांति सुख समाधान । मनाचें उन्मन नाम गाता ॥ १ ॥ तें हें नाम सोपें रामकृष्ण हरी । प्रपंच बोहरी उच्चारितां ॥ २ ॥ अहं भाव द्वेष नुरे ती वासना । द्वैताची भावना दुरी ठाके ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम हें सोपारें । येणेंचि पैं सरे भवसिंधु ॥ ४ ॥

८३४ श्रीरामनामें जगाचा उध्दार । करितां उच्चार दों अक्षरीं ॥ १ ॥ पाहतां साधन आन नसे दुजें । रामनामें नासे महत्पाप ॥ २ ॥ ब्रह्महत्यारी वाल्हा नामेंचि तरला । रामायणीं मिरविला बडिवार ॥ ३ । एका जनार्दनीं नामापरतें थोर । नसे बडिवार दुजियाचा ॥ ४ ॥

८३५ त्रिकाळ साधन न लगे अनुष्ठान । आसन वसन त्याग नको ॥ १ ॥ सोपें सोपें जपा आधीं रामनाम। वैकुंठीचें धाम जपतां लाभे ॥२॥ एका जनार्दनीं नामाचा प्रताप । तरेल ते लेप चौऱ्यांशीची ॥ ३ ॥

८३६ उत्तम अधम येथें नाहीं काम । जपें तूं श्रीराम सर्वकाळ ॥१॥ मंत्रतंत्र कांहीं योगाची धारणा। न लगे नामस्मरणा वांचूनियां ॥ २ ॥ योग याग तप वाउगा बोभाट। अष्टांग नेटपाट न लगे कांहीं ॥ ३ ॥

एका जनार्दनीं गावें मुखीं नाम । तेणें घारे काम क्रोध सर्व ॥ ४ ॥

८३७ दानधर्म कोणा न घडे सर्वथा । रामनाम घेतां सर्व जोडे ॥ १ ॥ कर्म धर्म कांहीं न होती सांग । रामनामें पांग फिटे त्याचा ॥ २ ॥ वेदशास्त्रां-व्युत्पत्ती पढतां श्रम पोटीं । रामनामें कोटी जप घडे ॥३॥ आचार विचार न कळे साचार । एका जनार्दनीं निर्धार राम जपा ॥ ४ ॥

८३८ ऐका नामाचें महिमान । नामें पातकी पावन तरले ते अधम जन । कलयुगामाझारीं ॥ १ ॥ धन्य धन्य राम पावन । सर्व साधनांचें साधन । मोक्ष नामाचि पूर्ण । स्मरतांचि जोडे ॥ २ ॥ न लगे आन विधि मुद्रा । न लगे तपांचा डोंगरा । कासया हिंडताती सैरा । नाम जपा सादर ॥ ३ ॥ भोळ्या भाविकां हें वर्म । दृढ जपावें हा नाम । एका जनार्दनीं धाम । पावे वैकुंठीचें ॥ ४ ॥

८३९ सुख वहु असे आम्हां । तुझा गातां नाममहिमा । तेणें अंगीं होतसे प्रेमा । नामीं दृढता सदोदित ॥१॥ तें नाम सोपें जयराम । भवसिंधुतारक निष्काम । मुखें गातां उत्तमोत्तम । सुलभ आणि सोपारें ॥ २ ॥ नाम नौका जगालागीं । नामें पावन होत कलियुगीं । एका जनार्दनीं मुराला अंगीं । पावन होय नाम घेता ॥ ३ ॥

८४० जग रामनाम म्हणे । तया कां न येती विमानें ॥ १ ॥ नवल स्मरणाची ठेव । नामीं नाहीं अनुभव ॥ २ ॥ नष्ट गणिका राम म्हणे । तिसीं वैकुंठीचें पेणें ॥३॥ एका जनार्दनीं ध्यात । राम पाहे ध्यानाआंत ॥४॥

८४१ श्रीराम श्रीराम सदा ज्याचे वाचा । त्या प्राणि-यासी साचा दंडवत ॥ १ ॥ घेईन पायवणी वंदीन मस्तकीं । देईन हस्तकीं क्षेम त्यासी ॥२॥ तयाचा भार वाहे अंकीतपणें । नोहेचि उत्तीर्ण जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं श्रीराम वाचे । वदतां पातक नासे कोटी जन्मांचें ॥ ४ ॥

८४२ गाणें वाणें मूर्तीकडे । राम अध ऊर्ध्व मागें पुढें ॥ १ ॥ मुखीं उच्चारितां नाम । जिव्हेमाजी वसे राम ॥ २ ॥ श्रुति मृदंग टाळ घोळ । ते नाद राम सकळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नित्य गात । श्रोता वक्ता जनार्दन तेथें ॥ ४ ॥

८४३ देहीं असोनियां विदेही प्रकार । रामनाम उच्चार ज्याचे मुखीं ॥ १ ॥ तोचि तरेल ऐसा नाहीं बोल । दरुशनें तारील मूढ जनां ॥२॥ देहीं तो विदेही समाधिस्थ सर्वदा । रामनाम मुखीं सदा जया असे ॥३॥ एका जनार्दनीं निश्चयो हा जाण । रामनामें पावन प्राणी होती ॥ ४ ॥

८४४ शुचि अथवा अशुचि । परी श्रीरामनाम ज्याचे मुखीं ॥ १ ॥ तोचि त्रैलोक्या पावन । तिन्ही देवांसि समान ॥२॥ त्याचें होतां दरुशन । घडे त्रिवेणीचें स्नान ॥३॥ एका जनार्दनीं देहीं । सदासर्वदा तो विदेही ॥४॥

८४५ अवचट मुखीं म्हणतां राम । सर्व दुरितें होती भस्म ॥ १ ॥ नामापुढें पाप राहे । ऐसा कोण वदताहे ॥ २ ॥ घडतां पातकांच्या राशी । तोही नेला वैकुंठासी ॥ ३ ॥ भाविकांसी वर्म सोपें । राम-मुखें जपावें ॥ ४ ॥ जनीं वनीं निरंजनीं । शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

८४६ आंबे केळीं द्राक्ष वहु । रामनामापुढें अवघें कडु ॥ १ ॥ नाम गोड नाम गोड । हरी म्हणतां पुरे कोड ॥२॥ गूळ साखर कायसी निकीं । अमृताची चवी जाली फिकी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पडली मिठी । चवी घेतली ती कधींच तुटी ॥ ४ ॥

८४७ देठींचें फळ देठीं पिके । न तोडितां जो चवी चाखे ॥ १ ॥ गोड साखरसें साखरसें । राम-नाम रसें चवी आलें ॥ २ ॥ न तोडी न फोडी सगळेंचा सेवी । ब्रह्मादिकां तो वाकुलया दावी ॥३॥ एका जनार्दनीं घेतली गोडी । जीव गेला तरी चवी न सोडी ॥ ४ ॥

८४८ जीवामाजीं घालुनी जीव । परिसा अर्थ तो गौरव ॥ १ ॥ तैं सिध्दि पावे कार्य सर्व । भव विभव निवारे ॥ २ ॥ व्यापक तो सर्वदेशीं । भरुनी उरला सर्वसाक्षी ॥ ३ ॥ राम व्यापकु सर्वदेशीं । ऐशी कल्पना जयासी ॥४॥ जळीं स्थळीं राम भरला । एका जनार्दनीं देखिला ॥ ५ ॥

८४९ लोह परिसासी झगटे । मग काळिमा कैंची भेटे ॥ १ ॥ तैसें विनटो रामनामा । पहिलेंपण कैचें आम्हां ॥ २ ॥ गंगा मीनली सागरीं । ती परतेना ब्रह्मगिरी ॥ ३ ॥ नीच रतली रायासी । तिसी कोण म्हणेल दासी ॥ ४ ॥ हरिभक्तांचें संगता । अभ-क्तांही उपजे भक्ती ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भेटी । चौ-देहांची सुटे गांठी ॥ ६ ॥

८५० रामनामावांचुनी । श्रेष्ठ नाहीं दुजें कोण्ही ॥१॥ हाचि अनुभव मना । घेई घेई सत्य जाणा ॥२॥ नको वाउगी खटपट । एका जनार्दनीं सोपी वाट ॥ ३ ॥

८५१ वाऊगाची सोस करितोसी तूं मना । चिंतीं तूं चरणां विठोबाच्या ॥ १ ॥ अविनाश सुख देईल सर्वदा । वाचे वदा सदा रामनाम ॥ २ ॥ तारिले पातकी पावन कलियुगीं । नामनौका जगीं तारावया ॥३॥ भवसिंधु पार रामनाम सार । न करीं विचार दुजा कांहीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं घ्यावा अनुभव । प्रत्यक्ष पाहा देव विटेवरी ॥ ५ ॥

८५२ श्रीराम श्रीराम वाचे म्हणतां । तेणें सायुज्यता हातां लागे ॥१॥ श्रीराम श्रीराम ध्यान जयासी । तोचि तपराशी पावन झाला ॥ २ ॥ श्रीराम श्रीराम वदे ज्याची वाणी । धन्य धन्य जनीं पावन तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं श्रीराम ध्यात । निरंतर चित्त रामनामीं ॥ ४ ॥

८५३ श्रीराम ऐसें वदतांचि साचें । पातक नासतें अनंत जन्माचें ॥ १ ॥ श्रीराम ऐसें जो उच्चारी । तयाच्या पापाची होतसे बोहरी ॥ २ ॥ श्रीराम ऐसें उच्चारी नाम । एका जनार्दनीं नासती क्रोध काम ॥ ३ ॥

८५४ गुंतला भ्रमर कमळणी कोशीं । आदरें आमोदासी सेवितसे ॥ १ ॥ तैसें रामनामीं लागतां ध्यान । मन उन्मन होय जाण रामनामीं ॥ २ ॥ रामनाम वळें कर्माकर्मीं चळे । जीवासी सोहळे रामनामें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं राम परिपूर्ण । प्रपंच परमार्थ रामचि जाण ॥ ४ ॥

८५५ रामनामें नामरूपा निरास । कृष्णकर्म स्मरतां कर्माचा ग्रास ॥ १ ॥ नामें जिव्हां गर्जता अहर्निशीं । भवभय तें बापुडें परदेशी ॥ २ ॥ रामनाम जपतां जीवीं । जीव पावे ब्रह्मपदवी ॥ ३ ॥ जीव म्हणतां तोचि परब्रह्म । नामें निरसलें कर्माकर्म ॥ ४ ॥ रामनामाचीं जीं जीं अक्षरें । तीं तंव क्षराक्षरातीत सारें ॥ ५ ॥ एका जनार्दनीं चमत्कार । नाम तें चैतन्य निर्धार ॥ ६ ॥

८५६ महापुरीं जैसें वहातें उदक । मध्य ती तारक नौका जैशी ॥ १ ॥ तैसें प्राणियासी नाम हें तारक । भवसिंधु धाक नुरे नामें ॥ २ ॥ तये नांवेसंगें ब्राह्मण तरती । केवीं ते बुडती अनामिक ॥ ३ ॥ नाना काष्ठ जात पडे हुताशनीं । जाती ते होऊनी एकरूप ॥ ४ ॥ तेथें निवडेना धुरें रुई कीं चंदन । तैसा भेदवर्ण नाहीं नामीं ॥ ५ ॥ पूर्वी न वोळखे तेंचि पैं मरण । एका जनार्दनीं स्मरण रामनाम ॥ ६ ॥

८५७ रामनामें जो धरी भाव । तया सुलभ उपाव । नामस्मरणीं जीव । सदोदित जयाचा ॥ १ ॥ तेणें साधिले साधन । अभ्यासिला हो पवन । अष्टांग योग साधून । लय लक्ष दिधलें ॥ २ ॥ योगयाग कसवटी । अभ्यासिल्या चौसष्टी । हृदयीं चिदानंद राहाटी । रामनामें ॥ ३ ॥ ध्यान धारणा मंत्रतंत्र । अवघा श्रीराम पवित्र । एका जनार्दनीं सतत । जपे वक्त्रीं ॥ ४ ॥

८५८ आयुष्याच्या अंतीं । राम म्हणतां वक्त्रीं । ते नर सेविती मुक्ती । संदेह नाहीं ॥१॥ हात पाय सिध्द आहे । तंव तूं तीर्थां जाये । तीर्थाचें मूळ पाहे । राम जप ॥ २ ॥ नको जप माळा कांहीं । उगाच बैसे एके ठायीं । हृदयीं दृढ ध्याई । रामनाम ॥ ३ ॥ ऐसा घेई पा उपदेश । नको करूं वाउगा सोस । तेणें होय नाना क्लेश । जन्म यातना ॥४॥ हेंचि तुज सोपें वर्म । येणें तुटे कर्माकर्म । एका जनार्दनीं श्रम । सर्व नासे ॥ ५ ॥

८५९ नासे प्रायश्चित्तांच्या कोटी । पळताती बारा वाटी ॥ १ ॥ ऐसें नाम समर्थ जपा । तेणें सोपा सुपंथ ॥ २ ॥ रामनामें पतित पावन । रामनामें उध्दरती जन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाचे । घोका साचें रामनाम ॥ ४ ॥

८६० आदरें आवडी गाती जे नाम । तया न बाधी क्रोध काम ॥ १ ॥ नाम आठवा नाम आठवा । हृदयीं सांठवा रामनाम ॥ २ ॥ संतसमुदाय वंदावे आवडीं । अंतरींची गोडी नित्य नवी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रेमाचा पुतळा । विठ्ठल देखिला डोळां धन्य झालों ॥ ४ ॥

८६१ निष्ठा ते भजन वाचे नारायण । तया सत्य पणें वैकुंठींचे ॥ १ ॥ ऐसें वेदशास्त्रें पुराणें सांगती । नामें जोडे मुक्ति नारीनरां ॥ २ ॥ भलतिया भावें मुखीं नाम गावें । तयासि राणिवे वैकुंठींचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न घेतां संशय । मुखीं सदा गाय रामकृष्ण ॥ ४ ॥

८६२ सकाम निष्काम । वाचे गातां रामनाम ॥ १ ॥ नाम उच्चारितां होटीं । जन्म जरा तुटे आटी ॥ २ ॥

नामाचें महिमान । महा दोषी जाहले पावन ॥ ३ ॥ ब्रह्महत्या बाळहत्यारी । नामें तरलें निर्धारीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम । उत्तमा उत्तम निजधाम ॥ ५ ॥

८६३ सकळ पापांपासोनि मुक्त । वाचे उच्चारीत राम हरी ॥१॥ ऐसा महिमा वेद सांगे । नका आड । मार्गे जाऊं कोण्ही ॥ २ ॥ भावें करितां भगवद्भक्ती मोक्षप्राप्ति तात्काल ॥ ३ ॥ स्वानंदें भगवद्भजन । एका वंदी त्याचे चरण ॥ ४ ॥

८६४ जन्मोजन्मीं केला लाग । म्हणोनि भाग पावलों ॥ १ ॥ तेणें घडे संतसेवा । हेचि देवा परम मान्य ॥ २ ॥ आलिया जन्माचें सार्थक । गातां राम-नाम देख ॥ ३ ॥ नामावांचुनी सुटिका । ब्रह्मादिकां नोहे देखा ॥ ४ ॥ नाम जपे शूलपाणी । एका जनार्दनीं ध्यानीं ॥ ५ ॥

८६५ राम हें माझे जीवींचें जीवन । पाहतां मन हें जालें उन्मन ॥ १ ॥ साधन कांहीं नेणें मी अबला । शाम हें वीजु बैसलेंसे डोळां ॥ २ ॥ लोपल्या चंद्र-सूर्याच्या कळा । तो राम माझा जीवीचा जिव्हाळा ॥ ३ ॥ प्रकाश हा दाटला दाही दिशा । पुढें वो मार्ग न दिसे आकाशा ॥ ४ ॥ खुंटली गति श्वासा वो उश्वासा । तो राम माझा भेटेल वो कैसा ॥ ५ ॥ यासी हो साच परिसा हो कारण । शरण एका जनार्दन नेणें तेंचि साधन ॥ ६ ॥

८६६ जनार्दनें मज सांगितला मंत्र । रामनाम पवित्र जप करी ॥ १ ॥ सोडवील राम संसार सांकडीं । न पडेचि बेडी अरिवर्गा ॥ २ ॥ जप तप साधन पुराण श्रवण । नाम घेतां जाण सर्व घडती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं टाकुनी संशयो । नाम मुखीं राहो प्रेमें पोटीं ॥ ४ ॥

८६७ नाम सुलभ इहलोकीं । तरले तरले महा पातकी । म्हणोनि वाचे जो घोकी । नित्य नेमें आदरें ॥ १ ॥ तयाचें तुटतें बंधन । होय जन्माचें खंडन । वाचे गातां जनार्दन । सोपें जाण साधन हें ॥ २ ॥ नमन करुनी समाधान । आठवी रामनामाचें ध्यान । शरण एका जनार्दन । समाधान संतोष ॥ ३ ॥

८६८ ॐकार हा वर्ण नामाचें पैं मूळ । परब्रह्म केवळ रामनाम ॥ १ ॥ रामकृष्ण हरी गोविंदा गोपाळा । आठवा वेळोंवेळां अहो जन ॥ २ ॥ एका जनार्दनीं वदतां वैखरी । देखे चराचरीं परब्रह्म ॥ ३ ॥

८६९ वाणी वदे रामनाम । तेणें साधे सर्व काम ॥ १ ॥ मनें रामाचें चिंतन । नामीं चित्त समाधान ॥ २ ॥ बुध्दीलागीं हाचि छंद । नित्य वदावा गोविंद ॥ ३ ॥ गोविंदावांचुनी । दुजा ध्यास नाहीं मनीं ॥४॥ एका जनार्दनीं मन । नित्य करी ब्रह्मध्यान ॥ ५ ॥

८७० उत्तम स्त्री देखोनि दृष्टी । मूर्ख कैसा लाळ घोटी ॥ १ ॥ तैसा विनटे रामनामा । तेणें चुकरी कर्माकर्मा ॥ २ ॥ मूषक देखोनि मार्जार । तैसे उभे यम किंकर ॥ ३ ॥ मीन तळमळी जैसा । विपर्यीक प्राणी तैसा ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं । दुजा छंद नाहीं मनीं ॥ ५ ॥

८७१ वाचे सदा रामनाम । तया न बाधी क्रोध काम ॥ १ ॥ हेंचि एक सत्य सार । वायां नको वेर-झार ॥ २ ॥ संसार वायां न म्हणे सार । करी पर-मार्थ विचार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रामनाम । वाचे वदे तूं निष्काम ॥ ४ ॥

८७२ साधन तें साधा वाचे । नाम म्हणा गोविं-दाचें ॥ १ ॥ तेणें तुटेल बंधन । वाचे गातां राम-कृष्ण ॥ २ ॥ नामासरसीं वाजे टाळी । महा पापा होय होळी ॥ ३ ॥ हा तो पुराणीं निश्चय । नाम निशिदिनीं गाय ॥ ४ ॥ आवडीनें नाम गाय । एका जनार्दनीं वंदी पाय ॥ ५ ॥

८७३ वाग्वद घेतलिया पाठीं । तेणें तुटी होय गाठी ॥ १ ॥ पथ्य साचार साचार । नामीं धरा निर्धार ॥ २ ॥ वोखदासी कारण पथ्य । भवरोगीयां रामनामें मुक्त ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करा । श्रीराम राम उच्चारा ॥ ४ ॥

८७४ अभिमान नका धरूं पोटीं । होय अर्थासवें तुटी ॥ १ ॥ म्हणोनि स्मरा रामराम । तेणें पावाल निजधाम ॥ २ ॥ विहित करा आपुलें कांहीं । आठवा वाचे राम देहीं ॥ ३ ॥ काकुलती येतां जनां । शरण एका जनार्दना ॥ ४ ॥

८७५ अहोरात्र वाचे वदा । राम गोविंद नामची ॥ १ ॥ तेणें तुटे भेदाभेद । निरसे संसाराचा कंद ॥२॥ ध्यानीं मनीं आणि शयनीं । वाचे वदा चक्रपाणी ॥३॥ ध्येय ध्याता ध्यान । आठवावा मधुसूदन ॥ ४ ॥ एका जनार्दनीं घोका । आवडीनें रामसखा ॥ ५ ॥

८७६ इतुकी करावी हे जोडी । रामनामीं धरा गोडी ॥ १ ॥ आणिक नलगे साधन । एकलें मन

जिका पूर्ण ॥ २ ॥ एका जनार्दनीं मन । देवापायीं बांधून ॥ ३ ॥

८७७ उठतां बैसतां खेळतां बोलतां । चालतां निजतां राम म्हणा ॥ १ ॥ आसनीं शयनीं भोजनीं परिपूर्ण । वाचे राम नारायण जप करीं ॥ २ ॥ कार्या-कारणा समाधी उन्मनीं । राम ध्यानीं मनीं जपे सदा ॥ ३ ॥ एकांती लोकांती देहत्यागाअंती । रामनाम वस्ती जिव्हेवरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं वाचे वदे राम । अखंड निष्काम होसी बापा ॥ ५ ॥

८७८ नका कर्म धर्म वार्ता । सुखें करा हरिकथा । भवजन्मव्यथा । येणें तुटे तुमची ॥१॥ सोपें साधनांचें सार । वाचे नरहरी उच्चार । भयें चुके येरझार । चौऱ्यांशींची ॥ २ ॥ नका वेदशास्त्र पाठ । नामें धरा नीट वाट । पंढरी हे पेठ । भूवैकुंठ महीवरी ॥ ३ ॥ म्हणोनि करा करा लाहो । वाचे रामनाम गावो । एका जनार्दनीं भावो । दृढ ठेवा विठ्ठलीं ॥ ४ ॥

८७९ उत्तम मध्यम कनिष्ठ याचें नाहीं काम । जपावें तें नाम आधीं आधीं ॥ १ ॥ वर्णाश्रम धर्म याचें नाहीं काम । जपावें तें नाम आधीं आधीं ॥ २ ॥ रज तम सत्त्व याचें नाहीं काम । जपावें तें नाम आधीं आधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हें परतें सारा । जपा रघुवीरा एका भावें ॥ ४ ॥

८८० कळिकाळावरी नाम । चाले जैसे मनोधर्म । वदतां पुरुषोत्तम । पुण्य जोड असंख्य ॥ १ ॥ वाचे सदा श्रीराम । तेणें पुरे सर्व काम । मोक्षमार्ग सुगम । नाम उच्चारणें जोडे ॥ २ ॥ आधीं पाहिजे विश्वास । म्हणा आम्हीं विष्णुदास । पापाचा तो लेश । कदा नुरे कल्पांतां ॥ ३ ॥ धरा वैष्णव सांगात । आणिक नका दुजा हेत । एका जनार्दनीं चित्त । रामनामीं असों द्या ॥ ४ ॥

८८१ तुमचें तुम्हां सांगतों साचें । मनें वाचे राम-नाम ॥ १ ॥ तेणें उतराल पैलथडी । चुकेल बेडी चौऱ्यांशींची ॥ २ ॥ प्रपंचाचें भोवर जाळें । यांत सगळे अटकाल ॥ ३ ॥ काया वाचा आणि मनें । एका जनार्दनीं आठवावा ॥ ४ ॥

८८२ नामें प्रायश्चितां शिक । हावि देख परमार्थ ॥ १ ॥ श्रेष्ठ नाम पावन जगीं । तरती अंगीं अधम जन ॥ २ ॥ नेणती यांसी सोपें वर्म । जाणती कर्म सर्वही ॥ ३ ॥ कळाकुसरी कांहीं नका । वाचे घोका रामनाम ॥ ४ ॥ एका एकपणें मीनला । एका जनार्दनीं भेटला ॥ ५ ॥

८८३ विश्रांतीचें आसन घालूनिया जपा । मंत्र तोचि सोपा रामनाम ॥ १ ॥ सर्व याती वर्णा आहे अधिकार । रामनाम उच्चार सोपा बहु ॥ २ ॥ कल्पना अविद्या टाकुनी उपाधी । रामनामें समाधी उघड दिसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम पवित्र परिकर । साधनाचें सार हेंचि एक ॥ ४ ॥

८८४ लावूनी आसन बैससी समाधी । तों तों उपाधी सहज लागे ॥ १ ॥ साममुखीं गातां जोडे सायूज्यता । उपाधी तत्त्वतां दूरी पळे ॥ २ ॥ घडती कोटी यज्ञया-गांचें तें फळ । मुखीं रामनाम सबळ असो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जया ऐसा नेम । तोचि पुरुषोत्तम जगामाजीं ॥ ४ ॥

८८५ देवासी तुष्टण्या एक युक्ति आहे । रामनाम गाय मुखीं सदा ॥ १ ॥ काया वाचा मनें संतांसी शरण । तेणें नारायण तुष्ट होय ॥ २ ॥ नामापरतें साधन आणीक नाहीं दुजें । एका जनार्दनीं निज नाम सार ॥ ३ ॥

८८६ कळिकाळासी दरारा । रामनाम स्मरण करा ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति लागती पायां । करितां दया वैष्णवांनीं ॥ २ ॥ सुगम सोपें हेंचि वर्म । नको श्रम मज दुजा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम सार । नाहीं बडिवार दुसरा ॥ ४ ॥

८८७ देवासी तों प्रिय एक नाम आहे । म्हणोनि तूं गाये सदोदित ॥ १ ॥ कला हें कौशल्य अवघें विकळ । मंगळां मंगळ रामनाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम मुखीं गातां । मुक्ति सायुज्यता पाठीं लागे ॥ ३ ॥

८८८ जगामाजीं कीर्ति एक श्रीराम । वाउगा तूं श्रम न करीं जना ॥ १ ॥ सदा सर्वकाळ आठवी वेळोवेळां । मग सुखसोहळा काय उणें ॥ २ ॥ येणें यातायाती चुकती संसार । भवभ्रम निर्धार दुरी ठाके ॥ ३ ॥ सांपडलें वर्म आम्हां इह जनीं । एका जनार्दनीं नाम गाऊं ॥ ४ ॥

८८९ जयां नामाचा विश्वास । धन्य तेचि हरीचे दास । वंदीन पायांस । वारंवार तयांच्या ॥ १ ॥ कुळ तारिलें सकळ । वाचे नामावळी अढळ । गाती राम-नाम सरळ । नोहे क्षण आराणूक ॥ २ ॥ ते भाग्याचे नारीनर । ज्यांचा ऐसा निर्धार । एका जनार्दनीं साचार । दृढ भाव रामनामीं ॥ ३ ॥

८९० भवरोगियांसी औषध हें नाम । सेवावें परम आवडीनें ॥ १ ॥ सर्वकाळ करा नामाचें चिंतन । सदा समाधान होय तेणें ॥ २ ॥ एका जनार्दनीं रामनामीं वृत्ती । वृत्तीची निवृत्ती सहज होय ॥ ३ ॥

८९१ जपजाप्य मंत्र नको यंत्र तंत्र । वर्णिजे जगत्र रामनाम ॥१॥ पाउला पाउलीं घडतसे यज्ञ । तेणें सर्व पुण्य हातीं जोडे ॥२॥ संताची संगतीं नामाचा निजध्यास तेणें । जोडे सौरस हातीं मग ॥ ३॥ होई सावधान म्हणे जनार्दन । एकनाथ पूर्ण होईल धन्य ॥४॥

८९२ सांगेन तें धरा पोटीं । वांया चावटीं बोलूं नये ॥१॥ एक नाम वदतां वाचे । कोटी जन्मांचें सार्थक ॥२॥ चुके जेणें वेरझार । करीं उच्चार रामनाम ॥३॥ एका जनार्दनीं साधन सोपें । सांगतों जपें श्रीराम ॥ ४ ॥

८९३ सकामासी स्वर्गप्राप्ती । ऐशी बोले वेदश्रुती ॥१॥ हाचि घेई अनुभव । सकाम निष्काम भजें देव ॥२॥ भजतां निष्काम पैं देवा । स्वर्ग मोक्ष कोण केवा ॥३॥ एका जनार्दनीं निष्काम । वाचे वदे रामनाम ॥ ४ ॥

८९४ मुळींच पापाचा नाहीं लेश । ऐसा घोष नामाचा ॥ १ ॥ ब्रह्महत्या मात्रागमन । दारूण कठीण पाप हें ॥२॥ तेंही नासे नामें कोटी । उच्चारी होटीं रामनाम ॥३॥ नामें नासे पाप । एका जनार्दनीं अनुताप ॥४॥

८९५ वोखद घेतलिया पाठीं । जेवीं होय रोग तुटी ॥१॥ तैसें घेतां रामनाम । नुरे तेथें क्रोध काम ॥२॥ घडतां अमृतपान । होय जन्माचें खंडन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जैसा भाव । तैसा भेटे तया देव ॥ ४ ॥

८९६ वाचे म्हणा रामनाम । तेणें निवारे क्रोध काम । संसाराचा श्रम । नुरे कांहीं तिळमात्र ॥१॥ न लगे वेदविधि आचार । सोपा मंत्राचा उच्चार । अबद्ध अथवा शुचि साचार । राम म्हणा सादर ॥२॥ एका जनार्दनीं धरूनी भाव । वाचे वदा रामराव । भवसिंधूचें भेव नुरे तुम्हां कल्पांतीं ॥ ३ ॥

८९७ अवघे रामराम वदा । नाहीं कळिकाळाची बाधा ॥१॥ अवघें वदतां नाम । नाममात्रें निष्काम ॥२॥ अवघे रंगुनी रंगले । अवघें नामें उद्धरिले ॥३॥ अवघियां भरंवसा । एका जनार्दनीं ऐसा ठसा ॥ ४ ॥

८९८ न करी आळस रामनाम घेतां । वाचे उच्चारितां काय वेंचे ॥१॥ न लगे द्रव्य धन वेचणेंचि कांहीं । रामनाम गाई सदा मुखीं ॥२॥ सोहळे आचार न लगे विचार । पवित्र परिकर नाम मुखीं ॥३॥ शुद्ध याति कुळ अथवा चांडाळ । स्त्री अथवा बाळ हो कां नीच ॥४॥ एका जनार्दनीं नाहीं यातीचें कारण । वाचे उच्चारण तोचि शुचि ॥ ५ ॥

८९९ कळिकाळ बापुडें नामापुढें दडे । ऐसे थोर पोवाडे श्रीरामाचे ॥१॥ ऐसे वर्म सोपें सांडोनी शिणती । वांया हीन होती हांव भरी ॥२॥ असोनियां देहीं फिरती ते वांया । वाउगाचि तया शीण होय ॥३॥ एका जनार्दनीं आत्माराम देहीं । असोनी न कळे कांहीं शिणती वांया ॥ ४ ॥

९०० जन्म कर्म अवघें व्यर्थ । ज्ञाते विवेकी घेती अर्थ ॥ १ ॥ हरी हाचि धर्म मुख्य । रामकृष्ण उच्चारी मुखें ॥ २ ॥ दीन जाऊं नेदी वाउगा जाण । काळाचें जनन रामकृष्ण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जन्म कर्म धर्म । ब्रह्मार्पण वर्म हेंचि खरें ॥ ४ ॥

९०१ आनंदें करूनी संसारीं असावें । नाम आठवावें श्रीरामाचें ॥ १ ॥ नामाचियां योगें संसार तो चांग । येरव्हीं तें अंग व्यर्थ जाय ॥ २ ॥ ऋषी मुनी सिद्ध संत महानुभाव । रामनामें भव सुखें केला ॥ ३ ॥ नामें होय सुख नामें निरसे दुःख । रामनाम एक हृदयीं धरा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नामाचा आठव । सुखदुःख भाव दुराविला ॥ ५ ॥

९०२ पुरुष अथवा नारी आलिया संसारीं । वाचे हरी हरी भलत्या भावें ॥ १ ॥ सुफळ संसार एका रामनामें । वाउग्या त्या भ्रमें पतन घडे ॥ २ ॥ जन्ममरणाचा तोडोनियां फांसा । वेगीं हृषिकेशा भजा आधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं किती हें सांगावें । गुंतलेती हावे वाउगें तें ॥ ४ ॥

९०३ भवरोगासी वोखद । रामनाम हेंचि शुद्ध ॥ १ ॥ येणे तुटे रोग व्यथा । भुक्ति मुक्ति वंदिती माथा ॥ २ ॥ न लगे आणिकाचें काम । वाचे वदें रामनाम ॥ ३ ॥ पथ्य एक शुद्ध क्रिया । एका जनार्दनीं लागे पायां ॥ ४ ॥

९०४ योग याग तप न लगे साधन । वाचे रामकृष्ण जपे आधीं ॥ १ ॥ कायिक वाचिक मानसिक भाव । तेणें सर्व ठाव एकरुप ॥ २ ॥ संसार सांकडें भ्रमिष्टासी पडे । उच्चारितां नाम तया न पडे सांकडें ॥३॥ एका जनार्दनीं नेम हाचि राम । सोपें तें वर्म गूढ नको ॥ ४ ॥

९०५ रामकृष्ण ऐसें नाम । सुलभ सोपें तें सप्रेम । उच्चारितां नित्य नेम । तया पेणें वैकुंठ ॥ १ ॥ नका करूं आळस कोणी । लहान थोर धरा मनीं । तुटेल आयणी । जन्म आणि मृत्यूची ॥ २ ॥ आहे मज भरंवसा । एका जनार्दनीं ठसा । आळस नका करूं सहसा । लहान थोर सकळ ॥ ३ ॥

९०६ सोपा मंत्र वाचे हरी हरी म्हणा । तुटेल बंधना यमाचिया ॥ १ ॥ न करी आळस हाचि उपदेश । येणें सावकाश तरती जगीं ॥ २ ॥ कलीमाजीं सोपें रामनाम ध्यान । यापरतें साधन आन नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न करीं आळस । रामनाम घोष मुखें करीं ॥ ४ ॥

९०७ नामधारक हो कां भलता । त्याचे चरणीं ठेवीन माथा ॥ १ ॥ न म्हणे उत्तम अधम । मुखीं जपतां रामनाम ॥ २ ॥ यातीकुळाचें कारण । नाहीं नाहीं नामाविण ॥ ३ ॥ नाम जपे तोचि श्रेष्ठ । एका जनार्दनीं वरिष्ठ ॥ ४ ॥

९०८ राम म्हणोनी दीन येती काकुलती । त्यांच्या यातनेचे दोष सांगावे किती ॥ १ ॥ काय सांचलें नाठवे पाप । नामें निष्पाप महादोषी ॥ २ ॥ चित्रगुप्त जव पाहे वही । कोरडें पान रेघही नाहीं ॥ ३ ॥ खोडीना मोडी समूळ उडे । एका जनार्दनीं नामें पाप झडे ॥ ४ ॥

९०९ अवघे जन्म उत्तम । वाचे स्मरा रामनाम ॥ १ ॥ अवघे वदती नाम साचें । धन्य धन्य ते दैवाचे ॥ २ ॥ संतसंग सदा । अवघा तया हाचि धंदा ॥ ३ ॥ अवघे वर्ण उत्तम । भेदाभेद नाहीं काम ॥ ४ ॥ अवघा एका जनार्दन । भेदाभेदाचें नाहीं कारण ॥ ५ ॥

९१० तुज सगुण जरी ध्याऊं तरी तूं परिमित होसी । तुज निर्गुण जरी ध्याऊं तरी तूं लक्षा न येसी । साचाच वेद पुरुषा न कळे श्रुती अभ्यासेंसी । तो तूं नभाचा जो साक्षी शब्दें केवीं आतुडसी ॥ १ ॥ राम राम रामा सच्चिदानंद रामा । भवसिंधु तारक जय तूं मेघश्यामा । अनंत कोटी ब्रह्मांडधीशा अनुपम्य महिमा । अहं सोहं ग्रासूनी हें तो मागतसे तुम्हां ॥ २ ॥ अष्टांगयोगें शरीर दंडूनि वायूसी झूंज घेवों । बहुसाल अंतराय तयाचा येतसे भेवां । कर्मचि जरी आचरूं रूढ धरूनियां भावो । विधिनिषेध माथा अंगीं वाजतसे घावो ॥ ३ ॥ तीर्थयात्रेसी जाऊं तरी तें तीर्थ दुरी राहे । पर्वकाळ विचारितां नित्य काळ वांया जाये । हातीं जपमाळा घेउनी अगणित गणूं पाहे । तेथें पापिणी निद्रा घाला घालूनियां जाये ॥ ४ ॥ गृह शिखासूत्र त्यजुनी संन्यास करूं । न नासे संकल्प तयाचा धाक थोरू । तेथें मन निश्चळ न राहे यासी काय बा करूं । वेषचि पालटे न पालटे अहंकारू ॥ ५ ॥ जनीं जनार्दन प्रत्यक्ष डोळा कां न दिसे त्यासी । ममताहंकृतीनें योगी बुडविले साधन आश्रमासी । एका जनार्दनीं सिद्ध साधन कां न करसी । सांडी मांडी न लगे मग तूं रामचि होसी ॥ ६ ॥

## श्रीराम चरित्र.

९११ दशरथ संतानहीन जाला । पुत्रजन्ययाग केला ॥ १ ॥ सांगे वसिष्ठ आचार्य । धर्मशास्त्र ऐके राय ॥ २ ॥ पुसों जावें जी डोहळीयां । जें जें प्रिया मागती ॥ ३ ॥ ऐका कौसल्या संभ्रम । उदरीं संभवला राम ॥ ४ ॥ पुसों जातां डोहळे । आन अन्य तें वर्तलें ॥ ५ ॥ जनार्दन उदरा आला । एकाएकीं डोळिया घाला ॥ ६ ॥

९१२ एकपणेंविण प्रसवला । विदेही जन्मला श्रीराम ॥ १ ॥ पूर्वीं पितामहाचा पिता । तया प्रसन्न सुभानु होतां ॥ २ ॥ यालागीं सूर्यवंशीं तंव पिता । जन्म जाला श्रीराम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं श्रीराम । सर्व हरतील श्रम ॥ ४ ॥

९१३ रीघ नाहीं कोणा पाहूं आले जना । फिटलें पारणा लोचनाचें ॥ १ ॥ नाचत नारद गाताती गंधर्व । तुंबर हावभाव दाविताती ॥ २ ॥ स्तुति करी शेष न वर्णवे वेदांसी । स्तवन विरिंची करीतसे ॥ ३ ॥ करिताती नारी अभ्यंग रामासी । पायांवरी त्यासी न्हाणिताती ॥ ४ ॥ नीति नाहीं गुण विश्वाचा जनिता । तयाचिया माथा पाणी घाली ॥ ५ ॥ घाली तेल माथां माखीत ते टाळू । दीनाचा दयाळू कुर्वाळिती ॥ ६ ॥ तीर्थें वास करिती जयाचिये चरणीं । पायांवरी न्हाणी त्यासी माता ॥ ७ ॥ लाउनी पालव रामासी पुसिलें । वेगीं फुंकियेले कान दोन्ही ॥ ८ ॥ दोघां दोहींकडे सिद्धि बुद्धि जाणा । घातिलें पाळणां रामराजा ॥ ९ ॥ त्यांनीं धणीवरी गाईला पाळणा । एका जनार्दना पहुडविलें ॥ १० ॥

९१४ पोटीं भय आतां तुजला कशाचें । ध्येय हें शिवाचें अवतरलें ॥ १ ॥ तरले अपार पापी मूढ जन ।

ऐकतां चिंतन देव तोषे ॥ २ ॥ तोषोनियां गुरु म्हणे लागे पायां । कौसल्या ही जाया नोहे तुझी ॥ ३ ॥ तुझी भक्ति वाड केली आली फळा । तो सुखसोहळा पाहें आतां ॥ ४ ॥ आतां करूं स्तुति श्रीराम रक्षितां । तारी निजभक्तां सत्ताबळें ॥ ५ ॥ बळें गेला लग्ना सागराचे पोटीं । तेथें तो कपटी घात करी ॥ ६ ॥ करी विघ्न तारूं बुडविलें सागरीं । एका जनार्दनीं निर्धारी देव राखे ॥ ७ ॥

९१५ पहा ऋषी आले मागावया दान । शांति करूं यज्ञ ऋषींचिया ॥ १ ॥ ऋषीलागीं पूजा सिध्दि नेऊं पैजा । राक्षसांच्या फौजा मारूं बळें ॥ २ ॥ मारूं बळें आतां त्राटिका सुबाहु । द्विजालागीं देऊं सुख मोठें ॥ ३ ॥ भेटे पुढें कार्य ऋषिभार्या वनीं । लाउनी चरण उध्दरावी ॥ ४ ॥ उध्दरावें तृण पशु आणि पक्षी । जया जे अपेक्षी देऊं तया ॥ ५ ॥ तया ऋषीसंगें जनकाचा याग । एका जनार्दनीं मग धनुष्य भंगी ॥ ६ ॥

९१६ तेथें रावणाचा गर्व परिहार । पर्णिली सुंदर सीतादेवी ॥ १ ॥ देवीं दुंदुभी वाजविल्या अपार । तेव्हां कळों सरे भार्गवासी ॥ २ ॥ भार्गव पातला आला गर्वराशी । कोणें धनुष्यासी सोडियेलें ॥ ३ ॥ भंगियला गर्व तोषला भार्गव । एका जनार्दनीं अपूर्व आशीर्वाद ॥ ४ ॥

९१७ श्रीरामासी राज्याभिषेचन । इंद्रादिकां चिंता गहन । समस्त देव मिळोन । चतुराननं विनविला ॥ १ ॥ देव म्हणती ब्रह्मयासी । तुझें आश्वासन आम्हांसी । श्रीराम अवतार सूर्यवंशीं । तो रावणासी वधील ॥ २ ॥ सपुत्र बंधु प्रधान । राम करील राक्षसकंदन । तेणें देवांसी बंधमोचन । एका जनार्दनीं होईल ॥ ३ ॥

९१८ लंकाबंदीं पडले देव । सुटका चिंतिताती सर्व ॥ १ ॥ रामा रामा रामा दशकंठनिकंदन रामा । भवबंधविमोचना तारीं । कृपा करी हो मेघश्यामा ॥ धृ. ॥ वेगीं बांधोनी सत्याचा सेतू । करीं अधर्मा रावणाचा घातू ॥ २ ॥ थोर पसरित वासना भुजा । तृजवांचूनी छेदितां नाहीं दुजा ॥ ३ ॥ अहं गर्वित रावणू । छेदीं सोडुनी कृपेचा बाणू ॥ ४ ॥ त्रिगुण लंका हे जाळुनी । सीता प्रकृती सोडवी निजपत्नी ॥ ५ ॥ अखंड लावूनी अनुसंधान । तोडी देहबुध्दि बंधन ॥ ६ ॥ अनन्य शरण जनार्दन एका । त्यासी राज्य करूनी दिधलें देखा ॥ ७ ॥

९१९ सत्य करी आपुलें वचन । आमुचें करी बंधमोचन । आमुचें विपत्तीचें विधान । सावधान अवधारी ॥ १ ॥ इंद्र बारी चंद्र करेहेरी । यम पाणी वाहे घरोघरीं । वायू झाडी सदा वोसरी । विधि तेथें करी दळाकांडा ॥ २ ॥ अश्विनी देव दोन्ही । परिमळ देतीं स्त्रियें लागुनी । विलंब अर्धक्षणीं । दासी बांधोनि धुमसिती ॥ ३ ॥ मारको केली तराळी । सटवी बाळातें पाखाळी । रात्रीं जागे काळी कराळी । मेसको बळी शोभतिया ॥ ४ ॥ मैराळ देव कानडा । करी राक्षसांच्या दाढा । आरसा न दाखवी ज्या पुढा । तो रोकडा बुकाली ॥ ५ ॥ विघ्न राहूं न शके ज्यापुढें । तो गणेश वापुडें । गाढवांचे कळप गाढे । एका जनार्दनीं वळीत ॥ ६ ॥

९२० अग्नीस आपदा बहुवस । रावणाचे असोस । नानापरीचे स्पर्शदोष । धुई अहर्निशीं धुपधुपीत ॥ १ ॥ उदक सेवा वरुणा हातीं । विंजणें सेवा नित्य वसती । निरोप सांगावया बृहस्पति । प्रजापती शांतिपाठा ॥ २ ॥ ऐसे आम्ही देव समस्त । रावणाचे नित्यांकित । लंके आलिया रघुनाथ । एका जनार्दनीं बंधमुक्त करील ॥ ३ ॥

९२१ रघुनंदन पायीं गेला । रथ त्वां कां रे आणिला ॥ १ ॥ सूर्यवंशीं नारायणा । माझा राघव जातो वनां ॥ २ ॥ सूर्यवंशीं दिनकरा । तपूं नको तूं भास्करा ॥ ३ ॥ अहो धरणी मायबहिणी । सांभाळा हो कोदंडपाणी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भाव । पदोपदीं राघवराव ॥ ५ ॥

९२२ कपींद्रा सुखी आहे कीं षड्गुण तरु हा राम ॥ धृ. ॥ कनक कुरंग पाठीं श्रमले । प्रभु सर्वज्ञ काम ॥ १ ॥ मज विरहित त्या निद्रा कैंची । अखिल लोकाभिराम ॥ २ ॥ सौमित्रा दुर्वाक्यें छळिलें । त्याचा हा परिणाम ॥ ३ ॥ त्र्यंबक भंगी एका जनार्दन । करिती विबुध प्रणाम ॥ ४ ॥

९२३ कधीं भेटेल रघुपती । मजला सांगा वा मारुती ॥ धृ. ॥ मी अपराधी शब्द शरानें । दुःखित उन्मीळापती । कीं मजला सांगा बा० ॥ १ ॥ साधु छळले माझे मज कळलें । वनीं राक्षस संगती । कीं मजला० ॥ २ ॥ एका जनार्दन आश्रय तुझा । सज्जन जन जाणती । कीं मजला० ॥ ३ ॥

९२४ कपटें रावण हो गेला ॥ रामु तंव कळला त्याचा कपट भावो । सकळ वृत्ति रामाचि देखे फिटला देह संदेहो । सबाह्य अभ्यंतरीं रामु नांदे सीतेसी नाहीं तेथें ठावो रया ॥ १ ॥ राम राम राम अवघाची राम

फिटला रावणाचा भ्रम । भोग्यभोग भोक्ता रामुचि जाला कैंचा । उठी तेथ कामु रया ॥ धृ. ॥ जनीं रामु वनीं रामु नरनारी देखे रामु । तो हा रामु कीं कामु निःसिम नेमु । सरला भावनेचा भ्रमु । कामाचेनि काजें कपटें रामु । होता फिटला तयाचा जन्मु श्रमु रया ॥ २ ॥ ऐसा सकळरुपें रामु स्वरूपें आला काय कीजे त्यासी पूजा । रामाचा वाणीसी रे छेदूनि चरणीं वाहातसे वोजा । रामाचा विश्वासु बाणला त्या रावणासी रे निघती अधिक पैजा ॥ ३ ॥ हृदयीं रामु तोंचि अमृत कुपिका । म्हणोनि शिरें निघती तया देखा । शिरांची लाखोली रामासी वाहिली । अधिकाधि येतसे हरिखा । अवघाचि राम गिळियेला रावणें । देह कुरवंडी केला तया सुखा रया ॥ ४ ॥ शरणागता दिधलें तें तंव उणें । म्हणोनि अधिक घेतलें रावणें रामाचें यश तें रावणा । विजयगुढी विचारूनि पहा पां मनें । अरि मित्रा समता समान एकपदीं एकाएकीं केलें जनार्दनीं रया ॥ ५ ॥

९२५ साधन कांहीं नेणें मी अबला । श्याम हें रूप बैसलेंसे डोळां । लोपली चंद्रसूर्याची कळा । तो राम माझा जीवींचा जिव्हाळा ॥ १ ॥ राम हें माझें जीवींचें जीवन । पाहतां मन हें जालें उन्मन ॥ धृ. ॥ प्रकाश दाटला दाही दिशा । पुढेंहि मार्ग न दिसे आकाशा । खुंटली गति श्वासोच्छ्वासा । तो राम माझा भेटेल हो कैसा ॥ २ ॥ यासी साच हो परिसा कारण । एका जनार्दनीं शरण । कृपा होय परिपूर्ण । तरीच साधे हें साधन ॥ ३ ॥

## सीता–मंदोदरी संवाद.

९२६ ऐका संतसज्जन । निजहित कुशल पूर्ण । करुनी सर्वांगाचे कान । शब्दार्थ जाणावा ॥ १ ॥ जीवामाजीं घालुनी जीव । परिसतां हे अर्थगौरव । तें सिद्धी पावे कार्य सर्व । भव विभव निवारे ॥ २ ॥ असो आतां जानकीसी । मंदोदरी अति प्रीतीसी । पुसती झाली वेगेंसी । रामानुभव तो कैसा ॥ ३ ॥ सांगे एका जनार्दन । चित्त करा समाधान । अनुभवाचें लक्षण । सावधान ऐकावें ॥ ४ ॥

## मंदोदरी प्रश्न.

९२७ श्रीराम व्यापकु कीं एकदेशी । हें सांगावें मजपाशीं । सकळ देहीं श्रीरामासी । स्थिती कैसी वस्तीची ॥ १ ॥ जरी म्हणसी परिच्छिन्न । तरी व्यापकत्वा पडिलें खाण । आत्माराम हें अभिधान । न घडे जाण तयासी ॥ २ ॥ जरी त्यातें व्यापक म्हणसी । तरी तो सर्व भूतनिवासी । तेथें उपेक्षितां रावणासी । अद्वैत भजनासी अभाव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं । भेद भाष्यवचन । राम परमात्मा जाण । सर्वगत निर्धारें ॥ ४ ॥

९२८ ब्रह्म धरूनी मुंगीवरी । रामव्यापक चराचरीं । तो रावणाचे शरीरीं । इंद्रियव्यापारीं नांदत ॥ १ ॥ रामानुसंधान रावणीं । भजतां होय कोण हानी । हें सांगावें साजणी । प्रीति करुनी मजलागीं ॥२॥ हांसोनिया सीता सुंदरी । उत्तर देती अति कुसरीं । तें परिसोनि मंदोदरी । विश्रांति थोर पावेल ॥ ३ ॥ शरण एका जनार्दन । दृश्यादृश्य वचन । परिसोनि समाधान । देहस्थिति निरसे ॥ ४ ॥

## सीता उत्तर.

९२९ सावध ऐकें साजणी । प्रवेशतां रामानुसंधानीं । चित्त चित्तपणा विसरुनी । राम होउनी स्वयें राहे ॥ १ ॥ द्रष्टा परिछिन्न होये । तें दृश्य दृश्यत्वें दिसों लाहे । श्रीराम स्वयें तैसा नोहे । परी तें माय सांगेन ॥ २ ॥ श्रीराम होउनी व्याप्य एक । असतां राम होआवें व्यापक । त्रिपुटीचा अभावो देख । व्याप्य व्यापक तेथें कैंचें ॥ ३ ॥ म्हणती सर्वांच्या अंतरीं । राम असे चराचरीं । तो रावणाचे शरीरीं । एका जनार्दनीं नांदत ॥ ४ ॥

९३० राम सर्वांच्या हृदयीं आहे । धरितां त्या हृदयस्थाची सोये । तेथें रामरावणू कोठें आहे । सांग माये यथार्थ ॥ १ ॥ भोगितां हृदयस्थासी । अवकाश कैंचा भोक्तियासी तेथें रावण कैंचा आणिसी । जें तयासी भोगावें ॥ २ ॥ दृश्याचिये भेटी । दृश्यपणें उठी । होता तेणेंसी तुटी । तोही शेवटीं असेना ॥३॥ आतां नाहींपण असे । असे तोचि दिसे । एका जनार्दनीं पिसें । रावणाचें कायसें ॥ ४ ॥

## सीतावचनमात्रें मंदोदरी पूर्णावस्था.

९३१ ऐकोनी सीतेच्या उत्तरीं । पूर्णावस्था मंदोदरी । चढली स्वेदकंप शरीरीं । आनंदलहरी दाटली ॥ १ ॥ इंद्रिय विकळता जाली । चित्त चैतन्या मिठी पडली । अंतरीं सुखोर्मी दाटली । तेणें पडली मूर्छित

॥ २ ॥ बाप सद्गुरूचें सामर्थ्य । अलोलिक अति अद्भुत । वचनमात्रें शक्तिपात । जाला निश्चित मंदोदरी ॥ ३ ॥ नाहीं हस्त मस्तक । कृपा कवळोजी देख । वचनमात्रें दिधलें सुख । एका जनार्दनीं सेरेना ॥ ४ ॥

## राम–रावण युद्ध.

९३२ तेहतीस कोटी देव बांदवडी लंका बंदीखान । गडलंका बंदीखान बंदिमोचन रामचिंतन देव करिती ध्यान । अंत गती सीता सती चोरुनी नेली जाण । अठरा पद्में वानर भार वीर चालिला दारुण राम चालिले आपण ॥ १ ॥ राम चढत रथ क्षिती डोलत त्रैलोक्य कंपायमान । रथु वडघडी शेषु फडफडी कूर्म लपवी मान । वराह बुडी दाढा तडतडी रगुडा घाली पलाण । मेरु कुळाचळ कांपती चळचळ राक्षसा निर्वाण ॥ धृ. ॥ हनुमान वळी फाळी आरोळी अवघ धोळी उपटितु । ब्रह्मा ब्रह्मापाशी बांधोनि त्यासी आणी लंकेसी अनर्थु । रावणू यासी हाणें खर्गेसी घाय हनुमंतु हाणतु । घागे पाचटु कैसा पेंदु जैसा रामेसी कैसा भीडसी तूं ॥ २ ॥ पुंसा लावूनि आंगी हनुमान रागी दावो दावो सवेगी तेणें केला । बिभिषणु ते वेळीं रावणाजवळीं बुद्धि सोज्वळीं भेदला । त्यासी हाणोनि लाथा दवडी सर्वथा शरण रघुनाथा तो आला । न जीणता रावण लंकादान पूर्व संकल्प रामें घातला॥३॥ रामाची ख्याति वाणूं किती शिळा तरती सागर । स्वयें बुडती आणिका बुडविती तरोनि तारीती वानर। लंका पारां सुवेळा गीरी रामु भारी दुर्धर । दाहा छत्रें लंकेवरी रावण पाहे नर वानर । येकु बाण सोडी कादुनी वोढी दहा छत्रें पाडी रघुवीर ॥ ४ ॥ शिष्टाई करितां अंगदू धरितां मंडपु अवचिता आणिला । मंडपु शिरीं देखोनी दुरी राम भारी कोपला । लंका बिभीषणां दिधली जाणा तेथील अर्थु कां आणिला । स्वामीबळें उडतां बैसलां माथां मजही न कळतां पैं आला । तेणेंची उड्डाणें आनंदें तेणें सभेसी मंडप सांडिला ॥ ५ ॥ हुडहुडां तत्काळीं वानर महाबळी वीरा खंदवी करिती । दांडे गुंडे पर्वत खांडे वळी अतुर्बळी हाणती । खंडु त्रीशूळ कोंती मुद्गल हातीं भाले कपाळां रोविती । पुच्छी धरूनी वानरां भवंडिती गरगरां घेरे निशाचरां उपटिती ॥ ६ ॥ सेली सांवळधर कोतेकर आढा उंच व्हाणका तोमर । आळगाईत बाणाईत त्रिशूळ चक्र धनुर्धर । अश्व गजपती नरपती नावाणगे वीर थोर थोर । नरांतक सुरांतक रणकर्कश दुर्धर । काळांतक यमांतक विकटमुखें भयासूर ॥७॥ नळ नीळांगद जांबुवंत सुग्रीव महावीर । तार तरळ गव गवाक्ष गंधमर्दन दुर्धर । हनुमान महावीर अजरामर सुखें नुदधो मुख दुस्तर । वृक्ष पर्वत हातां न मिळे उत्पती चालिले करिती भुभूःकार ॥८॥ वीरां वानरां रणीं झोट धरणी भागे कोण्ही न सरती । निशाण दणदण खडगें खणखण बाण सणसणां सुटती । उरीं शिरीं माथां घायें देतां टणके कैसे उठती । वृक्षें रथ मोडिती गज तोडिती थोर पाडिती पैं क्षिती । लंकेपुढां अशुध्द भडभडा रणनदी वाहती ॥ ९ ॥ रावणसेना मोडिली आपण कोपू दशानना पैं आला । ढाल टमक भेरी रण भोंगे बाधा निशाणा घातला । निशाचर वीर आला अपार भार दुर्धर चालिला । दाहा छत्रें शिरीं रावणावरी रामु सन्मुख लोटला । वानर भारी लपरिवारी रामु कैसा देखिला ॥ १० ॥ श्यामसुंदर अति मनोहर मूर्ति चिन्मात्र चिद्वृती । आभाळ भाळा टिळक पिवळा राखिला अति निगुती । कुंडलें साकार निराकार श्रवणें विकार लोपती । देखोनी वदन कोटी मदन लज्जा आंगा ते होती । चंद्र क्षीण वापुडा उपमे थोडा पूर्ण इंदु रघुपती ॥११॥ ऐसा मुख्य मयंक निष्कलंक आर्त चकोर सेविती । आबाहु भावो अजानुबाहो धनुष्य सिरें त्या हातीं । द्वैत दळण करी पूर्ण बाणु शोभा सद्गती । विजुकासे विसरली अस्तगती । चरणीं तोडरु गजें घोर विवरी कांपती॥१२॥ रामू रावण वरुपे बाण पवन पूर्ण खिळिला। बाणाचा वळसा फिरतो केला लोह धुळारी उठिला । शर निवारा सुटला वारा रावणू अंबरा उडविला । वाहाटुळी पान भ्रमें जाण तेवीं दशानन भ्रमला । न लगतां घावो रावण पाहा शुध्द क्रोधु सांडिला । कुंभकर्ण वळी तिये वेळीं देउनी आरोळी उठिला ॥१३॥ माहा मोह धूर्ण कुंभकर्ण अर्धक्षणें निवटिला । निकुंवळाशिरी आटकभारी हानू आम्ही चालिला । इंद्राजित निकटे कोटी कपट करी सपाटे येकला । बाळ ब्रह्मचारी निराहारी तेणें इंद्राजीत मारिला । तें देखोनि रावण कोपला पूर्ण राम गर्जोनि हांकिला ॥१४॥ रामनाम जल्प फेडी पाप करी निष्पाप नामें एकें । रामा-

वेगळें जाण न विधे आन अनुसंधानें नेटकें। तंव गर्जी राम ध्वजीं राम रामरूप आसके । रामू नर रामू वानर रामू निशाचर निर्मिखे । पाहे लंकेकडे राम चहूंकडे मागें पुढें रामू देखे । धनुष्य वाण रामपूर्ण आपण्या राम वोळखे ॥१५॥ ऐसें युध्द देखे परम सुख रावण हरिखें कोंदला । छेदुनी दशमुख केला विश्वमुख राम- सम्यक् तुष्टला । नेश्वरासाठीं स्वरुपीं भेटीं रामु कृपाळु होय भला । राजपद नेलें स्वपद दिधलें आत्माराम प्रगटला । एका जनार्दनीं आनंदु त्रिभुवनीं देह विदेह रामु जाहला ॥ १६ ॥

९३३ राम रावण रणांगणीं । युध्दा मीनले नीज निर्वाणीं। येरयेरातें लक्षुनी । स्वयें विंधों पाहे ॥१॥ तंव गज ध्वजीं राम । रामचि धनुष्यवाण । रामरूप आपण। आपणा देखें ॥२॥ रावणा पाडलें ठक । रामरूप कटक। पारिकें आणीक । तया न दिसे कांहीं ॥३॥ रामरूप नर। रामरूप वानर । वैरी निशाचर । रामरूप ॥ ४ ॥ रावण पाहे लंकेकडे । रामरुप लंकेचे हुडे । सबाह्य चहूंकडे । राम दिसे ॥ ५ ॥ ऐसें निर्वाण युध्द । विसरला द्वंद्वभेद । एका जनार्दनीं आनंद । प्रग- टला ॥ ६ ॥

## भिल्लिणीची रामरूपावस्था.

९३४ भिल्लणी बाळा वनीं वेंचितां फळा । देखिला रामरावो ठक पाडिलें डोळां ॥१॥ गोडणी सोहंमार्गी गीती गाती रामा । आनंदें नाचती दृष्टी देखोनीं रामा ॥ २ ॥ देखोनी रामरावो कैसा झाला भावो । सेवितां कंदमुळें आम्हां दिसतो देवो ॥ ३ ॥ सफळिता तरु- वरीं साचें राम आभासे । पहा जनीं वनीं अवघा रामचि दिसे ॥ ४ ॥ चारा हरवेटीं बोरा भरूनियां पाटीं । फळामाजीं फळ राम सफळीत दृष्टी ॥ ५ ॥ आसनीं शयनीं आम्हां आणीक वोधु । एका जना- र्दनीं गोड लाविला वेधू ॥ ६ ॥

## सीताशुद्धी.

९३५ देवासी नागवे ब्रह्मांचाही ब्रह्मो तो राम रावणें आणिला रणा । सुरवर वानर भक्ता निशाचर समूह मीनलीसे सेना । चैतन्य चोरटीं ते रूपें गोरटी आणिली राम अंगना रे ॥ धृ. ॥ राम देखोनी दिठी हरिखली गोरटी । स्वानंदाची सृष्टी हेलावतु ॥ जानकी पाहे रघु- नाथा राम न पाहे सीता। चरणावरी माथा ठेवूं नेदी॥१॥ तंव देव म्हणती देवा सीतेचिया भावा नमस्कार घ्यावा अनुसरू आतां । विनविती जगत्पति ऐके सीतापती। उभी आहे तिष्ठती जनकतनया ॥ विनवी बिभीषण मृदुवचनी लक्षुमण । सीतेलागीं रावण निर्दाळिला ॥ जीलागीं शिणविलें तिसीं । कां दुऱ्हाविलें । हनुमंत म्हणे बोले सांगा स्वामी ॥ २ ॥ तूं जीवीचें न सांगसी आणि मौन्यचि राहसी । तें गूढ वेदशास्त्रांसी न कळे मा ॥ आम्हीं तंव वानरें प्रकृतीचीं पामरें। तें केवीं वनचरें जाणोन वा ॥ सीता सीता घोकणी ते जनक- नंदिनी । उभी असे येउनी जवळी मा ॥ जवळी आल्या पाठी तूं न पाहासी दृष्टी । कुसरी हे उफराटी न कळे आम्हां ॥३॥ पाहोनी प्लवंगम इच्छीतसे बोले राम । विषयीं विषय काम आम्हां नाहीं ॥ हे परपुरु मीनली ऐसी झाली बोली । प्रकृति अंगिकारिली कैसी जाय ॥ तरी हे जीवाची मोहिनी कामजनित जननी। देखतां नयनीं भुलवी जगा ॥ तरी हें दिव्य देउनि पाहा हो दाखवूं शुध्द भावो । संज्ञा रामरावो करुनी ठेला ॥ ४ ॥ हें देखोनि समस्त राहिले तटस्थ । हनुमंत काय तेथें करिता झाला ॥ हें विषम विश्व- कुंड पेटविलें प्रचंड । सहजाग्नि उदंड प्रज्वाळिला । येरी कुंडाकडे पाहे तंव रामरुप दिसताहे। नवल दिव्य माय आरंभिलें ॥ येथें भावचि प्रमाण अग्नि- माजीं स्नान । करूनी रामचरण दृढ धरीन ॥ ५ ॥ अगा परिसें तेजोराशी तूं साक्षी या कर्मासी । जठ- रींचा जठरवासी जठराग्नी ॥ चपल चंचल योगें मन जेथें जाय वेगें । सरिसा पुढें मागें अवघा राम ॥ राम सांडोनि मना विषयो ये जरी ध्याना । तरी देह हुता- शना दग्ध करी ॥ ६ ॥ वाचिक व्यापारू स्वरवर्ण उच्चारु । रामेविण अक्षरु कवीं निघे ॥ वचना वदनीं राम कथे मेघःश्याम । रामेविण उपशम शब्द नाहीं ॥ वाचा जे वावडे तें तें राम घडे । रामेवीण उघडें वचन नाहीं ॥ हांका हांकितां हाका हाकेमाजीं राम देखा। नाहीं तरी देव मुखा दहन करी ॥७॥ हे काया आतळे तेथेंचि राम मिळे। रामाविण वेगळें उरलें नाहीं ॥ देहो देहा देहो वहतांसी संदेहो । देहीं रामरावो प्रकट नांदे ॥ राम श्वासोश्वास राम निमिष निमिष । रामामाजीं वास रामपणें ॥ रामेविण शरीर क्षीण जाय आन मोहर । तरी देहो हा वैश्वानर भस्म करी ॥८॥ जागृतीं जें जे दिसे तें तें राम असे । स्वप्नीं जें आभासें तेंही रामू ॥ सुषुप्तीचें सुख केवळ राम देख । रामे-

विण आणिक नाहीं नाहीं ॥ आम्हां रामरुपीं उत्पत्ति रामरुपी स्थिती। अंती तेही मती रामराम॥ तेथें अग्नीसी तो अतौता अग्निमार्जी सीता। राम म्हणोनि तत्वतां उडी घाली॥९॥ तेथें बुजालीं वानेर भ्यालीं निशाचरें। सुरनरा खेचरें चाकाटलीं॥ उडीसरसी देख सकळां पडिली शंक। अवघीच टकमक पहात ठेली। तेथें तम धुमावे घोळ रजस्ता-कल्लोळ। राहिले निश्चळ सीतातजें॥ धगधगीत इंगळ लखलखीत ज्वाळा। लोपूनी जनकबाळा मिरवे कैसी॥१०॥ दहनदिप्ती सुखा मूळ ते सीता देखा। अग्नि-चिया शिखा शाखा सीता॥ सीता अंगमेळे अग्नीचे पाप जळे। जें रावणाच्या घरीं मेळे धुतां घडलें॥ हे पतिव्रता निर्दोष अग्नि जाला चोख। जयजयकारें घोष अवघे करिती॥ तें देखोनी राघवा जाकळीलें कणवा। अवघेपणें अवघा खेवा आला॥११॥ प्रकृति पुरुषा भेटी खेवां पडिली मिठी। येरयेरां पोटीं हारपली॥ तेथें योग कांहीं स्मरतां स्मरेंत नाहीं। मीतूंपणा पाहीं बुजावणी॥ रामरूपीं तत्वतां मिळोनि गेली सीता। न निवडे सर्वथा कांहीं केलिया॥ अशोकाचे शोक वियोगाचें दुःख। हरुनी म्हणावें सुख तंव म्हणतें नाहीं॥१२॥ शीवशक्ति संयोग अभ्यासेंवीण योग। कल्पनेविण भोग भोगीतसे॥ एका जनार्दनीं सहजेसी मिळणी। प्रकृती रामचरणीं सती झाली॥ एकपणाचेनि आले नुरोचि पैं वेगळें। रामरूपीं सगळें सामावलें॥ नवल पैं लाघव देह देहीं राघव। देव पुढें दिव्य उतरील वा॥१३॥

## हनुमंतास अमर पदप्राप्ति.

९३६ अहिरावणे राम धरूनियां नेला थोर मांडिलें निर्वाण। घायातळीं राम उभा करूनियां म्हणतसे करी रे स्मरण॥१॥ जगाच्या संकटीं रामातें स्मरतां रामें स्मरावें कवण॥ धृ.॥ देवाचें मरण भ[illegible] चुकविलें म्हणोनि अमर केला हनुमंतु। न तुटे [illegible] जळे न बुडे न ढळे संसारीं असोनी अलिप्तु॥२॥ दुसरेनि अवतारें रामासी जन्मु परी हनुमंत जन्मातीतु। देवासी जन्ममरण दिसते अविनासी। एका जनार्दनीं केले भक्तु रे या॥३॥

## राम सहवास प्रभाव.

९३७ कौसल्या यज्ञशेष सेउनी राम जन्मला तियेचें पोटीं। वनवासासी जातां वियोग पावली दुःख शोकें हिंपुटीं॥१॥ धन्य धन्य ते अहिल्या शिळा। हरीच्या पावलीं चरणकमळा॥ धृ.॥ त्र्यंबकभंजनीं जानकी पर्णिली। केली एक पतिव्रता राणी॥ रामा वेगळी रावणें चोरूनियां नेली। दुःखीत अशोक वनीं॥२॥ रामें रणांगणीं राक्षस मारिले। ते मरणातीत होऊनि ठेले। देवांचीं बंधनें तोडिलीं रामें। शेखी अमर ते प्रळयीं निमाले॥३॥ दशरथ पिता निमाला। त्याचें कलेवर पवे तेल द्रोणीं। सकुडी अयोध्या वैकुंठासी। नेली अभिनव श्रीरामकरणी॥४॥ सुरांचा कैवारी कीं असुरांचा वैरी। ऐसें न मानीच रामरावो॥ वैरियाचा बंधु बिभीषण आप्तु। एका जनार्दनीं समभावो॥५॥

९३८ अवलोकितां रामराणा। धणी न पुरे मन नयना॥१॥ पाहतां नयन लोधले। सुरवर वानर बोधले॥२॥ भरत राम आलिंगनीं। रामीं हारपलें दोन्ही॥३॥ एका जनार्दनीं काज। एकछत्रीं रामराज्य॥४॥

९३९ दोघे शरणागत आले श्रीरामासी। मारिलें वालीसी एका बाणें॥१॥ बाणलीसे भक्ति अंगदाचे अंगीं। श्रीरामें वोसंगीं धरियेलें॥२॥ धरियेलें हातें तारा सुग्रीवानें। वैराचें खंडण झालें तेव्हां॥३॥ तेव्हां वानरांची बोलावली सेना। लंकेवरी ज्यांना पाठविलें॥४॥ विलंब न होता धाडी हनुमंता। जाळियेली वार्ता सीता सांगे॥५॥ सांग लंकाजळीं सन्निध उदधी। लंघूनियां शुद्धि रामा सांगे॥६॥ सांगे रामा तेव्हां बांधवा सागर। आणूनि अपार पर्वतांसी॥७॥ शिलासेतु रामचरणाची ख्याती। तारुनी पुढती ख्याती केली॥८॥ बांधोनियां सेतु राम आला लंके। मारियेलें मुख्य राक्षसासी॥९॥ मारी कुंभकर्ण इंद्राजित रावणा। होता लक्ष्मणा शक्तिपात॥१०॥ आणियला गिरी दिव्य तो द्रोणादी। उठविली मांदी वानरांची॥११॥ शिरें उडविलीं लंकापतीचीं। मुख्य राक्षस सावे छेदियेलें॥१२॥ लिगाड तोडिलें वैरत्व खुंटलें। लंकाराज्य दिलें बिभीषणा॥१३॥ तोडियेली बेडी नवग्रहां सोडी। उभविली गुढी रामराज्य॥१४॥ इंद्रचंद्रपद ब्रह्मीयांचें। देउनी तयांचें सुखी केलें॥१५॥ केलें समाधान आणविली सीता। अयोध्ये मागुता राम आला॥१६॥ आलासे भरत लागला चरणीं। फिटलीं पारणीं

लोचनांचीं ॥ १७ ॥ चिंता दुःख द्वेष पळाले बाहेरी। एका जनार्दनीं करी राज्य सुखें ॥ १८ ॥

९४० अवतरला श्रीराम परब्रह्म पुतळा । सुहास्य मुख सुंदर कांसे पितांबर पिवळा ॥ १ ॥ दशरथनंदन राम पाहतां वो मनीं ध्यातां । देहबुद्धि हरपली डोळे भरी पहातां ॥ २ ॥ वसिष्ठ गुरूंनीं अध्यात्माचा रस बिंबविला । ताटिका समूळ मर्दुनी याग रक्षिला ॥ ३ ॥ त्र्यंबक धनुष्य भंगुनी जनकदुहिता आणिली । कैकयीवरदें दशरथ निमाला श्रीराम गेले वनवासीं। ॥ ४ ॥ यवोनियां वनीं रावणें केलें आत्मकोहरण । सीताविरहें राम आलिंगी वृक्ष पाषाण ॥ ५ ॥ वाली वधुनी सुग्रीवा दिली किष्किंदा नगरी । सीताशुद्धी करुनी आला वानर केसरी ॥ ६ ॥ सेतुबंधन करुनी सुवेळो आला श्रीराम । गर्भासहित रावणा दिलें निजधाम ॥ ७ ॥ बिभीषण स्थापिला आणिली जनकनंदिनी । सीतेसह राम बैसले पुष्पक विमानीं ॥ ८ ॥ आला श्रीराम सकळां आनंद झाला । भरतभेटीसमयीं राम हृदयीं गहिंवरला ॥ ९ ॥ राम लक्ष्मण भरत शत्रुघ्न वामांगीं सीता । सिंहासनीं बैसविलें वोवाळिलें रघुनाथा ॥ १० ॥ झाला जयजयकार आनंदें पिटिली टाळी । एका जनार्दनी नाचती आनंदें सकळीं ॥ ११ ॥

९४१ गोड साखरसें गोड साखरसें । रामनाम रसें चवी आली ॥ १ ॥ देठींचें फळ देठीं पिके । राम तोडितां चवी चाखे ॥ २ ॥ न फोडी न तोडी सगळेंचि सेवी । ब्रह्मादिकां तो वाकुल्या दावी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं घेतली गोडी । जीव गेल्या तरी मी न सोडी ॥ ४ ॥

९४२ रघुवीरस्मरणें चित्त माझें रंगलें वो बाई । आसनीं शयनीं भोजनीं त्याविण न रुचे कांई ॥ १ ॥ जीवाचें जीवन माझें त्रैलोक्याचें सुख । त्यासी पाहतां सर्व हरली तहानभुक । ब्रह्मानंदें नाचूं लागे निरखुनी गेलें दुःख ॥ २ ॥ दीनबंधु सखा जीवलग अयोध्येचा राजा । निर्वाणीं संकटीं धांवे भक्तांचिया काजा । कनवाळु तोचि प्राण विसावा माझा ॥ ३ ॥ श्यामवर्ण गोमटी गळां वैजयंती माळा । वामांगीं वरवधीत शोभे जनकाची बाळा । एका जनार्दनीं तो म्यां राम देखिला डोळां ॥ ४ ॥

९४३ अंगे येऊनियां रामें नवल पैं केलें भवाब्धी बांधिला सेतु । अतिशयेसी जड दगड तैसे मूढ नामेंचि तारितु । अविश्वासिया तेथें मार्गेचि न कळे स्वेतबंधीं भवें आवर्तु रया ॥ १ ॥ रामीं आराम् त्या संसार रामू अभिमानियां तोचि पशु । अंतरीं बोध नाहीं बाहेरीं ज्ञातपण लटक्याचा न घेती त्रासु ॥ धृ. ॥ सर्वांतरीं राम म्हणोनि बोलती परी बोला ऐसी नाहीं स्थिती । चरणीं लागल्या शीळा उद्धरल्या हे तव रायाची ख्याती । तेंचि रामू हृदयीं अविश्वासें नरका जाती रया ॥ २ ॥ राम म्हणतां गणिका उद्धरिली तरला संसारलेशु । सकळ शास्त्र मंथुनि श्रुति वाखणितां नये चित्तांचा विश्वासु । वेश्ये निपटा रे वाचूनियां जालों मी नुरेचि संसारपाशु रया ॥ ३ ॥ अंतरीं रामनाम सांगतो कानीं परी न सांगती वेदध्वनी । वेदाचा विश्वासु कर्म प्रकृति परी राम तारील निर्वाणीं । तोचि राम जीतां विश्वासें भजाल तरी सेवक होईल निदानीं ॥ ४ ॥ सांडोनि अभिमान विश्वासें भजाल तरी स्वयेंचि व्हाल राम । मातोयेची मूर्ति द्रोण करूनियां कीं लौकिका फावला भावो । एका जनार्दनीं एकपणें भजतां संसारासी नुरे ठावो रया ॥ ५ ॥

९४४ इंद्रिय देवाची सुटली बांदवडी । स्वानंदें उभाविली गुढी सरली असुर धाडी ॥ १ ॥ रामराज्य झालें रामराज्य झालें । रामराज्य झालें सद्गुरूचेनि बोलें ॥ २ ॥ अहं रावणु रामें मारिला प्रचंडु । धरी मारी देहीं सरला इंद्रिय दंडु ॥ ३ ॥ त्रिकुटशिखरीं पिटलें रामराज्य धंडे । क्रोधादि असुर गेले करुनी काळीं तोंडें ॥ ४ ॥ विषयाचे कारभार कामिनी करिती अतु । राम रामराज्यें विराला मन्मथु ॥ ५ ॥ रामनाम तेथें कळिकाळ कांपती । रामनामें सम अधमोत्तमा मुक्ती ॥ ६ ॥ शरणागत निज स्थापिलें निजपदीं । रामनामें जड तरती भवाब्धी ॥ ७ ॥ एका जनार्दनीं रामनाम जपे । रामराज्य झालें सद्गुरूकृपें ॥ ८ ॥

## श्रीशिवमाहात्म्य.

९४५ आरोहण ज्याचें नंदीवरी । वामांकीं शोभे गिरिजा नारी ॥ १ ॥ त्रिशुळ डमरू शंख कपाल । मस्तकां गंगा चंद्रभाळ ॥ २ ॥ अंकीं षडानन गजवदन । सदा प्रसन्न ज्याचें ध्यान ॥ ३ ॥ भूतें वेताळ शोभती । हर्षयुक्त उमापती ॥ ४ ॥ अंगीं विभूति लेपन । सदा समाधी तल्लीन ॥ ५ ॥ मुखीं रामनाम छंद । एका जनार्दनीं परमानंद ॥ ६ ॥

९४६ भोळा कर्पुरगौर भोळे ज्याचें मन । भोळ्या भक्ताधीन धांवे भोळा ॥ १ ॥ भोळे याचे गळां शोभे रुंडमाळा । अर्धांगी ते बाळा पर्वताची ॥ २ ॥ भोळें ज्याचें मन भोळें ज्याचें ध्यान । भोळें ज्याचें वदन शोभतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रेमाचा पुतळा । भरो माझे डोळां सदोदित ॥ ४ ॥

९४७ पंचविसांचे दृष्टी । शिवा नाहीं तेथें भेटी ॥१॥ छत्तिसां वेगळा । भरला असे तो निराळा ॥ २ ॥ चाळिसाचे ध्यानीं मनीं । कदा नये शूळपाणी ॥३॥ ऐसे विचारे भागले । तयां नाहीं रूप कळलें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं रूप । स्वयंप्रकाश अमूप ॥५॥

९४८ पांच पांचाचा मिळोनि मेळु । सदाशिव म्हणती अमंगळु ॥ १ ॥ कवणा न कळे याचा भावो । शिव साचार देवाधि देवो ॥ २ ॥ विरूपाक्ष म्हणती भेकणा । परी हा सर्वांग देखणा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रबोधु । शिव नित्य नवा आणि वृध्दु ॥ ४ ॥

९४९ श्रवण नयन घ्राण रसन । यामाजीं कोण ज्ञान प्रमाण ॥ महादेव ॥१॥ इंद्रियां अतीत आपण । देखिजे हें ज्ञान कारण ॥ महादेव ॥ २ ॥ जन वन जीवन निरंजन । यामाजीं कवण करूं भजन ॥ महादेव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जन । तो भजकां तो मुख्य भजन ॥ महादेव ॥ ४ ॥

९५० निर्गुण निराकार अवयवरहित । जो शब्दरूपातीत शिव जाण ॥ १ ॥ चहूं वाचांवेगळा पांचांसी निराळा । तो असे व्यापला सर्वांघटीं ॥ २ ॥ ध्यानीं मनीं नये समाधी साधनीं । तो भक्तांचे ध्यानीं तिष्ठतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामरूपा वेगळा । परब्रह्म पुतळा शिव जाणा ॥ ४ ॥

९५१ परापश्यंती मध्यमा वेगळा । वैखरिये निराळा शिव जाणा ॥ १ ॥ आदि मध्य अंत न कळे रूपाचा । परता चहूं वांचा शिव जाणा ॥ २ ॥ एका जनार्दनीं जिवाचें जीवन । सर्वां घटीं पूर्ण शिव जाणा ॥ ४ ॥

९५२ एक दोन तीन पांचा वेगळा । आहे तो निराळा शिव एक ॥ १ ॥ सात पांच बारा चौदा वेगळा । आहे तो निराळा शिव एक ॥ २ ॥ भेदा अभेदा सोळांसी वेगळा । एका जनार्दनीं निराळा शिव एक ॥ ३ ॥

९५३ हृदयीं परमात्मा नांदे परिपूर्ण । तो शिव सनातन पूर्णब्रह्म ॥ १ ॥ जीव तो गुंतला विषयाचे लक्षीं । शिव सर्वसाक्षी परब्रह्म ॥ २ ॥ भाव अभावना जया जैसी पाही । एका जनार्दनीं देहीं परब्रह्म ॥ ३ ॥

९५४ अकार उकार मकारां वेगळा । परब्रह्म पुतळा शिव एक ॥ १ ॥ अंडज जारज स्वेदज उद्भिजां वेगळा । परब्रह्म पुतळा शिव एक ॥ २ ॥ प्राण अपान व्यान उदान समान । यांवेगळा जाण शिव एक ॥ ३ ॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश । यांवेगळा भास शिव एक ॥ ३ ॥ द्वैता अद्वैता वेगळावि जाण । एका जनार्दनीं पूर्ण शिव एक ॥ ५ ॥

९५५ वेदशास्त्रीं गाईला पुराणीं वर्णिला । तो शिव पाहिला डोळभरी ॥ १ ॥ तेणें माझ्या मना होय समाधान । आठवितो चरण वेळोवेळां ॥ २ ॥ सकळ इंद्रियां झाली पैं विश्रांती । पाहतां ती मूर्ति शंकराची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शिव हा भजावा । संसार करावा सुखरूप ॥ ४ ॥

९५६ शिव भोळा चक्रवर्ती । त्याचे पाय माझे चित्तीं ॥ १ ॥ वाचे वदतां शिवनाम । तयां न बाधी क्रोधकाम ॥ २ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष । शिवा देखतां प्रत्यक्ष ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शिव । निवारी कळिकाळाचा भेव ॥ ४ ॥

९५७ स्वरूप सुंदर अति विशाळ । नेत्रीं निघती अग्निज्वाळ । हृदयावरी सर्पाची माळ । दुष्ट दुर्जना प्रत्यक्ष काळ ॥ १ ॥ वाचे वदे हरहर शब्द । तेणें निरसे भवबंध ॥ ध्रु. ॥ माथां जटा शोभे पिंगटवर्ण । मध्यें गंगा वाहे परिपूर्ण । हृदयीं सदा रामध्यान । तयासी पाहतां निवे मन ॥ २ ॥ शिव शिव नाम हें तारक । जया ध्याती ब्रह्मादिक । सिद्ध साधक वानिती अनेक । तया ध्यातां सुख अलोकिक ॥ ३ ॥ वामांगीं गौरी सुंदर । तेजें लोपतसे दिनकर । हृदयीं ध्यातां परात्पर । एका जनार्दनीं तुटे येरझार ॥ ४ ॥

९५८ ॐकार हें मूळ सर्वांचें जाणावें । तेथुनी पहावें वेदशास्त्र ॥ १ ॥ नमन करावें कुळदैवतांसी । मातापितरांसी सर्व भावें ॥ २ ॥ मस्तक ठेवावें संतांचे चरणीं । सदा वसो वाणी शिवनाम ॥ ३ ॥ शिव शिव ऐसें उच्चारावें मुखें । जन्ममरण दुःखें नासताती ॥ ४ ॥ वांयां जाऊं देऊं नये एक क्षण । भक्तीचें लक्षण जाणावें हें ॥ ५ ॥ यमधर्म त्याचे पाय पैं वंदित । एका जनार्दनीं नित्य नाम गाय ॥ ६ ॥

९५९ कर्मे नित्य नैमित्तीक । करावी तीं आवश्यक ॥ १ ॥ तेचि होय शिवपूजा । चित्तशुद्धि ते सहजा ॥२॥ मनःस्थिर तें कारण । करा शंकराचें ध्यान ॥३॥ गुरु होऊनि शंकर । ज्ञान उपदेशीं सत्वर ॥ ४ ॥ तेणें अज्ञानाचा नाश । प्राप्त होय अविनाश ॥ ५ ॥ एका जनार्दनीं धर्म । ब्रह्मप्राप्तीचें हें वर्म ॥ ६ ॥

९६० ज्ञानाचें जें अधिष्ठान । महादेव एकचि जाण ॥ १ ॥ कर्म उपासना साधन । पैं शिवचि अधिष्ठान ॥ २ ॥ तेथुनी प्राप्त सर्व देवां । मुखीं शंकर वदावा ॥ ३ ॥ याकारणें शिवभक्ती । जनहो करा दिनरात्रीं ॥४॥ एका जनार्दनीं शंकर । पावती भवसिंधू पार ॥५॥

९६१ नित्य शिव शिव आठव । तुटेल जन्ममरण भेव ॥१॥ दुजें नाहीं पैं साधन । वाचे वदवा ईशान ॥ २ ॥ ऋध्दिसिध्दी पाया लागे । हृदयीं सदाशिव जागे ॥ ३ ॥ शंकर हा जया चित्तीं । जवळी तया भुक्ति मुक्ति ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सर्वदा । महादेव वाचे वदा ॥ ५ ॥

९६२ सहज नाम आठवितां । यमा पडे धाक सर्वथा ॥ १ ॥ ऐसें शिवनाम समर्थ । कळिकाळ पायां पडत ॥ २ ॥ शुध्द भावें आठवितां । मुक्ति होय सायुज्यता ॥ ३ ॥ ऐशी आहे वेदवाणी । एका शरण जनार्दनीं ॥४॥

९६३ भक्तांचिया मनासारिसा । धांव घाली तो विश्वेशा ॥ १ ॥ ऐसी कृपाळु माउली । शिव अनाथाची साउली ॥ २ ॥ नामीं जडतां सदा मन । आनंदें शिवाचें भजन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रेम । शिवनामें निष्काम ॥ ४ ॥

९६४ शिवनामाची कावड खांदीं । आम्हीं घेतली समताबुद्धि ॥ १ ॥ हर हर हर बोळंगा रे भाई । आशा मनिशा तृष्णा सांडुनी पाही ॥ २ ॥ मागें बहुतीं घेतली खांदीं । ते उतरले पैलपार भवनदी ॥ ३ ॥ ज्ञानदेव कावड घेतां । सुख समाधान वाटे चित्ता ॥ ४ ॥ निवृत्ति सोपान चांगदेव भारी । कावडीचे अधिकारी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं त्याचा दास । कावड घेतां बहु उल्हास ॥ ६ ॥

९६५ ज्ञान वैराग्य कावडी खांदीं । शांति जीवन तयामधीं ॥ १ शिवनाम तुम्ही घ्या रे । शिवस्मरणीं तुम्ही रहा रे ॥ २ ॥ हरिहर कावड घेतली खांदीं । भोंवती गर्जती संतमांदी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कावड बरी । भक्ति फरारा तयावरी ॥ ४ ॥

९६६ जनार्दनें कृपा केली । माझे खांदीं कावड दिली ॥ १ ॥ सांगितला सोपा मंत्र । वाचे वदे हरीहर ॥ २ ॥ बहुत साधनें न करितां । अनायासें आलें हातां ॥ ३ ॥ पूर्ण कृपें जनार्दन । एका जनार्दनीं निजखूण ॥ ४ ॥

९६७ मन हें ओढाळ । सदा करी तळमळ ॥ १ ॥ तयालागीं स्थिर करीं । चित्तीं महादेव धरीं ॥ २ ॥ तरी तुज होय सुख । येर अवघें तें दुःख ॥ ३ ॥ चित्तींची वासना । जंव नाहीं गेली जाणा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन । असो द्यावें समाधान ॥ ५ ॥

९६८ जन्मा येऊनियां नरा । न करी आयुष्याचा मातेरा ॥ १ ॥ वाचे उच्चारीं हरहर । तेणें सुखरूप संसार ॥ २ ॥ शिवनामीं होई रत । सदा समाधान चित्त ॥ ३ ॥ म्हणे एका जनार्दन । शिवनामें भरो वदन ॥ ४ ॥

९६९ महादेव नाम वदे नित्य मुखें । तेथें सर्व सुखें वसताती ॥ १ ॥ शिवनामें कामक्रोधांचें दहन । त्रिविध ताप शमन पावताती ॥ २ ॥ शिवनामें भुक्ति शिवनामें मुक्ती । चुके यातायाती शिवनामें ॥ ३ ॥ ऋद्धिसिद्धि हात जोडती तयासी । मुखीं अहर्निशीं शिव जया ॥४॥ एका जनार्दनीं शिवनाम सार । भवसिंधु पार पावावया ॥ ५ ॥

९७० धन्य धन्य ते जन । जया शिवाचें भजन ॥ १ ॥ हो कां नारी अथवा नर । वाचे वदे हरहर ॥ २ ॥ हास्य विनोद कथा । तेणें मोक्ष प्राप्त सायुज्यता ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जपा । शिव शिव मंत्र सोपा ॥ ४ ॥

९७१ शिवा ऐसा मंत्र सुलभ सोपा रे । जपावा परिकर नित्य नेमें ॥ १॥ न बाधीच विघ्न संसाराचें भान । धन्य ते भजन शिवनामें ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम शिव ईशान । वदतां घडे पुण्य कोटी यज्ञ ॥ ३॥

९७२ सर्व साधनांचें सार । वाचे उच्चार शिवनाम ॥ १ ॥ न लगे योगाची कसवटी । शिवनाम उच्चार होटीं ॥ २ ॥ घडे जप तप अनुष्ठान । वाचे वदतां शिव जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें । शिवनामें जाती पापें ॥ ४ ॥

९७३ सदाशिव अक्षरें चार । जो जपे निरंतर ॥ १॥ तया न बाधी संसार । वाचे वदतां हरहर ॥ २ ॥ ऐसें शिवाचें महिमान । उच्चारितां नोहे पतन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शिव । वाचे वदतां निरसे भेव ॥ ४ ॥

९७४ शिवनाम उच्चारा । तेणें कळिकाळासी दरारा ॥ १ ॥ ऐसा नामावा महिमा । न कळेचि आगमां निगमां ॥ २ ॥ सकळ मंत्रांचें माहेर । शिवमंत्र पंचाक्षर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाचे । शिवनाम जपा साचें ॥ ४ ॥

९७५ सकळांमध्यें श्रेष्ठ । शिवनाम जें वरिष्ठ ॥ १ ॥ आवडीनें नाम जपा । शिव शिव मंत्र सोपा ॥ २ ॥ ऐसा भक्तांचा अंकित । स्मरतांचि मोक्ष देत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उदार । देणें त्रिभुवनीं साचार ॥ ४ ॥

९७६ पाहोनियां भक्तनाथा । स्वयें दे आपुली कांता ॥ १ ॥ देतां न पाहे मागेंपुढें । उदार त्रिभुवन थोकडें ॥ २ ॥ देणें जयाचें अचाट । म्हणोनि नाम नीलकंठ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भोळा । पाळीं जाणें भक्तलळा ॥ ४ ॥

९७७ उत्तम अथवा चांडाळ । न पाहेचि खळाखळ ॥ १ ॥ शरण आलिया तत्त्वतां । तया नुपेक्षी सर्वथा ॥ २ ॥ न म्हणे शुचि अथवा चांडाळ । स्मरणेंचि मुक्तीफळ ॥ ३ ॥ ऐसा पतीत पावन । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

९७८ अनाथाचा नाथ पतीतपावन । हें नामाभिधान तया साजे ॥ १ ॥ भाळीं अर्धचंद्र जटाजूट गंगा । दरूशनें भंगा पापें जातीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम जपा होटीं । पातकें नाशा कोटी हेळामात्रें ॥ ३ ॥

९७९ त्रिभुवनीं उदार । भोळा राजा श्रीशंकर ॥ १ ॥ जे चिंत्तीं जया वासना । पुरवणें त्याचि क्षणा ॥ २ ॥ याती कुळ न पाहे कांहीं । वास कैलासीं त्या देई ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें । शिवनाम पवित्र जपें ॥ ४ ॥

९८० सत्यसत्य ब्रीदावळी । नाम उत्तम हें कलीं ॥ १ ॥ जपतां चार अक्षरें । मुक्ति जगासी निर्धारें ॥ २ ॥ नामें सर्वांवरी सत्ता । ऐसें वदे पैं गीता ॥ ३ ॥ तें नाम जपा पावन । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

९८१ नाम उत्तम पावन । शिव शिव वरिष्ठ जाण ॥ १ ॥ ऐसा पुराणीं महिमा । न कळे वेदशास्त्रां सीमा ॥ २ ॥ जयासाठीं वेवादती । तो शिव स्वयंज्योती ॥ ३ ॥ रुपा अरूपावेगळा । एका जनार्दनीं पाहे डोळां ॥ ४ ॥

९८२ सोमवार व्रत एकादशी करी । त्याचे चरण शिरीं वंदीन मी ॥ १ ॥ शिव विष्णु दोन्ही एकचि प्रतिमा । ऐसा जया प्रेमा वंदीन त्यासी ॥ २ ॥ सदा सर्वकाळ शिवाचें कीर्तन । आनंदें नर्तन भेदरहित ॥ ३ ॥ ऐसा जया भाव सदोदित मनीं । तयाचे चरणीं मिठी घाली ॥ ४ ॥ एका जनार्दनीं व्रताचा महिमा । नकळेचि ब्रह्मा उपरमला ॥ ५ ॥

९८३ देखोनियां हरलिंग । जो न करी तया साष्टांग ॥ १ ॥ मुख्य तोचि वैरी । स्वमुखें म्हणतसे हरी ॥ २ ॥ व्रत न करी शिवरात्र । कासयानें होती पवित्र ॥ ३ ॥ ऐशियासी यमपुरी । एका जनार्दनीं निर्धारीं ॥ ४ ॥

९८४ शिवरात्र व्रत करी यथाविधी । भावें पूजी आधीं शिवलिंग ॥ १ ॥ चुकलें चुकलें जन्माचें बंधन । पुनरागमन नये तेणें ॥ २ ॥ एक बिल्वदळ चंदन अक्षता । पूजन तत्त्वतां सोपें बहु ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूजितां साचार । इच्छिलें हरिहर पूर्ण करिती ॥ ४ ॥

९८५ सकळ देवांचा जनिता । त्रिगुण सत्ता चाळविता ॥ १ ॥ शरण जाता त्याच्या पायां । सर्व हारपली माया ॥ २ ॥ भेदाभेद निवारिले । सर्व स्वरूप कोंदलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शिवें । जीवपणा मुकलों जीवें ॥ ४ ॥

९८६ शिवनाम उच्चारी । आळस न करी क्षणभरी । महापापा होय बोहरी । नाम घेतां ॥ १ ॥ शिव शिव नाम । जपे कां रे उत्तम । नेणें नासे भवभ्रम । निःसंदेह ॥ २ ॥ दो अक्षरीं काम । वाचे घेई तूं नाम । आणीक तें धर्म । सोपें नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं । शिव जप ध्यानीं मनीं । वेदशास्त्र पुराणीं । बोलियेलें ॥ ४ ॥

९८७ शिव शिव अक्षरें दोन । जो जपे रात्रंदीन ॥ १ ॥ धन्य तयाचा संसार । परमार्थाचें तेंच घर ॥ २ ॥ सदोदित वाचे । जपे शिव शिव साचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शिव । सोपा मंत्र तो राणीव ॥ ४ ॥

९८८ ॐनमोजी शिवा । नमो तुज महादेवा । करुनी उपकार जीवा । अवतार धरिला ॥ १ ॥ सोपा मंत्र रामनाम । तेणें झालें सर्व काम । साधनांचा श्रम । गोवा उगविला ॥ २ ॥ बैसोनियां दृढासनीं । नाम जपे निशिदिनीं । तयासी अवनीं । सोपी दिसे ॥ ३ ॥ बरवें साधन उत्तम । अवघा निवारिला श्रम । गातां तुमचें नाम । वंद्य तिहीं लोकीं ॥ ४ ॥ जड जीव उद्धरिले । कलिमाजीं सोपें केलें । रामनाम जप वहिलें । थोर साधन हें ॥ ५ ॥ अवतार धरूनी साचा । उद्धार केला जड जीवांचा । एका जनार्दनीं नामाचा । वाढविला महिमा ॥ ६ ॥

## हरिहरऐक्य.

९८९ एका आरोहणा नंदी। एका गरूड वाहे स्कंधी ॥ १ ॥ एका नित्य वास स्मशानीं। एका क्षीरनिधी शयनीं ॥ २ ॥ एका भस्मलेपन सर्वांग। एका चंदन उटी अव्यंग ॥ ३ ॥ एका रूंडमाळा कंठीं शोभती। एका रुळे वैजयंती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सारखे। पाहतां आन न दिसे पारखें ॥ ५ ॥

९९० एक बाळ ब्रह्मचारी। एक उदास निर्विकारी ॥ १ ॥ एका शोभे पाशुपत। एका सुदर्शन झळकत ॥ २ ॥ एका करीं पद्मगदा। एक परशु वाहे सदा ॥ ३ ॥ ऐसे परस्परें ते दोघे। शोभताती ब्रह्मानंदें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ध्याऊं। तया चरणीं लीन होऊं ॥ ५ ॥

९९१ एका जटा मस्तकीं शोभती। एका किरीट कुंडलें तळपती ॥ १ ॥ एका अर्धांगी कमळा। एका विराजे हिमबाळा ॥ २ ॥ एका गजचर्म आसन। एका हृदयीं श्रीवत्सलांछन ॥ ३ ॥ एका जटा जूट गंगा। एका शोभे लक्ष्मी पैं गा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दोघे। तयां पदीं नमन माझें ॥ ५ ॥

९९२ एका शोभे कौपीन। एका पीतांबर परिधान ॥ १ ॥ एका कंठीं वैजयंती। एका रुद्राक्ष शोभती ॥ २ ॥ एका उदास वृत्ति सदा। एका भक्तांपाशीं तिष्ठे सदा ॥ ३ ॥ एक एका ध्यान करिती। एक एकातें चिंतिती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हरिहर। तया चरणीं मज थार ॥ ५ ॥

९९३ एक ध्याती एकमेकां। वेगळें अंतर नोहे देखा ॥ १ ॥ ऐसी परस्परें आवडी। गूळ सांडुनी वेगळी नोहे गोडी ॥ २ ॥ एकमेकांतें वर्णिती। एकएकांतें वंदिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साचार। सर्वभावें भजा हरिहर ॥ ४ ॥

९९४ हरावें चिंतन हरीचें हृदयीं। हरीचें चिंतन हरावें हृदयीं ॥ १ ॥ ऐशी परस्परें गोडी देखा। काय वर्णावें तया सुखा ॥ २ ॥ सुख पाहतां आनंद। एका जनार्दनीं परमानंद ॥ ३ ॥

९९५ हरिहरांसी जे करिती भेद। ते मतवादी जाण निषिद्ध ॥१॥ हरिहर एक तेथें नाहीं भेद। कालयासि वाद मूढ जनीं ॥ २ ॥ गोडीसी साखर साखरेस गोडी। निवडितां अर्ध घडी दुजी नोहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हरिहर म्हणतां। मोक्ष सायुज्याता पायां पडे ॥ ४ ॥

९९६ एका वेलांटिची आढी। मूर्ख नेणती बापुडीं ॥ १ ॥ हरिहर शब्द वदतां। यमदूतां पडतसे चिंता ॥ २ ॥ कीर्तनीं नाचतां अभेद। उभयतांसी परमानंद ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुख संतोष। हरिहर म्हणतां देख ॥ ४ ॥

९९७ होऊनी वैष्णव। जो कां निंदी सदाशिव ॥१॥ त्यावें न पहावें वदन। मूर्खाहुनी मुर्ख पूर्ण ॥ २ ॥ भक्तीचा सोहळा। शिवें दाविला सकळां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वैष्णव। शिरोमणी महादेव ॥ ४ ॥

९९८ होऊनियां विष्णुभक्त। शिवनिंदा जो करीत ॥ १ ॥ तोची अधम चांडाळ। महादोषी अमंगळ ॥२॥ मुख्य मार्गाचा शिक्का। बंध होय तिहीं लोकां ॥३॥ एका जनार्दनीं शिव। उच्चारितां नाहीं भेव ॥ ४ ॥

९९९ शिव शिव नाम वदतां वाचे। नासे पातक बहुतां जन्मांचें ॥ १ ॥ जो मुकुटमणी निका वैष्णव। तयाचें नाम घेतां हरे काळाचें भेव ॥ २ ॥ तिहीं लोकीं श्रेष्ठ न कळे आगमां निगमां। तयाची गोडी ठाऊक श्रीरामा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नका दुजा भावो। विष्णु तोची शिव ऐसा निर्वाहो ॥ ४ ॥

१००० हरिहरांचे चिंतनीं। अखंड वदे ज्याची वाणी ॥ १ ॥ नर नोहे नारायण। सदा वाचे हरिहर जाण ॥ २ ॥ पळती यमदूतांचे थाट। पडती दूर जाऊनी कपाट ॥ ३ ॥ विनोदें हरिहर म्हणतां। मोक्षप्राप्ती तयां तत्वतां ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हरिहर। भवसिंधु उतरी पार ॥ ५ ॥

१००१ भवसिंधुसी उतार। हरिहर म्हणतां निर्धार ॥ १ ॥ हीच ध्या र प्रचीत। सर्व पुरती मनोरथ ॥ २ ॥ संसाराचा धंदा। वाचे म्हणा हरि गोविंदा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम। वाचे जप सोपा सुगम ॥ ४ ॥

१००२ हरिहरां भेद। नका करूं अनुवाद। धरितां रे भेद। अधम तो जाणिजे ॥ १ ॥ वैष्णव निका संभ्रम। महादेवा सर्वोत्तम। द्वैताचा भ्रम। धरूं नको ॥ २ ॥ आदिनाथ परंपरा। चालत आली तो पसारा। जनार्दनें निर्धारा। उघडें केलें ॥ ३ ॥ गुह्य जाप्य शिवाचें। उघडें केलें पां साचें। एका जनार्दनीं वाचे। रामनाम ॥ ४ ॥

१००३ एकाची स्तुती एकाची निंदा । करितां अंगीं आदळे बाधा ॥ १ ॥ अर्धांगीं लक्ष्मी वंदावी । चरणीं गंगा ती काय निंदावी ॥ २ ॥ ऐसा नाहीं जया विचार । भक्ति नोहे अनाचार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । एकपणें जनार्दन ॥ ४ ॥

१००४ ॐनमोजी सदाशिवा । ब्रह्मादिकां न कळे लाघवा । तुम्ही स्वामी देवाधिदेवा । ध्यान करितसां कवणाचें ॥१॥ ऐक रमणीय पार्वती । त्रैलोक्यांत ज्याची कीर्ति । पुराण वेद जया वानिती । तो श्रीपती ध्यातां मी ॥ २ ॥ आवड किर्तन चित्तीं । रंगीं नाचतो जया वैकुंठपति । माझी धांव तेथें निश्चिती । ते सुखविश्रांति काय सांगूं ॥ ३ ॥ भाळे भोळे हरीचे दास । कीर्तनरंगीं नाचती उदास । त्यांचा भार वाहें मी सर्वेश । उणें तयांस येऊं नेदीं ॥ ४ ॥ ऐसा अनुवाद कैलासगिरीं । गिरिजेसी सांगे त्रिपुरारी । एका जनार्दनीं सत्य निर्धारीं । कीर्तनगजरीं उभे तिन्हीं देव ॥ ५ ॥

१००५ अलंकार जाहलेपणें । जेवीं असे निखळ सोनें ॥ १॥ नाम भिन्न रूप एक । देहीं देहात्मा तैसा देख ॥ २ ॥ गोडी आणि गूळ । नोहे वेगळे सकळ ॥ ३ ॥ जीव शिव नामें भिन्न । एकपणें एकचि जाण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । भेदरूपें दिसे भिन्न ॥५॥

१००६ जगाचा जनक बाप हा कृपाळु । दीनवत्सल प्रतिपाळू पांडुरंग ॥ १ ॥ पहा डोळेभरी द्वैत तें टाकुनी । करील झाडणी महत्पापा ॥२॥ ज्या कारणें योगी साधन साधिती । ती हे उभी मूर्ति भीमातटीं ॥३॥ एका जनार्दनीं भक्त करुणाकर । ठेवुनी कटीं कर उभा विटे ॥ ४ ॥

१००७ अभेदावांचून । न कळे भक्तीचें महिमान । साधितां दृढ साधन । विठ्ठलरूप न कळे ॥ १ ॥ येथें पाहिजे विश्वास । दृढता आणि आस । मोक्षाचा सायास । येथें कांहीं नकोची ॥ २ ॥ वर्ण भेद नको याती । नाम स्मरतां अहोरात्रीं । उभी विठ्ठलमूर्ति तयापाशीं तिष्ठत ॥ ३ ॥ आशा मनिशा सांडा परतें । कामक्रोध मारा लातें । तेणेंचि सरते । तुम्ही व्हाल त्रिलोकीं ॥ ४ ॥ दृढ धरा एक भाव । तेणें चरणीं असे ठाव । एका जनार्दनीं भेव । नाहीं मग काळाचें ॥५॥

## श्रीदत्तनाममहिमा.

१००८ धरी अवतार विश्व तारावया । अत्रीची अनुसूया गरोदर ॥ १ ॥ ऋतुकाळ हेमंत नक्षत्र रोहिणी । शुक्लपक्ष दिनीं पूर्णतिथी ॥ २ ॥ तिथि पूर्णिमा मास मार्गशीर्ष । गुरु तो वासर उत्सवकाळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण अवतार । निर्गुण निराकार आकारलें ॥ ४ ॥

१००९ अव्यक्त परब्रह्म न्हाणी पायांवरी । अभेद नरनारी मिळोनियां ॥ १ ॥ पीतांबर पदरें पुशिला घननीळ । निजविला निर्मळ पालखांत ॥ २ ॥ शिव कातबोळ त्रिगुण त्रिखुंडी । प्रेमाचे आवडी सेवी माय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दत्त पाळण्यांत घातिला । हालविती त्याला अनुसूया ॥ ४ ॥

१०१० जो जो जो जो रे निज आया । हालविती अनुसूया ॥ ध्रु. ॥ पालख पुरुषार्थ चौकोनी । भक्तिनाडी गुंफोनी । दोरी प्रेमाची लाउनी । शांति गाती गार्णी ॥ १ ॥ करितां उत्पत्ति शिणलासी । विश्रांति आलासी । निज रे ब्रह्मया तपलासी । कमळोद्भव जालासी ॥ २ ॥ लक्ष्मीपति निज हो घनश्यामा । सांडोनि वैकुंठधामा । प्रतिपाळ करी हो जीव नामा । दर्शन दिलें आम्हां ॥ ३ ॥ पार्वतीरमण शिवा निज आतां । संहारक जीवजंता । निजरूप निगमा हो आदिनाथा । एका जनार्दनीं दाता ॥ ४ ॥

१०११ दत्त वसे औदुंबरीं । त्रिशूळ डमरू जटाधारी ॥ १ ॥ कामधेनु आणि श्वान । उभे शोभती समान ॥ २ ॥ गोदातीरीं नित्य वस्ती । अंगीं चर्चिली विभुती ॥ ३ ॥ काखेमाजीं शोभे झोळी । अर्धचंद्र वसे भाळीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त । रात्रंदिनीं आठवित ॥ ५ ॥

१०१२ दत्त माझा दीनानाथ । भक्तालागीं उभा सतत ॥ १ ॥ त्रिशूळ घेऊनियां करीं । उभा असे भक्तद्वारीं ॥ २ ॥ भाळीं चार्चिली विभूती । रुद्राक्षाची माळ कंठीं ॥ ३ ॥ जवळी असे कामधेनु । तिचा महिमा काय वानुं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त । रूप राहिलें हृदयांत ॥ ५ ॥

१०१३ हातीं कमंडलु दंड । दत्तमूर्ति ती अखंड ॥१॥ ध्यान लागो माझे मना । विनवितो गुरुराणा ॥ २ ॥ अंगीं चर्चिली विभुती । हृदयीं वसे क्षमा शांती ॥३॥ तोचि चित्तांत आठव । गुरुराज दत्त देव ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त । तद्रूप हें झालें चित्त ॥ ५ ॥

१०१४ आयुष्य जाय माझें व्यर्थ । दत्त समर्थ महाराज ॥ १ ॥ धांव धांव लवकरी । करुणा करी गुरु-

राया ॥ २ ॥ मी तंव अनाथ अपराधी । हीनबुद्धि स्वामीया ॥ ३ ॥ काळ घाला पडिलावरी । धांव श्रीहरी लवलाह्या ॥ ४ ॥ दत्ता पतित पावना । शरण एका जनार्दना ॥ ५ ॥

१०१५ धांवें पावें दत्तराजा । महाराजा गुरुराया ॥१॥ अनाथासी संभाळावें । ब्रीद पाळावें आपुलें ॥ २ ॥ तुजविण सोडविता । नाहीं त्राता दुसरा ॥ ३ ॥ महादोषी पतितालागीं । करा वेगीं उद्धार ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्ता । अवधूता माय बापा ॥ ५ ॥

१०१६ दत्त माझी माता दत्त माझा पिता । बहिणी बंधु चुलता दत्त माझा ॥ १ ॥ दत्त माझा गुरू दत्त माझा तारू । मजशीं आधारू दत्तराज ॥२॥ दत्त माझें जन दत्त माझें मन । सोइरा सज्जन दत्त माझा ॥३॥ एका जनार्दनीं दत्त हा विसांवा । न विचारित गांवा जावें त्याच्या ॥ ४ ॥

१०१७ वेधोनि गेलें माझें मन । हारपलें दुजेंपण ॥१॥ ऐसी ब्रह्ममूर्ति दत्त । वोतलीसे आनंदभरीत ॥ २ ॥ तयाविण ठाव । रिता कोठें आहे वाव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भरला । सबाह्य अभ्यंतर व्यापिला ॥ ४ ॥

१०१८ ऐसी जगाची माऊली । दत्तनामें व्यापुनि ठेली । जावें जिकडे तिकडे दत्त । ऐशी जया मति होत ॥ २ ॥ तया सांकडेंचि नाहीं । दत्त उभा सर्वा ठायीं ॥ ३ ॥ घात आघात निवारी । भक्तां वाहे धरी करीं ॥ ४ ॥ ऐशी कृपाळु माऊली । एका जनार्दनीं देखिली ॥ ५ ॥

१०१९ लावण्य मनोहर प्रेमाचा पुतळा । देखिलासे डोळां दत्तराव ॥ १ ॥ चरणीं घातली मिठी प्रेम दुणावे पोटीं । पाहतां हारपली दृष्टि दुजेपणा ॥ २ ॥ मन माझें वेधलें परिपूर्ण भरलें । एका जनार्दनीं सांठविलें ह्रदयीं दत्त ॥ ३ ॥

१०२० दत्त माझी माय । आम्हां अनाथांची गाय ॥ १ ॥ प्रेमपान्हा पाजी वेगीं । गुरुमाउली आम्हांलागीं ॥ २ ॥ आम्हां प्रीतीची साउली । श्रीगुरु दत्तराज माउली ॥ ३ ॥ आमची जीवींची जीवलगी । आम्हांलागीं घे वोसंगी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं । दत्तराज मायबहिणी ॥ ५ ॥

१०२१ दत्त माझी माय । आम्हां सुखा उणें काय ॥ १ ॥ नित्य प्रीति दत्तनामीं । दत्त वसे गृहारामीं ॥२॥ दत्ताविण नसे दुजें । दत्त मायबाप माझें ॥ ३ ॥ दत्तात्रय दत्तात्रय । नाहीं कळिकाळाचें भय ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त । नित्य देखे ह्रदयांत ॥ ५ ॥

१०२२ आमुचें कुळीचें दैवत । श्रीगुरुदत्तराज समर्थ ॥ १ ॥ तोचि आमुचा मायबाप । नाशी सकळ संताप ॥ २ ॥ हेंचि आमुचें व्रत तप । मुखी दत्तनाम जप ॥ ३ ॥ तयाविण हे सुटिका । नाहीं नाहीं आम्हां देखा ॥४ ॥ एका शरण जनार्दनीं । दत्त वसे तनमनीं ॥ २ ॥

१०२३ माझी माता दत्तगुरू । मज तिचाचि आधारू ॥ १ ॥ तियेविण मजलागीं । कोण रक्षील सर्वांगीं ॥ २ ॥ दत्त माझा आधार । त्यासी चिंतीं वारंवार ॥ ३ ॥ निर्विकार निरंजन । स्वामी माझा दत्त जाण ॥४॥ एका जनार्दनीं दत्त । नित्य देखे ध्याना आंत ॥५॥

१०२४ आत्मज्ञान बिंबलें ह्रदयीं । दत्त वोळखिला ठायीं ॥ १ ॥ पारिखेपणा दूर केला । अवघा दत्तचि गमला ॥ २ ॥ नामें पावन चराचरें । तें दत्तनाम दोन अक्षरें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं छंद । दत्तनामें लागला वेधु ॥ ४ ॥

१०२५ श्रीगुरुरूपें दत्त वोळखिला । ह्रदय डोल्हाऱ्यावरीं बैसाविला । अभेद पूर्ण चांदवा तेथें दिला । शुद्ध भक्तीनें दत्त पुजियेला ॥ १ ॥ दत्तचरणीं मज लागलीसे गोडी । भवभयाची तुटोनी गेली बेडी ॥ ध्रु. ॥ सोहं गुढी तेथें उभारिली । मंत्र उपदेशें देहबुद्धि गेली । पूर्ण निवृत्ति प्रवृत्तीहि धाली । सहज पूर्णानंद पूर्णता जाली ॥ २ ॥ जिकडे पाहें तिकडे चक्रपाणी । बोलावयाची राहिली शिराणी । जनीं वनीं एकात्मता खाणी । एका जनार्दनीं रंगलीसे वाणी ॥ ३ ॥

१०२६ स्वानंदें आवडी दत्त पाहूं गेलों डोळां । तंव चराचर अवघें श्रीदत्तची लीला ॥ १ ॥ विस्मयो दाटला आतां पाहूं मी कैसें । देखता देखणें अवघें दत्तचि दिसे ॥ २ ॥ असे आणि नसे हा तंव विकल्प जनांत । जनीं जनार्दन निजरूपें दत्त ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तेथें अद्वय नित्य । सबाह्य अभ्यंतरी दत्त नांदत ॥ ४ ॥

१०२७ मनासी स्थिरता नामें दत्त वेध । दुजा नाहीं छंद आणीक कांहीं ॥ १ ॥ म्हणोनि संकल्प दृढ झाला पायीं । दत्तावांचूनी ठायीं नोहे कांहीं ॥ २ ॥ पाहतां पाहणें परतलें मन । पाहण्याचें विंदान विस-

रलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं परब्रह्म पुतळा। दत्त देखिला डोळां आत्मदृष्टी ॥ ४ ॥

१०२८ माझिया मनींचा फिटलासे विहो। पाहुनियां देवो दत्तराव ॥ १ ॥ फिटला संकल्प तुटली वासना। आन नाहीं कल्पना दुजी कांहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं दत्त वेगळा जाण। नोहे माझा प्राण क्षणभरी ॥ ३ ॥

१०२९ त्रिगुणात्मक त्रिमूर्ति वेगळा। पाहे तो सांवळा दत्तरावो ॥ १ ॥ मन माझें वेधलें दत्ताचे चरणीं। नाहीं आन मनीं दुजा छंद ॥ २ ॥ परात्पर पहावा हृदयीं तैसा ध्यावा। एका जनार्दनीं सांठवावा दत्त मनीं ॥ ३ ॥

१०३० माझी दत्त ती माऊली। प्रेमपान्हा पान्हावली ॥ १ ॥ कुर्वाळुनी लावी स्तनीं। नोहे निष्ठुर क्रोध नाहीं मनीं ॥ २ ॥ भक्तांसी न विसंबे। सदा वाट पाहे बिंबे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निश्चित। दत्तनामें पावन पतीत ॥ ४ ॥

१०३१ एकाएकीं एकला काशीवासा गेला। स्वलीना श्रीदत्त स्वयें प्रगटला ॥ १ ॥ दत्त देव आला दत्त देव आला। स्वभाव सांडोनी भेटावया चला ॥ २ ॥ मुक्त मंडपामाझारीं निजनाम नगरी। दत्त प्रगटला किर्तनामाझारीं ॥ ३ ॥ भेटणें भेटी उठी दत्ता आली भेटी। सांगणें ऐकणें दत्त होऊनि उठी ॥ ४ ॥ कीर्तनीं आतौता नाम श्रीदत्त दत्ता। निजकीर्ति ऐकोनि डोले तत्त्वतां ॥ ५ ॥ जळा सबाह्य अंतरीं मनकर्णिका तीरीं। दत्त स्नान करी आत्ममुद्रेवरी ॥ ६ ॥ दत्त जंगमीं स्थावरीं विश्वीं विश्व धरी। तोचि दत्त घरोघरीं नित्य भिक्षा करी ॥ ७ ॥ एका जनार्दनीं दत्तवचनें देख। प्रपंच परमार्थ मीच चालवी एक ॥ ८ ॥

१०३२ दुर्लभ नरदेह पावला। प्राणी देवासी विसरला ॥ १ ॥ सुख मानिलें संसारीं। जाउनि पडिला अघोरीं ॥ २ ॥ संसारसिंधूसी तारक। स्वामी दत्तराज एक ॥ ३ ॥ त्याचें नाम आठवितां। चुकली भवार्णवाची वार्ता ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त। भवसिंधु तारक समर्थ ॥ ५ ॥

१०३३ परमार्थी राखितां भावो नवल नव्हे पहाहो। भक्त परिग्रहो चालवी दत्तदेवो ॥ १ ॥ कृपाळु श्रीदत्त कृपाळु श्रीदत्त। अहर्निशीं स्वयें पाळिती निजभक्त ॥ २ ॥ वत्सालागीं जैसी व्याली धेनु धांवे। निजभक्तांकारणें दत्त तैसा पावे ॥ ३ ॥ भक्त कीर्तनें तोषला दत्त संतोषला। हरिजागरीं स्वयें सिध्द प्रगटला ॥ ४ ॥ निजात्मस्थिति लीला मनीं सुमनमाळा। एका जनार्दनीं दत्त घाली गळां ॥ ५ ॥

१०३४ लागूनियां पायां जना विनवीत। मुखीं बोला दत्त वारंवार ॥ १ ॥ तेणें तुम्हां सुख होईल अपार। दत्त दयासागर आठवावा ॥ २ ॥ स्त्रिया पुत्र संसारा गुंतसी पामरा। तेणें तूं अघोरा पावशील ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चित्तीं दत्तपायां। दत्तरूप काया झाली त्याची ॥ ४ ॥

१०३५ वेळोवेळां सांग जना। मागें दाना सर्वांसी ॥ १ ॥ मंगल श्रीदत्तराज। स्मरा गुरुराजसमर्थ ॥ २ ॥ आयुष्य जाय पळ पळ। करा बळ चिंतना ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लोकां। विसरूं नका सांगतों ॥ ४ ॥

१०३६ वाचे बोला दत्त दत्त। होय सकळ परमार्थ ॥ १ ॥ दत्तरूपीं लागतां दृष्टी। दत्तरूप अवघी सृष्टी ॥ २ ॥ दत्तकथा वसे कानीं। दत्तमूर्ति ध्यानीं मनीं ॥ ३ ॥ दत्तालागीं आलिंगना। कर समर्थ हे जाणा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त। सदा वसे हृदयांत ॥ ५ ॥

१०३७ धन्य धन्य तेचि नर। दत्तनामीं जे तत्पर ॥ १ ॥ त्याचें होतां दरुशन। पतित होताती पावन ॥ २ ॥ तयालागीं शरण जावें। काया वाचा आणि जीवें ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। त्याचे पाय आठवी मनीं ॥ ४ ॥

१०३८ उदार दयाळ गुरुदत्त। पुरवी हेत भक्तांचा ॥ १ ॥ त्याचे चरणीं लीन व्हावें। शुद्धभावें करुनी ॥ २ ॥ मुखीं स्मरा गुरुदत्ता। नाहीं दाता दुसरा ॥ ३ ॥ पायीं करा तीर्थयात्रा। गुरुसमर्था भजावें ॥ ४ ॥ म्हणे एका जनार्दनीं। जनीं वनीं दत्त हा ॥ ५ ॥

१०३९ कलयुगीं तारक। स्वामी दत्तराज एक ॥ १ ॥ त्याचें नाम नित्य गावें। भवसिंधूसि तरावें ॥ २ ॥ दत्तमूर्ति हृदयीं ध्यातां। पावे मोक्ष सायुज्यता ॥ ३ ॥ दत्त वसे जया मनीं। तया दत्त जनीं वनीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त। सबाह्य स्वानंदभरित ॥ ५ ॥

१०४० त्रिगुणाविरहित नाम दत्तात्रेय। गातां वदतां होय आनंद चित्तां ॥ १ ॥ पालटेल मन संसारभावना। अंतीं ते चरणा भेटी होय ॥ २ ॥ योगयाग कसवटी वाउगी रहाटी। दत्त म्हणतां होटीं सर्व जोडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वदतां दत्त वाचे। अनंत यागांचें पुण्य जोडे ॥ ४ ॥

१०४१ आठवितां दत्तात्रय। नासताती तापत्रय ॥१॥ प्राप्त होय ऋध्दिसिध्दी। दत्तनामें ती समाधी ॥ २ ॥ योगयागादि साधन। गुरुभक्त पावे जाण ॥ ३ ॥ विवेक वैराग्य शमादी। हस्तीं वसे निष्कर्मसिध्दी ॥४॥ एका जनार्दनीं दत्त। सदा हृदयीं तिष्ठत ॥ ५ ॥

१०४२ दत्तात्रेय नाम। नित्य जपे जो निष्काम ॥ १॥ तया नाहीं द्वैतभाव। दृष्टि दिसे गुरुराव ॥ २ ॥ दत्ताविण नसे स्थान। दत्तरूप जन वन ॥३॥ ध्यानीं मनीं दत्तराज। दत्ताविण नाहीं काज ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जपा। दत्तनाम मंत्र सोपा ॥ ६ ॥

१०४३ दत्त ध्यावा दत्त गावा। दत्त आमुचा विसांवा ॥ १ ॥ दत्त अंतर्बाह्य आहे। दत्ताविण कांहीं नोहे ॥२॥ दत्त जनीं दत्त वनीं। दत्तरूप हे अवनीं ॥ ३ ॥ दत्त-रूपीं लीन वृत्ती। एका जनार्दनीं विश्रांती ॥ ४ ॥

१०४४ खुंटलासे शब्द बोलतां आनंद। सर्व ब्रह्मा-नंद कोंदाटला ॥ १ ॥ तें हें दत्तनाम आवडी आदरें। उच्चारीं सोपारें सर्वकाळ ॥ २ ॥ कलिमाजीं सोपें दत्त-नाम घेतां। संसाराची वार्ता उरी नुरे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लागलासे छंद। दत्तनामें आनंद सर्व-काळ ॥ ४ ॥

१०४५ दत्ता देतां आलिंगन। कैसें होता हें अभिन्न ॥ १ ॥ स्वलीला स्वरूपता। तिन्ही दावी अभिन्नता ॥ २ ॥ लाघवी श्रीदत्त। देवभक्त आपणचि होत ॥३॥ मीचि जनार्दन मीचि एका। दत्तस्वरूपीं मीच मी देखा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त पुढें मागें। सगुण निर्गुण रूपें लागला संगें ॥ ५ ॥

१०४६ दत्त नामाचा उच्चार। मुखीं वसे निरंतर ॥ १ ॥ तयापाशीं शांति क्षमा। प्राप्त होय निजधामा ॥२॥ सर्व सुखें तयापाशीं। ऋध्दिसिध्दि त्याच्या दासी ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति लोटांगणीं। लागताती त्या चरणीं ॥ ४ ॥ म्हणे एका जनार्दन। मना लागलेंसे ध्यान ॥ ५ ॥

१०४७ दत्त दत्त म्हणतां वाचे। तेणें सार्थक जन्माचें ॥ १ ॥ मनें चिंतावा श्रीदत्त। अंतर्बाह्य पूर्ण भरित ॥ २ ॥ दत्तरूप पाहे डोळां। तेणें भय कळि-काळा ॥ ३ ॥ करा हस्तें दत्तपूजा। मुखीं मंत्र गुरुराजा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जपा। मंत्र द्व्यक्षरी हा सोपा ॥ ५ ॥

१०४८ सर्व पर्वकाळ दत्त वदतां वाचे। आणिक सायसाचें मूळ खुंटे ॥१॥ म्हणा दत्त दत्त म्हणा दत्त दत्त। म्हणा दत्त दत्त वेळोवेळां ॥२॥ काळ वेळ कांहीं न लगे तत्वतां। नाम उच्चारितां दरुशन ॥३॥ भोळ्या भावीकांसी जप मंत्रावळी। दत्तनाम माउली सोपा जप ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नामाचा प्रताप। निवारे भवताप दरुशनें ॥ ५ ॥

१०४९ म्हणतां दत्त दत्त। दत्त करी गुणातीत ॥ १ ॥ दत्तनामाचा निजछंद। नामें प्रगटे परमानंद ॥ २ ॥ निज भाव समर्थ। जेथें नाम तेथें दत्त ॥३॥ एका जनार्दनीं दत्त। दत्त करी देहातीत ॥ ४ ॥

१०५० प्राणियासी मंत्र सोपा। दत्त दत्त वाचे जपा ॥ १ ॥ आणीक न लगे साधन। दत्तनामें घडे ज्ञान ॥ २ ॥ न लगे योगायाग पाही। दत्तावांचुन नेणें कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेधलें मन। मनाचि जालें उन्मन ॥ ४ ॥

१०५१ दत्त दत्त म्हणे वाचे। काळ पाय वंदी त्याचे ॥ १ ॥ दत्तचरणीं ठेवी वृत्ती। होय वृत्तीची निवृत्ती ॥ २ ॥ दत्तरूप पाहे डोळां। वंद्य होय कळिकाळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दत्त। हृदयीं वसे सदोदित ॥ ४ ॥

१०५२ श्रीदत्त ऐसी ज्याची वाचा पढे। मोक्ष सायुज्यता जोडे ॥१॥ ऐसी प्रचीत पाहा देहीं। व्यापुनी असे देहीं विदेही ॥ २ ॥ एका जनार्दनीं दत्त। सबाह्य आनंदभरीत ॥ ३ ॥

१०५३ दत्त दत्त वदतां वाचे। होय जन्माचें सार्थक ॥ १ ॥ ऐसा जया नामीं वेधु। परमानंदु हृदयीं ॥ २ ॥ दत्त आलिंगनीं समाधान। तेणें नासे मीतूंपण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेधु। दत्तनामें लागला छंदु ॥ ४ ॥

१०५४ दत्तात्रय नाम ज्याचे नित्य मुखीं। तया समसुखी नाहीं दुजा ॥ १ ॥ भावें दत्त दत्त म्हणतसे वाचे। कळिकाळ त्याचे पाय वंदी ॥ २ ॥ दत्ताचें पैं रूप ज्याचे वसे नेत्रीं। आहिक्य परत्रीं तोचि सुखी ॥ ३ ॥ गुरु दत्तराया देई आलिंगन। तयासी वंदन करिती सर्व ॥ ४ ॥ दत्तरायाची जे करिताती यात्रा। त्याचेनी पवित्र होती तीर्थे ॥ ५ ॥ ज्याचे चित्तीं वसे गुरुदत्त ध्यान। त्याचेनि पावन तिन्ही लोक ॥ ६ ॥ दत्तालागीं अर्पी तन मन धन। परब्रह्म पूर्ण तोचि झाला ॥ ७ ॥ दत्तचरण तीर्थ जोका नित्य सेवी। उगवितो गोवी प्रपंचाची ॥ ८ ॥ दत्तावरूनियां

कुरवंडी काया । तयाचिया पायां मोक्ष लागे ॥ ९ ॥ एका जनार्दनीं मुखीं दत्तनाम । हरे भवश्रम क्षणामाजी ॥ १० ॥

१०५५ आर्तें आरती दत्त वोवाळूं जातां । आरतीचें हरण दत्तें केलें तत्त्वतां ॥ १ ॥ आरती खुंटली आतां वोवाळूं कैसें । तरी निजभजनें निरंजन होतसे ॥२॥ आरतीचे आर्त पुरवी श्रीदत्त । एका जनार्दनीं सहज वोवाळीत ॥ ३ ॥

## श्रीदत्तमानसपूजा.

१०५६ केलें आवाहन । जेथें नाहीं विसर्जन ॥ १ ॥ भरला ओतप्रोत । स्वामी माझा देव दत्त ॥ २ ॥ गातां येत नाहीं । पूर्ण सुलीनता पाही ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खूण । विश्वीं भरला परिपूर्ण ॥ ४ ॥

१०५७ सहज सुखासनीं अनुसूयानंदन । पाहतां हें ध्यान वृत्ती निवे ॥ १ ॥ बालोन्मत्त पिशाच्च त्रिविध अवस्था धरी । आपण निराकारी सोहंभावें ॥ २ ॥ कारण प्रकृती न घेचि तो माथा । चिदानंद सत्ता विलसतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हृदयीं आसन । अखंडीत ध्यान निजतत्त्वीं ॥ ४ ॥

१०५८ अनन्य आवरी उदक निर्मळ । वासना सोज्वळ नम्रपणें ॥ १ ॥ प्रक्षाळिले पाय वाही एक माथा । हृदयीं प्रीति धरितां प्रेमलाभ ॥ २ ॥ घेऊनियां तीर्थ इंद्रियें तीं धालीं । सकळ निवालीं जनार्दनीं ॥३॥

१०५९ चोहों देहांची क्रिया । अर्घ्यें दिले दत्तात्रेया ॥ १ ॥ जे जे कर्म-धर्म । शुद्ध सबळ अनुक्रम ॥ २ ॥ इंद्रिय क्रियाजात । कांहीं उचित अनुचित ॥ ३ ॥ आत्मा माझा देव दत्त । एका जनार्दनीं स्वस्थ ॥४॥

१०६० संचित क्रियमाण । केलें सर्वांत्रें आचमन ॥ १ ॥ प्रारब्ध शेष उरलें यथा । तेथें ध्याऊं सद्गुरुदत्ता ॥ २ ॥ झालें सकळ मंगळ । एका जनार्दनीं फळ ॥ ३ ॥

१०६१ साती भागीरथी सद्भावीची धार । सुभक्ति ते मकर समर्पिली ॥ १ ॥ अर्पियलें स्नान झालें समाधान । मनाचें उन्मन होऊनियां ॥ २ ॥ चित्त हें शीतळ गेली तळमळ । पाहिलें निढळ अमूर्तासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं केला जयजयकार । अत्रीवरद थोर तिहीं लोकीं ॥ ४ ॥

१०६२ वर्णावर्ण नाहीं । हेचि प्रावर्ण त्याचे ठायीं ॥ १ ॥ पराभक्तीच्या पालवीं । जिवो अज्ञाना मालवी ॥ २ ॥ करा करा जन्मोद्धार । हरिभक्तीचा बडीवार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोध । दत्तापायीं तो स्वानंद ॥ ४ ॥

१०६३ गंध ग्रहण घ्राणता । त्रिपुटी मांडिली सर्वथा ॥१॥ सुबुद्धि सुगंध चंदन । केलें दत्तात्रया अर्पण ॥ २ ॥ शांति क्षमा अक्षता । तिलक रेखिला तत्वतां ॥ ३ ॥ एका जनार्दन । करूनि साष्टांगें नमन ॥ ४ ॥

१०६४ सहस्रदल कमलाकर । कंठीं अर्पियले हार ॥ १ ॥ सोळा बारा अठरा चार । माथां वाहूं पुष्पभार ॥ २ ॥ एका जनार्दनीं अलिकुळु । दत्तचरणाब्ज निर्मळु ॥ ३ ॥

१०६५ आत्मज्ञान वैश्वानरीं । धूप जाळिला सरोभरी ॥१॥ तेणें मातला परिमळ । पिंडब्रह्मांडीं सकळ ॥२॥ वासाचा निजवास । एका जनार्दनीं सुवास ॥ ३ ॥

१०६६ ज्ञानदीपिका उजळी । नाहीं चिंतेची काजळी ॥ १ ॥ ओवाळिला देवदत्त । प्रेमें आनंदभरीत ॥ २ ॥ उष्ण चांदणें अतीत । तेज कोंदलें अद्भुत ॥ ३ ॥ भेदाभेद मावळले । सर्व विकार गळाले ॥ ४ ॥ एका मिळवी जनार्दन । तेजीं मिळाला आ॰ण ॥ ५ ॥

१०६७ अहंममता घारीपुरी । समूळ साधली दुरी ॥ १ ॥ चतुर्विध केलीं ताटें । मानी शरण गोमटें ॥ २ ॥ मन पवन समर्पिलें । भोग्य भोक्तृत्व हारपलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भोजन । तृप्त झालें त्रिभुवन ॥ ४ ॥

१०६८ नाम मंगळा मंगळ । झालें जन्माचें सफळ ॥१॥ दत्त जीवींचें जीवन । दत्त कारणा कारण ॥ २ ॥ अनसूयात्मजा पाही । देहभाव उरला नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दर्शन । चित्त झालें समाधान ॥ ४ ॥

१०६९ दत्त सबाह्य अंतरीं । दत्तात्रय चराचरीं ॥ १ ॥ दत्तात्रय माझें मन । हरोनि नेलें मतींपण ॥ २ ॥ मुळीं सिंहाद्री पर्वतीं । दत्तात्रयें केली वस्ती ॥ ३ ॥ भक्तां मनीं केला वास । एका जनार्दनीं विश्वास ॥४॥

१०७० नाम निजभावें समर्थ । जेथें नाम तेथें दत्त ॥ १ ॥ वाचे म्हणतां देवदत्त । दत्त करी गुणातीत ॥ २ ॥ दत्तनामाचा सोहळा । धाक पडे कळिकाळा ॥ ३ ॥ दत्तनामाचा निजछंद । नामीं प्रगटे परमानंद ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दत्त । [illegible] स्वानंदें भरीत ॥ ५ ॥

## श्रीहरिनाममहिमा.

१०७१ कलियुगामाजीं एक हरिनाम साचें । मुखें उच्चारितां पर्वत छेदी पापांचे ॥ १ ॥ सर्वभावें भजा एक हरीचें नाम । मंगला मंगल करील निर्गुण निष्काम ॥ २ ॥ दोषी अजामेळ तोहि नामें तरला । हरिनामें गणिकेचा उद्धार जाहला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम साराचें सार । स्त्रियादि अंत्यजा एकदांचि उद्धार ॥ ४ ॥

१०७२ जगीं तो व्यापक भरूनी उरला । शरण तूं तयाला जाय वेगीं ॥ १ ॥ उघडा मंत्र जाण वदे नारायण । नोहे तुज विघ्न यमदूत ॥ २ ॥ अखंड वाचेसी उच्चार नामाचा । तेणें कळिकाळाचा धाक नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतसेवेविण । आणिक साधन नाहीं दुजें ॥ ४ ॥

१०७३ नाम हे नौका तारक भवडोहीं । म्हणोनि लवलाही वेग करा ॥ १ ॥ बुडतां सागरीं तारूं श्रीहरी । म्हणोनि झटकरी लाहो करा ॥ २ ॥ काळाचा तो फांसा पडला नाहीं देहीं । म्हणोनि लवलाही लाहो करा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लाहो करा बळें । सर्वदा सर्वकाळें लाहो करा ॥ ४ ॥

१०७४ दुजा छंद नोहे वाचे । वदे साचें हरिनाम ॥ १ ॥ कोटी कुळें होती पावन । नामस्मरण करीतांची ॥ २ ॥ यम न पाहे तयाकडे । वाडें कोडें नमस्कारी ॥ ३ ॥ विधी शची उमारमण । वंदिती चरण आवडी ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । उपाय नेटका कलियुगीं ॥ ५ ॥

१०७५ सर्वांवरी वरिष्ठ सत्ता । वाचे गातां हरिनाम ॥ १ ॥ साधन सोपें पाहतां जगीं । सांडावी उगी तळमळ ॥ २ ॥ रामनामें करा ध्यास । व्हा रे उदास प्रपंचीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । करा वज्राहुनी कठीण ॥ ४ ॥

१०७६ नामें पाषाण तरले । महापापी उध्दरिले । राक्षसादि आसुर तरले । एका नामें हरिच्या ॥ १ ॥ घेईं नाम सदा । तेणें तुटेल आपदा । निवारेल बाधा । पंचभूतांची निश्चयें ॥ २ ॥ हो कां पंडित ब्रह्मज्ञानी । तरती तारिती मेदिनी । शरण एका जनार्दनीं । नाम उच्चारणीं आनंद ॥ ३ ॥

१०७७ काळाचें शासन । गातां श्रीहरीचे गुण ॥ १ ॥ ऐसें सुलभ नाम वाचे । घेईं घेईं गोविंदाचें ॥ २ ॥ संसाराचा छंद । येणें तुटे भवकंद ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । भवसिंधु तारक धाम ॥ ४ ॥

१०७८ जो विनटला श्रीहरीचरणीं । त्यासी भवबंधनीं श्रम नाहीं ॥ १ ॥ देव उभा मागें पुढें । वारी सांकडें भवाचें ॥ २ ॥ नामस्मरणीं रत सदा । तो गोविंद आवडे ॥ ३ ॥ त्याचे तुळणें दुजा नाहीं । एका पाही जनार्दनीं ॥ ४ ॥

१०७९ हरिनामें तरले । पशुपक्षी उद्धरले ॥ १ ॥ ऐशी व्याख्या वेदशास्त्रीं । पुराणें सांगताती वक्त्री ॥ २ ॥ नामें प्रल्हाद तरला । उपमन्यु अढळपदीं बैसला ॥ ३ ॥ नामें तरली ती शिळा । तारियेला वानरमेळा ॥ ४ ॥ हनुमंत ज्ञानी नामें । गणिका निजधामीं नामें ॥ ५ ॥ नामें पावन वाल्मिक । नामें अजामेळ शुध्द देख ॥ ६ ॥ नामें चोखामेळा केला पावन । नामें कबीर कमाल तरले जाण ॥ ७ ॥ नामें उंच नीच तारिले । एका जनार्दनीं नाम बोले ॥ ८ ॥

१०८० हरीचें नामें हरीचे भक्त । उद्धरले असंख्यात ॥ १ ॥ दैत्य दानव मानव । रीस वानर जीव सर्व ॥ २ ॥ वृक्षपाषाणादि तृण । हरिनामें ते पावन ॥ ३ ॥ पशु पक्षी अबला । एका जनार्दनीं तरल्या ॥ ४ ॥

१०८१ हरीनामामृत तरले अपार । व्यासवाल्मिकादि निर्धार तरले जाण ॥ १ ॥ सेवेचेनि मिसें अक्रूर तरला । उद्बोध जाहला हृदयामाजीं ॥ २ ॥ सख्यत्वयोगें अर्जुन तरला । प्रत्यक्ष भेटला कृष्णराव ॥ ३ ॥ दास्यत्व निकटीं हनुमंता भेटी । हृदयसंपुटीं राम वसे ॥ ४ ॥ नामधारकपणें प्रल्हादु तरला । प्रत्यक्ष देखिला नरहरी ॥ ५ ॥ उपमन्यू बाळक दुधाचिया छंदें । तयासी गोविंदें कृपा केली ॥ ६ ॥ ऐसें अपरंपार तरले नामस्मरणीं । एका जनार्दनीं नाम जपे ॥ ७ ॥

१०८२ जेथें हरिनामाचा गजर । कर्म पळतसे दूर ॥ १ ॥ नाम निर्दाळीं पापातें । वदती शास्त्रें ऐशीं मतें ॥ २ ॥ पापाचे पर्वत । नाम निर्दाळी सत्य ॥ ३ ॥ नाम जप जनार्दन । एका जनार्दनीं पावन ॥ ४ ॥

१०८३ ज्याचें देणें न सरे कधीं । नाहीं उपाधी संबंध ॥ १ ॥ एका नामासाठीं सोपें । नारी अमूपें पातकी ॥ २ ॥ शुध्द अथवा अशुद्ध याती । होत सरती हरिनामें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम सार । उतरी पार भवनदी ॥ ४ ॥

१०८४ सुलभ सोपारें नाम मुखीं गातां । पातकांच्या चळथा कांपताती ॥ १ ॥ हरिनाम सार वाचे तो उच्चार । तरले नारीनर नाममात्रें ॥ २ ॥ वेदांत सिध्दांत तयांचा संकेत । नामें होती मुक्त महापापी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेदाचें निजसार । नाम परात्पर जपती सर्व ॥ ४ ॥

१०८५ भगवंताची नामकीर्ति । अखंड वाचे जे वदती ॥ १ ॥ धन्य तेचि संसारीं । वाचे उच्चारी हरिनाम ॥ २ ॥ प्रपंचाचें नोहें कोड । पुरे चाड हरिनामें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम गोड । होय निवाड जन्माचा । ४ ॥

१०८६ हरि म्हणा बोलतां हरि म्हणा चालतां । हरि म्हणा खेळतां बाळपणीं ॥ १ ॥ म्हणा हरिनाम पुरती सकळ काम । हरिनामें ब्रह्म हातां चढे ॥ २ ॥ हरि म्हणा उठतां हरि म्हणा बैसतां । हरि म्हणा पाहतां लोकलीला ॥ ३ ॥ हरि म्हणा आसनीं हरि- म्हणा शयनीं । हरि म्हणा भोजनीं ग्रासोग्रासीं ॥४॥ हरि म्हणा जागतां हरि म्हणा निजतां । हरि म्हणा झुंजतां रणांगणां ॥ ५ ॥ हरि म्हणा एकटीं हरि म्हणा संकटीं । हरि धरा पोटीं भावबळें ॥६॥ हरि म्हणा हिंडतां हरि म्हणा भांडतां । हरि म्हणा कांडितां साळी दाळी ॥ ७ ॥ हरि म्हणा देतां हरि म्हणा मागतां । हरि म्हणा गातां पदोपदीं ॥ ८ ॥ हरि म्हणा देशीं हरि म्हणा परदेशीं । हरि म्हणा अहर्निशीं सावधान ॥ ९ ॥ हरि म्हणा एकांतीं हरि म्हणा लोकांतीं । हरि म्हणा अंतीं देहत्यागीं ॥ १० ॥ हरि म्हणा धर्मता हरि म्हणा अर्थता । हरि म्हणा कामता सकाम काम ॥ ११ ॥ हरि म्हणा स्वार्थी हरि म्हणा परमार्थी । हरि म्हणा ब्रह्मप्राप्तीलागीं ॥ १२ ॥ हरि म्हणा भावता हरि म्हणा अभावता । हरि म्हणा पावतां मोक्षपद ॥ १३ ॥ हरि म्हणा निजनिधी हरि म्हणा आनंदी । हरि परमानंदीं आनंद तो ॥ १४ ॥ हरि म्हणा जनीं हरी म्हणा विजनीं । एका जनार्दनीं हरि नांदे ॥ १५ ॥

१०८७ हरिनामीं ज्याची प्रीती । सदा वानिती हरि- नाम ॥ १ ॥ धन्य धन्य जन्म त्याचा । उच्चार वाचा हरिनाम ॥ २ ॥ नेणती शीण योग यागीं । घेती जगीं हरिनाम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हरिनाम । उमेसी सांगे राम जप करी ॥ ४ ॥

१०८८ हरिवांचुनी ठाव रिता कोठें आहे । विचारुनी पाहें मनामाजीं ॥ १ ॥ सर्व तो व्यापक भरूनि उरला । वाउगाचि चाळा वाहूं नको ॥ २ ॥ एका जनार्दनीं भरूनि उरला । तो म्यां देखियेला विटेवरी ॥ ३ ॥

१०८९ नाम जनार्दन वाचे । भय नाहीं कळिकाळाचें । सार्थक जन्माचें । नाम गातां निश्चयें ॥ १॥ सोपा मंत्र जनार्दन । जग व्यापक परिपूर्ण । जन वन जनार्दन । एक रूप नाम घेतां ॥ २ ॥ एका शरण जनार्दनीं । जनार्दन एकपणीं । आदि मध्य अवसानीं । दाता एका जनार्दनीं ॥ ३ ॥

१०९० योगियां न कळे वर्म । कोणा साधे शुद्ध कर्म । न घडे दान आणि धर्म । वाउगा श्रम जाणिवेचा ॥ १ ॥ मुखें गाऊं नाम वाचे । ब्रह्मज्ञान पुढें नाचे । भय नाहीं पापियां दूतांचें । आम्हांसी ते सर्वथा ॥ २ ॥ ना करूं वाउग्या खटपटा । आगमनिगमांचा न घेऊं ताठा । वाउग्या त्या चेष्टा । नामाविण न करूं ॥ ३ ॥ योगयाग न करूं तीर्थाटन । सुखें गाऊं जनार्दन । एका जनार्दनीं भजन । मुख्य मंत्र सोपारा ॥ ४ ॥

१०९१ नाम तें ब्रह्म नाम तें ब्रह्म । नामापाशीं नाहीं कर्म विकर्म ॥ १ ॥ अवध्द पढतां वेद बाधी निषिध्द । अबध्द नाम रडतां प्राणी होती शुध्द ॥२॥ अबध्द मंत्र जपतां जापक चळे । अवध्द नाम जपतां जडमूढ उध्दरलें ॥ ३ ॥ स्वधर्म कर्म करी पडे व्यंग । विष्णुस्मरणें ते समूळ होय सांग ॥ ४ ॥ मनापाशीं नाहीं विधिविधान । आसनीं शयनीं भोजनीं नाम पावन ॥५॥ एका जनार्दनीं नाम निकटीं । ब्रह्मानंदीं भरली सृष्टी ॥ ६ ॥

१०९२ जगासी तारक हरि हा उच्चार । सर्व वेरझार खुंटे जेणें ॥ १ ॥ पाहतां ब्रह्मांडीं व्यापक तो हरी । सबाह्य अभ्यंतरीं भरलासे ॥ २ ॥ एका जनार्दनीं रिता ठाव कोठें । पुंडलीक पेठे उभा नीट ॥ ३ ॥

१०९३ श्रीगोविंदा मधुसूदना । ऐशा नामाचा करितां उच्चारणा । तुटताती यमयातना । नाना पातकियांच्या ॥ १ ॥ माना हाचि रे विश्वास । नामीं धरा दृढ वास । आणिक ते सायास । फोलकट न करावे ॥ २ ॥ योगयाग कसवटी । नको नको कोरडया गोष्टी । वांयांचि हिंपुटी । शिणती मूर्ख ॥३॥ शरण रिघा जनार्दनीं । एकपणें मन करूनी । एका जनार्दनीं ध्यानीं मनीं । चिंतन तें असों द्यावें ॥ ४ ॥

१०९४ कृष्णाविण दुजे नेणती काया वाचा । जाला पांडवांचा सहकारी ॥ १ ॥ वारिलें संकट भक्तांचा अंकित । धांवोनि त्वरित नाम घेतां ॥ २ ॥ भोजनाची आस न धरा मानसीं । धांवतो त्वरेसी नाम घेतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामाची आवडी । घालितसे उडी वैकुंठाहुनी ॥४॥

१०९५ हरिनाम भजन कल्लोळ जेथें सदा । नोहे तेथें बाधा विषयाची ॥ १ ॥ वेदशास्त्र देती ग्वाही । पुराणें तीहि बोलती ॥ २ ॥ नामस्मरणें निरसे भेद । तुटे समूळ कंद संसार ॥ ३ ॥ निरसे भोग दुःखव्याधी । तुटे उपाधी शरीर ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका म्हणे । नाम गाणें सतत ॥ ५ ॥

१०९६ जागृतीं स्वप्नीं आणि सुषुप्तीं । तिहीं अवस्थांत हरि म्हणतां मुक्ति ॥ १ ॥ ऐसें वेदशास्त्रें गर्जती । विवादतीं पुराणें ॥ २ ॥ नाम निरंतर मुखीं सदा । नोहे बाधा भौतिक ॥३॥ एका जनार्दनीं शरण । भुक्तिमुक्तीचें नाहीं कारण ॥ ४ ॥

१०९७ हरिस्मरणीं सावध व्हावें । स्वहित आपुलें विचारावें ॥ १ ॥ तरला प्रल्हाद आणि धुरू । उपमन्यु क्षीरसागरू ॥ २ ॥ एका जनार्दनीं छंद । अवघा भरला श्रीगोविंद ॥ ३ ॥

१०९८ मुखाचा व्यापार । करावा हरिनाम उच्चार ॥ १ ॥ पायांचा व्यापार । करावें तीर्थाटन निर्धार ॥२॥ हातांचा व्यापार । करावें दानधर्म सार ॥ ३ ॥ एका जनार्दनाचा निर्धार । मुखीं नामाचा उच्चार ॥ ४ ॥

१०९९ आवडीनें भावें हरिनाम गावें । सप्रेम नाचावें कीर्तनरंगीं ॥१॥ तरती तरती तरती संसार । आणिक विचार दुजा नाहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं भावाचें माहेर । तरिजे संसार क्षणमात्रें ॥ ३ ॥

११०० आठवावे हरीचे गुण । तेणें मना समाधान ॥ १ ॥ मग न जाय सैरावैरा । चुके जन्मांच्या वेरझारा ॥ २ ॥ एका जनार्दनीं ध्यान । सदा मनीं नारायण ॥ ३ ॥

११०१ सर्वकाळ आठवीं पाय । हाचि होय संकल्प ॥ १ ॥ नेणे कांहीं दुजी मात । जागृतीं स्वप्नांत हरिविण ॥ २ ॥ समाधी उन्मनीं आसनीं । शरण एका जनार्दनीं ॥ ३ ॥

११०२ नित्य वाचे वदे हरी । होय बोहरी महा पापा ॥ १ ॥ ऐसा पुराणींचा बोध । वाचे गोविंद आठवा ॥२॥ एका जनार्दनीं वेदवाणी । नारायणीं स्मरावें ॥ ३ ॥

११०३ नाहीं अटक काळ वेळ । सदा सोंवळें हरिनाम ॥ १ ॥ भलते वेळीं भलते काळीं । वाचे वदा नामावळी ॥ २ ॥ न लगे मुहूर्त अथवा योग । संकल्प सांग मनाचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नेम । सोपें नाम जपतां ॥ ४ ॥

११०४ नामाचे पोवाडे वर्णिती साबडे । हरिनामें बागडे रंगले ते ॥१॥ नामापरतें आन नेणती सर्वथा । साधन चळथा वांयां जाय ॥ २ ॥ नाम निजधीर मानुनी भरंवसा । गाती ते उल्हासा रात्रंदिन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ध्यानीं आणि मनीं । नाम संजीवनी जपतसे ॥ ४ ॥

११०५ अष्टांग साधन न करीं वाउगें । धूम्रपान वेगें कासया करिसी ॥१॥ मनीं हरि धरीं मना हरि धरीं । वाउगा तूं फेरीं पडों नको ॥२॥ साधन फुकट वाउगे ते कष्ट । वेगें धरीं हरि वरिष्ठ मनामाजीं ॥३॥ साधन साधितां शिणताती मुनी । तो हरि कीर्तनीं नाचतसे ॥ ४ ॥ सायास न लगे करावे ते कांहीं । एका जनार्दनीं पायीं बुडी दिली ॥ ५ ॥

११०६ साधकांसी साधतां ज्ञान । तंव आडवें येत मायाविघ्न ॥ १ ॥ म्हणोनि करा हरिचिंतन । तेणें तुटे भवबंधन ॥ २ ॥ सांडीं सांडी थोरपण । व्हावें लीन कीर्तनीं ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । सांडा अभिमान संतजनीं ॥ ४ ॥

११०७ सर्वांभूतीं सारखा भाव । येणें माया तरे जीव ॥ १ ॥ करितां अद्वैतपणें भक्ती । तेणें जीवा जीवन्मुक्ती ॥ २ ॥ हरिनाम भजनाच्या कल्लोळें । जीव घेउनी माया पळे ॥३॥ एक करितां हरिभक्ती । एका जनार्दनीं तृप्ती ॥ ४ ॥

११०८ असंख्य वचनें असोनी नसती । कोण तया रीती चालतसे ॥ १ ॥ प्रमाण अप्रमाण देहींचा निवाडा । केलासे उघडा श्रुतींशास्त्रीं ॥ २ ॥ हरि नाम वचन एकचि प्रमाण । हें तो अप्रमाण करील कोण ॥ ३ ॥ जनार्दनाचे वचनीं द्यावें अनुमोदन । एका जनार्दनीं प्रमाण तेंचि होय ॥ ४ ॥

११०९ आमुचें हेंचि साधन खरें । नाम बरें जनार्दन ॥ १ ॥ नाही भय आणि चिंता । जन्ममरण वार्ता विसरलों ॥ २ ॥ नाहीं येणें जाणें मरण धाक । अवघा एक जनार्दन ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं । जनार्दन जनीं वनीं ॥ ४ ॥

१११० आठवण तीहीच असो । वाचे वसो हरिनाम ॥ १ ॥ काया वाचा आणि मन । करूं कीर्तन धुमाळी ॥ २ ॥ धरूं वैष्णवांचा संग । टाकूं कुसंग लाजोनी ॥ ३ ॥ म्हणूं आम्ही हरीचे दास । एका जनार्दनीं निजदास ॥ ४ ॥

११११ मुखीं उच्चार हरिहर । करिताती निरंतर ॥ १ ॥ नित्य रामकृष्ण हरी । वदतसे पैं वैखरी ॥२॥ करिती देवाचें पैं ध्यान । वृत्ति झालीसे तल्लीन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । हेंचि पाववी निजधाम ॥ ४ ॥

१११२ महा मात्रा हरीचें नाम । तरती अधमादि अधम । हाचि कलिमाजीं धर्म । नामापरतें न देखे ॥ १ ॥ जगीं नाम तारक नौका । आन उपाय नाहीं देखा । साधन साधितां साधकां । नामापरतें थोर नाहीं ॥ २ ॥ धरा विश्वास बांधा गांठीं । नाम जपा जगजेठी । एका जनार्दनीं भय पोटीं । नाहीं तुम्हां काळाचें ॥ ३ ॥

१११३ टाकूनियां निंदा स्तुतीचें वचन । तया नारायण जवळीं आहे ॥ १ ॥ न लगे उपवास पारणें करणें । सुखें नारायण घरा येती ॥ २ ॥ ठायींच बैसोनि जपे नामावळी । पूर्व कर्मा होळी होय तेणें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धरितां पायीं भाव । रमेसह देव घरीं नांदे ॥ ४ ॥

१११४ सोपा मंत्र द्वादश अक्षरीं । वाचे जपे तूं निर्धारीं । अंतकाळीं हरी । न विसंबे तुजली ॥ १ ॥ धन्य धन्य मंत्रराज । तेणें साधिलें बहुकाज । आम्हां सांपडलें निज । वैकुंठभुवनाचें निर्धारें ॥ २ ॥ मन करीं गा बळकट । जपे वरिष्ठावरिष्ठ । एका जनार्दनीं घाट । सोपी मग सहजची ॥ ३ ॥

१११५ येणेंचि नामें तारिलें बहुतां । दोषी तो पुरता अजामेळ ॥१॥ गणिका आणि वाल्हा अजामेळ भिल्लणी । गोपाळ गौळणी तारियेल्या ॥ २ ॥ गजेंद्र तो पशु नाडितां जळचर । धांवे देव सत्वरें भक्तदासाठीं ॥ ३ ॥ प्रल्हादा संकट पडतां निवारी । चोखियाचें करी बाळंतपण ॥ ४ ॥ दामाजीचा महार होऊनियां ठेला । उणेंपण त्याला येवों नेदी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भक्तांचा अंकित । उभाचि तिष्ठत विटेवरी ॥ ६ ॥

१११६ देवाचें तें ध्यान । आठवावें रात्रंदिन ॥ १ ॥ मुगुट कुंडलें मेखळा । कांसे शोभे सोनसळा ॥ २ ॥ शंख चक्र गदा पद्म । सदा उदार मेघःश्याम ॥ ३ ॥ ऐसा हृदयीं आठवा । एका जनार्दनीं सांठवा ॥ ४ ॥

१११७ जयाचीं तीं अनंत नामें । अनंत अवतार अनंत जन्में ॥१॥ अगाध श्रीहरीचा महिमा । त्याचा पार नेणे ब्रह्मा ॥ २ ॥ अवतार चरित्र नामें । परिसतां निवारे कर्मे ॥३॥ जे जे अवतारीं देव सगुण । गाईले निर्गुणाचे गुण ॥ ४ ॥ धन्य धन्य ते भाग्याचे । हरिगुण वर्णिती वाचे ॥ ५ ॥ कांहीं सगुण निर्गुण ठाव । अवघा एकाचे देहीं देव ॥ ६ ॥ एकपणे वेगळा । एका जनार्दनीं देखिला ॥ ७ ॥

१११८ जगदात्मा श्रीहरि आनंदें पुजीन । अंतरीं करीन महोत्सव ॥ १ ॥ शांति सिंहासनीं बैसवीन भावें । वैराग्यें अवघे हाकारीन ॥ २ ॥ द्वैत विसरूनि करीन पादपूजा । तेणें गरुडध्वजा पंचामृत ॥ ३ ॥ शब्दोदक स्नान घालीन मानसीं । ज्ञानें स्वरूपासी परिमार्जन ॥ ४ ॥ सत्त्व क्षीरोदक देवा नेसवीन । राजस प्रावर्ण पीतांबर ॥ ५ ॥ दिव्य अलंकार तोडर साज्वळ । सहज स्थिती लेईल स्वामी माझा ॥ ६ ॥ भक्त नवविध घालूनि सिंहासन । एका जनार्दनीं पूजा करी ॥ ७ ॥

१११९ पूजिला श्रीपति एकविध भावें । होऊनि स्थिरावें हृदयामाजीं ॥१॥ करितसे घिनवणी प्रेमाचें अंजुळ । तेणें घननीळ तुष्टमान ॥२॥ एका जनार्दनीं सर्व भावें पूजन । जनीं जनार्दन पूजियेला ॥ ३ ॥

## हरिपाठ.

११२० हरीचिया दासां हरि दाही दिशा । भावें जैसा तैसा हरि एक ॥ १ ॥ हरि मुखीं गातां हरपली चिंता । त्या नाहीं मागुता जन्म घेणें ॥ २ ॥ जन्म घेणें लागे वासनेच्या संगें । तेचि झाली अंगें हरिरूप ॥ ३ ॥ हरिरूप झालें जाणणें हरपलें । नेणणें तें गेलें हरीचें ठायीं ॥ ४ ॥ हरिरूप ध्यानीं हरिरूप मनीं । एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

११२१ हरि बोला हरि बोला नाहीं तरी अबोला । व्यर्थ गलबला करूं नका ॥ १ ॥ नको नको मान नको अभिमान । सोडी मीतूंपण तोचि सुखी ॥ २ ॥ सुखी जेणें व्हावें जग निववावें । अज्ञानी लावावे सन्मार्गासी ॥३॥ मार्ग जया कळे भाव भक्तियळें । जगाचिये

मळें न दिसती ॥ ४ ॥ दिसती जनीं वनीं प्रत्यक्ष लोचनीं । एका जनार्दनीं ओळखिलें ॥ ५ ॥

११२२ ओळखिला हरि धन्य तो संसारीं । मोक्ष त्याचे घरीं सिध्दीसहित ॥ १ ॥ सिध्दि लावी पिसे कोण तया पुसे । नेणें राजहंसे पाणी कायी ॥ २ ॥ काय तें करावें संदेहीं निर्गुण । ज्ञानानें सगुण ओस केलें ॥ ३ ॥ केलें कर्म झालें तेंचि भोगा आलें । उपजले मेले ऐसे किती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाहीं यातायाती । सुखाची विश्रांती हरिसंगें ॥ ५ ॥

११२३ जें जें दृष्टी दिसे तें तें हरिरूप । पूजा ध्यान जप त्यासी नाहीं ॥ १ ॥ वैकुंठ कैलासीं तीर्थक्षेत्रीं देव । तयाविण ठाव रिता कोठें ॥ २ ॥ वैष्णवांचें गुह्य मोक्षाचा एकांत । अनंताचा अंत पाहतां नाहीं ॥ ३ ॥ आदि मध्य अंतीं अवघा हरि एक । एकाचि अनेक एक हरी ॥ ४ ॥ एकाकार झाले जीव तेचि दोन्ही । एका जनार्दनीं ऐसें केलें ॥ ५ ॥

११२४ नामाविण मुख सर्पाचें तें बीळ । जिव्हा नव्हे काळसर्प आहे ॥ १ ॥ वाचा नव्हे लांब जळो त्यांचें जिणें । यातना भोगणें यमपुरी ॥ २ ॥ हरीविण कोणी नाहीं सोडविता । पुत्र बंधु कांता संपत्तीचे ॥ ३ ॥ अंतकाळीं कोणी नाहीं या सांगाती । साधूचे संगती हरि जोडे ॥ ४ ॥ कोटिकुळें तारी हरि अक्षरें दोनी । एका जनार्दनीं पाठ केलीं ॥ ५ ॥

११२५ धन्य माय व्याली सुकृताचें फळ । फळ तें निर्फळ हरीविण ॥ १ ॥ वेदाचेंहि बीज हरि हरि अक्षरें । पवित्र सोपारें हेंचि एक ॥ २ ॥ योगयाग व्रत नेम धर्म दान । न लगे साधन जपतां हरी ॥ ३ ॥ साधनाचें सार नाम मुखीं गातां । हरि हरि म्हणतां कार्यसिध्दी ॥ ४ ॥ नित्य मुक्त तोची एक ब्रह्मज्ञानी । एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

११२६ बहुतां सुकृतीं नरदेह लाधला । भक्तीविण गेला अधोगती ॥ १ ॥ बाप भाग्य कैसें न सरेचि कर्म । न कळेचि वर्म अरे मूढा ॥ २ ॥ अनेका जन्मांचें सुकृत पदरीं । त्याचे मुखा हरि पैठा होय ॥ ३ ॥ राव रंक हो कां उंच नीच याती । भक्तीविण माती मुखीं त्याच्या ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हरि हरि म्हणतां । मुक्ति सायुज्यता पाठी लागे ॥ ५ ॥

११२७ हरिनामामृत सेवी सावकाश । मोक्ष त्याचे भूस दृष्टीपुढें ॥ १ ॥ नित्य नामघोष जयाचे मंदिरीं । तेचि काशीपुरी तीर्थक्षेत्र ॥ २ ॥ वाराणशी तीर्थ क्षेत्रा नाश आहे । अविनाशासी पाहे नाश कैंचा ॥ ३ ॥ एका तासामाजीं कोटि वेळां सृष्टी । होती जाती दृष्टी पाहे तोची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसे किती झाले । हरिनाम सेविलें तोचि एक ॥ ५ ॥

११२८ भक्तीविण पशू कशासी वाढला । सटवीनें नेला कैसा नाहीं ॥ १ ॥ काय माय गेली होती भूता-पाशीं । हरि नये मुखासी अरे मूढा ॥ २ ॥ पातकें करितां पुढें आहे पुसता । काय उत्तर देतां होशील तूं ॥ ३ ॥ अनेक यातना यम करवील । कोण सोड-वील तेथें तुजला ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सांगताहे तोंडें । आहा वांचा रडे बोलतांची ॥ ५ ॥

११२९ स्वहिताकारणें संगती साधूची । भावें भक्ति हरीची भेटी तेणें ॥ १ ॥ हरि तेथें संत संत तेथें हरी । ऐसें वेद चारी बोलताती ॥ २ ॥ ब्रह्मा डोळसा तें वेदार्थ नाकळे । तेथें हे आंधळे व्यर्थ होती ॥ ३ ॥ वेदार्थाचा गोवा कन्या अभिलाष । वेदें नाहीं ऐसें सांगितलें ॥ ४ ॥ वेदाचीं हीं बीजाक्षरें हरि दोनी । एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

११३० सत्पद तें ब्रह्म चित्पद तें माया । आनंद-पदीं जया म्हणती हरी ॥ १ ॥ सत्पद निर्गुण चित्पद सगुण । सगुण निर्गुण हरिपायीं ॥ ३ ॥ तत्सदिति ऐसें पैल वस्तुवरी । गीतेमाजीं हरि बोलियेले ॥ २ ॥ हरिपदप्राप्ति भोळ्यां भाविकांसी । अभिमानियांसी गर्भवास ॥ ४ ॥ अस्ति भाति प्रिय ऐशीं पदें तिनी । एका जनार्दनीं तेंचि झालें ॥ ५ ॥

११३१ नाकळे तें कळे कळे तें नाकळे । वळे तें नावळे गुरूविण ॥ १ ॥ निर्गुणीं पावले सगुणीं भजतां । विकल्प धारितां जिव्हा झडे ॥ २ ॥ बहुरूपी धरी संन्याशाचा वेश । पाहोन तयास धन देती ॥ ३ ॥ संन्याशाला नाहीं बहुरूपी याला । सगुणीं भजला तेथें पावे ॥ ४ ॥ अद्वैताचा खेळ दिसे गुणागुणीं । एका जनार्दनीं ओळखिलें ॥ ५ ॥

११३२ ओळखिला हरि सांठविला पोटीं । होतां त्याची भेटी दुःख कैंचें ॥ १ ॥ नर अथवा नारी हो कां दुराचारी । मुखीं गातां हरि पवित्र तो ॥ २ ॥ पवित्र तें कुळ धन्य त्याची माय । हरिमुखें गाय नित्य नेमें ॥ ३ ॥ काम क्रोध लोभ जयाचे अंतरीं । नाहीं अधिकारी ऐसा येथें ॥ ४ ॥ वैष्णवांचें गुह्य काढिलें निवडुनी । एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

११३३ हरि बोला देतां हरि बोला घेतां । हांसतां खेळतां हरि बोला ॥ १ ॥ हरि बोला गातां हरि बोला खातां । सर्व कार्य करितां हरि बोला ॥ २ ॥ हरि बोला एकांतीं हरि बोला लोकांतीं । देहत्यागा अंतीं हरि बोला ॥ ३ ॥ हरि बोला भांडतां हरि बोला कांडतां । उठतां बैसतां हरि बोला ॥ ४ ॥ हरि बोला जनीं हरि बोला विजनीं । एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

११३४ एक तीन पांच मेळा पंचविसाचा । छत्तीस तत्त्वांचा मूळ हरि ॥ १ ॥ कल्पना अविद्या तेणें झाला जीव । मायोपाधि शिव बोलिजे रवी ॥ २ ॥ जीव शिव दोनी हरिरूपीं तरंग । सिंधु तो अभंग नेणें हरि ॥ ३ ॥ शुक्तीवरी रजत पाहतां डोळां दिसे । रज्जूवरी भासे मिथ्या सर्प ॥ ४ ॥ क्षेत्रक्षेत्रज्ञाते जाणताती ज्ञानी । एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

११३५ कल्पनेपासुनी कल्पिला जो ठेवा । तेणें पडे गोंवा नेणें हरी ॥ १ ॥ दिधल्यावांचूनि फळप्राप्ति कैंची । इच्छा कल्पनेची व्यर्थ बापा ॥ २ ॥ इच्छावें तें जवळी हरीचे चरण । सर्व नारायण देतो तुज ॥ ३ ॥ न सुटे कल्पना अभिमानाची गांठी । घेतां जन्म कोटी हरि कैंचा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सांपडली खूण । कल्पना अभिमान हरि झाला ॥ ५ ॥

११३६ काय नपूंसका पद्मिणीचे सोहळे । वांझेसी डोहळे कैंचे होती ॥ १ ॥ अंधापुढें दीप खरासी चंदन । सर्पा दूधपान करूं नये ॥ २ ॥ क्रोधी अविश्वासी त्यासी बोध कैंचा । व्यर्थ आपुली वाचा शिणवूं नये ॥ ३ ॥ खळाची संगती उपयोगासी नये । आपणा अपाय त्याचे संगें ॥ ४ ॥ वैष्णवीं कुपथ्य टाकिलें वाळुनी । एका जनार्दनीं तेचि भले ॥ ५ ॥

११३७ न जायेचि ताठा नित्य खटाटोप । मंडुकीं वटवट तैसें ते गा ॥ १ ॥ प्रेमाविण भजन नाकाविण मोतीं । अर्थाविण पोथी वाचुनी काय ॥ २ ॥ कुंकुंवा नाहीं ठाव म्हणे मी आहेव । भावाविण देव कैसा पावे ॥ ३ ॥ अनुतापाविण भाव कैसा राहे । अनुभवें पाहे शोधूनियां ॥ ४ ॥ पाहतां पाहणें गेलें तें शोधुनी । एका जनार्दनीं अनुभविलें ॥ ५ ॥

११३८ परिमळ गेलिया वोस फूल देठीं । आयुष्या शेवटीं देह तैसा ॥ १ ॥ घडिघडि काळ वाट याची पाहे । अझूनि किती आहे अवकाश ॥ २ ॥ हाचि अनुताप घेऊनि सावध । कांहीं तरी बोध करीं मना ॥ ३ ॥ एक तास उरला खट्वांगरायासी । भाग्यदशा कैसी प्राप्त झाली ॥ ४ ॥ सांपडला हरि तयाला साधनीं । एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

११३९ करा रे बापांनो साधन हरीचें । झणीं करणीचें करूं नका ॥ १ ॥ जेणें नये जन्म यमाची यातना ऐसिया साधना करा कांहीं ॥ २ ॥ साधनांचें सार मंत्रबीज हरी । आत्मतत्त्व धरी तोचि एक ॥ ३ ॥ कोटि कोटि यज्ञ नित्य ज्याचा नेम । एक हरिनाम जपतां घडे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं न ध्यावा संशय । निश्चयेंसी होय हरिरूप ॥ ५ ॥

११४० बारा सोळाजणी हरीसी नेणती । म्हणोनि फिरती रात्रंदिवस ॥ १ ॥ सहस्र मुखांचा वर्णितां भागला । हर्ष जया झाला तेणें सुखें ॥ २ ॥ वेद जाणूं गेला पुढें मौनावला । तें गुह्य तुजला प्राप्त कैचें ॥ ३ ॥ पूर्व सुकृताचा पूर्ण अभ्यासाचा । दास सद्‌गुरूचा तोचि जाणे ॥ ४ ॥ जाणते नेणते हरीचे ठिकाणीं । एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

११४१ पिंडीं देहस्थिति ब्रह्मांडीं पसारा । हरीविण सारा व्यर्थ भ्रम ॥ १ ॥ शुक याज्ञवल्क्य दत्त कपिल मुनी । हरीसी जाणोनी हरिच झाले ॥ २ ॥ या रे या रे धरूं हरिनाम तारूं । भवाचा सागरू भय नाहीं ॥ ३ ॥ साधुसंत गेले आनंदीं राहिले । हरिनामें झाले कृतकृत्य ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मांडिलें दुकान । देतो मोलाविण सर्व वस्तु ॥ ५ ॥

११४२ आवडीनें भावें हरिनाम घेसी । तुझी चिंता त्यासी सर्व आहे ॥ १ ॥ नको खेद धरूं कोणत्या गोष्टीचा । पति तो लक्ष्मीचा जाणतसे ॥ २ ॥ सकळ जीवांचा करितो सांभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ ३ ॥ जैशी स्थिति आहे तैशापरी राहे । कौतुक तूं पाहें संचिताचें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भोग प्रारब्धाचा । तुज हरिकृपे त्याचा नाश झाला ॥ ५ ॥

११४३ दुर्बळाची कन्या समर्थानें केली । अवदशा निमाली दरिद्राची ॥ १ ॥ हरीकृपा होतां भक्त निघती दोंदें । नाचती स्वानंदें हरिरंगीं ॥ २ ॥ देव भक्त दोन्ही एकरूप झाले । मुळींचे संचले जैसे तैसे ॥ ३ ॥ पाजळली ज्योती कापुराची वाती । ओवाळितां आरती भेद नुरे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कल्पाचे मुराला । तोचि हरि झाला ब्रह्मरूप ॥ ५ ॥

११४४ मुद्रा ती पांचवी लाऊनियां लक्ष । तो आत्मा प्रत्यक्ष हरि दिसे ॥ १ ॥ कानीं जें ऐकिलें डोळां तें.

उगवलें। व्यापकें भरिलें तोचि हरी ॥ २ ॥ कर्म उपासना ज्ञानमार्गी झाले। हरिपाठीं आले सर्व मार्ग ॥ ३ ॥ नित्य प्रेमभावें हरिपाठ गाय। हरिकृपा होय तयावरी ॥ ४ ॥ झाला हरिपाठ बोलणें येथुनी। एका जनार्दनीं हरि बोला ॥ ५ ॥

## चिंतनमहिमा.

११४५ चिंतनें नासतसे चिंता। चिंतनें सर्व कार्य ये हातां। चिंतनें मोक्ष सायुज्यता। घर शोधितसे ॥ १ ॥ ऐसें चिंतनाचें महिमान। तारिले अधम खळ जन। चिंतने समाधान। प्राणिमात्रा होतसे ॥ २ ॥ चिंतने तुटे आधीव्याधी। चिंतने तुटतसे उपाधी। चिंतने होय सर्व सिध्दी। एका जनार्दनाचे चरणीं ॥३॥

११४६ चिंतने कंसासुर तरला। चिंतने पूतनेचा उध्दार केला। चिंतने आनंद जाहला। अर्जुनादिकांसी ॥ १ ॥ म्हणोनि करावें चिंतन। काया वाचा आणि मन। संतांचे चरण। नित्य काळ चिंतावे ॥ २ ॥ चिंतन आसनीं शयनीं। भोजनीं आणि गमनागमनीं। सर्वकाळ निजध्यानीं। चिंतन रामकृष्णाचें ॥ ३ ॥ चिंतन हेंची तप थोर। चिंतने साधे सर्व संसार। एका जनार्दनीं निर्धार। नामस्मरण चिंतनीं ॥ ४ ॥

११४७ हरे भवभय व्यथा चिंतने। दूर पळती नाना विघ्नें। कलीं कल्मष बंधनें। न बाधती चिंतनें ॥१॥ करा करा म्हणोनि लाहो। चिंतनाचा निर्वाहो। काळाचा तो विहो। दुर पळे चिंतने ॥ २ ॥ हीच माझी विनवणी। चिंतन करा रात्रंदिनी। शरण एका जनार्दनीं। रामनाम चिंतावें ॥ ३ ॥

११४८ चिंतन तें सोपें जगीं। रामकृष्ण म्हणा सत्संगीं। उणें पडों नेदी व्यंगीं। देव धांवे चिंतनें ॥१॥ चिंतन करितां द्रौपदी। पावलासें भलते संधीं। ऋषीश्वरांची मांदी। तृप्त केली क्षणमात्रें ॥२॥ चिंतनें रक्षिलें अर्जुना। लागों नेदी शक्तिबाणा। होऊनी अंकणा। रथारूढ बैसला ॥ ३ ॥ चिंतनें प्रल्हाद तारिला। जळीं स्थळीं सांभाळिला। एका जनार्दनीं भला। चिंतनाचा अंकित ॥ ४ ॥

११४९ चिंतनें बळीद्वारें बंधन। चिंतनें होय समाधान। न म्हणे उच्छिष्ट अथवा पूर्ण। चिंतनेंची मुख पसरी ॥१॥ चिंतनें भोळे भाविक जन। तयांचे वारी नाना विघ्न। धर्माघरीं उच्छिष्ट जाण। चिंतनासाठीं काढितसे ॥ २ ॥ चिंतनासाठीं सारथी जाहला। चिंतनासाठीं उभा ठेला। चिंतनेची गोंविला। पुंडलिकें अद्यापी ॥ ३ ॥ चिंतने उभा विटेवरी। न बैसे अद्यापि वरी। एका जनार्दनीं निर्धारी। चिंतन सोपें सर्वांत ॥ ४ ॥

११५० चिंतने धांवे भक्तांपाठीं। धरी कांबळी हातीं काठी। चिंतने उठाउठी। बांधवितो आपणिया ॥ १ ॥ ऐसा भुकेला चिंतनाचा। न पाहे यातीहीन उंचाचा। काय अधिकार शबरीचा। फळें काय प्रिय तीं ॥२॥ एका जनार्दनीं चिंतन। तेणें जोडे नारायण। आणिक न लगे साधन। कलीमाजीं सर्वथा ॥ ३ ॥

११५१ चिंतने गणिका निजपदा। चिंतने अजामेळ तोहि सदा। बैसविला आपुले पदा। चिंतनेची सर्वथा ॥ १ ॥ चिंतने उध्दरी सर्वथा। न म्हणे यातिकूळ कुपात्रा। चिंतने तारी सर्वत्रा। प्राणिमात्रा जगासी ॥ २ ॥ पुराणें डांगोरा पिटती। चिंतने उध्दार सर्व गती। न लगे नेम नाना युक्ति। नाम चिंता श्रीरामाचें ॥ ३ ॥ एवढें चिंतनाचें बळ। एका जनार्दनीं कृपाळ। यम काळ वंदी सकळ। नामचिंतनीं सर्वदा ॥ ४ ॥

११५२ चिंतनासी न लगे वेळ। कांहीं न लगे तया मोल। वाचे वदा सर्वकाळ। राम हरी गोविंद ॥ १ ॥ ह्याचि पुरे मंत्र सोपा। तेणें चुके जन्मखेपा। आणिक तें पापा। कधीं नुरे कल्पांतीं ॥ २ ॥ चौऱ्यांशीची न ये फेरी। एवढी चिंतनाची ही थोरी। सांडोनीं वेरझारी। का रे शिणतां बापुडीं ॥३॥ एका जनार्दनीं चिंतन। वाचे वदा परीपूर्ण। तेणें घडे कोटीयज्ञ। नाम चिंतन जपतां ॥ ४ ॥

११५३ चिंतनीं केला उध्दार। चिंतने तरले नारीनर। पशुपक्ष्यादि साचार। चिंतनेंची तारिले ॥ १ ॥ एवढी चिंतनाची थोरी। महा पापा होय बोहरी। यातीकुळाची वारी। कोण पुसे थोरीया ॥२॥ भुक्तिमुक्तीचें सांकडें। तयां न पडोचि बापुडें। चिंतनेची कोडें। सर्व हरे तयांचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन। दृढ ठेवावें बांधून। चिंतनेचि जाण। सर्व लाभ घडती ॥ ४ ॥

११५४ चिंतनें पर्वकाळ राशी। येती अपैशा घरासी। चिंतन तें सार सर्वांसी। व्रतांतपांसी चिंतन ॥ १ ॥ चिंतनें यज्ञ दान धर्म। चिंतनें घडे नाना नेम। आणिक तें धर्म। चिंतनें घडे सर्वथा ॥ २ ॥ चिंतने वेदशास्त्र पुराण। नाना मंत्र तंत्र पठण। नाना तीर्थांचें भ्रमण। चिंतनें होय ठायींच ॥३॥ ऐसा चिंतनमहिमा।

नाहीं आणिक उपमा । एका जनार्दनीं प्रेमा । चिंतनें चिंतिता ॥ ४ ॥

११५५ चिंतनें उद्धरला पापी । महा दोषी केला निःपापी । तया म्हणती ऋषि तपी । पुराणीं तें सर्व ॥ १ ॥ नारदें सांडोनिया मंत्र । केला जगीं तो पवित्र । चिंतना एवढें पात्र । आन नाहीं सर्वथा ॥ २ ॥ चिंतनें शुकादिक मुक्त । राजा जाहला परीक्षित । ऐसे अपार आहेत । चिंतनें मुक्त जाहले ते ॥ ३ ॥ चिंतनाची येवढी थोरी । गणिका नारी परव्दारी । वाचे उच्चारितां हरी । मोक्षधामीं बैसविली ॥ ४ ॥ चिंतनें हनुमंता समाधी । तुटोनि गेली आधिव्याधी । एका जनार्दनीं बुद्धि । चिंतनीच जडलीसे ॥ ५ ॥

११५६ चिंतनें बिभीषण मुक्त । चिंतनें जाहला जनक जीवन्मुक्त । चिंतनें कुळ सरित । सर्वभावें हरि होय ॥ १ ॥ आवडी चिंतावें चरण । दुजें नको मान-धन । नाम स्मरणावांचून । चिंतनचि नसो ॥ २ ॥ ऐसा एकविध भावें । चिंतन असो मनीं जीवें । एका जनार्दनीं देव । तया पाठीं धांवतसे ॥ ३ ॥

११५७ जाईन पंढरी । हेंचि चिंतन धरीं । मग तो श्रीहरी । नुपेक्षी भक्तातें ॥ १ ॥ धरूनि पहा विश्वास । नका आणिक सायास । पहातसे वास । चिंतनाची सर्वथा ॥ २ ॥ न धरीं माझें आणि तुझें । भार घाली पारे वोझें । एका जनार्दनीं दुजें । मग नाहीं तयातें ॥ ३ ॥

११५८ पंढरीस जावया । सदा हेत मानसीं जया । कळिकाळ वंदी पाया । तया हरिभक्तातें ॥ १ ॥ दृढ मनींच चिंतन । वाचे विठ्ठलाचि जाण । होतु कां कोटी विघ्न । परी नेम न टळे सर्वथा ॥ २ ॥ एका जना-र्दनीं भाव । नुपेक्षी तया देव । करूनि संसार वाव । निजपदीं ठाव देतुसे ॥ ३ ॥

११५९ देहीं न धरी जो आशा । चित्त पंढरी-निवासा । स्मरणाचा ठसा । रात्रंदिवस जयातें ॥ १ ॥ तोचि होय हरीचा दास । तेणें पुरती सर्व सायास । नाहीं आशापाश । चिंतनावाचुनी सर्वथा ॥ २ ॥ ध्यानीं मनीं नारायण । सदा सर्वदा हें चिंतन । एका जनार्दनीं मन । जडलेंसे हरिपायीं ॥ ३ ॥

११६० चिंतन तें हरिचरण । हेंचि कलीमाजीं प्रमाण । सर्व पुण्याचें फल जाण । नामस्मरण विठ्ठल ॥ १ ॥ मागें तरले पुढें तरती । याची पुराणीं प्रचिती । वेद शास्त्र जया गाती । श्रुतीहि आनंदें ॥ २ ॥ हेंचि सर्वांशीं माहेर । भूवैकुंठ पंढरपूर । एका जनार्दनीं नर । धन्य जाणा तेथींचे ॥ ३ ॥

११६१ चिंतन तें करी सदा । रामकृष्ण हरि गोविंदा ॥ १ ॥ हेंचि एक सत्य सार । वांया व्युत्पत्तीचा भार ॥ २ ॥ नको जप तप अनुष्ठान । वाचे वदे नारायण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । अवघा देहीं पाहे देव ॥ ४ ॥

## नाममहिमा.

११६२ ऐका नामाचें महिमान । नाम पावन तें जाण ॥ १ ॥ हास्य विनोदें घेतां नाम । तरती जन ते अधम ॥ २ ॥ एका जनार्दनीं धरीं विश्वास । नामें नासती दोष कळिकाळाचे ॥ ३ ॥

११६३ नामाचें महिमान सादर ऐका । तारियेले देखा महापापी ॥ १ ॥ पापाची ते राशी अजामेळ जाण । जपतांचि पावन नामें जाहला ॥ २ ॥ गणिका पांखिरुं नाम जपे सदा । नोहे तिसी बाधा गर्भवासा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कलीमाजीं नाम । उत्तम उत्तम जपा आधीं ॥ ४ ॥

११६४ दोषी पापराशी नामाचे धारक । होतां तिन्ही लोक वंदिती माथां ॥ १ ॥ नामाचें महिमान नामाचें महिमान । नामाचें महिमान शिव जाणे ॥२॥ जाणती ते ज्ञानी दत्त कपिल मुनी । शुकादिक जनीं धन्य जाहले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम परिपूर्ण । सांपडली खूण गुरुकृपें ॥ ४ ॥

११६५ नाम पवित्र आणि परिकर । नामें तरले दोषी अपार । नाम हेंचि निजसार । आधार वेदशास्त्रांचे ॥ १ ॥ तारक कलिमाजीं नाम । भोळ्याभाविकां सुगम । ज्ञाते पंडित सकाम । नामें तरती श्रीहरीच्या ॥ २ ॥ मनीं माझ्या ऐक गोष्टी । नाम जपें तूं सदा कंठीं । एका जनार्दनीं परिपाठीं । नाहीं गोष्टी दुसरी ॥ ३ ॥

११६६ नाम तें उत्तम नाम तें सगुण । नाम तें निर्गुण सनातन ॥ १ ॥ नाम तें ध्यान नाम तें धारणा । नाम तें हें जनां तारक नाम ॥ २ ॥ नाम तें पावन नाम तें कारण । नामापरतें साधन आन नाहीं ॥ ३ ॥ नाम ध्यानीं मनीं गातसे वदनीं । एका जनार्दनीं श्रेष्ठ नाम ॥ ४ ॥

११६७ नामाचा धारक। हरिहरां त्याचा धाक ॥१॥ ऐसें नाम समर्थ। त्रिभुवनीं तें विख्यात ॥ २ ॥ नामें यज्ञयाग घडती। नामें उत्तम लोकीं गती ॥ ३ ॥ नामें भुक्ति मुक्ति तिष्ठे। नामें वरिष्ठा वरिष्ठें ॥ ४ ॥ नामें सर्व सत्ता हातीं। नामें वैकुंठीं वसती ॥ ५ ॥ नामें होती चतुर्भुज। एका जनार्दनीं सतेज ॥ ६ ॥

११६८ अष्टादश पुराणें सांगती बडिवार। नाम साराचें सार कलियुगीं ॥ १ ॥ तारिले पातकी विश्वास घातकी। मुक्त झाले लोकीं तिहीं सत्य ॥२॥ सर्वांतर सार नाम जपूनिका। जनार्दनाचा एका घोकितसें ॥ ३ ॥

११६९ सकळ साधनांचें सार। मुखीं नामाचा उच्चार ॥१॥ सकळ तपांचें जें सार। मुखीं नामाचा उच्चार ॥२॥ सकळ ज्ञानांचें जें सार। मुखीं नामाचा उच्चार ॥ ३ ॥ सकळ ब्रह्म विद्येचें जें घर। एका जनार्दनीचें माहेर ॥ ४ ॥

११७० साधन सोपें नाम वाचे। पर्वत भंगती पापांचे। विश्वासियातें साचें। नाम तारक कलियुगीं ॥ १ ॥ अहोरात्र वदतां वाणी। ऐसा छंद ज्याचे मनीं। त्याचेनि धन्य ही मेदिनी। तारक तो सर्वांसी ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम। भाविकांचें पुरे काम। अभागियांतें वर्म। नव्हे नव्हे सोपारें ॥३॥

११७१ पशु पक्षी वनचरें। श्वान श्वापदादि सूकरें ॥ १ ॥ पडतां नाम घोष कानीं। पावन होती इये जनीं ॥ २ ॥ चतुष्पाद आणि तरूवर। नामें उध्दार सर्वांसी ॥ ३ ॥ उंच नीच नको याती। ब्राह्मणादि सर्व तरती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं अभेद। नामीं नाहीं भेदाभेद ॥ ५ ॥

११७२ नामामृतापुढें। कायसें अमृत बापुडें ॥ १ ॥ ऐसा नामाचा बडिवार। गोडी जाणे गिरिजावर ॥२॥ नामें जोडे ब्रह्मज्ञान। भुक्ति मुक्ति नामें जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सार। ब्रह्मज्ञानाचें हें घर ॥ ४ ॥

११७३ नाम पावन तिहीं लोकीं। मुक्त जाले महा पातकी ॥ १ ॥ नाम श्रेष्ठाचें हें श्रेष्ठ। नाम जपे तो वरिष्ठ ॥ २ ॥ नाम जपे नीलकंठ। वंदिताती श्रेष्ठ श्रेष्ठ ॥ ३ ॥ नाम जपे हनुमंत। तेणें अंगीं शक्तिवंत ॥ ४ ॥ नाम जपे पुंडलीक। उभा वैकुंठनायक ॥ ५ ॥ नाम ध्यानीं मनीं देखा। जपे जनार्दनीं एका ॥ ६ ॥

११७४ तारले नामें अपार जन। ऐसें महिमान नामाचें ॥ १ ॥ अधम तरले नवल काय। पाषाण ते पाहें तारियले ॥ २ ॥ दैत्यदानव ते राक्षस। नामें सर्वांस मुक्तिपद ॥३॥ एका जनार्दनीं नाम सार। जपा निरंतर हृदयीं ॥ ४ ॥

११७५ नामें पावन हीन याती। नाम जपतां अहो रात्रीं। नामापरती विश्रांती। दुजी नाहीं प्राणियां ॥१॥ नका भ्रमूं सैरावैरा। वाउगें तप साधन पसारा। योग याग अवधारा। नामें एका साधतसे ॥ २ ॥ व्रत तप हवन दान। नामें घडे तीर्थ स्नान। एका जनार्दनीं मन। स्थिर करूनि नाम जपा ॥ ३ ॥

११७६ अनामिकादि चांडाळ। नामें सकळ तारिले ॥ १ ॥ ब्रह्महत्या पापराशी। नामें वैकुंठवासि पावले ॥ २ ॥ दुराचारी व्यभिचारी। गणिका नारी तारिली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम। मंगळधाम मंगला ॥ ४ ॥

११७७ नाम तारक ये मेदिनी। नाम सर्वांचें मुगुटमणी। नाम जपे शूळपाणी। अहोरात्र सर्वदा ॥१॥ तें हें सुलभ सोपारें। कामक्रोध येणें सरे। मोह मद मत्सर। नुरे नाममात्रें त्रिजगतीं ॥ २ ॥ घेउनी नामाचें अमृत। एका जनार्दनीं झाला तृप्त। म्हणोनि सर्वांतें सांगत। नाम वाचे वदावें ॥ ३ ॥

११७८ नाम तारक हें क्षितीं। तरले आणि पुढें तरती ॥ १ ॥ न लगे साधन मंडण। नामें सर्व पापदहन ॥ २ ॥ योगयागांची परवडी। नामापुढें वांया गोडी ॥ ३ ॥ नाम वाचे आवडी घोका। म्हणे जनार्दनीं एका ॥ ४ ॥

११७९ नाम पावन पावन। नाम दोषांसि दहन। नाम पतीतपावन। कलीमाजीं उद्धार ॥ १ ॥ गातां नित्य हरिकथा। पावन होय श्रोता वक्ता। नाम गाऊनि टाळी वाहतां। नित्य मुक्त प्राणी तो ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम। भवसिंधु तारक नाम। सोपें सुगम वर्म। भाविकांसी निर्धारें ॥ ३ ॥

११८० नाम गाये तो पवित्र क्षितीं। नामें उध्दार त्रिजगतीं ॥ १ ॥ ज्याचें उच्चारितां नाम। निवारे क्रोध आणि काम ॥ २ ॥ वेदशास्त्र विवेकीसंपन्न। नामें होताती पावन ॥ ३ ॥ नामें उत्तम अधमा गती। एका जनार्दनीं ध्याय चित्तीं ॥ ४ ॥

११८१ नाम हें पावन नाम हैं पावन। दुजा ठाव आन नाहीं येथें ॥ १ ॥ देखणाही झाला देखणाही

झाला । देखणाही झाला अंधत्वेसी ॥ २ ॥ द्वैत अद्वैत गेलें नेणें हारपलें । जाणणें तें गेलें जाणते ठायीं ॥३॥ एका जनार्दनीं नाम तें अनाम । सर्वोत्तम नाम सर्वां ठायीं ॥ ४ ॥

११८२ दोष दुरितांचे पाळें । पळती बळें नाम घेतां ॥ १ ॥ नाम प्रताप गहन । भवतारण हरिनाम ॥ २॥ आणीक नको दुजी चाड । नाम गोड विठ्ठल ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । तरले तरती निष्काम ॥ ४ ॥

११८३ नामें पावन इये लोकीं । नामें पावन परलोकीं । नाम सदा ज्याचे मुखीं । धन्य तो नर संसारीं ॥ १ ॥ नामें कलिमल दहन । नाम पतीतपावन । नाम दीनोध्दारण । नाम जनार्दन वदतां ॥२॥ नाम गातां सुख वाटे । प्रेमें प्रेम तें कोंदाटें । एका जनार्दनीं भेटे । नाम गातां निश्चयें ॥ ३ ॥

११८४ नामें घडे निज शांति । तेथें वसे भुक्ति मुक्ति । नाम तारक त्रिजगतीं । दृढभावें आठवितां ॥ १ ॥ म्हणोनि घेतलासे लाहो । रात्रंदिवस नाम गावो । कळिकाळाचें भेवो । सहज तेथें पळतसे ॥ २ ॥ मज मानला भरंवसा । नामीं आहे निजठसा । एका जनार्दनीं सर्वेशा । नाम जपे अंतरीं ॥ ३ ॥

११८५ नाम प्राप्त नित्यानंद । नामें होय परम पद। नामें निरसे भवकंद । नाम तारक निर्धार ॥ १ ॥ हेंचि मना दृढ धरीं । वांया नको पडूं फेरी । तेणें होसी हाव भरी । मग पतनीं पडशील ॥२॥ म्हणे एका जनार्दन । नामें तरती अधम जन । नामें होय प्राप्त पेणें । वैकुंठाचि निर्धारें ॥ ३ ॥

११८६ नामें तारिले पातकी । नाम थोर तिहीं लोकीं । नामें साधे भुक्ति मुक्ती । नाम कलीं तारक ॥ १ ॥ नको जाऊं वनांतरीं । रानीं वनीं आणि डोंगरीं । बैसोनियां करीं । स्थिर चित्त निमग्न ॥२॥ नामें साधलें साधन । तुटलें बहुतांचें बंधन । एका जनार्दना शरण । नाम वाचे उच्चारी ॥ ३ ॥

११८७ जितुका आकार दिसत । नाशिवंत जात लया ॥ १ ॥ एक नाम सत्य सार । वाउगा पसार शीण तो ॥ २ ॥ नामें प्राप्त ब्रह्मपद । नामें देह होय गोविंद ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । सर्व निरसे क्रोधकाम ॥ ४ ॥

११८८ सदा नामें घडे आचार । नामें साधे सर्व विचार । नाम पवित्र परिकर । सादर वदनीं घेतां ॥१॥ शुद्ध वैराग्य घडे नामीं । तप तीर्थ घडे निष्कामीं । दान धर्म पुण्यपावन इये धर्मीं । नाम वाचे आठवितां ॥२॥ नामें साधे अष्टांग पवन । नामें साधे पंचाग्नि धूम्रपान । नामें एका जनार्दनीं भजन । नामें पावन देह होय ॥ ३ ॥

११८९ परेसी न कळे पार । पश्यंतीसी निर्धार । मध्यमा तो स्थिर वैखरीये ॥ १ ॥ चहूं वाचा कुंठीत । ऐसें नाम समर्थ । आम्ही गाऊं सदोदित । सोपें नाम ॥ २ ॥ ऋध्दिसिध्दि धांवे पायीं । मुक्तीसी तो अवसर नाहीं । भुक्तीचा तो उपाय कांहीं । हरिदास ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । भावेंचि तुष्टे देव । आणीक नको उपाव । नाम स्मरे ॥ ४ ॥

११९० श्रुतीशास्त्रांचा आधार । पुराणांचा परिकर । दरुशनें सांगती बडिवार । वाचे नाम उच्चारा ॥ १॥ तारक जगीं हें नाम । जपतां निष्काम सकाम। पावे स्वर्ग मोक्ष धाम । कलिमाजीं प्रत्यक्ष ॥ २ ॥ म्हणोनि धरिलें शिवें कंठीं । तेणें हळाहळ शमलें पोटीं । एका जनार्दनीं गुह्य गोष्टी । गिरजेप्रति अनुवाद ॥ ३॥

११९१ वेदांचा संवाद श्रुतींचा अनुवाद । नामाचा मकरंद पुराण वदे ॥ १ ॥ शास्त्रांचें मत नामाचा इतिहास । यापरती भाष नाहीं नाहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं संतांचें हें मत । नामें तरती पतित असंख्यात ॥ ३ ॥

११९२ कष्ट न करितां योग्य जरी साधी । श्रम ते उपाधी वाउगी कां बा ॥ १ ॥ नाम तें सोपें श्रम नाहीं कांहीं । उच्चारितां पाही सर्व जोडे ॥२॥ एका जनार्दनीं नको योगयाग । म्हणावा श्रीरंग वाचे सदा ॥ ३ ॥

११९३ योगयाग तप व्रतें आचरितां । नाम सोपें गातां सर्व जोडे ॥ १ ॥ पाहोनियां प्रचीत नाम घे अनंत । तुटे नाना घात जपे नाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं नामाचा महिमा । वर्णितां उपरमा शेष आला ॥ ३ ॥

११९४ करितां साधनांच्या कोटी । नामाहूनि त्या हिंपुटी ॥ १ ॥ नाम वाचे आठवितां । साधनें सर्व येती हातां ॥ २ ॥ नामापरतां दुजा मंत्र । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । शुध्द चैतन्य निष्काम ॥ ४ ॥

११९५ नाम श्रेष्ठ तिहीं लोकीं । म्हणोनि शिव नित्य घोकी ॥ १ ॥ सदा समाधी शयनीं । राम चिंती ध्यानीं मनीं ॥ २ ॥ अखंड वैराग्य बाणलें अंगीं । म्हणोनि

वंद्य सर्वां जगीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाचे । नाम वदे सर्वदा साचे ॥ ४ ॥

११९६ काळिकाळा नाहीं बळ । नाम जपे तो सबळ ॥ १ ॥ ऐसें नाम सदा जपे । काळिकाळा घाली खेपे ॥ २ ॥ हरीचिया दासा साचें । भय नाहीं काळिकाळाचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं काळ । काळ होय तो कृपाळ ॥ ४ ॥

११९७ जेणें नाम धरिलें कंठीं । धांवे त्याच्या पाठीं पोटीं ॥ १ ॥ नाम गातां जनीं घनीं । आपण उभा तेथें जाउनी ॥ २ ॥ नामासाठीं मागें धांवे । इच्छिलें तेणें पुरवावें ॥ ३ ॥ यातीकुळ तयाचें । न पाहे कांहीं साचें ॥ ४ ॥ वर्णाची तों चाड नाहीं । नाम गातां उभा पाही ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भोळा । नामासाठीं अंकित जाला ॥ ६ ॥

११९८ आपुल्या नामाची आवडी । वैकुंठाहुनी घाली उडी । वारी भक्तांचीं सांकडीं । नामासाठीं आपुल्या ॥१॥ ऐसा नामाचा पोवाडा । नाम उच्चारा घडघडा । तेणें निवारे यमपीडा । साचपणें भक्तांची ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम । सोपें सोपें हो सुगम । तरावया आन नाहीं धाम । नामावांचुन सर्वथा ॥३॥

११९९ एका नामासाठीं । प्रगटतसे कोरडे काष्ठीं । भक्तवचनाची आवडी मोठी । होय जगजेठी अंकित ॥ १ ॥ एका घरीं उच्छिष्ट काढणें । एका द्वारीं द्वारपाळपण करणें । एका घरीं गुरें राखणें । लोणी खाणें चोरुनी ॥ २ ॥ एकाची उगेचि धरुनी आस । उभा राहे युगें अठ्ठावीस । एका जनार्दनीं त्याचा दास । नामें आपुल्या अंकित ॥ ३ ॥

१२०० आपुल्या नामा आपण वाढवी । भक्तपणा स्वयें मिरवीं । अवतार नाना दावीं । लाघव आपुलें ॥ १ ॥ करी भक्तांचें पाळण । वाढवी त्यांचें महिमान । तयासी नेदी उणीव जाण । वागवी ब्रीद नामाचें ॥ २ ॥ करी नीच काम नाहीं थोरपण । खाय भाजीचें आनंदें पान । तृप्त होय एका जनार्दन । तेणें समाधान होतसे ॥ ३ ॥

१२०१ विचारितां तुज नामची नसे । नामरूपीं तुझें स्वरूप भासे ॥ १ ॥ नाम आरामता पाउनी पठण । यापरी स्मरिजे या नांव पठण ॥ २ ॥ गर्जत नामीं जो जो शब्द उठी । शब्दानुशब्दा पडतसे मिठी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नित्य स्मरे नाम । नामरूप जाला आत्माराम ॥ ४ ॥

१२०२ नाम घेतां हे वैखरी । चित्त धांवे विषयावरी ॥ १ ॥ कैसें होता हें स्मरण । स्मरणामाजीं विस्मरण ॥ २ ॥ नामरूपा नव्हता मेळ । नुसता वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं छंद । बोलामाजीं परमानंद ॥ ४ ॥

१२०३ शुकादिक योगी रंगले श्रीरंगीं । नाम पवित्र जगीं जपा आधीं ॥ १ ॥ साधनें साधितां कष्ट होती जीवा । नाम सोपें सर्वां गोड गातां ॥ २ ॥ परंपरा नाम वाचे तें सुगम । सनकादिक श्रम न करिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम तें पावन । वाचे उच्चारितां जाण श्रम हरे ॥ ४ ॥

१२०४ वेदांचें वचन शास्त्रांचें अनुमोदन । पुराणीं कथन हेंचि केलें ॥ १ ॥ कलियुगामाजीं नाम एक सार । व्यासाचा निर्धार वचनोक्ती ॥ २ ॥ तरतील येणें विश्वासी जे नर । तत्संगें दुराचार उद्धरती ॥३॥ एका जनार्दनीं ऐसा हा अनुभव । प्रत्यक्ष सांगे देव उध्दवासी ॥ ४ ॥

१२०५ नामेंचि तरले नामेंचि तरले । जडजीव उध्दरिले कलियुगीं ॥१॥ ऐसें नाम समर्थ नाम विख्यात । नामेंचि पवित्र नरनारी ॥ २ ॥ पापांचे पर्वत नामाग्नीनें शांत । येरा कोण मात नामापुढें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तारक हें नाम । पावती निजधाम गातां वाचे ॥४॥

१२०६ चांडाळादि तरले । महादोषी उध्दरले ॥ १ ॥ नाम पावन पावन । नामापरतें थोर कोण ॥ २ ॥ नामाग्नीनें न जळे । ऐसे दोष नाहीं केले ॥ ३ ॥ वाल्मिक म्हणती दोषी । नाम उच्चारितां वंद्य सर्वांसी ॥ ४ ॥ अजामेळ गणिका । नामें दोष भंगिले देखा ॥ ५ ॥ एका जनार्दनीं नाम जाण । शस्त्र निर्वाणीचा बाण ॥ ६ ॥

१२०७ एकाचि नाम उच्चारिलें । गणिके नेलें निजपदीं ॥ १ ॥ नाम घोकी कोळी वाल्हा । दोष जाहला संहारा ॥ २ ॥ नामें परीक्षिती उध्दरिला । मुक्त जाहला सर्वार्थी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । भवतारक निष्काम ॥ ४ ॥

१२०८ नाम एक उच्चारितां । गणिका नेली वैकुंठ पंथा । नामें पशू तो तत्त्वतां । उध्दरिला गजेंद्र ॥ १॥ ऐसा नामाचा बडिवार । जगीं सर्वांसी माहेर । नामापरतें थोर । योगयागादि न होती ॥ २ ॥ नामें तरला कोळी वाल्हा । करा नामाचा गलबला । नामें एका जनार्दनीं धाला । कृतकृत्य झाला संसार ॥ ३ ॥

१२०९ उत्तम अथवा चांडाळ । अधम खळाहुनी खळ ॥ १ ॥ तेही तरले एका नामें । काय उपमे आन देऊं ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम । गातां सकाम मुक्ति जोडे ॥ ३ ॥

१२१० अवघ्या लोकीं जाहलीं मात । नामें पतीत तरती ॥ १ ॥ तोचि घेउनी अनुभव । गाती वैष्णव नाम तें ॥ २ ॥ तेणें त्रिभुवनीं सत्ता । उध्दरती पतिता अनायासें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गाजली हांक । नाम दाहक पापांसी ॥ ४ ॥

१२११ नित्य काळ वाचे जया नाम छंद । तयासी गोविंद मागें पुढें ॥ १ ॥ घात आघात निवारीत । छाया पीतंबरी करीत ॥ २ ॥ ऐसा भक्तांचा अंकीत । राहे उभाची तिष्ठत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेध । वेधामाजीं परमानंद ॥ ४ ॥

१२१२ भाग्याचें भाग्य धन्य ते संसारीं । सांठविती हरी हृदयामाजीं ॥१॥ धन्य त्याचें कूळ धन्य त्याचें कर्म । धन्य त्याचा स्वधर्म नाम मुखा ॥ २ ॥ संकटीं सुखांत नाम सदा गाय । न विसंबे देवराय क्षण एक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धन्य त्यांचें दैव । उभा स्वयमेव देव घरीं ॥ ४ ॥

१२१३ भाग्याचे ते नारीनर । गाती निरंतर मुखीं नाम ॥१॥ धन्य धन्य त्यांचा जन्म । सुफळ सर्व कर्म धर्म ॥ २ ॥ उपासना त्यांची निकी । सदा नाम गातीं मुखीं ॥ ३ ॥ नामापरतें आन । त्यासी नाहीं पैं साधन ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम गाय । त्यांचे वंदितसे पाय ॥ ५ ॥

१२१४ जयामुखीं नाममंत्र । तया जग हें पवित्र ॥ १ ॥ नाम वदे ज्याची वाचा । देव हृदयीं वसे साचा ॥ २ ॥ नामीं प्रीति अखंड ज्यासी । मोक्ष तया करीं वसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । हेंचि चैतन्य निजधाम ॥ ४ ॥

१२१५ अवचट दैवयोगें नाम येत मुखा । त्रैलोक्याचा सखा प्राणी होय ॥ १ ॥ आवडी आदरें उच्चारी जो नाम । वैकुंठ निजधाम तया सुख ॥ २ ॥ एका जनार्दनीं नामाची ही थोरी । होतसे बोहरी केली पापा ॥ ३ ॥

१२१६ अमृत तें स्वर्गीं निर्जर सेविती । परी चरफडती नामामृता ॥ १ ॥ धन्य ते दैवाचे नाम घेती वाचे । होतें पैं जन्माचें सार्थक तेणें ॥ २ ॥ न लगे उपवास करणें अष्टांग । न लगे नानायोग साधनें तीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामामृत सार । उतरले पैलपार वैष्णव जन ॥ ४ ॥

१२१७ कलियुगीं नाम तारक । दुजें होय दुःखदायक ॥ १ ॥ पहा अनुभवो मना । नाम भवनदी नौका जाणा ॥ २ ॥ अठरा वर्ण याती । नामें पावनचि होती ॥ ३ ॥ न करा आळस क्षणभरी । एका जनार्दनीं निर्धारी ॥ ४ ॥

१२१८ नरदेहीं आलिया मुखीं नाम गाय । वायां आयुष्य न जाय ऐसें करीं ॥ १ ॥ प्रपंचमृगजळीं गुंतूं नको वायां । कन्या पुत्रादिक या सुख नोहे ॥ २ ॥ रोडिरे धाडिरे वायांचि हांवभरी । पाडिती निर्धारीं भोंवरजाळीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संसाराचा छंद । वायां मतिमंद भुललासे ॥ ४ ॥

१२१९ प्राणी गुंतले संसारश्रमा । न कळे महिमा नामाचा ॥ १ ॥ नामें तरले पातकी । मुक्त जाले तिन्ही लोकीं ॥२॥ व्यास शुकादिक पावन । नामेंचि पावले बहुमान ॥३॥ वाल्हा कोळी अजामेळ । गणिका दीन हा चांडाळ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम पावन । पातकी उध्दरीले परीपूर्ण ॥ ५ ॥

१२२० असोनि उत्तम कुळीं । नाम नाहीं ज्याचे कुळीं ॥ १ ॥ जन्मोनी अधम कुळीं । सदा जपे नामावळी ॥२॥ कुळासी तो नाहीं काज । नाम वदतांचि निज ॥ ३ ॥ नाम पावन हे जनीं । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१२२१ यातीसी नाहीं कारण । नामस्मरण हरीचें ॥ १ ॥ तेणें तराल भवपार । आणिक विचार न करा ॥ २ ॥ मागां पहा अनुभव । तारिले जीव निर्जिव ॥ ३ ॥ स्त्रिया शूद्र नारी नरा । नामें निर्धारा मुक्तिपद ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम । जपा विश्रामदायक ॥ ५ ॥

१२२२ उंच नीच नाहीं नामाचिया पुढें । जातीचें तें गाढें नाहीं काम ॥ १ ॥ अनामिकाहुनी असोत चांडाळ । परी नामाचा उच्चार मुखीं वसो ॥ २ ॥ यवनादि नीच असोत भलते । परी नाम सर्वदा तें मुखीं वसो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम वसो मुखीं । तेणें तो तिहीं लोकीं सरता होय ॥ ४ ॥

१२२३ प्राणियां उध्दार नाम मुखीं गातां । येरा तें करिता वांयां जाय ॥ १ ॥ पालथी घागरी घालितां

वाउगी । नामाविण जगीं शीण तैसा ॥ २ ॥ अमृत-सागरीं राहुनी कोरडा ! नाम धडपुडा नेघे प्राणी ॥ ३ ॥ नाम संजीवनी भरलीसे जनीं वनीं । एका जनार्दनीं तारक जगा ॥ ४ ॥

१२२४ भवसिंधु तराया नाम हे नौका । उतार ते लोकां सोपा केला ॥ १ ॥ न घडे न घडे आणिक साधन । नाम पंचानन नाम पुरे ॥ २ ॥ क्षणीक आयुष्य न घडे जप तपें । नाम गातां सोपें सर्व साधे ॥ ३ ॥ मंत्र तंत्र हवन नोहे विधियुक्त । तैं होत अपघात शरिराचा ॥४॥ एका जनार्दनीं तैसें नोहे नाम । तारक निजधाम प्राणिमात्रां ॥ ५ ॥

१२२५ नामीं धरा दृढ विश्वास । घाला कळिकाळावर फास । नाम हाचि निजध्यास । रात्रंदिवस स्मरण ॥ १ ॥ सोपें वर्म कलिमाजीं । नामें तरती जन सहजीं । योगयाग तप साधनें जीं । तया प्राप्ति नामेंची ॥ २ ॥ नाम साधनांचें सार । सोपा मंत्र हरि उच्चार । एका जनार्दनीं सार । निवडोनि काढिलें ॥ ३ ॥

१२२६ शम दम साधन । नामावांचून न करीं जाण ॥ १ ॥ नाम गावें नाम गावें । वेळोवेळां नाम गावें ॥ २ ॥ नामावांचूनी साधन नाहीं । ऐसी वेद-शास्त्रें देती ग्वाही ॥ ३ ॥ मज भरंवसा नामाचा । एका जनार्दनीं म्हणे वाचा ॥ ४ ॥

१२२७ एका नामावांचून । अवघा शीण भ्रामक ॥ १ ॥ कां रे हिंडसी सैरावैरा । तपाचिया गिरी-कंदरा ॥ २ ॥ बैससी घालूनि आसन । मना मुळीं वाउगें ध्यान ॥ ३ ॥ दाविसी तें अवघें सोंग । एका जनार्दनीं नाहीं रंग ॥ ४ ॥

१२२८ दंभ मान हीं उपाधी । निरसेल आधि-व्याधी । नामें जोडे सर्व सिद्धी । धन्य जगीं नाम तें ॥ १ ॥ उच्चारितां वडघडा । माया तृष्णा पळती पुढा । ऐसा नामाचा पोवाडा । ब्रह्मादिकां अतर्क्य ॥ २ ॥ आगमनिगमांचें ज्ञान । नामें साधे वैराग्य निधान । एका जनार्दनीं पावन । नाम जाण निर्धारें ॥३॥

१२२९ नाम मुखीं गातां विषयाची वार्ता । नोहेचि सर्वथा गातीयासी ॥ १ ॥ नाम तें पावन नाम तें पावन । नामावांचूनि जाण श्रेष्ठ कोण ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम तें पावन । त्रिभुवनीं मंडन नाम सत्य ॥ ३ ॥

१२३० नामस्मरण अहो जना । तेणें तुटे भवबंधना । येचि देहीं येचि काळीं । भजीजे रे नाम जाण ॥ १ ॥ ध्रुव अजामेळ गणिका । नाममात्रें तारिले देखा । आणिकहि भक्त देखा । मोक्ष पावले नामें एका ॥२॥ जो जो कोणी प्रेमें भजतां । पाविजेल सायुज्यता । ऐशी भाक घे रे आर्ता । जप तप नाम स्मरतां ॥ ३ ॥ दीनबंधु दयासिंधु । जेणें केला परमानंदु । दुष्ट जना करी भेदु । एका जनार्दनीं नित्यानंदु ॥४॥

१२३१ नामापाशीं तिष्ठे देव । नामापाशीं वसे भाव । नामापाशीं मुक्ति गौरव । अहर्निशीं वसतसे ॥१॥ नामापाशीं ऋद्धिसिध्दी । नामापाशीं ते समाधी । नामें तुटती उपाधी । जन्मोजन्मींच्या ॥ २ ॥ नामापाशीं भुक्ति मुक्ति । नामापाशीं ते विरक्ती । नामें पातकें नासती । बहु जन्मांचीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । गातां निरसे भवभ्रम । साधन उत्तम कलियुगामाझारीं ॥ ४ ॥

१२३२ असोनि दुराचारी । मुखा गाय नित्य हरी ॥ १ ॥ तयाचे नमस्कारावे चरण । धन्य जगीं तो पावन ॥ २ ॥ वाचे सदा गाय नाम । तोचि पावे निजधाम ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं । तोचि पवित्र त्रिभुवनीं ॥ ४ ॥

१२३३ राजाला आळस संन्याशाला सायास । विधवेसी विलास विटंबना ॥ १ ॥ व्याघ्रासी शांतता गाईसी उग्रता । वेश्येसी हरिकथा विटंबना ॥ २ ॥ दानेंविण पाणी । घ्राणेंविण घाणी । नामेंविण वाणी विटंबना ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावभक्तीविना । पुण्य केलें नाना विटंबना ॥ ४ ॥

१२३४ आपुलें कल्याण इच्छिणें जयासी । तेणें या नामासी विसंबूं नये ॥१॥ करील परिपूर्ण मनींचे हेत । ठाविलिया चित्त नामापाशीं ॥ २ ॥ भुक्ति आणि मुक्ति वोळंगती सिध्दी । होईल कीं वृध्दी आत्मनिष्ठ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जपतां हें नाम । पुरवील काम जो जो हेतु ॥ ४ ॥

१२३५ मुळींचें आहे संतवचन । नामस्मरणें तरती जन ॥ १ ॥ तोचि आधार धरूनी पोटीं । बोलतों नेहटीं भाविकां ॥ २ ॥ अवघ्या यातीसी उध्दार । न लगे श्रम करा नामोच्चार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्वापार । नामाचा वडिवार बोलती ॥ ४ ॥

१२३६ आनंदें निर्भर नाम गावें वाचे । तेणें कळिकाळाचें भय नाहीं ॥१॥ नामाचें सामर्थ्य कळिकाळ

वंदी माथां । मुक्ति सायुज्यता पाठी लागे ॥ २ ॥ यज्ञ योग जप तप नामें सर्व सिध्दी । वांयां तूं उपाधीं गुंतूं नको ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम भवाचें तारक । निश्चयेसी देख गाये वाचे ॥ ४ ॥

१२३७ जयाचें देखतां चरण । तुटेल जन्म जरा मरण ॥ १ ॥ तो हा चंद्रभागेच्या तीरीं । कट धरूनियां करीं ॥ २ ॥ नाम घेतां आवडीं । तुटेल संसाराची बेडी ॥ ३ ॥ भाविकांसी पावे । मागें मागें त्यांच्या धांवे ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । आवडीनें नाम घोका ॥ ५ ॥

१२३८ प्रेमयुक्त नाम आदरें घेतां । तेथें नाहीं सुखदुःखवार्ता ॥ १ ॥ नामीं धरुनी आवडी । उच्चारावें घडोघडी ॥ २ ॥ योगयाग तपसाधन । नाम उच्चारितां संपूर्ण ॥ ३ ॥ ऐसा नामीं निजध्यास । एका जनार्दनीं त्याचा दास ॥ ४ ॥

१२३९ मुखीं नाम हातें टाळी । साधन कलीं उत्तम हें ॥ १ ॥ न घडे योगयाग तप । नाहीं संकल्प दुसरा ॥ २ ॥ संतापायीं सदा मन । हृदयीं ध्यान मूर्तीचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सेवा । हीचि देवा उत्तम ॥ ४ ॥

१२४० काया वाचा आणि मन । जयाचें ध्यान संतचरणीं ॥ १ ॥ तोचि पावन जाहला जगीं । दुजें अंगीं कांहीं नेणें ॥२॥ सदा वाचे गाय नाम । न करी काम आणीक तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव । नेदी तया दुजा ठाव ॥ ४ ॥

१२४१ निवांत बैसोनि सुखें गाय नाम । भेदाभेद काम परते सांडी ॥१॥ हेंचि एक खूण परमार्थ पुरता । मोक्ष सायुज्यता हातां चढे ॥ २ ॥ लौकिक वेव्हार आहे तैसा पाहे । जो जो होत जाये जे जे वेळे ॥ ३ ॥ कर्म धर्म तत्वतां बीज हें सर्वथा । एका जनार्दनीं पुरता योग साधे ॥ ४ ॥

१२४२ नाम घेई सदा वाचे । अनंत जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ सुलभ सुलभ एक नाम । होय आगम जपतांची ॥२॥ रानीं वनीं बैसता जनीं । नाम वदनीं तो धन्य ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें । हरती पापें जन्माचीं ॥ ४ ॥

१२४३ नको कांहीं आणिक नेम । एक नाम घेई वाचे ॥ १ ॥ तुटे जन्ममरण बाध । हृदयीं बोध ठसावे ॥ २ ॥ न लगे गिरी कडे कपाट । नाम बोभाट करीं सुखें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वर्म । धर्माधर्म घडे नामें ॥ ४ ॥

१२४४ नाहीं कधी वाचे नाम । तो अधम न पहावा ॥ १ ॥ होतां त्याचें दरुशन । सचैल स्नान करावें ॥ २ ॥ तयाची ते ऐकतां मात । होय घात शरिराचा ॥ ३ ॥ ऐसा अधम तो जनीं । नामहीन असतो प्राणी ॥ ४ ॥ म्हणोनि नाम आठवावें । एका जनार्दनीं जीवेंभावें ॥ ५ ॥

१२४५ नको आणिकांच्या पडूं हावभरी । वांयां रानभरी कां रे रहाशीं ॥ १ ॥ चुकवी पतन उच्चारीं तूं नाम । आणिक नको धाम यापरतें ॥ २ ॥ वेगळें वेगळें चहूं वाचांपरतें आहे । साहांचे तें पाहें न चले कांहीं ॥ ३ ॥ अठरांची मती कुंठीत राहिली । एका जनार्दनीं माऊली विठ्ठल देखा ॥ ४ ॥

१२४६ हेंचि साचें बा साधन । मुखीं नाम हृदयीं ध्यान ॥ १ ॥ येणें तुटे नाना कंद । पीडा रोग भवछंद ॥ २ ॥ नको ते वाउगी खटपट । मन करीं एकनिष्ठ ॥ ३ ॥ घडे साधन समाधी । तेथें अवघी उपाधी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ध्यान । साधी परमार्थ साधन ॥ ५ ॥

१२४७ एक नाम गाये । तेथें सदा सुख आहे ॥१॥ नाम गातांचि वदनीं । उभा असे चक्रपाणी ॥ २ ॥ नामाचिया हाकें । उडी घाली कवतुकें ॥ ३ ॥ घात आघात निवारी । उभा राहे सदा द्वारीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नामासाठीं । धांवे भक्तांचिये पाठीं ॥ ५ ॥

१२४८ पशु आणि पक्षी तरले स्मरणें । तो तुम्हा कारणें उपेक्षीना ॥ १ ॥ धरूनि विश्वास आळवावें नाम । सद्गद तें प्रेम असो द्यावें ॥ २ ॥ सुखदुःख कोटी येती आणि जाती । नामाविण विश्रांती नाहीं जगीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामाचा प्रताप । नुरची तेथें पाप वोखदासी ॥ ४ ॥

१२४९ सेवेचें कारण मुख्य तो सद्भाव । इतर ते वाव इंद्रिय बाधा ॥ १ ॥ साधन हेंचि साधी ताडीं तूं उपाधी । नको ऋध्दिसिध्दि आणिक कांहीं ॥ २ ॥ नामाचा उच्चार मुख्य हेचि भक्ती । एका जनार्दनीं विरक्ति तेणें जोडे ॥ ३ ॥

१२५० नाहीं जया भाव पोटीं । तया चावटी वाटे नाम ॥ १ ॥ परी येतां अनुभव । चुकवी हाव संसार ॥ २ ॥ वेरझारीं पडे चिरा । नाहीं थारा जन्माचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खंडे कर्म । सोपें वर्म हातां लागे ॥ ४ ॥

१२५१ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । चांडाळादि अधिकार ॥ १ ॥ एका भावें गावें नाम । सोडोनियां क्रोधकाम ॥ २ ॥ आशा मनशा टाका दुरी । मग इच्छा कल्पना काय करी ॥३॥ एका जनार्दनीं मन । करा देवासी अर्पण ॥ ४ ॥

१२५२ वेदांत सिध्दांत पाहतां खटपट । वाउगा बोभाट नामाविण ॥ १ ॥ नामें होय भुक्ति नामें होय मुक्ति । नामें वैकुंठप्राप्ति सर्व जीवां ॥ २ ॥ नामेंचि तरले नारदादि योगी । नाम पावन जगीं कीर्ति नामें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तारक हें नाम । भवसिंधु धाम उतरी नाम ॥ ४ ॥

१२५३ जया ठायीं जैसा भाव । प्रगटे देव तैसाची ॥ १ ॥ हा तो जगा अनुभव । नुपेक्षी देव कवणासी ॥२॥ स्त्रियादि हीन याती । नामें तयां उत्तम गती ॥ ३ ॥ निंदकां वंदकां सम । गातां जोडे एक धाम ॥४॥ कृपाळु माउली । एका जनार्दनीं साउली ॥ ५ ॥

१२५४ उपवास पारणें न लगे आणिक साधन । नामापरतें निधान नाहीं जगीं ॥ १ ॥ म्हणोनि सांडी सांडी काम परतें । वाचेसी आरुतें नाम जपे ॥ २ ॥ नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनीं । नाम हें निर्वाणीं तारक जगा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम श्रेष्ठाचें श्रेष्ठ । सर्वांहि वरिष्ठ नाम एक ॥ ४ ॥

१२५५ रंक बैसतां पालखीसी । उपेक्षी पाहिल्या पदवीसी ॥ १ ॥ तैसें नाम मुखीं गातां । कोण ब्रह्मज्ञान वार्ता ॥ २ ॥ मुळींच जाहलें नाहीं खंडन । वादविवाद अभेदीं जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । ब्रह्मज्ञानाची कोण आठवण ॥ ४ ॥

१२५६ गुणदोष नायकावे कानीं । सदा वाचा नामस्मरणीं ॥ १ ॥ हेंचि परमार्थाचें सार । मोक्ष मुक्तीचें भांडार ॥ २ ॥ साधे सर्व योगस्थिती । द्वेष धरूं नये भूतीं ॥ ३ ॥ सर्वांठायीं जनार्दन । म्हणोनि वंदावें ते जन ॥ ४ ॥ खूण सांगे जनार्दन । एका जनार्दनीं पूर्ण ॥ ५ ॥

१२५७ सदा वाचे नामावळी । नित्य जिव्हा ज्याची चाळी । पातकांची होळी । होत तेणें कली ये ॥ १ ॥ नको ध्यानधारणा आसन । वाचे सदा नारायण । कोलिया पेला नेम जाण । मेरुसमान सुकृत ॥ २ ॥ उपमा नव्हे तया नरा । जनार्दन तो निर्धारा । एका जनार्दनीं वरा । त्याचा मांगात बहतां ॥ ३ ॥

१२५८ गांवढे सहस्र ब्राह्मण । तृप्त केलिया भोजन । पुण्यक्षेत्रींचा एकाचि जाण । सुकृत तितुकेंची जोडे ॥ १ ॥ ऐसें पुण्यक्षेत्रांचें दशशतक । तृप्त केलिया पाठक । पहातां सुकृत । तितुकेंचि जोडे ॥ २ ॥ ऐसे सहस्र वेदपाठक । तृप्त केलिया पंडीत एक । पहातां सुकृत । तितुकेंचि जोडे ॥ ३ ॥ तैसेच पंडित सहस्र एक । तृप्त केलिया संन्यासी देख । तरी तें सुकृत । तितुकेंचि जोडे ॥ ४ ॥ तसें सहस्र संन्यासी । गणिक एक परमहंसी । पाहतां सुकृतासी । एक तृप्त केलिया ॥ ५ ॥ परमहंसी सहस्रगणो । तैसीच ब्रह्मज्ञानाची मांडणी । जोडे सुकृत तृप्तकरणी । एक ब्रह्मवेत्ता ॥ ६ ॥ उपमा देतां ब्रह्मवेत्त्यासी । पाहतां ब्रह्मांडो नाहीं त्यासी । तृप्त केलिया ब्रह्मवेत्यासी । हरिहर तृप्त ॥ ७ ॥ ऐसे वेत्ते अपरंपार । न ये नामधारका बरोबर । नामधारका सादर । पाहे एका जनार्दनीं ॥ ८ ॥

१२५९ वेदाभ्यास नको सायास ज्योतिष । नामाचा तो लेश तेथें नाहीं ॥ १ ॥ बहुत व्युत्पत्ती सांगसी पुराण । व्यर्थ तेंचि स्मरण नाम नाहीं ॥२॥ अनंत हें नाम जयापासुनि जालें । तें वर्म चुकलें संतसेवा ॥ ३ ॥ संतांसी शरण गेलिया वांचुनि । एका जनार्दनीं न कळे नाम ॥ ४ ॥

१२६० ज्या नामें पाषाण जळांत तरले । नामें त्या राखिलें प्रल्हादासी ॥ १ ॥ अग्नि विष बाधा नामेंचि निवारी । गिरीं आणि कंदरीं रक्षी नाम ॥२॥ ब्रह्महत्यारी वाल्हा नामेंचि तरला । त्रैलोकीं मिरवला वडिवार ॥३॥ एका जनार्दनीं नामेंचि तरलें । जडजीव उध्दरले युगायुगीं ॥ ४ ॥

१२६१ उत्तम मध्यम चांडाळ । अंत्यजाहि तरलें खळ ॥ १ ॥ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य क्षूद्र । नामें पवित्र पैं जाहले ॥ २ ॥ यवन माळी तो कुंभार । शिंपी सोनार तरले ॥३॥ एका जनार्दनीं सांगू किती । मागें तरलें पुढें तरती ॥ ४ ॥

१२६२ नाम सुलभ सोपें गातां । नाहीं भय आणि चिंता । पळती दोषांच्या चळथा । नाम गातां देशोधडीं ॥ १ ॥ म्हणोनि धरियेली कास । जाहलों संतांचा मी दास । नाम गातां उल्हास । वारंवार मानसीं ॥ २ ॥ उणें पुरें नको कांहीं । सोंवळें येथें नाहीं । एका जनार्दनीं देहीं । सुस्नात सर्वदा ॥ ३ ॥

१२६३ जडजीवांतें उध्दरी। ऐसी नामामाजीं थोरी ॥ १ ॥ तेंचि नाम वाचे गातां। हरे जन्ममरण-व्यथा ॥ २ ॥ नामें पाषाण तारिले। गजेंद्रातें उध्द-रिलें ॥ ३ ॥ ऐसा नामाचा निजछंद। एका जना-र्दनीं परमानंद ॥ ४ ॥

१२६४ आम्ही धारक नामाचे। आम्हां भय नाहीं काळाचें ॥ १ ॥ ऐशी नामाची ती थोरी। कळिकाळ दास्य करी ॥ २ ॥ येरां अवघियां उद्धार। नाममंत्र परिकर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पोटीं। नाम गावें सदा होटीं ॥ ४ ॥

१२६५ कोणी कांहीं तरी म्हणो। आम्ही न जाणो तया बोला ॥ १ ॥ गाऊं सुखें नामावळी। सुख कल्लोळीं सर्वदां ॥ २ ॥ नाचूं संतमेळीं सदा। कीर्तनीं गोविंदा रंजवूं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हाचि धंदा। वायां शब्दा न लागूं ॥ ४ ॥

१२६६ धन्य धन्य श्रीहरीचे गुण। नाम पावन ऐकतां ॥ १ ॥ जें जें अवतारचरित्र। वर्णितां पवित्र वाणी होय ॥ २ ॥ कीर्ति वर्णिता उध्दार जीवां। कलीयुगीं सर्वा उपदेश ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें वर्म। गुण कर्म वर्णितां ॥ ४ ॥

१२६७ नामाचे धारक विष्णुरूप देख। त्रिभुव-नींचें सुख तये ठायीं ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु हर येताती सामोरे। नामधारक निर्धारें तयां वंद्य ॥ २ ॥ त्रिभु वनापरता नामाचा महिमा। जाणे शंकर उमा सत्य सत्य ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पतीतपावन नाम। गातां निजधाम जोडे मुक्ती ॥ ४ ॥

१२६८ मोक्ष मुक्तीचें लिगाड। वागवी अवघड कासया ॥ १ ॥ एक नाम जपा कंठीं। रावती कोटी मुक्ती देखा ॥ २ ॥ मोक्ष तेथें जोडोनि हात। उभाचि तिष्ठत सर्वदा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देखा। मुक्ती फुका रावती ॥ ४ ॥

१२६९ दोषी यमदूत नेतसे बांधोनी। तंव अव-चित नाम पडलें कानीं ॥ १ ॥ तुटलें बंधन खुंटलें पतन। नाम जनार्दन ऐकतांची ॥ २ ॥ तुटोनि बंधन पडतां तळीं। तंव वरचेवर झेली वन-माळी ॥ ३ ॥ दूतीं अति दृढ नाम धरितां मनीं। यमदूतां देवदूत घालिती विमानीं ॥ ४ ॥ दोषी आणि दूता नामाच्या पाठीं। भावबळें देव स्थापी वैकुंठीं ॥ ५ ॥ एका जनार्दनीं नामोच्चारा-साठीं। यमे यमदूतां नोहे भेटी ॥ ६ ॥

१२७० चित्रगुप्त म्हणती करावें काई। यमदूता-विण न चले कांहीं ॥ १ ॥ नामें नागविलें नामें नाग विलें। यम म्हणे माझें सामर्थ्य न चले ॥ २ ॥ यम चित्रगुप्त नाम विवंचीत। नाम विवंचितां जाले मुक्त ॥ ३ ॥ यमें यमदूता आल्हादें भेटी। अवघे चतुर्भुज झाले वैकुंठीं ॥ ४ ॥ जनामाजीं थोर दाटुगें नाम। यमें यमदूत झाले आत्माराम ॥ ५ ॥ एका जनार्दनीं नामाचा गुण। यमेसीं यमलोक जाला परब्रह्म पूर्ण ॥ ६ ॥

१२७१ जपतां नाम पडे धाक। पातकें पळती त्रिवाटे देख। कळिकाळाचें नासे दुःख। ऐसें नामीं सामर्थ्य ॥ १ ॥ जप तप नामावळी। आणिक नको मंत्रावळी। ब्रह्मज्ञान बोली। वायां शीण आटा-आटी ॥ २ ॥ साधन पुण्य असेल गांठीं। तराच नाम येईल होटीं। एका जनार्दनीं पोटीं। दया शांति आकळे ॥ ३ ॥

१२७२ नित्य नैमित्तिक कर्म। जया न घडे हा धर्म। येणें उच्चारावें नाम। सत्य निर्धार जाणावा ॥ १ ॥ नामें कर्माची सुटे उपाधी। नामें तुटे आधी व्याधी। नामें शोक संदेह बुद्धी। नास-तसे हरिनामें ॥ २ ॥ नाना रोग तुटती नामें। घडती सर्व ब्रह्मकर्में। एका जनार्दनीं नामें। धर्म सकळ साधती ॥ ३ ॥

## नामपाठ.

१२७३ नामपाठ करा नामपाठ करा। चवऱ्यां-शींचा फेरा चुकवा जगीं ॥ १ ॥ नामपाठ गाये नाम-पाठ गाये। पुनरपि नये संसारासी ॥ २ ॥ एका जनार्दनाचा नामपाठ गाय। आनंदी आनंद होय तयालागीं ॥ ३ ॥

१२७४ नामपाठ गाये संताचे संगती। नाहीं पुनरा-वृत्ति तया मग ॥ १ ॥ नामपाठ गाय सर्व भावें मनीं। चुकेल आयणी गर्भवास ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाये। जनार्दन पाहे जनीं वनीं ॥ ३ ॥

१२७५ नामपाठ सार सर्वांमाजीं श्रेष्ठ। जो गाये तो वरिष्ठ कालियुगीं ॥ १ ॥ चुकेल यातना नाना गर्भ-वास। भय आणि त्रास नव्हे मनीं ॥ २ ॥ जनार्द-नाचा एका नामपाठ भावें। आदरें गात आहे सदो-दित ॥ ३ ॥

१२७६ नामपाठ गाये सदोदित मनीं। यमाची जाचणी नोहे तया ॥ १ ॥ नामपाठ भावें आदरें जो गाये। सर्व सुख पाहे तया होय ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामीं धरी आवडी। सर्वभावें जोडी नामपाठ ॥ ३ ॥

१२७७ नामपाठ सार वेदाचें तें मूळ। शास्त्राचें तें फळ नामपाठ ॥ १ ॥ योगयागविधि न लगे खटपट। नामपाठें स्पष्ट सर्व कार्य ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ घोकी। गुढी तिहीं लोकीं उभारिली ॥ ३ ॥

१२७८ नामपाठ ब्रह्म उघड बोले वाचा। वेदांतीं तो साचा निर्णय असे ॥ १ ॥ नामपाठ भाव भक्ति ते कारण। आणिक साधन नाहीं दुजें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गाये तो आवडी। तोडियेली बेडी संसाराची ॥ ३ ॥

१२७९ नामपाठ कीर्ति सर्वांत वरिष्ठ। नको साधन कष्ट आणिक कांहीं ॥ १ ॥ नामपाठमाला हृदयीं ध्याई भावें। उगेंचि जपावें मौन्यरूप ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम गाय फुका। साधन तिहीं लोकां वरिष्ठ तें ॥ ३ ॥

१२८० नामपाठ कलीमाजीं सोपें वर्म। साधन तो श्रम न करीं वांयां ॥ १ ॥ नामपाठ गाये नामपाठ गाये। वांयां तूं न जाय खटपटा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाये। जनार्दना पाहे काया वाचा ॥ ३ ॥

१२८१ नामपाठ श्रेष्ठ नामपाठ श्रेष्ठ। पावे तो वैकुंठ कलीमाजीं ॥ १ ॥ नामपाठें गेले नामपाठें गेले। जडजीव उद्धरिले नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आणिक नेणें वर्म। सोपें होय कर्म नामपाठें ॥ ३ ॥

## नामपाठफल.

१२८२ नामपाठ सदा एकांतीं जो करी। भुक्तीमुक्ती चारी घरीं त्याच्या ॥ १ ॥ न लगे साधन व्युत्पत्ति पसारा। नामपाठ बरा संतसंगें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें निका। तारिले जडलोकां नामपाठें ॥ ३ ॥

१२८३ नामपाठ अंडज जारज स्वेदज। उद्भिज देख चार योनी ॥ १ ॥ नामपाठ प्रेमें गाय तूं आवडीं। तुटेल सांकडीं कर्म धर्म ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठीं निका। तोडियेली शाखा द्वैताची ते ॥ ३ ॥

१२८४ नामपाठ ज्या नाहीं पैं सर्वथा। तयासी तत्वतां यमदंड ॥ १ ॥ मारिती तोडिती यमाचे ते दूत। नामपाठीं चित्त कां रे नेणें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे सर्व लोकां। नामपाठ घोका आळस नका ॥ ३ ॥

१२८५ नामपाठ वर्म सोपें आहे जाणा। चिंती नारायणा नामपाठें ॥ १ ॥ अष्टांग योग साधनें वरिष्ठ। नामपाठेंविण कष्ट होती जना ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी विनवणी। नामपाठ निर्वाणीं शस्त्र आहे ॥ ३ ॥

१२८६ नामपाठ युक्ति जगीं सोपी जाणा। म्हणोनि नारायणा आठवावें ॥ १ ॥ नामपाठ सोपा नामपाठ सोपा। जन्ममरण खेपा दूर होती ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आवडीनें गाये। नाशिवंत पाहें शरीर आहे ॥ ३ ॥

१२८७ नामपाठ गाये धन्य तो संसारीं। काय त्याची थोरी वानूं जगीं ॥ १ ॥ तयाचे चरणीं माझा दंडवत। नामपाठ गात सर्वभावें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ भावें। अखंड गात आहे जीवेंभावें ॥ ३ ॥

१२८८ नामपाठ गाय सदा नामपाठ गाय। धन्य त्याची माय त्रिभुवनीं ॥ १ ॥ ब्रह्मादिक वंदिती शिवादिक ध्याती। नामपाठ कीर्ति मुखीं गातां ॥ २ ॥ एका जनार्दनीं साराचें हें सार। नामपाठ निर्धार केला जगीं ॥ ३ ॥

१२८९ नामपाठ सत्ता सर्वां वरिष्ठता। यमधर्म माथां वंदी पाय ॥ १ ॥ ऐसा नामपाठ भक्तीयुक्त गाय। पुनरपि नये संसारासी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे फुका। नामपाठ घोका जीवेंभावें ॥ ३ ॥

१२९० नामपाठ जगीं सोपें तें साधन। म्हणोनि वर्णन वैष्णव करिती ॥ १ ॥ आनंदें नाचती टाळी वाजविती। नामपाठ गाती सर्वभावें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भुलला नामपाठीं। म्हणोनि वैकुंठीं घर केलें ॥ ३ ॥

१२९१ नामपाठ सोपा हरावया पापें। आणीक संकल्प न करी दुजा ॥ १ ॥ नामपाठें सिद्धि नामपाठें सिद्धि। तुटेल उपाधी नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गात नाचत। नामपाठ करीत सर्वकाळ ॥ ३ ॥

१२९२ नामपाठ करितां काळ वेळ नाहीं। उभारुनी बाहीं सर्वकाळ ॥ १ ॥ सर्वभावें नामपाठ तूं गाये। आणिक न करी काय साधन तें ॥ २ ॥ जना

र्दनाचा एका भुलला नामपाठीं । आणिक न करी गोष्टी नामाविण ॥ ३ ॥

१२९३ नामपाठ सोपा भोळ्या भाविकांसी । मतवादीयांसी न रुचे नाम ॥ १ ॥ नवज्वरिता दुग्ध प्राण जाय तत्त्वतां । अभाविकांसी सर्वथा गति तेची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे प्रेमभावें । आदरें तें गावें नामपाठ ॥ ३ ॥

१२९४ गाय नामपाठ न करीं आळस । हातां येईल सौरस इच्छिलें तें ॥ १ ॥ न करी आळस आलिया संसारीं । नामपाठ निरंतरीं गाय सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें विनटला । नामपाठें झाला कृतकृत्य ॥ ३ ॥

१२९५ नामपाठ करितां जाईल पैं चिंता । मोक्ष सायुज्यता हातां येई ॥१॥ म्हणोनि सोपें वर्म सांगतसे तुज । नामपाठ गुज जपे सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कुर्वंडी करुनी । लोळत चरणीं संतांचिया ॥ ३ ॥

१२९६ नामपाठें होय शुद्ध तें शरीर । आणिक विचार न करी कांहीं ॥ १ ॥ नामपाठ भोळे नामपाठ भोळे । शंकर तो लोळे स्मशानीं तो ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रचीत घेउनी । नामपाठ वदनीं जपतसे ॥ ३ ॥

१२९७ नामपाठ जपे भोळा महादेव । देवाधि देव वंदी तया ॥ १ ॥ विष तें अमृत नामपाठें झालें । दैन्य दुःख गेलें नाम जपतां ॥ २ ॥ जनार्दनाचा एका उभारुनि बाह्या । नामपाठ गाय सर्वकाळ ॥ ३ ॥

१२९८ शास्त्रवेत्ते ज्ञानी नामपाठ गाती । तेणें तयां विश्रांती सर्वकाळ ॥१॥ पुराणें वदती नाम पाठ कीर्ति । व्यासादिकीं निश्चितीं नेम केला ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे गुज । नामपाठ निज जपे जना ॥३॥

## नामपाठफल प्राप्त झालेले भक्त.

१२९९ नामपाठें गणिका नेली मोक्षपदा । नामपाठें प्रल्हादा सुख झालें ॥ १ ॥ नामपाठें ध्रुव अढळपदीं बैसे । नारद नाचतसे नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे अनुभव । नामपाठ सर्व जपा आधीं ॥ ३ ॥

१३०० नामपाठें भक्ति हनुमंतें केली । सेवा रुजु झाली देवा तेणें ॥ १ ॥ नामपाठें शक्ति अद्भुत ये अंगीं । धन्य झाला जगीं कपीनाथ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सेवोनि आदरें । नामपाठ स्मरे सर्वकाळ ॥ ३ ॥

१३०१ नामपाठ करूनि वाल्हा तो तरला । अधिकारी झाला रामनामें ॥ १ ॥ शतकोटी कावित्व रामायण केलें । जडजीव उद्धरिले तिहीं लोकीं ॥२॥ जनार्दनाचा एका बोलतसे वाणी । नामपाठ अमृतसंजीवनीं घ्या रे भावें ॥ ३ ॥

१३०२ नामापाठें नक्र तारिला निर्धारें । गजेंद्र उद्धरे नामपाठें ॥ १ ॥ तरले तरले नामेंचि तरले । वैकुंठासी नेले नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका जोडोनियां हात । नामपाठ गात संतांपुढें ॥ ३ ॥

१३०३ नामपाठें तारिले पतित उद्धरिले । धावणें तें केलें पांडवांचें ॥ १ ॥ पडतां संकटीं नामपाठ गाय । द्रौपदी ती माय तारियेली ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतसे लोकां । नामपाठ फुका जपा आधीं ॥ ३ ॥

१३०४ नामपाठें सर्व मुक्तत्व साधिती । नामपाठें विरक्ती हातां येत ॥ १ ॥ नामपाठें उद्धव तरला तरला । नामपाठें झाला शापमुक्त ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले लडिवाळ । नामापाठ काळ काळाचाही ॥३॥

१३०५ नामपाठें अक्रूर सर्व ब्रह्मरूप । भेदाभेद संकल्प मावळले ॥ १ ॥ वंदी रजमाथां घाली लोटांगण । द्वैताचें बंधन तुटोनि गेलें ॥२॥ जनार्दनाचा एका नामपाठें मुक्त । जालासे सतत संतचरणां ॥ ३ ॥

१३०६ नामपाठें बिभीषण सर्वांस वरिष्ठ । वंश तो स्पष्ट दशोधडी ॥ १ ॥ जाउनी शरण चिरंजीव झाला । नामपाठें धाला कल्पवरी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका मिरवी बडिवार । नामपाठ सार युगायुगीं ॥ ३ ॥

१३०७ नामपाठें भीष्में कामातें जिंकिलें । सार्थक पैं केलें विहिताचें ॥ १ ॥ आदरें आवडी नामपाठ गावें । सर्वांवरी होय सत्ता त्याची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका होउनी शरण । घाली लोटांगण संतचरणीं ॥ ३ ॥

१३०८ नामपाठें तरला चोखा तो महार । भावें सर्वेश्वर स्थापी तया ॥ १ ॥ नामपाठ करूनि कीर्ति केली जगीं । उपमा ते अंगीं वाढविली ॥२॥ जनार्दनाचा एका वर्णितो संतांसी । नित्य नामपाठासी अनुसरला ॥३॥

१३०९ नामपाठें गोरा कुंभार तरला । उद्धार तो झाला पूर्वजांचा ॥१॥ नामपाठ कीर्ति गाताती वैष्णव ।

धन्य तो अपूर्व नाममहिमा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चरणरजेरेण । नामपाठ संकीर्तन करा वेगीं ॥ ३ ॥

१३१० नामपाठ प्रेमें सांवता तो गाये । हृदयकमळीं वाहे नारायणा ॥ १ ॥ नामपाठ निका नामपाठ निका । खुर्पू लागे देखा देव त्यासी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ऐकोनिया बोल । सांगत नवल संतांपुढें ॥ ३ ॥

१३११ नामपाठें नामा शिंपी तो तरला । तयाची देवाला आवड मोठी ॥ १ ॥ जाउनी जेवणें उच्छिष्ट भक्षणें । नामपाठें देणें इच्छिलें तें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सद्गदित होय । नामपाठ गाय आवडीनें ॥ ३ ॥

१३१२ नामपाठें जनाबाईबरोबरी । दळी कांडी हरि शेणी वेंची ॥ १ ॥ भक्तांचें सकळ कार्य तें करणें । नये ऐसें उणें करी काम ॥ २ ॥ जनार्दनाचा एका आवड पाहुनी । नाचतो कीर्तनीं नाम गाय ॥ ३ ॥

१३१३ नामपाठें आपण होय अनामिक । नामपाठें देख न म्हणे कांहीं ॥ १ ॥ उंच नीच ज्ञाती न करी विचार । नामपाठें निर्धार ऐसा ज्याचा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सर्वभावें देखा । नामपाठ निका गात असे ॥ ३ ॥

१३१४ नामपाठें ज्ञानियाची भिंत ओढी । भाविकां तांतडी देव धांवे ॥ १ ॥ बोलविला रेडा केलेंसे कवित्व । नामपाठें मुक्त केलें जन ॥ २ ॥ जनार्दनाचा एका लागतो चरणीं । जावें ओवाळोनी जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

१३१५ नामपाठें सोपान समबुद्धि झाला । विश्रांती पावला संवत्सरा ॥ १ ॥ मुख्य ब्रह्मा तो नामपाठ वंदी । इतर तरणें उपाधीपासोनियां ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कांहीं नेणें देखा । नामपाठें सुखा सुख झालें ॥ ३ ॥

१३१६ नामपाठें मुक्त मुक्ताई पैं झाली । हृदयीं आटली नामपाठें ॥१॥ देहादेह सर्व निरासिले चान्ही । नामपाठ वरी मुक्त झालें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले करुणावचनीं । नामपाठ झणीं विसरूं नका ॥३॥

१३१७ नामपाठें निवृत्ति पावला विश्रांती । नामपाठें शांति कर्माकर्मी ॥ १ ॥ म्हणोनि प्रेमभावें नामपाठ गावें । आलिंगन द्यावें संतचरण ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चिंता नामपाठ। मोक्षमार्ग वाट सोपी जगा ॥३॥

१३१८ नामपाठ मच्छिंद्र गोरक्षातें बोधी। तोडिली उपाधी चौदेहांची ॥ १ ॥ नामपाठ मोक्ष मार्ग तो सर्वदा । वाचे गातां बाधा नोहे कांहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका द्वैताविरहित । नामपाठ गात सर्वभावें ॥३॥

१३१९ नामपाठें गोरक्ष बोळगला गहिनी । दाविली उन्मनी सर्वकाळ ॥ १ ॥ समाधी आसन सैरा ते बोल । नामपाठ मोल अभ्यासिलें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नेणे तो उन्मनी । सदा संतचरणीं मिठी घाली ॥३॥

१३२० नामपाठें गहिनी निवृत्ति बोळला । उघड तो केला परब्रह्म ॥ १ ॥ नामपाठ ब्रह्म नामपाठ ब्रह्म । आणिक नेणें वर्म नामेंविण ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सेवेसी नटला । नामपाठें केला जनार्दन ॥ ३ ॥

१३२१ नामपाठें निवृत्ति ज्ञानदेवा उपदेशी । ओहं सोहं कोहं साक्षी केले ॥ १ ॥ तिन्हींपरता बोध तयासी बोधिला । नामपाठें झाला शांतरूप ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गमोनी मनासी । लागतो चरणांसी जनार्दना ॥ ३ ॥

१३२२ नामपाठें गुण झाले पैं त्रिगुण । अनाम लक्षण नामपाठें ॥ १ ॥ सैरा सैराट धांव जे वाटा । तयाच्या चेष्टा न चलती तेथें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एकपणें बोधिला । जनार्दन बोळला कामधेनु ॥ ३ ॥

१३२३ नामपाठें क्रिया नामपाठें कर्म। नामपाठें वर्म हातां येत ॥ १ ॥ तो हा सोपा योग नामपाठ वाचे। न करीं सायासाचें वर्म कांहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भक्तीसी भुलला । मोकळा मार्ग केला नामपाठें ॥ ३ ॥

## नामपाठमार्ग-गीताज्ञानेश्वरीपाठ, व एकाग्र मनानें अखंड नामोच्चार.

१३२४ नामपाठें ओहं सोहं कोहं खादलें । परब्रह्म लक्षिलें नामपाठें ॥ १ ॥ अहं अहंपण सोहं सोहंपण। नाम हेंचि खूण नामपाठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कोहंपणा वेगळा। जनार्दनें कुर्वाळिला अभयदानीं ॥३॥

१३२५ नामपाठ गीता नामपाठ गीता । नामपाठ गीता गाय सदा ॥ १ ॥ हाचि बोध सोपा अर्जुना उपदेश । नामपाठें क्लेश सर्व गेले ॥ २ ॥ जनार्दनाचा एका वाचे गाये गीता। हारपली चिंता जन्ममरण ॥३॥

१३२६ नामपाठें गीता ज्ञानेश्वरी होय। स्मरे तूं निर्भय ज्ञानदेवी ॥ १ ॥ नामपाठें सोपी अक्षरें तं,

उच्चार। ज्ञानेश्वरी उच्चार करी वाचे ॥२॥ जनार्दनाचा एका ज्ञानेश्वरी ध्याय। तेणें मुक्त होय युगायुगीं ॥ ३ ॥

१३२७ नामपाठ ज्ञानदेवी नामपाठ तूं करीं। चुके वेरझारी चौऱ्यांशींची ॥ १ ॥ ऐसें वर्म सोपें सांगे जगा गुज। ज्ञानेश्वरी निजीं जपों आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चरणीं विनटला। धन्य धन्य झाला ज्ञानदेवी ॥ ३ ॥

१३२८ नामपाठें वर्म वेदांचें तें कळे। नामपाठबळें शास्त्रबोध ॥ १ ॥ या दोहींचें वर्म ज्ञानदेवी जाणा। जपें कां रे जना हृदयीं सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका विनीत होउनी। आठवितो मनीं ज्ञानदेवा ॥३॥

१३२९ नामपाठें संदेह सर्व हा जाईल। नामपाठ गाईल प्रेमभावें ॥ १ ॥ नामपाठ सोपा नामपाठ सोपा। अहर्निशीं बापा जप करी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ठेउनी विश्वास। नामपाठ निजध्यास करीं सदा ॥३॥

१३३० नामपाठ साधन याहुनी आहे कोण। कासयासी पेणें स्वर्गवास ॥ १ ॥ जन्म देई देवा जन्म देई देवा। गाईन मी देवा नामपाठ ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोलतसे वाणी। नामपाठें जनीं जनार्दन ॥ ३ ॥

१३३१ नामपाठ युक्ति भाविकां प्रतीती। लोभिया विरक्ती नामपाठें ॥१॥ नामपाठें याग नामपाठ योग। नामपाठें भोग सरे आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भोगातीत झाला। म्हणोनि बोळला जनार्दन ॥ ३ ॥

१३३२ नामपाठें मोक्ष पाविजे तत्त्वतां। आणिक तें आतां साधन नाहीं ॥ १ ॥ नामपाठ सार नामपाठ सार। न करी विचार आणिक दुजा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाय। आदरें नाचताहे संतांपुढें ॥ ३ ॥

१३३३ नामपाठें संत पावले विसांवा। आणिक नाहीं हेवा दुजा कांहीं ॥ १ ॥ नामपाठें सिध्दि येईल हातां। मोक्षमार्ग तत्त्वतां नामपाठें ॥२॥ जनार्दनाचा एका नामपाठें तरला। उध्दार तो केला जडजीवां ॥ ३ ॥

१३३४ नामपाठें युक्ती साधन समाप्ती। नोहे दुजी प्रीति नामपाठें ॥ १ ॥ आणिक खटपट कारुया बोभाट। नामपाठ वाट वैकुंठाची ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें रंगला। आनंदें वाहिला नाचतसे ॥३॥

१३३५ नामपाठ मंत्र सर्वांत पैं श्रेष्ठ। तेणें तें वैकुंठ सरतें केलें ॥ १ ॥ नामपाठें साधे साधन तत्त्वतां। मोक्ष सायुज्यता हातां लागे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें नाम गाय। उभारुनी बाह्या सांगतसे ॥ ३ ॥

१३३६ नामपाठ करितां आनंद मानसीं। योगयाग राशीं पायां लागे ॥१॥ आनंदें आवडी नामपाठ गाय। उभा तारिता बाह्य जना ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगे जगाप्रती। नामपाठें विश्रांती होईल जना ॥३॥

१३३७ नामपाठ पसारा घे रे मुखें सदा। कळिकाळाची बाधा तुज नोहे ॥ १ ॥ नाम तें सोपें नाम तें सोपें। नाम तें सोपें विठ्ठलाचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ वाणी। कीर्ति त्रिभुवनीं नामपाठें ॥३॥

१३३८ नामपाठ कसवटी अखंड ज्याचे मुखीं। तोचि झाला सुखी इहीं जनीं ॥ १ ॥ नामपाठ धन्य नामपाठ धन्य। नामपाठ धन्य कलीमाजीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें मिरविला। श्रीरंग वरला नामपाठें ॥ ३ ॥

१३३९ नामपाठें ज्ञान नामपाठें ध्यान। नामपाठें मन स्थिर होय ॥ १ ॥ जगांत हें सार नामपाठ भक्ती। आणिक विश्रांती नाहीं नाहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका अखंड नाम गाय। हर्षें नाचताहे प्रेम रंगीं ॥ ३ ॥

१३४० नामाचेनि पाठें जाती पैं वैकुंठीं। आणिक खटपटी न तरती ॥ १ ॥ आठवा नामपाठ आठवा नामपाठ। वाउगा बोभाट करूं नका ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें तरला। जनार्दन जोडला गुरु मज ॥ ३ ॥

१३४१ संसार पाल्हाळ सांगती परिकर। नामपाठ सार सिद्धवरी ॥ १ ॥ न करी आळस नामपाठ गातां। तुटे भवचिंता नाना व्याधी ॥२॥ जनार्दनाचा एका जनार्दन चरणीं। भासे जनीं वनीं जनार्दन ॥३॥

१३४२ नामपाठ नित्य एक नेमें गायें। हरिकृपा होय तयावरी ॥ १ ॥ अंतरीं बाहेरी रक्षी नारायण। आलिया विघ्न निवारी साचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रचीत घेउनी। गात असे वाणी नामपाठ ॥ ३ ॥

१३४३ नामपाठ गंगा नामपाठ गंगा। दोष जाती भंगा नामपाठें ॥ १ ॥ नामपाठ सरिता सागर संगम। देवभक्त नाम तिन्ही बोध ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करितो मार्जन। त्रिवेणीचें स्नान पुण्य जोडे ॥ ३ ॥

१३४४ नामपाठ गंगा सागर तें तीर्थ। पवित्रापवित्र नामपाठ ॥ १ ॥ पर्वकाळ संतसमागम जाणा । नामपाठ स्नाना आदरेंसी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका कायावाचा मनीं । विनटला चरणीं जनार्दना ॥ ३ ॥

१३४५ नामपाठ श्रेष्ठ तीर्थांचें तें तीर्थ। वदे तूं चिंतारहित सर्वकाळ ॥ १ ॥ काळाचें तें काळ नामपाठ गात । काळ हा तयास नमस्कारी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका काळा बांधी चरणीं । म्हणोनी जनार्दनीं विनटला ॥ ३ ॥

१३४६ नामपाठ यश कीर्ति नामपाठें। तो जाय वैकुंठा हेळामात्रें ॥ १ ॥ न करी रे जना आळस मानसीं । नामपाठ अहर्निशीं जपे सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका सांगतो आदरें । नामपाठ स्मरे वेळोवेळां ॥३॥

१३४७ आणिक साधन नाहीं नाहीं जगीं। नामपाठ वेगीं गाय जना ॥ १ ॥ तुटलीं बंधनें खुंटलें पतन। नामपाठ खूण वैकुंठाची ॥२॥ जनार्दनाचा एका नामपाठें रंगला। भोळ्याभाविकाला नामपाठ ॥३॥

१३४८ चंचळ तें मन मुष्टीमाजी धरी। नामपाठ हरि गाये सदा ॥ १ ॥ जोडेल सर्व सिद्धी तुटेल उपाधी । नामपाठ आधीं भावें गाय ॥ २ ॥ जनार्दनाचा एका निश्चयें करूनी । नामपाठ निर्वाणीं जपतसे ॥३॥

१३४९ नामपाठ स्नान नामपाठ दान । नामपाठ ध्यान जनार्दन ॥ १ ॥ नामपाठ संध्या नामपाठ कर्म। नामपाठें धर्म सर्व जोडे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी नामपाठ। आणिक नाहीं श्रेष्ठ नामेंविण ॥ ३ ॥

## नामपाठ-संख्येंतील चोवीस नामांचा नामोच्चार

१३५० नामपाठ केशव वदा नित्य वाचे । सार्थक देहाचें सहजासहज ॥ १ ॥ आठवी केशव आठवी केशव। ठेवी तूं भाव केशवचरणीं ॥ २॥ जनार्दनाचा एका केशवीं विनटला। प्रेमे तो दाटला हृदयामाजीं ॥३॥

१३५१ नामपाठ नारायण वदे सर्वकाळ। काळाचा तो काळ नारायण ॥ १ ॥ नारायण गाय नारायण ध्याय । नारायण पाहे सर्वांठायीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नारायणीं प्रेम। आणिक नाहीं प्रेम दुजा कांहीं ॥३॥

१३५२ नामपाठ माधव सदा तूं उच्चारी। माधव अंतरीं धरूनि राहे ॥ १ ॥ माधवा माधवा आठवी यादवा। आणिक धांवा धांवा करूं नको ॥२॥ जनार्दनाचा एका माधवीं मुराला। वसंत तयाला जनार्दन ॥ ३ ॥

१३५३ नामपाठ गोविंद हाचि लागो छंद। न करी भेदाभेद हृदयामाजीं ॥ १ ॥ गोविंद नाम गाय गोविंद नाम गाय । गोविंद नाम गाय हृदयीं सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका हृदयीं ध्यायें सच्चिता। गोविंद गीतीं गातां सुख जोडे ॥ ३ ॥

१३५४ विष्णुनामपाठ करी वेळोवेळां। पाहे तूं सांवळा विष्णुसखा ॥ १ ॥ विष्णुनाम गाय अंतरीं सर्वदा। तुटे जन्मजरा बाधा येणें नामें ॥२॥ जनार्दनाचा एका विष्णुरूप देखा । जनार्दन सखा एकरूप ॥ ३ ॥

१३५५ नामपाठें मधुसूदन वाचे। अनंत जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ मधुनामें जैसा माक्षिकेशी वेधु । तैसा तूं बोधुं धरी देहीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका मधुर बोले वाणी । मधुसूदन चरणीं देउनी दिठी ॥३॥

१३५६ नामपाठ त्रिविक्रम वदे तूं रे वाचे । अनंत जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ बळीचे द्वारीं त्रिविक्रम उभा । नामपाठें उभा तुजपुढें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका त्रिविक्रमीं वंदी ।साधन उपाधी नेणे आण ॥३॥

१३५७ नामपाठें वामन अक्षरें तीं तीन । आणिक योगसाधन आन नाहीं । वदे तूं वामन वदे तूं वामन। विषय वमन करूनि सांडी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नसे तो पारखा । वामन तेणें सखा जोडियेला ॥३॥

१३५८ नाम तें सार श्रीधराचे वाचे। कोटी जन्मांचे दोष जाती ॥ १ ॥ जपें तूं आवडी धरूनियां गोडी । युगाऐसी घडी करूनियां ॥ २ ॥ जनार्दनीं एका श्रीधर निजसखा। नोहे तो पारखा जनार्दनीं ॥ ३ ॥

१३५९ नाम हृषिकेश गाये सावकाश। धरूनी उदास देहआशा ॥ १ ॥ जाईल जाईल देह नाशिवंत। नाम तें शाश्वत हृषिकेश ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नाम गाय सदा । पंचभूत बाधा तेणें नोहे ॥ ३ ॥

१३६० नाम तें सोपें पद्मनाभ पाठ। करी तूं बोभाट दिवसनिशीं ॥ १ ॥ चौसष्ट घडियामाजीं जपें नामावळी । कळिकाळ टाळी मारूं न शके ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामीं तो निर्भय। कळिकाळ वंदी पाय जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

१३६१ दामोदर गावा दामोदर पहावा। दामोदर साठवा हृदयामाजीं ॥ १ ॥ गोपीराजी ध्यान दामोदरीं मन । चुकलें बंधन नाम घेतां ॥ २ ॥ जना-

र्दनाचा एका दामोदरीं मीनला। कृतकृत्य झाला उभय लोकीं ॥ ३ ॥

१३६२ नाम तें सोपें संकर्षण जपें। आणिक संकल्पे धरूं नको ॥ १ ॥ धरितां संकल्प नाशिवंत बापा। नाम जप सोपा मंत्रमार्गे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका बोले लडिवाळ। जनार्दन कृपाळ जगीं तोची ॥ ३ ॥

१३६३ वासुदेव नाम प्रातःकाळीं वाचे। धन्य जन्म त्याचें सुफळ सदा ॥ १ ॥ वाहतां टाळी मुखीं नाम सार। वासुदेव उच्चार करी आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एकपणें देखा। जनार्दन सखा जोडियेला ॥ ३ ॥

१३६४ नाम जप वाचा प्रद्युम्न सावा। न करी नामाचा आळस कदा ॥ १ ॥ संसारयातना जाती पां निर्धारें। नाम निरंतर जपें आधीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका त्रैलोक्याचा सखा। झाली पूर्ण कृपा जनार्दन ॥ ३ ॥

१३६५ नाम अनिरुद्ध जगीं तें प्रसिद्ध। ओहं सोहं बोध गिळोनी गाय ॥ १ ॥ अहंकार सांडी नाम मुखें मांडी। साधन देशधडी करुनी जपें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका साधन सारुनी। जनार्दनचरणीं विनटला ॥ ३ ॥

१३६६ नाम पुरुषोत्तम घेई तूं आवडी। यातना कल्पकोडी नाहीं तुज ॥ १ ॥ नाम हें आठवी नाम हें आठवी। हृदयीं सांठवी पुरुषोत्तम ॥ २ ॥ जनार्दनाचा एका पारखी नेटका। पुरुषोत्तम सखा जोडिलासे ॥ ३ ॥

१३६७ नाम तूं अधोक्षज घेई सर्वकाळ। महाकाळा काळ अधोक्षज ॥ १ ॥ नामीं धरुनी प्रीति आठव सर्वदा। नाहीं तुज बाधा जन्मोजन्मीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें विनटला। आपुलासा केला जनार्दन ॥ ३ ॥

१३६८ नाम नारसिंह नाम नारसिंह। भक्तांसी तो सम सर्वकाळ ॥ १ ॥ जपे तो प्रल्हाद आवडी तें नाम। पावला सर्वोत्तम तयालागीं ॥ २ ॥ जनार्दनाचा एका रूप तें पाहुनी। नारसिंहचरणीं मिठी घाली ॥ ३ ॥

१३६९ वदें तूं अच्युत सर्वकाळ सदा। मायापाश बंध तुटोनि जाय ॥ १ ॥ करी कां रे नेम धरीं कां रे प्रेम। अच्युताचें नाम वदें सदा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका अच्युत पैं झाला। सप्रेमें रंगला प्रेमरंगीं ॥ ३ ॥

१३७० नाम जनार्दन रूप जनार्दन। ध्यान जनार्दन सर्व मज ॥ १ ॥ माय जनार्दन बाप जनार्दन। जनजनार्दन सर्व मज ॥ २ ॥ जनार्दनाचा एका जनार्दन देखा। जनीं वनीं सखा जनार्दन ॥ ३ ॥

१३७१ नाम उपेंद्र सर्व देवांचा तो इंद्र। शुभ काळ वक्त्र जप सदा ॥ १ ॥ तें नाम सोपें जपें कां रे वाचे। अहर्निशीं साचें नाम जप ॥ २ ॥ जनार्दनाचा एका एकाभावें नटला। हृदयीं सांठविला जनार्दन ॥ ३ ॥

१३७२ नाम हरिहर संसार तो हरी। सबाह्य अभ्यंतरीं हरि माझा ॥ १ ॥ हरिनाम जपें हरिनाम जपें। तें वर्म सोपें हरि जपें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका हरिचरणीं देखा। सुखासुख सुखा अनुभवला ॥ ३ ॥

१३७३ नाम श्रीकृष्ण उद्धवें साधिलें। चोविस नामें झाले जप पवे ॥ १ ॥ आठवा श्रीकृष्ण आठवा श्रीकृष्ण। आठवा श्रीकृष्ण वेळोवेळां ॥ २ ॥ जनार्दनाचा एका श्रीकृष्ण निजसखा। जनार्दनें देखा दावियेला ॥ ३ ॥

## नामपाठ-पंचविसावें

### विठ्ठलनामोच्चारफल.

१३७४ नामपाठ विठ्ठल पंचविसावा वाचे। सार्थक जन्माचें जालें जालें ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वदतां वो वाचे। सार्थक जन्माचें झालें साचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाय। विठ्ठल विठ्ठल ध्याये वेळोवेळां ॥ ३ ॥

१३७५ झाला नामपाठ झाला नामपाठ। मोक्षमार्ग वाट सोपी झाली ॥ १ ॥ आवडी आदरें नामपाठ गाये। हरिकृपा होय तयावरी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें निका। तोडियली शाखा अद्वैताची ॥ ३ ॥

### कीर्तनमहिमा.

१३७६ क्षीरसागर सांडोनि हरी। कीर्तनीं उभा सहपरिवारी। लक्ष्मी गरुड कामारी। होती तया कीर्तनीं ॥ १ ॥ आलिया विघ्न निवारी आपण। शंख चक्र गदा हातीं घेऊन। सुदर्शन कौस्तुभमंडित जाण। उभा असे चतुर्भुज ॥ २ ॥ गरुड तिष्ठे जोडिल्या

करीं। लक्ष्मी तेथें कामारी। ऋद्धिसिद्धी सहपरिवारी। तिष्ठताती स्वानंदें ॥ ३ ॥ कीर्तनगजरें वाहे टाळी। महादोषांची होय होळी। एका जनार्दनीं गदारोळी। नामोच्चार आनंदें ॥ ४ ॥

१३७७ श्रीशंभूचें आराध्य दैवत। क्षणीं वैकुंठीं क्षीरसागरांत। जयालागीं योगी तप तपती समस्त। तो सांपडला आम्हां कीर्तनरंगांत ॥ १ ॥ धन्य धन्य कीर्तन भूमंडळीं। महादोषां होतसे होळी। पूर्वज उध्दरती सकळीं। वाहतां टाळी कीर्तनीं ॥ २ ॥ पार्वतीसी गुज सांगे आपण। शंकर राजा बोले वचन। माझें आराध्य दैवत जाण। कीर्तनरंगणीं उभें आहे ॥ ३ ॥ मीं त्रिशूळ पाशुपत घेउनी करीं। कीर्तनाभोंवती घिरटी करीं। विघ्नां हाणोनि लाथा निवारी। रक्षी स्वयें हरिदासां ॥४॥ त्याचे चरणीचें रज वंदी आपण। हें पार्वतीसी सांगे गुह्य ज्ञान। एका जनार्दनीं शरण। कीर्तनरंगीं नाचतसे ॥ ५ ॥

१३७८ कीर्तनाची मर्यादा कैसी। देव सांगे उध्दवासी ॥ १ ॥ गावें नाचावें साबडें। न घालावें कोडें त्या कांहीं ॥ २ ॥ मिळेल तरीं खावें अन्न। अथवा पर्णे तीं भक्षून ॥ ३ ॥ जाईल तरी जावो प्राण। परी न सांडावें कीर्तन ॥ ४ ॥ किर किर आणूं नये पाठी। बोलूं नये भलत्या गोष्टी ॥ ५ ॥ स्वये उभा राहून। तेथें करी मीं कीर्तन ॥ ६ ॥ घात आलिया निवारी। माता जैसी बाळावरी ॥ ७ ॥ बोले उध्दवासी गुज। एका जनार्दनीं बीज ॥ ८ ॥

१३७९ उध्दवा तूं करी कीर्तन। अनन्यभावें माझें भजन। नको आणीक साधन। यापरतें सर्वथा ॥ १ ॥ धरी प्रेम सदा वाचे। कीर्तनरंगीं तूं नाचे। मीतूंपण साचें। अंगीं न धरी कांहीं ॥ २ ॥ भाळे भोळे जन। गाती अनुदिनीं कीर्तन। तेथें अधिष्ठान। माझें जाण सर्वथा ॥ ३ ॥ नको चुकूं तया ठायीं। वसें सर्वदा मीही। एका जनार्दनीं पाही। कीर्तनीं वसे सर्वदा ॥ ४ ॥

१३८० नारदें केलासे प्रश्न। सांगतसे जगज्जीवन। कलीमाजी प्रमाण। कीर्तन करावें ॥ १ ॥ महापापीया उध्दार। पावन करतो हरिहर। ब्रह्मादि समोर। लोटांगण घालिती ॥ २ ॥ श्रुती स्मृति वाक्यार्थ। कीर्तन तोचि परमार्थ। शास्त्रांचा मथितार्थ। कीर्तनपसारा ॥ ३ ॥ एका शरण जनार्दन। कीर्तनें तरती विश्वजन। हें प्रभूचें वचन। धन्य धन्य मानावें ॥ ४ ॥

१३८१ कीर्तनाची देवा आवडी। म्हणोनि धांवे तो तांतडी ॥ १ ॥ सुख कीर्तनीं अद्भुत आहे। शंकरराज जाणताहे ॥ २ ॥ गोडी सेविती संतजन। येरां न कळे महिमान ॥ ३ ॥ ऐसा कीर्तनसोहळा। एका जनार्दनीं पहा डोळां ॥ ४ ॥

१३८२ श्याम चतुर्भुज पीतांबरधारी। शंख चक्र मिरवे करीं ॥ १ ॥ आला पुंडलिकाकारणें। आवडी कीर्तनें धरूनी ॥ २ ॥ युगे अठ्ठावीस जाली। न बैसे उभा सम पाउली ॥ ३ ॥ कीर्तनीं धरूनियां हेत। उभा राहिला तिष्ठत ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनी। अनुदिनी करा कीर्तन ॥ ५ ॥

१३८३ कीर्तनाची आवडी देवा। वैकुंठाहुनी घाली धांवा ॥ १ ॥ नवल वैकुंठींच नसे। तो कीर्तनीं नाचतसे ॥ २ ॥ भाळ्याभोळ्यांसाठीं। धावे त्याच्या पाठोपाठी ॥ ३ ॥ आपुलें सुख तया द्यावें। दुःख आपण भोगावें ॥ ४ ॥ दीनानाथ पतीतपावना। एका जनार्दनीं वचना ॥ ५ ॥

१३८४ गरुड हनुमंतादि आपण। सामोरा येत जगज्जीवन ॥ १ ॥ आवडी कीर्तना ऐशी। लक्ष्मी तेथें प्रत्यक्ष दासी ॥ २ ॥ मोक्षादिकां नव्हे वाड। येरा कोण वाहे काबाड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भुलला। उघडा कीर्तनीं रंगला ॥ ४ ॥

१३८५ देवासी तो मुख्य कीर्तनाची गोडी। म्हणोनियां उडी घाली स्वयें ॥ १ ॥ नावडे तया आणिक संकल्प। कीर्तनी विकल्प करितां क्षोभे ॥ २ ॥ साबडे भाळे भोळे नाचताती रंगीं। प्रेम तें अंगीं देवाचिये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धांवे लवलाहे। न तो कांहीं पाहे आपणातें ॥ ४ ॥

१३८६ देखोनि कीर्तनाची गोडी। देव धांवे लवडसवडी ॥ १ ॥ वैकुंठीहूनि आला। कीर्तनीं तो सुखें घाला ॥ २ ॥ ऐसा कीर्तनाचा गजर। देव नाचतसे निर्भर ॥ ३ ॥ भुलला कीर्तनीं। एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

१३८७ देवासी प्रिय होय कीर्तन। नाचे येऊन आनंदें ॥ १ ॥ न विचारी यातीकूळ। असोत अमंगळ भलतैसे ॥ २ ॥ करिती कीर्तन अनन्यभावें। ते पढीये जीवेंभावें ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। कुळें पावन होती कीर्तनीं ॥ ४ ॥

१३८८ देवासी दुजें नावडे सर्वथा। करितां हरिकथा समाधान ॥ १ ॥ येऊनिया नाचे कीर्तनीं।

सर्वदा । निवारी आपदा सर्व त्याची ॥ २ ॥ भाविकांसाठीं मोठा लोभापर । नाचतो निर्भर कीर्तनांत॥३॥ एका जनार्दनीं आवडे कीर्तन । म्हणोनि वैकुंठसदन नावडेची ॥ ४ ॥

१३८९ नावडे वैकुंठ शेषशयन । वैष्णव संतजन आवडले ॥ १ ॥ रमा म्हणे कैसी नवल परी । देव भुलले वैष्णवाघरीं ॥ २ ॥ जो नातुडे ध्यानीं समाधीसाधनीं । तो स्वानंदें कीर्तनीं नाचतसे ॥ ३ ॥ जो यज्ञावदानीं कांहीं नेघे माये । तो द्वादशी क्षीराब्धी उभउभ्या खाये ॥ ४ ॥ लक्ष्मी म्हणे देव आतुडे कवणे बुद्धी । वैष्णवांची सेवा करावी त्रिशुद्धी ॥ ५ ॥ वैष्णवाघरीं लक्ष्मी कामारी । एका जनार्दनीं देव दास्यत्व करी ॥ ६ ॥

१३९० योगीयांचे चिंतनीं न बैसे । यज्ञयागादिकांसीं जो न गिंवसे । तो भाविकांचे कीर्तनासरिसें । नाचतसें आनंदें ॥ १ ॥ तो भाविकांचे कीर्तनीं आपुलें । सुख अनुभवी वहिलें । प्रेमें ब्रह्मानंदी डोले । वैष्णवांचें सदनीं ॥ २ ॥ यज्ञांचे अवदानीं न धाये । तो क्षीरापतीलागीं मुख पसरूनि धांवे । केवढें नवल सांगावें । या वैष्णवसुखाचें ॥ ३ ॥ सुख येतें समाधानीं । म्हणोनि सुख जनार्दनीं । एका जनार्दनाचे चरणीं । सप्रेमें विनटला ॥ ४ ॥

१३९१ तेजाचें तेजस रूपाचें रूपस । वैकुंठनिवास पंढरीये ॥ १ ॥ पाहतां चित्त निवे मनाचें उन्मन । तें समचरण विटेवरी ॥ २ ॥ आदी अंत नाहीं पाहतां प्रकार । तो हा सर्वेश्वर भीमातटीं ॥ ३ ॥ योगी चिंतिती अखंडता मनीं । तें उभे असे रंगणीं वैष्णवाचें ॥ ४ ॥ समाधी अष्टांग साधनें साधिती । तो मागे क्षीरापती आपुल्या मुखें ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भावाचा लंपट । सांडोनि वैकुंठ कीर्तनीं डोले ॥ ६ ॥

१३९२ नाभीकमळीं चतुरानन । न कळे तया महिमान । तो सावडे कीर्तन । तेथें नाचे सर्वदा ॥ १ ॥ नातुडे जो सदा ध्यानीं । योगयाग यज्ञहवनीं । अष्टांग योग करिता साधनीं । न लाभेचि सर्वथा ॥ २ ॥ भागले वेद गीती गातां । श्रमलीं शास्त्रें वेवादतां । पुराणें तों सर्वथा । तया न कळे महिमान ॥ ३ ॥ तो उभा भीमातीरीं । भक्त करुणाकर श्रीहरी । एका जनार्दनीं विनंति करी । वास देईं हृदयीं ॥ ४ ॥

१३९३ मधुपर्कादिक नावडे पूजन । आवडे कीर्तन भाविकांचें ॥ १ ॥ शंखचक्रादिक नावडती मनीं । वोडावितसे पाणी भाजीपाना ॥ २ ॥ लक्ष्मीसारखी नावडती जीवा । आवडे या देवा तुळशी बुका ॥३॥ एका जनार्दनीं कीर्तनीं नाचे । आणीक सुख त्याचें नये मना ॥ ४ ॥

१३९४ कीर्तनें तोषे अधोक्षज । राखी लाज भक्तांची ॥ १ ॥ धांवे द्रौपदीचे पानासाठीं । भीड मोठी कीर्तनाची ॥ २ ॥ दहा गर्भवास सोसले । उणें नाहीं आलें भक्तांचें ॥ ३ ॥ एका विनवी जनार्दनीं । कीर्तनीं प्राणी धन्य होती ॥ ४ ॥

१३९५ जन्ममरणाचें निवारेल दुःख । करितां देख कीर्तन ॥ १ ॥ नारद प्रल्हाद अंबऋषी । विनटले कीर्तनासी ॥ २ ॥ व्यास शुक वामदेव । धरिती भाव कीर्तनीं ॥ ३ ॥ एका त्याचा दास खरा । करी पसारा कीर्तन ॥ ४ ॥

१३९६ महा पापराशी तरले कीर्तनीं । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य जाले ॥ १ ॥ वाल्हा अजामेळ तारिली गणिका । त्रैलोक्यीं देखा सरते जाले ॥ २ ॥ कीर्तनीं दोष पळती रानोरान । यापरतें आन दुजें नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कीर्तन सार । तेणें पैलपार उतरलों ॥ ४ ॥

१३९७ कीर्तनाची आवडी मोठी । प्रेमें देव घाली मिठी ॥ १ ॥ कीर्तन प्रिय पैं गोविंदा । आदरें पूजितो नारदा ॥ २ ॥ कीर्तन करिता अभेदु । आदरें रक्षिला प्रल्हादु ॥ ३ ॥ गजेंद्र करी नामस्मरण । धांवण्या धांवे नारायण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कळवळा । भक्तालागीं देव भोळा ॥ ५ ॥

१३९८ कीर्तनीं प्रल्हाद तरला । बिभीषण मुक्त जाला ॥ १ ॥ ऐसा कीर्तनमहिमा । गणिका नेली निजधामा ॥ २ ॥ तारिले वानर असुर । कीर्तनीं पावन चराचर ॥ ३ ॥ गाई गोपाळ सवंगडे । कीर्तनीं तरले वाडेंकोडें ॥ ४ ॥ अजामेळ उद्धरिला । कीर्तनीं आल्हाद भला ॥ ५ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । कली कल्मष नाशीं क्षण ॥ ६ ॥

१३९९ कीर्तन श्रेष्ठ कलियुगीं सेवा । तरले पातकी ते देवा ॥ १ ॥ वाल्हा तारिला कीर्तनीं । पावन जाला त्रिभुवनीं ॥ २ ॥ गणिका कीर्तनें तरली । मोक्षधामा ती नेली ॥ ३ ॥ अजामेळ चोखा महार । कीर्तनीं तरले अपार ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । तिन्ही लोक जाले पावन ॥ ५ ॥

१४०० हरिकीर्तन नामोच्चार । जे नर करिती वारंवार । तया नाहीं संसार । ब्रह्मादि देव वंदिती ॥ १ ॥ कीर्तनमहिमा नारदु । जाणतसे परमानंदु । जालासे सर्वां वंद्यु । देवां असुरमानवां ॥२॥ कीर्तनमहिमा परीक्षिती । जाणतसे परम प्रीती । अंतीं सायुज्यता मुक्ती । पावती झाली ॥ ३ ॥ कीर्तनमहिमा जाणे शुक । जाणती ते व्यासादिक । वाल्मिकादि सर्व सुख । कीर्तनें सरते ॥ ४ ॥ कीर्तनमहिमा जाणे प्रल्हादु । तोडियेला मायाकंदु । कोरडे काष्ठीं गोविंदु प्रकटला ॥ ५ ॥ कीर्तनमहिमा जाणे बळी । याचक झाला वनमाळी । एका जनार्दनीं कली । कीर्तनें न पीडी ॥ ६ ॥

१४०१ अंतरशुद्धीचें कारण । वाचे करा हरिकीर्तन ॥१॥ देवा आवडी कैसी । धेनु धांवे वत्सा जैसी ॥ २ ॥ कीर्तनीं तारिला वाल्हा कोळी । अजामेळ दोषी बळी ॥ ३ ॥ कीर्तनीं तारिली गणिका । नामस्मरणें मोक्ष देखा ॥ ४ ॥ ऐशी कीर्तनाची गोडी । एका जनार्दनीं घाली उडी ॥ ५ ॥

१४०२ करितां कीर्तन श्रवण । अंतर्मलाचें होत क्षालन ॥ १ ॥ तुमचें कीर्तन पवित्र कथा । पावन होत श्रोता वक्ता ॥ २ ॥ तुमचे कीर्तनीं आनंद । गातां तरले ध्रुव प्रल्हाद ॥ ३ ॥ कीर्तनाचा गजर होतां । यम काळ पळे सर्वथा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । तिन्ही देव वंदिती चरण ॥ ५ ॥

१४०३ कीर्तनीं स्वधर्म वाढे । कीर्तनीं जोडे चित्तशुध्दी ॥ १ ॥ ऐसा महिमा कीर्तनाचा । शुक सांगे परीक्षिती साचा ॥ २ ॥ होती पावन अधम जन । करितां कीर्तन कलियुगीं ॥ ३ ॥ एका त्याचा दासानुदास । जाती कीर्तनास आवडी जे ॥ ४ ॥

१४०४ हरिकीर्तनें चित्त शुध्द । जाय भेद निरसुनी ॥ १ ॥ कामक्रोध पळती दुरी । होत बोंवरी महापापा ॥ २ ॥ गजरें हरिचें कीर्तन । पशु पक्षी होती पावन ॥ ३ ॥ स्त्री पुरुष अधिकार । कीर्तन सार कलियुगीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं उपाय । तरावया भवनदीसी ॥ ५ ॥

१४०५ तरले तरती भरंवसा । कीर्तनमहिमा हा ऐसा ॥ १ ॥ म्हणोनियां हरीचे दास । कीर्तन करिती सावकाश ॥ २ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । आनंदें होती तें पावन ॥ ३ ॥

१४०६ धन्य धन्य तें शरीर । जेथें कथा निरंतर ॥ १ ॥ गुण गाती भगवंताचे । तेचि जाणावे दैवाचे ॥ २ ॥ स्वयें बोलिले जगज्जीवन । थोर कलियुगीं कीर्तन ॥३॥ एका जनार्दनीं भले । हरिभक्तीनें उद्धरिले ॥ ४ ॥

१४०७ कीर्तनाचें थोर सुख । यदुनायक राहे उभा ॥ १ ॥ भाळे भोळे घेती नाम । करिती आराम कीर्तन ॥ २ ॥ नाना साधनांचे वोढी । न लगे सांकडी सोसाव्या ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपें बहू । कीर्तनीं पाहे देवातें ॥ ४ ॥

१४०८ धन्य भाग्याचे जन इहलोकीं । कीर्तनें जाले सुखी कृतकृत्य ॥ १ ॥ पातकी घातकी यासी सोपा पंथ । कीर्तनें सरतीं कलीमाजी ॥ २ ॥ योगयाग व्रत तप कल्पकोडी । कीर्तन श्रवण गोडी तेथें नाहीं ॥ ३ ॥ वेदशास्त्र पुराण श्रुतीचें अनुमोदन । करा रे कीर्तन कलीमाजीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं आल्हादें कीर्तन । करितां श्रोते वक्ते जाण पावन होती ॥ ५ ॥

१४०९ तुमचें चरित्र श्रवण । आवडी करूं तें कीर्तन ॥ १ ॥ संसार पुसोनियां वाव । निजपद देशी ठाव ॥ २ ॥ स्वभावें कीर्तन करितां । एवढा लाभ ये हातां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । होती पातकी पावन ॥ ४ ॥

१४१० आवडी करितां हरिकीर्तन । हृदयीं प्रगटे जनार्दन ॥ १ ॥ थोर कीर्तनाचें सुख । स्वयें तिष्ठे आपण देख ॥ २ ॥ घात आलिया निवारी । चक्र गदा घेउनी करीं ॥ ३ ॥ कीर्तनीं होऊनि सादर । एका जनार्दनीं तत्पर ॥ ४ ॥

१४११ जेथें सर्वदा कीर्तनघोष । जाती दोष पळुनी ॥ १ ॥ यमधर्म सांगे दूता । तुम्ही सर्वथा जाऊं नका ॥ २ ॥ जेथें स्वयें हरि उभा । कोण शोभा तुमची ॥ ३ ॥ तुम्हीं रहावें उभे पुढें । आलें कोडें निवारावें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । श्रेष्ठ सर्वांहुनी जाण ॥ ५ ॥

१४१२ कीर्तनें सिध्दि कीर्तनें सिध्दि । कीर्तनें निरसे आधिव्याधी ॥१॥ कीर्तनें काया कीर्तनें माया । कीर्तनें सर्व एक ठाया ॥२॥ द्वंद्व द्वैत भेद नुरेची ठाव । कीर्तनीं तिष्ठे उभाचि देव ॥ ३ ॥ निद्रेमाजीं वासणें देवो । म्हणे मज ठावो कीर्तनीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कीर्तनासाठीं । देव धांवे भक्तापाठीं ॥ ५ ॥

१४१३ जुनाट कीर्तनमाहिमा। तया काय देऊं उपमा ॥ १ ॥ धन्य धन्य हरीचे दास। करिती आस कीर्तनीं ॥ २ ॥ मागें तरले पुढें तरती। पहा प्रचीती पुराणीं ॥ ३ ॥ म्हणोनि एका काकुलती। कीर्तन करा दिनराती ॥ ४ ॥

१४१४ परंपरा कीर्तन चाली। मागून आली अनिवार ॥ १ ॥ उध्दवा सांगे जनार्दन। कीर्तन पावन कलीमाजीं ॥ २ ॥ अर्जुना तोचि उपदेश। कीर्तन उद्देश सर्वथा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तत्पर। कीर्तन करावें निरंतर ॥ ४ ॥

१४१५ काळाचें तो न चले बळ। करितां कल्लोळ कीर्तनीं ॥ १ ॥ शिव सांगे गिरजेप्रती। कीर्तनीं प्रीति धरावी ॥ २ ॥ सांगे शुक परीक्षिती। कीर्तनीं उध्दार पावती ॥ ३ ॥ एका अनन्य त्यांचा दास। धरती आस कीर्तनीं जे ॥ ४ ॥

१४१६ कीर्तनानंद चारी मुक्ती। धांवत येती घरासी ॥ १ ॥ सोपें सार सोपें सार। कीर्तन उध्दार कलियुगीं ॥ २ ॥ वाहतां टाळी कीर्तनछंदें। जाती वृंदें पातक ॥ ३ ॥ एका विनटला कीर्तनीं। भुक्ति-मुक्ति लागती चरणीं ॥ ४ ॥

१४१७ कीर्तनासाठीं चारी मुक्ती। उभ्या राबती हरिदासां ॥ १ ॥ कलीयुगीं हेंचि सार। करावें साचार कीर्तन ॥ २ ॥ कृता त्रेता द्वापारीं। कीर्तनमहिमा परोपरी ॥ ३ ॥ एका तयांसी शरण। कीर्तन करिती अनुदिन ॥ ४ ॥

१४१८ वेदाचिया मतें विसरूनि कीर्तन। करती जे पठण शीण त्यांसी ॥ १ ॥ वेदाचा अर्थ न कळेची पाठका। कीर्तनीं नेटका भाव सोपा ॥२॥ श्रुतीचेनी मतें पाहे तो उच्चार। परी सारासारविचार कीर्तनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पुराणाच्या गोष्टी। कीर्तन वाक्पुटीं करा सुखें ॥ ४ ॥

१४१९ नेणें वेदशास्त्र पुराण पठण। तेणें नाम-कीर्तन करावें ॥ १ ॥ कलीमाजीं सोपा मार्ग। तरा-वया जग उत्तम हें ॥ २ ॥ नोहे यज्ञ यागयोग व्रत। करावें व्रत एकादशी ॥३॥ एका जनार्दनीं सार। वाचे उच्चार हरिनाम ॥ ४ ॥

१४२० एक कीर्तन करितां पंढरीसी। सुकृताच्या राशी ब्रह्मा नेणें ॥ १ ॥ संतसमागम टाळ घोळ नाद। ऐकतां गोविंद सुख पावे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी विनवणी। मस्तक चरणीं ठेवितसे ॥ ३ ॥

१४२१ योगी शिणती साधनीं। पावन होती ते कीर्तनीं ॥ १ ॥ अष्टांग धूम्रपान। तया श्रेष्ठ हें साधन ॥ २ ॥ समाधी उन्मनी। कीर्तनीं पावन हे दोनी ॥ ३ ॥ चौदेहांसी अतीत। कीर्तनें होतीं ते मुक्त ॥ ४ ॥ कर्म धर्म न लगे श्रम। व्यर्थ वाउगा विश्राम ॥ ५ ॥ कीर्तन छंद निशिदिनीं। एका शरण जनार्दनीं ॥ ६ ॥

१४२२ ऐसी कीर्तनाची आवडी। प्रायाश्चित्तें जाली देशधडी ॥ १ ॥ होती तीर्थें तीं बापुडीं। मळ रोकडी टाकिती ॥ २ ॥ ऐकोनी कीर्तनाचा गजर। ठेला यमलोकींचा व्यापार ॥ ३ ॥ यमपाश टाकिती खालीं। देखोनि कीर्तनाची चाली ॥ ४ ॥ ऐसा कीर्तन-सोहळा। एका जनार्दनीं देखे डोळां ॥ ५ ॥

१४२३ येती कीर्तना आल्हादें। गाती नाचती परमानंदें। सुखाचीं तीं दोंदें। आनंदें तयासी ॥१॥ धन्य धन्य कीर्तन। धन्य धन्य संतजन। जाले कीर्तनीं पावन। परमानंदगजरीं ॥ २ ॥ हरि कृष्ण गोविंद। हाचि तया नित्य छंद। तेणें जाय भेदाभेद। कीर्तन-गजरीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सार। कीर्तनीं केलासे निर्धार। आणिक नाहीं दुजा विचार। कीर्तना-वांचोनी ॥ ४ ॥

१४२४ कीर्तन ते पूजा कीर्तन तें भक्ति। कीर्तनें होय मुक्ति सर्व जीवां ॥ १ ॥ पातकी चांडाळ असोत भलते। कीर्तनीं सरते कलियुगीं ॥ २ ॥ कीर्तन श्रवण मनन पठण। कीर्तनें पावन तिन्ही लोक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कीर्तनीं आवडी। घाली-तसे उडी वैकुंठाहुनी ॥ ४ ॥

१४२५ करितां भगवद्भक्ती। चारी मुक्ती पायां लागती ॥ १ ॥ ऐसा लाभ नाहीं कोठें। कीर्त-नामाजी देव भेटे ॥ २ ॥ योगयाग तप साधन। कासया तें ब्रह्मज्ञान ॥ ३ ॥ न लगे तीर्थांचें भ्रमण। सदा ध्यान नारायण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भक्ति। तेणें पावे उत्तम गती ॥ ५ ॥

१४२६ सेवितां कथासार अमृत। तेणें गोड जाले भक्त ॥ १ ॥ मातले मरणातें मारिती। धाके पळती यमदूत ॥ २ ॥ प्रेमें नाचे कथामेळीं। सुखकल्लोळीं हरिनाम ॥ ३ ॥ गर्जती नाम सदा वाचे। एका जनार्दन तेथें नाचे ॥ ४ ॥

१४२७ कीर्तनीं आवडी जया नरा देखा । चुकतील खेपा जन्मकोटी ॥१॥ कीर्तनीं समाधी कीर्तनीं समाधी । पुढें आधीव्याधी कीर्तनेंची ॥ २ ॥ कीर्तनें बोध कीर्तनें सिध्दी । एका जनार्दनीं गोविंदीं कीर्तनीं ऐक्य ॥ ३ ॥

१४२८ पुरुष अथवा नारी । नाचती कीर्तन गजरीं ॥ १ ॥ तया कोणी जे हांसती । त्यांचे पूर्वज नरका जाती ॥ २ ॥ आपुली आपण । कीर्तनीं सोडवण ॥ ३ ॥ देहीं असोनी विदेहता । कीर्तनीं होय पैं तत्त्वतां ॥ ४ ॥ ऐसा कीर्तनमहिमा । एका जनार्दनीं उपमा ॥ ५ ॥

१४२९ सर्वभावें जे झाले उदास । धरूनियां आस कीर्तनीं ॥ १ ॥ सर्व काळ सर्व वाचे । सर्व साचें कीर्तन ॥ २ ॥ सर्वा देहीं सर्व विदेहीं । सर्वा वदवी कीर्तन ॥ ३ ॥ सर्व मनीं सर्व ध्यानीं । सर्वा ठिकाणीं कीर्तन ॥ ४ ॥ सर्व देशीं सर्व गांवीं । एका भावीं कीर्तन ॥ ५ ॥

१४३० ऐशी शांती जयासी देखा । तोचि सर्व भूतांचा सखा ॥ १ ॥ सर्व लोकां आवडता । जाला सरता कीर्तनीं ॥ २ ॥ नवलावो तयाचा भावो । सर्वा ठायीं देखे देवो ॥ ३ ॥ सर्व दृष्टीचा देखणा । शरण एका जनार्दना ॥ ४ ॥

१४३१ हेंचि कलीमाजीं साधन । आवडी कीर्तन हरीचें ॥ १ ॥ न घडे योगयागतप । होय अनुताप कीर्तनीं ॥ २ ॥ भावभक्ति लागे हातीं । प्रेम धरिती कीर्तनीं ॥ ३ ॥ आवडी धरा हरिकीर्तनीं । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

१४३२ नरदेहा येउनी करावें कीर्तन । वाचे नामस्मरण विठ्ठलाचें ॥ १ ॥ आणिक सायास न करी आळस । सर्वकाळ सोस हाचि वाहे ॥ २ ॥ घटिका आणि पळ न वेंचीं वांयां । नामस्मरणीं काया झिजवावी ॥ ३ ॥ प्रपंच परमार्थ करी कां रे सारखा । संसार पारखा करुनी सांडी ॥ ४ ॥ माईक हें धन इष्टमित्र सखे । अंतकाळीं पारखे अवघे चोर ॥ ५ ॥ एका जनार्दनीं न धरी भरंवसा । कोण यमपाशा चुकवील ॥ ६ ॥

१४३३ देह लावी हरिकीर्तनीं । येर कारणीं पडूं नको ॥ १ ॥ सोडी संसाराचा छंद । कीर्तनीं गोविंद आठवा ॥ २ ॥ होई दास संतचरणीं । पायवणी वंदीं तूं ॥ ३ ॥ काया लावी देवाकडे । येर सांकडें वारील ॥ ४ ॥ अनुमोदन सर्वांठायीं । मन देई हरि-चरणीं ॥ ५ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । काया वाचा भाविका सांगत ॥ ६ ॥

१४३४ नरदेह उत्तम चांग । धरा लाग कीर्तनीं ॥१॥ वांयां जाऊं नेदी घडी । करा जोडी कीर्तन ॥ २ ॥ क्षणभंगुर हा देहो । करा लाहो कीर्तनीं ॥ ३ ॥ संसार अवघा नासे । खरें दिसे कीर्तन ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनीं एका । उपाय निका कीर्तन ॥ ५ ॥

१४३५ शुद्ध ज्याचें मन । तया आवडे कीर्तन ॥ १ ॥ येर ते पामर पातकी । दैन्यवाणे तिहीं लोकीं ॥ २ ॥ नावडे हरीचें कीर्तन । तेथें वसे नाना विघ्न ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं । करा कीर्तन अनुदिनीं ॥ ४ ॥

१४३६ भुलले ते प्राणी विसरले कीर्तना । अंतीं त्या पतना वारी कोण ॥ १ ॥ जयांसी नावडे हरीचें कीर्तन । ते जाणावे पाषाण कलीमाजीं ॥ २ ॥ मागें सांगितलें संतीं अनुभवुनी । तरावया जनीं कीर्तन नौका ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साराचें हें सार । कीर्तनें भवपार मृत्युलोकीं ॥४॥

१४३७ करुनी हरिकीर्तन । तेथें सेविती जे अन्न ॥१॥ ऐसे अभागी खळ । परम चांडाळ कलीयुगीं ॥ २ ॥ हरिकथा माउली । विकिताती अर्थ भुली ॥ ३ ॥ पंच महापातक । तयां घडे दोष देख ॥ ४ ॥ एका जनार्दनीं । करा कीर्तन अनुदिनीं ॥ ५ ॥

१४३८ करुनी कीर्तन मागती जे द्रव्य । तें जाणावें वैधव्य विधवेचें ॥ १ ॥ सर्व अलंकार शरीर शोभलें । वांयां परी गेलें कुंकूहीन ॥ २ ॥ मानवानें भावें करावें कीर्तन । आनंदें वर्तन वैष्णवांपुढें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कामनीक कीर्तन । करितां पतन जन्मोजन्मीं ॥४॥

१४३९ वाउगा पसारा नेणें तो पामर । कीर्तनीं निर्धार ठेवीचिना ॥ १ ॥ सोपें हें वर्म कीर्तन हरीचें । उच्चारी रे वाचे रामनाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं कीर्तन आदरें । सर्वभावें निर्धारें श्रवण करी ॥ ३ ॥

१४४० जो जो काळ वेंचिता कीर्तनीं । तो तो सार्थक जनीं होतसे ॥ १ ॥ साधन जागा साधन जागा । पुढें दगा चुकवी ॥ २ ॥ करी कीर्तनीं तूं वेग । तेणें संग तुटेल ॥ ३ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । उपाय सोपा कलीमाजीं ॥ ४ ॥

१४४१ सप्रेम नाचोनि वाजवा टाळी । गर्जो हरिकथा नामावळी ॥ १ ॥ ऐशी कथेची आवडी । दोष गेले देशोधडी ॥ २ ॥ सेवितां कथामृतसार । दीनवदनें दिसे संसार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रेम । स्वयें सांगे पुरुषोत्तम ॥ ४ ॥

१४४२ दीन म्हणोनी नाच रे कीर्तनीं । तेणें चक्रपाणी करी कृपा ॥ १ ॥ अनाथाचा नाथ पतीतपावन । म्हणोनि कीर्तन तया गोड ॥ २ ॥ एका जनार्दनीं गोडाचें तें गोड । कीर्तन सुरवाड तिहीं लोकीं ॥ ३ ॥

१४४३ अपाय उपाय न टाकी कीर्तन । सदा सर्वकाळ ध्यान रामकृष्ण ॥ १ ॥ तयाचिये घरीं वसे नारायण । लक्ष्मीसह आपण कार्य करी ॥ २ ॥ एका जनार्दनीं कीर्तनासाठीं । देव धांवे पाठीं त्या मागें ॥ ३ ॥

१४४४ नसे वैकुंठीं हरी । नाचे कीर्तनीं परोपरी । भक्तांबरोबरी । पाठीं धांवे तयाच्या ॥ १ ॥ म्हणोनि करावें कीर्तन । तेणें तुष्टे नारायण । मनोरथ करी पूर्ण । इच्छिलें ते सर्वदा ॥ २ ॥ आणा अनुभव मनीं । करा कीर्तन अनुदिनीं । एका जनार्दनीं । उभा असे कीर्तनीं ॥ ३ ॥

१४४५ साधन नको आणिक कांहीं । करीं लवलाही कीर्तन ॥ १ ॥ मोक्ष मुक्ती ठाके पुढें । येर अवघें तें बापुडें ॥ २ ॥ भक्ति साधे नवरत्न । कीर्तनें होती ते पावन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । ओहं सोहं कोहं जाती पळून ॥ ४ ॥

१४४६ समाधीचें स्थान हरिकीर्तन । येर अवघा वांयां शीण । कासया गुदाग्रीं अंगुष्ठ लाऊन । खटाटोप पसारा ॥ १ ॥ राम कृष्ण हरि वासुदेवा । हाचि छंद असो जीवा ॥ धृ० ॥ आसन ध्यान मुद्रा लक्षण । कर्मकांड क्रिया धर्म जाण । वाउगें कासया भस्मलेपन । कीर्तन अंतरीं नसेची ॥ २ ॥ माळा मुद्रा शृंगार भारी । भाळे भोळे भोंदी निरंतरीं । ऐशी कीर्तनमर्यादा नाहीं निर्धारीं । निरपेक्ष हरिकीर्तन ॥ ३ ॥ श्रोता वक्ता होउनी सावधान । परनिंदा परपीडा टाकून । कीर्तन करावें श्रवण । रामकृष्ण नामें उच्चार ॥ ४ ॥ ऐसें ऐकतां कीर्तन । समाधीसी तेथें समाधान । अष्टांगादि कर जोडोन । उभे सर्वदा राहाती ॥ ५ ॥ कीर्तन होय सर्व सिद्धी । तुटती भवपाश आधिव्याधी । एका जनार्दनीं नाहीं उपाधी । कीर्तन श्रवण केलिया ॥ ६ ॥

१४४७ जें पदीं निरूपण तेंचि हृदयीं ध्यान । तेथें सहजीं स्थिर राहे मन ॥ कीर्तनासी तोषोनि काळिकाळ तुष्टला । समाधीसी समाधान रे ॥ १ ॥ कीर्तनें सिद्धि कीर्तनें सिद्धी । कीर्तनें समाधान बुद्धी ॥ कीर्तनीं विनटले नारद प्रल्हाद । द्वंद्वामाजीं समाधी रे ॥ २ ॥ कीर्तनीं सद्भाव अखंड अहर्निशीं । पाप न रिघे त्याच्या देशीं ॥ निजनामें निष्पाप अंतर देखोनी । देव तिष्ठे तयापाशीं रे ॥ ३ ॥ हरिनाम कीर्तनें अभिमान सरे । आणिक श्रेष्ठ आहे काज ॥ सद्भावें कीर्तनीं गातां पैं नाचतां । लोकेषणा सांडीं लाज रे ॥ ४ ॥ कलीमाजीं कीर्तन श्रेष्ठ पैं साधन । साच न मानी ज्याचें मन ॥ नामासी विन्मुख जन्म त्यासी दुःख । त्या केविं होय समाधान रे ॥ ५ ॥ कीर्तनाचेनि पंथें लाजविलीं तीर्थें । जप तपासी केलें मुक्त ॥ हरिनामें लोधला देवाधिदेवो । वैकुंठीच केलें तेथें रे ॥ ६ ॥ व्रतां तपां तीर्थां न भेटे जो पहातां । तो कीर्तनीं सांपडे देवो ॥ तनु मन प्राणें कीर्तनीं विनटलें । भावा विकला वासुदेवो रे ॥ ७ ॥ एका जनार्दनीं कीर्तन भावें । श्रोता वक्ता ऐसें लाहावें ॥ गर्जत नामें निशाण लागुनि । सकळिकां वैकुंठासी जावें रे ॥ ८ ॥

१४४८ सदैव आवडे ज्यां कीर्तन । धन्य पावन जगीं ते ॥ १ ॥ ब्रह्मचारी गृहस्थाश्रमीं । करिती कीर्तन निजधार्मीं ॥ २ ॥ शुद्र अथवा अति निंद्य । कीर्तनीं वंद्य सर्वथा ॥ ३ ॥ यवन मातंगादि जन । कीर्तनीं पावन कलियुगीं ॥ ४ ॥ एका शरण जीवेंभावें । सदा कीर्तन करावें ॥ ५ ॥

१४४९ दुर्जेपणें पाहे तरी देवाचे चरण । आणि तें नर्तन वैष्णवांचें ॥ १ ॥ कीर्तनीं नाचती हरिदास प्रेमें । दुर्जेपणा नेमें हारुनी जाय ॥ २ ॥ एका जनार्दनीं दुर्जेपणा टाकुनी । वासुदेवचरणीं लीन होई ॥ ३ ॥

१४५० कायावाचामनें निग्रह करीं । कीर्तन सर्वभावें ऐकें निर्धारीं । अष्टांग साधन न करीं । सुखें करीं कीर्तन ॥ १ ॥ देव तुष्टेल तुष्टेल । सर्वभाव तुझा पुरवेल ॥ धृ० ॥ शांती क्षमा दया उन्मनी । आशा मनीषा तृष्णा दवडोनी । काम क्रोध मद लोभ बंदीखानीं । घालीं नेउनी निर्धारें ॥ २ ॥ सर्वांभूतीं समदृष्टी । पाहे सर्व एकमय सृष्टी । तरी ऐक्य कीर्तनगोष्टी । परमानंदें आल्हाद ॥ ३ ॥ धरी

संतांचा सांगात । कीर्तनीं करीं शुद्ध चित्त । एका जनार्दनीं वचनार्थ । राम हरि गोविंदा ॥ ४ ॥

१४५१ पाहूं गेलिये हरि जागरा । नयन लांचावले नंदकुमारा ॥ १ ॥ तान्हया रे मनमोहना । देहगेहाची तुटली वासना ॥ २ ॥ आदरें आवडी ऐकतां नाम । नाममात्रें जालों निष्काम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हरि-कीर्तन । समाधीसी तेथें समाधान ॥ ४ ॥

१४५२ नसे वैकुंठीं अणुमात्र । नाचतां पवित्र कीर्तनीं ॥ १ ॥ त्याचा छंद माझे मनीं । अनुदिनीं कीर्तन ॥ २ ॥ नेणे कांहीं दुजें आर्ता । कीर्तनापरता छंद नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेध । कीर्तन छंद गोड देखा ॥ ४ ॥

१४५३ आणिक तें आम्हां न दिसे प्रमाण । कीर्त-नावांचून आनु नेणों ॥ १ ॥ राम कृष्ण हरि विठ्ठल उच्चार । करूं हा गजर पाहूं टाळी ॥ २ ॥ आनंदे नामावळी गाऊं पैं कीर्तनीं ।श्रुती टाळ घोळ लाऊनी गजरेंसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हाचि आम्हां छंद । वाऊगा तो ढंग न करूं कांहीं ॥ ४ ॥

१४५४ आमुच्या स्वहिता आम्हीं जागूं । वाउग्या न लागूं मार्गासी ॥ १ ॥ करूं पूजन संतसेवा । हेंचि देवा आवडतें ॥ २ ॥ तुळसीमाळा घालूं गळां । मस्तकीं टिळा चंदन ॥ ३ ॥ मुद्रा अलंकार भूषण । करूं कीर्तन दिननिशीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं न सेवूं आन । वाहूं आण देवाची ॥ ५ ॥

१४५५ मागणें तें आम्हीं मागूं देवा । देई हेवा कीर्तनीं ॥ १ ॥ दुजा हेत नाहीं मनीं । कीर्तनांवांचुनी तुमचीया ॥ २ ॥ प्रेमें हरिदास नाचत । कीर्तन होत गजरीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । पावन होती चराचर जाण ॥ ४ ॥

१४५६ धन्य धन्य कीर्तन जगीं । संत तेथीं सभागीं ॥ १ ॥ गाती कीर्तनीं उल्हास । सदा प्रेमें हरिदास ॥ २ ॥ नाहीं आणिक चिंतन । करती आदरें कीर्तन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । जालों कीर्तनीं पावन ॥ ४ ॥

१४५७ नेणों कळायुक्ती व्युत्पत्ती सर्वथा । करूं हरिकथा नाम गाऊं ॥ १ ॥ कलियुगामाजीं साधन वरिष्ठ । श्रेष्ठांचें तें श्रेष्ठ नाम जपूं ॥ २ ॥ हाचि अनु-भव बहुतांसी आला । म्हणोनि वर्णिला नाममहिमा ॥३॥ एका जनार्दनीं नामयज्ञ कथा । पावन सर्वथा जड मूढा ॥ ४ ॥

१४५८ एकचि नाम वाचे । श्रीरामाचें सर्वकाळ ॥१॥ पर्वत उल्लंघी पापाचे । नाम वाचे वदतांची ॥ २ ॥ आवडी करितां कीर्तन । नासे भवाचें बंधन ॥ ३ ॥ श्रेष्ठ साधन कीर्तन । तेणें तोषे जनार्दन ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । मना होय समाधान ॥ ५ ॥

१४५९ वसो कां भलते ठायीं जन । परी कीर्तन करी हरीचें ॥१॥ तोचि सर्वांमध्यें वरिष्ठ । एकनिष्ठपणें होतां कीर्तनीं ॥ २ ॥ मनीं वसो सदा कीर्तन । अहर्निशीं ध्यान कीर्तनीं ॥ ३ ॥ पावन तो तिहीं लोकीं । एका अवलोकीं तयातें ॥ ४ ॥

१४६० या हो या चला जाऊं कीर्तना । आनंद तेणें मना नाचती वैष्णव ॥ १ ॥ राम कृष्ण हरि वासुदेवा । गाताती प्रेमभावा आवडी आदरें ॥ २ ॥ सुख तेथें शांती विरक्ति कोण पुसे । सबाह्य अभ्यंतरीं अवघा वासुदेव वसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वासुदेवीं मन । जन वन तेथें अवघा जनार्दन ॥ ४ ॥

१४६१ नवल भजनाचा भावो । स्वतां भक्तची होय देवो ॥ १ ॥ वाचे करितां हरिकीर्तन । उन्मनी मन निशिदिनीं ॥ २ ॥ नाहीं प्रपंचाचें भान । वाचे सदा नारायण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मुक्त । सबाह्य अभ्यंतरीं पतीत ॥ ४ ॥

१४६२ तान मान सर्वथा । तें भजन न मने चित्ता ॥ १ ॥ वेडेंवाकुडें तुमचें नाम । गाईन सदोदित प्रेम ॥२॥ वाचा करुनी सांवळी । उच्चारीन नामावळी ॥३॥ नाम तारक हें जनीं । व्यास बोलिले पुराणीं ॥४॥ एका जनार्दनीं जप । सुलभ आम्हां विठ्ठल नाम देख ॥ ५ ॥

१४६३ ऐसें सुख कोठें आहे । भजन सांडोनि करिशी काय ॥ १ ॥ सांडोनि भजनाचा प्रेमा । मुक्ति मागसी अधमा ॥ २ ॥ सांडोनियां संतसंग । काय मुक्ती ते अभंग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मुक्ती । भजन केलिया दासी होती ॥ ४ ॥

१४६४ वाहूनियां हातीं टाळी । करूं भजन प्रेमळीं ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वाचे वदूं । दुजा नाहीं आम्हां छंदु ॥ २ ॥ जाऊं पंढरीस नेमें । संतासंगें अनुक्रमें ॥ ३ ॥ पुंडलीक चंद्रभागा । दरुशनें जाय पापभंगा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं स्नान । पातकें पळती रानोरान ॥ ५ ॥

१४६५ भजन भावें गाऊं भजन भावें ध्याऊं। भजन भावें पाहूं विठोबासी ॥ १ ॥ भजन तें सोपें भजन तें सोपें। हरतील पापें जन्मांतरींचीं ॥ २ ॥ घालूं तुळशीमाळा गोपीचंदन ललाटीं। देखतां हिंपुटी यम पळे ॥ ३ ॥ सांडूनियां आशा जालों वारकरी। एका जनार्दनीं पंढरी पाहूं डोळां ॥ ४ ॥

१४६६ भजन भावातें उपजवी। देव भक्तातें निपजवी ॥ १ ॥ ऐसा भजनेंचि देव केला। भक्त वडिल देव धाकुला ॥ २ ॥ भक्ताकारणें हा संकल्प। भक्त देवाचाहि बाप ॥ ३ ॥ देव भक्ताचीये पोटीं। जाला म्हणोनी आवड मोठी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नवलावो। भक्ताचि कैसा जाला देवो ॥ ५ ॥

१४६७ जीव परमात्मा दोन्ही। ऐसे जाणती तेचि ज्ञानी ॥ १ ॥ ऐसें असोनि संपन्न। सदा करिती माझे भजन ॥ २ ॥ माझ्या भजना हातीं। उसंतु नाहीं दिवसरातीं ॥ ३ ॥ जन नोहे जनार्दन। एका जनार्दनीं लोटांगण ॥ ४ ॥

१४६८ भजन पूजन करितां। देव भक्तांचा होय दाता ॥ १ ॥ भजनमहिमा निस्सीम। अधमहि पदवी उत्तम ॥ २ ॥ ज्ञानीं गुंतले उत्तम। भजनीं उद्धरिले अधम ॥ ३ ॥ दीनोद्धरण जनार्दन। एका जनार्दनीं शरण ॥ ४ ॥

१४६९ हरिभजनीं घेतां गोडी। निवारे जन्ममरण कोडी ॥ १ ॥ भावें करितां हरीचें भजन। देवा होय समाधान ॥ २ ॥ हरिभजनाची आवडी। काळ केला देशोधडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भजन। भजनीं पावे समाधान ॥ ४ ॥

१४७० काया वाचा आणि मन। एक करुनी करी भजन ॥ १ ॥ हाचि मुख्य भजनभावो। सांडीं भेद अभेदाचा ठावो ॥ २ ॥ मना धरूनियां शांती। प्रेमें भजें कमळापती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भजन। तेणें पावसी समाधान ॥ ४ ॥

१४७१ नवल रोग पडिपाडू। गोड परमार्थ झाला कडू ॥ १ ॥ विषय व्याधीचा उफाडा। हरिकथेचा घ्यावा काढा ॥ २ ॥ ऐसा रोग देखोनि गाढा। एका जनार्दन धांवे पुढा ॥ ३ ॥

१४७२ नित्य हरिकथा वैष्णव सांगात। तोचि परमार्थ शुद्ध त्याचा ॥ १ ॥ नाहीं कधीं द्वैत सदा तें अद्वैत। अभेदरहित सर्वकाळ ॥ २ ॥ परमार्थसाधनीं झिजवितसे अंग। वाउगा उद्योग न करी कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा ज्याचा हेत। त्याचे मनोरथ पूर्ण होती ॥ ४ ॥

१४७३ करी हरिकथा टाकी दंभमान। वायांचि पतन पडूं नको ॥ १ ॥ नामाचा विश्वास संतांचा सांगात। तेणें तुझें हित सर्व होय ॥ २ ॥ द्रव्य दारा यांचा मानी पा विटाळ। सर्वा ठायीं निर्मळ होसी बापा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा धरी मार्ग। सोपा संसर्ग पूर्वजांसी ॥ ४ ॥

१४७४ धरितां श्रीहरीचें ध्यान। समाधीस समाधान ॥१॥ तो सोपा आम्हांलागीं। उघडा पहा धन्य जगीं ॥२॥ कीर्तनीं नाचतो भक्तांमागें। मन वेधिलें या श्रीरंगें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुखाची भेटी। झालिया होय जन्ममरण तुटी ॥ ४ ॥

१४७५ चरणीं ठेउनि माथा संतांसी पुजावें। उगेंचि ऐकावें हरिकीर्तन ॥ १ ॥ कलीमाजीं श्रेष्ठ कलीमाजी श्रेष्ठ। कीर्तन बोभाटें पळती दोष ॥ २ ॥ न लगे नाना युक्ती व्युत्पत्तीचें वर्म। हरीचें कीर्तन सोपें बहु ॥ ३ ॥ योगयागादिक नोहें यथासांग। तेणें होय भंग सर्व कर्मा ॥४॥ एका जनार्दनीं धरुनि विश्वास। जाई तूं संतांस शरण सुखें ॥ ५ ॥

१४७६ आजी परमानंद मानसीं। संत भेटतां सुखराशी। कीर्तनें तारिले सर्वांसी। विठ्ठल नामस्मरणें ॥ १ ॥ धन्य धन्य विठ्ठल मंत्र। सोपा तीन अक्षरीं पवित्र। कळिकाळ उघडोनि नेत्र। पाहूं न शके जयासी ॥ २ ॥ एका जनार्दनीं शुद्ध भक्ति। कीर्तनें प्राप्त सर्व स्थिती। जयजय रामकृष्ण म्हणती। ते तरती कलीमाजीं ॥ ३ ॥

१४७७ नित्य नवा कीर्तनीं कैसा वोढवला रंग। श्रोता आणि वक्ता स्वयें जाला श्रीरंग ॥ १ ॥ आल्हादें वैष्णव करती नामाचा घोष। हरिनाम गर्जतां गगनीं न माये हरुष ॥ २ ॥ पदोपदीं कीर्तनीं निवताहे जन मन। आवडी भुकेली तिनें गिळिलें गगन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गातां हरीचें नाम। निमालीं इंद्रियें विषय विसरली काम ॥ ४ ॥

## संतमहिमा

१४७८ उद्धवा स्वमुखें सांगे श्रीकृष्ण। संतसेवा जाण सर्वश्रेष्ठ ॥ १ ॥ हाची योग जाण उद्धवा

स्वीकारी । आणिक न करी भरोवरी साधन उद्धवा ॥ २ ॥ योगयाग तप व्रत कसवटी । न करीं आन गोष्टीरे उध्दवा ॥ ३ ॥ कीर्तन भजन सर्वभावें करी । जाई संतद्वारीं शरणागत रे उद्धवा ॥ ४ ॥ मनींचें निजगुज सांगितलें तुज । एका जनार्दनीं निज साधे रे उद्धवा ॥ ५ ॥

१४७९ ऐक रे उद्धवा तुज सांगतों गुज । संतचरणरज वंदी तूं सहज । तेणें कार्य कारण होईल तुज । अंतरदृष्टी करुनी परीस निज ॥ १ ॥ घाली लोटांगण वंदी चरण । कायावाचामनें धरुनी जीवीं॥धृ॥ आलीया संतजन आलिंगन देई । पूजा ती बरवी समर्पावी । ज्ञान ध्यान त्यांचे करावें जीवीं । हेतु सर्व भावीं मनीं धरी उद्धवा ॥ २ ॥ कायिक वाचिक मानसिक भाव । अर्पी तेथें जीव देहभाव । एका जनार्दनीं तयाचें वैभव । सांगितलें तुज उद्धवा ॥३॥

१४८० उद्धवा तूं धर संतसमागम । तेणें भवश्रम हरे उद्धवा ॥ १ ॥ सांगतसे गुज मना धरीं रे उद्धवा । आणीक श्रम वांया न करी रे तें ॥ २ ॥ तयाची संगती उद्धवा धरावी । सेवा ते करावी काया वाचा ॥ ३ ॥ मज तयाचा वेध उद्धवा प्रसिध्द । तूं सर्वभावें सद्‍गद नाम घेई ॥ ४ ॥ ज्याची आवडी मजसी उद्धवा । जाई तया ठायां प्रेमभरित ॥ ५ ॥ उच्च नीच कांहीं न म्हणें उद्धवा । एका जनार्दनीं तया शरण जावें ॥ ६ ॥

१४८१ उद्धव बोले कृष्णाप्रती । ऐकोनि संतांची कीर्ति । धन्य वैष्णव होती । कलीमाजीं ॥ १ ॥ तुम्हां जयाचा निजछंद । मानीतसा परमानंद । अखंड तयाचा वेध । तुमचे मनीं ॥२॥ ऐसी याची संगती । मज घडो अहोरातीं । नये पुनरावृत्ती । पुनः जन्मासी ॥३॥ हर्षें देव सांगे आपण । उद्धवा तयाचें मज ध्यान । एका जनार्दनीं शरण । ते मज आवडती ॥ ४ ॥

१४८२ मज तयांची आवड । पुरवणें लागे त्याचें कोड । गर्भवास सांकड । तयालागीं उद्धवा ॥ १ ॥ घेऊनि अवतार । करी दुष्टांचा संहार । माझा हा बडिवार । तयांचेनि उद्धवा ॥ २ ॥ माझें जप तप अनुष्ठान । देव पूजा मंत्र पठण । नाना नेमादि साधन । संत माझे उद्धवा ॥ ३ ॥ मज आणिलें नामरूपा । त्यांची मजवर कृपा । दाविला हो सोपा। मार्ग मज उद्धवा ॥ ४ ॥ माझा योगयाग सर्व । संत माझें वैभव । वैकुंठादि राणीव । तयाचेनि मज उद्धवा ॥ ५ ॥ ऐसें वरिष्ठ पावन । पुनीत केलें मजलागून । एका जनार्दनीं शरण । तयांसीच उद्धवा ॥६॥

१४८३ मीही संतचरण वंदीतसें माथां । वेदादि साम्यता थोडी तेथें ॥ १ ॥ पुराणासी धाड पडलें सांकडें । शास्त्रांचें तें कोडें उगवेल ॥ २ ॥ अहं ब्रह्म ऐसा श्रुति वेवादती । नेति त्या म्हणती तटस्थ ठेल्या ॥ ३ ॥ उपासनामार्ग परंपरा जाला । तो बोध तुला सांगितला ॥ ४ ॥ एका जनार्दनीं संतांचा सांगात । न चुको देऊं हित आपुलें तूं ॥ ५ ॥

१४८४ भांबावला देव संतांमागें धांवे । उघडावि प्रभवे पंढरीये ॥ १ ॥ युगें अठ्ठावीस पुंडलिकासाठीं । उभा जगजेठी विटेवर ॥ २ ॥ यावें तया धावें क्षेमालिंगन । पुसावा तो शिणभाग त्यास ॥ ३ ॥ कुर्वाळुनी करें धरी हनुवटी । म्हणे मजसी भेटी तुमची झाली ॥ ४ ॥ लाघव तयासी दावी आपुलें बळें । पुरवावे लळे सत्य त्याचे ॥ ५ ॥ जैशी ज्याची भावना आपण पुरवी । एका जनार्दनीं गोंवी आपणाकडे ॥ ६ ॥

१४८५ ज्या सुखाकारणें देव वेडावला । वैकुंठ सांडुनी संतसदनीं राहिला ॥ १ ॥ धन्य धन्य संतांचें सदन । जेथें लक्ष्मीसहित शोभे नारायण ॥ २ ॥ सर्व सुखांची सुखराशी । संतचरणीं भुक्तिमुक्ति दासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पार नाहीं सुखा । म्हणोनि देव भुलले देखा ॥ ४ ॥

१४८६ वैष्णवाघरीं देव सुखावला । बाहीर नवजे दवडोनि घातिला ॥ १ ॥ देव म्हणे माझें पुरतसें कोड । संगती गोड या वैष्णवांची ॥ २ ॥ जरी देव नेउनी घातिला दुरी । परतोनि पाहे तंव घराभीतरीं ॥ ३ ॥ कीर्तनाची देवा आवडी मोठी । एका जनार्दनीं पडली मिठी ॥ ४ ॥

१४८७ संतापोटीं देव वसे । देवा पोटीं संत असे ॥१॥ ऐसा परस्परें मेळा । देव संतांचा अंकिला ॥ २ ॥ संतांठायीं देव तिष्ठे । देव तेथें संत वसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । देव तयांचा अंकित ॥ ४ ॥

१४८८ संत ते देव देव ते संत । ऐसा हेत दोघांचा ॥ १ ॥ देव ते संत संत ते देव । हाचि भाव दोघांचा ॥ २ ॥ संतांविण देवा कोण । संत ते जाण

देवासी ॥ ३ ॥ फळपुष्प एका पाठीं । एका जनार्दनीं राहाटी ॥ ४ ॥

१४८९ संतांअंकीं देव वसे । देवाअंकीं संत बैसे ॥ १ ॥ ऐसा परस्परें मिळणी । समुद्रतरंग तैसे दोन्ही ॥ २ ॥ हेम अलंकारवत । तैसे देव भक्त भासत ॥ ३ ॥ पुष्पीं तो परिमळ असे । एका जनार्दनीं देव दिसे ॥ ४ ॥

१४९० संत आधीं देव मग । हाचि उगम आणा मना ॥ १ ॥ देव निर्गुण संत सगुण । म्हणोनि महिमान देवासी ॥ २ ॥ नाम रूप अचिंत्य जाण । संतीं सगुण वर्णिले ॥ ३ ॥ मुळीं अलक्ष लक्षा नये । संतीं सोय दाविली ॥ ४ ॥ एका जनार्दनीं संत थोर । देव निर्धार धाकुला ॥ ५ ॥

१४९१ संतांचा महिमा देवचि जाणें । देवाची गोडी संतासी पुसणें ॥ १ ॥ ऐसी आवडी एकमेकां । परस्परें नोहे सुटिका ॥ २ ॥ बहुत रंग उदक एक । यापरी देव संत दोन्हीं देख ॥ ३ ॥ संताविण देवा न कंठे घडी । उभयतां गोडी एक असे ॥ ४ ॥ मागें पुढें नाहो कोणी । शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

१४९२ देवाचे सोईरे संत ते जाणावें । यापरतें जीवें नाठवी कोणा ॥ १ ॥ पडतां संकट आठवितसे संतां । त्याहुनी वारिता नाहीं दुजा ॥ २ ॥ म्हणोनि घरटी फिरे तया गांवीं । सुदर्शनादि मिरवी आयुधें हातीं ॥ ३ ॥ लाडिके डिंगर वैष्णव ते साचे । एका जनार्दनीं त्यांचे वंदी पाय ॥ ४ ॥

१४९३ संत देवाचा लाडका । देव तेणें केला बोडका ॥ १ ॥ अर्थ पाहतां सखोल असे । बोडका देव पंढरी बसे ॥२॥ संत लाडका देव बोडका । म्हणे जनार्दन लाडका एका ॥ ३ ॥

१४९४ पंढरीये देव आला । संतभारें तो वेष्टिला ॥ १ ॥ गुळासवें गोडी जैसी । देवासंगें दाटी तैसी ॥ २ ॥ झाले दोघां एकचित्त । म्हणोनि उभाचि तिष्ठत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । संतापायीं ठेविला जीव ॥ ४ ॥

१४९५ पुंडलीक संत भला । तेणें उद्धार जगाचा केला ॥ १ ॥ तयाचे वंदावे चरण । कायावाचामनें करून ॥ २ ॥ उपाधिसंग तुटती व्याधी । एका जनार्दनीं समाधी ॥ ३ ॥

१४९६ अंकिला देव संतद्वारीं । भिक्षा मागे तो निर्धारीं ॥ १ ॥ मज द्याहो प्रेमभिक्षा । देव बोले तया प्रत्यक्षा ॥ २ ॥ नाम गाणें हेंचि दक्ष । एका जनार्दनीं प्रत्यक्ष ॥ ३ ॥

१४९७ संतचरणरज वंदुनी तत्त्वतां । सायुज्य भक्ती माथां पाय देऊं ॥ १ ॥ थोरीव थोरीव संतांची थोरीव । आणिक वैभव कांहीं नेणें ॥ २ ॥ संतांपरतें दैवत नाहीं जया चित्तीं । तोचि एक पूर्णस्थिति ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥ संत तोचि देव जयांची वासना । एका जनार्दनीं भावना नाहीं दुजी ॥ ४ ॥

१४९८ उघड बोलती संत । जैसा हेत पुरविती ॥१॥ मनीचें जाणती ते सदा । होऊं नेदी विषयबाधा ॥२॥ अज्ञान सज्ञान । तारिती कृपें करून ॥ ३ ॥ संतांपायीं ज्याचा भाव । तेथें प्रगटेचि देव ॥ ४ ॥ एका जनार्दनीं बा ॥ । द्यावा मज तेथें थारा ॥ ५ ॥

१४९९ अभक्तां देव कंटाळती । परी सरते करिती तंव त्या ॥ १ ॥ म्हणोनि महिमा त्यांचा जगीं । वागविती अंगीं सामर्थ्य ॥ २ ॥ मंत्र तंत्र नोहे बळ । भक्ति प्रेमळ पाहिजे ॥३॥ आगमानिगमाचा पसारा । उगाचि भारा विंध्यांचा ॥ ४ ॥ वेदशास्त्रांची घोकणी । ती तो कहाणी जुनाट ॥ ५ ॥ पुरातन वाटा असती बहु । त्या त्या न घेऊं यामाजी ॥ ६ ॥ एका जनार्दनीं सोपा मार्ग । संतसंग चोखडा ॥ ७ ॥

१५०० उदार संत एक जगीं । वागविती अंगीं सामर्थ्य ॥ १ ॥ काय महिमा वर्णू दीन । पातकी पावन करिती जगीं ॥ २ ॥ अधम आणि पापराशी । दरुशनें त्यांसी उद्धार ॥ ३ ॥ लागतां त्यांच्या चरणकमळीं । पापतापां होय होळी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भेटतां । हरे संसाराची चिंता ॥ ५ ॥

१५०१ संत कृपाळू उदार । ब्रह्मादिकां न कळे पार ॥ १ ॥ काय वानूं मी पामर । थकले सहा अठरा चार ॥ २ ॥ नेति नेति शब्द । श्रुति विरालिये आनंदें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । धरा माझी आठवण ॥ ४ ॥

१५०२ स्वर्ग जयाची पायरी । मोक्ष ज्यांचा आज्ञाधारी ॥ १ ॥ ऐसा संतांचा महिमा । पायवणी ये शिवब्रह्मा ॥ २ ॥ ब्रह्मज्ञानाची ती मात । कोण तया तेथें पुसत ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति लोटांगणीं । शरण एका जनार्दनीं ॥४॥

१५०३ मोक्षमुक्ति काकुलती ।संतांप्रती येताती॥१॥ करा माझा अंगिकार । नाहीं थार तुम्हांवीण ॥ २॥ हेंचि द्यावें आम्हांलागुनी । तुमचे चरणीं वास सदा ॥३॥ एका जनार्दनीं करी विनंती । कींव भाकिती संतांप्रती ॥४॥

१५०४ घालितां संतांपायीं मिठी । पूर्वज वैकुंठीं उद्धरती ॥१॥ ऐसा संतांचा महिमा । वानूं न शके शिवब्रह्मा ॥२॥ इच्छिलें तें फळ । जन पावती सकळ ॥३॥ एका जनार्दनीं विश्वास । संत दासांचा मी दास ॥४॥

१५०५ संतचरणींचा महिमा । कांहीं न कळे आगमां निगमां ॥ १ ॥ब्रह्मा घाली लोटांगण । विष्णु वंदितो आपण ॥ २ ॥ शिव ध्यातो पायवणी । धन्य धन्य संतजनीं ॥ ३॥ तया संतांचा सांगात । एका जनार्दन निवांत ॥ ४ ॥

१५०६ संतसांगात घडे । ब्रह्म सायुज्यता जोडे ॥१॥ मुक्ति लागती चरणीं । ब्रह्मज्ञान लोटांगणीं ॥ २॥ एका जनार्दनीं सांगात । घडतां होय देहातीत ॥ ३ ॥

१५०७ पहातां संतसमुदाय । भुक्ति मुक्ति तेथें देव ॥ १ ॥ जातां लोटांगणी भावें । ब्रह्मज्ञान अंगे पावें ॥ २ ॥ तयाचे उच्छिष्टाचा कण । शरण एका जनार्दन ॥ ३ ॥

१५०८ संतदरुशनें लाभ होय । ऐसा आहे अनुभव ॥ १ ॥ पुराणीं महिमा सांगे व्यास । संतदया सर्वांस सारखी ॥२॥ यातिकुळ हा कां भलतें । करिती सरते सर्वांसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। संतमहिमान वेगळें॥४॥

१५०९ जें सुख संतसज्जनाचे पायीं । तें सुख नाहीं आणिके ठायीं ॥ १ ॥ तुकितां या सुखाचेनी तुके । पैं वैकुंठ जालें फिकें ॥ २ ॥ पाहों जातां लोकीं तिहीं । ऐसें न देखों आणिके ठायीं ॥ ३ ॥ नवल या सुखाची गोडी । हरिहर ब्रह्मा घालिती उडी ॥४॥ क्षीरसागर सांडोनी पाही । अंगे धांवे शेषशाई ॥ ५ ॥ एका जनार्दनीं जाली भेटी । सुख संतोषा पडली मिठी ॥ ६ ॥

१५१० सुख अपार संतसंगीं । दुजें अंगीं न दिसे कोठें ॥ १ ॥ वह सुख बहुता परी । येथेंची सरी नसेची ॥ २ ॥ स्त्रिया पुत्र धन सुख । नाशिवंत देख शेवटीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतसुखा । नोहे लेखा ब्रह्मांडीं ॥ ४ ॥

१५११ संतसुखा नाहीं पार । तेणें आनंद पैं थोर ॥ १ ॥ ऐसी सुखाची वसती । सनकादिक जया गाती ॥ २ ॥ सुखें सुख अनुभव । सुखें नाचतसे देव ॥ ३॥ तया सुखाची वसती । एका जनार्दनीं ध्यातसे चित्तीं ॥ ४ ॥

१५१२ अमृता उणें आणिती संतजन । नाम अमृत खूण पाजिताती ॥ १ ॥ नाशिवंत यासी अमृत उपकार । अनाशिवंता नामामृतसार ॥ २ ॥नाशिवंत देह नाशिवंत जीव । नाशिवंत ठाव जगडंबर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांचिये दृष्टी । नाशिवंत सृष्टि सजीव होती ॥ ४ ॥

१५१३ संत ते सोयरे जिवलग सांगाती । भेटतां पुरती सर्व काम ॥ १ ॥ कामधेनु कल्पतरु चिंतामणी । उदार चुडामणी याहुनी संत ॥ २॥ देउं परिसाची यांसी उपमा । परी ते नये समा संताचिये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांचा सांगात । पुरती सर्व आर्त जीवींचें जें ॥ ४ ॥

१५१४ जे या गेले संतां शरण । जन्ममरण चुकलें त्या ॥ १ ॥ मागां बहुतां अनुभव आला । पुढंहि देखिला प्रत्यक्ष ॥ २ ॥ महापापी मूढ जन । जाहले पावन दरुशनें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । कृपावंत दयाळू ॥ ४ ॥

१५१५ मागें संतीं उपकार । केला फार न वर्णवे ॥ १ ॥ पाप ताप दैन्य गेलें । सिद्धचि जाहले सर्व मार्ग ॥ २ ॥ दुणा थाव आला पोटीं । संतभेटी होतांची ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं ।पावन जनीं संत ते ॥ ४ ॥

१५१६ संतांचा उपकार । सांगावया नाहीं पार ॥१॥ आपणासारिखें करिती । यातिकुळ नाहीं चित्तीं ॥२॥ दया अंतरांत वसे । दुजेपण तेथें नसे ॥ ३ ॥ उदारपणें उदार । एका जनार्दनीं निर्धार ॥ ४ ॥

१५१७ भाग्यवंत संत होती । दीन पतीत तारिती॥१॥ नाहीं तया भाग्या पार । काय पामर मी वद्दू ॥ २॥ चुकविता जन्म जरा । संसारा यापासोनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । पतीतपावन संत ते ॥ ४ ॥

१५१८ भाग्यवंत होती संत । दीन पतीत तारिती ॥१॥ उपदेश विठ्ठल मंत्र । देती सर्वत्र सारिखा ॥ २ ॥ स्त्रिया शुद्र अथवा बाळें । कृपाकल्लोळें एकची ॥३॥ एका जनार्दनीं शरण । पतीतपावन संत होती ॥ ४ ॥

१५१९ संतांचे संगती । पाप नुरे तें कल्पांती ॥ १ ॥ ऐसा संतांचा महिमा । नाहीं द्यावया उपमा ॥ २ ॥ तीर्थ व्रत जप दान ।अवघें टाका वोंवाळून ॥ ३ ॥ संतचरणींचें रजःकण । वंदी एका जनार्दन ॥ ४ ॥

१५२० संतचरणींचें रजःकण । तेणें तिन्हीं देव पावन ॥ १ ॥ ऐसा महिमा ज्याची थोरी । वेद गर्जे परोपरी ॥ २ ॥ शास्त्रें पुराणें सांगत । दरुशनें प्राणी होती मुक्त ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । ठाव द्यावा संतचरणीं ॥ ४ ॥

१५२१ संतचरणीं आलिंगन। ब्रह्मज्ञानी होती पावन॥१॥ इतर सहज उद्धरंती ।वाचे गातां ज्याची कीर्ति ॥२॥ लाभे लाभ संतचरणीं । मोक्षसुख वंदी पायवणी ॥३॥ शरण एका जनार्दनीं । उदार संत त्रिभुवनीं ॥ ४ ॥

१५२२ संतांचे चरण ध्यातां । हारपली जन्मव्यथा ॥१॥ पुढती मरणांचे पेणें । चुकती जन्मजरा तेणें ॥ २ ॥ संतसमुदाय दृष्टी । पडतां लाभ होय कोटी ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । काया कुर्वंडी संतचरणीं ॥ ४ ॥

१५२३ संतांच्या दरुशनें । तुटे जन्ममरण पेणें ॥१॥ ऐसा संतांचा महिमा । बोलतां नाहीं वो उपमा ॥२॥ तीर्थ पर्वकाळ यज्ञ दान । संतचरणीं होती पावन ॥३॥ शरण एका जनार्दनीं । संत पावन इये जनीं ॥ ४ ॥

१५२४ अपार महिमा संतांचा । काय बोलूं मी वाचा ॥ १ ॥ मागें तरले पुढें तरती । जडजीवां उद्धरती ॥ २ ॥ नाममात्रा रसायन । देउनी तारिती संतजन ॥ ३ ॥ ऐशा संतां शरण जाऊं । एका जनार्दनीं ध्याऊं ॥ ४ ॥

१५२५ संत दयाळ दयाळ । अंतरीं होतार्ती प्रेमळ ॥१॥ शरण आलियासी पाठीं । पहाताती कृपादृष्टी ॥ २ ॥ देऊनियां रसायना । तारिताती भवार्णव जाणा ॥ ३ ॥ संतांसी शरण जावें । एका जनार्दनीं त्यांसी गावें ॥ ४ ॥

१५२६ संत श्रेष्ठ संत श्रेष्ठ । पातकी नष्ट तारिती ॥ १ ॥ ऐसा आहे अनुभव । पुराणीं पहाहो निर्वाहो ॥ २ ॥ वेद शास्त्र देती ग्वाही । संत श्रेष्ठ सर्वां ठायीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । ब्रह्मादिकां न कळे अंत ॥ ४ ॥

१५२७ धन्य धन्य जगीं संत । कृपावंत दीनबंधु ॥ १ ॥ कृपादृष्टी अवलोकितां । परिपूर्ण समदृष्टी ॥ २ ॥ अगाध देणें ऐसें आहे । कल्पांती हें न सरेची ॥३॥ एका जनार्दनीं चित्त । जडो हेत त्या ठायीं ॥ ४ ॥

१५२८ तुटतीं बंधनें संतांच्या दरुशनें । केलें तें पावन जगीं बहु ॥ १ ॥ महा पापराशी तारिलें अपार । न कळे त्यांचा पार वेदशास्त्रां ॥ २ ॥ वाल्मिकादि दोषी तारिलें अनुग्रही । पाप तेथें नाहीं संत जेथें ॥ ३ ॥ पापताप दैन्य गेलें देशांतरीं । एका जनार्दनीं निर्धारीं सत्य सत्य ॥ ४ ॥

१५२९ उदारपणें संत भले । पापी उद्धरिले तात्काळ ॥ १ ॥ एका भावें येतां शरण । देणें पेणें वैकुंठ ॥ २ ॥ ऐसें उदार त्रिभुवनीं । संतांवांचुनी कोण दुजें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । संत पतीतपावन ॥ ४ ॥

१५३० पतीतपावन केलें असे संतीं । पुराणीं ती ख्याती वर्णियेली ॥ १ ॥ सदोषी अदोषी तारिलें अपार । हाचि वडिवार धन्य जगीं ॥ २ ॥ नाना वर्ण याती उत्तम चांडाळ । उद्धरिलें सकळ नाममात्रें ॥३॥ एका जनार्दनीं दयेचे सागर । संतकृपा धीर समुद्र ते ॥४॥

१५३१ मेघापरीस उदार संत । मनोगत पुरविती ॥ १ ॥ आलिया शरण मनें वाचा । चालविती त्याचा भार सर्व ॥ २ ॥ लिगाड उपाधी तोडिती । सरते करिती आपणामाजीं ॥ ३ ॥ काळाचा तो चुकविती घाव । येऊं न देती ठाव अंगासी ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं । तारिले जनीं मूढ सर्व ॥५॥

१५३२ कृपासिंधु ते संत । तारिती पतीत अन्याई ॥ १ ॥ न पहाती गुणदोष । देती समरस नाममात्रा ॥ २ ॥ तारिती भवसिंधूचा पार । एक उच्चार स्मरणें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धन्य संत । अनाथ पतीत तारिती ॥ ४ ॥

१५३३ भाविक हे संत कृपेचे सागर । उतरती पार भवनदी ॥ १ ॥ तयांचिया नामें तरताती दोषी । नासती त्या राशी पातकांच्या ॥ २ ॥ दयेचें भांडार शांतीचें घर । एका जनार्दनीं मोहर भाविकाचें ॥३॥

१५३४ संतसंगें तरला वाल्हा । पशु तरला गजेंद्र ॥ १ ॥ ऐसा संतसमागम । धरतां उत्तम सुखलाभ ॥ २ ॥ तुटती जन्मजरा व्याधी । आणिक उपाधी नातळती ॥ ३ ॥ संसाराचा तुटे कंद । निरसे भेद अंतरींचा ॥ ४ ॥ परमार्थाचें फळ ये हातां । हा जोडतां संतसंग ॥ ५ ॥ घडती तीर्थादिक सर्व । सकळ पर्व साधती ॥ ६ ॥ एका जनार्दनीं संत । धन्य समर्थ तिहीं लोकीं ॥ ७ ॥

१५३५ तरले संगती अपार । वाल्मीकादि हा निर्धार । पापी दुराचार । अजामेळ तरला ॥ १ ॥ ऐसा संतांचा महिमा । नाहीं आणिक उपमा । अनुसरलिया प्रेमा । तरताती निःसंदेह ॥ २ ॥ वेदशास्त्रें देती ग्वाही । पुराणें हीं सांगती ठायीं । सत्संगा वांचुनि नाहीं । प्राणियांसी उद्धार ॥३॥ श्रुति हेंचि पैं बोलति । धरावी संतांची संगती । एका जनार्दनीं प्रचीती । संतसंगाची सर्वदा ॥४॥

१५३६ संतमहिमा न वदतां वाचा । नोहे साचा उपरम ॥ १ ॥ वेदशास्त्रें देती ग्वाही । संतमहिमा न कळे कांहीं ॥ २ ॥ पुराणासी वाड । श्रुति म्हणती न कळे कोड ॥ ३ ॥ योग याग वोवाळणी । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१५३७ अभागी असोत चांडाळ । संतदरुशनें तात्काळ उद्धरती ॥ १ ॥ हा तो आहे अनुभव । स्वयमेव संत होती ॥ २ ॥ पापतापां महामारी । कामक्रोधाची नुरे उरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लीन । संत पावन तिहीं लोकीं ॥ ४ ॥

१५३८ यातिहीन असो भला । जो या गेला शरण संतां ॥ १ ॥ त्याचें जन्ममरण चुकलें । पावन जाहलें. तिहीं लोकीं ॥ २ ॥ उत्तम अधम न म्हणती । समचि देती सर्वांसी ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । केलें पावन दीनालागुनी ॥ ४ ॥

१५३९ जन्म जरा तुटे कर्म । संतसमागम घडतांची ॥ १ ॥ उपदेश धरिता पोटीं । दैन्यें दाही वाटीं पळताती ॥ २ ॥ खंडे फेरा चौऱ्यांयेंशी । धरितां जीवेंशीं पाऊलें ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । ते दिनमणी प्रत्यक्ष ॥ ४ ॥

१५४० सुखदुःखांचिया कोडी । संतदरुशनें तोडी वेडी ॥ १ ॥ थोर मायेचा खटाटोप । संतदरुशनें नुरे ताप ॥ २ ॥ चार देहांची पैं वार्ता । संतदरुशनें तुटे तत्त्वतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । सबाह्य अभ्यंतर देहातीत ॥ ४ ॥

१५४१ संत मायबाप म्हणतां । लाज वाटे बहु चित्ता ॥ १ ॥ मायबाप जन्म देती । संत चुकविती जन्मपंक्ती ॥ २ ॥ मायबापांपरीस थोर । वेदशास्त्रीं हा निर्धार ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । संत शोभती मुगुटमणी ॥ ४ ॥

१५४२ वैकुंठीचें वैभव । संतांपायीं वसे सर्व ॥ १ ॥ संत उदार उदार । देतो मोक्षाचें भांडार ॥२॥ अनन्य भावें धरा चाड । मग सुरवाड सुख पुढें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ठाव । नोहे भाव पालट ॥ ४ ॥

१५४३ मोक्ष मुक्तीचें ठेवणें । देती पेणें संत ते ॥ १ ॥ नाहीं सायासाचें कोड । न लगे अवघड साधन ॥ २ ॥ नको वनवनांतरी जाणें । संतदरुशनें लाभ हातां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । संतसमान देवाच्या ॥ ४ ॥

१५४४ संतांचें चरणतीर्थ घेतां अनुदिनीं । पातकांची धुणी सहज होय ॥ १ ॥ संतांचें उच्छिष्ट प्रसाद लाधतां । ब्रह्मज्ञान हातां सहज होय ॥ २ ॥ संतांच्या दरुशनें साधतीं साधनें । तुटतीं बंधनें सहज तेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत कृपादृष्टी । पाहतां सुलभ सृष्टी सहज होय ॥ ४ ॥

१५४५ भुक्तीमुक्तीचें माहेर । संत उदार असती ॥ १ ॥ देव ज्यांचें करी काम । देतो धाम आपुलें ॥ २ ॥ तया वचनाची पाहे वास । पुरवी सौरस मनींची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विनित । संतचरणरज वंदीत ॥ ४ ॥

१५४६ जया जैसा हेत । तैसा संत पुरविती ॥१॥ उदारपणें सम देणें । नाहीं उणें कोणासी ॥ २ ॥ भलतिया भावें संतसेवा । करिता देवा मानें तें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं त्यांचा दास । पूर्ण वोरस कृपेचा ॥ ४ ॥

१५४७ देवतांचे अंगीं असतां विपरीत । परी संतकृपा त्वरित करिती जगीं ॥ १ ॥ जैसी भक्ति देखती तैसे ते पावती । परी संतांची गती विचित्रची ॥ २ ॥ वादक निंदक भेदक न पाहाती । एकरूप चित्तीं मन ज्यांचें ॥ ३ ॥ भक्ति केल्या देव तुष्ट सर्वकाळ । न करितां खळ म्हणवी येर ॥४॥ संतांचे तों ठायीं ही भावना नाहीं । एका जनार्दनीं पायीं विनटला ॥५॥

१५४८ भवरोगियासी उपाय । धरावे तें संतपाय ॥ १ ॥ तेणें तुटे जन्मजराकंद । वांया छंद मना नये ॥ २ ॥ उपासना जे जे मार्ग । दाविती अव्यंग भाविकां ॥ ३ ॥ निवटोनी कामक्रोध । देती बोध नाममुद्रा ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं । धन्य धन्य संतजनीं ॥ ५ ॥

१५४९ धन्य तेचि संत भक्त भागवत । हृदयीं अनंत नित्य ज्यांच्या ॥ १ ॥ धन्य त्यांची भक्ति धन्य त्यांचें ज्ञान । चित्त समाधान सर्वकाळ ॥ २ ॥ धन्य

तें वैराग्य धन्य उपासना । जयाची वासना पांडुरंगीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धन्य तेचि संत । नित्य ज्यांचें आर्त नारायणीं ॥ ४ ॥

१५५० धन्य धन्य तेचि संत । नाहीं मात दुसरी ॥ १ ॥ वाचे सदा नारायण । तें वदन मंगळ ॥ २ ॥ सांडोनी घरदारा । जाती पंढरपुरा आवडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नेम । पुरुषोत्तम न विसंबे त्या ॥ ४ ॥

१५५१ परलोकींचे सखे । संत जाणावे ते देखे ॥ १ ॥ तोडिती दरुशनें बंधन । करिती खंडन कर्मांचें ॥ २ ॥ उत्तम जें नामामृत । पाजिती त्वरित मुखामार्जी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतपाय । निरंतर हृदयीं ध्याय ॥ ४ ॥

१५५२ ब्रह्मांडाचा धनी । तो संतीं केला ऋणी ॥ १ ॥ म्हणोनि नाचे मागें मागें । वाहे अंगें भार त्याचा ॥ २ ॥ सांकडें पडूं नेदी कांहीं व्यथा । आपणचि माथां वोढवी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । त्रैलोक्यांत मुकुटमणी ॥ ४ ॥

१५५३ आदि अंत नाहीं जयाचे रूपासी । तोचि संतांपाशीं तिष्ठतसे ॥ १ ॥ गातां गीतीं सावडें भावें तें कीर्तन । तेथें नारायण नाचतसे ॥ २ ॥ योगियाचीं ध्यानें कुंठित राहिलीं । संतनामामृतवल्ली गोड वाटे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतसेवा जाण । घडती कोटी यज्ञ स्मरणमात्रें ॥ ४ ॥

१५५४ ज्यांचें देणें न सरे कधीं । नाहीं उपाधी जन्मांची ॥ १ ॥ काया वाचा आणि मनें । धरितां चरण लाभ बहु ॥ २ ॥ चौऱ्यांशींचें नाहीं कोडें । निवारे सांकडे पैं जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । संतपूजनें लाभ बहु ॥ ४ ॥

१५५५ संतपूजनें देव । तुष्टतसे वासुदेव ॥ १ ॥ संतपूजेचें महिमान । वेदां न कळे प्रमाण ॥ २ ॥ संतचरणतीर्थ माथा । वंदिती तीर्थें पैं सर्वथा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करी पूजा । पूज्यपूजक नाहीं दुजा ॥ ४ ॥

१५५६ असोनी उत्तम न करी भजन । संतसेवा दान धर्म नेणें ॥ १ ॥ काय त्याचें कुळ चांडाळ चांडाळ । मानी तो विटाळ यमधर्म ॥ २ ॥ सदा सर्वकाळ संतांची करी निंदा । पापाची आपदा भोगी नरक ॥ ३ ॥ स्वमुखें आपण सांगे जनार्दन । एका जनार्दन पूजन करी सुखें ॥ ४ ॥

१५५७ संतां निंदी जो पामर । तो दुराचार जन्मोजन्मीं ॥ १ ॥ त्यांसी करितां संभाषण । करावें सचैल तें स्नान ॥ २ ॥ तयांसीं येऊं न द्यावें घरां । आपण जाऊं नये द्वारां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । त्याचें न पहावें वदन ॥ ४ ॥

१५५८ संतांची जो निंदा करितो चांडाळ । प्रत्यक्ष अमंगळ हीन याती ॥ १ ॥ तयाच्या विटाळा घ्यावें प्रायश्चित । आणिक दुजी मात नाहीं नाहीं ॥ २ ॥ तयाचें वचन नायकावें कानीं । हो कां ब्रह्मज्ञानी पूर्ण ज्ञाता ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसे जे पामर । भोगिती अघोर रवरव नरक ॥ ४ ॥

१५५९ संतांचा करी जो अपमान । तोचि जाणावा दुर्जन ॥ १ ॥ जन्मोनियां पापराशी । जातो पतना नरकासी ॥ २ ॥ सोडवावया नाहीं कोणी । पडती चौऱ्यायशीं पतनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । ऐसा अभागी खळ जाण ॥ ४ ॥

१५६० जया संतचरणीं नाहीं विश्वास । धिक् त्यास वास यमपुरीं ॥ १ ॥ संतचरणीं मन ठेवा रे निश्चळ । करुणा उतावेळ भाका त्यासी ॥ २ ॥ घाला लोटांगण वंदूं पां चरण । तेणें समाधान होईल मना ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतसंगावांचुनी । तरला तो कोणी मज सांगा ॥ ४ ॥

१५६१ नांदतसे नाम आकाश पाताळीं । सर्व भूमंडळीं व्याप्त असे ॥ १ ॥ पाताळ भेदोनी व्याप्त ठेलें पुढें । नाहीं त्यासी आड कोठें कांहीं ॥ २ ॥ चौऱ्यांयशी भोगिती दुर्मती पामर । संतांसी साचार शरण न जाती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम अविनाश । संतसंगें दोष सर्व जाती ॥ ४ ॥

१५६२ नरदेह श्रेष्ठ परमपावन । पावोन न करी संतसेवन ॥ १ ॥ पेलिया नरकप्रती जाण । यम यातना करितसे ॥ २ ॥ अपरोक्ष ज्ञान कसवटी । संतावीण नये पोटीं ॥ ३ ॥ जैसा अंधारीं खद्योत । तैसा संतांविण नरदेह प्राप्त ॥ ४ ॥ मनीं विषयाचा अभिलाष । कोण सोडवी तयास ॥ ५ ॥ जनार्दनाचा एका म्हणे । संतायायीं देह ठेवणें ॥ ६ ॥

१५६३ संतांसी जो निंदी देवासी जो वंदी । तो नर आपदीं आपदा पावे ॥ १ ॥ देवासी जो निंदी संतांसी जो वंदी । तो नर गोविंदीं सरता होय ॥ २ ॥ कृष्णा कंस द्वेषी नारदा सन्मानी । सायुज्यसदनीं

पदवी पावे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गूज सांगे कानीं। रहा अनुदिनीं संतसंगें ॥ ४ ॥

१५६४ संतांवाचोनियां सुख कोठें नाहीं। अमृत त्यांचे पायीं नित्य वसे ॥ १ ॥ संतांचे संगती होय मोक्षप्राप्ती। नको पा संगती दुर्जनाची ॥ २ ॥ दुर्जनाचे संगें दुःख प्राप्त होय। तेथें कैंचि सोय तरावया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हेंचि सत्य साचा। नको अभक्तांचा संग देवा ॥ ४ ॥

१५६५ कर्म उपासना न कळे जयांसी। तेणें संतांसी शरण जावें ॥ १ ॥ सर्व कर्मभावें विठ्ठलनाम गावें। जाणिवेनेणिवेचें हांवे पडूं नये ॥ २ ॥ अभिमान झटा वेदाचा पसारा। शास्त्रांचा तो थारा वहातां अंगीं ॥३॥ एका जनार्दनीं सर्व कर्म पाही। विठ्ठल म्हणतां दूहीं घडतसे ॥ ४ ॥

१५६६ शरण गेलिया संतांसी। तेणें चुकती चौऱ्यांयशीं ॥ १ ॥ द्यावें संतां आलिंगन। तेणें तुटे भवबंधन ॥ २ ॥ वंदितां चरणरज। पावन देह होतो सहज ॥ ३ ॥ घालितां चरणीं मिठी। लाभ होय उठाउठी ॥ ४ ॥ प्रेमें दर्शन घेतां। मोक्ष सायुज्य ये हातां ॥ ५ ॥ म्हणे जनार्दन। एका लाधलीसे खूण ॥६॥

१५६७ हरिप्राप्तीसी उपाय। धरावें संतांचे ते पाय ॥१॥ तेणें साधतीं साधनें। तुटतीं भवाचीं बंधनें ॥ २ ॥ संतांविण प्राप्ति नाहीं। ऐशी वेद देत ग्वाही ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत। पूर्ण करिती मनोरथ ॥ ४ ॥

१५६८ दुजा नाहीं जया भाव। अवघा देव विठ्ठल ॥ १ ॥ आणिक कांहीं नाहीं चंद्र। नाम गोविंद सर्वदा ॥ २ ॥ नाना मतां करिती खंड। छेदिती पाखांड अंतरींचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तेचि संत। उदार कृपावंत दयाळु ॥ ४ ॥

१५६९ संत उपाधिरहित। नाहीं तया दुसरा हेत ॥ १ ॥ सदा मुखीं नाम वाचे। तेणें जन्माचें सार्थक ॥ २ ॥ संग नावडे तयां कांहीं। सदा कीर्तनप्रवाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चित्त। ध्यानीं मनीं संत आठवीत ॥ ४ ॥

१५७० काम क्रोध लोभ नाहीं संतां अंगीं। वर्तताती जगीं जगरूप ॥ १ ॥ नातळोनी संसारा दाविती पसारा। भाव एक खरा विठ्ठलपायीं ॥ २ ॥ आणिकांची स्तुति नायकती कानीं। न बोलती वचनीं वांया बोला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तेचि संत तारू। भवाचा सागरू उतरिती ॥ ४ ॥

१५७१ संतांचे ठायीं नाहीं द्वैतभाव। रंक आणि राव सारिखाची ॥ १ ॥ संतांचें देणें अरिमित्रां सम। कैवल्याचें धाम उघड तें ॥ २ ॥ संतांची थोरीव वैभव गौरव। न कळे अभिप्राय देवासी तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करी संतसेवा। परब्रह्म ठेवा प्राप्त जाला ॥ ४ ॥

१५७२ दरुशनें तरतीं प्राणी। ऐशी आयणी जयाची ॥ १ ॥ ठेवितांचि मस्तकीं हात। देवचि करीत तयासी ॥ २ ॥ देउनी नाममात्रा रस। भवरोगास छेदिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ते संत। कृपावंत दीनालागीं ॥ ४ ॥

१५७३ सम असे सुखदुःख। संत त्यासी म्हणती देख ॥ १ ॥ पापपुण्य मावळलें। द्वैत सर्व दुरावलें ॥२॥ हर्ष शोक नाहीं देहीं। संत जाणावे विदेही ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत। जनालागीं कृपावंत ॥ ४ ॥

१५७४ मुखीं नाहीं निंदा स्तुती। साधु वरिती आत्मस्थिती ॥ १ ॥ राग द्वेष समूळ गेले। द्वैताद्वैत हारपले ॥ २ ॥ घेणें देणें हा पसारा। नाहीं जयासी दुसरा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत। ज्याचे हृदयीं भगवंत ॥ ४ ॥

१५७५ मान देखोनि सहसा। संतां असंतोष होय जैसा ॥ १ ॥ नाम ऐकुनी वागुलातें। बाळ सांडू पाहे प्राणातें ॥ २ ॥ चंडवातें ते कर्दळी। समूळ कांपे चळचळीं ॥ ३ ॥ सन्मानें नामरूप जाय। एका जनार्दनीं सत्य पाहे ॥ ४ ॥

१५७६ पवित्र तो देह सदा ज्याचा नेम। वाचे गाय राम सर्वभावें ॥ १ ॥ धन्य तो भाग्याचा तरला संसार। परमार्थाचें घर नाम मुखीं ॥ २ ॥ करितसे कथा कीर्तनीं आवडी। ब्रह्मज्ञान जोडी तया लाभे ॥३॥ एका जनार्दनीं धन्य तें शरीर। परमार्थे संसार एकरूप ॥ ४ ॥

१५७७ छळितां न येती रागावरी। तदाकारी वृत्ति मुराली ॥१॥ आपपर नाहीं जेथें। भेद तेथें नसेची ॥२॥ याती असो भलते परी। एकसरी जयासी ॥३॥ एका जनार्दनीं भाव। अवघियां ठाव एकची ॥ ४ ॥

१५७८ देहींची वासना अद्वैत निमालें। साधन साधिलें तोचि धन्य ॥१॥ द्वैताचा भाव अद्वैताचा ठाव।

आठवा स्वयमेघ नेणें कांहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं अद्वैता वेगळा । राहिला निराळा सुखरूप ॥ ३ ॥

१५७९ सहज सहज ऐशा करिताती गोष्टी । परि सहजाची भेटी विरळा जाणें ॥ १ ॥ सहजाच्या आवडी विद्या अविद्या तोडी । जाणीव नेणीवेची राहूं नेदी बेडी ॥ २ ॥ जाणीवा जाणपण नेणिवा नेणपण । दोहींच्या विंदानें सहजाचें दर्शन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जाणीव नेणीव । सहज चैतन्यासी देउनी ठेला खेव ॥ ४ ॥

१५८० कार्य कर्ता आणि कारण । त्रिगुणेशीं त्रिपुटी शून्य ॥१॥ अंगीं गुण आदळतां तिन्हीं गुण । जया चित्तवृत्ति नोहे भिन्न ॥ २ ॥ ऐसा त्रिगुणांवेगळा । एका जनार्दनीं पाहे डोळां ॥ ३ ॥

१५८१ जागा परी निजला दिसे । कर्म करी स्फुरण नसे ॥ १ ॥ सकळ शरिराचा गोळा । होये आळसाचा मोदळा ॥ २ ॥ संकल्पविकल्पाची ख्याती । उपजेचिना सदा चित्तीं ॥ ३ ॥ यापरी जनीं असोनि वेगळा । एका जनार्दनीं पाहे डोळां ॥ ४ ॥

१५८२ आपुलीच दारा जरी टेके व्यभिचारा । क्रोधाचा थारा अंतरीं नये ॥ १ ॥ आपुलेंच धन तस्करें नेतां जाण । जयाचें मन उद्विग्न नव्हे ॥ २ ॥ आपुलाची पुत्र वधोनि जाय शत्रु । परी मोहाचा पाझरु नेत्रीं नये ॥ ३ ॥ आपुलें शरीर गांजितां परनरें । परी शांतीचें घर चळों नेदी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जया पूर्ण बोधू । तोचि एक साधु जगामाजीं ॥ ५ ॥

१५८३ असोनि संसारीं आपदा । वाचे वदे विठ्ठल सदा ॥ १ ॥ नाहीं मानसीं तळमळ । सदा शांत गंगाजळ ॥ २ ॥ असोनियां अकिंचन । जयाची वृत्ति समाधान ॥३॥ एका जनार्दनीं ऐसे थोडे । लक्षामध्यें एक निवडे ॥ ४ ॥

१५८४ इहलोकीं बरा तो परलोकीं वंद्य । त्यासी भेदत्व निंद्य उरलें नाहीं ॥ १ ॥ परस्त्री देखतां नपुसक वागे । परधन पाहतां अंधापरी निघे ॥ २ ॥ वाद वेवादा नोहे त्याची मती । हृदयीं भगवद्भावित सदा वाहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसे विरळे प्राणी । कोटीमाजीं जनीं एक देखो ॥ ४ ॥

१५८५ न मानी सन्मानाचें कोडें । नाहीं चाड विषयाची ॥१॥ ऐसें मज शरण येती । तयांचें उणें न पडे कल्पांती ॥ २ ॥ नाहीं संसाराची चाड । नाहीं भीड कवणाची ॥ ३ ॥ एका त्याचा म्हणवी दास । धरूनि आस जनार्दनीं ॥ ४ ॥

१५८६ देह पाहतां दोषची दिठीं । वृत्ती दिसे तै स्वरूपीं मिठी ॥ १ ॥ कैसेनी हरिदास भासती । देहीं असे तंव दोष दिसती ॥ २ ॥ देह दिसतां न दिसे भावो । वृत्ती दिसे तंव समाधान पहा हो ॥ ३ ॥ एका जनार्दनाच्या पाहीं । वृत्ती दिसे तै दोष नाहीं ॥४॥

१५८७ सदा वसे अंगीं शांती । चारी मुक्ती होती दासी ॥ १ ॥ तेची सखे हरीचे दास । सदा सोंवळे उदास ॥ २ ॥ कामक्रोधाची वार्ता । अंगीं नाहीं पैं सर्वथा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निष्काम । सदा परिपूर्ण मंगळधाम ॥ ४ ॥

१५८८ मुक्तीची तो नाहीं चाड । ऐसे वाड हरिदास ॥ १ ॥ मोक्षमुक्तीसी कोण पुसे । हें तों सरसें भांडवल ॥ २ ॥ लक्ष्मीसहित देव नांदे । येरा विनोदें काय चाड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दास्य करी । मुक्ति तेथें फुका वरी ॥ ४ ॥

१५८९ संतांचा दास तो देवाचा भक्त । तरती पतीत दरुशनें त्याच्या ॥ १ ॥ त्याचिया योगें घडती सर्व तीर्थें । तीर्थें तें पवित्र होतीं तीर्थें ॥ २ ॥ तयाचिया पदें धरा धन्य म्हणे । ऐसे जे भेदरहित मनें तेचि संत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तयांच्या प्रसादें । कर्म अकर्मा दोंदें निघताती ॥ ४ ॥

१५९० जयाचेनि चरणीं तीर्थां तीर्थपण । तो हृदयीं केला सांठवण ॥ १ ॥ नवल महिमा हरिदासाची । तीर्थें उपजती त्याचे कुशीं ॥ २ ॥ काशीं मरणें होय मुक्ती । तेथें वचनें न मरतां होय मुक्ती ॥ ३ ॥ एका जनार्दनाचे भेटी । सकळ तीर्थें वोळंगती दिठी ॥४॥

१५९१ धन जयासी मृत्तिका । जगीं तोचि साधु देखा ॥ १ ॥ ज्यासी नाहीं लोभ आशा । तोचि प्रिय जगदीशा ॥ २ ॥ निवारले क्रोधकाम । तोचि जाणा आत्माराम ॥ ३ ॥ एका जनार्दन पाय धरी । भुक्ति मुक्ति नांदे घरीं ॥ ४ ॥

१५९२ साधु म्हणावें तयासी । दया क्षमा ज्याच्या दासी ॥ १ ॥ जयापाशीं नित्य शांती । संत जाणा आत्मस्थिती ॥ २ ॥ ऋद्धिसिद्धि त्याच्या दासी । भुक्ति मुक्ति पायांपाशीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साधु । जयापाशीं आत्मबोधु ॥ ४ ॥

१५९३ सर्वांभूतीं दया । साधु म्हणावें पैशिया ॥ १ ॥ जग ब्रह्मरूप जाण । हेंचि साधूचें लक्षण ॥ २ ॥ सर्वांभूतीं समदृष्टी । तोचि साधु इये सृष्टीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । नित्य साधी आत्महित ॥ ४ ॥

१५९४ ज्याचे गेले कामक्रोध । तोचि साधु जगीं सिद्ध ॥ १ ॥ लोभ मोह नाहीं ज्याशी । तोचि साधु निश्चयेंसी ॥ २ ॥ गेले मद आणि मत्सर । साधु तोचि निर्विकार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साधु । त्याचे चरण नित्य वंदूं ॥ ४ ॥

१५९५ वेधिलें ज्याचें मन सदा नामस्मरणीं । रामनाम ध्वनी मुखीं सदा ॥ १ ॥ प्रपंच परमार्थ त्यासी पैं सारखा । अद्वैती तो देखा भेद नाहीं ॥२॥ एका जनार्दनीं एकरूप भाव । नाहीं भेदा ठाव तये ठायीं ॥ ३ ॥

१५९६ देहीं असोनी विदेही । चाले बोले सदा पाही ॥ १ ॥ असे अखंड समाधी । नसे कांहीं आधिव्याधी ॥ २ ॥ उपाधीचे तोडोनी लाग । देहीं देहपणें भरिलें जग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संग । सदा समाधान सर्वांग ॥ ४ ॥

१५९७ काम क्रोध नाहीं अंगीं । तोचि नर जन्मला जगीं ॥ १ ॥ तयाचें होतां दरुशन । तुटे देहाचें बंधन २ ॥ अरुणोदयीं जाण । तम निरसे सहज आपण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । नोहे एकपणावांचून ॥ ४ ॥

१५९८ जें जें बोले तैसा चाले । तोचि वहिलें निवांत ॥ १ ॥ अंगीं असोनी जाणपण । सदा सर्वदा तो लीन ॥ २ ॥ निंदा अथवा वंदा । नाहीं विषम ती बाधा ॥ ३ ॥ शांतीचा मांदूस । भरला असे सदोदित ॥ ४ ॥ एका जनार्दनीं धन्य । त्याचें दरुशन जगमान्य ॥ ५ ॥

१५९९ मज कोणी न देखावें । मज कोणी नोळखावें ॥ १ ॥ मान देखोनियां दृष्टी । पळे देह उपेक्षा पोटीं ॥ २ ॥ मी एक लौकिकी आहे । ऐसें कवणा ठावें नोहे ॥ ३ ॥ सांडावया अहं ममता । मान न पाहे सर्वथा ॥ ४ ॥ ज्याचे पोटीं दृढ अभिमान । तो सदा इच्छी सन्मान ॥ ५ ॥ सन्मान घ्यावया सर्वथा । ज्ञातेपण मिरवी वृथा ॥ ६ ॥ ऐसा निरपेक्ष सज्ञानी । एका शरण जनार्दनीं ॥ ७ ॥

१६०० ऐशी शांती ज्यासी आहे । त्याचे घरीं देव राहे ॥ १ ॥ हा अनुभव मनीं । पहा प्रत्यक्ष पुराणीं ॥ २ ॥ धर्माघरीं वसे । अर्जुनाचे रथीं बैसे ॥ ३ ॥ अंकित दासाचा होय । एका जनार्दनीं देव ॥ ४ ॥

१६०१ आले आले हरीचे दास । मुखीं रामनाम घोष । तोडोनियां भवपाश । जीवन्मुक्त ते ॥ १ ॥ वैराग्याचें कवच अंगीं । नाचताती प्रेमरंगीं । ज्ञान शस्त्र तें निसंगीं । छेदिती संग ॥ २ ॥ अनुभव तीक्ष्ण शर । सोडिताती निरंतर । वर्मी खोचले ते वीर । क्रोधादि असुर ॥ ३ ॥ सांडोनि देहाभिमान । तोचि जीवन्मुक्त जाण । एका जनार्दना शरण । रामकृष्ण जपताती ॥ ४ ॥

१६०२ भाग्यवंत श्रीहरीचे दास । धरितां कास तारिती ॥ १ ॥ धन्य त्यांचा उपकार । पावविले पार बहुत ॥ २ ॥ वर्णितां त्यांचे उत्तम गुण । होय जन्माचें खंडन ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । धन्य धन्य तुमची वाणी ॥ ४ ॥

१६०३ विठ्ठल नाम घेती वाहाती टाळिया । ब्रह्मादिक येऊनियां वंदिती पायां ॥१॥ धन्य धन्य हरिभक्त जगीं । वहाताती टाळी नाचताती रंगीं ॥२॥ प्रेमभरित सदा करिती कीर्तन । एका जनार्दनीं वंदूं तयाचे चरण ॥ ३ ॥

१६०४ हेंचि एक खरें । सदा वाचे नाम स्मरे ॥१॥ धन्य त्याची जननी । प्रसवली त्या लागोनी ॥ २ ॥ हरुषें नाचे कीर्तनांत । प्रेम न खंडे शुध्द चित्त ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । वंदीन तयाचे चरण ॥ ४ ॥

१६०५ सदा सर्वकाळ वाचे । नाम जया श्रीहरीचें ॥ १ ॥ धन्य जन्मोनी संसारीं । सदा मनीं धरी हरी ॥ २ ॥ रात्रंदिवस ध्यानीं मनीं । शरण एका जनार्दनीं ॥ ३ ॥

१६०६ आसनीं भोजनीं शयनीं । जो चिंती रूप मनीं ॥ १ ॥ जागृति स्वप्न आणि सुषुप्ति । सदा ध्याय रूप चित्तीं ॥ २ ॥ नसे आणिके ठायीं मन । एका शरण जनार्दन ॥ ३ ॥

१६०७ न्याय मीमांसा सांख्य पातंजली । व्याकरण वेदांत बोली सर्व एक ॥ १ ॥ ते माझे सोईरे जिवलग जीवाचे । जे अधिकारी साचे संतजन ॥ २ ॥ एका जनार्दनीं मन तया ठायीं । होऊनिया पायीं उतराई ॥ ३ ॥

१६०८ ऐसें जाणोनि वेदमत । संतसेवा सदोदित ॥ १ ॥ पुराणें शास्त्रें अनुवादिती । संतसेवन दिनराती ॥ २ ॥ संतचरणीं ज्यांचें मन । तयां सुखा काय उणें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावें । संतचरणीं लीन व्हावें ॥ ४ ॥

१६०९ भाग्य उजळलें आतां । संत सभाग्यता भेटले ॥ १ ॥ पाप ताप दैन्य गेलें । संत पाउलें देखतां ॥ २ ॥ तुटली बंधनाची गांठी । पाय पोटीं आठवितां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । संतचरण दुर्लभ ॥ ४ ॥

१६१० ब्रह्म सर्वगत सदा सम । जेथें आनु नाहीं विषम । ऐसें जाणती ते अति दुर्गम । तयांची भेटी जालिया भाग्य परम ॥ १ ॥ ऐसें कैसियानें भेटती ते साधू । ज्यांचा अतर्क्य तर्केवेना बोधु । ज्यासी निजानंदी आनंदु । ज्यांचा परमानंदी उद्बोधु ॥ २ ॥ पवना घालवेल पालाण । पायीं चढवेल गगन । भूत भविष्य कळों येईल वर्तमान । परी त्या साधूचें न कळे माहिमान ॥ ३ ॥ चंद्रामृत सुखें सेववेल । रवि अस्ता जातां धरवेल । बाह्या हेळा सागर तरवेल । परी त्या साधूची भेटी न होईल ॥४॥ जप तप करवेल अनुष्ठान । ध्येय ध्याता धरवेल निजध्यान । ज्ञेय ज्ञाता विवर्जित ज्ञान । ज्ञाना ध्यानाचे मूळ हे साधुजन ॥ ५ ॥ निजवृत्तीचा करवेल निरोधु । जीवाशिवाचा भोगवेल आनंदु । एका जनार्दनीं निजसाधु । त्याच्या दर्शनें तुटे भवबंधु ॥ ६ ॥

१६११ जन्म कोट्यांनीं हरिसेवा जोडे । नवविद्या भजन सांग घडे । तंव वैराग्य तें पाहे पुढें । पूर्व प्राचीन फळ रोकडें ॥ १ ॥ ऐसे तैंच मिळती ते साधु । ज्यांचा संग करी उद्बोधु । ज्यांचा स्पर्श करी आल्हादु । ज्यांचा महिमा न कळे आनंदु ॥२॥ घडे काम कर्म परित्याग । झडे समूळ विषयांचा संग । सर्व कामना तुरे मुसमार्ग । तैं आतुडे मानवा संतसंग ॥ ३ ॥ शुद्ध सत्वगुण देहीं पाहें । दंभ अहंकार मानापमान जाये । कामक्रोध लोभ सांडी सोये । तैं भूतभाव नाहीं होय ॥ ४ ॥ जैं जनार्दनीं शुद्धभाव । स्वकर्मासी विश्रांती ठाव । ऐक्य दुजे दोन्ही होती वाव । देहबुद्धीच भासे देव ॥ ५ ॥ जैं संतदया होय बापा । तैंचि विश्रांती त्रिविध तापा । तैंचि मिळणी होय स्वरूपा । पूर्ण एका जनार्दनीं कृपा ॥ ६ ॥

१६१२ हृदयीं नांदे संदेह मूळ । तेथें फळ विरुद्धे कैंची ॥ १ ॥ जैसें बीज तैसा अंकुर । दिसे निर्धार जाणावा ॥ २ ॥ योगयाग शास्त्रपाठें । वाउगी खटपटें तर्कांची ॥ ३ ॥ करितां कर्म धर्म नेहटी । नोहे भेटी संतांची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं त्याचा दास । सहज आस पुरतसे ॥ ५ ॥

१६१३ पूर्वपुण्य असतां गांठी । संतभेटी तै होय ॥१॥ धन्य धन्य संतसंग । फिटे पांग जन्माचा ॥२॥ चार सहा वंदिती पाय । आणिकां ठाव कोठें नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । कृपावंत सुखसिंधु ॥ ४ ॥

१६१४ बहुत जन्मांचें सुकृत । तयांसी घडत संतसंग ॥ १ ॥ धन्य वैष्णव भूमंडळी । दरुशन मेळीं जीव तरती ॥ २ ॥ एका जनार्दनीं विश्वास । निजदास संतांश ॥ ३ ॥

१६१५ बहु पुण्य होय गांठी । तरीच भेटी संतांची ॥ १ ॥ पाप ताप दैन्य गेलें । संत पाउलें देखतां ॥२॥ मोक्ष मुक्ति साधे फुका । ऐशी देखा संतकृपा ॥ ३ ॥ नाहीं आणिकाचें भेव । संत सदैव भेटतां ॥ ४ ॥ एका जनार्दनीं संत । पुरविती हेत सर्वही ॥ ५ ॥

१६१६ संतभेटीचा आनंदु । सुखसागर परमानंदु । गातां नुरेची भेदु । नामस्मरणें ॥१॥ कैवल्याचे अधिकारी । मोक्ष राबे त्यांचे घरीं । ऋद्धि सिद्धि कामारी । कोण त्यां पुसे ॥ २ ॥ भुक्ति आणि मुक्ति । सदा तिष्ठे अहोरातीं । कैवल्यपद येती । सामोरीं तयासी ॥ ३ ॥ नाम गातां जे आनंद । हृदयीं नाहीं दुजा भेद । एका जनार्दनीं छंद । तयांचा मज ॥ ४ ॥

१६१७ वाट पिकली संतांची । अवघें स्वरूप मुद्गलची ॥ १ ॥ उकल करा लवडसवडीं । मुद्गल देव घडोघडीं ॥ २ ॥ द्वैतांची दाटणी सोडी । वासनेची वासना फेडी ॥ ३ ॥ आळ करितां सरळ सात । मन पडेल विचारांत ॥ ४ ॥ अखिल गुरु नामाचे । स्थापिले सुरंग भक्तांचे ॥ ५ ॥ अंगळु मंगळु नंद भापा । द्वैत दळणीं वटील घसा ॥ ६ ॥ आंत बाहेर एकत्रि सूत । मुद्गल देतां सुखी होत ॥ ७ ॥ एका जनार्दनीं एकत्रि भेटी । सरिसीं साठी संसारा ॥ ८ ॥

१६१८ समुद्रवलयांकित तीर्थं । स्नानें करती जे पवित्र । परी तेथें नसतां भाव । निर्फळ वाव होतसे ॥१॥ ऐसा निर्णय शास्त्रीं । पुराणीं सांगतसे व्यक्ती ।

तेचि उघड सर्वांप्रती । सांगतसें परियेसा ॥ २ ॥ जे शुचिर्भूत शुद्धमती । ईश्वर मानिती सर्वांभूतीं । ते सर्वदा वसती तीर्थी । तीर्थे वसती त्यांच्यासंगें ॥ ३ ॥ तीर्थी नसतां तीर्थवास । सत्य निष्ठा नित्य निर्दोष । तीर्थी वसतां पुण्यलेश । न पावे तीर्थ निंदितां ॥४॥ मत्सर निष्ठुर भूतद्वेष । भजनमार्गीचा उपहास । तीर्थे घेती त्यांचा श्वास । कीटक द्वेष त्या करिती ॥५॥ काम क्रोध लोभ माया । स्पर्श न करी जयाची काया । तो तीर्थवासी जाणे राया । तीर्थे पायां वंदिती ॥ ६ ॥ विष्णुस्मरण शिवस्मरण । नित्य वसवी ज्याचें वदन । तोचि तीर्थ जाण । तीर्थे चरण वंदिती ॥ ७ ॥ इंद्रिय नियमाचे आसनीं । नित्य माधुर्य बोलली वाणी । अहंकार ज्याचिये ज्ञानीं । संतचरणा सर्वथा ॥ ८ ॥ तो सकळ शिष्टांचा धात्रा । तीर्थे करिती त्याची यात्रा । पादोदकालागीं पवित्रा । तीर्थे माथां वोढविती ॥ ९ ॥ तीर्थी असोनि इच्छारहित । प्रतिग्रहा न वोढवी हात । यथालाभें संतोषत । तो तीर्थरूप जाणावा ॥१०॥ परधनीं अंधत्व जयाचे नयना । परस्त्री पाहतां क्लीबत्व जयाचे मना । परापवादीं मूकत्व जयाचे वदना । तो जनक जाणा तीर्थांचा ॥११॥ मनें इंद्रिया निग्रह करी । तो गृहीं असतां जान्हवी-तीरीं । तीर्थी असो अनाचारी । तो कीटकवासी जाणावा ॥ १२ ॥ सत्यशील दृढव्रती । आत्मभावना सर्वांभूतीं । क्रोधकंटका नातळे चित्तीं । तो सर्व तीर्थी सेविजे ॥ १३ ॥ शुध्दशीळ विद्यातीर्थी । साधु सुस्नात सत्यतीर्थी । कुलांगना लज्जातीर्थी । पवित्र होती जाण पां ॥ १४ ॥ धनाढ्य निर्दोष दानतीर्थी । पापी निष्पाप गंगातीर्थी । क्षत्रिय राजे धारातीर्थी । प्रक्षाळिती अघातें ॥ १५ ॥ योगी आत्मध्यान तीर्थी । आत्मस्वरूप स्वयें होती । श्रवणादिक नवही तीर्थी । भक्त होती हरिरूप ॥ १६ ॥ असो या निरोपणाच्या युक्ती । जाणते अथवा हो नेणती । शरीर प्रक्षाळितां तीर्थी । मोक्षप्राप्ति निर्धारें ॥ १७ ॥ ऋषीश्वरीं वेद-वचनीं । महा फळें कल्पी यज्ञीं । ती यज्ञफळें तीर्थस्नानीं । वेदवाणी अनुवादे ॥१८॥ शरण एका जनार्दनीं । सकळ तीर्थे नामस्मरणीं । घडती संतसंघटनीं । येथें संशय नाहीं ॥ १९ ॥

१६१९ ऐसे म्हणशील कोण । ज्याचें गातां नामा-भिधान । देवाधि देव आपण । स्वमुखें सांगे उध्दवा ॥ १ ॥ नारद पराशर पुंडलीक । व्यास शुक वाल्मि-कादिक । ध्रुव उपमन्यु भीष्मादिक । वंद्य जाण उध्दवा ॥ २ ॥ वसिष्ठ वामदेव विश्वामित्र । अत्रि दत्तात्रेय पवित्र । ऐसे पुण्यश्लोक सर्वत्र । ते तुज वंद्य उध्दवा ॥ ३ ॥ रघु दिलीप हरिश्चंद्र । शीभ्रीराज बळी थोर । जयाचा अंकित मी निर्धार । हें तूं जाणें उध्दवा ॥ ४ ॥ पांडव माझे पंचप्राण । काया वाचा वोचिलें मन । मज निर्धारितां पूर्ण । जीव वेंचिला उध्दवा ॥ ५ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान । मुक्ताबाई ज्ञानकळा आपण । इहीं अवतार धरून । जग तारिलें उध्दवा ॥ ६ ॥ गोरा सांवता जगमित्र । चोखा रोहि-दास कबीर । हे माझे प्राणमित्र । आहेत जाण उध्दवा ॥ ७ ॥ दामा नामा जनाबाई । राजाई आणि गोणाई । येशी आणि साकराई । जिवलग माझे उध्दवा ॥ ८ ॥ कान्हूपात्रा जन जसवंत । हनुमंतादि समस्त । पाठक कान्हा आनंदभरित । तयाचेनि उध्दवा ॥ ९ ॥ परसा भागवत सुरदास । वत्सरा आणि कूर्मदास । एका जनार्दनीं निजदास । संतांचा मी उध्दवा ॥ १० ॥

१६२० स्मरतां निवृत्ति पावलों विश्रांती । संसा-राची शांती जाली माझ्या ॥ १ ॥ नमिता ज्ञानदेवा पावलों विसावा । अंतरींचा हेवा विसरलों ॥ २ ॥ सुखाचा निधान तो माझा सोपान । विश्रांतीचें स्थान मुक्ताबाई ॥ ३ ॥ चांगदेव माझा आनंदाचा तारु । सुखाचा सागरु वटेश्वर ॥ ४ ॥ सुखाचा सागर विसोवा खेचर । नरहरी सोनार प्राण माझा ॥ ५ ॥ आठवितां नामा पावलों विश्राम । मोक्षमार्गी आम्हां वाट जाली ॥ ६ ॥ परिसा भागवत जीवा आवडता । गोरा आणि सांवता सखे माझे ॥ ७ ॥ जनजसवंत सूरदास संत । नित्य प्राणिपात वैष्णवांसी ॥ ८ ॥ वंदूं भानूदास वैष्णवांचे कुळीं । ज्यासी वन-माळी मागें पुढें ॥ ९ ॥ बाळपणीं जेणें भानु आराधिला । वंश निरविला देवराया ॥ १० ॥ धन्य त्यांचा वंश धन्य त्यांचें कुळ । परब्रह्म केवळ त्यांचे वंशीं ॥ ११ ॥ एका जनार्दनीं संतांचें स्तवन । जनीं जनार्दन नमी-येला ॥ १२ ॥

१६२१ निवृत्ति शोभे मुगुटाकार । ज्ञान सोपान वटेश्वर ॥ १ ॥ विठू पंढरीचे राणे । त्यालें भक्तांची भूषणें ॥ २ ॥ खेचर विसा जगमित्र नागा । कुंडलें जोडा विठोबा जोगा ॥३॥ बहु शोभे बाहुवट । गोरा सांवता दिग्पाट ॥ ४ ॥ कंठीं जाणा एकविद । तो हा जोगा परमानंद ॥ ५ ॥ गळां शोभे वैजयंती । तिसी

मुक्ताई म्हणती ॥ ६ ॥ अखंड शोभे माझ्या बापा। पदकीं शोभे नामा शिंपा ॥ ७ ॥ कटीं सूत्र कटावरीं। तो हा सोनार नरहरी ॥ ८ ॥ कासे कसिला पीतांबर। तो हा जाणावा कबीर ॥ ९ ॥ जानु जघन सरळ। तेंही कान्हुपात्रा विशाळ ॥१०॥ दंतपंक्तीचा झळाळ। तो हा कान्हया रसाळ ॥११॥ चरणींच्या क्षुद्र घंटा। नामयाचा नारा विठा ॥ १२ ॥ वाम चरणीं तोडर। परसा रुळतो किंकर ॥ १३ ॥ चरणीं वीट निर्मळ। तो हा जाला चोखामेळ ॥ १४ ॥ चरणातळील उर्ध्वरेखा। जाला जनार्दन एका ॥ १५ ॥

१६२२ आला आषाढी पर्वकाळ। भक्त मिळाले सकळ ॥ १ ॥ निवृत्तिनाथ ज्ञानदेव। मुक्ताबाई सोपानदेव ॥ २ ॥ चांगदेव विसोबा खेचर। सांवता माळी गोरा कुंभार ॥ ३ ॥ रोहिदास कबीर सूरदास। नरहरी आणि भानुदास ॥ ४ ॥ नामदेव नाचे कीर्तनीं एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

१६२३ वारंवार जन्म घेऊं। परी पाहूं पंढरपूर ॥१॥ दुजें मागणें नाहीं देवा। करूं सेवा वैष्णवांची ॥ २ ॥ न मागों भुक्ति आणि मुक्ति। ती फजिती कोण सोसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मागे। कीर्तनरंगीं रंगला वेगें ॥ ४ ॥

१६२४ दास मी होईन कामारी दासीचा। परि छंद सायासाचा नाहीं मनीं ॥ १ ॥ गाईन तुमचें नाम संतांचा सांगात। यापरती मात दुजी नाहीं ॥ २ ॥ निर्लज्ज कीर्तनीं नाचेन मी देवा। एका जनार्दनीं भावा पालट नको ॥ ३ ॥

१६२५ कोणता उपाय। जोडे जेणें संतपाय ॥ १ ॥ हाचि आठव दिवसरात्रीं। घडो संतांची संगती ॥२॥ न करूं जप तप ध्यान। संतांपायीं ठेवूं मन ॥ ३ ॥ न जाऊं तीर्थप्रदक्षिणा। आठवूं संतांचे चरणा ॥ ४ ॥ होता ऐसा निजध्यास। एका जनार्दनीं दास ॥ ५ ॥

१६२६ आधीं घेई निरपेक्षता। त्याचे चरण वंदीन माथां ॥ १ ॥ निरपेक्ष जेथें घडे। यमकाळ पायीं जोडे ॥ २ ॥ निरपेक्षाची आवडी। ब्रह्मज्ञान घाली उडी ॥ ३ ॥ निरपेक्षेवांचून। नाही नाहीं रे साधन ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण। निरपेक्ष पाविजे ज्ञान ॥ ५ ॥

१६२७ सकळ संकल्पांचा त्याग। करितां संतसंग जोडला ॥ १ ॥ मूळ पाहिजे हेंचि शुद्ध। भेदाभेद न यावे ॥ २ ॥ संकल्पाचें दृढ बळ। विकल्पाचें छेदी मूळ ॥ ३ ॥ संकल्प दृढ धरितां पोटीं। एका जनार्दनीं होय भेटी ॥ ४ ॥

१६२८ न होता शुद्ध अंतःकरण। संतसेवा न घडे जाण ॥ १ ॥ शुद्ध संकल्पावांचून। संतसेवा न घडेचि जाण ॥ २ ॥ कामक्रोध दुराचार। यांचा करूं नये अंगिकार ॥ ३ ॥ आशा मनीशांचें जाळें। छेदुनी टाकी विवेकबळें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ध्यान। सहज तेणें संतपण ॥ ५ ॥

१६२९ संतां द्यावें आलिंगन। सांडूनियां थोरपण ॥१॥ अंगे देव करी सेवा। इतराचा कोण केवा ॥२॥ ब्रह्मज्ञानी वंदिती माथां। मुक्ताची सहज मुक्तता ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। यमकाळ वंदिती दोन्हीं ॥ ४ ॥

१६३० जाणिव नेणिवांच्या वाटा। खटपटा पडूं नका ॥ १ ॥ संतां शरण जा रे आधीं। तुटे उपाधी तत्काळ ॥ २ ॥तेणें तुटे भवबंधन। आत्मज्ञान प्रगटे ॥३॥ एका जनार्दनीं शरण। संत परिपूर्ण उदार ॥४॥

१६३१ विचारावें विवेक दृष्टी। संतचरणीं द्यावी मिठी ॥ १ ॥ तेणें चुके जन्मजरा। चुकवी चौऱ्यांशीचा फेरा ॥ २ ॥ संतचरण अनुदिन। दृढ राखावें तेथें मन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। सहज निवारे जन्ममरण ॥ ४ ॥

१६३२ बहु मार्ग बहु प्रकार। तेथें निर्धार न बैसे ॥ १ ॥ उलट सुलट कासया करणें। जप तप अव्हान दैवतें ॥ २ ॥ योग याग तप तीर्थ। साधन कष्ट ते पसारा ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। घडे निशिदिनीं संतसेवा ॥ ४ ॥

१६३३ धर्म अर्थ काम मोक्ष। संतचरणीं ठेवी लक्ष ॥ १ ॥ परा पश्यंती मध्यमा वैखरी। चरणीं निर्धारीं संतांच्या ॥ २ ॥ योगयागादि साधनें। संतचरणीं असो ध्यानें ॥३॥ आणिक नको त्या उपाधी। तोडा देहीं आधिव्याधी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन। एकपणें जनार्दन ॥ ५ ॥

१६३४ गोल्हाट उल्हाट कासया आटाआटी। घेतां संतभेटी पुरे हेंची ॥ १ ॥ गुद ते पीडन नागिणी दमन। संतदरुशन घडतां जोडे ॥ २ ॥ ओहं सोहं यातायाती कोहं जाण। टाकुनि संतचरण धरा

आधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मानावा विश्वास । होय देवदास आपोआप ॥ ४ ॥

१६३५ बकाचिये परी ध्यान नको धरूं । जीवेंमावें धरूं संतचरण ॥ १ ॥ मग ते तात्काळ करिती पावन। ऐसें अनुमोदन आहे शास्त्रीं ॥ २ ॥ ध्यानाचें ध्यान संतांचे चरण । काया वाचा मन दृढ ठेवी ॥ ३ ॥ वाच्य तें वाचक संत ते व्यापक । एका जनार्दनीं देख अंतर्वाही ॥ ४ ॥

१६३६ समष्टीसमान । म्हणो नये थोर सान । ऐसे उपदेशी ज्ञान । आपणा ही गोष्टी ॥ १ ॥ काया वाचा मनें भावें । संतांशीं शरण जावें । सांगती ते जीवें-भावें । अंतरींची गोष्टी ॥ २ ॥ पूर्ण बुध्दिचाची रावो। पापपुण्य नाहीं ठावो । साधुसंतांसी भजावो । मुख्य ही गोष्टी ॥ ३ ॥ ऐसिया संतांसी जाण । शरण एका जनार्दन । घालीतसे लोटांगण । मुख्य ही गोष्टी ॥४॥

१६३७ जयाचें चित्त संतांच्या चरणा । तेणें नारायणा जिंकियेलें ॥१॥ भावें देव मिळे भावें देव मिळे। संतचरणीं लोळे सर्व काळ ॥ २ ॥ संतांची आवडी म्हणोनि अवतार धरी । योगक्षेम भारी चालवी त्याचा ॥ ३ ॥ संतचरणीं सेवा आदर उपचार । एका जनार्दनीं साचार करीतसे ॥ ४ ॥

१६३८ संतांसी आवडे तो देवाचाही देव । काळिकाळाचें भेव पायातळीं ॥ १ ॥ आणिकाची चाड नसेची वासना । संतांचिया चरणा वाचूनियां ॥ २ ॥ ऐसें ज्यांचें प्रेम ऐशी ज्यांची भक्ती । एका जनार्दनीं मुक्ति तेथें रावे ॥ ३ ॥

१६३९ संतांचें सुख जिहीं अनुभाविलें । ते जीवन्मुक्त जाहले जन्मोजन्मीं ॥ १ ॥ संतांचा संग जयासी हो जहाला । प्रत्यक्ष घडला सत्यलोक ॥ २ ॥ एका जनार्दनीं संतांचा अनुभव । धाला माझा जीव परमानंदें ॥ ३ ॥

१६४० संतचरणीं सावधान । ज्याचें जडलेंसें मन। ॥ १ ॥ तया नाहीं जन्ममरण । मुक्ती उभ्या कर जोडोन ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान हात जोडी । संताघरीं घाली उडी ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । वंदितसे अनुदिनीं ॥ ४ ॥

१६४१ सांडोनियां संतसेवा । कोण हेवा मग जोडी ॥ १ ॥ नानापरीचें साधन । अष्टांगयोग धूम्रपान ॥ २ ॥ यज्ञ योग तीर्थकोटी । संतांचेया चरणांगुष्ठीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । संतचरणीं समाधान ॥ ४ ॥

१६४२ संतसेवा केल्यापाठीं । कैंची संसाराची गोष्टी ॥ १ ॥ तेथें कैंचें कर्माकर्म । अवघा देव परब्रह्म ॥ २ ॥ कैंचें ध्येय ध्याता ध्यान। एक संतचरणीं मन ॥ ३ ॥ कैंचा भेद कैंचें भान । एका जनार्दनीं ध्यान ॥ ४ ॥

१६४३ भय नाहीं हरीच्या दासां। शुभ काळ सर्व दिशा ॥ १ ॥ नाहीं तयां गोवागुंती । न लगे पुराण व्युत्पत्ती ॥ २ ॥ नाहीं शास्त्रांचें कारण । वेदाभ्यासाचें नको मनन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । परंपरा हेचि पूर्ण ॥ ४ ॥

१६४४ पायांवरी ठेवितां भाळ । कर्म सकळ सुफळ ॥ १ ॥ ऐसा छंद जया मनीं । धन्य जननी तयाची ॥ २ ॥ लोटांगण संतांपुढा । घाली उघडा होउनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भेटी । जन्ममरणा होय तुटी ॥ ४ ॥

१६४५ देवाचे ते आप्त जाणावे ते संत। त्यांचे चरणीं रत व्हावें सर्वदा ॥ १ ॥ श्रीहरीची भेटी सहजची होय। श्रमलीया जाय क्षणमात्रें ॥ २ ॥ पापाचे पर्वत भस्म नामाग्नींत । अभक्ता न कळे हित नाम न घेती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांचिया कृपे ।नाम होय सोपें कृपें त्यांच्या ॥ ४ ॥

१६४६ संतांचोनियां नाम नये हातां। साधनें साधितां कोटी जाणा ॥ १ ॥ जैसें कांतेविण करणें संसार। साधन विचार व्यर्थ ठेला ॥२॥ संतसमागम धरलिया वांचुनी । संसार सांडणी नोहे बापा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांसी शरण। रिघालिया जाण देव जोडे ॥ ४ ॥

१६४७ संतचरणीं सेवा घडे । भाग्य पहा हो केव्हढें ॥ १ ॥ व्यर्थ शिणती बापुडे ।योग याग करूनी गाढे ॥ २ ॥ संतचरणीं जे विन्मुख । स्वप्नीं न देखती सुख ॥ ३ ॥ संतचरणीं नाहीं थारा । भरले तपांच्या डोंगरा ॥ ४ ॥ नाम न म्हणती कोडें । धूम्रपान करिती तोंडें ॥ ५ ॥ एका जनार्दनीं साचें । मन नाहीं सुख कैचें ॥ ६ ॥

१६४८ ज्ञान ध्यान जप तप तें साधन। ते हे संतनिधान सखे माझे ॥ १ ॥ संतांपायीं आधीं जावें वो शरण । संसार बोळवण होय तेणें ॥ २ ॥ तयाचें हें

मूळ संतांचे पाय। आणीक उपाय नाहीं नाहीं ॥३॥ द्वैत अद्वैताचा न संरेचि कोंभ। तो हाचि स्वयंभ संतसंग ॥४॥ एका जनार्दनीं परब्रह्म नाम। द्वैत क्रियाकर्म तेथें नाहीं ॥५॥

१६४९ तापलीया तापत्रयें संतां शरण जावें। जीवें-भावें धरावें चरण त्यांचें ॥१॥ करूनि विनवणी वंदूं पायवणी। घालूं लोटांगणीं मस्तक हें ॥२॥ उपास-नामार्ग सांगती ते खूण। देती मंत्र निर्वाण विठ्ठल हरी ॥३॥ एका जनार्दनीं संतांसी शरण। रात्र आणि दिन चिंतू त्यांसी ॥४॥

१६५० मनुष्यदेहें हित होय। शरण तूं जाय श्रीसंतां ॥१॥ काय महिमा कीर्ति जगीं। नाहीं सामर्थ्य दुजिया अंगीं ॥२॥ एका जनार्दनीं संत। उदार पतीत तारिती ॥३॥

१६५१ वाउगाचि सोस न करीं सायास। भजें श्रीसंतांस एकाभावें ॥१॥ जाणोनि नेणतां कां होसी रे मूर्ख। सुखाचें निजसुख विटेवरी ॥२॥ एका जनार्दनीं धरूनि विश्वास। होई कां रे दास संतच-रणीं ॥३॥

१६५२ सहस्र मुखांचा वर्णितां भागला। तें सुख तुजला प्राप्त कैचें ॥१॥ संतांचे संगती सुख तें अपार। नाहीं पारावार सुखा अंत ॥२॥ एका जनार्दनीं सुखाचीच राशी। उभा हृषिकेशी विटेवरी ॥३॥

१६५३ सुख अनुपम्य संतसमागमें। अखंड हुता-वतें नामें। दहन होती सकळ कर्में। आणिक वर्म दुजें नाहीं ॥१॥ वाचे म्हणे कृष्णहरी। तेणें पापा होय बोहरी। संसारासी नुरे उरी। हा महिमा सत्सं-गाचा ॥२॥ काशी प्रयागादि तीर्थें थोर। बहुत असती महीवरी। परी संतसमागमाची थोरी। तीर्थें न पावती सर्वदा ॥३॥ असती दैवतें अनंत कोटी। परी संतसमागम भेटी। देती सामर्थ्य हिपुटी। हा महिमा संतांचा ॥४॥ एका जनार्दनी मन। संतच-रणीं दृढ ध्यान। तेणें प्राप्त सच्चिदानंदघन। विठ्ठल देव न विसंबे ॥५॥

१६५४ सर्वकाळ सुख रामनामीं आहे। ऐसा ज्याचा देह धन्य तोचि ॥१॥ जागृती सुषुप्ती रामनाम ध्यान। कार्य आणि कारण रामनामें ॥२॥ एका जनार्दनीं ध्यानीं आणि मनीं। श्रीरामावांचुनी आन नेणे ॥३॥

१६५५ सुखरूप धन्य जाणावा संसारी। सदा वाचे हरी उच्चारी जो ॥१॥ रामकृष्णनाम वंद्य वेळोवेळां। हृदयीं कळवळा संतभेटी ॥२॥ एका जनार्दनीं प्रेमाचा कल्लोळ। भुक्ति मुक्ति सकळ वसे देव ॥३॥

१६५६ आवडे देवासी तो ऐका प्रकार। नामाचा उच्चार रात्रंदिन ॥१॥ तुळसीमाळ गळा गोपीचंदन टिळा। हृदयीं कळवळा वैष्णवांचा ॥२॥ आषाढी कार्तिकी पंढरीची वारी। साधन निर्धारीं आन नाहीं ॥३॥ एका जनार्दनीं ऐसा ज्याचा नेम। तो देवा परमपूज्य जगीं ॥४॥

१६५७ तीर्थाटन गुहावास। शरीरा नाश न करणें ॥१॥ रामनाम संतसंग। हेंचि देवा आवडतें ॥२॥ करितां रामनाम लाहो। घडतो पहाहो धर्म त्या ॥३॥ सकळ कर्म जाती पायां। संतपायां देखतां ॥४॥ एका जनार्दनीं होतां दास। पुरे आस सर्वही ॥५॥

१६५८ सकळ तीर्थें। घडती करितां नामस्मरण। देवाधि देव उत्तम। तोही धांवे सामोरा ॥१॥ पहाहो वैष्णवांचे घरीं। सकळ तीर्थें कामारी। ऋद्धिसिद्धि मोक्ष चारी। दास्यत्व करिती सर्वदा ॥२॥ शरण एका जनार्दनीं। तीर्थांचा तो अधिष्ठानी। नामस्मरण अनुदिनीं। तया तीर्थें वंदिती ॥३॥

१६५९ भुक्तिमुक्तीचें सांकडें नाहीं विष्णुदासां। प्रपंचाची आशा ना तेथें केंची ॥१॥ वैकुंठ कैलास अमरपदें तिन्ही। तुच्छवत मनीं मानिताती ॥२॥ राज्य भोग संतती संपत्ति धन मान। विष्ठे तें समान श्वान सुकर ॥३॥ मा ब्रह्मदारा तेथें कोण पुसे तत्त्वतां। घर रिघोनि सायुज्यता येत असे ॥४॥ एका जनार्दनीं नामाची प्रौढी। ऋद्धिसिद्धि दडी घरीं देती ॥५॥

१६६० कळिकाळाचें न चले बळ। ऐसे सबळ हरिदास ॥१॥ क्षमेचें तो कवच अंगीं। धीर प्रसंगीं कामक्रोधा ॥२॥ रामनाम हाचि बाण। शस्त्र निर्वाण सांगातीं ॥३॥ एका जनार्दनीं यमाचे भार। देखतां समोर पळती ते ॥४॥

१६६१ जाईल तरी जावो प्राण। परी न सोडा चरण संतांचे ॥१॥ होणार तें हो कां सुखें। परी मुखें रामनाम न सोडा ॥२॥ कर्म धर्म होतु कां

हानी । परी प्रेम कीर्तनीं न सोडा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वर्म । सोपा धर्म सर्वांसीं ॥ ४ ॥

१६६२ परमार्थाचा हाचि भाव । वाचे देव स्मरावा ॥ १ ॥ नाहीं दुजा छंद मनीं । संतचरणीं विश्वास ॥ २ ॥ न धांवे वायां कोठें मन । संतचरणांवाचुनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नेम । सर्वोत्तम हृदयीं वसे ॥४॥

१६६३ जन्ममरण कोडें निवारी हा संग । भजें पांडुरंग आधीं आधीं ॥ १ ॥ वांयाची पसारा नासिलासी सारा । कां रे चुकसी पामरा भजनासी ॥ २ ॥ एकविध भाव भक्ति करीं मोळी । तेणें कुळींची मुळी हातीं लागे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांचा सेवक । तयाचा मग धाक ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

१६६४ संकल्प विकल्प नका वायां । धरा पायां विठोबाच्या ॥ १ ॥ सर्व तीर्थां हेंचि मूळ : आणीक केवळ दुजे नाहीं ॥ २ ॥ संतसमागमें उपाधी । तुटती आधिव्यापी घडतांची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वर्म सोपें । हरती पापें कलियुगीं ॥ ४ ॥

१६६५ गव्हांची राशी जोडिल्या हातीं । सकळ पक्वान्नें तै होतीं ॥ १ ॥ ऐसा नरदेह उत्तम जाण । वाचे वदे नारायण ॥ २ ॥ द्रव्य जोडितां आपुल हाती । सकळ पदार्थ घरा येती ॥ ३ ॥ भावें करी संतसेवा । एका जनार्दनीं प्रिय देवा ॥ ४ ॥

१६६६ वेदोक्त पठण करितां चढे मान । तेणें होय पतन कर्मभूमी ॥ १ ॥ सोपें ते साधन संतांसी शरण । तेणें चुके बंधन जडजीवां ॥ २ ॥ अभ्यासाचा सोस वाउगाची द्वेष । न करी सायास नाम जपे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सायासाचे भरी । नको पडूं फेरी चौऱ्यांशीच्या ॥ ४ ॥

१६६७ पालटे भावना संताचे संगती । अभाविकांहि भक्ति प्रगटतसे ॥ १ ॥ ऐसा ज्याचा उपकार । मानिती निर्धार वेदशास्त्रें ॥ २ ॥ तारिती आणिकां देऊनि विठ्ठलमंत्र । एका जनार्दनीं पवित्र नाम गाती ॥३॥

१६६८ संत केवळ घातकी पाही । परी त्यासि पातक नाहीं ॥ १ ॥ निजबोधाचे करूनी फांसे । दोघे गोसावी मारिले कैसे ॥ २ ॥ अती खाणोरिया कर्म करी । दिवसां जाळिले गांव चारी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं घातकी मोठे । त्यासी अंतक केवीं भेटे ॥ ४ ॥

१६६९ छळणें करूनी बोलतां । तात्काळ जाली समाधी अवस्था । सद्भावें विमटतां संतां । न कळे तत्वतां काय देती ॥ १ ॥ जाणा जाणते सकळ । ज्यांसी निजप्राप्तीची कळवळ । तिहीं सांडोनि स्थळ । संतजन वंदावे ॥ २ ॥ एका जनार्दनाचे तान्हे । भुकाळु पै मागूं नेणे । कुर्वाळूनियां स्तनें । जनार्दनें लाविलें ॥३॥

१६७० नरदेहीचा हाचि मुख्य स्वार्थ । संतसंग करी परमार्थ ॥ १ ॥ आणिक नाहीं पां साधन । मुखीं हरि हरी स्मरण ॥ २ ॥ सोडी द्रव्य दारा आशा । संतसंगे दशा पावावी ॥ ३ ॥ जरी पोखलें शरीर । तरी तें केव्हांहि जाणार ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका म्हणे । संतापायीं ठाव देणे ॥ २ ॥

१६७१ हरिनाम स्मरतो म्हणोनि आचरसी दोष । श्रवण स्मरण भक्ति तेणें पडली वोस ॥ १ ॥ हरिनामाचेनि बळे करिसी अधर्म । देवाचेनी तुमचें शुद्ध नोहे कर्म ॥ २ ॥ दुर्वासाचेनि कोपे अंबऋषीस शाप । देवाचे चक्रें त्या दिधले संताप ॥ ३ ॥ सत्यवती धर्म सद्यज्ञनिष्ठ । असत्य वचनीं त्याचा झडला अंगुष्ट ॥४॥ निष्पाप मांडव्य शुळी वाइला । इतुकियास्तव यम दासीपुत्र केला ॥ ५ ॥ एका जनार्दनीं संत सोयीनें चाले । सद्गुरुवचनें सबाह्य शुद्ध जाले ॥ ६ ॥

१६७२ नको दुजी रे वासना । मिठी घाली संतचरणा । पंढरीचा राणा । आपोआप हृदयीं ॥ १ ॥ हाचि धरी रे विश्वास । सांडी वाउगा हव्यास । नको आशा तृष्णा पाश । परतें टाकीं सकळ ॥ २ ॥ भगवद्भक्तीचें लक्षण । सर्वांभूतीं समाधान । पाहतां दोष आणि गुण । वाउगा शीण मना होय ॥ ३ ॥ सर्वांभूती देव आहे । सर्व भरुनी उरला पाहे । रिता नाहीं कोठें ठाव । देवाविण सर्वथा ॥ ४ ॥ म्हणोनी नको भेदभाव । एक वचनीं एक ठाव । एका जनार्दनीं स्वयमेव । देव उभा पंढरी ॥५॥

१६७३ संतवचनें देव जोडे । सायुज्य मुक्ति पायां पडे । संतवचनें सांकडें । नुरेचि कांहीं ॥ १ ॥ धन्य धन्य संतसंग । उभा तेथें श्रीरंग । लक्ष्मीसहित अभंग । तिष्ठे सदा ॥ २ ॥ संतवचनें कर्म झडे । संतवचनें मोक्ष जोडे । संतवचनीं तीर्थ झडे । धन्य संग संतांचा ॥ ३ ॥ संतवचनें तुटे उपाधी । संतवचनें सरे आधिव्याधी । संतवचनें भवनदी । प्राणी तरती ॥ ४ ॥ संतवचनीं धरा भाव । तेणें सर्व निरसे भेव । एका जनार्दनीं देव । प्रत्यक्ष भेटे ॥ ५ ॥

१६७४ संतवचनें साधे मुक्ती । संतवचनें ब्रह्मस्थिति । कर्माकर्माची शांती । संतवचनें ॥१॥ संत-

वचनें याग । संतवचनें सांग योग । संतवचनें अनुराग । घडतां संग संतांचा ॥२॥ संतवचनें ब्रह्मप्राप्ती संतवचनें सायुज्य मुक्ती । ब्रह्मादि पदें येती । संतवचनें समोर ॥ ३ ॥ संतवचनें सर्व सिद्धी । संतवचनें समाधी । संतवचनें उपाधी । एका जनार्दनीं तुटतसे ॥ ४ ॥

१६७५ सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं । सज्जनवृंदें मनोभावें आधीं वंदावीं ॥ १ ॥ संतसंगें अंतरंगें नाम बोलावें । कीर्तनरंगीं देवा सन्निध सुखें डोलावें ॥ २ ॥ भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरां न कराव्या । प्रेमभरें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ॥३॥ जेणें करुनी मूर्ति ठसावी अंतरीं श्रीहरीची । ऐशी कीर्तनमर्यादा आहे संतांच्या घरची ॥४॥ अद्वय भजनें अखंड स्मरणें वाजवी करटाळी । एका जनार्दनीं मुक्त होय तत्काळीं ॥ ५ ॥

१६७६ सर्वांगीं सुवास परि तो उगला न राहे । सभोंवतें तरुवर चंदन करीताचि जाये ॥ १ ॥ धर्णी धाय परी त्याची भुक्ति न धाये । सागर भरिता परी त्या सरिता समाये ॥ २ ॥ वैरागर मणी पूर्ण तेजाचा होय । सभोंवतें हारळ हिरे करीतचि जाय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण जालासे निज । आपणासारिखें परी तें करीतसे दुजें ॥ ४ ॥

१६७७ आली आषाढी जाये पंढरीसी । चित्त पायांपाशीं विठोबाच्या ॥ १ ॥ वैष्णव गर्जती नामामृत सार । फुटतसे पाझर कामक्रोधा ॥ २ ॥ एका जनार्दनीं धरुनी विश्वास । जाये पंढरीस होय संतांचा दास ॥ ३ ॥

१६७८ धन्य हरिहर भवभयहर । आठव सत्वर करीं मना ॥ १ ॥ तयांच्या चिंतनीं हरतील दोष । नित्य होय वास वैकुंठासी ॥ २ ॥ नारदादि संतां करावें नमन । धरावे चरण हृदयकमळीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतचरण ध्यातां । मुक्ति सायुज्यता हातां येते ॥ ४ ॥

१६७९ पंढरीची वारी आहे ज्याचे घरीं । तोचि अधिकारी धन्य जगीं ॥ १ ॥ आपण तरुनी तारितसे लोकां ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति देखा तिष्ठताती ॥ २ ॥ धर्म अर्थ काम हे त्याचे अंकीत । एका जनार्दनीं मात धन्य त्याची ॥ ३ ॥

१६८० धन्य पंढरीची वारी । सदा वसे जया घरीं ॥ १ ॥ तोचि देवाचा आवडता । कळिकाळा मारी लाथा ॥ २ ॥ आलिया आघात । निवारी स्वयें दीनानाथ ॥३॥ कळिकाळाची बाधा । नोहे तयासी आपदा ॥ ४ ॥ लक्ष्मी घरीं वसे । देव तेथें फिरतसे ॥ ५ ॥ ऐशी भाविकाची आवडी । एका जनार्दनीं घाली उडी ॥ ६ ॥

१६८१ भाळे भोळे वारकरी । हरिनामगजरीं नाचती ॥ १ ॥ त्यांचा संग देई देवा । नको हेवा दुजा कांहीं ॥ २ ॥ त्यांचे चरणीं राहो मन । आणिक साधन दुजें नको ॥ ३ ॥ म्हणती हरि करिती वारी । याहुनी थोरी कोण आहे ॥ ४ ॥ तयांजवळी मज ठेवा । एका जनार्दनीं जीवा माझिया ॥ ५ ॥

१६८२ आवडी जाती पंढरीसी । अहर्निशीं ते वारकरी ॥ १ ॥ तयांचे पायीं माझे भाळ । सर्वकाळ असो देवा ॥ २ ॥ हातीं टाळ मुखीं नाम । नेणती सकाम दुसरें ॥ ३ ॥ एकविध तयांचें मन । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

१६८३ पायांवरी ठेविती भाळ । ते प्रेमळ वारकरी ॥ १ ॥ जन्मोजन्मीं त्यांचा संग । द्या अभंग सर्वदा ॥२॥ सर्वकाळ वाचे । दुजें साचें नाठविती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं त्यांचा संग । घडावा सर्वांगें मजसी ॥ ४ ॥

१६८४ आषाढी पर्वकाळ । निघताती संतमेळ । करिती गदारोळ । विठ्ठलकीर्तनीं ॥ १ ॥ धन्य धन्य त्यांचें कुळ । पावन ते सकळ । येवोनि उतावीळ । विठ्ठला भेटतो ॥ २ ॥ करती चंद्रभागे स्नान । पुंडलिकाचें अभिवंदन । तीर्थ प्रदक्षिणा दरुशन । विठ्ठलाचें ॥ ३ ॥ एकादशी करती व्रत । नेमें जागरण करीत । आनंदेंभरीत नाचत । विठ्ठलासमोर ॥ ४ ॥ ऐसे भाळे भोळे सकळ । विठ्ठलाचे लडिवाळ । एका जनार्दनीं कृपाळ । विठ्ठल माझा ॥ ५ ॥

१६८५ धर्म अर्थ काम । जिहीं अर्पिला संपूर्ण ॥१॥ तेचि जाती या वाटा । पंढरी चोहटा नाचती ॥ २ ॥ आणिकांसी नोहे प्राप्ती । संत गाती तो स्वादु ॥३॥ क्षीण आदि अवसानीं । पंढरपूर न देखतां नयनीं ॥ ४ ॥ उभा विटे समचरणीं । एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

१६८६ नको तुझें आम्हां कांहीं । वास पंढरीचा देई ॥ १ ॥ दुजें कांहीं नको आम्हां । घावा चर

णाचा महिमा ॥ २ ॥ संतांची संगत । दुजा नाहीं कांहीं हेत ॥ ३ ॥ काकुलती येतो हरी । एका जनार्दनीं निर्धारीं ॥ ४ ॥

१६८७ ऐसी प्राप्ति कै लाहीन । संतसंगती राहीन। त्यांचे संगती मी ध्याईन । नाम गाईन अहर्निशीं ॥ १ ॥ भावें धरलिया संतसंग । सकळ संगा होय भंग । अभ्यासितां आगळे योग । पळे भवरोग आपभयें ॥ २ ॥ सेविलीया संतचरणतीर्था । तीर्थं पायवणी वोढविती माथां । सुरनर असुर वंदिती तत्वतां। ब्रह्म सायुज्यता घर रिघे ॥ ३ ॥ संतचरणरज मस्तकीं पडे । देह संदेह समूळ उडे । उघडिलीं मुक्तीचीं कवाडें । कोंदाटे पुढें परब्रह्म ॥ ४ ॥ दृढ धरलिया सत्संगती । अलभ्य लाभ आतुडे हातीं । चारी पुरुपार्थ चारी मुक्ती । पायां लागती निजदास्य ॥ ५॥ जैं कृपा करिती संतजन । जन विजन होय जनार्दन । एका जनार्दनीं शरण । ब्रह्म परिपूर्ण तो लाहे ॥ ६ ॥

१६८८ देहाचिया आशा पुत्रादिक धन । कासया बंधन घडे मग ॥ १ ॥ सांडोनि उपाधी करावें भजन । तेणें जनार्दन कृपा करी ॥ २ ॥ एका जनार्दनीं निराशी तो धन्य।तयाचे चरण वंदूं आम्ही॥ ३ ॥

१६८९ संत सज्जन जिवलग माझे । त्यांचे चरण चुरीन वोजे ॥ १ ॥ त्यांचे संगें सुख मना होय । आनंद आनंदीं पाहतां होय ॥ २॥ त्यांचे विर्हे मजलागीं मोठें । ऐसे भाविक केवीं भेटे ॥ ३ ॥ त्यांचे नामाची घेऊं धणी । तया जाऊं लोटांगणीं ॥ ४ ॥ तयां शेजार करितां बरा । चुके जन्ममरण फेरा ॥५॥ तया जीव करूं कुरवंडी पाहीं । एका जनार्दनीं लागतसे पायीं ॥ ६ ॥

१६९० होईन मी दास कामारी संतांचा । संकल्प हा साचा जीवभावें ॥ १ ॥ घालीन लोटांगण करीन पूजन । भावें वोवाळीन प्राण माझा ॥ २ ॥ आणिक सायास न करीं कांहीं आस । होईन निजदास संतचरणीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हेंचि वाटे बरें । आणिक दुसरें नको कांहीं ॥ ४ ॥

१६९१ संतांचिये द्वारीं होईन द्वारपाळ । न सांगतां सकळ करीन काम ॥ १ ॥ तेणें माझ्या जीवा होईल समाधान । यापरतें साधन आणिक नाहीं ॥ २ ॥ शेष उष्टावळी काढीन पत्रावळी । पूर्वकर्मा होळी सहज होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हेंचि पै मागत । नाहीं दुजा हेत सेवेविण ॥ ४ ॥

१६९२ संताचिये घरीं होईन श्वानयाती । उच्छिष्ट तें प्रीति मिळेल मज ॥ १ ॥ तेणें या देहाची होईल शुद्धता । भ्रम मोह ममता निवारेल ॥ २ ॥ आशा पाश सर्व जातील तुटोनी । जीव हा बंधनीं मुक्त होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाकीन करुणा । श्रीसंतचरणा वारंवार ॥ ४ ॥

१६९३ संतांचिये परिचारीं । लोळेन मी निर्धारीं ॥ १ ॥ जीवा होईल महालाभ । ऐसा घडतां उद्योग ॥ २ ॥ सांडोनियां थोरपण । शिव घालीं लोटांगण ॥ ३ ॥ आपुलें महत्व । तेथें मिरवूं नये सत्य ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं । वोवाळावा जीव चरणीं ॥ ५ ॥

१६९४ संतांचे चरणीं । सुख घेईन मी धणी ॥ १ ॥ करीन नीचवृत्ति काम । मना होईल विश्राम ॥ २ ॥ बंधनाची बेडी । तुटेल तयाचीये जोडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । वासना जाईल करपोन ॥ ४ ॥

१६९५ अनुपम्य सुख संतांचिया पायीं । राहीन तये ठायीं अखंडित ॥ १ ॥ अखंडित गोडी सेवीन आवडी । ब्रह्मादिकां जोडी ऐसी नाहीं ॥ २ ॥ सर्व पर्वकाळ आले तयां ठायां । विश्रांती घ्यावया इच्छिताती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुखाचें माहेर । भवसिंधुपार तारक हें ॥ ४ ॥

१६९६ एकविध भाव संतांच्या चरणीं । घेईन पायवणी धणीवरी ॥१॥ आनंदें चरण धरीन आवडी। हेंच माझी जोडी सर्व जाणा ॥२॥ उतराई तयांच्या नोहे उपकारा । धाडिती माहेरा निजाचिया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं घडतां त्यांचा संग । जन्ममरण पांग तुटे मग ॥ ४ ॥

१६९७ संत जाती हरिकीर्तना । त्यांच्या वाहीन मोचे वहाणा ॥ १ ॥ हेंचि भवसिंधूचें तारूं । तेणें उतरूं पैलपारु ॥ २ ॥ जन्मोजन्मींचें भेपज । तें हें संतचरणरज ॥ ३ ॥ संतचरणींच्या पादुका । जाहला जनार्दन एका ॥ ४ ॥

१६९८ एक आहे मज आस । संत दासांचा मी दास ॥ १ ॥ कै पुरती मनोरथ । संत सनाथ करतील ॥ २ ॥ मनींचें साच होईल कई । क्षेम मी देई संतांसी ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । माझा मनीं नवस पुरे ॥ ४ ॥

१६९९ आम्हांसी तो एका संतांचे चरण । दुजें अनुमान नेणों कांहीं ॥ १ ॥ सर्वभावें त्यांचें करितां सेवन । आमुचें हितकल्याण जन्मोजन्मीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं संतांचे चरणां । जाईन लोटांगणीं जीवेंभावें ॥ ३ ॥

१७०० संत भलते याती असो । परी विठ्ठल मनीं वसो ॥ १ ॥ तया घालीन लोळणी । घेईन मी पायवणी ॥ २ ॥ शातीं कुळासी कारण । मज नाहीं भेदाभेद ॥ ३ ॥ भलते आताचा । विठ्ठल उच्चारी वाचा ॥ ४ ॥ तेथें पावन देह वारी । एका जनार्दनीं निर्धारी ॥ ५ ॥

१७०१ पायासीं घालीन मिठी । दाटेन कंठा सद्गद ॥ १ ॥ वाहेन टाळी नाचेन रंगीं । दुजें संगी नका कांहीं ॥ २ ॥ पायवणी वंदीन माथा । निवारेल चिंता मग सर्व ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दान । द्यावें दोष गुण न पाहा ॥ ४ ॥

१७०२ तुम्हीं कृपा केलियावरी । पात्र होईन निर्धारी ॥ १ ॥ आतां नका धरूं दुजें । सीतृपणाचे उतरा ओझें ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण । जीवींची निजखूण त्या द्यावी ॥ ३ ॥

१७०३ सोनियाचा दिवस आजी झाला । संतसमागम पावला ॥ १ ॥ फिटलें अवघें कोडें । झालें परब्रह्म उघडें ॥ २ ॥ एका जनार्दनीं सेवा । करीन मी त्यांची भावा ॥३॥

१७०४ माझ्या मना धरीं सोसो । संत जोडी करी तूं ॥१॥ मग सुखा काय उणें । दणावें ॥२॥ कळिकाळ वंदी माथा । नाहीं चिंता संसारा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दास । होय आस पुरवासी ॥ ४ ॥

१७०५ मनाची नखी न लगे जयां टाया । तेणें उणी पायां भेटवी संत ॥ १ ॥ संत उदार उदार । नामामृतें भरलें सागर ॥ २ ॥ एका जनार्दनीं संत । कोण जाणें त्यांचा अंत ॥ ३ ॥

१७०६ करी कांहीं मना एक विचारणा । संतांच्या चरणा न विसंबे ॥ १ ॥ तयाचा मी दास कामारी दुर्बळ । तोचि माझें सकळ हित करी ॥ २ ॥ देउनि प्रेमपान्हा लडिवाळपणें।कृपेचें पोसणें तुमचें मी ॥३॥ जनार्दनाचा एका तुमचा तो दास । तयासी उदास धरूं नये ॥४॥

१७०७ मनाचेनि मनें जहालों शरणागत । कृपावंत संत मायबाप ॥१॥ धरूनियां आस घातली लोळणी । मस्तक चरणीं माझा तुमच्या ॥ २ ॥ तुमचा मी दास कामारी त्रिवाचा । आणिक मनाचा संकल्प नाहीं ॥३॥ एका जनार्दनीं तुम्हीं तों पावन । काय हा मी दीन वानूं महिमा ॥ ४ ॥

१७०८ पाहूनियां मनोगत । पुरवा हेत तुम्ही माझा ॥ १ ॥ मग मी न सोडी चरणां । संत सुजाणा तुमचीया ॥ २ ॥ दंडवत घालीन पायां । करा छाया कृपेची ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । मुकुटमणीं तुम्ही संत ॥ ४ ॥

१७०९ जन्मजन्मांतरींचें सुकृत जोडणें । संतचरण पावणें तेणें भाग्यें ॥१॥ हा माझा विश्वास संतचरण सेवा । दुजा नाहीं हेवा प्रपंचाचा ॥२॥ मागणें तें नाहीं आणिक तयासी । संत हे सेवेसी झिजवी अंग ॥३॥ एका जनार्दनीं सेवेसी मन । रात्रंदिवस ध्यान लागो त्याचें ॥४॥

१७१० जगीं जनार्दन मुख्य हाचि भाव । संत तेचि देववृत्ती केली ॥१॥ समाधी साधन माझें संतजन । विश्रांतीचें स्थान संतापायीं ॥२॥ योगयाग धारणा पंचाग्नि साधन । तें हें माझें ध्यान संतापायीं ॥३॥ एका जनार्दनीं तयांचा सांगात । घडो मज निश्चित सर्वकाळ ॥४॥

१७११ तुमच्या चरणीं मिठी । आतां तुटी न करावी ॥१॥ थोरांचें जें थोरपण । तुम्हां करणें सहजची ॥२॥ मी पतीत दीन हीन । म्हणोनि शरण तुम्हांसी ॥३॥ पतीतपावन तुम्हीं संत । एवढें आर्त पुरवा ॥४॥ एका जनार्दनीं शरण । त्यासी चुकवा जन्ममरण ॥५॥

१७१२ ऐकोनी कीर्ति उदार संत । आलों धांवत शरण ॥ १ ॥ सांभाळावें सांभाळावें । सांभाळावें अनाथा ॥ २ ॥ धरूनियां हातीं हात । ठेवा मस्तकीं निवांत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपण । एका भावें आलों शरण ॥ ४ ॥

१७१३ संतचरणीं जीवभाव । ठेविला देह विसर ॥१॥ आतां तुम्ही उपेक्षिल्यावरी । कोण वानील तुमची थोरी ॥ २ ॥ बहु जाहलों कासावीस । धरली कास आदरें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं परता । करितां लाज येई माथा ॥ ४ ॥

१७१४ संतचरणीं विश्वास । धरुनी राहिलों रात्रंदिवस ॥ १ ॥ मज दीना सांमाळावें । हेंचि मागें जीवेंभावें ॥ २ ॥ धनवित्ता चाड नाहीं । सेवा सुखे मज द्यावी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आपुला । एका एकपणें अंकिला ॥ ४ ॥

१७१५ पुरवा माझी एवढी आस । करा निजदास संतांचा ॥ १ ॥ इच्छा पुरवा मनींचा हेत । सभाग्य संत दाखवा ॥ २ ॥ आणिक मागणें तें नाहीं । दुजा देहीं आठव नको ॥ ३ ॥ घालीन लोळणी । संतचरणा निशिदिनीं ॥ ४ ॥ परलोकींचे तारुं । एका निर्धारु जनार्दनीं ॥ ५ ॥

१७१६ देहतापे तापलों भारी । संताघरीं मागतसें ॥ १ ॥ मज द्या काहो जीवन । जेणें जीवाचें समाधान ॥ २ ॥ एका जनार्दना सवें । सुखसागराची घातली पोहे ॥ ३ ॥

१७१७ मायवाप तुम्ही संत । मी पतीत कींव भाकी ॥ १ ॥ करा माझें समाधान । अभय वचन देउनी ॥ २ ॥ मागें तारिले सकळ । उत्तम अधम चांडाळ ॥ ३ ॥ तोचि आहे अनुभव । म्हणोनि कींव भाकितसे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । मज पावन करावें ॥ ५ ॥

१७१८ संताचिये पायीं । भावे ठेविलीं म्यां डोई ॥१॥ करा माझें समाधान । आलों पतीत शरण ॥ २ ॥ आपुलीया सेवे । माझे संकल्प वेचावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तुमचा दास । पुरवा आस माझी ते ॥४॥

१७१९ तुम्ही तंव उदार मायबाप संत । करावें कृतार्थ मजलागी ॥१॥ ठेवा माथां हात वंदूं पायवणी । आणिक दुजें मनीं नाहीं कांहीं ॥२॥ गुण दोष याती न पहा कारण । करितो भजन निशिदिनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तयाचा मी दास । एवढीच आस पायी मिठी ॥ ४ ॥

१७२० फार बोलूं काय वांया । जाणवेल पाया चित्त माझें ॥ १ ॥ धन्य धन्य तुम्ही संत । कृपावंत संसारीं ॥ २ ॥ उत्तीर्णपणें मज दासा । पुरवा इच्छा कृपाळुवा ॥ ३ ॥ शरण एका जनार्दना । कृपा करुणा तुम्ही संत ॥ ४ ॥

१७२१ रवि न लपेचि अंधारीं । तैशी तुमची जगीं थोरी ॥ १ ॥ कृपावंत तुम्ही संत । यावरी हेत दुजा नाहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण । संत परीपूर्ण दयाळु ॥ ३ ॥

१७२२ धन्य आज दिन संतदरुशनाचा । अनंत जन्मांचा शीण गेला ॥ १ ॥ मज वाटे त्यासी आलिंगन द्यावें । कदा न सोडावे चरण त्यांचे ॥ २ ॥ त्रिविध तापांची जाहली बोळवण । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं घडो त्यांचा संग । न व्हावा वियोग माझ्या चित्ता ॥ ४ ॥

१७२३ संतांच्या विभुती जगासी उपदेश । देताती सौरस सर्वभावें ॥१॥ परिसाचे परी करिती उपकार । कामधेनु कल्पतरूवर त्यासी वंद्य ॥ २ ॥ एका जनार्दनीं सर्वांमाजीं श्रेष्ठ । संत ते वरिष्ठ वंदूं आम्हीं ॥३॥

१७२४ संत आमुचे देव संत आमुचे भाव । आमुचें गौरव संत सर्व ॥१॥ वेदशास्त्र पुराण मंत्रादि साधन। संतसेवा ध्यान आम्हां धन्य ॥ २ ॥ योगयाग व्रत साधन पसर। संताठायीं आदर हेंचि बरें ॥ ३ ॥ जनी जनार्दन संतसेवा जाण । एका जनार्दन तोचि धन्य ॥ ४ ॥

१७२५ संतसमागमें सुखाची ते राशी । म्हणोनि पायांपाशी सलगी केली ॥ १ ॥ वंदूं चरणरज घालूं लोटांगण । अभय तें दान संत देती ॥२॥ पंचमहापातकी विश्वासघातकी । ऐशी यासी निकी संतसेवा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांचा मी दास । अनन्य पायांस न विसंबे ॥ ४ ॥

१७२६ सायासाचा न करी सोस । एक आंस संतचरणीं ॥ १ ॥ नावडे वैभव विलास मनीं । अनुदिनीं संतसेवा ॥ २ ॥ प्रेमें प्रेम दुणावलें । सुख जाहलें सुखासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । संतचरण वंदी माथां ॥ ४ ॥

१७२७ संतसुखसागरीं । बुडी दिधली निर्धारीं । भव दुःख हरी । संतनामें ॥ १ ॥ ऐसा संतांचा महिमा । नाहीं द्यावया उपमा । ब्रह्मसुखधामा । पुढें नाचे ॥२॥ बोलती तें वचन साचें । नाहीं बोलणें असत्याचें । नामीं प्रेम जयाचें । जडोनि ठेलें ॥३॥ कृपावंत संत । दीन तारिले त्वरित । एका जनार्दनीं मात । श्रवण मज झाली ॥ ४ ॥

१७२८ तुम्ही संतजन । माझें ऐका हो वचन ॥१॥ करा कृपा मजवरी । एकदां दाखवा तो हरी ॥ २ ॥ आहे तुमचे हातीं । म्हणोनि येतो काकुळती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे थारा । संतीं द्यावा मज पामरा ॥४॥

१७२९ जाहली भाग्याची उजरी। संतसेवा निरंतरी ॥ १ ॥ हेंचि मज वाटे गोमटें। येणें भवभ्रम फिटे ॥ २ ॥ करिता सावकाश ध्यान। होय मनाचें उन्मन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत। सदा शांत अंतरीं ॥ ४ ॥

१७३० आजी सुदिन आम्हांसी। संतसंग कैवल्यराशी ॥ १ ॥ हेंचि आमुचें साधन। आणिक नको आम्हां पठण ॥ २ ॥ वेदश्रुती पुराण मत। संतसेवा ते सांगत ॥ ३ ॥ जाणोनि विश्वासलों मनीं। शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१७३१ कृपाळ उदार तुम्ही संत। दीन अनाथ तारिले ॥ १ ॥ हाचि महिमा ऐकिला। जीव गुंतला चरणीं ॥ २ ॥ करा माझें समाधान। देउनी वचन अभयाचें ॥ ३ ॥ यावरी फार बोलूं नेणें। उचित करणें तुम्हांसी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण। आहे मी दीन पामर ॥ ५ ॥

१७३२ मस्तक माझें संतांपायीं। ठेउनी होऊं उतराई ॥ १ ॥ वारंवार क्षणक्षणा। नामघोष करिती जाणा ॥ २ ॥ देउनी अभयदान। करिती पतीतपावन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाही। संतापायीं ठेवी डोई ॥ ४ ॥

१७३३ संताचिये पायीं मज पैं विश्रांती। नाहीं माया भ्रांति तये ठायीं ॥ १ ॥ सांगतों तें मनीं धरावें वचन। संतांसी शरण जावें सुखें ॥ २ ॥ संत तुष्टलिया देवा आनंद होय। मागें मागें धांवे तया पाठीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं माहेर सुखाचें। घेतलीया वाचे संतनाम ॥ ४ ॥

१७३४ ब्रह्मांडभरी कीर्ति संतांचा महिमा। वर्णावया आम्हां मति थोडी ॥ १ ॥ एक मुखें वानूं चतुरानन शीणु। सहस्र मुखें गुणु वानितां नेणें ॥ २ ॥ एका जनार्दनीं वर्णीन पवाडे। उभा वाडेकोडें पंढरीये ॥ ३ ॥

१७३५ संताचा महिमा। नाहीं द्यावया उपमा ॥ १ ॥ मज तारिले तारिले। भवजळीं उद्धरिलें ॥ २ ॥ पावन केलें संतीं। अवघी निरसली गुंती ॥ ३ ॥ संतचरण वंदीन माथां। एका जनार्दनीं तत्त्वता ॥ ४ ॥

१७३६ गर्भवासा भीती ते अंधळे जन। मुक्तीसी कारण नाहीं आम्हां ॥ १ ॥ गर्भवास झालिया संतसेवा घडती। मुक्त जालिया न कळे भगवद्भक्ती ॥ २ ॥ आम्हीं सुखें गर्भवास घेऊं देखा। मुक्तीचिया मस्तकीं पाय देऊं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गर्भवास सोसूं। संताचा सौरसु हातीं लागे ॥ ४ ॥

१७३७ बालका देखोनी संकटीं। माता कार्य टाकुनी उठी ॥ १ ॥ ऐसें दयेचे ठायीं जाण। आपुलें जाणावें पारिखेपण ॥ २ ॥ महापुरीं बुडे तयातें। उडी घाली कृपाळु तेथें ॥ ३ ॥ दीनाचिये लाभीं। जो निघे जळतीये अंगीं ॥ ४ ॥ ऐसे दयेचे पाळी लळे। एका जनार्दनीं चरणीं लोळे ॥ ५ ॥

१७३८ देह गेह चिंता। बाळासी नाठवे सर्वथा ॥ १ ॥ न देखे तो दुजें स्थान। बाळका आपुलें अंगीं जाण ॥ २ ॥ माझें तुझें न म्हणे। उंच नीच कांहीं नेणें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अखंड। नाहीं तया वांया खंड ॥ ४ ॥

१७३९ संकल्पाचा आन ठाव। नाहीं भाव दुसरा ॥ १ ॥ तुमच्या चरणांसी शरण। काया वाचा आणि मन ॥ २ ॥ आलों दीन होउनी हीन। तुम्ही तंव पतीतपावन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। करा खंडन जन्ममृत्यु ॥ ४ ॥

१७४० तुमचें कृपेचें पोसणें। त्याचें धांवणें करा तुम्ही ॥ १ ॥ गुंतलोंसे मायाजाळीं। बुडतों जळीं भवाच्या ॥ २ ॥ कामक्रोध हे मगर। वेढिताती निरंतर ॥ ३ ॥ आशा तृष्णा या सुसरी। वेढिताती या संसारीं ॥ ४ ॥ म्हणोनी येतों काकुळती। एका जनार्दनीं विनंती ॥ ५ ॥

१७४१ संत ते सोइरे सांगाती आमुचे। तेणें कळिकाळाचें भय नाहीं ॥ १ ॥ जयाची आवडी धरी नारायण। म्हणोनि चरण धरूं त्यांचे ॥ २ ॥ परलोकींचे सखे सोइरे सांगाती। मज ते आदीअंतीं सांभाळिती ॥ २ ॥ एका जनार्दनीं धरूनि विश्वास। होईन त्यांचा दास जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

१७४२ अखंडित संतसंग। तेथें काय सुखा उणें मग ॥ १ ॥ माझें आलें अनुभवा। संतसेवा घडावी ॥ २ ॥ हेंचि मागें आणीक नाहीं। संतसंग देई सर्वकाळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन। संतपायीं मी ठेवीन ॥ ४ ॥

१७४३ मनासी निर्धार केलासे देखा। संतसंग सुखा आतुडलों ॥ १ ॥ इच्छिलें पावलों इच्छिलें पावलों। इच्छिलें पावलों संतसंग ॥ २ ॥ एका जनार्दनीं सांगात तयाचा। अनुभवें अनुभवाचा बोध लाहे ॥ ३ ॥

१७४४ बहुत मारग बहुत प्रकार । नागवले थोर थोर मार्गे ॥१॥ म्हणोनिया जीवें मानिला विश्वास । नाहीं दुजी आस संताविण ॥ २ ॥ मार्गाची आशा सांडिला बोभाट । धरली एक वाट संतसंग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जातां तयांमागें । हित लागवेगें जाहलें माझें ॥ ४ ॥

१७४५ चालतां मारगीं फुटतसे वाट । मग तो बो भाट सहजीं होय ॥१॥ तैसें नोहे संतमार्गाचें लक्षण । चालत मागून आले सर्व ॥ २ ॥ नोहे गुंतागुंती चुकीचा बोभाट । मार्ग आहे नीट संतसंग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांपडलें सहज । तेणें जाहलें काज सरतें माझें ॥ ४ ॥

१७४६ बहुतांच्या मता । आम्हीं न लागूं सर्वथा ॥१॥ धरूं संतांचा सांगात । तेणें होय आमुचें हित ॥ २॥ जाऊं पंढरीसी । नाम गाऊं अहर्निशीं ॥ ३ ॥ करूं हाचि नित्य नेम । आणिक नको निजधाम ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम । गाऊं आवडीनें राम ॥ ५ ॥

१७४७ ज्यासी नाहीं संतसंग । ते अभंग दुःख भोगिती ॥ १ ॥ तैसा नको विचार देवा । देई सेवा संतसंग ॥ २ ॥ अखंड नाम वाचे कीर्ती । संतसंग विश्रांती मज देई ॥ ३ ॥ मागणें तें द्यावें । आणिक मागणें जीवीं नाहीं ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । सुलभ सोपा उपाय ॥ ५ ॥

१७४८ अर्धक्षण घडता संतांची संगती । तेणें होय शांती महत्पापा ॥ १ ॥ संतसंग देई संतसंग देई । आणिक प्रवाहीं घालूं नको ॥२॥ संसार मज न करणें सर्वथा । परमार्थ पुरता हातीं देई ॥३॥ जनार्दनाचा एका करुणावचनीं । करी विनवणी पायांपाशीं ॥ ४॥

१७४९ सोहरे धाइरे आम्हां संतजन । तयाविण चिंतन आन नाहीं ॥ १ ॥ हाचि माझा भाव हीच माझी भक्ती । आणिक विश्रांती दुजी नाहीं ॥ २ ॥ हेंचि माझें कर्म हाचि माझा धर्म । वाउगाचि श्रम न करी दुजा ॥ ३ ॥ हेंचि माझें ज्ञान हेंचि माझें विज्ञान । संताविण शरण न जाय कोणा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हा माझा निश्चय । वंदीन मी पाय सर्वभावें ॥ ५ ॥

१७५० संतजनाचा मिळाली मिळणी । रामनामाची भरली भरणी ॥१॥ रामनाम सेवा हा राम सांठवा । परमानंदाचा लाभ जाला जीवा ॥ २ ॥ कीर्तनाचें दारें लाधलें । रामनाम कोणें सघंगले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रामनामसेवा । परमानंदाचा लाभ जाला जीवा ॥ ४ ॥

१७५१ अंगीं जया पूर्ण शांती । वाचा रामनाम वदती । अनुसरले चित्तवृत्तीं । संतचरणीं सर्वदा॥१॥ घडो तयांचा मज संग । जन्ममरणाचा फिटतसे पांग । आधिव्याधि निरसोनी सांग । घडतां संग वैष्णवांचा ॥ २ ॥ जे दुर्लभ तिहीं लोकां । आम्हां सांपडले फुका । एका जनार्दनीं धोका । नाम त्यांचें आवडी ॥ ३ ॥

१७५२ बाळकाची बोबडी वाणी । ऐकोनि जननी संतोषे ॥ १ ॥ तैसे तुम्हीं कृपाळें । पाळिलें लळे संतजनीं ॥ २ ॥ बाळाचे जे जे अपराध । माता न करी तयाचा क्रोध ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । मिळविलें गुणी आपुलिया ॥ ४ ॥

१७५३ देऊनियां अभयदान । संतीं केलें मज पावन । निरसोनी पापबंधन । नारिलें मज ॥ १ ॥ ऐसा संतसमागम । नाहीं आणीक विश्राम । योगियांचें धाम । कुंठीत पै झालें ॥२॥ आणीक एक वर्म । मुख्य इंद्रियांचा धर्म । मन ठेवुनी विश्राम । नामचिंतन करावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जाण । संत आमुचें निजध्यान । काया वाचा मन । दृढ पायीं॥४॥

१७५४ माझ्या मनाचा संदेह । फिटला देखतांचि पाय ॥ १ ॥ तुम्हीं कृपा केली संतीं । निरसली भय खंती ॥ २ ॥ माथां मज दिले हातीं । आहली समाधान वृत्ती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । निरसला भवशीण ॥ ४ ॥

१७५५ आलिंगन संतपायीं । पावली काया विश्रांती ॥ १ ॥ सुख अपार झालें । संत पाउलें देखतां ॥ २ ॥ पावन धर्म फळा आला । काळ गेला देशधडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । मज भेटोत अखंडित ॥ ४ ॥

१७५६ संतीं केला उपकार । मज निर्धार वाणला ॥ १ ॥ चुकविलें जन्म तें सांकडें । उगविलें कोडें बहुतांचें ॥ २ ॥ गुण अवगुण नाणितां मनीं । देती दरुशनीं मुक्ति त्या ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । करूं वोवाळणी देहाची ॥ ४ ॥

१७५७ संतसंगतीनें झालें माझें काज । अंतरीं तें निज प्रगटलें ॥ १ ॥ बरवा झाला समागम । अवघा निवारला श्रम ॥ २ ॥ दैन्य दारिद्र दूर गेलें । संत-

पाउलें देखतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सेवा । करीन मी आपुल्या भावा ॥ ४ ॥

१७५८ भाग्याचा उदय झाला । संतसंग मज घडला ॥ १ ॥ तेणें आनंदाचे पूर । लोटताती निरंतर ॥ २ ॥ प्रेम सप्रेम भरतें । अंगीं उतार चढतें ॥३॥ आली आनंदलहरी । एका जनार्दनीं निर्धारीं ॥ ४ ॥

१७५९ आजी उत्तम सुदीन । झालें दरुशन संतांचें ॥ १ ॥ पापताप दैन्य गेलें । संत पाउलें पहातां ॥२॥ अवघा यत्न फळा आला । अवघा झाला आनंद ॥३॥ अवघें कर्म सुकर्म झालें । अवघे भेटले संतजन ॥४॥ एका जनार्दनीं वरा । संतसमागम खरा ॥ ५ ॥

१७६० आजी दिवस धन्य झाला । संतसमागम पावला ॥ १ ॥ बरवा फळला शकुन । अवघा निवारला शीण ॥ २ ॥ सुस्नात झालों । संतसागरीं नाहलों ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावें । संतचरणीं लीन व्हावें ॥ ४ ॥

१७६१ घटिका पळ न वजे वायां । संतपायां सांडोनी ॥ १ ॥ मनोरथ पुरले मनींचे । झालें देहाचें सार्थक ॥ २ ॥ जन्मा आलियाचें काज । संतसंग घडला निज ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मिठी । संतसंग जडला पोटीं ॥ ४ ॥

१७६२ जाणते संत जाणते संत । जाणते संत अंतरींचे ॥ १ ॥ जे जे इच्छा देती फळ । काळ वेळ चुकवोनी ॥ २ ॥ मनोरथ पुरले वो माझे । एका जनार्दनीं वोझें ॥ ३ ॥

१७६३ जयाच्या चरणां मिठी घाली भावें । धन्य ते जाणावे सदैव संत ॥ १ ॥ प्रेमाचे सागर भक्तीचे उदधी । तोडिती उपाधी नाममात्रें ॥ २ ॥ जडजीवां तारक सत्य सत्य वाचे । आणीक तें न वचे उपमे त्याच्या ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कृपाळु संतजन । तेणें मज पावन केलें जगीं ॥ ४ ॥

१७६४ जाणती हे हातवटी । संत पोटीं दयाळु ॥१॥ न म्हणती अधम जन । करिती कृपेचें पोषण ॥ २ ॥ शुचि अशुचि न म्हणे कांहीं । एकरूप वर्ते देहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मज । तारियेलें तेणें सहज ॥ ४ ॥

१७६५ कैवल्य निधान तुम्ही संतजन । काया वाचा मन जडलें पायीं ॥ १ ॥ सर्वभावें दास अंकित अंकीला । पूर्णपणें जाहला बोध देहीं ॥ २ ॥ जें जें दृष्टी दिसे तें तें ब्रह्मरूप । एका जनार्दनीं दीप प्रज्वळिला ॥ ३ ॥

१७६६ धन्य दिवस जाहला । संतसमुदाय भेटला ॥ १ ॥ कोडें फिटलें जन्माचें । सार्थक जाहलें पैं साचें ॥ २ ॥ आज दिवाळी दसरा । संतपाय आले घरा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जाहला । धन्य तो दिवस भला ॥ ४ ॥

१७६७ केला संतीं उपकार । दिधलें घर दावुनी ॥१॥ नये ध्यानीं मनीं लक्षी । तो प्रत्यक्षीं दाविला ॥ २ ॥ संकल्पाचें तोडिलें मूळ । आलें समूळ प्रत्यया ॥३॥ एका जनार्दनीं कृपावंत । होती संत सारखे ॥ ४ ॥

१७६८ मती लागो संतचरणीं । तेणें उन्मनी साधती ॥ १ ॥ तुच्छ वाटे स्वर्ग लोक । जैसा रंक इंद्रासी ॥ २ ॥ आधार तो जेसा फळे । किरण उजाळे देखतां ॥ ३ ॥ एका जनार्दना शरण । मनचि जालें कृष्णार्पण ॥ ४ ॥

१७६९ मोकळें तें मन ठेविलें बांधोनी । जनार्दनचरणीं सर्वभावें ॥ १ ॥ स्थिर मति जाली वार्ता तीहि गेली । द्वैताची फिटली सर्वसत्ता ॥ २ ॥ मोह आशाबद्ध कर्मा निवारलों । पावन तो जालों संतचरणीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धन्य संतसेवा । उगविला गोवा गुंती सर्व ॥ ४ ॥

१७७० पाजी प्रेमपान्हा लाऊनियां सोई । पुन्हां तो न गोंवी येरझारीं ॥ १ ॥ येरझार दारीं घातलासे चिरा । ठेविलेंसे स्थिरा चरणाजवळीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं केलोंसे मोकळा । संतांपायीं लळा लाऊनियां ॥ ३ ॥

१७७१ संतद्वारीं कुतरा जालों । प्रेमरसासी सोकलों ॥ १ ॥ भुंकत भुंकत द्वारां आलों । ज्ञान थारोळ्या बैसलों ॥ २ ॥ कुतरा भुंकत आला हिता । संतीं हात ठेविला माथां ॥ ३ ॥ कुतऱ्या गळ्याची सांखळी । केली संतांनीं मोकळी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कुतरा । दांत पाडुनी केला बोथरा ॥ ५ ॥

१७७२ मनाची तों खुंटली गती । संत संगती घडतांचि ॥ १ ॥ बहु जन्मांचा तो लाग । फिटला पांग जन्मोजन्मीं ॥ २ ॥ कृतकृत्य थोर जाहलों । सुखें पावलों इच्छित ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चित्त । जाहलें निवांत ते ठायीं ॥ ४ ॥

१७७३ जीवेंभावें जाहलों दास। नाहीं आस संसारा ॥ १ ॥ नाशिवंता पाठीं धांवे। कोण हावे भोगील ॥ २ ॥ जन्मजरामरण फेरा। या संसारा आंचवलों ॥ ३ ॥ जाहला संतसमागम। भवभ्रम फिटला ॥ ४ ॥ एका जनार्दनीं काम। मन जाहलें तें निष्काम ॥ ५ ॥

१७७४ माझे मनीं आनंद जाहला। बोलतां बोला नवजाय ॥ १ ॥ एक संत जाणती खूण। येरा महिमान न कळे ॥ २ ॥ हृदयींच उदय दिसे। लाविलें पिसें देवानें ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। करी विनवणी सलगीनें ॥ ४ ॥

१७७५ आजी नवल झालें वो माय। पाहण्या पाहण्या पाहणें दृष्टी धाये ॥ १ ॥ ऐसा लाघवी सुखकर मूर्ती। संतसंगें जाली मज विश्रांती ॥ २ ॥ योगीश्वर जया चिंतिती। सनकादिक जया ध्याती ॥ ३ ॥ योग साधनें नातुडे जो माये। एका जनार्दनीं कीर्तनीं नाचतु आहे ॥ ४ ॥

१७७६ संगती बावनाचें रातलों सर्व भावें। चंदन होऊनी सर्वें ठेलों मी वो ॥ १ ॥ वेधिला जीव माझा संतचरणीं। आन दुजें मना नाठवेचि स्वप्नीं ॥ २ ॥ जागृती स्वप्न सुषुप्तीचा ठाव। अवघा देखे देवाधिदेव ॥ ३ ॥ पहातां पहातां मन नाहींसें जालें। एका जनार्दनीं केलें मज ऐसें ॥ ४ ॥

१७७७ आम्हासी ती मुख्य संतसेवा प्रमाण। विठ्ठलकीर्तन वाचे गाऊं ॥ १ ॥ दुजें नेणों स्वप्नीं विठ्ठलावांचूनी। जनीं मनीं निरंजनीं देखा हेंचि ॥ २ ॥ संताचिया पायीं मस्तक ठेवून। आवडी चरणा विठ्ठलाच्या ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जनार्दन एकपणीं। विठ्ठलावांचूनी दुजें नेणों ॥ ४ ॥

१७७८ माझी मुख्य उपासना। लागेन चरणां संतांच्या ॥ १ ॥ भांडवल तें हेंचि देख। भक्तियुक्त उपासना ॥ २ ॥ मन वसो संतापायीं। आन ठायीं कीर्तनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं। विनवणी करीतसे ॥ ४ ॥

१७७९ दुजेपणी दृष्टि न घालूं। सर्वां चालू एक सत्ता ॥ १ ॥ हाचि पूर्वीचा संकल्प। निर्विकल्प नाम जपूं ॥ २ ॥ नाहीं कांहीं वाटावाटी। करूं एक वटी मनाची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उदास। जाहलो दास संतचरणीं ॥ ४ ॥

१७८० भुक्ति मुक्ति कारणें तुज न घाली सांकडें। संतासी रोकडे शरण जाऊं ॥ १ ॥ हाचि माझा नेम उपासना भक्ति। आणिक विश्रांती मज नाहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं सेवेवांचून। आन नेणें जाण दुजें कांहीं ॥ ३ ॥

१७८१ काया वाचा आणि मन। संतचरण प्रमाण ॥ १ ॥ ऐसें चालत आलें मागें। तया वाउगें कोण करी ॥ २ ॥ उपासना मार्ग आधीं। भाविकांसी ती समाधी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आस। आहे पायांस दास्यत्वें ॥ ४ ॥

१७८२ वैष्णवा भूषण मुद्रांचे शृंगार। तुळशी परिकर वाहती कंठीं ॥ १ ॥ तयांचिया पायीं माझा दंडवत। सदा जे जपत नाम मुखीं ॥ २ ॥ आसनीं शयनीं भोजनीं नित्यता। स्मरती जे तत्वतां रामनाम ॥ ३ ॥ पुण्यपावन देह जन्माचि सार्थक। एका जनार्दनीं कौतुक त्याचें मज ॥ ४ ॥

१७८३ धन्य धन्य भूमंडळी। वैष्णव वळीं वीर गाढे ॥ १ ॥ कळिकाळाचें न चले बळ। नामें सबळ वज्रकवची ॥ २ ॥ विठ्ठल देव पाठीं उभा। तेथें लाभा काय उणें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मुक्ती। तेथें दास्यत्व करिती ॥ ४ ॥

१७८४ पैलनामें गर्जती वीर। हरीचे डिंगर लाडके ॥ १ ॥ धन्य धन्य ते वैष्णव। सदा नामस्मरणीं जीव ॥ २ ॥ महा वैष्णव निवृत्ती। नाम जपतां होय शांती ॥ ३ ॥ धन्य धन्य ज्ञानदेव। पातकी तारियेले जीव ॥ ४ ॥ धन्य सोपानदेव। म्हणतां कळिकाळाचें नाहीं भेव ॥ ५ ॥ धन्य धन्य मुक्ताबाई। एका जनार्दनीं वंदी पायीं ॥ ६ ॥

१७८५ जयाचिये द्वारीं तुळशीवृंदावन। धन्य तें सदन वैष्णवांचें ॥१॥ उत्तम चांडाळ अथवा सुशीळ। पावन सकळ वैकुंठी होती ॥ २ ॥ जयांचिया गळां तुळशीमाळा। यम पदकमळा वंदी त्याच्या ॥ ३ ॥ गोपीचंदन उटी जयाचिया अंगीं। प्रत्यक्ष देव जगीं तोचि धन्य ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तयाचा सांगात। जन्मोजन्मीं प्राप्त हो कां मज ॥ ५ ॥

१७८६ जीवा शिवा एकपण। तुमच्या चरणांचें महिमान ॥ १ ॥ गेले अज्ञान हारपोनी। लाविलें तें आपुलें ध्यानीं ॥ २ ॥ कर्म धर्म पारुषले। अवघे जाहले परब्रह्म ॥ ३ ॥ उगविली गोवागुंती। एका जनार्दनीं प्रचीती ॥ ४ ॥

१७८७ ऐकोनी संतकीर्ति। मना जालीसे विश्रांती। नाहीं पुनरावृत्ती। जन्माची तया ॥ १ ॥ धन्य धन्य

संतजन । मज केलें वो पावन । विश्रांतीचें स्थान । हृदयीं माझ्या ठसविलें ॥ २ ॥ बहु जाचलों संसारें । बहु जन्म केले फेरे । ते चुकविले सारे । आर्जा कृपा करुनी ॥ ३ ॥ शरण एका जनार्दन । माझें हरिलें मीपण । तुम्हीं कृपा करून । अभय वर दिधला ॥४॥

१७८८ जडजीवासी उद्धार । करावयासी निर्धार ॥ १ ॥ पापी दोषी जैसे तैसे । लाविलें कांसे आपुलिया ॥ २ ॥ जया जें जें गोड लागे । तें तें अंगें देताती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । शरणागता नाहीं न्यून ॥ ४ ॥

१७८९ संताचिया माथां चरणांवरी माझा । देहीं भाव दुजा नाहीं नाहीं ॥१॥ नामाचें चिंतन करिती सर्व काळ । ते माझे केवळ मायबाप ॥ २ ॥ मायबाप म्हणो तरी लाजिरवाणें । चुकविलें पेणें संतजनीं ॥३॥ ज्या ज्या जन्मा जावें मायबाप दोन्ही । परी संतजन निर्वाणी मिळतीना ॥ ४ ॥ येचि देहीं डोळा संतांसी देखिलें । एका जनार्दनीं वंदिले चरण त्यांचे ॥ ५ ॥

१७९० धर्माची वाट मोडे । अधर्माची शीग चढे । तैं आम्हां येणें घडे । संसारस्थिती ॥ १ ॥ आम्हां कां संसारा येणें । हरिभक्ति नामस्मरणें । जडजीव उद्धरणें । नामस्मरणें करुनी ॥२॥ सर्व कर्म ब्रह्मस्थिती । प्रतिपादाव्या वेदोक्ती । हेंचि एक निश्चिती । करणें आम्हां ॥ ३ ॥ नाना मतें पाषांड । कर्मठता अति बंड । तयाचें ठेंगणें तोंड । हरिभजनें ॥४॥ विश्वरूप सृष्टी । अर्जुना दाविली दृष्टी । भिन्न भेदाची गोष्टी । बोलूं नये ॥ ५ ॥ एका जनार्दनीं । धरिती भेद मनीं । दुन्हावले येथुनी । निंदक जाण ॥ ६॥

१७९१ संतांच्या विभूती । धर्मालागीं अवतरती ॥१॥ धर्मरक्षणाकारणें । साधु होताती अवतीर्ण ॥२॥ जगा लावावें सत्पंथीं । हेचि साधूची पैं कृती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साधु । हृदयीं वसे ब्रह्मानंदु ॥ ४ ॥

## श्रीसद्गुरुमहिमा

१७९२ ॐकारस्वरूपा सद्गुरु समर्था । अनाथाच्या नाथा तुज नमो ॥१॥ नमो मायबापा गुरु कृपाघना । तोडी या बंधना माया मोहा ॥ २ ॥ मोहोजाळ माझें कोण निरशील । तुजवीण दयाळा सद्गुरुराया ॥३॥ सद्गुरुराया माझा आनंदसागर । त्रैलोक्या आधार गुरुराव ॥ ४ ॥ गुरुराव स्वामी असे स्वयंप्रकाश । ज्यापुढें उदास चंद्र रवी ॥ ५ ॥ रवि शशि अग्नि नेणती ज्या रूपा । स्वप्रकाशरूपा नेणे वेद ॥ ६ ॥ वेदां पडलें मौन शास्त्रें वेडावलीं । वाचा हे निमाली ते श्रीगुरु ॥ ७ ॥ श्रीगुरु जयासी पाहे कृपादृष्टीं । तयासी हे सृष्टी पांडुरंग ॥ ८ ॥ पांडुरंग माझा दीनां मायबाप । नासी सर्व पाप भाव दुजा ॥ ९ ॥ दुजेपणा ठाव नाहीं जया रूपीं । तेथें आपेआपीं मन रंगे ॥ १० ॥ रंगें चित्त माझें सद्गुरुचरणीं । स्वरूप निर्वाणी होय गती ॥ ११ ॥ गति अधोगति दोनी या नासती । सद्गुरुची मूर्ति ध्यातां मनीं ॥ १२ ॥ मनीं वसे ज्याच्या सद्गुरुदयाळ । तयासी सकळ सिध्दी हातीं ॥ १३ ॥ हातीं मोक्ष परी नावडत्या ठायीं । सद्गुरुच्या पायीं बुध्दी राहे ॥ १४ ॥ राहे गुरुगृहीं सदा सर्वकाळ । परब्रह्मी केवळ होय जागा ॥१५॥ जागा शिष्य चित्त सद्गुरु वसती । कैसी असे स्थिति शमदमीं ॥ १६ ॥ शमादिकीं चित्त जयाचें निर्मळ । तेथें तो गोपाळ वसे प्रभु ॥ १७ ॥ प्रभुराज माझा स्वामी गुरुराव । देतो मज भाव शुद्ध भूमि ॥ १८ ॥ भूमि शुध्द करी ज्ञानबीज पेरी । अद्वैत हें धरी मी तूं नेणें ॥ १९ ॥ नेणें मी तूं कांहीं द्वैताद्वैत भाव । एक स्वयमेव आत्मा इति ॥ २० ॥ इतिकर्तव्यता हीच दासालागीं । माया गुणासंगी नाश तिचा ॥२१॥ तिचा नाश करणें हाचि येक थोरु । करितां सद्गुरु उपकार ॥ २२ ॥ उपकार त्यांच्या नोहे उतराई । ठेवीं जीव पायीं थोडा पाहा ॥ २३ ॥ पाहा गुरुरायें ब्रह्म दाखविलें । अखंड स्मरविलें मज नाम ॥ २४ ॥ नाम निरामय अज अविनाशी । प्रिय तें मानसीं सदा मज ॥ २५ ॥ मजलागीं माझी सद्गुरु माउली । करा कृपा साउली वर्णू काय ॥ २६ ॥ काय वर्णू माझ्या सद्गुरु दयाळा । बहुत कळवळा दासा यया ॥ २७ ॥ यया दासा मनीं सद्गुरुचें ध्यान । झालासे तल्लीन गुरुपायीं ॥२८॥ एका जनार्दनीं गुरु परब्रह्म । तयाचें पैं नाम सदा मुखीं ॥ २९ ॥

१७९३ नमो सद्गुरुराया दीनाच्या वत्सला । पाळावे दासाला ब्रीद तुझें ॥१॥ ब्रीद तुझें जगीं पतीतपावन । भक्तांची रक्षण सर्व काळीं ॥ २॥ सर्व काळीं भक्त आठविती तुज । ब्रीदाची ते लाज धरणें लागे ॥३॥ धरणें लागे तुज भक्तांचा अभिमान । आश्रय त्या कोण तुम्हाविणें ॥४॥ तुम्हाविणें त्यासी नाहीं कोणी सखा । संसार पारिखा वाट त्यांसी ॥ ५ ॥ वाट त्यांसी माझा

आधार सद्गुरु । इच्छा मी कां करूं आणिकांची ॥ ६ ॥ आणिकांची इच्छा कासया करावी । प्रपंचाची ते गोंवो जेणें होय ॥ ७ ॥ जेणें होय प्राण्या जन्ममरण दुःख । तया आत्मसुख भेट नाहीं ॥ ८ ॥ भेट नाहीं जया आत्मा परमात्म्याची । हानी नरदेहाची केली तेणें ॥ ९ ॥ केलीं तेणें जरी जप तपें फार । नाहीं त्या आधार गुरुविना ॥ १० ॥ गुरुविना प्राण्या नव्हेची सद्गती । ऐसें वेदश्रुती बोलतातो ॥ ११ ॥ बोलताती सिद्ध साधु महानुभाव । गुरुविण वाव सत्कर्में तीं ॥ १२ ॥ सत्कर्में तीं वारा चित्त शुद्ध करा । तेणें पाय धरा सद्गुरूचे ॥१३॥ सद्गुरूचे पाय जयासी लाधले । तेणें निरासिलें प्रपंचासी ॥१४॥ प्रपंचासी बाधा केली गुरुदासें । चरणीं विश्वास ठेवोनियां ॥१५॥ ठेवोनियां जीव सद्गुरूचे पायीं । प्रपंचव्यवसायीं वागतसे ॥ १६ ॥ वागतसे जनीं परी तो विजनीं । भेदभाव मनीं नाहीं जया ॥ १७ ॥ नाहीं जया चित्तीं आणिक वासना । सद्गुरुवचना विश्वासला ॥ १८ ॥ विश्वासला मनें सद्गुरुचरणीं । प्रेम अन्य स्थानीं नाहीं ज्यांचें ॥१९॥ नाहीं ज्यांचें तन मन आणि धन । गुरूसी अर्पण केलें असे ॥२०॥ केलें असे जेणें निष्काम तें कर्म । चित्त शुद्धी वर्म हातां आलें ॥२१॥ हातां आलें जया चित्तानें तें स्थैर्य । सद्गुरु आचार्य भेटले त्या ॥२२॥ भेटले त्या मायबाप गुरुराव । दयासिंधु नांव असे ज्यांसी ॥ २३ ॥ असे ज्यांसी सर्व श्रुती अध्ययन । ब्रह्मपरायण अहर्निशीं ॥ २४ ॥ अहर्निशीं चित्त ब्रह्मींचि रंगलें । विषय उरले नाहीं जया ॥ २५ ॥ नाहीं जया कामक्रोधाची भावना । आणिक वासना नानापरी ॥२६॥ नानापरी जग जरी देखियेलें । ब्रह्म हें भरलें ओतप्रोत ॥ २७ ॥ ओतप्रोत आत्मा स्वरूप जयासी । तयासी द्वंद्वासी भेटी कैसी ॥ २८ ॥ भेटी कैसी तया सुखदुःख द्वंद्वा । लोभ मोह आपदा नाहीं त्यासी ॥२९॥ नाहीं त्यासी मनीं द्वैताद्वैत नांव । आत्मस्थिति भाव सर्व जगीं ॥३०॥ सर्व जगीं दिसे ब्रह्मरूप ज्यासी । उपमा तयासी काय देऊं ॥ ३१ ॥ काय देऊं जगीं नव्हे त्या समान । स्वयंप्रकाशमान सद्गुरुराजा ॥ ३२ ॥ सद्गुरुराजानें केली मज कृपा । ब्रह्मानंद सोपा केला मज ॥ ३३ ॥ केला मजवर उपकार गुरूनें । तयासी उत्तीर्ण काय होऊं ॥ ३४ ॥ काय उतराई होऊं गुरुराया । मस्तक हा पायां सदा असो ॥ ३५ ॥ सदा असो माझे अंतरी वसती । अखंड प्रेम प्रीति गुरुरूपीं ॥ ३६ ॥ गुरुरूपीं मज आत्यंतिक सुख । अवलोकीं मुख सर्वकाळ ॥ ३७ ॥ सर्वकाळ मुखीं सद्गुरूचें नाम । आणिक तें काम नाहीं मज ॥ ३८ ॥ नाहीं मज प्रिय सद्गुरुवांचुनी । दृढनिश्चय मनीं केला असे ॥ ३९ ॥ केला असे प्राण सखा सद्गुरुराजा । मन त्यासी पूजा सदा करी ॥ ४० ॥ सदा करी मन सद्गुरुअर्चन । तेणें समाधान होय त्यासी ॥४१॥ होय त्यासी सुख मुखें वर्णवेना । षड्विध प्रमाणा लाग नाहीं ॥ ४२ ॥ लाग नाहीं जेथें अग्नि चंद्र सूर्या । कारण त्या कार्या नाश जेथें ॥ ४३ ॥ नाश जेथें असे सकळ ब्रह्मांडा । त्या सुखा अखंडा काय वानूं ॥ ४४ ॥ काय वानूं जेथें श्रुती मौनावल्या । प्रमात्या पावल्या लयो जेथें ॥ ४५ ॥ लय जेथें असे सकळ कल्पनांचा । तेथें इंद्रियांचा काय पाड ॥ ४६ ॥ काय पाड असे अंतर इंद्रियां । चारी देह वांया झाले जेथें ॥ ४७ ॥ झाले जेथें लीन मन इंद्रिय प्रमाण । त्या सुखा वर्णन कैसें होय ॥ ४८ ॥ कैसें होय वक्ता वाच्य आणि वचन । त्रिपुटी हे क्षीण जया ठायीं ॥ ४९ ॥ जया ठायीं वसती तेहतीस कोटी देव । तें सुखवैभव काय सांगूं ॥ ५० ॥ काय सांगूं मज मुखें वर्णवेना । तेणें मीतूंपणा मावळला ॥ ५१ ॥ मावळला आतां जगदांधकार । समूळ संसार पारुषला ॥५२॥ पारुषला मज सकळ द्वैतभाव । दिसे भावाभाव ब्रह्मरूप ॥५३॥ ब्रह्मरूप जग व्यष्टि हे समष्टी । भासे कृपादृष्टी सद्गुरुच्या ॥ ५४ ॥ सद्गुरुच्या कृपें हरलें जीव शिव । ब्रह्म एकमेव अद्वितीय ॥ ५५ ॥ अद्वितीय ब्रह्म प्रत्यक्ष हें दिसे । दृष्टि समरसें तदाकार ॥ ५६ ॥ तदाकार झाला सकळ हा देह । राहे तो संदेह कैशापरी ॥ ५७ ॥ कैशापरी राहे द्वैताची भावना । विपरित असंभावना निवर्तल्या ॥ ५८ ॥ निवर्तल्या जेथें शास्त्रांचीया मती । मनादिक पंक्ति मावळली ॥ ५९ ॥ मावळली मज द्वैताद्वैत स्फूर्ती । सुखें सहज स्थिति भोगितसों ॥ ६० ॥ भोगितसों आम्हीं सुखें परमानंद । कोटी हे आनंद वसती जेथें ॥६१॥ वसती जेथें सिद्ध महानुभाव संत । असे तें अनंत ब्रह्मसुख ॥६२॥ ब्रह्मसुख झालें सहज जयासी । तयाच्या भाग्यासी पार नाहीं ॥६३॥ पार नाहीं तया सुखा प्राप्त झाला । संदेह तो झाला चिदानंद ॥६४॥ चिदानंद नित्य मज निरामय । निर्विकार सबाह्य

एकरूप ॥ ६५ ॥ एकरूप ब्रह्म उपाधिरहित । तेथें तो वसत भाग्यवंत ॥ ६६ ॥ भाग्यवंत ऐसा असे गुरुदास । देहासी उदास सर्वकाळ ॥ ६७ ॥ सर्वकाळीं करी सत्क्रिया भजन । आणिक उपासन सद्‌गुरूचें ॥ ६८ ॥ सद्‌गुरूचें पादतीर्थ सदा सेवी । प्रपंचीं त्या गोंवी कैशी होय ॥ ६९ ॥ कैशी होय गुरुभक्तां अधोगती । लागला सत्पथीं गुरुकृपें ॥ ७० ॥ गुरुकृपें ज्यासी सत्पथ पावला । जीव सुखावला ब्रह्मसुखें ॥ ७१ ॥ ब्रह्मसुखें झालों मी सदा संपन्न । ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ ७२ ॥ अनुभविलें ब्रह्म अंतर सबाह्य । जग ब्रह्ममय झालें दिसे ॥ ७३ ॥ झालें दिसे ब्रह्म चतुर्दश लोक । शुद्धाशुद्ध विवेक नाहीं जेथें ॥ ७४ ॥ नाहीं जेथें द्वैताद्वैत ते उपाधी । ते सुखी समाधी दासां झाली ॥ ७५ ॥ दासां झाली निद्रा शून्य सारूनियां । वृत्ती पावलीया ब्रह्मसुखा ॥ ७६ ॥ ब्रह्मसुखा पावे ज्याचें अंतःकरण । सर्वकाळीं जाण ब्रह्मरूप ॥ ७७ ॥ ब्रह्मरूप झालें जयाचें तें अंग । तया नित्यसंग सज्जनाचा ॥ ७८ ॥ सज्जनाचा संग जयासी पैं होय । तया उणें काय निजसुखा ॥ ७९ ॥ निजसुखा प्राप्त झाला संतसंगें । तयाचीं सर्वांगें ब्रह्म झालीं ॥ ८० ॥ ब्रह्म झालें त्याचें काया वाचा मन । साध्य आणि साधन सर्व ब्रह्म ॥ ८१ ॥ सर्व ब्रह्मावीण नाहीं ज्यासी अनुभव । ऐसा त्याचा भाव एकविध ॥ ८२ ॥ एकविध भाव जयाचिया मनीं । त्यासी चक्रपाणी अंकिलासे ॥ ८३ ॥ अंकिलासे देव तया सद्‌गुरुकृपें । अहंकार पापें सोडियेलें ॥ ८४ ॥ सोडियेलें त्यासी कामादि षड्‌विकारीं । वसती त्या अंतरीं देवें केली ॥ ८५ ॥ देवें केली त्यांसी आपुली अंकीत । तोचि त्यांचें हित सत्य जाणें ॥ ८६ ॥ सत्य जाणें एक सद्‌गुरु दयाळ । चरण कमळ त्याचें ध्यावें ॥ ८७ ॥ त्याचें ध्यावें चरण सदा सर्वकाळ । प्रपंच सकळ सांडूनिया ॥ ८८ ॥ सांडूनिया म्हणजे मिथ्या हा पहावा । सद्‌गुरु करावा पाठीराखा ॥ ८९ ॥ पाठीराखा होय सद्‌गुरु जयासी । कळिकाळ त्यासी बाधतीना ॥ ९० ॥ बाधतीना त्यासी मुक्ती ऋद्धिसिद्धी । ज्याची सदा बुद्धि सद्‌गुरुपायीं ॥ ९१ ॥ सद्‌गुरुपायीं ज्याचें चित्त स्थिर झालें । तयासी जोडलें मोक्षपद ॥ ९२ ॥ मोक्षपद त्याची इच्छा ते करीत । भक्तांचे मनांत गुरुपद ॥ ९३ ॥ गुरुपद योगें मुक्ति तुच्छ त्यासी । त्याचिया मानसी गुरु वसे ॥ ९४ ॥ गुरु वसे मनीं सदा सर्वकाळ । तुटली हळहळ प्रपंचाची ॥ ९५ ॥ प्रपंचाची चिंता गुरुदासा नये । योगक्षेम असे गुरुहातीं ॥ ९६ ॥ गुरुहातीं असे सर्व त्याचें काम । दासा मुखीं नाम गुरुगुरु ॥ ९७ ॥ गुरुगुरु जप अज्ञाननाशक । भवसिंधु तारक गुरुनाम ॥ ९८ ॥ गुरुनामासम आणिक नाहीं मंत्र । सांगताती शास्त्रें महानुभव ॥ ९९ ॥ एका जनार्दनीं गुरुपदीं मस्तक । ठेवुनी सम्यक ब्रह्म झाला ॥ १०० ॥

१७९४ श्रीपांडुरंग सद्‌गुरु हे स्वामी । तया पादपद्मीं नमन माझें ॥ १ ॥ गजाननमूर्ति सद्‌गुरुसमर्थ । देई मज स्वार्थ निजपदीं ॥ २ ॥ नेत मजलागीं गुरु निजधामीं । वसे अंतर्यामीं सर्वकाळीं ॥ ३ ॥ शामसुंदरमूर्ति सद्‌गुरुदयाळ । भक्ता प्रतिपाळ गुरुराव ॥ ४ ॥ यम नियम मज करविती सद्‌गुरु । सर्वस्वें आधारु मज त्यांचा ॥ ५ ॥ नर नारायण रूप हा सद्‌गुरु । उतरी भवपारु क्षणमात्रें ॥ ६ ॥ मस्तक तयाच्या पायीं हा ठेवावा । नित्य तो पहावा हृदयामाजीं ॥ ७ ॥ ॐकार प्रणव सद्‌गुरुस्वरूप । मिळे आपेआप अंतर्यामीं ॥ ८ ॥ नका विसरूं त्या सद्‌गुरुदयाळा । दासाचा कळवळा तयालागीं ॥ ९ ॥ मस्त होऊं नका तारुण्याच्या भरें । करावी या करें सद्‌गुरुसेवा ॥ १० ॥ ऋद्धिसिद्धी तुम्ही मनीं त्या न आणा । भजावा तो राणा सद्‌गुरुराव ॥ ११ ॥ धंदा नका करूं आणिक तयाविण । तन्नाम श्रवण दृढ करा ॥ १२ ॥ अवन होतसे सद्‌गुरूच्या कृपें । निरसती पापें सकळही ॥ १३ ॥ आशा हे त्यागावी पासूनियां मना । सद्‌गुरुचरणा तेव्हां भेटी ॥ १४ ॥ इहलोकीं सुख सद्‌गुरु देणार । मना सर्व भार तेथें ठेवी ॥ १५ ॥ ईशान स्वरूपीं सद्‌गुरु प्रत्यक्ष । देत ज्ञान अक्ष दासालागीं ॥ १६ ॥ उपकार त्याचे अनंत अपार । भवसिंधु पार त्यांचियोगें ॥ १७ ॥ उदास जो झाला देहाचिये ठायीं । तया लागीं पायीं ठाव देई ॥ १८ ॥ ऋषिसिद्ध मुनी ज्या लागी भजती । वसे आत्मस्थिति सर्वकाळ ॥ १९ ॥ ऋण हें फेडावें जन्ममरणाचें । साधन हें साचें नाम धरा ॥ २० ॥ लुब्ध होऊं नका विषयाच्या स्वादा । पावाल आपदा नानापरी ॥ २१ ॥ लुसलुसित कोंवळी बिल्वतुळसीपत्रें । वहावीं पवित्र चरणावरीं ॥ २२ ॥ एक दोन तीन चार पांच सहा । सांडूनियां रहा गुरुपायीं ॥ २३ ॥ ऐहिक हें सुख तुच्छ नाशिवंत । सेवावा

अनंत सद्गुरुराव ॥ २४ ॥ ओवी नाममाळा वृत्ति तंतूमाजीं । इंद्रियसमाजी गुरु वसे ॥ २५ ॥ औदार्य गुरूचें अनिवार जगीं । मना पायलागीं दृढ धरी ॥ २६ ॥ अंगीं मजलागीं गुरु बैसविती । उपदेश देती ब्रह्मज्ञान ॥ २७ ॥ अहा काय सांगूं सद्गुरूची कीर्ति । परब्रह्म मूर्ति गुरुराव ॥ २८ ॥ कल्पना त्यागावी तेव्हां ब्रह्मप्राप्ती । चुके यातायाती आपेंआप ॥ २९ ॥ खटपट करिती प्रपंचाचेविशीं । भजे त्या गुरूशी तैशापरी ॥ ३० ॥ गर्व अभिमान मनीं नको धरूं । तुजसी आधारु सद्गुरुराज ॥ ३१ ॥ घटिका दीस मास अयन संवत्सर । गुरु विश्वंभर भजें बापा ॥ ३२ ॥ ॐकारस्वरूप गुरुमहाराज । मूर्ति हे सहज हृदयीं लक्षीं ॥३३॥ चमत्कार माझ्या सद्गुरुरायाचा । दाता स्वानंदाचा लाभ होय ॥ ३४॥ छत्तीस तत्त्वांचें शरीर हें सांचें । कांहीं अनुभवाचें पाव लक्ष ॥ ३५ ॥ जवनिका माया समूळ नुरवीं । प्रेम पुरवीं सद्गुरुपायीं ॥ ३६ ॥ झरा हा सुखाचा सद्गुरुच्या पायीं । मना तूं राहीं अक्षयीं तेथें ॥ ३७ ॥ ॐकार वर्णात्मक सद्गुरु पांडुरंग । अक्षय्य अभंग सर्वसाक्षी ॥ ३८ ॥ टणत्कार करा विरागाच्या योगें । सद्गुरूच्या संगें ब्रह्मप्राप्ती ॥ ३९ ॥ ठकूं नका तुम्हीं माया विद्या-योगें । चरणीं करा जागे वृत्तीसी त्या ॥ ४० ॥ डमरू त्रिशूळ सद्गुरूच्या हातीं । दासांसी रक्षिती सर्वकाळ ॥ ४१ ॥ ढवळूं तूं नको विषयाच्या ठायीं । वृत्ति स्थिर पायीं सदा करीं ॥ ४२ ॥ टणत्कार तिरेघाटी भेदावला नसे । सद्गुरु हा असे ऐक्यें तैसा ॥ ४३॥ तदाकार मन करा सद्गुरुरूपीं । सच्चित्स्वरूपीं तुम्ही व्हाल ॥ ४४ ॥ थरथर कांपा सद्गुरुसमीप । ब्रह्मीं आपेंआप प्राप्त व्हाल ॥ ४५ ॥ दया शांती क्षमा सद्गुरूसी मागा । सद्गुरूच्या वागा आज्ञे ऐसें ॥ ४६ ॥ धरा भाव तुम्ही सद्गुरूच्या पायीं । परब्रह्म ठायीं गति जेणें ॥ ४७ ॥ नमस्कार करा तुम्ही सद्-गुरूसी । तेणें निजपदासी प्राप्त व्हाल ॥ ४८ ॥ पहावें नयना सद्गुरुरायाला । तेणें आनंदाला अनुभवावें ॥ ४९ ॥ फजिती ही तुम्हीं नका करूं आतां । वेगीं सद्गुरुनाथा शरण जा ॥ ५० ॥ बरवें जनहो तुम्हांसी सांगतों । तुम्हीं चित्तीं ध्या तो सद्गुरुरावो ॥ ५१ ॥ भरावा मानसीं सद्गुरुदयाळ । पद हें पावाल परब्रह्म ॥ ५२ ॥ मरणें जन्मणें सत्वर निवारा । वृत्ति हे आवरा विषयांतुनी ॥ ५३ ॥ यमाच्या हातींचे सोड-वील तुम्हां । भजा आत्मारामा गुरुराया ॥५४॥ रमवा हें चित्त सद्गुरूच्या ध्यानीं । पहा जनीं वनीं सद्गु-रुराव ॥ ५५ ॥ लगाम हा देणें अश्वासी ज्या परी । वृत्ति स्थिर करी गुरुध्यान ॥ ५६ ॥ वमनवत हे विषय त्यागावे । ब्रह्म अनुभवावें गुरुकृपें ॥ ५७ ॥ शम दम श्रद्धा उपरम तितिक्षा । सातवी अपेक्षा सद्गुरुपायीं ॥५८॥ षकार स्वरूप सद्गुरु नारायण । गुण हे श्रवण त्याचे करा ॥ ५९ ॥ समाधी साधनीं वृत्ति स्थिर करा । दृढ चरण धरा सद्गुरूचे ॥ ६० ॥ हवाशिर स्थान एकांत पहावें । ध्यान तें धरावें सद्गुरूचें ॥ ६१ ॥ लववावी वृत्ति सद्गुरुचरणीं । तें पायांपासुनी सोडूं नये ॥ ६२ ॥ क्षमा शस्त्र हातीं गुरुकृपें धरा । कामक्रोध करा शांत जना ॥ ६३ ॥ इति हे आकळे सद्गुरुप्रसादें । वर्ताल स्वानंदें सर्वकाळ ॥ ६४ ॥ एका जनार्दनीं गुरुपदीं लीन । ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ ६५ ॥

१७९५ दत्तराया करूं प्रथम नमन । द्वितीय चरणां सद्गुरूच्या ॥१॥ सद्गुरूच्या चरणां करावा प्रणाम । मुखीं नित्य नाम सदा जप ॥ २ ॥ नित्य जपा वाचे गुरुराज स्वामी । तेणें सुखधामीं प्राप्त व्हाल ॥ ३ ॥ प्राप्त व्हाल तुम्हीं अत्यंतीक सुखा । जेथें जन्म दुःखा पार नाहीं ॥४॥ पार नाहीं वेदां शास्त्रें मौनावलीं । पुराणें तीं झालीं मौनरूप ॥ ५ ॥ मौजरूप शेष ब्रह्मा आणि इंद्र । सूर्य अग्नि चंद्रा अंत नाहीं ॥ ६ ॥ अंत नाहीं त्याचा अनंत स्वरूप । अनिर्वाच्य रूप सद्गुरूचें ॥७॥ सद्गुरूचें रूप तें स्वयं-प्रकाश । हृदयीं जो प्रकाश सद्गुरुचा ॥८॥ सद्गुरुचा प्रेमा माझिया अंतरीं । अनुभव साक्षात्कारीं झाला असे ॥ ९ ॥ झाला असे अनुभव अपरोक्ष । शास्त्रीं जे विवक्षा केली असे ॥ १० ॥ केली असे स्तुति संत महानुभावीं । सद्गुरु वदवीं मजलागीं ॥ ११ ॥ मज-लागीं त्यांनीं दिली असे वाचा । उपकार तयाचा काय वानूं ॥१२॥ काय वानूं माझ्या सद्गुरुदयाळा । बहुत कळवळा ज्यासी माझा ॥ १३ ॥ ज्यांसी माझा प्राण अर्पण मी केला । देह हा विकिला सर्वस्वें मी ॥ १४ ॥ सर्वस्वें मी वसें सद्गुरूचे पायीं । अन्य प्रिय नाहीं मजलागीं ॥ १५ ॥ मजलागीं दया केली गुरुरायें । हृदयीं तें पाय धरियले ॥१६॥ धरियेलीं जीवीं पाउलें कोंवळीं । कंठीं एकावळी नाममाळा ॥१७॥ नाममाळा कंठीं शोभे ही साजिरी । हृदयीं

गोजरी गुरुमूर्ति ॥ १८ ॥ गुरुमूर्ति वसे ज्याचे हृदयकमळीं । तया चंद्रमोळी मागें पुढें ॥ १९ ॥ मागें पुढें उभा राहे तो रक्षित । कांहींच आघात येवों नेदी ॥ २० ॥ येवों नेदी कदा कल्पनेची बाधा । आणिक आपदा शिष्यालागीं ॥ २१ ॥ शिष्यालागीं गुरु करिताती बोध । स्वरूप स्वानंद देती तया ॥ २२ ॥ देती तया गुरु अनुपम सुख । स्वानंद कौतुक त्यासी लाभे ॥ २३ ॥ त्यासी लाभे आत्मा सर्व अंतर्यामी । चिन्मयसुख धामीं पहुडे तो ॥ २४ ॥ पहुडे तो नये कदाकाळीं देहा । तोचि निःसंदेहा पावलासे ॥२५॥ पावलासे ब्रह्म अखंड परात्पर । सारासार विचार करोनियां ॥ २६ ॥ करोनियां जेणें नित्य स्नानसंध्या । दोषाची ते बाधा वारियेली ॥ २७ ॥ वारियेली जेणें चित्तविक्षेपता । करोनि उपास्यता सगुणमूर्ति ॥२८॥ सगुणमूर्तीसी न म्हणावें मायीक । शास्त्र आत्यंतिक सांगतसे ॥ २९ ॥ सांगतसे शास्त्र देवध्यान करा । विक्षेप तो वारा चित्ताचा पैं ॥ ३० ॥ चित्ताचा गेलिया विक्षेप सकळ । आवरण केवळ राहिलेसे ॥ ३१ ॥ राहिलेंसे जयां स्वरूपावरण । त्याचें निवारण ज्ञानें होय ॥ ३२ ॥ ज्ञानें होय परी ज्ञानप्राप्तिलागीं । साधनें तीं अंगीं विवेकादी ॥ ३३ ॥ विवेक वैराग्य शमादी ते षटक । चौथी ते देख मुमुक्षुता ॥ ३४ ॥ मुमुक्ष ते पुढें श्रवण मनन । निज तें ध्यासन पाहिजे कीं ॥३५॥ पाहिजे कीं तत्व पदार्थ-शोधन । साधनें हीं जाण अंतरंग ॥ ३६ ॥ अंतरंग साधनें करावी परमार्था । त्यागावी सर्वथा बहि-रंग ॥ ३७ ॥ बहिरंग साधनें होय स्वर्गप्राप्ती । निष्कामी होती चित्तशुद्धी ॥ ३८ ॥ चित्तशुध्दी झाल्या अंतरंगा अधिकार । विवेक निर्धार सांग-तसो ॥ ३९ ॥ सांगतसो आतां विवेकाचें तथ्य । ब्रह्म हेंचि सत्य जगन्मिथ्या ॥ ४० ॥ मिथ्या माया कार्य जगत प्रकार । ब्रह्म हेंचि सार विवेक हा ॥४१॥ विवेक हा स्मरा अनुभव करा । वैराग्य अवधारा एकचित्तें ॥ ४२ ॥ एकचित्तें करा वैराग्य श्रवण । तेणें समाधान स्वरूपी होय ॥ ४३ ॥ स्वरूपी होय स्थिती वैराग्याच्या योगे । अग्रा विषसंगे सेवूं नये ॥ ४४ ॥ सेवूं नये विषय वमनाचें परी । विट तो अंतरी सदा असो ॥ ४५ ॥ सदा असो प्रीति परमार्थालागीं । विषयीं विरागी याचें नांव ॥ ४६ ॥ याचें नांव शम मनाचा निग्रहो । विषयी आग्रहो चित्ता नाहीं ॥ ४७ ॥ चित्ता नाहीं कधीं विषयाची स्फूर्ति । अंतर हे वृत्ति झाली असे ॥ ४८ ॥ झाली असे सर्व इंद्रिया स्थिरता । दम हें तत्वतां म्हणती त्या ॥४९॥ म्हणती त्या उपरम स्वधर्मासी । त्यागावें विधिसी सर्वस्वेंची ॥५०॥ सर्वस्वेंचि शीत उष्णातें साहणें । तितिक्षा म्हणणें तयालागीं ॥ ५१ ॥ तयालागी श्रद्धा म्हणताती जनीं । सद्गुरुवचनीं विश्वास तो ॥ ५२ ॥ विश्वास असावा वेदांताचे ठायीं । सद्गुरुचे पायीं लीन व्हावें ॥ ५३ ॥ लीन व्हावें चित्त सद्गुरु-वचना । तोचि समाधाना प्राप्त झाला ॥ ५४ ॥ प्राप्त झाला प्राणी मुमुक्षतेलागी । प्रपंचसंसर्गी विटला तो ॥५५॥ विटला संसारा आणि घरदारा । पुत्र परिवारा मिथ्या मानी ॥ ५६ ॥ मिथ्या मानी सर्व प्रपंचवैभव । विषयाचें नांव नावडे ज्यासी ॥ ५७ ॥ नावडे ज्यासी इष्ट मित्र ते सोयरे । परमार्थी वेव्हारे चित्त ज्याचें ॥ ५८ ॥ चित्त ज्याचें झालें प्रपंचासी विरक्त । त्याचे मनीं आर्त सद्गुरुभेटी ॥ ५९ ॥ सद्गुरुभेटी व्हावी ऐसें ज्याचे मनीं । तो सर्वालागूनि विचारीत ॥ ६० ॥ विचारीत मला सद्गुरु कैं भेटती । रात्रंदिवस चित्तीं दुजें नाहीं ॥ ६१ ॥ दुजें नाहीं तया आणिक जगांत । सद्गुरु सर्वत्र दिसतसे ॥ ६२ ॥ दिसतसे गुरु आसनीं शयनीं । आणिक भोजनीं गुरु दिसे ॥ ६३ ॥ गुरु दिसे जागृती स्वप्न आणि सुषुप्तीं । आनंद नेणती गुरूवीण ॥ ६४ ॥ गुरूवीण जनीं न दिसे ज्या अन्य । चित्त होय धन्य गुरु भेटी ॥ ६५ ॥ गुरूभेटी होता चित्त स्थिर होय । तळमळ जाय मनाची ते ॥ ६६ ॥ मनाची ते शांती होता पाय धरी । दंडवत करी वेळोवेळां ॥ ६७ ॥ वेळोवेळां गुरुसी करी नमस्कार । जोडोनिया कर उभा राही ॥ ६८ ॥ जोडोनियां हात पुढें गुरुराया । बोलत सखया तारा स्वामी ॥ ६९ ॥ तारा स्वामी मज भवाचें सागरीं । व्हावें कर्णधारी मजलागी ॥ ७० ॥ मजलागीं गुरो तुमचा आधार । वोस चराचर तुम्हांवीण ॥७१॥ तुम्हांवीण सखा मज नाहीं कोणी । वाटतें चरणीं घालूं मिठी ॥ ७२ ॥ मिठी घालूं पायां सद्गुरुसमर्था तेणें निजस्वार्था पाववील ॥ ७३ ॥ पाववील सुखा सद्-गुरू माउली । ती मज गाउली शिष्यवत्सा ॥ ७४ ॥ शिष्यवत्सालागी पाजी ज्ञानदुग्ध । तेणें देह शुद्ध होय त्याचा ॥ ७५ ॥ देह त्याचा केला ब्रह्म हा गुरूनें । काया वाचा मनें चरण धरी ॥ ७६ ॥ चरण धरीतसे

शिष्य वेळोवेळां । माझा कळवळा असो तुम्हां ॥७७॥ तुम्हाविण मज कोण हो तारील । दीन उद्धरेल कैशापरीं ॥ ७८ ॥ कैशापरी मज होईल सुटका । प्रपंच लटिका वाटे केव्हां ॥ ७९ ॥ केव्हां वाटे मज जगत हें मिथ्या । ब्रह्माचें सत्यत्व केव्हां पावें ॥ ८० ॥ केव्हां पावे मज स्वरूपचि शांती । तें मज निश्चिती सांगा स्वामी ॥ ८१ ॥ सांगा स्वामी मज कृपा हो करुनी । शिष्य विनवणी करी ऐसी ॥ ८२ ॥ करी ऐसी दया मज गुरुराया । लागतसे पाया शिष्यराज ॥ ८३ ॥ शिष्यराजा झाली अष्टभाव प्राप्ती । सद्गुरूनीं हातीं धरियेला ॥ ८४ ॥ धरियेला करीं नेला एकांतांत । अंकीं बैसवीत सद्गुरुराव ॥ ८५ ॥ सद्गुरुराव बोलती त्या क्षणीं । लागली उन्मनी तया लागीं ॥८६॥ तयालागीं नाहीं देहींचा आठव । स्थूल सूक्ष्म भाव मावळले ॥८७॥ मावळले चारी देह चारी अवस्था । शिष्य तो तत्वता ब्रह्म झाला ॥८८॥ ब्रम्ह झाला त्याचा देह आत्मस्थिती । द्वैताद्वैतप्रतीति नाहीं जया ॥८९॥ नाहीं जया सुखदुःखाची भावना । समूळ वासना निरसली ॥ ९० ॥ निरसली त्याची अहंकार कल्पना । सुखदुःख यातना नाहीं तया ॥ ९१ ॥ नाहीं तया जीव शिव भेदाभेद । समूळ हे वाद मिथ्या झाले ॥९२॥ मिथ्या झालें ज्ञान ज्ञेय आणि ज्ञाता । भोज्य भोग भोक्ता मावळला ॥ ९३ ॥ मावळला तेव्हां सद्वैत प्रपंच । एक ब्रह्म साच अनुभविले ॥ ९४ ॥ अनुभविले तेणें अनुभव वेडावला । विचार निमाला जिये ठायीं ॥ ९५ ॥ जिये ठायीं गती नाहीं षट्प्रमाणा । साधन लक्षणा ठाव कैंचा ॥ ९६ ॥ ठाव कैंचा तेथें परादिका वाचा । जेथें त्या शब्दाचा लाग नाहीं ॥९७॥ लाग नाहीं तेथें उपपत्ति युक्ति । अपरोक्ष प्रतीति लया गेली ॥ ९८ ॥ लया गेली तया स्थानीं मज ठेविलें । सद्गुरुदयाळे दीनानाथें ॥ ९९ ॥दीनानाथें तया ठायीं निजविलें । नवजाती वर्णिले गुण तया ॥ १०० ॥ एका जनार्दन गुरुपायीं लीन । ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥ १०१ ॥

१७९६ श्रीगुरुराया स्वामी दीनानाथा । उद्धरी अनाथा पांडुरंगा ॥ १ ॥ गुण निर्गुणरूपा देवा यति वरा । त्रैलोक्य आधारा पांडुरंगा ॥२॥ रूप वर्णावया नाहीं मज मती । देई तूं बा शक्ति पांडुरंगा ॥३॥ देई मजलागीं प्रभो नित्य शांती । करितों विनंति पांडुरंगा ॥४॥ वदविसी मज तंव सत्ते देवा । देई मज भावा पांडुरंगा ॥ ५ ॥ दशा हे यौवन मज करी बाधा । सांगे स्वयंबोधा पांडुरंगा ॥ ६ ॥ तमगुणरजोगुणांतें निरसी । तारी या दासासी पांडुरंगा ॥७॥ असावें मी सदा विषयीं विरक्त । पुरवीं माझें आर्त पांडुरंगा ॥ ८ ॥ वससी अंतरीं दासाच्या तूं सदा । आनंदाच्या कंदा पांडुरंगा ॥ ९ ॥ धूत पाप व्हावें तुमच्या कृपादृष्टी । सुखाची तूं सृष्टी पांडुरंगा ॥ १०॥ तरती सज्जन तुमच्या दर्शनें । कृपेचें तूं ठाणें पांडुरंगा ॥ ११ ॥ श्रीयाळ चांगुणा भक्त तारियेले । सत्त्व रक्षियेलें पांडुरंगा ॥ १२ ॥ पाश हा भ्रांतीचा मजलागीं गोंवा । त्यांचि पैं तोडावा पांडुरंगा ॥ १३ ॥ दमावीं इंद्रियें तेव्हां गुरुभेटी । नको आटाआटी पांडुरंगा ॥१४॥ श्रीद श्रीश माझा समर्थ सद्गुरु । देवा तूं आधारू पांडुरंगा ॥ १५ ॥ वन जन सर्व त्वांचि व्यापियलें । स्वरूप शोभलें पांडुरंगा ॥ १६ ॥ लव निमिषभरी तुजविण रहावें । मरणें मज व्हावें पांडुरंगा ॥ १७ ॥ भवसागरांत बुडतों मी देवा । करी माझा काढावा पांडुरंगा ॥ १८ ॥ स्वानंद आरामी मी तो विश्रामावें । मजलागीं पावावें पांडुरंगा ॥ १९ ॥ मीपणें नासिलें मजलागीं देवा । देई स्वानुभवा पांडुरंगा ॥ २० ॥ नृप हा जगाचा परमानंद साचा । वदो माझी वाचा पांडुरंगा ॥ २१ ॥ सिंहासन हृदयीं करोनिया माझ्या । बैसे गुरुराजा पांडुरंगा ॥ २२ ॥ हस्तांत धरावें आपुलिया दासा । हे जगन्निवासा पांडुरंगा ॥ २३ ॥ सर्वकाळ चित्तीं माझिया वसावें । शुध्द प्रेम द्यावें पांडुरंगा ॥ २४ ॥ रण कामक्रोध लोभाचें माजलें । निवारी उगलें पांडुरंगा॥ २५ ॥ स्वभाव हा माझा रजो तमो युक्त । नाशी तूं क्षणांत पांडुरंगा ॥२६॥ तोकडी सांखळी त्रिगुणाची सारी । भव हा निवारी पांडुरंगा ॥ २७ ॥ मनन करावें रात्रंदिवस तुझें । ऐसी कृपा कीजे पांडुरंगा ॥ २८ ॥ हाव ही धरावी सद्गुरुपायांची । विनंति दीनाची पांडुरंगा ॥ २९ ॥ रहावें सर्वदा तुझ्या पायांपाशीं । देई तूं वरासी पांडुरंगा ॥ ३० ॥ जयजय सद्गुरो स्वामी तूं समर्थ । पुरवी मनोरथ पांडुरंगा ॥ ३१ ॥ एका जनार्दनीं सद्गुरो उदारा । दयेच्या सागरा पांडुरंगा ॥ ३२ ॥

१७९७ प्रकाश तरणी न बोले वेदवाणी । बोध विवेक दोन्ही तटस्थ झालीं ॥ १ ॥ वेदासी अगोदर ध्यानासी कानडे । तें ब्रह्म सांपडे सद्गुरुचरणीं ॥२॥ काळासी नाकळे कर्मी जें न मिळे । सर्वांसी न कळे

असूनियां ॥ ३ ॥ जीवीं जीवा न कळे शिवपण बोविलें । नाम या वेगळें सच्चिदानंद ॥ ४ ॥ सद्गुरु बोधें ब्रह्म ब्रह्मार्पण । जीवासी सोडवण सद्गुरुचरणीं ॥ ५ ॥ गुरुजप सदा नाम एक वस्ती । एका जनार्दनीं प्राप्त सहज नाम ॥ ६ ॥

१७९८ मनोभाव जाणोनी माझा । सगुणरूप धरिलें वोजा । पाहुणा सद्गुरुराजा । आला वो माय ॥१॥ प्रथम अंतःकरण जाण । चित्तशुद्ध आणि मन । चोखाळोनी मन आसन । स्वामासी केलें ॥ २ ॥ अनन्य आवडीचें जळ । प्रक्षाळिलें चरणकमळ । वासना समूळ । चंदन लावी ॥ ३ ॥ अहं जाळियला धूप । सद्भाव उजाळिला दीप । पंचप्राण हे अमूप । नैवेद्य केला ॥ ४ ॥ रजतम सांडोनी दोन्ही । विडा दिला सत्त्वगुणी । स्वानुभवें रंगानी । सुरंग दावी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं पूजा । देवभक्त नाहा दुजा । अवघाचि सद्गुरुराजा । होवोनी ठेला ॥ ६ ॥

१७९९ धन्य धन्य श्रीगुरुभक्त । गुरूचें जाणती मनोगत ॥ १ ॥ गुरुचरणीं श्रध्दा गाढी । गुरुभजनाची आवडी ॥२॥ गुरूचें नाम घेता वाचे । कैवल्य मुक्ति तेथें नाचे ॥ ३ ॥ गुरूचें घेतां चरणतीर्थ । भुक्ति मुक्ति पवित्र होत ॥४॥ गुरुकृपेचें महिमान । शरण एका जनार्दन ॥ ५ ॥

१८०० धन्य धन्य सद्गुरुराणा । दाखविलें ब्रह्मभुवना ॥१॥ उपकार केला जगीं । पावन जालों आम्ही वेगीं ॥२॥ पंढरी पाहतां । समाधान जालें चित्ता ॥३॥ विटेवरी समचरण । एका जनार्दनीं निजखूण ॥ ४ ॥

१८०१ वेदान्त सिध्दांत पाहणें ते आटी । जनार्दन भेटी निरसली ॥ १ ॥ आगम निगम कासया दुर्गम । जनार्दनें सुवर्म सांगितलें ॥ २ ॥ न्यायमीमांसा पातंजली शास्त्रें । पाहतां सर्वत्र निवारलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण कृपा केली । भ्रांती निरसली मनाची ते ॥ ४ ॥

१८०२ गुरूच्या उपकारा । उत्तीर्ण नव्हे गा दातारा ॥ १ ॥ माझें रूप मज दाविलें । दुःख सर्व हारविलें ॥२॥ तन मन धन । केलें गुरूसी अर्पण ॥३॥ एका जनार्दनीं आदर । ब्रह्मरूप चराचर ॥ ४ ॥

१८०३ दृष्टी देखे परब्रह्म । श्रवणीं ऐके परब्रह्म ॥१॥ रसना सेवी ब्रह्मरस । सदा आनंद उल्हास ॥ २ ॥ गुरुकृपेचें हें वर्म । जग देखे परब्रह्म ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चराचर । अवघे ज्यासी परात्पर ॥ ४ ॥

१८०४ देवाचरणीं ठाव । तैसा गुरुचरणीं भाव ॥ १ ॥ गुरु देव दोन्ही समान । ऐसे वेदांचें वचन ॥ २ ॥ गुरु देवामाजीं पाही । भिन्न भेद नाहीं नाहीं ॥ ३ ॥ देवां पूजितां गुरूसी आनंद । गुरूसी पूजितां देवा परमानंद ॥ ४ ॥ दो नामाचेनि छंदें । एका जनार्दना परमानंदें ॥ ५ ॥

१८०५ श्रीगुरूचें नाममात्र । तेंचि आमुचें वेदशास्त्र ॥ १ ॥ श्रीगुरूचें चरणतीर्थ । सकळा तीर्थां करी पवित्र ॥ २ ॥ श्रीगुरूचा उपदेश । एका जनार्दनीं तो रस ॥ ३ ॥

१८०६ श्रीगुरूचें नाममात्र । तेंचि आमुचें वेदशास्त्र ॥ १ ॥ श्रीगुरूचें तीर्थ मात्र । सकळ तीर्थां करी पवित्र ॥ २ ॥ श्रीगुरूचे चरणरज । तेणें आमुचें जाहलें काज ॥ ३ ॥ श्रीगुरुची ध्यानमुद्रा । तेंचि आमुची योगनिद्रा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन । श्रीगुरुचरणीं केलें लीन ॥ ५ ॥

१८०७ श्रीगुरूच्या चरणांगुष्ठीं । वंदिती ब्रह्मादि देव कोटी ॥ १ ॥ सकळ वेदांचें निजसार । श्रीसद्गुरू परात्पर ॥ २ ॥ श्रीगुरु नांव ऐकतां कानीं । यम काळ कांपती दोन्ही ॥ ३ ॥ सद्गुरूसी भावें शरण । एका जनार्दनीं नमन ॥ ४ ॥

१८०८ गुरु परमात्मा परेशु । ऐसा ज्याचा दृढ विश्वासु ॥ १ ॥ देव तयाचा अंकिला । स्वयें संचला त्याचे घरीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं गुरुदेव । येथें नाहीं बा संशय ॥ ३ ॥

१८०९ तारिलें वो येणें श्रीगुरुनायकें । बोधाचिये कासे लाऊनि कवतुकें ॥१॥ या भवसागरीं जालासी तूं तारूं । परतोनियां पाहो कैंचा मायापूरू ॥२॥ एका जनार्दनीं काढिये । संचला प्रपंच लाऊनि थडीये ॥३॥

१८१० गुरु माता गुरु पिता । गुरु आमुची कुळदेवता ॥ १ ॥ थोर पडता सांकडें । गुरु रक्षी मागें पुढें ॥ २ ॥ काया वाचा आणि मन । गुरुचरणींच अर्पण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । गुरु एक जनार्दन ॥ ४ ॥

१८११ आमुचिये कुळीं दैवत सद्गुरु । आम्हांसी आधारू पांडुरंग ॥ १ ॥ सद्गुरु आमुची माता सद्गुरु तो पिता । सद्गुरु तो भ्राता आम्हालागीं ॥ २ ॥ इष्ट

मित्र बंधु सज्जन सोयरे। नाहीं पैं दुसरें गुरुवीण ॥ ३ ॥ सद्गुरु आचार सद्गुरु विचार। सद्गुरुचें सार साधनांचें ॥ ४ ॥ सद्गुरुची क्षेत्र सद्गुरु तो धर्म। गुरुगुह्य वर्म आम्हांलागां ॥ ५ ॥ सद्गुरु तो यम सद्गुरु नियम। सद्गुरु प्राणायाम आम्हालागां ॥ ६ ॥ सद्गुरु तो सुख सद्गुरु तो मोक्ष। सद्गुरु प्रत्यक्ष परब्रह्म ॥७॥ सद्गुरूचें ध्यान अखंड हृदयीं। सद्गुरूच्या पायीं वृत्ति सदा ॥ ८ ॥ सद्गुरूचें नाम नित्य आम्हां मुखीं। गुणातीत सुखी सद्गुरुराज ॥९॥ एका जनार्दनीं गुरुकृपादृष्टी। दिसे सर्व सृष्टि परब्रह्म ॥ १० ॥

१८१२ म्यां गुरु केला म्यां गुरु केला। सर्व बोध तेणें मज दिधला ॥ १ ॥ घालूनियां भक्ति अंजन। दावियेलें विठ्ठलनिधान ॥२॥ कान फुंकुनी निगुती। दिधलें संतांचिये हातीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गुरु बरा। तेणें दाविलें परात्परा ॥ ४ ॥

१८१३ गेलों गुरुलागीं शरण। माझें हारपलें मीतूंपण ॥ १ ॥ द्वैतभाव गेला देशोधडी। बोध ठसा मज सवंगडी ॥ २ ॥ मंत्र सांगे त्रिअक्षर। परात्परा निजघर ॥ ३ ॥ जपतां मंत्र लागलें ध्यान। सहज खुंटलें मीतूंपण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं समाधी। सहज तुटली उपाधी ॥ ५ ॥

१८१४ धन्य श्रीगुरुनाथें। दाखविलें पाय तुमतें ॥१॥ मी अभागी दातारा। मज तारिलें पामरा ॥ २ ॥ करुनी दास्यत्व। राखियेलें माझें चित्त ॥ ३ ॥ ऐसा मी हीनदीन। शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

१८१५ अभिनव गुरूनें दाखविलें। ओहं सोहं माझें गिळिलें ॥ १ ॥ प्रपंचाचें उगवोनि जाळें। केलें षड्वैरियांचें तोंड काळें ॥२॥ उदयो अस्तावीण प्रकाश। स्वयें देहीं देखिला भास ॥ ३ ॥ मीपण नाहीं उरलें। एका जनार्दनीं मन रमलें ॥ ४ ॥

१८१६ धन्य गुरुकृपा जाहली। अहंता ममता दूर गेली ॥ १ ॥ घालूनि अंजन डोळां। दाविला स्वयंप्रकाश गोळा ॥ २ ॥ बोधीं बोधाविलें मन। नाहीं संकल्पासी भिन्न ॥ ३ ॥ देह विदेह निरसले। एका जनार्दनीं धन्य केलें ॥ ४ ॥

१८१७ सर्वभावें दास झालों मी उदास। तोडिला मायापाश जनार्दनें ॥ १ ॥ माझें मज दावियलें माझें मज दावियेलें। उघडें अनुभविलें परब्रह्म ॥ २ ॥ रविचिये परी प्रकाश तो केला। अंधार पळविला कामक्रोध ॥ ३ ॥ बांधलों होतों मायाममतेच्या पाशीं। तोडिलें वेगेंसी कृपादृष्टी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं उघडा बोध दिला। तोचि ठसावला हृदयामाजीं ॥ ५ ॥

१८१८ अनुभव पंथें निरसितां देहभाव। देह नाहीं विदेहीं म्हणों वाव। लाटिका नसतां साचार केला ठाव। गेला गेला समूळ भवभाव ॥ १ ॥ सद्गुरुकृपें कल्याण ऐसें जाहलें। द्वैताद्वैत निरसुनी मन ठेलें ॥ धृ० ॥ कैंचा भाव अभाव उरला आतां। देव म्हणे तोटा नाहीं भक्ता। समरस करितां तो हीन होतां। शून्य भरला सद्गुरु जनार्दन दाता ॥ २ ॥ देशी खूण दाविता गुरुराव। तुरेचि तात्काळ देहीं सोहंभाव। सुखदुःखाचा भेद गेला वाव। एका जनार्दनीं फिटला भव ॥ ३ ॥

१८१९ सवेची आवडी। आराम नाहीं अर्धघडी ॥ १ ॥ नित्य करित गुरुसेवा। प्रेम पडीभर होत जीवा ॥ २ ॥ आळस येवोची सरला। अराणुकेचा ठावो गेला ॥ ३ ॥ तहान विसरली जीवन। भूक विसरली मिष्टान्न ॥ ४ ॥ जांभई ही वांच पुरता। सवड नाहींची तत्त्वतां ॥ ५ ॥ ऐसें सेवे गुंतलें मन। एका जनार्दनीं शरण ॥ ६ ॥

१८२० माझें मज कळलें माझें मज कळलें। नाहीं परतें केलें आपणांतुनी ॥ १ ॥ उदकीं लवण पडतां न निघे बाहेरी। तैशी केली परी जनार्दनें ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकपणें भाव। सर्वांभूतीं देव दाखविला ॥ ३ ॥

१८२१ येव्हढें जया कृपेचें करणें। रंक राज्यपदें मिरवती ॥ १ ॥ तो हा कल्पतरु गुरु जनार्दनु। छेदी देहाभिमानु भवकंदु ॥ २ ॥ कृपेचें घोरलें धावे कामधेनु। तैसा माझा मनु वेधिलासे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तयांवांचुनीं कांहीं। दुजें पहाणें नाहीं मनामाजीं ॥ ४ ॥

१८२२ साधावया परमार्था। साह्य नव्हती माता पिता ॥ १ ॥ साह्य न होत व्याही जांवई। आपणा आपण साह्य पाही ॥ २ ॥ साह्य सद्गुरु समर्थ। तेवि करिती स्वहित ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। नोहे एकपणावांचून ॥ ४ ॥

१८२३ रात्रीची प्रौढी नोहे सूर्याचा प्रकाश। तोंवरीच भास अंधाराचा ॥ १ ॥ सूर्याचे उदयीं अंधार

हा नासे । तैसें अज्ञानें नासे ज्ञान सर्व ॥ २ ॥ एका जनार्दनीं सद्‌गुरुवांचुनी । प्रकाश तो मनीं नोहे कांहीं ॥ ३ ॥

१८२४ संसारीं परजनीं बुडतों महाडोहीं । सोडविण्या येई गुरुराया ॥ १ ॥ गुरुराया धांवें लवड सवडी । जाती एकघडी युगाऐसी ॥ २ ॥ माझी चित्तवृत्ती अज्ञान हें गाय । एका जनार्दनीं पाय दावीं डोळा ॥ ३ ॥

१८२५ सांपडलों होतों भ्रमाचिया जाळीं । मायामोहकल्लोळीं भ्रमत होतों ॥ १ ॥ परी जनार्दनें केलोंसे मोकळा । द्वंद्वडुडी अवकळा आशा तृष्णा ॥ २ ॥ मीनाचियेपरी तळमळ संसारीं । माझें माझें भोंवरी दृढ धरीत ॥ ३ ॥ तें परतें करुनी केलेंसे सरतें । आपणापरौतें जाऊं नेदी ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका लडिवाळ तान्हा । पाजी प्रेमपान्हा जनार्दन ॥ ५ ॥

१८२६ दासां दुःख झालें फार । वेगीं करा प्रतिकार ॥ १ ॥ सुख मानिलें संसारीं । दासां दुःख झालें भारी ॥ २ ॥ सोडूनियां मी स्वधर्म । आचरलों नीच कर्म ॥ ३ ॥ सेवा केली नीच याती । द्रव्यलोभें घाताघाती ॥ ४ ॥ अन्न ग्रास न जाय मुखीं । पश्चात्ताप झाला शेखीं ॥ ५ ॥ पुण्यस्थान मी पावलों । गुरुचरणीं विश्रामलों ॥ ६ ॥ स्वामी विनंति अवधारा । दीनबंधो करुणाकरा ॥ ७ ॥ कर जोडोनियां शीर । ठेवियेलें पायांवर ॥ ८ ॥ जन्मनाम जनार्दन । मुखीं गुरुअभिधान ॥ ९ ॥

१८२७ जन्मोजन्मींचें संचित । गुरुपायीं जडलें चित्त ॥ १ ॥ तें तो सोडिल्या न सुटे । प्रेमतंतू तो न तुटे ॥ २ ॥ दुःखें आदळलीं वरपडा । पाय न सोडीं हा धडा ॥ ३ ॥ देह गेला तरी जावो । गुरुचरणीं दृढ भावो ॥ ४ ॥ वरी पडोत पाषाण । परी न सोडीं गुरुचरण ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निर्धार । तेथें प्रगटे विश्वंभर ॥ ६ ॥

१८२८ ध्यानीं ध्यातां गुरुराया । ब्रह्मभूत होय काया ॥ १ ॥ करें करितां गुरुपूजा । तेंचि पूजन अधोक्षजा ॥ २ ॥ पायीं करा गुरुयात्रा । मुखें उच्चार गुरुमंत्रा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं परब्रह्म । हेंचि जाणा धर्म कर्म ॥ ४ ॥

१८२९ न सोडी रे मना गुरुजनार्दना । संसार बंधना सोडविलें ॥ १ ॥ संसार अजगर झोंबला विखार । धन्वंतरी थोर जनार्दन ॥ २ ॥ जनार्दन ऐसी माउली परियेसी । बहु कष्टें सायासीं जोडियेली ॥ ३ ॥ जनार्दनें रंक तारियेला एका । संसारी हा सखा जनार्दन ॥ ४ ॥

१८३० कोण पार नेई भवनदींतुनी । सद्‌गुरुवांचुनी तुम्हांलागीं ॥ १ ॥ अनंत उपाय जरी तुम्ही केले । पार पाविलें नव जाय ॥ २ ॥ नाना तीर्थयात्रा घडल्या तुम्हांसी । परी संतोषासी न पावाल ॥ ३ ॥ व्रतें तपें यज्ञ दानें चित्तशुद्धी । परी निजपदीं स्थिर नोहे ॥ ४ ॥ विवेक वैराग्य बळें सद्‌गुरु भेटा । आन आटाआटी न लगे कांहीं ॥ ५ ॥ एका जनार्दनीं गुरुचरण धरीं । तेथें स्थिर करी मन नरा ॥ ६ ॥

१८३१ नमावे हे नित्य सद्‌गुरूचे पाय । आन तो उपाय करूं नये ॥ १ ॥ गुरुचरणांविण मानूं नये कांहीं । वेद शास्त्र पाही हेंचि सांगे ॥ २ ॥ एका जनार्दनीं गुरुचरण सेवा । प्रिय होय देवा सर्वभावें ॥ ३ ॥

१८३२ नमूं जाय जंव गुरुत्वा । तंव त्रैलोक्य आलें गुरुत्वा ॥ १ ॥ आतां नमना नुरेचि गुरु । गुरुत्वा आला संसार ॥ २ ॥ वंद्यत्वें नमूं गुरुभेदें । तंव त्रैलोक्य गुरुत्व नांदे ॥ ३ ॥ गुरुवांचुनी न दिसे कांहीं । तंव सानथोर अवयवें गुरु पाही ॥ ४ ॥ थोर गुरुत्वा आलें गौरव । तरी गुरुनामें नये अहंभाव ॥ ५ ॥ एका जनार्दनाच्या पायीं । नमूं गेलों तों गुरुशिष्य नाहीं ॥ ६ ॥

१८३३ सद्‌गुरूसी शरण जाय । त्यासी ब्रह्मप्राप्ति होय ॥ १ ॥ न लगे आणिक उपाय । धरी सद्‌गुरूचे पाय ॥ २ ॥ सद्‌गुरूचें चरणतीर्थ । मस्तकीं वंदावें पवित्र ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सद्‌गुरु । हाचि भवसिंधूचा तारू ॥ ४ ॥

१८३४ विनंति माझी परिसावी । कृपा दीनावर करावी ॥ १ ॥ नित्य नवा नामघोष । आठव द्यावा सावकाश ॥ २ ॥ नामावांचुनी कांहीं दुजें । मना आणिक नको माझें ॥ ३ ॥ एका विनंति करी । जनार्दना कृपा करी ॥ ४ ॥

१८३५ तुझ्या चरणापरतें । शरण जाऊं जाऊं आणिकातें ॥ १ ॥ काया वाचा आणि मन । रिघालों शरण तुजसी ॥ २ ॥ निवारुनि भवताप । त्रिविध तापें तो संतार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चित्तें । शरण आला न करा परतें ॥ ४ ॥

१८३६ ध्येय ध्याता ध्यान । अवघा माझा जनार्दन ॥ १ ॥ आसन शयनीं मुद्रा जाण । अवघा माझा जनार्दन ॥ २ ॥ जप तप यज्ञ यागपण । अवघा माझा जनार्दन ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति स्थावर जाण । अवघा माझा जनार्दन ॥४॥ एका एकीं वेगळा जाण । अवघा भरला जनार्दन ॥ ५ ॥

१८३७ जयजय वो जनार्दनें विश्वव्यापक संपूर्ण वो । सगुण अगुण विगुण पूर्णपूर्णानंदघन वो ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र निर्माण तुजपासुनी वो । गुणत्रय उभय वनीं तूंचि पंचक अंतःकरणीं वो ॥ २ ॥ व्यापुनी पंचक प्राण दशइंद्रिय करणी वो । पंचक विषय स्थानें पंच विषयांचे स्वामिनी वो ॥ ३ ॥ स्थूललिंग कारण चौथें महाकारण वो । जागृती स्वप्न सुषुप्ति तूर्या उन्मनी हें स्थान वो ॥ ४ ॥ नेत्र कंठ हृदय मूर्धी या प्रमाण वो । विश्वतेजस प्राज्ञ प्रत्यगात्मा तू संपूर्ण वो ॥ ५ ॥ स्थूळ प्रविविक्त सुख चौथें आनंदाभास वो । पिंड ब्रह्मांड आणीक तूं ॐकाराचें सुख वो ॥ ६ ॥ त्वंपद आणिक असिपद तें तूं एक वो । आजी पंचकारण षड्चक्रांचे भेदन वो ॥ ७ ॥ मंत्र तंत्र स्थानीं अनावराचें आवरण वो । नरोनि एकपणां एकाएकीं जनार्दन वो ॥ ८ ॥

१८३८ जनार्दन माय जनार्दन बाप । जनार्दन ताप निवारिती ॥ १ ॥ जनार्दन बंधु जनार्दन भगिनी । जनार्दन निर्वाणी मजलागीं ॥ २ ॥ जनार्दन सखा जनार्दन चुलता । जनार्दन तत्वतां प्राण माझा ॥३॥ जनार्दन सुहृद जनार्दन मित्र । पवित्रा पवित्र जनार्दन ॥४॥ जनार्दन जन जनार्दन विजन । माझें तनमन जनार्दन ॥५॥ जनार्दन ऐश्वर्य जनार्दन धन । मज निरंजन जनार्दन ॥६॥ जनार्दन जीव जनार्दन भाव । जनार्दन शिव मजलागीं ॥७॥ जनार्दन पिंड जनार्दन ब्रह्मांड । जनार्दन अखंड परब्रह्म ॥ ८ ॥ एका जनार्दनीं वृत्ति होय लीन । जालासे तल्लीन परब्रह्मीं ॥ ९ ॥

१८३९ जनार्दनीं शोभित जन । जनार्दनें सचार ज्ञान । जनार्दनें आकळे मन । ध्याता ध्येय ध्यान जनार्दन ॥ १ ॥ जनार्दन मुखकमळीं । जनार्दनु नयनीं न्याहाळी । हृदयकमळीं । जनार्दनु ॥ २ ॥ जनार्दनें बोलिला वेदू । जनार्दनें बुद्धीसी बोधू । जनार्दनें तोडिला भेदू । परमानंदु जनार्दनु ॥ ३ ॥ जनार्दनें सद्‌दृष्टी । जनार्दनें पावन सृष्टी । जनार्दनें संतुष्ट पुष्टी । निजभावें भेटी जनार्दनें ॥ ४ ॥ जनार्दन सर्व ज्ञान डोळसू । जनार्दन स्वयंप्रकाशु । जनार्दन देहबुद्धी निरासू । परमहंसु जनार्दनु ॥ ५ ॥ जनार्दनें अज्ञानभंग । जनार्दनें नित्य नवा रंग । जनार्दनें वैष्णवसंग । वोडवे रंग जनार्दनें ॥ ६ ॥ जनार्दनें सुख होय सुखा । जनार्दन पाठीराखा । जनार्दनें तारिला एका । आम्हां निजसखा जनार्दन ॥ ७ ॥

१८४० जनार्दनें कृपा केली । वृत्ति ब्रह्माकार झाली ॥ १ ॥ धन्य धन्य जनार्दन । तयापायां मम वंदन ॥ २ ॥ मन मनपणा हरपलें । तन्मय होऊनियां ठेलें ॥ ३ ॥ चित्त चिंतना विरालें । चैतन्यरूप होऊनि ठेलें ॥ ४ ॥ निश्चयरूप जे का बुद्धि । परब्रह्म तें निरवधी ॥ ५ ॥ अहंपणें अहंभाव । तोहि झाला देवाधि देव ॥ ६ ॥ श्रोत्रेंद्रिय ग्राह्य शब्द । होऊनि राहिला निःशब्द ॥ ७ ॥ त्वगिंद्रिय स्पर्श । तो पैं जाहला परेश ॥ ८ ॥ नेत्रें पाहती रूपातें । तें पैं परब्रह्म आतें ॥ ९ ॥ जिव्हा सेवितसे रस । तें हें ब्रह्म स्वयंप्रकाश ॥ १० ॥ घ्राण सेवितसे गंध । तें हें परात्पर निर्द्वंद्व ॥ ११ ॥ वाणी उच्चारी वचन । तें हें परब्रह्म जाण ॥ १२ ॥ गमन करिताती पाद । तें हें ब्रह्म परम पद ॥ १३ ॥ पाणींद्रियें घेणें देणें । तेंचि ब्रह्म परिपूर्ण ॥ १४ ॥ गुह्येंद्रियाचा आनंद । तो झाला परमानंद ॥१५॥ जे जे क्रिया घडे अंगीं । तें तें ब्रह्मरूप जगीं ॥ १६ ॥ पंचप्राण ते अमूप । परब्रह्माचें स्वरुप ॥ १७ ॥ स्थूल सूक्ष्म तें कारण । सकल ब्रह्म परिपूर्ण ॥ १८ ॥ महाकारण प्रकृती । परब्रह्माची आकृती ॥ १९ ॥ अन्नमय कोश । परब्रह्माचा विकाश ॥ २० ॥ कोश तोहि प्राणमय । दिसे प्रत्यक्ष चिन्मय ॥ २१ ॥ मनोमय कोश जाण । परात्पर परिपूर्ण ॥ २२ ॥ कोश विज्ञान पहावा । द्रष्टा दृश्यातीत अवघा ॥ २३ ॥ कोश जाणावा आनंद । तो हा केवळ परमानंद ॥ २४ ॥ समष्टिव्यष्ट्यात्मक जग । तें हं परब्रह्म अभंग ॥ २५ ॥ जनार्दन जन वन । जनार्दन निरंजन ॥२६॥ एका जनार्दनीं भाव । एकनाथ झाला देव ॥ २७ ॥

१८४१ जनार्दनें माझें केलें असे हित । दाविला देहातीत देव मज ॥ १ ॥ नाठवे भाव अभावना तें कांहीं । स्वर्ग मोक्ष नाहीं चाड आम्हा ॥ २ ॥ देहाचें देहत्व देहपण गेलें । एका जनार्दनीं केलें विदेहत्व ॥ ३ ॥

१८४२ धन्य गुरु जनार्दन । स्वानंदाचें जें निधान ॥ १ ॥ तेणें केला हा उपकार । दावियलें परात्पर ॥ २ ॥ त्याच्या कृपें करूनि जाण । प्राप्त झालें ब्रह्मज्ञान ॥ ३ ॥ एका जनार्दन सद्गुरु । जनार्दन माझा पैं आधारू ॥ ४ ॥

१८४३ माझी जनार्दन माउली । प्रेमपान्हा पान्हावली ॥ १ ॥ तीच नित्य मज सांभाळी । रात्रंदिवस सर्वकाळीं ॥२॥ आठवितों वेळोवेळां । माझा तिजलागीं कळवळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बाळ । माता रक्षी पैं स्नेहाळ ॥ ४ ॥

१८४४ वेद तो आम्हां जनार्दन । शास्त्र तें आम्हां जनार्दन । पुराण जनार्दन । सर्वभावें ॥ १ ॥ सुख जनार्दन । दुःख जनार्दन । कर्म धर्म जनार्दन । सर्वभावें ॥२॥ योग जनार्दन । याग जनार्दन । पाप आणि पुण्य । तेंही जनार्दन ॥ ३ ॥ यापरी । सर्वेस्व अर्पी जनार्दन । एका जनार्दनीं साधे भजन ॥ ४ ॥

१८४५ आमुचा आचार आमुचा विचार । सर्वभावें निर्धार जनार्दन ॥१॥ आमुचा दानधर्म यज्ञ तें हवन । सर्व जनार्दन एकरूप ॥ २ ॥ आमुचा योगयाग तप तीर्थाटण । सर्व जनार्दन रूप असे ॥ ३ ॥ आमुचें आसन मुद्रा जनार्दन । एका जनार्दनीं भजन हेंचि खरें ॥ ४ ॥

१८४६ स्वजनीं जनार्दन विजनीं जनार्दन । जीव तो जनार्दन जीवनकळा ॥ १ ॥ जनक जनार्दन जननी जनार्दन । जन तो जनार्दन होउनी ठेला ॥ २ ॥ भाव जनार्दन स्वभाव जनार्दन । देव जनार्दन जेथें तेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आकळे जनार्दन । एका जनार्दन निश्चळ तेथें ॥ ४ ॥

१८४७ आम्हां जप जनार्दन तप जनार्दन । स्वरूप जनार्दन जनीं वनीं ॥ १ ॥ आम्हां कर्म जनार्दन धर्म जनार्दन । ब्रह्म जनार्दन जनसहित ॥ २ ॥ आम्हा योग जनार्दन याग जनार्दन । भोग जनार्दन अहर्निशा ॥ ३ ॥ आम्हां ध्येय जनार्दन ध्यान जनार्दन । एका जनार्दन ज्ञानरूप ॥ ४ ॥

१८४८ दुरघरी वोझें वाहिलासे भार । आतां वेरझार खुंटलीसे ॥ १ ॥ माझिया पैं मनें मानिला विश्वास । दृढभावें आस धरियेली ॥ २ ॥ सांपडला मार्ग हस्तमाहस्तम । गेलें कर्म धर्म पाठमोरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहतां निश्चित । निवारली भ्रांति देहीं देव ॥ ४ ॥

१८४९ शांती क्षमा दया ज्ञानविज्ञान । निरसले जाण भेदाभेद ॥ १ ॥ यापरतें सुलभ आम्हां एक नाम । मोक्ष मुक्ति धाम फोलकट ॥ २ ॥ न करूं सायास ब्रह्मज्ञान आटी । योगाची कसवटी वांया तप ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एक जनार्दन । जनीं वनीं संपूर्ण भरलासे ॥ ४ ॥

१८५० पावलों प्रसाद । अवघा निरसला भेद ॥१॥ द्वैताद्वैत दूर ठेलें । एकपणें एक देखिलें ॥ २ ॥ जन वन समान दोन्ही । जनार्दन एकपणीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लडिवाळ । म्हणोनि करावा सांभाळ ॥४॥

१८५१ माथां ठेवोनियां पाव । माझा देहींच केला देव ॥ १ ॥ नवलाव पायाचा मी केला । माझा देहींच देवपणा नेला ॥ २ ॥ पायीं पराक्रम पंचानन । पायीं निरसला देह अभिमान ॥ ३ ॥ पायीं देहासी पाहे ठावो । पायीं देहाचि केला वावो ॥४॥ नवल पायाचा हा भावो । पायीं नुरेचि देहा देवो ॥ ५ ॥ एका जनार्दनाच्या पायां । देह विदेह दोन्हो नाहीं ॥ ६ ॥

१८५२ अभिनव सांगतां विस्मयो दाटला । देहींच भासला देव माझ्या ॥ १ ॥ नवल कृपेचें विंदान कैसें । जनार्दनें ससों केलें मज ॥ २ ॥ साधनाची आटी न करितां गोष्टी । हृदयसंपुटीं दाविला देव ॥३॥ एका जनार्दनीं एकपणें शरण । नकळे महिमान कांहीं मज ॥ ४ ॥

१८५३ तळीं पृथ्वीवरी गगन । पाहतां अवघेंचि समान ॥ १ ॥ रिता ठाव नाहीं कोठें । जगीं परब्रह्म प्रगटे ॥ २ ॥ स्थावर जंगम पहातां । अवघा भरला तत्त्वतां ॥ ३ ॥ भरुनी उरला दिसे । एका जनार्दनीं हृदयीं वसे ॥ ४ ॥

१८५४ सहा चार अठरा बारा जे वर्णिती । चौदांची तो गति कुंठित गे माय ॥ १ ॥ पांचांची न कळे सात पैं भांडती । आठांची तो गति कुंठित जाली गे माय ॥ २ ॥ नवम मौनावले दशम स्थिरावले । एकादशें धरिलें हृदयीं गे माय ॥ ३ ॥ द्वादश पोटीं त्रयोदश कोटीं । एका जनार्दनाचे दृष्टी उभा गे माय ॥ ४ ॥

१८५५ पंधरा भागले सोळांसी न कळे । सतरा वेडावले न कळे माय ॥ १ ॥ एकुणविस भले विसांते पुसती । तयांसि तो गति न कळे गे माय ॥ २ ॥

एकविस वेगळे विरों मुराले। तयांचे तयां न कळे गे माय ॥ ३ ॥ तेविस चोविस वर्ते जगाकारीं। एका जनार्दनीं पंचविसावा हृदयीं गे माय ॥ ४ ॥

१८५६ एक ते एक एकाची कळेना। उगेचि कल्पना घेती वेडे ॥ १ ॥ एकवांचुनी नाहीं एक सर्वां ठायीं। एकाचि हृदयीं पुरे बापा ॥ २ ॥ एकातें आवडी धरितां प्रेमें पोटीं। दुजा ठाव सृष्टी कोठें असे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकाची आवडी । एकपणें गोडी एक जाणें ॥ ४ ॥

१८५७ एक दोन ऐसे करिती विचार। एकाचें अंतर एका न कळे ॥ १ ॥ दोन ऐसें एक सर्वां ठायीं वसे। योगियां न दिसे एक दोन ॥ २ ॥ जयासाठीं सर्व करिती आटाआटी। एक दोन सृष्टी भरलेसे ॥३॥ एका जनार्दनीं एक दोन वेळां। जनार्दन कळातीत जाणें ॥ ४ ॥

१८५८ कैंचें सुख कैंचें दुःख। कैंचा बंध कैंचा मोक्ष ॥ १ ॥ कैंचा देव कैंचा भक्त। कैंचा शांत कैंचा अशांत ॥ २ ॥ कैंचें शास्त्र कैंचा वेद । कैंची बुद्धि कैंचा बोध ॥ ३ ॥ जन नोहे जनार्दन। एका जनार्दनीं भजन ॥ ४ ॥

१८५९ अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां। चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें ॥ १ ॥ माय जगन्नाथ बाप जगन्नाथ। अनाथांचा नाथ जनार्दन ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकपणें उभा। चैतन्याची शोभा शोभलीसे ॥ ३ ॥

१८६० नेणें मंत्र तंत्र बीजाचा पसारा । जनार्दन सोईरा घडला मज ॥ १ ॥ भक्ति ज्ञान विरक्ति नेणें पैं सर्वथा। मोह ममता चिंता कांहीं नेणें ॥ २ ॥ योगयाग कसवटी कांहीं नेणों आटी । सर्व देखों सृष्टी जनार्दन ॥ ३ ॥ काया वाचा मन ठेविलें चरणां। एका जनार्दनीं सर्वभावें ॥ ४ ॥

१८६१ कोटि कंदर्पांच्या श्रेणी। कुर्वंडित जनार्दनीं ॥१॥ बरवा जनार्दन जनीं। पाहतां तनुमन भुलवणी ॥२॥ नयन लांचावले दोन्हीं। आन न दिसे त्रिभुवनीं ॥ ३ ॥ शंकरासी झाला गोड। काय इतरांचा पाड ॥४॥ रूपा भाळला कंदर्प। तेणें कृष्ण केला बाप ॥ ५ ॥ रमा रमणीये सर्वांसी। झाली चरणाची दासी ॥ ६ ॥ सनकादिक अति विरक्त। तेहि हरिपदीं आसक्त ॥७॥ जनीं जनार्दन नेटका। एकाएकी चरणीं देखा ॥८॥

१८६२ तुम्हीं करूनियां सेवा । वाढविलें मज नांवा ॥१॥ ऐसा कृपाळू उदार। पांडुरंगा तूं निर्धार ॥२॥ नानापरी उपचार। नित्य पुरवा अपार ॥ ३ ॥ उतराई नोहे देखा। म्हणे जनार्दना एका ॥४॥

१८६३ पूजा उपचार। मज पुरविले अपार ॥ १ ॥ कळूं दिली नाहीं मात। अपराधी मी पतीत ॥ २ ॥ जडजीवां उद्धारिलें। एका जनार्दनीं ऐसें केलें ॥ ३ ॥

१८६४ तुम्हीं कृपाळुजी देवा। केली सेवा आवडी ॥१॥ करूनि सडा संमार्जन। पाळिलें वचन प्रमाण ॥ २ ॥ उगळुनि गंध पुरविलें। सोहोळे केले दासांचे ॥३॥ ऐसा अपराधी पतीत। एका जनार्दनीं म्हणत ॥४॥

१८६५ तुम्हीं पूर्ण कृपा केली। मज दाविली निजमूर्ती ॥ १ ॥ तेणें निवारला शीण। गेलें जन्ममरण भान ॥ २ ॥ जें जें मधीं होतें आड। त्याचें कोडें फेडिलें ॥ ३ ॥ जाचलों होतों षड्उर्मी। पावलों दरुशनी सुख जेणें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं वासना। जाहलें समाधान मना ॥ ५ ॥

१८६६ गुरुस्मरण करितां देख। स्मरणें विसरे तहानभूक ॥१॥ आसनीं शयनीं भोजनीं। गुरुतें न विसंबे ध्यानीं मनीं ॥ २ ॥ गुरुसेवेची आवडी। सेवा करी चढोवेढी ॥ ३ ॥ गुरुचरणाची गोडी । एका जनार्दनीं पायीं दडी ॥ ४ ॥

१८६७ निर्गुणाची प्राप्ति सगुणाचे योगें। वरि भक्ति अंगा दृढ भाव ॥ १ ॥ न लगे ध्यान प्रौढी योगयाग तपें। ज्ञानाचियें वापें होतां नये ॥ २ ॥ पाहिजे समता सर्वभूतीं भाव। मुंगी आणि राव सारखेची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हेंचि हातवटी। देवा तुझी भेटी तरीच होय ॥ ४ ॥

१८६८ मुळीं निर्विकार ब्रह्म तें निश्चळ। त्यामाजीं चंचळ अहंस्फूर्ती ॥ १ ॥ तेचि ज्ञप्तीकळा चिन्मात्र स्वरूप। तो हरी संकल्प पुरातन ॥ २ ॥ संकल्पीं कल्पेना तेचि मूळ प्रकृती। जन्म अव्यक्त ती माया पोटीं ॥ ३ ॥ तेथोनी हिरण्यगर्भ तें जन्मलें। तया पोटा आलें विराट पैं ॥ ४ ॥ गुणभूत देह होतो मायें पोटीं। तत्त्वज्ञान पाठीं विस्तारलें ॥५॥ स्थूळा पासोनियां मुळाकडे जावें। सर्वसाक्षी व्हावें स्वयंब्रह्म ॥६॥ सद्गुरूचा तो पैं जालिया प्रसाद। एका जनार्दनीं बोध ठसावे तो ॥ ७ ॥

१८६९ निपाळा निपाळा राहे तूं अढळ। दृश्याचें पाल्हाळ मागें सारी ॥ १ ॥ तेथें तीर्थ संन्यास

निश्चयाचा । मेरु होई सुखाचा सहजपणें ॥ २ ॥ श्रुतीची धारणा नाद आणि मना । मेळवी गगना गुरुमुखें ॥ ३ ॥ तेथें पिंडापदा ग्रास स्वरूप चिदाकाश । एका जनार्दनीं वास एकपणें ॥४॥

१८७० दृश्य तो जो निळीं देखणें कवळी । दृष्टी ज्याचे मेळीं समरस होय ॥ १ ॥ लक्षालक्ष भेदो निरसी उपाधी । महाशून्य पदीं पैठा होय ॥ २ ॥ मन पवन गांठा संगम गोल्हाटी । तूर्या औठपिठी स्थिर करी ॥ ३ ॥ मनाचें उन्मन जनार्दनीं खूण । यालागीं शरण एकनाथ ॥ ४ ॥

१८७१ महा तम अंक दाता जो मोक्षाचा । गुरुपदीं साचा भाव असो ॥ १ ॥ आनंदीत मन चिंतनाचे ठायीं । मनीं नसो कांहीं विकल्प तो ॥ २ ॥ पाप ताप दैन्य जातील सहज । गुरुचरण रज वंदिलीया ॥३॥ एका जनार्दनीं सद्‌गुरुचरणीं । वृत्ति असो वाणी नाम वदो ॥ ४ ॥

१८७२ पृथ्वी आप तेज वायु गगन । हीं पंचभूतें भिन्नाभिन्न ॥ १ ॥ येथें न करीं ठाव । धरी गुरुचरणीं भाव ॥ २ ॥ पंचभूतें पंचप्राण । अवघा एक परिपूर्ण ॥३॥ देहीं असोनी विदेही । एका जनार्दनीं पाही ॥ ४ ॥

१८७३ तोंडीं घासु डोई टोला । ऐसा भजनार्थ जाला ॥ १ ॥ तो सर्वस्वीं नागवला । वैरी आपुला आपणची ॥ २ ॥ एका जनार्दनीं मात । भज भज सद्‌गुरुनाथ ॥ ३ ॥

१८७४ एक शुद्ध ब्रह्म ज्ञानाचें भांडार । एक तें अंतर मळीन सदा ॥ १ ॥ दोघांमाजीं वसे परमात्मा एक । परी बुध्दीचा तो देख पालटची ॥ २ ॥ एका जनार्दनीं गुरूसी शरण । काया वाचा मन ठेवा पायीं ॥३॥

१८७५ हातीं सांपडतां वर्म । वाउगा श्रम कोण करी ॥ १ ॥ पायाळची जवळी असतां । धन सर्वथा बहु जोडे ॥ २ ॥ अंजन तें गुरुकृपा । पुण्य पापा कोण लेखा ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । दुजेपणा एकला दिसे ॥ ४ ॥

१८७६ पीक पिकलें प्रेमाचें । सांठविलें गगन टांचें ॥१॥ भूमी शोधोनी पेरिजे वीज । सद्‌गुरुकृपें उगवलें सहज ॥२॥ कामक्रोधाच्या उपटोनी पेंडो । कल्पनेच्या काशा काढी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निजभाव । विश्वंभरित पिकला देव ॥ ४ ॥

१८७७ सर्वभावें दास होती सद्‌गुरूचे । धन्य भाग्य तयाचें काय वानूं ॥ १ ॥ पार नाहीं सुखा तयांचिया दैवा । वांचुनी केशवा भक्ति नाहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं सर्वभावें शरण । तनुमनधन वोवाळावें ॥३॥

१८७८ निरालंब देशींचा गुरुराय । धरीं कां रे भाव चरणकमळीं ॥ १ ॥ धरितांचि भाव नासतसे माया । त्याचें स्वरूप ठाया वोळखावें ॥ २ ॥ भाव अभावा विरहीत सांचे । तें रूप जयाचें हृदयीं ध्यावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसें जें रूपडें । हृदयीं चोखडें ध्याई जना ॥ ४ ॥

१८७९ गुरुमुखें घेतां तो निर्दोष । येऱ्हवीं आयास पडे कष्ट ॥ १ ॥ राम कृष्ण हरि मंत्र हा सोपा । उच्चारितां खेपा खंडे कर्म ॥ २ ॥ तुटतो भावना द्वैताची ते बुद्धी । निरसे उपाधी कामक्रोध ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सत्य सत्य साचा । राम नाम मंत्राचा जप करा ॥ ४ ॥

१८८० मोह ममता ही समूळ नाशावी । तेव्हांचि पावावी आत्मशुद्धि ॥ १ ॥ चित्तशुद्धि झालिया गुरुचरण सेवा । तेणें ज्ञानठेवा प्राप्त होय ॥ २ ॥ एका जनार्दनीं प्राप्त झाल्या ज्ञान । ब्रह्म परिपूर्ण अनुभवल ॥ ३ ॥

१८८१ वर्णावी ती थोरी एका सद्‌गुरूची । येरा मानवाची कामा नये ॥१॥ सद्‌गुरु समर्थ कृपेचा सागर । मनीं वारंवार आठवावा ॥२॥ सद्‌गुरूचरणीं तल्लीन हे वृत्ति । वृत्तीची निवृत्ति क्षण मात्र ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आठवीं सद्‌गुरु । भवसिंधु पारु पावलासे ॥ ४ ॥

१८८२ बुद्धि आणि मन सावध करून । मन उघडी लोचन मूळ तत्त्वीं ॥ १ ॥ सद्‌गुरूचें दास्य करीं एकभावें । काया वाचा जीवें शरण रिघा ॥ २ ॥ पंचभूतापर प्रकृतीचा वर । नामरूप विस्तार नाहीं जेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धारणा ही बळी । चतुर्थ शून्यावरी चित्त यावें ॥ ४ ॥

१८८३ परब्रह्म प्राप्तीलागीं । कर्मे आचरावीं वेगीं ॥ १ ॥ चित्त शुद्ध तेणें होय । भेटी सद्‌गुरूचे पाय ॥ २ ॥ कर्म नित्य नैमित्तिक । प्रायश्चित जाण एक ॥ ३ ॥ उपासना ते चवथे । आचरावें शुद्ध चित्तें ॥ ४ ॥ तेणें होय चित्त स्थिर । ज्ञानालागीं अधिकार ॥ ५ ॥ होय भेटी सद्‌गुरूची । ज्ञानप्राप्ति तैंचि साची ॥ ६ ॥ प्राप्त झाल्या ब्रह्मज्ञान । आपण जग ब्रह्म परिपूर्ण

॥ ७ ॥ एका जनार्दनीं भेटला । ब्रह्मस्वरूप स्वयें झाला ॥ ८ ॥

१८८४ बहुत दाविती खुणा । आमुच्या नये त्या मना । आजि आला पाहुणा । गुरुरात्र ॥ १ ॥ सांगे बोधाचिया गोष्टी । म्हणे का रे होतां कष्टी । या संसाराची तुटी । करा करा लवलाहे ॥२॥ कां रे होतां उगेच उदास । आशा मोह तोडा पाश । कां रे कासाविस । होतां वाउगे परदेशां ॥ ३ ॥ धरा धरा मंत्र मुखीं । जेणें शिवादिक जाहले सुखी । तुमचें तुम्हां न कळे शेखी । वाउगें कां शिणतां ॥ ४ ॥ अरे नको वेरझारा । चुकवा जन्ममरण सारा । एका जनार्दनीं म्हणे धरा । विश्वास संतवचनीं ॥ ५ ॥

१८८५ ऐसे जे धाले पूर्ण निमाले । ते नाहीं आले परतोनियां ॥ १ ॥ घडीनें घडी चढतसे गोडी । अखंड आवडी संतापायां ॥ २ ॥ सांडोनियां काम स्मरे रामनाम । अंतरीं तें प्रेम धरूनियां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रंगले नामीं । तया वंदू आम्हीं सर्वभावें ॥ ४ ॥

१८८६ चंचळत्व मनाचें मोडे । दृष्टीचें स्थिरत्व जोडे । सहज समाधी घडे । हरिकृपेनें पाहे पां ॥१॥ पवन पवनाची आटणी । आसनीं दृढ दृष्टी ठेउनी । गोल्हाट भेदोनी । त्रिकुटाचल मस्तकीं ॥ २ ॥ निरालंबी विश्रांती । पूर्ण एका जनार्दन स्थिती । अखंड भोगिताती । जनार्दन कृपें ॥ ३ ॥

१८८७ गोडी वेगळा ऊंस वाढे । हे तों न जोडे कल्पांतीं ॥ १ ॥ जों जों वाढे तों तों गोड । ऐशी वाड भावाची ॥ २ ॥ जों जों धरिशील भाव । तों तों देव दिसे पुढें ॥ ३ ॥ ही तों प्रचीति ध्या अंगीं । नाचा रंगीं संतांच्या ॥ ४ ॥ रूपावेगळी ती छाया । एका जनार्दनीं लागे पायां ॥ ५ ॥

१८८८ श्रीगुरुपायीं ठेवी तूं विश्वास । दासांचा तूं दास होय त्यांच्या ॥ १ ॥ परब्रह्म राम वशिष्ठा शरण । कृष्णें संदीपान गुरु केला ॥ २ ॥ वाल्मिका उपदेशी नारद तो मुनी । वंद्य त्रिभुवनीं झाला वाल्हा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गुरु मज भेटला । मोकळा दाविला मार्ग तेणें ॥ ४ ॥

## गुरुपरंपरा.

१८८९ ध्यानीं बैसोनी शंकर । जपे रामनाम सार ॥ १ ॥ पार्वती पुसे आवडी । काय जपतां तांतडी ॥ २ ॥ मंत्र तो मज सांगा । ऐसो बोलतसे दुर्गा ॥ ३ ॥ एकांतां नेऊन । उपदेशी राम अभिधान ॥ ४ ॥ तोचि मत्स्येंद्रा लाधला । पुढें परंपरा चालिले ॥ ५ ॥ तोचि बोध जनार्दनीं । एका लागतसे चरणीं ॥ ६ ॥

१८९० वंदुनी श्रीगुरुचरण । संत महिमा वर्णू ध्यान ॥ १ ॥ आदिनाथ गुरु । तयापासोनी विस्तारु ॥ २ ॥ आदिनाथें उपदेश । केला मत्स्येंद्र तो शिष्य ॥ ३ ॥ मत्स्येंद्र तो बोळला । गोरक्षासी बोध केला ॥ ४ ॥ गोरक्ष अनुग्रहित । गहिनी संप्रदाययुक्त ॥५॥ गहिनी दातारें । निवृत्ति बोधिला त्वरें ॥ ६ ॥ निवृत्ति प्रसाद । ज्ञानदेवा दिला बोध ॥ ७ ॥ ज्ञानदेव कृपें करून । शरण एका जनार्दन ॥ ८ ॥

१८९१ सांबें बोधियेला कृपावंत विष्णु । परब्रह्म पूर्ण सांब माझा ॥ १ ॥ सांब उपदेशी उमा मच्छिंद्रासी । ब्रह्मरूप त्यासी केलें तेणें ॥ २ ॥ मच्छिंद्रापासुनी चौरंगी गोरक्ष । एका जनार्दनीं अलक्ष दाखविलें ॥ ३ ॥

१८९२ गोरक्षनाथें उपदेश केला । ब्रह्मरूप झाला गहिनीनाथा ॥ १ ॥ गहिनीनें निवृत्तिनाथासी । उपदेश त्यासी आत्मबोध ॥ २ ॥ निवृत्तिनाथानें ज्ञानदेवा पाहा । एका जनार्दनीं तेंही बोधियेलें ॥ ३ ॥

१८९३ ज्ञानदेवें उपदेश करूनियां पाहीं । सोपान मुक्ताई बोधियेली ॥ १ ॥ मुक्ताईनें बोध खेचरासी केला । तेणें नामियाला बोधियेलें ॥ २ ॥ नाम्याचें कुटुंब चांगा वटेश्वर । एका जनार्दनीं विस्तार मुक्ताईचा ॥ ३ ॥

१८९४ ज्ञानराजें बोध केला सत्यबळा । रेडा बोलाविला प्रतिष्ठानी ॥ १ ॥ भोजलिंग ज्याची समाधी आळंदी । ज्ञानराज बोधी तिघाजणां ॥२॥ सत्यबळें बोध गैबीराया केला । स्वयें ब्रह्म झाला सिद्धरूप ॥३॥ एका जनार्दनीं ऐसी परंपरा । दाविलें निर्धारा कथूनिया ॥ ४ ॥

१८९५ मच्छिंद्रानें मंत्र गोरक्षासी दिला । गोरक्ष बोळला गहिनीराजा ॥ १ ॥ गहिनीनें खूण निवृत्ति दिधली । पूर्ण कृपा केली ज्ञानराजा ॥ २ ॥ ज्ञानदेवें बोधें जगासी पैं केला । एका जनार्दनीं धाला पूर्ण बोधें ॥ ३ ॥

१८९६ परेचें जें सुख पश्यंती भोगी । तोचि राजयोगी मुगुटमणी ॥१॥ सिद्धाची ही खूण साधक सुख

जाण। सद्गुरूसी शरण रिघोनियां ॥ २ ॥ वैखरी व्यापारी मध्यमेच्या घरीं। ओंकाराच्या शिरीं वृत्ती ठेवी ॥ ३ ॥ आदिनाथ ठेवणें सिद्ध परंपरा। जनार्दनीं वेव्हारा एकनाथी ॥ ४ ॥

१८९७ आदि गुरु शंकर ब्रह्मज्ञान खूण। वाणली पैं पूर्ण मच्छेंद्रनाथीं ॥ १ ॥ मच्छेंद्र बोळला गोरख बोधिला। ब्रह्मज्ञान त्याला काथियेलें ॥ २ ॥ गोरक्ष संपूर्ण निवेदिलें गहिनी। तेणें निवृत्तिलागुनी उपदेशिलें ॥ ३ ॥ निवृत्तिनाथें ज्ञानदेवासी दिधलें। परंपरा आलें ऐशापरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तयाचा मी दास। उच्छिष्ट कवळास भक्षीतसें ॥ ५ ॥

१८९८ जो निर्गुण निराभास। जेथून उद्भव शबल ब्रह्मास। आदिनारायण म्हणती ज्यास। तो सर्वांस आदिगुरु ॥ १ ॥ तयाचा ब्रह्मा अनुग्रहीत। ब्रह्मा अत्रीस उपदेशीत। अत्रीपाद प्रसादीत। श्रीअवधूत दत्तात्रय ॥ २ ॥ दत्तात्रय परंपरा। सहस्त्रार्जुन यदु दुसरा। जनार्दन शिष्य तिसरा। केला खरा कलियुगीं ॥ ३ ॥ जनार्दन कृपेस्तव जाण। समूळ निरसलें भवबंधन। एका जनार्दनीं शरण। झाली संपूर्ण परंपरा ॥ ४ ॥

१८९९ करी जो सृष्टीचें रचन। तया न कळे ब्रह्मज्ञान। तो श्रीनारायण। शरण रिघे ॥ १ ॥ न कळे न कळे ब्रह्मज्ञान। म्हणोनि धरितसे चरण। नारायण परिपूर्ण। उपदेशी ब्रह्मा ॥ २ ॥ ब्रह्मा अत्रीतें सांगत। ब्रह्मज्ञान हृदयीं भरित। अत्री पूर्ण कृपेस्थित। दत्तात्रय सांगतसे ॥ ३ ॥ दत्तात्रय कृपें पूर्ण। जनार्दनीं पूर्णज्ञान। जगांचि संपूर्ण। एक रूप तयांसी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पूर्ण। ब्रह्मज्ञानाची खूण। बोधोनियां संपूर्ण। मळविलें आपणीया ॥ ५ ॥

१९०० जनार्दनाचा गुरु। स्वामी दत्तात्रय दातारू ॥ १ ॥ त्यांनीं उपकार केला। स्वानंदाचा बोध दिला ॥ २ ॥ सच्चित्सुखाचा अनुभव। दाखविला स्वयमेव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दत्त। वसो माझ्या हृदयांत॥४॥

---

भाग ] आत्मास्थिति. [ २ रा

१९०१ येउनी नरदेहा गमविलें आयुष्य। नाहीं हृषिकेश स्मरला मनीं ॥१॥ मुखें नाहीं केलें देवाचें स्मरण। ऐसा अधम जन जाहलों देवा ॥ २ ॥ नाहीं तें ऐकलें कीर्तन संतांचें। कर्ण बधिर साचे जाहले देवा ॥३॥ करें नाहीं केला दानधर्म कांहीं। ऐसा अपराधी पाहीं जाहलों देवा ॥४॥ चरण न चालती तीर्थयात्रेप्रती। ऐसा आत्मघाती जाहलों देवा ॥ ५ ॥ एका जनार्दनीं संसाराचा छंद। नाहीं तो गोविंद आठविला ॥ ६ ॥

१९०२ कासया निर्मिला अपवित्र संसार। न घडे विचार योग्यायोग्य ॥ १ ॥ दिननिशीं मना द्रव्याची वासना। परी नारायणा स्मरण नाहीं ॥ २ ॥ ऐसा मी भुललों प्रपंच लिगाडीं। एका जनार्दनीं उडी घाली देवा ॥ ३ ॥

१९०३ कासया संसार लाविला छंद। तेणें हा गोविंद अंतरला ॥ १ ॥ न कळे दिवस जातो तें कळेना। संसार भ्रमणा फिरतसों ॥ २ ॥ एका जनार्दनीं भाकितो करुणा। माझिया वचना चित्त द्यावें ॥ ३ ॥

१९०४ आशामनंसातृष्णा बांधिती दावणीं। सोडवी चक्रपाणी संतसंगें ॥ १ ॥ कामक्रोधलोभ याचा पसर। पाडिला विसर तुझा देवा ॥ २ ॥ मोह ममता भ्रांति ढकलिती कूपीं। दावी पैं सोपी वाट आम्हां ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका विनवी सर्वांतें। भजा एकचित्तें विठोबासी ॥ ४ ॥

१९०५ आशा पाश देवा नको या संसारीं। नका चौऱ्यांयशीं फेरी वेरझार ॥ १ ॥ सोडवी देवा कुसंगा टाकून। मन तें उन्मन तुझे चरणीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं मनोगत सिद्धि। कैं कृपानिधी पुरवाल ॥ ३ ॥

१९०६ जन्म जरा मरण व्याधी। हीं तों उपाधी लागलीसे ॥ १ ॥ लिगाड तें मुळीं वायां। जैसी छाया अभ्रींची ॥ २ ॥ विषयकर्दमाचे मेळीं। विठ्ठल वनमाळी येवो आतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ध्यास। अवघी आस पायां पैं ॥ ४ ॥

१९०७ संचित माझें वोखटें देवा। तुम्ही केशवा काय करा ॥ १ ॥ पहा वासुगी शिव कंठीं। क्षुधा

पोटीं वायूची ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण । कर्मेचि गहन पैं माझें ॥ ३ ॥

१९०८ धांव रे धांव आतां । दीनवत्सला रामा ॥ संसारसंग गोष्टी । मी गुंतलों कामा ॥ १ ॥ तारुण्य अभिमानें । अंगा भरला ताठा ॥ विषय संपत्तीचा । मज फुटला फाटा ॥ २ ॥ विषय भोगितांना । देह पोसलें माझें । स्वहित आठवेना । ध्यान चुकलों मी तुझें ॥ ३ ॥ विषया मोकलिलों । तुज शरण मी आलों । एका जनार्दनीं पायीं । लीन मी जाहालों ॥ ४ ॥

१९०९ धांव नारायणा । माझ्या दुःखाच्या निरसना ॥ १ ॥ संसारें मी कष्टलों । तुजलागीं शरण आलों ॥ २ ॥ कोण सोडवील आतां । तुजाविण जी अनंता ॥ ३ ॥ तूंचि मायबापा । निवारिसी सर्व तापा ॥ ४ ॥ एका जनार्दन पाय । धरूनियां चित्तीं राहे ॥ ५ ॥

१९१० धांवे धांवे श्रीहरी । निवारी संसार बोहरी ॥ १ ॥ आडलियाचा विसांवा । धांवे पावे तूं केशवा ॥२॥ तूं दीनदयाळ हरी । आपुलें आम्हां जतन करी ॥ ३ ॥ अंकित भक्तांचा । ऐसी बोले वेदवाचा ॥४॥ एकापणीं जनार्दनीं । आठ सहस्र बोले वाणी ॥ ५ ॥

१९११ तुजविण आम्हां कोण आहे देवा । धांव यादवरावा मायबापा ॥ १ ॥ पडिलोसें डोहीं प्रपंच आवर्ती । कोण करी शांति तुजविण ॥ २ ॥ जन्ममरणाचा पडिलासे फेरा । सोडवी दातारा मायबापा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धांवे लवलाही । येवोनियां ह्रदयीं ठाव देई ॥ ४ ॥

१९१२ सांडिला प्रपंच जाहलोंसे उदास । सर्वभावें कास धरिली तुमची ॥ १ ॥ आतां माझें हित करी गा देवराया । नाहीं तरी वांया सहज गेलों ॥ २ ॥ लौकिकाची चाड नाहीं मज शंका । तुम्हावांचूनी एका पांडुरंगा ॥३॥ एका जनार्दनीं पायाची आवडी । सर्व माझी जोडी नाम तुझें ॥ ४ ॥

१९१३ ब्रीदावळी करी आपुली जतन । आलों मी शरण जनार्दना ॥१॥ राखी माझी लाज पतीत पतीत । तुझा मुद्रांकित रंक एक ॥ २ ॥ काम क्रोध लोभ दंभ अहंकार । हे देहीं अनिवार सोसवेना ॥ ३ ॥ आशा मनीषा माया साखिया सांगातिणी । करिती गोसणी सदा जीवा ॥४॥ चिंता वित्त आशा लागलीसे पाठीं । इहीं जीवें साठी केली मज ॥ ५ ॥ जनार्दना शरण अनन्य पैं एका । काये वाचे देखा चरणीं विनटला ॥६॥

१९१४ तुमच्या चरणांपरतें । शरण न जाय आणिकांतें ॥ १ ॥ ऐसे चरण पावन । उद्धरिले असंख्य जन ॥ २ ॥ चरणरजाचें ध्यान । शंकर करितो आपण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । धरिले चरण न सोडी जाण ॥ ४ ॥

१९१५ अहो करुणाकरा पतीतपावना । आमुच्या वचना चित्त धावें ॥ १ ॥ दीन मी हीन रंकाहुनी रंक । म्हणोनियां देख शरण तुम्हा ॥ २ ॥ आमुचें सांकडें वारूनियां देवा । घ्यावी तुम्हीं सेवा एक चित्तें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संकल्प हा दृढ । आतां नाहीं गूढ तुम्हापुढें ॥ ४ ॥

१९१६ कीर्ति तुमची तिहीं लोकीं । तारिले पातकी अपार ॥ १ ॥ जाहला विश्वास आधीं मना । धरिले चरणां दृढ मग ॥ २ ॥ एका जनार्दनीं लाडिवाळ । करा सांभाळ आतां माझा ॥ ३ ॥

१९१७ कृपाळु माधव तूं मुरारी । अच्युता अनंता श्रीहरी ॥ १ ॥ तुम्हीं तारिले अहिल्येसी । उद्धरिले अजामेळासी ॥ २ ॥ महा दोषांची दोषश्रेणी । ती तारिली कुंटिणी ॥ ३ ॥ रामनाम जपे अनुदिनीं । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१९१८ त्रिभुवनीं तुमची थोरी । पतीतपावन म्हणती हरी ॥ १ ॥ तें हें तारक सत्यनाम । शंकराचा तूं विश्राम ॥ २ ॥ ब्रीद गाजे पतिताचें । तिहीं लोकीं तुमचें साचें ॥ ३ ॥ शरण एका जनार्दन । आम्ही पतीत तूं पावन ॥ ४ ॥

१९१९ उपमन्यु प्रल्हाद तारिले आळीकें । मी तुझें लाडकें सानपणें ॥१॥ नेणतीयासी धांवसी तूं त्वरा । शाहणे वेरझारा मरताती ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण एकपणीं । नेणतां जाणतां चरणीं तुझे देवा ॥ ३ ॥

१९२० पोटींचें बाळ अवगुणी वोखटें । परी मायबापा स्नेहो मोठें ॥ १ ॥ तयापरी उदरा आलों जी स्वामी । अवगुणाच्यापरी नुपेक्षा तुम्ही ॥ २ ॥ गुण नाहीं तेथें कर्म कैंचे धड । परी मायबापा वाटतसे कोड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उद्भव साचें । म्हणोनि हरिदासा कौतुक त्याचें ॥ ४ ॥

१९२१ जेणें जेणें आमुच्या मना समाधान । तें तें करूं ध्यान तुमचें देवा ॥ १ ॥ करुणाकर तुम्ही पतीत-

पावना । अहो नारायणा वेदवंद्या ॥ २ ॥ भाकितसों कींव होऊनि उदास । आतां निराश नका करूं ॥३॥ एका जनार्दनीं नका दुजे आतां । अहो रुक्मादेवी-कांता पांडुरंगा ॥ ४ ॥

१९२२ शरणागता कृपाळु उदार पंढरीराणा । जाण-तसे खुणा अंतरींच्या ॥ १ ॥ तिहीं त्रिभुवनीं चाले एक सत्ता । म्हणोनि तत्वतां कींव भाकीं ॥ २ ॥ करु-णाकर तुम्हीं भक्तांचें जीवन । हें आम्हां वचन श्रुति-वाक्य ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आलोंसे शरण । काया वाचा मन जडलें पायीं ॥ ४ ॥

१९२३ साचपणें माझें करावें धांवणें । काया वाचा मनें शरण तुम्हां ॥ १ ॥ अहो पंढरीराया नका आतां दुजें । विश्रांती सहज तवचरणीं ॥ २ ॥ एका जना-र्दनीं माझा अभिमान । वाढविलें आपण म्हणोनियां॥३॥

१९२४ बहु उतावीळ । पांडुरंगा तूं दयाळ ॥ १ ॥ मागें तारिले बहुतां । माझी असों द्यावी चिंता ॥ २ ॥ दयाळ तूं पांडुरंगा । मज धरावें वोसंगा ॥ ३ ॥ सेवा तुम्हीं देवा । केली दुर्बळाची केशवा ॥ ४ ॥ उचिता उचित । एका जनार्दनीं मात ॥ ५ ॥

१९२५ भजन नाहीं मी अकर्मी वांया । अभिनव अवगति जाली देवराया ॥ १ ॥ नीचा नीच मीच एकु । मजवरी उपवरी वर्ते सकळ लोकु ॥ २ ॥ अंधाअंध अधोगत पाहीं । मजहुनी अंधाअंध कोणी नाहीं ॥३॥ एका जनार्दनीं नीच हा नेला । मुंगीयाचे पायीं सगळा सामावला ॥ ४ ॥

१९२६ पंचाननें मज घेतलें वेढून । नेताती काढून प्राण माझे ॥ १ ॥ गजेंद्राकारणें त्वां घातली उडी । तैसा लवडसवडी धांवे देवा ॥ २ ॥ तुजवांचून मज नाहीं आधार । एका जनार्दनीं पार उतरीं देवा ॥ ३ ॥

१९२७ अहो नारायणा । सांभाळावें आम्हां दीनां ॥ १ ॥ आमुची राखावी ती लाज । परंपरा हेंचि काज ॥ २ ॥ सांभाळावी ब्रीदावळी । करुणाकल्लोळीं दयाळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । करुणाकर पतीतपावन ॥ ४ ॥

१९२८ थोर अन्यायी दयाघना । सांभाळीं दीना आपुल्या ॥ १ ॥ वारंवार क्षणोक्षणीं । मस्तक चरणीं तुमच्या ॥ २ ॥ कुर्वंडीन आपुली काया । तुमचे पायां-वरुनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तुमचा दास । न करा उदास तयासी ॥ ४ ॥

१९२९ तुम्ही कृपावंत देवा । माझा हेवा चुकवावा ॥ १ ॥ सांपडलों काळाहातीं । उगवा गुंती तेवढी ॥ २ ॥ माझें मन तुमचे चरणीं । राहो चक्रपाणी सर्वदा ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । तुम्ही धनी ब्रह्मांडीं ॥ ४ ॥

१९३० आम्हां तुमचा भरंवसा । सांभाळावें जग-दीशा ॥ १ ॥ आपुली आपण जतन करा । ब्रीदावळी हे दातारा ॥ २ ॥ आम्ही पतितांनीं कोडें । तुम्हां घातलें सांकडें ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । मोक्ष मुक्ती तुमचे चरणीं ॥ ४ ॥

१९३१ वांया बोभाट अनंता । शरणागता उपेक्षि-लिया ॥ १ ॥ अपमानाचें भातुकें । तुम्हां सुखें देतील ॥ २ ॥ एकापरीस एक थोर । तुमचा वडिवार चालूं न देती ॥ ३ ॥ विनवी जनार्दनाचा एका । देवा लौकिका सांभाळा ॥ ४ ॥

१९३२ तुम्हीं बहुतांचें केलेंसे धांवणें । आतां नारा-यणें कठीण केलें ॥ १ ॥ होउनी उदास अवलोकितों दिशा । पुरवा माझी इच्छा मायबापा ॥ २ ॥ एका जनार्दनीं त्रैलोकीं नाम । तुम्ही तो निष्काम देवा बहु ॥ ३ ॥

१९३३ धांवण्या धांवतां न लावा उशीर । हा श्रेष्ठा-चार मागें आला ॥ १ ॥ गुणदोष नाहीं पाहिले कव-णाचे । केलें बहुतांचें धांवणें देवा ॥ २ ॥ एका जना-र्दनीं पतीतपावन । हें तो तुम्हां वचन साजतसे ॥ ३ ॥

१९३४ जाणा पाळूं कळा । कृपाळुवा जी दयाळा ॥ १ ॥ कां हो आतां उपेक्षिलें । मज दीनासी ये वेळे ॥ २ ॥ पाहतों वास देउनी धीर । कां हो पडियेला विसर ॥ ३ ॥ चित्त सर्व तुमचे पायीं । कृपावंता भेटी देई ॥ ४ ॥ एका जनार्दनीं एकपणें । तया नाहीं दुजेपणें ॥ ५ ॥

१९३५ तुम्ही कृपाळ कृपाळ । विश्वजन प्रतिपाळ ॥ १ ॥ म्हणोनी येतों काकुलती । कृपाळुवा श्रीपती ॥२॥ एका जनार्दनीं देवा । सर्व सारुनि पायीं ठेवा ॥३॥

१९३६ अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ । म्हणवोनि सांभाळ करीं माझा ॥ १ ॥ तुज ऐसा देव नाहीं त्रिभुवनीं । म्हणवोनि चरणीं विनटलों ॥ २ ॥ बापा जनार्दना कृपा करीं दान । सांभाळीं वचन आपुलें तें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भेटी देई देवा । संतांपायीं भावा मिठी पडो ॥ ४ ॥

१९३७ आनंदाचा भोग घालीन आसनीं। वैकुंठनिवासिनी तुझे नांवें ॥ १ ॥ येई वो विठ्ठले अनाथाचे नाथे। पंढरी दैवते कुळदेवी ॥ २ ॥ आपुलें म्हणावें सनाथ करावें। एका जनार्दनीं वंदावें संतजनां ॥ ३ ॥

१९३८ कैं तया मार्गीं चरण चालती। ऐशी वाटे खंती दिनरातीं ॥ १ ॥ कैं या मनाची पुरेल वासना। कैं मिठी चरणा देईन जीवें ॥ २ ॥ कैं हें भाळ ठेवीन चरणीं। कै पायवणी घेईन सुखें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कै होईल कृपादान। कैं नारायण प्रेमें भेटे ॥४॥

१९३९ बारंवार देहीं हेचि पैं वासना। अखंड चरणा घालीन मिठी ॥ १ ॥ हा माझा नवस आठवीन पाय। आणीक तें कांहीं नेणें दुजें ॥ २ ॥ संकल्पासी कैं येईल अंकुर। कै धीरा धीर होईल मन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अखंड वासना। पुरवा नारायणा देउनी भेटी ॥ ४ ॥

१९४० कृपाळु माउली उभी भीमातटीं। लागलीसे आशा जीवासी मोठी ॥ १ ॥ कई भेटेल माझा मायबाप। उजळोनी दीप वोवाळीन श्रीमुख ॥ २ ॥ शून्य स्थावर व्यापुनी वेगळा राहे। एका जनार्दनीं वंदीन त्याचे पाय ॥ ३ ॥

१९४१ हीच मुख्य उपासना। तुमच्या चरणां दंडवत ॥ १ ॥ गुणदोष पाहूं नका। कीर्तनीं सुखा लुटावें ॥ २ ॥ संतचरणीं सदा भाव। करा वाव संसार ॥३॥ लडिवाळ जनार्दनीं एका। कांव देखा भाकितसे ॥४॥

१९४२ कैं मनींची इच्छा पुरेल ही धांव। पाहीन पंढरीराव जाऊनियां ॥ १ ॥ आलीया जन्माचें होईल सार्थक। निवारेल दुःख भय पीडा ॥ २ ॥ कैं हें मस्तक ठेवीन चरणीं। पाहीन डोळे भरूनि श्रीमुख तें ॥ ३ ॥ एका जनार्दना कैं होईन पात्र। नासेल समस्त तापत्रय ॥ ४ ॥

१९४३ माहेरींची वास पाहीन मी डोळां। संतांचा पैं मेळा येतां देखें ॥ १ ॥ घालुनी दंडवत लागेन मी पायीं। जीव हा उतराई करूनि सांडीं ॥ २ ॥ कुरवंडीन काया तयावरून भावें। जीवें वोवाळावें जीवलगा ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी प्रेमें करिती वारी। तयांची मी थोरी काय वानूं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं धन्य ते दैवाचे। निरंतर वाचे विठ्ठलनाम ॥ ५ ॥

१९४४ मागणें हेंचि माझें देवा। दुजेपणा दुरी ठेवा ॥ १ ॥ मी तूं ऐसी नको उरी। जनार्दना कृपा करी ॥ २ ॥ रंक मी एक दीन। माझें करावें स्मरण ॥ ३ ॥ नीच सेवा मज द्यावी। एका जनार्दनीं आस पुरवावी ॥ ४ ॥

१९४५ आम्ही दीन तूं दीनानाथ। तिहीं लोकीं तुझी मात ॥ १ ॥ आम्ही पतीत तूं पावन। ऐसें साजे नामाधिमान ॥ २ ॥ आम्ही अनाथ तूं कैवारी। ऐसी तुझी आहे थोरी ॥ ३ ॥ आम्ही दीन तूं वत्सल। ऐकिला तो ऐसा बोल ॥ ४ ॥ नको धरूं दुजें आर्ता। कृपाळु तूं दीनानाथा ॥ ५ ॥ एका शरण जनार्दनीं। ऐसें चालत आलें दुरूनी ॥ ६ ॥

१९४६ संपत्ती संतती मजला नावडे। स्वरूप आवडे तुझें देवा ॥ १ ॥ तुझ्या रूपीं सुख माझिया लोचनां। आणिक नारायणा न पाहती ॥ २ ॥ हस्त इच्छिताती तुज भेटावया। सेवाहि कराया सर्वकाळ ॥ ३ ॥ चित्त जडलें पायीं सदा सर्वकाळ। राहिली तळमळ तयाची ते ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तुझें नाम मुखीं। नको आणिका सुखीं गोऊं मज ॥ ५ ॥

१९४७ वारंवार संतसंग। गाऊं अभंग हरिनाम ॥१॥ वाचे कीर्ति पाय पंथीं। आणिकांची स्तुति न गाऊं ॥२॥ एकविधपणें राहूं। वाचे गाऊं विठ्ठल ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सेवा। तुमचें देवा दास्यत्व ॥ ४ ॥

१९४८ मज तो आणीक नाहीं चाड। येवढी जोड पायांची ॥ १ ॥ वास द्यावा पंढरीचा। संतांचा समागम ॥ २ ॥ कीर्तनीं नाचेन महाद्वारीं। गरुडपारीं कान धरूनी ॥ ३ ॥ ऐसें लडिवाळ तान्हें। एका जनार्दनाचें पोसणें ॥ ४ ॥

१९४९ माझें मन राखोनि पायीं। करा समाधान देहीं ॥ १ ॥ हेंचि मागतों साचार। वारंवार जोडोनि कर ॥ २ ॥ ब्रह्मज्ञानाची आटी। नका योगाची कसवटी ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति नका आड। ब्रह्म सायुज्यता भीड ॥ ४ ॥ लागतो चरणा। शरण एका जनार्दना ॥ ५ ॥

१९५० माझें मन अति चंचळ। त्यासी बांधा तुम्ही सबळ ॥ १ ॥ मग तें कोठें नच जाय। तुमचे जोडेनियां पाय ॥ २ ॥ सुखदुःखाचें कारण। मनचि हें अधिष्ठान ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। मनें मनासी बंधन ॥ ४ ॥

१९५१. माझें मन राहो तुझे पायीं। वास पंढरीचा देई ॥ १ ॥ जन्म देशी भलते परी। वाचे राम

विठ्ठल हरी ॥ २ ॥ जन्माचिया भेणें। हे तों आम्हां लाजिरवाणें ॥ ३ ॥ मोक्ष मुक्तीतें देवा। नको गोऊं तया ठाया ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनीं एका। संतसंग द्यावा निका ॥ ५ ॥

१९५२ वाउगे बोल जाती वांया। पंढरीराया कृपेविण ॥ १ ॥ तुमचा छंद वसो मनीं। संतचरणीं वास सदा ॥ २ ॥ नको आत्मस्थिति वांया शीण। तुम्हांविण दयाळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। मनाचें मोहन तुम्ही माझें ॥ ४ ॥

१९५३ जेथें जेथें मन जाईल वासना। फिरवावें नारायणा हेंचि देई ॥ १ ॥ वारंवार द्यावा नामाचा आठव। कुबुद्धीचा ठाव पुसा सर्व ॥ २ ॥ भेदाची भावना तोडावी कल्पना। छेदावी वासना समूळ कंद ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नका दुजा छंद। रामकृष्ण गोविंद आठवावा ॥ ४ ॥

१९५४ येवढा पुरवा मनींचा छंद। वाचे गोविंद आठऊं द्या ॥ १ ॥ मग मी तुमच्या न सोडी पायां। करीन काया कुर्वंडी ॥ २ ॥ वारंवार क्षणक्षणां। संतचरणीं वंदीन ॥ ३ ॥ दुजा नका कांहीं हेत। एका जनार्दनीं मागत ॥ ४ ॥

१९५५ मागणें तें एक आम्हांप्रती द्यावें। निरंतर यावें जागरणा ॥ १ ॥ या हरिदासाचा संग बरवा। आनंद राघवा गाऊं गीतीं ॥ २ ॥ जो न लभे तप तीर्थ दानीं। तो हरिकीर्तनीं तिष्ठतसे ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका म्हणे। कृपा करणें जागरणें ॥ ४ ॥

१९५६ सर्वभावें विनवणी। मस्तक चरणीं देवाच्या ॥ १ ॥ सदा रूप पहावें डोळां। वाचे चाळा हरिनाम ॥ २ ॥ निजध्यास कीर्तनाचा। समागम तो संतांचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे देवा। हीच सेवा मज द्यावी ॥ ४ ॥

१९५७ आमुच्या निजसुखधामा। तुझे चरण पुरुषोत्तमा ॥ १ ॥ आम्हांवरी कृपा करा। उद्धरा दातारा दीनाची ॥ २ ॥ देऊनियां नाम कीर्ति। बरवा मूर्ति हृदयीं ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं। ठाव मागतसे चरणीं ॥ ४ ॥

१९५८ तुमचे वर्णितां पोवाडे। कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥ तुमची वर्णितां बाळलीला। तें तुज आवडे गोपाळा ॥ २ ॥ तुमचें वर्णील हास्यमुख। त्याचें छेदितो संसारदुःख ॥ ३ ॥ तुमचे रूपाचें दरुशन। एका जनार्दनीं तें ध्यान ॥ ४ ॥

१९५९ कांहीं न करूं आणीक आन। वाचे गुण गाऊं तुमचे ॥ १ ॥ पाहूं डोळेभरी मुख। तेणें सुख इंद्रियां ॥ २ ॥ न करी कोणा ताडातोडी। आहे खोडी दूर करूं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रमाण। वाचे नारायण आठवूं ॥ ४ ॥

१९६० श्रवणीं ऐकेन तुमचें गुणनाम। वाचे आणीक काम न करी कांहीं ॥ १ ॥ डोळे भरूनियां पाहीन श्रीमुख। सुखाचें तें सुख हृदयांत ॥ २ ॥ अष्टभावें कंठीं दाटेन सद्गद। सांडोनि भेदाभेद आन देवा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं यापरतें प्रेम। आन नाहीं विषम मजपाशीं ॥ ४ ॥

१९६१ तुम्ही उदार कृपाळ। मागे केले प्रतिपाळ ॥ १ ॥ तैसें मज सांभाळावें। वदनीं वदवावें नाम तुमचें ॥ २ ॥ आशापाश नका मोह। याचा निःसंदेह पाडावा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विज्ञापना। परिसा दीना दासाची ॥ ४ ॥

१९६२ नेणें साधन पसारा। व्रता तपाच्या निर्धारा ॥ १ ॥ आवडी गाऊं तुझें नाम। तेणें पुरती सर्व काम ॥ २ ॥ आणीक न करूं चावटी। आगम निगम आटाआटी ॥ ३ ॥ न करी साधन कांहीं। एका जनार्दनीं पाहीं ॥ ४ ॥

१९६३ देवा तुम्ही आहांत समर्थ। काय मागूं मी पदार्थ ॥ १ ॥ देणें द्याल तरी हेंचि द्यावें। संतचरण मी वंदावें ॥ २ ॥ दुजें मागणें सायासीं। नाहीं नाहीं हृषीकेशी ॥ ३ ॥ बोलतसे तोंडभरी। ऐसे नका म्हणूं हरी ॥ ४ ॥ अंकीत मी तुझा देवा। एका जनार्दनीं ठेवा ॥ ५ ॥

१९६४ दास्यत्व करीन मी देवा। माझी पुरवा आस तुम्ही ॥ १ ॥ देऊनियां कृपादान। निरवावें जाण संतांसी ॥ २ ॥ मग ते धरितां आपुले करीं। होती कामारी भुक्ति मुक्ती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। तुमचें महिमान न कळे ॥ ४ ॥

१९६५ नाम धारकाचा। दास होईन मी साचा ॥ १ ॥ आणीक नको थोरपण। वाचे वदों त्याचे गुण ॥ २ ॥ नामीं सदा वसो हेत। हेंचि मागणें मागत ॥ ३ ॥ हेंचि द्यावें कृपादान। एका जनार्दनीं शरण ॥ ४ ॥

१९६६ माझिया जीवीं आवडे। संतसमागम रोकडे ॥ १ ॥ हेंचि द्यावें कृपादान। कृपाळु तूं नारा-

यण ॥ २ ॥ एका जनार्दनीं म्हणवी दास। त्याची पुरवावी आस ॥ ३ ॥

१९६७ तुम्ही उदार सर्व गुणें। मीं रंकपणें रंकाहुनी ॥ १ ॥ काया वाचा आणि मन। केलें समर्पण तंव चरणीं ॥ २ ॥ आणीक नाहीं कांहीं चाड। सेवा दृढ संतांची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तुमचा दास। आहे आस पायांची ॥ ४ ॥

१९६८ दास्य करूं हरिदासाचें। तेणें जन्माचें सार्थक ॥ १ ॥ बुद्धि वसो तुमचे नामीं। आणिका कामीं न गुंतो ॥ २ ॥ संसार तो पारिखा जाहला। या विठ्ठला पाहतां ॥ ३ ॥ पालटला भेदाभेद। एका जनार्दनीं आनंद ॥ ४ ॥

१९६९ हेचि देवासी विनंती। संतसेवा दिवसरातीं ॥ १ ॥ वास देई पंढरीचा। नामघोष कीर्तनाचा ॥ २ ॥ सदा सर्वदा नाम मुखीं। दुजें नको कांहीं पारखी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हरीचा दास। म्हणतां पुरे सर्व आस ॥ ४ ॥

१९७० देवा माझें मन लागो तुझे चरणीं। संसारव्यसनीं पडों नेदी ॥ १ ॥ नामस्मरण घडो संतसमागम। वाऊगाची भ्रम नको देवा ॥ २ ॥ पायीं तीर्थयात्रा मुखीं रामनाम। हाचि माझा नेम सिद्धी नेई ॥ ३ ॥ आणीक मागणें नाहीं नाहीं देवा। एका जनार्दनीं सेवा दृढ देई ॥ ४ ॥

१९७१ उपासना हीच बरी। वाचे हरि हरि म्हणावें ॥ १ ॥ काय दुसऱ्याचें काम। वाचे नाम आठवितां ॥ २ ॥ चातकाचा जैसा नेम। पूर्ण काम हरि करी ॥ ३ ॥ एकविध आमुचा भाव। एका जना र्दनाचि देव ॥ ४ ॥

१९७२ पूर्वीचिया मतांतरां। सांपडला बरा आम्हां मार्ग ॥ १ ॥ नाहीं कोठें गोवागुंती। ऐसे गर्जती हरिदास ॥ २ ॥ वाचे नाम करें टाळी। साधन कलीं उत्तम हें ॥ ३ ॥ धालों कीर्तनीं प्रेमानंदें। वाचे आनंदें गाऊं गीत ॥४॥ एका जनार्दनीं धरली कास। नाहीं आस दुसरी ॥ ५ ॥

१९७३ वरपांग सोंग नको माळा मुद्री। ठाव संतपदीं देई देवा ॥ १ ॥ प्रेमभाव देई प्रेमभाव देई। मागणें दुजें नाहीं आणिक तें ॥ २ ॥ नाममुखीं सदा संतांचा सांगात। प्रेम हृदयांत विठोबाचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हा माझा निर्धार। जन्माची वेरझार तोडीं देवा ॥ ४ ॥

१९७४ पायाचें चिंतन। माझें हेंचि भजन ॥ १ ॥ भजनाचा मुख्य भाव। चित्तीं चिंतन लवलाहो ॥ २ ॥ राहो माझी मती। भजनीं ते दिनरातीं ॥ ३ ॥ हेतु दुजा मनीं। ठेऊं नका चक्रपाणी ॥ ४ ॥ मज पायांपरतें। नका ठेऊं जी निरुते ॥ ५ ॥ कृपाळुजी देवा। एका जनार्दनीं ठेवा ॥ ६ ॥

१९७५ गुंतला प्रपंचीं सोडवी गा देवा। देई तुझी सेवा जीवेंभावें ॥ १ ॥ न लगे धन मान पुत्र दारा वित्त। सदां पायीं चित्त जडोनी राहो ॥ २ ॥ वैष्णवांचा दास कामारी निःशेष। हेचि पुरवी आस दुजें नको ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करीत विनंती। मागणें श्रीपती हेंचि द्यावें ॥ ४ ॥

१९७६ जयजयाजी देवाधिदेवा। पंढरीरावा श्रीविठ्ठला ॥ १ ॥ भुक्ती मुक्ती नको कांहीं। लिगाड तेंहि मज आतां ॥ २ ॥ भाळी भोळी घ्यावी सेवा। हीचि देवा विनवणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तुमचा दास। त्याची आस पाया पैं ॥ ४ ॥

१९७७ माझें मन तेथें वसो। आणीक नसो दुजें कांहीं ॥ १ ॥ होईन हरीचा वारकरी। करीन वारी पंढरीची ॥ २ ॥ संसाराचा वीट आला। आवडला संतसंग ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। करी विनवणी येवढी ॥ ४ ॥

१९७८ हेचि माझी मनींची आस। करा दास सेवेसी ॥ १ ॥ नका कांहीं गुंतागुंती। लिगाड फजिती मज मागें ॥ २ ॥ संसार तो फलकट। दाखवा वाट पंढरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विनंती। पुढती करुणा असों द्या ॥ ४ ॥

१९७९ तुमच्या सेवेचा महिमा। मज न कळे पुरुषोत्तमा ॥ १ ॥ पूजा करणें कवणे रीती। नेणें जपमाळ हातीं ॥ २ ॥ स्नानसंध्या न कळे कांहीं। मन असो तुझे पायीं ॥ ३ ॥ तुम्हां मागणें इतुकें। एका जनार्दनीं द्यावें कौतुकें ॥ ४ ॥

१९८० शरण शरण नारायणा। आम्हां दीनां तारावें ॥ १ ॥ मागें बहु शीण पोटीं। पाडा तुटी तयाची ॥ २ ॥ संसाराचा चुकवा हेवा। मागील ठगवा गुंती ते ॥ ३ ॥ तुम्हीं कृपा केल्यावरी। मीं

निर्धारीं पात्रची ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं। तुम्ही तो धनी त्रैलोक्याचे ॥ ५ ॥

१९८१ सर्वभावें शरणागत। जाहलों निश्चित कृपाळा ॥१॥ आतां कळे तैसें करी। तुम्ही उदार श्रीहरी ॥ २ ॥ मी आलों असे शरण। कृपा करणें उचितची ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । ऋद्धिसिद्धि तुमचे चरणीं ॥ ४ ॥

१९८२ शरण आलों तुझियां पायां। कृपानिधि देवराया ॥ १ ॥ पशु उद्धरिलें गजासी। गणिका नेली वैकुंठासी ॥ २ ॥ ऐसा कृपेचा कोंवळा। भक्तां आधीन गोपाळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। हीच लाधली निजखूण ॥ ४ ॥

१९८३ अहो देवा गुणनिधाना। परिसा विज्ञापना एक माझी ॥ १ ॥ माझें मज आश्वासन। देखिल्या चरण तुमचे ॥ २ ॥ हेचि माझी करुणाकरा। भक्ति अवधारा भोळी ते ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। माझी विनवणी परिसावी ॥ ४ ॥

१९८४ तुझीया कृपेचें पोसणें मी दीन। करी तूं जतन जनार्दन ॥ १ ॥ अंकीत मी दास कायामनें-वाचा। हेलावा कृपेचा करीं देवा ॥ २ ॥ कदा नुपेक्षिसी आलिया शरण। हें मागोनि महिमान चालत आलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कृपेचा वोरस। करी जगदीश मजवरी ॥ ४ ॥

१९८५ मज तो अधिकार नाहीं। शरण आलों तुझे पायीं ॥ १ ॥ तुम्हीं पशु गजातें उद्धरिलें। गणिके तारिलें कुंटनीसी ॥ २ ॥ ऐशी शरणागत माउली। एका जनार्दनाची साउली ॥ ३ ॥

१९८६ माझे मनोरथ चरणाची आवडी। दुजियाची जोडी नको आतां ॥ १ ॥ वाउगा पसारा नका गोऊं मन। चरणापाशीं जाण स्थिर होय ॥ २ ॥ एका जनार्दनीं पुरवी वासना। दुजें नारायणा नको कांहीं ॥ ३ ॥

१९८७ भक्ति माझी भोळी। भाव एकविध बळी ॥ १ ॥ अहो परिसा नारायणा। जाणोनि अंतरींच्या खुणा ॥ २ ॥ नाहीं तुम्हां सांकडें कायी। भुक्तिमुक्ती मागणें तेंही ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। माझी विनवणी परिसावी ॥ ४ ॥

१९८८ सर्वांभूतीं तुझें रूप। हृदयीं सिद्धची स्वरुप ॥ १ ॥ इतुकें देई अधोक्षजा। नाहीं तरी घोट भरीन तुझा ॥ २ ॥ सकळांहुनी करी स्नान। सकाळिकीं समसमान ॥ ३ ॥ सदा द्यावा संतसंग। अखंड कीर्तनीं अनुराग ॥ ४ ॥ निःशेष दवडोनियां स्वार्थ। अवघा करी परमार्थ ॥ ५ ॥ एका जनार्दनीं मागे। नाहीं तरी घाला घालीन अंगे ॥ ६ ॥

१९८९ मुख्यत्वें करावी भक्ती। घडावी संतांची संगती। हेंचि मागणें तुम्हांप्रती। द्यावें निश्चिती मज देवा ॥ १ ॥ पुरवा पुरवा माझा हेत। दुजें मागणें नाहीं निश्चित ॥ धृ० ॥ आयुष्य अंतवरी नामस्मरण। गीता भागवताचें श्रवण। विष्णु शिवमूर्तींचें ध्यान। हेंचि देणें सर्वथा ॥२॥ ऐकोनि ऐसें वचन। जनार्दन तुष्टला प्रेमें करून। एका जनार्दनीं पाय धरून। सप्रेमें आलिंगिला ॥ ३ ॥

१९९० देव तुष्टला मग दे घे। तुजवांचूनि कांहीं नेघे ॥ १ ॥ देवा इतुली कृपा करी। जो मीं तुझा घोटभरी ॥ २ ॥ आणिक कांहीं मागेन जरी। तरी मज दंडावें हरी ॥ ३ ॥ वैकुंठ देई रे एका। तो तंव फोडीव फटका ॥ ४ ॥ क्षीरसागर शेषशयन। इतुकें न दे वाळवण ॥ ५ ॥ सोहं पद विसावून। देतां घेतां लाजिरवाणें ॥ ६ ॥ एका जनार्दनीं तुष्टला। सकळ सर्वांगीं घोटला ॥ ७ ॥

१९९१ तुमचें जाहलिया दरुशन। जन्ममरण फिटला पांग ॥ १ ॥ आतां धन्य जाहलों करुणाकरा। विश्वंभरा दयाळुवा ॥ २ ॥ मागें कासाविस बहु जाहलों। दरुशनें पावलों सुखातें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कृपा केली। फळासी आली सर्वस्वें ॥ ४ ॥

१९९२ भाग्यहीन बहु असती। कमळापती सांभाळणें ॥ १ ॥ गर्जे ब्रीदाचा तोडर। चराचर त्रिभुवनीं ॥ २ ॥ शरणागता वज्रपंजर। हा बडिवार त्रिजगतीं ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। कैवल्यदानीं उद्धार ॥ ४ ॥

१९९३ ज्याचा केला अंगिकार। न मानी भार त्याचा हा ॥ १ ॥ अरिमित्रां सम देणें। एकचि पेणें वैकुंठ ॥ २ ॥ उत्तम मध्यम चांडाळ। देणें स्थळ एकची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाकी कींव। उद्धरा जीव पातकी ॥ ४ ॥

१९९४ आम्हीं तो वासना भाजियेली बळें। वैराग्याचेनि बळें आथियेलें ॥ १ ॥ सांडिला वेव्हार माया लोकाचार। भरला निर्धार हृदयामाजीं ॥ २ ॥

एका जनार्दनीं खुंटली भावना। जनीं जनार्दना अभ्यासिलें ॥ ३ ॥

१९९५ माझें देई मजलागून। म्हणोनि दृढ धरिले चरण ॥ १ ॥ भक्तीचें ऋण देवा। देई माझें मज केशवा ॥ २ ॥ माझें देतां जड कायीं। अभिलाष धरीन पायीं ॥ ३ ॥ एका अभिलाषें फावला। एका जनार्दनीं उभा केला ॥ ४ ॥

१९९६ जाईल तरी जावो प्राण। परी मी न सोडी चरण ॥ १ ॥ ऐसा विश्वास्लों हरी। नाम तुमचें कंठीं धरी ॥ २ ॥ होईल तें होवो साचा। परी न सडो नाम वाचा ॥ ३ ॥ चित्त वेधलें चिंतनीं। शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१९९७ ऐके गा हृषिकेशी। जाणोनि तूं विश्वासी। निजगुह्य तुजपाशीं। ठेवणें दिधलें ॥ १ ॥ आम्हा चाळवोनि विषयासी। थितें बुडवूं पाहासी। क्रियानष्ट होसी। तूंचि येक ॥ २ ॥ आमुचें आम्हां देतां। तुज कां नये चिंता। लाजची तत्त्वतां। भक्ति घेसी ॥ ३ ॥ नेतां पंचापाशीं। भले नव्हे हृषीकेशी। मजसी समान होसी। एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१९९८ वेव्हाराच्या ठायीं। तुझें न चले कांहीं। मी तूं दोघे पाही। सरिसें तेथें ॥ १ ॥ ठेविलें बुडविसी। शेखी जाबही न देसी। ऐकोन नायकसी। गहिंसपणें ॥ २ ॥ खवळलों तरी जाण। गिळीन मीतूंपण। तेथें देवपण। उडवीन तुझें ॥ ३ ॥ जो सांगे पांचांपाशीं। त्याचें तोंड तूं धरिसी। ठकडा कैसा होसी। म्हणे एका जनार्दनीं ॥ ४ ॥

१९९९ जीहीं जाणितलें वर्मासी। त्याचें दास्य करिसी। गर्भवास सोसिसी। लांचेसाठीं ॥ १ ॥ घर कुटुंब ना अभावो। गांव ना तुज ठावो। सोलाट तूं पाहा हो। लागला जगीं ॥ २ ॥ बहुतांचें ठेवणें। बुडविलें येणें। शेखीं जीव घेणें। मागत्यासी ॥ ३ ॥ मायबापेंवीण। वाढला हा जाण। शरण एका जनार्दन। जाती गोतपणें ॥ ४ ॥

२००० होतां द्वारपाल लाज वाटे थोरी। न साहे भिकारी जाला हरी ॥ १ ॥ बळीच्या तो द्वारीं सारथी पार्थाचा। गोसावी आमुचा वेदवाणी ॥ २ ॥ गर्भ न साहाती यातायाती जना। एका जनार्दनीं शरण वेगें ॥ ३ ॥

२००१ सर्वस्व हरूनि म्हणसी बळीसी। ऱ्यां बांधिले विचारिसी कोण कोण ॥ १ ॥ द्वारीं द्वारपाळ झालासी अंकीत। सांग बुद्धिमंत ऐसा कोण ॥ २ ॥ ऐसें नाथिलेसी आपणा गोंविसी। एका जनार्दनीं बोल आम्हां कां ठेविसी ॥ ३ ॥

२००२ बळी अर्पितां देहासी। द्वारपाळ होसी तयाचा ॥ १ ॥ सांगा थोरपण आहे कोण। घेतल्यावांचून न देशी तूं ॥ २ ॥ धर्म आधीं पूजा करी। म्हणोनि घरीं राबसी तूं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा उदार। घेतां निर्धार देशी तूं ॥ ४ ॥

२००३ न लगे भुक्तिमुक्ति न लगे स्वर्गवास। नको वैकुंठवास देवराया ॥ १ ॥ न लगे योगयाग अष्टांग साधन। न चुके बंधन येणें कांहां ॥ २ ॥ न लगे इष्टमित्र सोईरे संबंधी। नको ही उपाधी पाठीं लाऊं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चुकवोनी पाल्हाळ। करीं मज मोकळ गुरुराया ॥ ४ ॥

२००४ जय गोविंदा परमानंदा ऐक माझे बोल। निर्गुणरूपें असतां तुझें कांहांच नव्हे मोल। मग तूं माया रूप धरुनी जाहलासी सबळ। नसतें देवपण अंगीं आणुनी चालविसी केवळ ॥ १ ॥ ऐसा लाघवी तूं रामा। नको चाळवूं आम्हां ॥ ध्रु० ॥ नसतां तुज मज भेद देवा लटिकें जीवपण देसी। आपुले ठायीं थोरपण आणुनी आमुची सेवा घेसी। नसती अविद्या पाठीं लावुनी संसारीं गोंविसी। नाना कर्मे केलीं म्हणोनि आम्हां कां दंडिसी ॥ २ ॥ मातें भावें भजिजे ऐसा उपदेश करिसी। आपुल्या भक्तां तारीन म्हणोनी प्रतापें बोलसी। निंदक दुर्जन अभक्त त्यांतें नरकीं तूं घालिसी। आपुल्या स्वार्थालागुनी दुसरीयाते कां पीडिसी ॥ ३ ॥ आपुली महिमा वाढो म्हणोनि आम्हां भक्त केलें। लक्ष चौऱ्यांयशी योनी देउनी संसारीं गोंविलें। भावें तूतें न भजों म्हणोनि आकस आरंभिलें। तुज मज वैर देवा ऐसें करितां नव्हे भलें ॥ ४ ॥ ऐसें तुज मज वैर म्हणोनि गुरूसी शरण गेलों। देवभक्तपण कोण्या कर्मे मग पुसों लागलों। सद्गुरु म्हणती सर्वहि मायिक निश्चयें बोलिलों। देव आणि भक्त एकचि गोष्टीसी पावलों ॥ ५ ॥ मग गुरुकृपें करून तुझें गिळीन देवपण। तुझिया नेणों भक्तावरी घालीन पाषाण। जीव शिव दोन्ही मिळोनि मग मी सुखें राहीन। तुज मज रूप ना रेखा त्यांतें निर्धारीन ॥ ६ ॥ ऐसे भक्तबोल ऐकुनी देवा थोर उपजली

चिता। विवेकबळें करूनि माझें देवपण उडवील आतां। यालागा भिणें भक्तजनासी ऐक्य करूनी तत्वतां। एका जनार्दना दरुशन द्यावें लागेल त्वरिता ॥ ७ ॥

२००५ संसारकुपीं हरि पडियलों श्रीहरि लाहुनी पैं शरीर। एक सिरी लागे कोहापक न करवे पंचभुतीक विकार। सुष्ट दुष्ट कर्में करितां हे शिणले मळमूत्र दोष जर्जर। ऐसिया जीवातें उद्धरती म्हणोनि ब्रीद साजे रघुवीर ॥१॥ यालागीं रामचंद्रा रामचंद्रा। हृदयीं धरिली नाममुद्रा ॥ धृ० ॥ आशा तृष्णा दोन्हा सोहाळ नागिणी कामक्रोध हे विकार। त्यांचिया संगती विष-यवृत्ती जाली लहरी दुःख दरिद्र। डुंगळाचे शेजे अंथूरितां घरी निकडाया असुवार। ऐसा हा संसार जाणानी दुस्तर ठाकिलें तुझें द्वार ॥ २ ॥ कौटाक रूप कपटा धरियेलें तें त्वां साचार केलें। साभि-मान्या देव गुरु चक्रवर्ती त्रिभुवनीं यश थोरलें। पांखिरु वाचिया लोभाकारणें गणिकेसी कैवल्या दिधलें। दंभ प्रपंच वोळंगता जीव तया तूं सायुज्य देशी आपुलें ॥ ३ ॥ श्रीवत्स ब्राह्मणें झालासी पामरा आतां तूंत पद मिरविसी दाता ॥। चरणस्पर्शे त्वां अहिल्या उद्धरिली विस्मयो थोर सुरनरां। जे गता देवाकये तैसीच पुतने विश्राम एक वोवरा। तुझे मुद्रांकित न भीये काळिकाळा तूं स्वामी सारंग-धरा ॥ ४ ॥ वनीं सिंहाचें भय दाखविलें अजातें बैस-विली गजस्कंधीं। परमपुरुषा तुझें नाम उच्चारितां वोळंगताती ऋद्धिसिद्धी। उपमन्या आरतें क्षिरसिंधु दिधला येवढी प्र बुद्धी। न गणितां रावणु शरणा-गतु केला लंका निरोपिली आधीं ॥ ५ ॥ नर सुर किन्नर पन्नग यक्ष आटियेले संसारें। जाणोनी शुक देव गर्भी स्थिरावला भयाभीत वोलें उत्तरें। जननी-येच्या कष्टा निष्कृती व्हावया उपदेश केला दातारें। जीवन्मुक्त शुक मुनीजना वरिष्ठ जपतांची ध्यानी दोन अक्षरें ॥ ६ ॥ ऐसा सहस्रमुखें वर्णितां नातुडसी गा देवा धांडोळितां सिद्ध पंथ। जगद्बंधु दीनानाथ समुद्धरण द्रौपदीचा वेळाइत। सुदामियाच्या दों पोह्याकारणें स्नेहें पसरिती हात। एका जनार्दनीं जवळीं बोलाउनी उच्छिष्ट प्रसाद देत ॥ ७ ॥

२००६ पायांवरी ठेवितां भाळ। गेली तळमळ सक-ळही ॥ १ ॥ बैसलें रूप डोळां आधीं। गेली उपाधी सकळ ॥ २ ॥ एका जनार्दनीं मंगल जाला। अवघा भरला हृदयीं ॥ ३ ॥

२००७ गोजिरें ठाण विठोबाचें। आवडी साचें बैसली ॥ १ ॥ आणखी न धांवे कोठें मन। समच-रण पाहतांच ॥ २ ॥ नाहीं आन दुजी वासना। आवडी चरणा बैसलीसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन। सांडोन कुर्वंडी करून ॥ ४ ॥

२००८ आलिंगनालागीं उतावेळ मन। देखेन चरण विठोबाचे ॥ १ ॥ मना समाधान मना समाधान। मना समाधान राहे मना ॥ २ ॥ देखिलिया मूर्ति सावळी सगुण। मग नाहीं बंधन मना तुज ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन आवरिलें। दृढ तें ठेविलें विठ्ठल-पायीं ॥ ४ ॥

२००९ पायीं जडलें माझें मन। चित्त जालें समा-धान ॥ १ ॥ तुमच्या नामाचा महिमा। आजी पावन केलें आम्हां ॥ २ ॥ कृपा केली तुम्ही। लाविंयेलें आपुले नामीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण कृपा। तेणें मार्ग जाला सोपा ॥ ४ ॥

२०१० कुर्वंडीन काया मन। रामचरण देखोनियां ॥१॥ ऐसा वेधी वेधक कान्हा। चित्त मना बैसलासे ॥ २ ॥ नावडे कांहां दुजें चित्तीं। श्रीविठ्ठलमूर्ति पाहातांचि ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ध्यान। सुकुमार गोजिरें ठाण ॥ ४ ॥

२०११ वेधोनि नेलें आमुचें मन। लागलें ध्यान अंतरीं ॥ १ ॥ दृष्टी धांवे पहावया। आलिंगना बाह्या उतावेळ ॥ २ ॥ चरण उतावेळ चालतां पंथ। दुजा हेत नाहीं मनासी ॥ ३ ॥ एका जनार्दना डोई पायीं। दुजा भाव नाहीं इंद्रियां ॥ ४ ॥

२०१२ येणें पांडुरंगें लावियेला चाळा। बैसलासी डोळां निवंडना ॥१॥ मनाचियें मनें घालितसे ठाण। नोहे उत्थापना कोणाकडे ॥ २ ॥ वेधकु वेधकु पंढ-रीचा राजा। एका जनार्दना शरण होय ॥ ३ ॥

२०१३ देवासी कांहीं नेसणें नसे। जेथें तेथें देव उघडाची दिसे ॥ १ ॥ देव निलाजरा देव निलाजरा। देव निलाजरा पहा तुम्ही ॥ २ ॥ न लाजे जेथें नाहीं गांव। पाढरा डुकर झाला देव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकल्या काज। भक्ती तेणेंचा नेली लाज ॥ ४ ॥

२०१४ हरीचें पाहतां श्रीमुख। सुखावलें मन नित्य नवा हर्ष ॥ १ ॥ परमप्रिय वो श्रीहरी। ध्याता ध्यान

ध्येय सर्व हरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाहतां हरी। हरीरूप दिसे चराचरीं ॥ ३ ॥

२०१५ राजीवाक्ष प्रभु रुक्मिणीरमण। मनोहर ध्यान श्रीकृष्णाचें ॥१॥ शंखचक्रगदा पीतांबरधारी। नमिला कंसारी प्रेमभावें ॥ २ ॥ मोक्ष अधिष्ठान पुण्य कीर्तिस्थान। पतीतपावन पांडुरंग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देवाधिदेव। चित्तीं वासुदेव राहो सदा ॥ ४ ॥

२०१६ आनंद अद्वय नित्य निरामय। सांवळा भासताहे मजलागीं ॥१॥ वेधु तयाचा माझीया जीवा। काया वाचा मनोभावा लागलासे ॥२॥ वेधलेंसें मन झालें उन्मन। देखतां चरण गोड वाटे ॥ ३ ॥ पाहतां पाहतां पारुषला जीव। एका जनार्दनीं देव कळो आला ॥ ४ ॥

२०१७ अष्ट धातु वेगळा देखिला पुतळा। जिवींचा जिव्हाळा श्रीविठ्ठल ॥ १ ॥ तयाचे चरणीं माझा दंडवत। घडो आणि चित्त जडो नामीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं देखिला डोळां। जावी जीवनकळा विठ्ठल देवो ॥ ३ ॥

२०१८ सर्व सुखाची उघडली खाणी। श्रीमुख नयनीं पाहतां ॥ १ ॥ मोक्षसुख आम्हां न लगे गा देवा। विश्रांतीची ठेवा आणिकाची ॥ २ ॥ धनसुख मज कासया हें पोटीं। पाहिजे लंगोटी सर्वभावें ॥३॥ स्त्रीसुख संसार काराया वेरझार। नको हा पसर मज देवा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाशिवंत सुख। पाहतां तुझें मुख इच्छा पुरती ॥ ५ ॥

२०१९ नाम घेतां रूप आठवलें सांवळें। ही खूण गोपाळें दिली मज ॥ १ ॥ येणें जन्में कृष्ण दाटोनी टाकणें। आडवस्ती येणें चुकविली ॥ २ ॥ चुकविली वस्ती एका जनार्दनें। संसार सांडणें सांडोनिया ॥३॥

२०२० तुमचें नामसंकीर्तन। हेंची माझें संध्यास्नान ॥ १ ॥ तुमच्या पायाचें वंदन। हेंचि माझें अनुष्ठान ॥२॥ तुमच्या पायाचा साक्षेप। हाचि माझा कालक्षेप ॥ ३ ॥ तुमच्या प्रेमें आली निद्रा। हीच माझी ध्यान मुद्रा ॥४॥ एका जनार्दनीं सार। ब्रह्मरूप हा संसार ॥ ५ ॥

२०२१ भुक्तिमुक्तीस कारण। हरीचें जन्मकर्म गुण ॥ १ ॥ हरिकीर्तनाची जोडी। सकळ साधनें होतीं बापुडी ॥२॥ शिळा तारिल्या सागरीं। गोवर्धन उचलिला करीं ॥ ३ ॥ निमाला गुरुपुत्र आणिल। मुखें दावाग्नी प्राशिला ॥ ४ ॥ तो सांवळा श्रीहरी। एका जनार्दनीं चरण धरी ॥ ५ ॥

२०२२ पतीतपावन नाम श्रीविठ्ठलाचें। आणीक मी साचें नेणें कांहीं ॥ १ ॥ पतीतपावन नाम वदे वाणी। विठ्ठलावांचुनी कांहीं नेणे ॥ २ ॥ पतीतपावन नामें तारिली गणिका। अजामेळ देखा सरता केला ॥ ३ ॥ पतीतपावन नाम जनीं वनीं। एका जनार्दनीं नाम वाचे ॥ ४ ॥

२०२३ आम्हांसी तो पुरे विठ्ठलची एक। वाउगाची देख दुजा न मनीं ॥ १ ॥ ध्यान धरूं विठ्ठल करूं तयाचें कीर्तन। आणिक चिंतन नाहीं दुजें ॥ २ ॥ ध्येय ध्यात ध्यान खुंटला पैं शब्द। विठ्ठल उद्बोध सुख आम्हां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल भरला। रिता ठाव उरला कोठें सांगा ॥ ४ ॥

२०२४ भीवरेचे तीरीं उभा। धन्य शोभा विठ्ठल ॥ १ ॥ विटेवरी समचरण। तेथें मन गुंतलें ॥ २ ॥ संत जाती तया ठाया। मजहि गांवा त्या न्यावें ॥ ३ ॥ उपकार करा साचा। दाखवा दीनाचा सोयरा ॥४॥ एका जनार्दनीं मायबाप। वंदूं पाय तयाचे ॥ ५ ॥

२०२५ घवघवीत वैकुंठनाथ। भक्त वत्सल शोभत ॥१॥ तयाचे पायीं माझें मन। राहो वृत्तीसह जडोन ॥२॥ नेणें आणिक दुजा छंद। वाचे आठवीन गोविंद ॥३॥ एका जनार्दनीं कटीं कर। उभा चंद्रभागे तीर ॥४॥

२०२६ सायासाचा श्रम न करूं पसारा। विठ्ठलचि बरा वाचे गातां ॥ १ ॥ गोडपणें मिठी पडलीसे जीवा। कायामनें हेवा दुजा नाहीं ॥ २ ॥ या विठ्ठलापरतें ना करी साधन। देखेन समचरण विटेवरी ॥३॥ एका जनार्दनीं विठ्ठलाची भेटी। सरलीसे तुटी गर्भवास ॥ ४॥

२०२७ मागें एक पुढें एक। दोनी मिळोनी देख ॥१॥ ऐसी होतांची मिळणी। दिलें संसारासी पाणी ॥२॥ एक एक पहातां दिठी। होय विठ्ठलेसी भेटी ॥ ३ ॥ एक सांडूनि दुजा नाहीं। एका जनार्दनीं ध्यायी ॥४॥

२०२८ आम्हां नादीं विठ्ठलु छंदीं विठ्ठलु। हृत्पद्मीं विठ्ठलु मिळतसे ॥ १ ॥ आम्हां धातु विठ्ठलु मातु विठ्ठलु। गातु विठ्ठलु आनंदें ॥ २ ॥ आम्हां राग विठ्ठलु रंग विठ्ठलु। संग विठ्ठलु वैष्णवांचा ॥ ३ ॥ आम्हां ताल विठ्ठलु मेळ विठ्ठलु। कल्लोळ विठ्ठलु कीर्तनें ॥ ४ ॥ आम्हां श्रुति विठ्ठलु श्रोता विठ्ठलु।

वदा विठ्ठल वदनीं ॥५॥ आम्हां मनीं विठ्ठल ध्यानीं विठ्ठल। एका जनार्दनीं अवघा विठ्ठल ॥ ६ ॥

२०२९ ध्येय ध्याता ध्यान विठ्ठल संपूर्ण। ज्ञेय ज्ञाता पूर्ण विठ्ठल माझा ॥ १ ॥ योगयाग तप विठ्ठल नाम जप। पुण्य आणि पाप विठ्ठल बोला ॥ २ ॥ उन्मनी समाधी विठ्ठल बोला वाणी। तारील निर्वाणी विठ्ठल माझा ॥ ३ ॥ मज भरवंसा कायामनेंवाचा। एका जनार्दनीं त्याचा शरणागत ॥ ४ ॥

२०३० एक विठ्ठल वदतां वाचे। आणिक साचें नावडती ॥ १ ॥ बैसलासे ध्यानीं मनीं। विठ्ठलावांचुनी दुजें नेणें ॥ २ ॥ जावें तिकडे विठ्ठल भरला। रिता ठाव नाहीं उरला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावें। विठ्ठल म्हणतां पाठीं धांवे ॥ ४ ॥

२०३१ गातों एका ध्यातों एका। अंतरबाही पहातों एका ॥ १ ॥ अगुणी एका सगुणी एका। गुणातीत पहातो एका ॥ २ ॥ जनीं एका वनीं एका। निरंजना देखों एका ॥ ३ ॥ संतजना पढिये एका। जनार्दना कडीये एका ॥ ४ ॥

२०३२ वाद विवाद अतिवाद। नावडे कोणाचाहि संबंध ॥१॥ बोल एक आम्हां बोलणें। वाचे विठ्ठलुची म्हणे ॥ २ ॥ आणिकाची चाड चित्तीं। नाहीं नाहीं गा त्रिजगतीं ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। विठ्ठल भरलासे व्यापुनी ॥ ४ ॥

२०३३ एक विठ्ठल चिंतन। आणिक दुजें नेघे मन। ऐसें घडतां साधन। जोडे सर्व तयासी ॥ १॥ हेचि एकविधा भक्ती। येणें जोडे सर्व मुक्ती। पर्वकाळ विश्रांती। तेथें घेती सर्वदा ॥ २ ॥ तीर्थ ओढवती माथा। वंदिताती सर्वथा। तपांच्या चळथा। घडताती आपेआप ॥ ३ ॥ घडतें यज्ञाचें पुण्य। आणिक तया नाहीं बंधन। शरण एका जनार्दन। निश्चय ऐसा जयाचा ॥ ४ ॥

२०३४ देव विठ्ठल तीर्थ विठ्ठल। अवघा विठ्ठल भरलासे ॥१॥ जन विठ्ठल वन विठ्ठल। जळीं स्थळीं विठ्ठल भरलासे ॥२॥ भाव विठ्ठल देव विठ्ठल। अवघा विठ्ठल भरलासे ॥३॥ एका जनार्दनीं मनीं विठ्ठल। जप तप ध्यान विठ्ठल ॥ ४ ॥

२०३५ एकपण पाहतां सृष्टी। भरला दृष्टी विठ्ठल ॥१॥ नाहीं द्वैताची भावना। भरला ध्याना विठ्ठल ॥ २ ॥ मीतूंपणा ओस जग। वेसला सर्व विठ्ठल ॥ ३ ॥ ध्यानीं विठ्ठल मनीं विठ्ठल। एका जनार्दनीं अवघा विठ्ठल ॥ ४ ॥

२०३६ रिता ठाव न दिसे पाहतां। भरला पुरता विठ्ठल ॥ १ ॥ जनीं वनीं विजनीं देखा। विठ्ठल सखा भरलासे ॥ २ ॥ पाहतां पाहणें सरतलें। विठ्ठलें व्यापिलें सर्वत्र ॥३॥ नाहीं पाहण्यासी ठाव। अवघा भाव विठ्ठल ॥ ४ ॥ एका जनार्दनीं व्यापक। विठ्ठल देख त्रिभुवनीं ॥ ५ ॥

२०३७ मागें पुढें विठ्ठल भरला। रिता ठाव नाहीं उरला ॥ १ ॥ जिकडे पहावें तिकडे आहे। दिशाद्रुम भरला पाहे ॥ २ ॥ एका जनार्दनीं सर्व देशीं। विठ्ठल व्यापक निश्चयेंशीं ॥ ३ ॥

२०३८ विठ्ठलावांचुनी आणिकाचें ध्यान। नाहीं आम्हां चिंतन दुजियाचें ॥ १ ॥ आमुचे कुळींचें विठ्ठल दैवत। कुळधर्म समस्त विठ्ठल देव ॥ २ ॥ विठ्ठलावांचुनी नेणों क्रियाकर्म। विठ्ठलावांचुनि धर्म दुजा नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल भरला। भरुनी उरला पंढरीये ॥४॥

२०३९ उच्चार फुकाचा नाम हें विठ्ठल। नाहीं कांहीं मोल द्रव्य वेंचे ॥१॥ जागृतीं सुषुप्तीं स्वप्नीं विठ्ठलनाम ध्यानीं। गाऊं तें कीर्तनीं दिनानिशीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं केला लागपाठ। तेणें सोपी वाट वैकुंठीची ॥ ३ ॥

२०४० रूप तेंचि नाम नाम तेंचि रूप। अवघा संकल्प एकरूप ॥ १ ॥ पहातां पहाणें हरपलें देहीं। देहचि विदेही होउनी ठेलों ॥ २ ॥ सांगतां नवल पाहतां सखोल। बोलतां अबोल चोज वाटे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोलण्या वेगळा। उभा तो सांवळा विटेवरी ॥ ४ ॥

२०४१ पाहतां पाहतां भुललें मन। धरिले चरण हृदयीं ॥ १ ॥ येथें वेधिला जीव प्राण। ब्रह्मज्ञान नावडे ॥ २ ॥ तीर्थांचें जें अधिष्ठान। पुण्यपावन चंद्रभागा ॥ ३ ॥ सकळ देवांचा देव उभा। एका जनार्दनीं गाभा लावण्याचा ॥ ४ ॥

२०४२ वाचे विठ्ठल बोलावें। मग पाऊल टाकावें ॥ १ ॥ ऐसा ज्याचा नेमधर्म। मुखीं विठ्ठलाचें नाम ॥ २ ॥ सर्वकाळ वाचे। विठ्ठलनाम वदती साचें ॥३॥ कुळधर्म आमुचा। म्हणे एका जनार्दनाचा ॥ ४ ॥

२०४३ माझ्या मना लागो छंद। नित्य गोविंद गोविंद ॥ १ ॥ तेणें देह ब्रह्मरूप। निरसेल नामरूप

॥ २ ॥ तुटेल सकळ उपाधी । निरसेल आधिव्याधी ॥ ३ ॥ गोविंद हा जनीं वनीं । म्हणे एका जनार्दनीं ॥४॥

२०४४ शब्दा आदि मध्य अंतीं । उच्चारितां व्यक्ताव्यक्ती ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल जिव्हारीं । मुक्ति होइल कामारी ॥ २ ॥ विश्वा विठ्ठल उघडा पाहे । मुक्त होतां वेळ काये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ठसा । विठ्ठल उभा नामासरिसा ॥ ४ ॥

२०४५ तंतुपट जेवि एकत्व दिसती । तैसी भगवद्भक्ति सर्वांभूतीं ॥१॥ सर्वत्रा व्यापक विठ्ठल सर्वांचा । म्हणोनि त्याच्या गांवा मन धांवे ॥ २ ॥ एका जनार्दनीं व्यापक विठ्ठल । तेथें नाहीं बोल आन दुजा ॥ ३ ॥

२०४६ लाडिके विठोबाचे आम्ही । गाऊं नित्यनेमीं नाम तुझें ॥ १ ॥ उत्तम उत्तम साधन हें नाम । गातां गीतीं प्रेम घाटे जीवीं ॥ २ ॥ न कळेचि वेदां उपनिषद्बोधा । त्या हरि गोविंदा जपों आम्ही ॥३॥ एका जनार्दनीं मंगळा मंगळ । न लगे आम्हां मोल उच्चारितां ॥ ४ ॥

२०४७ बहुत प्रकारें भक्तहि असती । देवहि भेटती तयां तैसे ॥ १ ॥ तैसा नोहे माझा पंढरीचा राव । देवाधिदेव मुकुटमणी ॥ २ ॥ एकविध तया शरण पैं जातां । मोक्ष सायुज्यता पाठीं लागे ॥ ३ ॥ ऐसा लावण्य पुतळा देखिला दृष्टी । एका जनार्दनीं सुख न समाये सृष्टीं ॥ ४ ॥

२०४८ गाऊं तरी एक विठ्ठलचि गाऊं । ध्याऊं तरी एक विठ्ठलचि ध्याऊं ॥ १ ॥ पाहूं तरी एक विठ्ठलचि पाहूं । आणिका न गोऊं वासनाही ॥ २ ॥ आठवूं तो एक विठ्ठल आठवूं । आणिक न सांठवूं हृदयामाजीं ॥ ३ ॥ विठ्ठलावांचुनी मना नाहीं आन । सर्वभावें प्रमाण विठ्ठल मज ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जडला जिव्हारा । विठ्ठल चराचरीं व्यापूनि ठेला ॥५॥

२०४९ सुखें मुख सोज्वळ पहातां दृष्टी । आनंदीं आनंदमय तेणें सृष्टी ॥ १ ॥ देखिला देखिला वैष्णवांचा राणा । देवाधिदेवो श्रीविठ्ठल ॥ २ ॥ गोपाळ गजरीं नाचती आनंदें । लीला विनोदें प्रेमरसें ॥ ३ ॥ भावाचा अंकित उगा राहे उभा । धन्य त्याची शोभा काय वानूं ॥ ४ ॥ पाहतां पाहतां मन धालें दृष्टी । जनार्दनाचा एका परमानंदें पोटा ॥ ५ ॥

२०५० परिपूर्ण उभा विटे पंढरी । गाभा । अंगींचिया प्रभा । घवघवीत बिम्ब ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग । आम्हां जोडला श्रीरंग । कीर्ति गातां निःसंग । अनुवाद तयाचा ॥ २ ॥ तें सुख सांगता कोडीं । पापें पळती बापुडीं । यमधर्म हात जोडी । नंदेचि तया गांवा ॥ ३ ॥ ऐसे एकविधभावाचे । संतचरण वंदिती साचे । एका जनार्दना त्यांचें । दर्शन दुर्लभ ॥ ४ ॥

२०५१ जगाचें जीवन मनाचें मोहन । योगियांचें ध्यान विठ्ठल माझा ॥ १ ॥ द्वैताद्वैताहूनि वेगळा । श्रीविठ्ठल कळा पौर्णिमेचा ॥ २ ॥ न कळे आगमां नेणवेचि दुर्गमा । एका जनार्दनीं आम्हां सांपडला ॥३॥

२०५२ सद्गदीत कंठ बाष्प पैं दाटत । जया भेटीलागीं हृदय फुटत ॥ १ ॥ तो देखिलावो तो देखिला । सबाह्य अभ्यंतरीं व्यापुनियां राहिला ॥ २ ॥ सबराभरीत भरुनी पंढरीये उभा । सभोंवतीं दाटी संतांची शोभा ॥ ३ ॥ ऐसा लावण्य पुतळा देखिला दृष्टी । एका जनार्दनीं सुख न समाय सृष्टीं ॥ ४ ॥

२०५३ मन माझें वेधलें मन माझें वेधलें । पहातां भले सच्चिदानंद ॥ १ ॥ आनंदीआनंद मनासी पैं झाला । देखिला सांवळा पांडुरंग ॥ २ ॥ एका जनार्दनीं उघडाचि देखिला । आनंद तो झाला मनीं माझ्या ॥ ३ ॥

२०५४ कमलदलाक्ष गे पीजीवनलक्ष । तो अलक्षा न बैसे लक्ष तो देखिलावो ॥ १ ॥ मनमृग आमुचा वेधोनि गेला । पाहातांचि डोळां श्रीकृष्ण ॥ २ ॥ सहजची आवडी पाहतां समदृष्टी । वेधोनि गेली दृष्टी पाहतां गे माय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं परात्पर शोभला । तेणें मज वेधें वेध लाविला गे माय ॥ ४ ॥

२०५५ सलीलकमलदलक्ष राजीवलोचनु । परे परता पाहतां निवे आमुचें मनु ॥ १ ॥ कान्हया परम गोजरीया । कान्हया परम गोजरीया ॥ ध्रु० ॥ तनु मन वेधलें चित्त विगुंतलें । पाहतां पाहतां मना समाधान जालें ॥२॥ ऐसा कमलगर्भीचा कदु उभा परमानदु । एका जनार्दनीं वधु मजलागे माय ॥ ३ ॥

२०५६ आजी दिवाळी दसरा । श्रीरघुनंदन आले घरा ॥ १ ॥ पायीं घालूं मिठी । आनंदें नाचूं वाळुवटीं ॥ २ ॥ पाहूं हरीचें ध्यान । तेणें मना समाधान ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । विटे उभा विठ्ठलराव ॥ ४ ॥

२०५७ आजी दिवाळी दसरा । आलों विठ्ठलाचे द्वारा ॥ १ ॥ पाहुनियां देव तीर्थ । आनंदें आनंद

लोटत ॥ २ ॥ नाठवे कांहीं आन दुजें । विठ्ठला-वांचुनी मनीं माझे ॥ ३ ॥ आशा केली तें पावली । एका जनार्दनीं धन्य झाली ॥ ४ ॥

२०५८ निळा पंढरपुरचा लावण्य पुतळा । देखिलासे डोळां विठ्ठल देव ॥ १ ॥ जीव वेधला वो वेधला वो । पाहतां पाहतां जीव वेधला वो ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाहतांचि देव । बांधिला जीव परतेना भाव ॥ ३ ॥

२०५९ इंद्रियें कुंठीत जालीं । विठु माउली पाहतां ॥१॥ वेधलें मन दुजें नेणें । विसरलें पेणें ताहानभूक ॥२॥ मदमत्सर समूळ गेला । पैसा लागला वेध त्याचा ॥३॥ काम क्रोध पळाले दुरी । आशा तृष्णा झडकरी लपाल्या ॥ ४ ॥ मन मनाधीन जालें । एका जनार्दनीं रूप देखिलें ॥ ५ ॥

२०६० दृष्टीं पाहतां विठोबासी । आनंद होय सुखराशी ॥ १ ॥ पैसा अनुभव मना । पाहें पाहें पंढरीराणा ॥ २ ॥ एका दरुशनें मुक्ती । देता रखुमाईचा पती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नमन । गोजिरें विटे समचरण ॥ ४ ॥

२०६१ भेदबुद्धी पालटली । कृपा या विठ्ठलीं केली मज ॥ १ ॥ प्रकाश जाहला देहादेहीं । वासनाप्रवाहीं वहापली ॥ २ ॥ विषयांचें तें लिगाड । जाहलें देशोधडी आपेआप ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । काया वाचा आणि मन ॥ ४ ॥

२०६२ विसर तो अवघा जाहला । या विठ्ठला पाहतां ॥ १ ॥ निवारला क्रोध काम । जाहला तम शांत तो ॥ २ ॥ इंद्रियांची होती चाली । निवांत राहिली एकरूप ॥ ३ ॥ दुजेपणाचा भेद गेला । एका ठेला जनार्दना ॥ ४ ॥

२०६३ सर्व सिद्धी मनोरथ । पंढरीनाथ पाहतां ॥१॥ दैन्य दारिद्र्य तें गेलें । सुंदर पाउलें पाहतां ॥ २ ॥ विषयाते पळ सुटला । सुंदर सांवळा पाहतां ॥३ ॥ काम क्रोध विलया गेले । श्रीमुख चांगलें न्याहाळितां ॥ ४ ॥ एका जनार्दनीं बरें जाहलें । सुंदर देखिलें समचरण ॥ ५ ॥

२०६४ देखणा जाहलों देखणा जाहलों । देखणा जाहलों विठ्ठला ॥ १ ॥ जन्ममरण निरसलें । पाहतां पाहणें हारपलें ॥ २ ॥ तुटली आशापाश बेडी । हेचि जोडी जोडली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव । धरिला ठाव न सोडीं ॥ ४ ॥

२०६५ जन्ममरणाचें तुटलें सांकडें । कैवल्य रोकडें उभें असे ॥ १ ॥ डोळियाचा डोळा उघड दाविला । संदेह फिटला उरी नुरे ॥ २ ॥ एका जनार्दनीं संशयचि नाहीं । जन्ममरण देहीं पुन्हां न ये ॥ ३ ॥

२०६६ कमळनेत्र पाहतां मन माझें भुललें । योगी ध्याती जातें रूप पंढरीये आलें ॥ १ ॥ आनंदु वो परमानंदु ध्यातां । समाधी उन्मनी वोवाळणी तत्त्वता ॥२॥ योग याग तप न लगे आचरण कांहा । सुलभ सोपारा वसे सर्वा ठायीं ॥ ३ ॥ वेदशास्त्र श्रमले पुराणें भांडती । शेषादिकां न कळे कुंठित मती ॥४॥ एका जनार्दनीं पहात आनंदे मन । तद्रूपचि झालें जनीं सर्व जनार्दन ॥ ५ ॥

२०६७ धन्य धन्य विठ्ठल देव । पाहतां निरसे भेव काळाचें ॥ १ ॥ जाउनी घाला पायीं मिठी । उदार हा जगजेठी ॥ २ ॥ दरुशनें तारी जडजीव । निवारी भेव यमाचें ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । ध्यानीं मनीं विठ्ठल ॥ ४ ॥

२०६८ नागर गोमटें रूप तें गोजिरें । उभें तें साजिरें भीमातटीं ॥ १ ॥ पहातां विश्रांती देहा होय शांती । अनुपम्य मूर्ति विठ्ठल देव ॥ २ ॥ भक्तांचीया काजा राहिलासे उभा । कैवल्याचा गाभा बालमूर्ती ॥ ३ ॥ आनंदाचा कंद उभा परमानंद । एका जनार्दनीं छंद मज त्याचा ॥ ४ ॥

२०६९ गोमटें गोजिरें पाउलें साजिरीं । धरियेलीं गोजिरीं विटेवरी ॥ १ ॥ वेध तो तयाचा मनें काया वाचा । दुजा छंद साचा नाहीं मना ॥ २ ॥ इंद्रियें धांवतां आकळती ठायीं । विठोबाचे पायीं ठवियलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेधलेंसे मन । धरुनी चरण दृढ ठेलों ॥ ४ ॥

२०७० उपासना धरुनि जीवीं । आलों गांवीं विठोबाच्या ॥ १ ॥ उभयतांच्या दरुशनें । जाहलें पारणें जीवशिवा ॥ २ ॥ कष्टलों होतों दाही दिशा । पहातां आशा निमाली ॥ ३ ॥ केला परिहार श्रम । उरला नाहीं भवभ्रम ॥ ४ ॥ जडलें सदा पायीं मन । आतां न करी साधन ॥ ५॥ जहालों जीवें भावें दास । एका जनार्दना पुरली आस ॥ ६ ॥

२०७१ पाहतां पाहतां परतलें मन । झालें समाधान चित्तीं माझे ॥ १ ॥ संतांचे संगतीं लाभ बेवहा

झाला । पंढरिये पाहिला विठ्ठल देवो ॥ २ ॥ एका जनार्दनीं मनांच बैसला । नवजे संचला दीपु जैसा ॥ ३ ॥

२०७२ न माये ध्यानीं योगिया चिंतनीं । नाचतो कीर्तनीं संतपुढ ॥ १ ॥ डोळियाची धणी फिटली पारणीं । उभा तो राजजनां पंढरीये ॥ २ ॥ एका जनार्दनां देखियला डोळा । परब्रह्म पुतळा बाईये वो ॥ ३ ॥

२०७३ इच्छा केली तें पावलों । देखतांचि धन्य जाहलों ॥ १ ॥ होतें सुकृत पदरीं । तुमचे चरण देखिले हरी ॥ २ ॥ गेलें भय आणि चिंता । कृतकृत्य जाहलों आतां ॥ ३ ॥ आजी पुरला नवस । एका जनार्दनां जाहलों दास ॥ ४ ॥

२०७४ धरिला देव आवडी मिठी । नोहे तुटी जन्मोजन्मीं ॥ १ ॥ हाचि मुख्य भाव साचा । तुटला जन्माचा विसर ॥ २ ॥ एकपणें पाहतां पोटीं । एका जनार्दनीं जाहली भेटी ॥ ३ ॥

२०७५ अवघे यारे चला जाऊं । विठ्ठल रखुमाई पाहूं ॥ १ ॥ अवघे ते भाग्याचे । नाम घेती विठ्ठलाचें ॥ २ ॥ अवघे ब्रह्मज्ञानी । शरण एका जनार्दनी ॥ ३ ॥

२०७६ अवघें साधनें साधिलें । अवघें विठ्ठलरूप झालें ॥ १ ॥ अवघें कर्म नेणती धर्म । अवघा तया परब्रह्म ॥ २ ॥ अवघी सिद्धि समाधी । अवघी तुटली आधिव्याधी ॥ ३ ॥ अवघें झालें एकरूप । एका जनार्दनां स्वरूप ॥ ४ ॥

२०७७ अवघे ते दैवाचे । विठ्ठल विठ्ठल वदती वाचे ॥ १ ॥ अवघा धंदा दुजा नाहीं । वाचे विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥ अवघा संसार करिती । वाचे विठ्ठल म्हणती ॥ ३ ॥ अवघीं कर्में घडलीं तया । अवघे विठ्ठलाचे पायां ॥ ४ ॥ अवघा एका जनार्दन । अवघा जनीं जनार्दन ॥ ५ ॥

२०७८ अवघेंची सुख तयासी जोडलें । अवघे पाउलें देखतांची ॥ १ ॥ अवघें ब्रह्मरूप नाहीं कांही चिंता । अवघाचि देखतां पांडुरंग ॥ २ ॥ अवघे ते धन्य क्षेत्रवासी दैवाचे । एका जनार्दनीं वाचे विठ्ठल वदती ॥ ३ ॥

२०७९ अवघा सुखाचा आनंद । अवघा विटेवर परमानंद ॥ १ ॥ अवघें चराचर सुख । अवघे झालिया विमुख ॥ २ ॥ अवघे डोळे भरुनी पहा । अवघें सुखें पूर्ण व्हा ॥ ३ ॥ अवघा अंतरीं आठवा । एका जनार्दनां साठवा ॥ ४ ॥

२०८० अवघे संतां एकमेळ । अवघा देव तो विठ्ठल ॥ १ ॥ अवघे प्रेमरसाचे । अवघे विठ्ठल वदती वाचे ॥ २ ॥ अवघे एकभावी । एका जनार्दनीं सोहंभावी ॥ ३ ॥

२०८१ सदा सुरवर सुख तें इच्छिती । ऐसा लक्ष्मीपती कां रे न भजा ॥ १ ॥ सोइरा धाइरा आन दुजा नाहीं । गुरु पिता पाहीं हाचि बंधु ॥ २ ॥ राजजन सांगातो आन नाहीं आम्हां । एका जनार्दनीं प्रेमा वसे देहीं ॥ ३ ॥

२०८२ एक मागें एक पुढें । उभे गोकुळे असती ॥ १ ॥ चला जाऊं तया ठाया । पाहूं सखया आवडी ॥ २ ॥ एक एकाचें करूनि मीस । रहिवासले सावकाश ॥ ३ ॥ बहु युगें जाहलीं पाहतां । खालीं न बैसती उभयतां ॥ ४ ॥ आनंदीं आनंद मना होय । एका जनार्दनां पाहुनी धाय ॥ ५ ॥

२०८३ योगी ध्याती जया चिंतिती मानसीं । तो हृषिकेशी पंढरीये ॥ १ ॥ जाऊं लवलाहे पाहूं पैं चरण । क्षेमालिंगन देऊं सुखें ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाहतां रूपडें । ब्रह्म फाडोवाडें विटेवरी ॥ ३ ॥

२०८४ नीळवर्ण घनश्याम । आत्माराम विटेवरी ॥ १ ॥ चला जाऊं तयां गांवां । उगवूं गोंवा तांतडी ॥ २ ॥ भेटलिया मनोरथ । पुरती अर्थ मनाचे ॥ ३ ॥ साधे साधन फुकटची । एका जनार्दनीं भाक साची ॥ ४ ॥

२०८५ पहा पहा विठ्ठलमुख । हरे जन्ममरण दुःख ॥ १ ॥ पहातां राउळाची ध्वजा । पूर्वज उद्धरती सहजा ॥ २ ॥ कळस देखतां नयनीं । होय पातकांची धुणी ॥ ३ ॥ करितां चंद्रभागा स्नान । कोटि तीर्थांचें मार्जन ॥ ४ ॥ पुंडलिका घेती भेटी । तयां वास तो वैकुंठी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं प्रदक्षिणा । पार नाहीं त्यांच्या पुण्या ॥ ६ ॥

२०८६ भक्त देव एके ठायीं ते आवडी । घेऊनियां गुढी जाऊं तेथें ॥ १ ॥ पाहूं चरणकमळ वोवाळूं श्रीमुख । होईल तेणें सुख चौदेहांसी ॥ २ ॥ संतांचे ते भार गाती नाचती । आनंदे डुल्लती विठ्ठल वाचे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आनंदसोहळा । पाहोनि आलों डोळा डोळीयाचा ॥ ४ ॥

२०८७ योगयाग तप जयालागीं करणें । तें उभें केणें पंढरीसी ॥ १ ॥ कउलाची पेठ पंढरीचा हाट । मिळाले घनदाट वारकरी ॥ २ ॥ पताकांचे भार गर्जती हरिदास । होउनी उदास सर्वभावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं कामक्रोध । अवघा गोविंद हृदयीं त्यांचे ॥ ४ ॥

२०८८ पुढें गेले हरीचे दास । त्यांची आस आम्हांसी ॥ १ ॥ त्याचि मार्गीं आम्ही जाऊं । वाचे गाऊं विठ्ठला ॥ २ ॥ संसाराचा न करूं धंदा । हरुषें सदा नाम गाऊं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं डोळे । पहाती पाउले कोंवळें ॥ ४ ॥

२०८९ योग्याचें ध्यान बैसलेंसे मौन । तो हा निधान विटेवरी ॥ १ ॥ विठ्ठल सांवळा पाहूं चला डोळां । धरुनी बाळलीला कटीं कर ॥ २ ॥ संतांचा समुदाव आरत्यांची दाटी । नामघोष सृष्टीं न समाय ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी आनंदसोहळा । येती नरनारी बाळा पहावया ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पुरला मनोरथ । विठ्ठल पहातां चित्त गुंतलेंसे ॥ ५ ॥

२०९० न लगे कांहीं यासी मोल । वेंचिता बोल फुकाचे ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वदा वाचे । नोहे आणिकांचे कारण ॥ २ ॥ नाचा प्रेमें वाळुवंटीं । घाला मिठी संतांसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उभा । विठ्ठल शोभा अनुपम्य ॥ ४ ॥

२०९१ अवघे रंगले रंगीं । अवघे त्या पांडुरंगीं ॥ १ ॥ अवघा दुजा भाव नाहीं । अवघे विठ्ठलची पाहीं ॥ २ ॥ अवघे आनंदें नाचती । अवघे रंगीं त्या गाती ॥ ३ ॥ अवघे भाळे भोळे । अवघे प्रेमाचे आगळे ॥ ४ ॥ अवघा जनार्दन । एका जनार्दनीं भजन ॥ ५ ॥

२०९२ नाचेन आनंदें विठ्ठलनाम छंदें । परते भेदाभेद सांडोनियां ॥१॥ जाईन पंढरी नाचेन महाद्वारीं । वाचे हरि हरि रामकृष्ण ॥ २ ॥ साधन आणीक नेणें मी सर्वथा । एका पंढरीनाथावांचुनी कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दृढ हा निश्चय । मुखीं नाम गाय सदोदित ॥ ४ ॥

२०९३ प्रेमळ प्रेमळ अंतरीं प्रेमळ । नाहीं काळवेळ तयालागीं ॥ १ ॥ प्रेमभावें गाय विठ्ठलाचि ध्याय । मग सुखा उणें काय संसारिया ॥ २ ॥ जनार्दनाचा एका रंगला चरणीं । निजरंगीं रंगोनि मिळोनि गेला ॥ ३ ॥

२०९४ त्रिभुवना परती पंढरिये पेठ । उभा तो वैकुंठ विटेवरी ॥ १ ॥ पहा चला जाऊं पंढरीये । नवस पुरती सये अंतरीचे ॥ २ ॥ उभा विटेवरी घेऊनी बुंथी । शंख चक्र गदा पद्म हातीं शोभती ॥३॥ राही रुक्मिणी उभ्या दोहों दोबाहीं । चामरें मयूरपिच्छ ढाळिती ठायीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पहातां रूप । पाहतां पाहतां जालें मन तद्रूप ॥ ५ ॥

२०९५ परलोकींचा सखा उभा विटेवरी । भक्त साहाकारी पांडुरंग ॥ १ ॥ चंद्रभागे तटीं शोभे वाळुवंटीं । दाखिलासे दृष्टी पांडुरंग ॥ २ ॥ एका जनार्दनीं भेटतां तयासी । ऋद्धिसिद्धी दासी होती मग ॥ ३ ॥

२०९६ गोमटें नागर कटीं धरूनि कर । उभा तो सुकुमार वैकुंठींचा ॥ १ ॥ रूपाचें रूपस पाहतां सावकाश । धणी धाय मनास तया पाहतां ॥ २ ॥ नाठवे कल्पना मनाचिया मना । बुद्धी ते चरणा विनटली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं इंद्रियांची चाली । सर्व हारपली पंढरी पाहतां ॥ ४ ॥

२०९७ उपवास पारणें न लगे समाधी । वांयाचि उपाधी कोण धरी ॥ १ ॥ आम्हां विष्णुदासां कळलेंसे वर्म । मुखीं गावें नाम हातीं टाळी ॥ २ ॥ आनंदें वागडे जाती पंढरीसी । पहाती विठोबासी दृष्टीभरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मनाचें उन्मन । एका दरुशनें मुक्तिपद ॥ ४ ॥

२०९८ देव विसरला देवपणासी । देखोनि भक्तांसी भुलला ॥ १ ॥ नावडेचि वैकुंठ धाम । तो निष्काम कीर्तनीं नाचतो ॥ २ ॥ नावडे शेषशायी आसन । उभा जघन धरूनि विटे ॥ ३ ॥ ऐसा प्रेमाचा भुकेला । एका जनार्दनीं धाला ॥ ४ ॥

२०९९ जघन प्रमाण दावीत श्रीअनंत । या रे या रे म्हणत भेटावया ॥ १ ॥ आवडीची धणी घ्या रे प्रेमभावें । संतचरणां द्यावें आलिंगन ॥२॥ कट धरूनि करीं समचि पाऊलीं । उभा वनमाळी भक्तांसाठीं ॥ ३ ॥ जीवींचें जीवन मनाचें मोहन । सगुण हें ध्यान भक्तकाजा ॥ ४ ॥ रूपाचें रूपस निर्गुणावेगळें । पहातां तो संतमेळे उभा असे ॥ ५ ॥ विटे नीट उभा आनंदाचा कंद । पाहतां परमानंद सुख वाटे ॥ ६ ॥ एका जनार्दनीं भक्तांचिया काजा । उभारूनि भुजा वाट पाहे ॥७॥

२१०० नेणतियासी नेणता तो सान । जाणतिया जाणपण धरूनि ठेला ॥ १ ॥ योगियांचे मांदुस सज्ज-

नांचे स्थळ । श्रम तो केवळ पाहतां जाय ॥ २ ॥ जाणते नेणते येती बरवेपरी । दरुशनें उद्धरी जड जीव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सगुण निर्गुण । जाणता नेणता सर्व आपणचि जाण ॥ ४ ॥

२१०१ सांवळें कोवळें ढवळें ना पिवळें । रंग रंगावेगळें पंढरी गे माये ॥ १ ॥ चांदिणें जैसें शोभतें नभीं । तैसा कट धरूनि नभीं चंद्र गे माये ॥ २ ॥ विटेवरी नीट जघना कर । उभा दुजे परात्पर गे माये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पहातां तयासी । मन चकोर तृप्त झाले गे माये ॥ ४ ॥

२१०२ सर्वां घटीं बिंबोनि ठेला । तो हा आला पंढरीये ॥ १ ॥ सर्वांघटा ज्याची वस्ती । ते ही मूर्ति विटेवरी ॥ २ ॥ सर्वां ठायीं भरूनि उरे । पंढरिये पुरे माझारी ॥ ३ ॥ जनार्दनाचा एका म्हणे । धन्य पणें पंढरी ॥ ४ ॥

२१०३ त्रिपुटीविरहित कर कटीं उभा । त्रैलोक्याची शोभा शोभे गे माये ॥ १ ॥ परे परता वैखरीये आरुता । पश्यंती निर्धारितां न कळे गे माये ॥ २ ॥ मध्यमा मध्यमा उभा तो स्वयंभ । अद्वयानंद कोंभ कर्दळीचा गे माये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आहे तैसा भला । हृदयीं सामावला माझ्या गे माये ॥ ४ ॥

२१०४ जिकडे जावें तिकडे देवाचे सांगातें । ऐसें केलें नाथें पंढरीच्या ॥ १ ॥ शब्द तथें झाला समूळचि वाव । गेला देहभाव हारपोनी ॥ २ ॥ अंतरीं बाहेरा एकमय जाहलें । अवघें कोंदाटलें परब्रह्म ॥३॥ एका जनार्दनीं ऐसी जाहली वृत्ती । वृत्तीची निवृत्ति चिदानंदीं ॥४॥

२१०५ व्यापक तें नाम अनंत ब्रह्मांडीं । मना सोस सांडी कल्पनेचा ॥ १ ॥ कल्पनाविरहित नाम तूंचि गायें । सर्व सुख पाहें विठ्ठलपायीं ॥ २ ॥ ठसावेल मूर्ति पाहतां अनुभव । पांचांचा मग ठाव कैचा तेथें ॥३॥ एका जनार्दनीं संपूर्ण अघवा । भीमातीरीं थडवा उभा असे ॥ ४ ॥

२१०६ सर्व इंद्रियांचें पुरलें कोड । नाम वाड ऐकतां ॥ १ ॥ हरुषें नाचतां वाळुवंटीं । गेलीं करावटीं पळुनी ॥ २ ॥ पंचभूतें स्थिर झालीं । जीवाशिवा एक चाली ॥ ३ ॥ एका जनार्दनां मंगळ झाला । अवघा भेटला श्रीविठ्ठल ॥ ४ ॥

२१०७ तुमचे पायीं ठेवितां भाळ । पावलों सकळ अंतरायें ॥ १ ॥ आतां पुरली वासना । आठवितां तुमचे गुणा ॥ २ ॥ जन्मा वें सार्थक । पाहतां तुमचें श्रीमुख ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । धन्य नाम तुमचें वदनीं ॥ ४ ॥

२१०८ मार्ग सोपा पंढरीचा । सांपडला साचा उत्तम ॥ १ ॥ नाहीं पुसायाचें काम । वाचे नाम मुखीं गाऊं ॥ २ ॥ नाहीं कोठें आडकाठी । साधनकपाटीं पंचाग्न ॥ ३ ॥ न लगे योग याग तप । वाचे जप विठ्ठल ॥ ४ ॥ त्रिअक्षराचें काम । एका निष्काम जनार्दनीं ॥ ५ ॥

२१०९ आलिंगोनि देवभक्त । सरते एकरूपीं होत ॥ १ ॥ तें हें पहा पंढरपूर । देव भक्त तीर्थ माहेर ॥ २ ॥ आलियासी दान । नामामृताचें पान ॥ ३ ॥ जैसा ज्याचा हेत । पुरवितसे रुक्मिणीकांत ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । दावा पंढरी पावन ॥ ५ ॥

२११० येथोनि आनंदु रे । कृपासागर तो गोविंदु रे ॥ १ ॥ महाराजाचे राउळीं । वाजे ब्रह्मानंदा टाळी ॥ २ ॥ आनंदले भक्त जन । म्हणे धन्य रघुनंदन ॥ ३ ॥ लक्ष्मी चतुर्भुज जाली । प्रसाद घेउनी बाहेर आली ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम । पाहतां निवे आत्माराम ॥ ५ ॥

२१११ भक्तीच्या पोटा मुक्ति पैं आली । भक्तीनें मुक्तीतें वाढविली ॥ १ ॥ भक्ति ते माता मुक्ति ते दुहिता । जाणोनि तत्त्वतां भजन करी ॥ २ ॥ भक्ती सोडोनि मुक्ति वांछिती वेडी । गूळ सोडोनि कैसी जे गोडी ॥ ३ ॥ संतोषोनि भक्ति ज्यासी दे मुक्ति । ताचि लाभे येर व्यर्थ कां शिणतो ॥ ४ ॥ एका जनार्दनीं एक भाव खरा । भक्ति मुक्ति सादूनि आलिया घरा ॥ ५ ॥

२११२ भक्ति असो मुक्ति घाला रे बाहेरी । बहुतां चाळविलें चाळायाची थोरी ॥ १ ॥ भक्ति ते राहो मुक्ति ते जावो । मुक्तांमाजी भावो नाहीं नाहीं ॥२॥ मुक्ति चाळा लाऊनि शेखीं घोरांडी । तेणें ऐसें किती केले पाषांडी ॥३॥ मुक्तीचेनी योगें नामदेव शुक । त्यां नाहीं विकल्प मानिताती लोक ॥ ४ ॥ नाम संकीर्तन भुक्तिमुक्तीसी धाक । संवादें दोघेही राहो माझी भाक ॥ ५ ॥ उपजोनियां पोटा भक्ति ते ग्रासी । मातृहत्यारी मुक्ति कवण पोसी ॥६॥ एका

जनार्दनीं सेवितां चरणगज। मुक्ति सेवा करी सांडोनियां लाज ॥ ७ ॥

२११३ भक्तिप्रेमाविण ज्ञान नको देवा। अभिमान नित्य नवा तयामाजीं ॥ १ ॥ प्रेम सुख देई प्रेम सुख देई। प्रेमेंविण नाहीं समाधान ॥ २ ॥ रांडवेनें जेविं शृंगारु केला। प्रेमेंविण जाला ज्ञानी तैसा ॥३॥ एका जनार्दनीं प्रेम अति गोड। अनुभवी सुरवाड जाणतील ॥ ४ ॥

२११४ तुझिया चरणीं अनुपम्य सुख। हें तों अलोलिक रमा जाणे ॥१॥ जाणती ते भक्त प्रेमळ सज्जन। अभाविक दुर्जन तयां न कळे ॥ २ ॥ भक्तियुक्त ज्ञान तेथें घडे भजन। वांया मग शीण जाणिवेचा ॥ ३॥ एका जनार्दनीं वाउगे ते बोल। भक्तीविण फोल नावडती ॥४॥

२११५ नवल दावियलें सोंग। अवघा एक पांडुरंग ॥ १ ॥ हें तों आलें अनुभवा। विठ्ठल देवा पाहतांची ॥ २ ॥ मन पवनांची धारणा। तुटली वासना विषयाची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं परिपूर्ण। एका एकपण देखतां ॥ ४ ॥

२११६ सोळा सहस्र गोपी भोगुनी ब्रह्मचारी। ऐशी अगाध कीर्ति तुमची श्रीहरी ॥ १ ॥ दीन आम्ही रंक वंदितों चरणा। सांभाळीं दीनालागीं मानमोसहना ॥२॥ एका जनार्दनीं धन्य धन्य लाघव। एकरूपें असोनि दिसों नेदी कैसें वैभव ॥ ३ ॥

२११७ अकळ अनुपम्य तुझी लीला। न कळे अकळा सर्वांसी ॥ १ ॥ वेदशास्त्रां न कळे पार। षट्निर्विकार दर्शनें ॥ २ ॥ जों जों धरूं जावा संग। तों तों विरंग उपाधी ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। रंकाहुनी मी रंक ॥ ४ ॥

२११८ ऐक्य तें जालीया मीतूंपण नाहीं। गौरव हा कांहीं नाहीं नामीं ॥ १ ॥ नाहीं चतुर्दल तूर्याहि उन्मनी। स्वयंभ ती खाणी उभी असे ॥ २ ॥ चित्त जडालिया तेथें काय उणें। लज्जीत साधनें होती देखा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं मीतूंपण। व्यापक तें जाण सर्वांठायीं ॥ ४ ॥

२११९ खंडन मुंडन दंडन करुनि ध्याती रूप। तें आम्हां सोपें झालें वर्णितां चिद्रूप ॥ १ ॥ तो देखिला वो देखिला वो। पहातां पहाणें विसरून गेलें ठक पडलें सकळां वो ॥२॥ नेति नेति शब्द भुलल्या वेडावल्या श्रुती। आगमनिगमां न कळे चोज चिंत्तीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सकळ ब्रह्म शोभा। अनुपम्य उभा कर्दळीचा गाभा ॥ ४ ॥

२१२० कळा ते कुसरी नव्हे हें शाब्दिक। अणुरेणु एक भरुनी उरला ॥ १ ॥ तोचि डोळेभरी पहा श्रीहरी। परे परता दुरी ठसावला ॥ २ ॥ एका जनार्दनीं शब्दावेगळा असे। तो उभा दिसे कीर्तनरंगीं ॥ ३ ॥

२१२१ पाहतां पाहतां वेचलेंसे मन। तेणें समाधान जीव शिवां ॥ १ ॥ जीवाचें जीवन मनाचें मोहन। वाचेसी मौन्य सदा पडे ॥ २ ॥ परादिकां उपावा न कळेचि अंत। सर्व गुणातीत भेदरहित ॥ ३ ॥ एका जनार्दनीं त्रिगुणापरता। ओतप्रोत सर्वथा भरलासे ॥४॥

२१२२ जय विश्वव्यापका विश्वमूर्ति वंदन। वर्णितां थकले सहा अठराजण। मुनिजन धुंडिती साधिती साधन। नव्हे दरुशन तयांसी ॥ १ ॥ तो तूं लाघव सूत्रधारी। करिसी गोकुळामाजी चोरी। धरितां न सांपडसी निर्धारी। आगमनिगमां सरी न पवेची ॥ २ ॥ न कळे न कळे कवणा महिमान। शेषादिक श्रमले जाहले आसन्न। शरण एका जनार्दन। काया वाचा मन दृढेंसी ॥ ३ ॥

२१२३ व्यापक हा जनार्दन। जगची भरला संपूर्ण ॥ १ ॥ मागें पुढें आहे उभा। काय वानूं त्याची शोभा ॥ २ ॥ भरुनी उरला। सर्वांठायीं तो संचला ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। व्यापक तो जनीं वनीं ॥ ४ ॥

२१२४ काय वानूं हरीचा महिमा। आगमांनिगमां अतर्क्य ॥ १ ॥ वेदशास्त्रें शिणोनि ठेलीं। पुराणें निवांत राहिलीं ॥ २ ॥ दरुशनें तटस्थ होऊन। धरुनी ठेलीं तीं मौन ॥ ३ ॥ श्रुती अनुवादा जो नये। त्यासी एका जनार्दनीं ध्याये ॥ ४ ॥

२१२५ दीपकळिकेमाजीं कळा। तैसा परब्रह्म पुतळा ॥ १ ॥ असोनियां नसे जगीं। जैसा प्राणवायु संगीं ॥ २ ॥ करवी खेळवी नाना खेळां। परी आपण अलिप्त सकळां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सूत्रधारी। खेळ खेळोनी अलिप्त निर्धारी ॥ ४ ॥

२१२६ आमुची तो येवढी आस। होऊं दास हरीचे ॥ १ ॥ मना मागें न जाऊं देखा। सांपडला

शिक्का उत्तम ॥ २ ॥ त्रैलोक्याचा धनी देव । आम्हां भेव नाहीं कोठें ॥ ३ ॥ जाहलो बळिये शिरोमणी । एका चरणीं जनार्दनाचे ॥ ४ ॥

२१२७ कोणाचें आमचें काय काज । पंढरीराज कैवारी ॥ १ ॥ उभा राहे मागें पुढें । निवारी सांकडें भक्तांचें ॥ २ ॥ आघात घात निवारी । पीतांबरी करी छाया ॥ ३ ॥ ऐसा अनुभव मज यावा । धांवे राया पंढरीच्या ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भाव । धरिलिया धांवे देव ॥ ५ ॥

२१२८ लेकुरें खेळती वो सायें । मायबाप प्रेमें नाचे ॥ १ ॥ तैसा हेत पांडुरंगीं । धरितां उणें काय जगीं ॥ २ ॥ जैसा जैसा छंद त्यावा । पुरवणें लागे साचा ॥ ३ ॥ एका जनार्दनाचा बाळ । कौतुकें खेळतसे खेळ ॥ ४ ॥

२१२९ टाळ मृदंग मोहरी । नौबद वाजे नानापरी ॥ १ ॥ घण घणाणा घंटा वाजे । घण घणाणा घंटा वाजे ॥ २ ॥ उपासना याचे पायीं । अवघा माझा पिठावाई ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । अवघा माझा पंढरीराव ॥ ४ ॥

२१३० व्यापक जनार्दन व्यापूनि राहिला । अखंड भरला हृदयपुटीं ॥ १ ॥ पाहतां पाहणें परत गेलें वो । अवघा चराचरीं जनार्दन ॥ २ ॥ व्यापक व्यापला अक्षयां संचला । भरूनी उरला जळीं स्थळीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रिता नाहीं ठाव । अवघा देहीं देव जनार्दन ॥ ४ ॥

२१३१ भोळ्या भाविकांसी देव । अवघा एक विठ्ठल ॥ १ ॥ दुजा नाहीं आन कोण्ही । पाहतां तिहीं त्रिभुवनीं ॥ २ ॥ जन्ममरणाचें सांकडें । नाहीं कोडें मुक्तीचें ॥ ३ ॥ मोक्ष तो उभा जोडोनी हात । एका जनार्दनीं तिष्ठत ॥ ४ ॥

२१३२ एकपणें असे सर्वां ठायीं वसे । योगी ज्या ध्यातसे हृदयकमळा ॥ १ ॥ तें रूप साजिरें पाहतां गोजिरें । मन तेथें मुरे पाहतां पाहतां ॥ २ ॥ खुंटली भावना तुटली वासना । साधनें तीं नाना हारपली ॥ ३ ॥ संकल्प विकल्प मुळींच उडाला । एका जनार्दनीं धाला एकपणें ॥ ४ ॥

## श्रीविठ्ठलभावभक्तिमाहात्म्य.

२१३३ भक्ताचिया काजा । उभा पंढरीचा राजा ॥ १ ॥ घेऊनिया परिवार । उभा तिष्ठे निरंतर ॥ २ ॥ शोभे गोपाळांची मांदी । रुक्मिणी सत्यभामा आदी ॥ ३ ॥ शोभे पुढें भीवरा नीर । भक्त करती जयजयकार ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ध्यान । चिमणें रूप गोजिरें ठाण ॥ ५ ॥

२१३४ देव भुलला भावासी । सांडोनियां वैकुंठासी ॥ १ ॥ उघडा आला पंढरपुरा । तो परात्पर सोइरा ॥ २ ॥ पाहूनियां पुंडलिका । भुलला तयाच्या कौतुका ॥ ३ ॥ उभा राहिला विटेवरी । एका जनार्दनीं हरी ॥ ४ ॥

२१३५ भावाचेनि भक्ती थोर । भावें तुटे वेरझार ॥ १ ॥ भावें अंकित देव भक्ताचा । वेदशास्त्र बोल वाचा ॥ २ ॥ भावें गुरुशिष्य दोन्ही । भावयुक्त सर्व गुणी ॥ ३ ॥ भावें जाल भक्तिपंथ । भावें पुरे मनोरथ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भाव । भावें दिसे देहीं देव ॥ ५ ॥

२१३६ भावाचिये बळें होऊनि लहान । आपुलें थोरपण विसरला ॥ १ ॥ न म्हणे यातिकुळ ते सुशीळ । उत्तम चांडाळ हो कां कोण्ही ॥ २ ॥ अट्टाहास्यें करितां नामाचा उच्चार । उतरी पैल पार भवनदीचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्तांची आवडी । घालीतसे उडी वैकुंठाहुनी ॥ ४ ॥

२१३७ जीवभाव जेणें अर्पियेला देवा । तयाची ते सेवा देव करी ॥ १ ॥ न म्हणे नीच अथवा उंचपण । भावासी कारण मुख्य देवा ॥ २ ॥ देव भावासाठीं लागे पाठोपाठीं । एका जनार्दनीं भेटी देतो देव ॥ ३ ॥

२१३८ चरणामृत देव स्वादला । वटपत्रीं तो बाळ जाला ॥ १ ॥ अभिनव भक्ति नेली गोडी । चुरचुरा पावो चोखी आवडी ॥ २ ॥ भक्तिरसाची लागली गोडी । तोंडीचा अंगुष्ठ बाहेर न काढी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांगतो भावो । आपुली गोडी आपण घ्यावो ॥ ४ ॥

२१३९ एका भावासाठीं । देव धांवे उठाउठी ॥ १ ॥ पोहे सुदामदेवाचे । भक्षी आवडीनें साचे ॥ २ ॥ खाऊनियां भाजी पान । दिधलें भोजन ऋषींसी ॥ ३ ॥ आवडीनें कण्या खाय । प्रेम न समाय अंतरीं ॥ ४ ॥ गौळियांचें उच्छिष्ट खाये । एका जनार्दनीं धाये ॥ ५ ॥

२१४० प्रेमें भक्ताची आवडी । म्हणोनियां धुतो घोडीं ॥ १ ॥ ऐसा प्रेमाचा भुकेला । सेवक झाला बळाद्वारीं ॥ २ ॥ उच्छिष्ट फळें भिल्लणीचीं । खाये साचां आवडीनें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उदार । तो हा सर्वेश्वर विटेवरी ॥ ४ ॥

२१४१ राम भावाचा भुकेला । सांडोनी दुर्योधन सदनाला ॥ १ ॥ विदुर गृहाप्रति गेला । विश्रांति तेथें पावला ॥ २ ॥ शबरीचीं फळें भक्षी । द्रौपदीघरीं शयन साक्षी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निश्चय ऐसा । देव भक्ताधीन सहसा ॥ ४ ॥

२१४२ जें वेदांसी नातुडे श्रुतींसी सांकडें । तें उभें धाडेंकोडें पंढरीये ॥ १ ॥ न मायें चराचरीं योगियांच्या ध्याना । तया म्हणती कान्हा नंदाचा जो ॥ २ ॥ आगम निगम लाजोनी राहिले । तया बांधिती वहिलें उखळासी ॥ ३ ॥ काळाचा जो काळ भक्ता प्रतिपाळ । तया भेडविती बागुल आला म्हणोनि ॥ ४ ॥ बारा चौदा सोळा अठरा विवादतो । तो गायी राखी प्रीतीं गोकुळांत ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भक्तीचा भुकाळु । खाय तुळशीदळु भाविकांचें ॥ ६ ॥

२१४३ स्वामीसी तो पुरे एक भाव गांठा । वाउगा श्रम नेहटीं वांया जाय ॥ १ ॥ भावासाठीं देव अंकित अंकिला । राहिला उगला बळीचे द्वारीं ॥ २ ॥ अर्जुनाचे रथीं सारथी होउनी । राहे मोकळा भावासाठीं ॥ ३ ॥ विदुराचे घरीं आवडीनें भक्षी । कण्या सांडोनी खातो देव ॥ ४ ॥ पोहे सुदाम्याचे खाउनी तुष्टला । एका जनार्दनीं दिला सुवर्णगांव ॥ ५ ॥

२१४४ भावें घातली कास देव झाला दास । सोशी गर्भवास भाविकांचे ॥ १ ॥ भावचि कारण भावचि कारण । यापरतें साधन आणिक नाहीं ॥ २ ॥ भावाचेनि बळें जीवपणें वोवळें । मन हें सोवळें ब्रह्म साम्य ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावाचि कारण । सच्चिदानंदावरी खूण दाविली ते ॥ ४ ॥

२१४५ भाव भजनातें निपजवी । भक्त देवातें उपजवी ॥ १ ॥ आतां भजनीं देव केला । भक्त वडिल देव धाकुला ॥ २ ॥ देवा करणें हा संकल्प । भक्त देवाचाहि बाप ॥ ३ ॥ भक्ता कळवळा देवाचा । देव झाला त्या भक्ताचा ॥ ४ ॥ देव भक्ताचे पोटीं । झाला म्हणोनी आवड मोठी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं नवलाव । कैसा भक्तावि झाला देव ॥ ६ ॥

२१४६ एका भावें कार्यसिद्धी । एका भावें तुटे उपाधी । एका भावें आधिव्याधी । जन्मजरा पाश तुटे ॥ १ ॥ एकाभावें करी भजन । एकाभावें संतसेवन । एकाभावें वेदवचन । पाळितां तुटे भवपीडा ॥ २ ॥ एकाभावें योगयाग । एकाभावें तप अष्टांग । एकाभावें द्वैत तें सांग । तेथें द्वैत नको बापा ॥ ३ ॥ एकाभावें रिघे शरण । एकाभावें एका जनार्दन । एकाभावें धरा चरण । कायावाचामनेंसी ॥ ४ ॥

२१४७ योगी सिणले कपाटीं । हटयोग साधिती आटी ॥ १ ॥ परी तयांसी दुर्लभ । तो गोकुळीं जाहला सुलभ ॥ २ ॥ यज्ञादिका अवदाना नये । तो गोपाळांचें उच्छिष्ट खाये ॥ ३ ॥ सदा ध्याती जपी तपी ज्यासी । तो नाचे कीर्तनीं उल्हासी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं प्रेमळ । भोळ्या भाविकां निर्मळ ॥ ५ ॥

२१४८ असोनी सबराभरी बाह्य आणि अंतरीं । संपुष्टामाझारीं म्हणती देव ॥ १ ॥ कल्पनेचा देव ऐसा जया भाव । तो न करी निर्वाहो आम्हांलागीं ॥ २ ॥ सुक्षेत्रा पुण्य अनु क्षेत्रां पाप । न चले हा संताप कल्पनेचा ॥ ३ ॥ काशी हा पंढरी तीर्थयात्रा करी । सर्वत्र नरहरी तोचि भाव ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सर्व सिद्धि असे । नाथिलेंचि पिसें मतवाद्या ॥ ५ ॥

२१४९ जो जया चित्तीं भाव । तैसा तैसा होय देव । येथें संदेहो । धरणें न लगे ॥ १ ॥ द्रौपदी स्मरतां माधव । धांव घेतली लवलाहे । जया जैसा भाव । तैसा देव होतसे ॥ २ ॥ अशोक वनीं सीता । शुद्धि जातां हनुमंता । भावेंचि तत्त्वतां । कार्यसिद्धी ॥ ३ ॥ समरांगणीं तो अर्जुन । मोहिलासे गोत्र देखोन । तेथेंचि जनार्दन । भावें गीता सांगे ॥ ४ ॥ ऐसा भावाचा लंपट । सांडोनि आलासे वैकुंठ । एका जनार्दनीं नीट । विटे उभा राहिला ॥ ५ ॥

२१५० जैसा जैसा जया भाव । तैसा पावे देव ॥ १ ॥ हा देव अनुभव पहा । देहा पहा विदेही ॥ २ ॥ शुद्ध करावें तें मन । जगीं पहा जनार्दन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । देहीं वसतसे देव ॥ ४ ॥

२१५१ देवासी तो पुरे एक भाव । नेणे वैभव दासाचें ॥ १ ॥ जया चित्ता जी वासना । तैशी कामना पुरवणें ॥ २ ॥ नाहीं पडत गोवागुंती । आपणचि हातीं करितुसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अंकीत । राहे तिष्ठत द्वारीं त्याच्या ॥ ४ ॥

२१५२ अंगावरी आलिया घाव । अवघा देव निवारी ॥ १ ॥ काया वाचा शरण आतां । नुपेक्षी अनाथा विठ्ठल ॥ २ ॥ मुख्य आधीं पाहिजे भाव । तेणें देव कव घाली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावापाठीं । धांवे उठाउठी देव मागें ॥ ४ ॥

५१५३ महालाभ हाचि आहे । जो या गाये विठ्ठलासी ॥ १ ॥ प्रेमभरित सदा कंठ । अंगीं थलकट

भावना ॥ २ ॥ हेंचि वैराग्याचें सार । वांया कासया वेरझार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । अवघा पाठीं पोटीं देव ॥ ४ ॥

२१५४ समसाम्य सर्वां भूतीं । ज्यासी घडे भगवद्भक्ती ॥ १ ॥ जालिया सद्गुरुकृपा । सर्व मार्ग होय सोपा ॥ २ ॥ हृदयीं ठसतांचि भावो । प्रगटे देवाधिदेवो ॥ ३ ॥ भक्ता भावार्थे विकला । एका जनार्दनीं देखिला ॥ ४ ॥

२१५५ झालिया गुरुकृपा सुगम । सर्वत्र ठावें परब्रह्म ॥ १ ॥ तेथें नाहीं जन्ममरण । भवबंधन असेना ॥ २ ॥ ऐसा धरितां विश्वास । काय उणें मग तयास ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । स्वयें आपणचि होय देव ॥ ४ ॥

२१५६ सकळ साधनांचें सार । जनार्दन इतका उच्चार ॥ १ ॥ येणें घडे सर्व कर्म । नको भेदाभेद वर्म ॥२॥ सांडा द्वैताचा भाव । तेणें दिसे सर्व वाव ॥३॥ एका जनार्दनीं भाव । भाव तेथें वसे देव ॥ ४ ॥

२१५७ आरशाअंगीं लागतां मळ । मुख न दिसेचि निर्मळ ॥ १ ॥ मळ तो झाडूनि पाहतां । मुख दिसे निर्मळता ॥ २ ॥ पाहतां शुद्धभाव रीती । परमार्थ हाचि चित्तीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हा विचार । आरशासारिखा प्रकार ॥ ४ ॥

२१५८ शुद्धभाव चित्तीं । तरी कांहीं न लगे युक्ती ॥ १ ॥ न लगे आणिक विचार । शुद्ध भाव हाचि सार ॥ २ ॥ भावाविण वांझें । साधनें तीं अवघीं ओझें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । पाववी अक्षय तो ठाव ॥ ४ ॥

२१५९ अभाग्य न भजती भगवंतीं । त्यासी पृथ्वी असे जडत्व देती । जळें दिधली त्या अधोगती । तेजें दिधली त्या संतापवृत्ती ॥ १ ॥ ऐशा कैसेनि भेटे भगवंतु । नरदेही मुकले निजस्वार्थु । जन्ममरणाचे भोगिती आवर्तु । त्यासी विन्मुख होय हृदयस्थु ॥२॥ वायूनें दिधलें त्या चंचळत्व । नभें दिधलें त्या भाव शून्यत्व । महत्तत्त्वें हरिलें निजसत्त्व । मायें दिधलें त्या ममत्व ॥ ३ ॥ सभाग्य भावें भजती भगवंतीं । त्यांसी पृथ्वी देतसे निज शांती । जळें दिधली मधुर रसवृत्ती । तेजें दिधली निजतेज प्रभादीप्ती ॥ ४ ॥ ऐशा सद्भजें प्रसन्न होय देवो । जेणें भूतांचा पालटे देहभावो । निजीं निजाचा वाढे निर्वाहे । जनीं विजनीं अखंड ब्रह्मभावो ॥५॥ वायु उपरमे दे निश्चळत्व । नभें दिधलें त्या अलिप्तत्व । महतत्वें दिधलें शोधित सत्व । मायें दिधलें सद्विद्या परमतत्व ॥ ६ ॥ एका जनार्दनीं निजभक्ती । तैं अलभ्य लाभु होय प्राप्ती । भूतें महाभूतें प्रसन्न होती । तेणें न भंगे ब्रह्मस्थिति ॥ ७ ॥

२१६० भाव लागला भगवंतीं । हरिरूप पवित्र जगतीं । पाहतां कर्माकर्म गती । ब्रह्मस्थिती अखंड ॥१॥ भाक्ति म्हणे सोहंशक्ती । सांडी भवभय आसक्ती । पाहतां निजभाव विरक्ती । सर्वाभूती भगवंत ॥२॥ करितां कर्माचें देहाचरण । कर्म सबाह्य चैतन्य । देहविदेह अवसान । गमनागमन खुंटलें ॥३॥ एका जनार्दनीं एकपण । अनन्य भावें पैं शरण । जन्ममरणा आलें मरण । ब्रह्म परिपूर्ण पूर्णत्वें ॥ ४ ॥

२१६१ जो जो धरसील भाव । तें तें देईल देव । ये अर्थीं संदेह । मानूं नको ॥१॥ भावें भक्ति फळे । भावें देह मिळे । निजभावें सोहळे । स्वानंदाचे ॥२॥ एका जनार्दनीं । भावाच्या आवडी । मनोरथ कोडी । पुरवी तेथें ॥ ३ ॥

२१६२ भावेंविण देव नयेचि पैं हातां । वाउगें फिरता रानोरान ॥ १ ॥ मुख्य तें स्वरूप पाहिजे तो भाव । तेणें आकळे देह निःसंदेह ॥ २ ॥ संतसमागम नाम तें पावन । वाचे नारायण हाचि भाव ॥३॥ एका जनार्दनीं सोपा मंत्र राम । गातां जोडे धाम वैकुंठीचें ॥ ४ ॥

२१६३ अवघे अवघे ते देव । अवघे अवघे एक भाव ॥१॥ अवघे अवघे प्रेमळ । अवघे अवघे निर्मळ ॥ २ ॥ अवघे अवघे भावाचे । अवघे अवघे प्रेमाचे ॥ ३ ॥ अवघा एका अवघा एका । अवघा अवघा जनार्दन एका ॥ ४ ॥

२१६४ देवासी तो पुरे । एक तुळशीपान बरें ॥१॥ नाहीं आणिक आवडी । भावासाठीं घाली उडी ॥२॥ कण्या भाजीपान फळें खाय । न पाहे यातीकुळ स्वयें ॥ ३ ॥ प्रीतीनें दहींभात । उच्छिष्ट गोवळ्यांचें खात ॥ ४ ॥ भक्तिसुखें भुलला हरी । एका जनार्दनीं निर्धारीं ॥ ५ ॥

२१६५ भावें करा रे भजन । भावें करा नामस्मरण ॥१॥ भावें जाये पंढरीसी । भावें नाहावें भीमरथीसी ॥ २ ॥ भावें करा प्रदक्षिणा । भावें करा जागरणा ॥ ३ ॥ भावें व्रत एकादशी । एका शरण जनार्दनासी ॥ ४ ॥

२१६६ आम्हासी विश्वास पुरे एक भाव। या विठ्ठलावांचोनि देव न मनो कोण्हा ॥ १ ॥ विश्रांतीचें घर। संतांचें माहेर। करिती निर्धार वेदशास्त्रे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका प्रेमें तो आठवी। विठ्ठल सांठवी हृदयामाजीं ॥ ३ ॥

२१६७ पाउला पाउली चिंतावी माउली। विठाई साउली आदि अंतीं ॥ १ ॥ नोहे परता भाव नोहे परता भाव। आतुडेचि देव हातीं मग ॥ २ ॥ बैसलासे दृढ हृदयमंदिरीं। सबाह्याभ्यंतरी कोंडोनियां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जडला विठ्ठल। नोहे तो निर्बळ आतां कधीं ॥ ४ ॥

२१६८ बहु मतें बहु मतांतरें। आम्हां निर्धारें नावडती ॥ १ ॥ अविनाश आहे सुख पंढरीसी। यालागीं तयासी न विसंबो ॥ २ ॥ विठ्ठल देवो जेथें उभे। पुढें शोभे पुंडलीक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भ्रमर। कमळ परिकर विठोबा ॥ ४ ॥

२१६९ देव प्रसन्न जाला माग म्हणे वहिला। भक्त घरोघरीं विचार पुसो गेला ॥ १ ॥ भाव कीं भ्रांति आळस कीं भक्ती। विचारूनि व्यक्ती ठायीं ठेवा ॥२॥ अरे हें गुह्य गोप्य कुडे करूं नये उघडें। तरी दारोदार पुढं जाय वेडे ॥ ३ ॥ विलंब करितां पहाहो उदास जाला देवो। निवालिया खंति न घाली म्हणे धावो ॥ ४ ॥ शिकविलें नायकती धरिलें तें करिती। आपुलेनि कर्में आपण गुंतताती ॥ ५ ॥ एका जनार्दनीं शीतळ भाव। आळसेंचि देव दुव्हाविला ॥६॥

२१७० सर्वांठायीं ज्याची सत्ता। तो भक्ताधीन तत्वतां ॥ १ ॥ ज्याचीं आज्ञा प्रमाण। बारा अंगुळे विचरे प्राण ॥ २ ॥ आज्ञा ज्याची धडफुडी। पर्वत बैसका न सोडी ॥ ३ ॥ ज्याचे आज्ञेविण। पवनु न चाले एक क्षण ॥ ४ ॥ जो सर्वांसी आधार। एका जनार्दनीं विश्वंभर ॥ ५ ॥

२१७१ भक्त देवातें भजती। देव भक्तीं धरी प्रीती ॥ १ ॥ ऐसा एकमेकांचा ठावो। भक्ताअंगीं देव पहा वो ॥ २ ॥ अलंकार एक सुवर्ण। तैसें नाहीं दुजेपण ॥ ३ ॥ एका आधीं एक पाठी। एका जनार्दनीं राहाटी ॥ ४ ॥

२१७२ एक एकाच्या भावा। गुंतुनी ठेले अनुभवा ॥ १ ॥ प्रेम न समाये गगनीं। धन्य धन्य चक्रपाणी ॥२॥ बव्हरी पतिता। मोक्ष देतो सायुज्यता ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं। उद्धार हा जगदानी ॥ ४ ॥

२१७३ आधीं देव पाठी भक्त। ऐसें मागें आले चालत ॥ १ ॥ होहि बोलणेंचि वाव। भक्ता आधीं कैंचा देव ॥ २ ॥ भक्त शिरोमणी भावाचा। देव लंपट जाला साचा ॥ ३ ॥ भक्तासाठीं अवतार। ऐसा आहे निर्धार ॥४॥ वडील भक्त धाकुला देव। एका जनार्दनीं नाहीं संदेह ॥ ५ ॥

२१७४ सप्रेम करितां भजन। नोहे भवाचें बंधन ॥ १ ॥ भक्ताचे आधीन देवो। नाहीं नाहीं हो संदेहो ॥ २ ॥ भक्तीची एवढी गोडी। वैकुंठाहुनी घाली उडी ॥ ३ ॥ भक्तामाजी देव असे। देवा अंगीं भक्त दिसे ॥ ४ ॥ ऐशी परस्परें मिळणी। शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

२१७५ देव भक्त दोन्ही समची सारखें। पहातां पारिखें न दिसे दुजें ॥ १ ॥ भक्तांचे अंगीं देव असे। देवाचे हृदयीं भक्त वसे ॥ २ ॥ ऐशी परस्परें मिळणी। शरण एका जनार्दनीं ॥ ३ ॥

२१७६ भक्तावांचुनी देवा। कैंचें रूप कैंचें नांवा ॥१॥ भक्ती धरूनि आवडी। देवा लावलीसे गोडी ॥२॥ भक्तांवाचुनी पुसे कोण। देवा नाहीं महिमान ॥३॥ भक्ति करूनि निर्धार। देवा धरविला अवतार ॥४॥ उभयतां नोहे तुटी। एका जनार्दनीं मिठी ॥५॥

## देवाची भक्ताविषयीं प्रतिज्ञा.

२१७७ देव म्हणे भक्तांसी आवडी। मी जाहलों तुमचा गडी ॥ १ ॥ सांगाल तें करीन काम। मजवर ठेवा तुमचें प्रेम ॥ २ ॥ भाव भज द्यावा। आणिक मज नाहीं हेवा ॥ ३ ॥ आवडीनें देव बोले। भक्तामाजीं स्वयें खेळे ॥ ४ ॥ खेळतां गोपाळीं। एका जनार्दनीं गोकुळीं ॥ ५ ॥

२१७८ माझा भक्त मज अंतरीं। मी सदा बाहेरी तिष्ठतसे ॥ १ ॥ ऐशी परस्परें खूण। जाणती ते ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ माझी सायुज्यता मुक्ती। घेउनी बळें मीच होती ॥ ३ ॥ सायुज्यापरीस भक्ती गोड। एका जनार्दनीं धरिती चाड ॥ ४ ॥

२१७९ बहु बोलाचें नाहीं कारण। मी देह भक्त आत्मा जाण ॥ १ ॥ माझा देह शरीर जाण। भक्त आंत पंचप्राण ॥ २ ॥ नांदें सहज भक्त आंत। मी देह भक्त देहातीत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्त। देवपणा मी भक्तांकित ॥ ४ ॥

२१८० नामरूप मज आणिलें जिहीं। त्यांचिया उपकारा नोहे उतराई ॥ १ ॥ भक्तांचे उपकार कशानें फेडी। यालागीं त्यांचें उच्छिष्ट काढीं ॥२॥ भक्तांचेनी पालटे येतो गर्भवासा। उपकार उतराई नोहे कैसा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उतराई नोहे। यालागीं भक्तांसी न विसंबे जीवें ॥ ४ ॥

२१८१ मज भक्त आवडता फार। ऐसा माझा निर्धार ॥ १ ॥ भक्तांअंगीं मीच वसे। माझा भक्त मजमाजीं असे ॥ २ ॥ मज आणिलें नामरूपा। भक्त सखा माझा तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निर्गुण। भक्तीं सगुण मज केलें ॥ ४ ॥

२१८२ देव गुज सांगे भक्तां। अंकित अंकिता तुमचा मी ॥ १ ॥ तुम्हांलागीं अवतार। धरणें साचार मजलागीं ॥ २ ॥ तुम्हां न यावें उणेंपण। माझें थोरपण कोण वानी ॥ ३ ॥ म्हणोनि गळां घाली मिठी। एका जनार्दनीं पडली गांठी ॥ ४ ॥

२१८३ भावें करितां माझी भक्ती। मी आतुडें भक्ताहातीं ॥ १ ॥ माझें भक्तीपरतें। साधन नाहीं वो निरुतें ॥ २ ॥ माझें भक्तांचे महिमान। भक्त जाणतो सज्ञान ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव। स्वयें बोलतसे देव ॥ ४ ॥

२१८४ जो जो कोणी भजनीं बैसे। तेथें मी दिसे तैसाची ॥ १ ॥ उपासनेचा निर्वाहो। सर्वां भूतां देवाधिदेवो ॥ २ ॥ हो का माझी प्रतिमा मूर्ति। अंतर्ज्योति मी वसे ॥ ३ ॥ तेथें करितां भाव भक्ति। एका जनार्दनीं मुक्ति तयासी ॥ ४ ॥

२१८५ जे भजती मज जैसें। मीहि तया तैसा असे ॥ १ ॥ जयां जैशी पैं वासना। मीहि तैसा होय जाणा ॥ २ ॥ हो का माझी प्रतिमा मूर्ति। आदरें करितां माझी भक्ति ॥ ३ ॥ मी जनीं असोनि निराळा। एका जनार्दनीं आवळीला ॥ ४ ॥

२१८६ मज जे अनुसरले काया वाचा मनें। त्यांचें चालवणें सर्व मज ॥ १ ॥ ऋणवई त्यांचा आनंद जन्मांचा। जे गाती वाचा कीर्ति माझी ॥ २ ॥ तयांचियां द्वारीं लक्ष्मीसहित। उभा मी तिष्ठत याचकपणें ॥ ३ ॥ सर्व जडभारी जाणें योगक्षेम। एका जनार्दनीं नेम जाणा माझा ॥ ४ ॥

२१८७ मजसि जेणें विकिलें शरीर। जाणें मी निर्धारें अंकीत त्याचा ॥ १ ॥ त्याचें सर्व काम करीन मी अंगें। पडों नेदी व्यंगें सहसा कोठें ॥ २ ॥ एका जनार्दनीं त्याचा मी अंकीत। राहे पैं तिष्ठत त्याचे द्वारीं ॥ ३ ॥

२१८८ सर्व कर्म मदर्पण। करितां मन शुद्ध होय ॥ १ ॥ न्यून तें चढतें जाण। करी संपूर्ण मी एक ॥ २ ॥ माझ्या ठायीं ठेउनी मन। करी कीर्तन आवडी ॥ ३ ॥ मन ठेउनी माझ्या ठायीं। वसो कोठें भलते ठायीं ॥४॥ एका जनार्दनीं मन। करा मजसी अर्पण ॥ ५ ॥

२१८९ साक्षात्कार होतां। साच बद्धता नुरे तत्त्वतां ॥ १ ॥ माझा होतां अनुभव। कल्पनेसी नुरे ठाव ॥ २ ॥ माझें देखतां चरण। संसाराची नुरे जाण ॥ ३ ॥ माझी भक्ति करितां। दोष नुरेचि सर्वथा ॥ ४ ॥ सर्वां ठायीं मी वसे। एका जनार्दनीं भेद नासे ॥ ५ ॥

२१९० भाविकांच्या उदकासाठीं। रमा नाडे गोमटी ॥ १ ॥ भाविकांचे उदक घेतां। मज समाधान चित्ता ॥ २ ॥ भाविकांचे उदकापुढें। मज वैकुंठहि नावडे ॥ ३ ॥ ऐसी भाविकांची गोडी। एका जनार्दनीं घाली उडी ॥ ४ ॥

२१९१ स्वर्ग नरक इहलोक। यांची प्रीति सांडोनी देख ॥ १ ॥ भावें करितां माझी भक्ति। भाविक आपआप उद्धरती ॥ २ ॥ गव्हांची राशी जोडिल्या हातां। सकळ पक्वान्नें त्यांचीं होतां ॥ ३ ॥ द्रव्य जाहलें आपुले हातीं। सकळ पदार्थ घरा येती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं बोध। सहज घडे एकविध ॥ ५ ॥

२१९२ माझा शरणागत न दिसे केविलवाणा। ही तो लाज जाणा माझी मज ॥ १ ॥ एकविध भावें आलिया शरण। कर्म धर्म जाण पूर्ण त्याचे ॥ २ ॥ समर्थाचे मुला काय खावयाची चिंता। तैसें मी त्या तत्त्वतां न विसंबें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हा माझा नेम। आणिक नाहीं वर्म भावेंविण ॥ ४ ॥

२१९३ माझा भक्त मजभीतरीं। मी स्वयें असे तयामाझारीं ॥ १ ॥ बहु बोलावें नाहीं कारण। मी देह तो आत्मा जाण ॥ २ ॥ माझिया भक्तीसी जे लागले। ते मीच होउनी ठेले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अभेद। तया हृदयीं मी गोविंद ॥ ४ ॥

२१९४ पूजीं माझिया भक्तातें। तेणें संतोष होत मातें ॥ १ ॥ भक्त माझा मी भक्ताचा। ऐसी परंपरा साचा ॥ २ ॥ देवभक्तपण। वेगळीक नाहीं

जाण ॥ ३ ॥ भक्त जेवितांची धालों । एका जनार्दनीं लाधलों ॥ ४ ॥

२१९५ वमिल्या मिष्टान्ना । परतोनी श्रद्धा न धरी रसना ॥ १ ॥ ऐसे आठवितां माझे गुण । मिथ्या ठायीं नसे भान ॥ २ ॥ जेथें कर्माचे परिपाठीं । हें तों पुन्हां नये गोष्टी ॥ ३ ॥ येवढें कथेचें महिमान । एका जनार्दनीं शरण ॥ ४ ॥

२१९६ भावें करितां माझी भक्ती । विषयवासना जळोनि जाती ॥ १ ॥ चालतां माझे भक्तिपंथीं । सकळ साधनें जळोनि जाती ॥ २ ॥ माझिया निज-भक्ता । न बाधेचि संसारव्यथा ॥ ३ ॥ प्रल्हादा गांजिता जगजेठी । मी प्रगटलों कोरडे काष्ठीं ॥ ४ ॥ द्रौपदी गांजितां तात्काळीं । कौरवांचीं तोंडें केलीं काळीं ॥ ५ ॥ गोकुळीं गांजितां सुरपती । गोवर्धन धरिला हातीं ॥ ६ ॥ अर्जुन प्रतिज्ञेचे वेळीं । म्यां लपविला हेळीं ॥ ७ ॥ अंबऋषीचे गर्भवास । म्यां सोशिले सावकाश ॥ ८ ॥ भक्तचरणींची माती । एका जनार्दनीं वंदिती ॥ ९ ॥

२१९७ तुमचे अप्रमाण होतां बोल । मग फोल जिवित्व माझें ॥ १ ॥ कासया वागवूं सुदर्शन । नाहीं कारण गदेचें ॥ २ ॥ तुमचा बोल व्हावा निका । हेंचि देखा मज प्रिय ॥ ३ ॥ मज यावें उणेपण । तुमचें थोरपण प्रकाशूं द्या ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देव । स्वयमेव बोलतो ॥ ५ ॥

२१९८ माझी ब्रीदावळी । कदाकाळीं न संडो मी ॥ १ ॥ तुम्हां पडतां अंतर । मज वाटे हुरहुर ॥ २ ॥ तुमची न होत भेटी । मज दुःख पोटीं अनिवार ॥ ३ ॥ अंकित अंकिलों तुमचा । एका जनार्दनीं सत्य साचा ॥ ४ ॥

२१९९ तुम्हांसाठीं उणेपण । स्वयें मजलागून येऊं द्या ॥ १ ॥ प्रतिज्ञा तुमची व्हावी सिद्धी । मधीं उपाधी येऊं नेदी ॥ २ ॥ घेउनी हातीं सुदर्शन । आलें विघ्न निवारी ॥ ३ ॥ दारवंटा राखीन तुमचा । एका जनार्दनीं साचा ब्रीद माझें ॥ ४ ॥

२२०० जीं जीं भक्त बोलतीं वचनें । तीं तीं प्रमाण करणें देवा ॥ १ ॥ याजसाठीं अवतार । धरी मत्स्य कासव सुकर ॥ २ ॥ भक्तवचना उणेपण । येऊं नेदी जाण निर्धारें ॥ ३ ॥ स्वयें गर्भवास सोशी । अंबऋषीकारणें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ब्रीद साचा । वागवी भक्ताचा अभिमान ॥ ५ ॥

## भक्तवत्सलता—भक्तप्रतिज्ञा.

२२०१ ज्याची प्रतिज्ञा निर्धारीं । देवा हारी आणि-येलें ॥ १ ॥ तो हा शांतनूचा रावो । भीष्म देवो संग्रामीं ॥ २ ॥ शस्त्र न धरी ऐसा बोल । साचा केला संग्रामीं ॥ ३ ॥ निकळ पडतांचि अर्जुन । धरिलें सुदर्शन हस्तकीं ॥ ४ ॥ ऐसा कृपेचा कळवळा । एका जनार्दनां पाळी लळा ॥ ५ ॥

२२०२ अंबऋषिराया पडिले सायास । सोशी गर्भ-वास स्वयें देव ॥१॥ उच्छिष्टहि खातां प्रायश्चित असे । गोपाळाचे ग्रास खाय हरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्ताचा अंकीत । म्हणोनि तिष्ठत विटेवरी ॥ ३ ॥

२२०३ भक्तालागीं अणुमात्र व्यथा । ते न साहवे भगवंता ॥ १ ॥ करुनी सर्वांगाचा वोढा । निवारि-तसे भक्त पीडा ॥ २ ॥ होउनी भक्ताचा अंकितु । सारथीपण तो करितु ॥ ३ ॥ प्रल्हादासी दुःख मोठें । होतांची काष्ठीं प्रगटे ॥ ४ ॥ ऐसा अंकीत चक्रपाणी । एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

२२०४ भक्तपणा सान नव्हे रे भाई । भक्ताचे पाय देवाचे हृदयीं ॥ १ ॥ भक्त तोचि देव भक्त तोचि देव । जाणती हा भाव अनुभवी ॥ २ ॥ दानें सर्वस्वें उदार बळी । त्याचें द्वार राखे सदा वनमाळी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भीति नाहीं भावा । देवचि करितो भक्ताची सेवा ॥ ४ ॥

२२०५ वाहे भक्तांचे उपकार । न संडी भार त्यांचा तो ॥ १ ॥ म्हणे इहीं थोरपण आम्हां । ऐसा वाढवी महिमा भक्तांचा ॥ २ ॥ एका जनार्दनीं कृपाळ । दीनाचा दयाळ विठ्ठलु ॥ ३ ॥

२२०६ मिठी घालूनियां भक्तां । म्हणे शिणलेती आतां ॥ १ ॥ धांवे चुरावया चरण । ऐसा लाघवी आपण ॥ २ ॥ योगियासी भेटी नाहीं । तो आवडीनें कवळी बाही ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भोळा । भक्तां आलिंगी सांवळा ॥ ४ ॥

२२०७ देवासी तो आवडे भक्त । नाहीं हेत दुसरा ॥ १ ॥ बळी सर्वस्व करी दान । त्याचें द्वारपाळपण केलें त्वां ॥ २ ॥ धर्म सदा होय उदार । त्याचे घरीं तुझा वास ॥ ३ ॥ तुझा भक्त अंबऋषी । त्याचे गर्भ-वास सोशिसी ॥ ३ ॥ तुम्हीं उदार जगदानी । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

२२०८ शुद्ध करूनियां मन। नारायण चिंतावा ॥१॥ मग उणें नाहीं कांहीं। प्रत्यक्ष पाहीं अनुभव ॥ २ ॥ आठवितां उपमन्यु बाळ। दिला क्षीरसागर सुढाळ ॥ ३ ॥ ध्रुवें चिंतिलें चरणा। अढळपदीं स्थापिलें जाणा ॥ ४ ॥ बिभीषणें केला नमस्कार। तया केलें राज्यधर ॥ ५ ॥ विष पाजितां पूतना। पाठविली वैकुंठसदना ॥ ६ ॥ गणिकेनें आठविलें। तिसी वैकुंठीं बैसाविलें ॥ ७ ॥ हीनयाती कुब्जादासी। जाहली ती प्रिय देवासी ॥ ८ ॥ अर्जुनाच्या भावार्थासाठीं। रथ हांकी जगजेठी ॥ ९ ॥ गोपाळांची आवड पोटीं। उच्छिष्टासाठीं लाळ घोटी ॥ १० ॥ विदुराच्या भक्षी कण्या। तेणें आवडी मानी मना ॥ ११ ॥ एका शरण जनार्दनीं। दासा न विसरे चक्रपाणी ॥ १२ ॥

२२०९ अष्टांगप्रयोग साधिती साधनीं। तो हरि-कीर्तनीं नाचे बापा ॥ १ ॥ यज्ञादिकीं अवधान ने घे वो माये। तो उभा राहूनि क्षीरापती खाये ॥ २ ॥ पवन कोंडोनि योगी जाती निराकारीं। तो हरि धर्मा-घरीं पाणी वाहे ॥ ३ ॥ सनकसनंदन जया ध्याताती आवडी। तो अर्जुनाची घोडीं धुतो हरि। ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भक्तांचा अंकीत। म्हणोनि तिष्ठत विटेवरी ॥ ५ ॥

२२१० देव धांवे मागें न करी आळस। सांडितां भवपाश मायाजाळ ॥ १ ॥ सर्वभावें जें कां शरण रिघती। तयांचें वोझें श्रीपती अंगें वाहे ॥ २ ॥ नको भुक्तिमुक्ति सदा नामीं हेत। देव तो अंकीत होय त्यांचा ॥३॥ एका जनार्दनीं ऐसा ज्यांचा भाव। तया घरीं देव पाणी वाहे ॥ ४ ॥

२२११ देवासी आवडे भक्तसमागम। त्याचें सर्व काम करी अंगें ॥१॥ भक्ताकाजालागीं अवतार धरी। नांदे भक्ताघरीं स्वयें देव ॥ २ ॥ भक्तांविण देवा कांहींच नावडे। भक्त तो आवडे सर्वकाळ ॥३॥ एका जनार्दनीं भक्ताचा अंकीत। देव सदोदित स्वयें होत ॥ ४ ॥

२२१२ नातुडे जो योगी ध्यानां। तो समचरणा पंढरीये ॥१॥ भोळा सुलभ भाविकांसी। दर्शनें सर्वांसी सारखा ॥ २ ॥ अभेदाच्या न धांवे मागें। भाविकां लागे पाठोपाठीं ॥ ३ ॥ शुद्ध देखतांचि भाव। एका जनार्दनीं उभा देव ॥ ४ ॥

२२१३ उदार देव उदार देव। नाशी भेव भक्तांचें ॥ १ ॥ प्रल्हादाचे निवारी घात। राखिला जळांत अग्नीसी ॥ २ ॥ पांडवांचें करी काम। निवारी दुर्गम स्वअंगें ॥ ३ ॥ गौळियांचीं गुरें राखी। आपण शेखीं एकला ॥ ४ ॥ येतां शरण एकपणें। एका जना-र्दनीं ऐसें देणें ॥ ५ ॥

२२१४ दयाळु उदार पंढरीराव। भाकितां कीव पुरवी इच्छा ॥ १ ॥ ऐसा याचा अनुभव। आहे ठाव मागोनियां ॥ २ ॥ जे जे होती शरणागत। पुरवी आर्त तयांचे ॥ ३ ॥ उपमन्यु ध्रुव बाळ। दिधलें अढळपद त्यांतें ॥ ४ ॥ पुराणीं तो व्यासें बहु। वर्णिले दावूं कासया ॥ ५ ॥ एका जनार्दनीं एकवि भाव। तेणें देव तुष्टत ॥ ६ ॥

२२१५ दयेचें धाम नेघे कोणाचाहि श्रम। हरि वर्णी सप्रेम दृढ निजभावें ॥ १ ॥ प्रसन्न होउनी दीनातें पहातो। आवडी उद्धरितो भाविकांसी ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्तीसी भुलला। म्हणोनि वेडावला भक्तामागें ॥ ३ ॥

२२१६ खुर्पूं लागे सांवत्यासी। न पाहे यातीसी कारण ॥ १ ॥ घडी मडकें कुंभाराचें। चोख्यामे-ळ्याचीं ढोरें ओढी ॥ २ ॥ सजन कसयाचें विकी मांस। दामाजीचा दास स्वयें होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जनीसंगें। दळूं कांडूं लागे आपण ॥ ४ ॥

२२१७ देखावया भक्तपण। रूप धरिलें सगुण ॥१॥ तो हा पंढरीचा राणा। वेदा अनुमाना नये तो ॥२॥ भाविकांचे पाठीमागें। धांवे लागे लवलाहीं ॥ ३ ॥ खाये तुळसीपत्र पान। न म्हणे सान थोडें तें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हरी। आपुली थोरी विसरे ॥ ५ ॥

२२१८ दहा अवतार घेत भक्तांचिया काजा। तो हा विटेवरी राजा पंढरीचा ॥ १ ॥ भक्ताचें उणें न पाहे आपण। उच्छिष्ट काढी धर्माघरीं न लाजो जाण ॥ २ ॥ अर्जुनाची घोडीं रणांगणीं धुतलीं। भक्ता नये उणे कृपेची माउली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्तांचिया काजा। विटेवरी उभा राहिला सहजा ॥४॥

२२१९ एकपणें एकसा दिसे। उभा असे विटे-वरी ॥ १ ॥ नेणती यासाठीं लहान। होय आपण स्वइच्छें ॥ २ ॥ जाणतांचि लागे वाड। न धरी भीड तयाची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। भावमो-चन तारक ॥ ४ ॥

२२२० एका घरीं चोरी लोणी। एका घरीं वाहे पाणी ॥ १ ॥ एका घरीं बांधिला राहे। एका घरीं

चिमणा होय ॥२॥ एका घरीं ब्रह्मचारी । एका घरीं भोगी नारी ॥ ३ ॥ एका घरीं सुखें नाचे । एका घरीं प्रेम त्याचें ॥ ४ ॥ ऐसा व्यापला दोहीं घरीं । एका जनार्दनीं श्रीहरी ॥ ५ ॥

२२२१ एका घरीं द्वारपाळ । एका घरीं होय बाळ ॥ १ ॥ एका घरीं करी चोरी । एका घरीं होय भिकारी ॥ २ ॥ एका घरीं युद्ध करी । एका घरीं पूजा बरी ॥३॥ एका घरीं खाय फळें । एका घरीं लोणी बळें ॥ ४ ॥ एका एकपणें एकला । एका जनार्दनीं प्रकाशला ॥ ५ ॥

२२२२ एकाचिया चाडें । उगवी बहुतांचीं कोडें ॥१॥ म्हणोनि उभा विटेवरी । पाउलें समचि साजिरी ॥२॥ एकासाठीं गर्भवास । एकाद्वारीं रहिवास ॥ ३ ॥ एका घरीं उच्छिष्ट काढी । एकाचीं रणीं धूत घोडीं ॥४॥ एका द्वारीं भिकारी होय । एका घरीं भाजी खाय ॥५॥ एका एकपणें हरी । एका जनार्दनीं दास्य करी ॥६॥

२२२३ भक्तचरणींचे रजःकण । हृदयीं वाहे नारायण ॥ १ ॥ भक्ता पडतां संकट । देव अंगें सोशी कष्ट ॥ २ ॥ गांजितां प्रल्हादा नेहटीं । स्वयें प्रगटला कोरडे काष्ठीं ॥ ३ ॥ द्रौपदी गांजितां तात्काळीं । कौरवांचीं तोंडें केलीं काळीं ॥४॥ गोकुळीं गांजितां सुरपती । गोवर्धन धरिला हातीं ॥ ५ ॥ अर्जुनातें संकटप्राप्ती । दिवसां लपवी गभस्ती ॥ ६ ॥ अंबऋषीचे गर्भवास । स्वयें सोशी हृषिकेश ॥ ७ ॥ एका जनार्दनीं दास । होय भक्तांचा सावकाश ॥८॥

२२२४ कासया साधन तपाचिया हावा । पाचारितां धांवा येतो लवलाही ॥१॥ ऐसा अंकिला धांवे वचनासाठीं । पहा जगजेठी भक्तकाजा ॥ २ ॥ संकटीं पडला गजा नक्र मिठी । धांवे उठाउठी ब्रीदासाठीं ॥३॥ आळीकर धोकुटा ध्रुव बैसे वनीं । तयासी तत्क्षणीं अढळ केलें ॥ ४ ॥ पडतां संकट द्रौपदी करी धांवा । धांवे लवलाह्या सारुनी ताट ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भक्तकाज कैवारी । धांवे सत्वरीं आपुल्या लाजा ॥ ६ ॥

२२२५ अवरोधें विरोधें करितां हरिभक्ती । सायुज्यता मुक्ति देणें तया ॥ १ ॥ ऐसा कृपाळु लक्ष्मीचा पती । पुराणें वर्णिती महिमा ज्याचा ॥ २ ॥ विष पाजूं आली पूतना राक्षसी । अक्षयपदासी दिले तिसी ॥३॥ अघ बग केशी असुर वधिले । सायुज्यता दिलें पद त्यांसी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भक्तांचा कैवारी । ब्रीद हें साचारीं मिरवितसे ॥ ५ ॥

२२२६ ज्ञानराजासाठीं स्वयें भिंत ओढी । विसरुनी प्रौढी थोरपण ॥ १ ॥ तो हा महाराज चंद्रभागे तीरीं । कट धरूनी करीं तिष्ठतसे ॥ २ ॥ नामदेवासाठीं जेवी दहीभात । न पाहे उचित आन दुजें ॥३॥ गोरियाचे घरीं स्वयें मडकी घडी । चोखियाची ओढी गुरेढोरें ॥ ४ ॥ सांवत्या माळ्यासी खुरपूं लागे अंगें । कबिराचे मागें शेले विणी ॥ ५ ॥ रोहिदासासवें चर्म रंगूं लागे । सजन कसायाचे अंगें मांस विकी ॥६॥ नरहरी सोनारा घडूं फुंकूं लागे । दामाजीचा वेगें पाडी वार ॥ ७ ॥ जनाबाईसाठीं वोंचितसे शेणी । एका जनार्दनीं धन्य महिमा ॥ ८ ॥

२२२७ भक्तांच्या उपकारासाठीं । नोहे पालट उतराई ॥ १ ॥ ज्ञानोबाची भिंत ओढी । उच्छिष्टपात्रें काढी धर्माघरीं ॥ २ ॥ जेवीं नामदेवासंगें साचें । सुदाम्याचे पोहे भक्षी ॥ ३ ॥ विष पितो मिराबाईसाठीं । विदुराच्या हाटीं कण्या स्वयें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं अंकितपणें । द्वार राखणें बळीचें ॥ ५ ॥

२२२८ दासासी संकट पडतां जडभारी । धांवे नानापरी रक्षणार्थ ॥१॥ पडतां संकटीं द्रौपदी बहीण । धांवे नारायण लवलाहें ॥ २ ॥ सुदामियाचें दरिद्र निवटीलें । द्वारकेतुल्य दिलें ग्राम त्यासी ॥ ३ ॥ अंबऋषीसाठीं गर्भवास सोशी । परीक्षितीसी रक्षी गर्भवासीं ॥४॥ अर्जुनाचे रथीं होऊनी सारथी । उच्छिष्ट भक्षितो गोवळ्याचें ॥ ५ ॥ राखितां गोधनें मेघ वरुषला । गोवर्धन उचलिला निजबळें ॥ ६ ॥ मारुनी कंसासुर सोडिले पितर । रक्षिलें निर्धारें भक्तजन ॥ ७ ॥ एका जनार्दनीं आपुले म्हणवितां । धांवे हरि सर्वथा तयालागीं ॥ ८ ॥

२२२९ भक्तासी संकट पडतां । धांवे देव तत्त्वतां लवलाहें ॥ १ ॥ ऐसा अनुभव आहे । देव लवलाहें धांवत ॥ २ ॥ द्रौपदी पडतां संकटीं । धांवे उठाउठीं देव तेव्हां ॥ ३ ॥ पडतां संकट प्रल्हादासी । कोरडे काष्टेंसी देव जाहला ॥ ४ ॥ पडतां संकट गजेंद्रासी । हांकेसरसी उडी घाली ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निर्धार । स्मरतां साचार धांवत ॥ ६ ॥

२२३० मानी भक्तांचे उपकार । धरी गौळियाघरीं अवतार ॥ १ ॥ प्रेमें नाना छंदें नाचे । उणें पडों

नेदी साचें ॥ २ ॥ अंगें धांव घाली । ऐसी कृपेची माउली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साचा । देव अंकीत भक्तांचा ॥ ४ ॥

२२३१ मानी भक्तांचे उपकार । म्हणोनि धरी अवतार ॥ १ ॥ उच्छिष्ट काढी धर्माघरीं । नीच काम करीं गौळियांचें ॥ २ ॥ अर्जुनाचे रथीं बैसे । सारथ्य सरसे करितसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अंकितपणें । द्वार राखणें बळीचें ॥ ४ ॥

२२३२ भाविकांची आवड मोठी । धांवे पाठी रानोरान ॥ १ ॥ कण्या खाये विदुराच्या । उच्छिष्ट गोवळ्याचें परमप्रिय ॥२॥ उच्छिष्ट फळें भिल्लिणीचीं। खाये रुची आदरें ॥ ३ ॥ पोहे खाये सुदाम्याचें । कोरडे फके मारी साचे ॥ ४ ॥ ऐशी भक्ताची आवडी देवा । एका जनार्दनीं करी सेवा ॥ ५ ॥

२२३३ उत्तम अन्न देखतां दिठी । ठेवी पोटीं जतन तें ॥१॥ तान्हुल्याची वाहे चिंता । जेवी माता बाळातें ॥२॥ न कळे तया उत्तम कडू । परी परपडु माता दावी ॥३॥ एका जनार्दनीं तैसा देव । घेत धांव भक्तांघरीं ॥४॥

२२३४ वत्सािचिये लळे जैसी । धेनु अपैशी येत घरां ॥ १ ॥ तैसा भक्तांघरीं नारायण । धांवे आपण वोढीनें ॥ २ ॥ मुंगियांच्या घरां मूळ । धाडी समूळ कोण तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव । घेत धांव आपणची ॥ ४ ॥

२२३५ यातीकुळ कांहीं नाणी तो मानसीं । धांवे त्यांचे पाठीसीं लागवेगें ॥ १ ॥ आपुलें म्हणविल्या न देखें पारिखें । रक्षी त्या कौतुकें आपुलें काजा ॥२॥ एका जनार्दनीं पहा अनुभव । धांवतसे देव लवलाहे ॥३॥

२२३६ चातकाची तहान किती । तृप्ति करूनि निववी क्षिती ॥ १ ॥ धेनु वत्सातें वोरसे । घरीं दुभतें पुरवी जैसें ॥ २ ॥ पक्कान्न सेवूं नेणती बाळें । माता मुखीं घालीं बळें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोले । एकपण माझें नेलें ॥ ४ ॥

२२३७ बाळाचे छंद जाण । माता पुरविती आपण ॥ १ ॥ बोबडे बोलतां ते बोल । माते आनंद सखोल ॥ २ ॥ मागे जें तें दे आपण । आळ पुरवी त्यासी देऊन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ममत्व तें । नोहे लौकिकापुरतें ॥ ४ ॥

२२३८ भक्तिभावार्थे अर्पिला । देव सर्वांगीं धरिला ॥ १ ॥ रानींची रानट वनमाला । भक्ति आणुनी घातली गळां ॥ २ ॥ भक्त अर्पितां आवडीं । देव जाणे त्याची गोडी ॥ ३ ॥ भक्तभाव जाणोनि पाहीं । एका जनार्दनीं राहे देहीं ॥ ४ ॥

२२३९ देवो विसरे देवपण । अर्पी वासना भक्तांसी ॥ १ ॥ भक्तदेहीं सदा वसे । धर्म अर्थ अर्पितसे ॥ २ ॥ जे जे भक्ताची वासना । पुरवी आपण त्याचि क्षणा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अंकीत । उभा तेथेंचि तिष्ठत ॥ ४ ॥

२२४० जे जे भक्तांची आवडी । तयां संकटीं घाली उडी । वाढवी आपुली आपण गोडी । करी जोडी नामाची ॥ १ ॥ होय तयांचा अंकीत । नेणे लहान थोर मात । आपुलें आपण पुढें धांवत । न सांगतां करी सर्व ॥ २ ॥ एका जनार्दनीं कनवाळ । पतीतपावन म्हणवी दयाळ । माता स्नेहें परीस सबळ । भक्तांलागीं स्वयें रक्षी ॥ ३ ॥

२२४१ जे जे वेळे जें जें लागे । तें न मागतां पुरवी वेगें ॥१॥ ऐसा भक्तांचा अंकीत । राहे द्वारीं पै तिष्ठत ॥ २ ॥ आवडी गौळियांची मोठी । गायी राखी जगजेठी ॥ ३ ॥ भक्तिभावार्थें भुकेला । एका जनार्दनीं विकला ॥ ४ ॥

२२४२ भक्ता जैसा मनोरथ । पुरवी समर्थ गुरुराव ॥ १ ॥ नित्य ध्यातां तयाचें चरण । करी संसार खंडन ॥ २ ॥ वानूं चरणाची पवित्रता । उद्धार जडजीवां तत्त्वतां ॥ ३ ॥ अवचट लागतांचि कर । एका जनार्दनीं उद्धार ॥ ४ ॥

२२४३ आम्हां सकळां देखतां । पुरवी लळे तो सर्वथा ॥ १ ॥ जें जें मागावें तयासी । तें तें देतो निजभक्तांसी ॥ २ ॥ न मने अंकिताचा शीण । राहे द्वारपाळ होऊन ॥ ३ ॥ घोडे धुतले रणांगणीं । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

२२४४ अंकित भक्ताचा । नीचकाम काम करी साचा ॥ १ ॥ काढी धर्माघरीं । उच्छिष्ट पात्रें निर्धारीं ॥ २ ॥ कुब्जेसी रतला । एका जनार्दनीं भला ॥ ३ ॥

२२४५ भक्ताचिये काजें । देव करितां न लाजे ॥१॥ हा तो पहा अनुभव । उदार पंढरीचा राव ॥ २ ॥ न विचारी यातीकुळ । शुची अथवा चांडाळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । एका भावें निंबलोण ॥ ४ ॥

२२४६ भक्ताचिया घरीं । नीच काम देव करी ॥ १ ॥ धर्माघरीं उच्छिष्ट काढी । अर्जुनाचीं घुते

घोडीं ॥ २ ॥ विदुराच्या भक्षी कण्या । द्रौपदी धांवण्या धांवतु ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । एकपणें जनार्दन ॥ ४ ॥

२२४७ अंकित अंकिला । देव भक्ताचा पैं जाला ॥ १ ॥ पहा पुंडलिकासाठीं । उभा असे वाळुवंटीं ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस जालीं । न बैसे अद्यापि तो खालीं ॥ ३ ॥ न बैसेची उभा असे । एका जनार्दनीं भक्तिपिसें ॥ ४ ॥

२२४८ भक्त अर्पितां सुमनमाळा । घाली आवडीनें गळां ॥ १ ॥ ऐसा आवडीचा भुकाळू । श्रीविठ्ठलु दीनदयाळु ॥ २ ॥ भक्त भावार्थे अर्पितां । ते आवडे पंढरीनाथा ॥ ३ ॥ भक्तासाठीं विटेवर । समपद कटीं कर ॥ ४ ॥ ऐशी कृपेची कोंवळीं । एका जनार्दनीं माउली ॥ ५ ॥

२२४९ पार नाहीं जयाच्या गुणा । तो उभा श्री पंढरीचा राणा ॥ १ ॥ नवल गे माय भक्ताचेसाठीं । कटीं कर ठेवुनी उभा वाळुवंटीं ॥ २ ॥ न म्हणे तया कोणते बोल । उगा राहिला न बोले बोल ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्ताची आस । धरुनी उभा तिष्ठे जगदीश ॥ ४ ॥

२२५० कृपाळुपणें उभा विटेवरी । पाहे अवलोकोनि दृष्टीभरी ॥ १ ॥ न कुंचेचि धणी न बैसे खालीं । उभा राहे समचि पाउलीं ॥ २ ॥ युगें जाहलीं नोहे लेखा । एका जनार्दनीं भुलला देखा ॥ ३ ॥

२२५१ भोळा देव भोळा देव । उंच नीच नेणें भाव ॥ १ ॥ चोखियाच्या मागें धांवे । शेले कबिराचे विणावे ॥ २ ॥ खुरपूं लागे सांवत्यासी । उणें येवो नेदी कोणासी ॥ ३ ॥ विष पिणें धाउनी जाणें । भाविकाची भाजी खाणें ॥ ४ ॥ कण्याची तो आवडी मोठी । एका जनार्दनीं लाळ घोटी ॥ ५ ॥

२२५२ भक्तदरुशनें देव ते तोषती । तेणें आनंद चित्तीं देवांचिये ॥ १ ॥ भक्ताची स्तुती देवासी आनंद । भक्तनिंदा होतां देवा येतसे क्रोध ॥ २ ॥ भक्त संतोषता देवासी सुख । एका जनार्दनीं देवा भक्तांचा संतोष ॥ ३ ॥

२२५३ देव पुजिती आपुले भक्त । मज वाढविलें म्हणे उचिता ॥ १ ॥ ऐसा मानी उपकार । देव भक्तीं केला थोर ॥ २ ॥ देवाअंगीं नाहीं बळ । भक्त भक्तीनें सबळ ॥ ३ ॥ देव एकदेशीं वसे । भक्त नांदती समरसें ॥ ४ ॥ भक्ताची देवा आवडी । उणें पडों नेदी अर्ध घडी ॥ ५ ॥ नाहीं लाज अभिमान देवा । एका जनार्दनीं करी सेवा ॥ ६ ॥

२२५४ भक्त नीच म्हणोनि उपहासिती । त्यांचे पूर्वज नरका जाती ॥ १ ॥ भक्त समर्थ समर्थ । स्वयें बोले वैकुंठनाथ ॥ २ ॥ भक्तासाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सुकर ॥ ३ ॥ यातिकुळ न पाहे मनीं । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

२२५५ अभेद भजनाचा हरिख । देव भक्त जाहले एक ॥ १ ॥ कोठें न दिसे भेदवाणी । अवघी कहाणी बुडाली ॥ २ ॥ हारपलें देवभक्तपण । जनीं जाहला जनार्दन ॥ ३ ॥ देवभक्त नाहीं मात । मुळींच खुंटला शब्दार्थ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देव । पुढें उभा स्वयमेव ॥ ५ ॥

२२५६ देवभक्तपणें नाहीं दुजा भाव । एकरूप ठाव दोहीं अंगीं ॥ १ ॥ दुजेपण नाहीं दुजेपण नाहीं । दुजेपण नाहीं दोहीं अंगीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं देव तेचि भक्त । सबाह्य नांदत एकरूपीं ॥ ३ ॥

२२५७ देव आणि भक्तां एकचि विचार । दुजें पाहे तयां घडे पातक साचार ॥ १ ॥ देव आणि श्रुती सांगती पुराणें । देव आणि भक्त एकरूपपणें ॥ २ ॥ एका जनार्दनीं जया समता दृष्टी । भक्ता पाहतां देवा होतसे भेटी ॥ ३ ॥

२२५८ भक्ताविण देवा । कैंचें एकपण सेवा ॥ १ ॥ भक्ताची सेवा देव करी । देव तिष्ठे भक्ताद्वारीं ॥ २ ॥ भक्ताचे अंकीत । लक्ष्मीसह देव होत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्त । देवा हृदयीं धरीत ॥ ४ ॥

२२५९ जेथें जेथें भक्त वसे । तेथें देव नांदे अपैसे ॥ १ ॥ हाचि पहा अनुभव । नका ठाव चळं देऊं ॥ २ ॥ बैसलें ठायीं दृढ बैसा । यांचे सहसा विठ्ठल ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ठाव । धरितां देव हातीं लागे ॥ ४ ॥

२२६० वचनमात्रासाठीं । प्रगटला कोरडे काष्ठीं ॥ १ ॥ ऐसी कृपाळु माउली । भक्तासाठीं धांव घाली ॥ २ ॥ कृपेचा कोंवळा । राखे भक्ताचा तो लळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं डोळा । पहा विठ्ठल सांवळा ॥ ४ ॥

२२६१ भक्ताची अणुमात्र व्यथा । न सहावे भगवंता ॥ १ ॥ अंबऋषीसाठीं । गर्भवासा येत पोटीं ॥ २ ॥ प्रल्हादाकारणें । सहस्र स्तंभीं गुरगुरणें ॥ ३ ॥

गोपाळ राखिले वनांतरीं । तेथें उचलिला गिरी ॥ ४ ॥ राखिले पांडव जोहरीं । काढिले बाहेरी विवरद्वारें ॥ ५ ॥ ऐसा भक्तांचा अंकीत । एका जनार्दनीं तया ध्यात ॥ ६ ॥

२२६२ देव दासाचा अंकीत । म्हणोनि गर्भवास घेत ॥ १ ॥ उणें पडों नेदी भक्ता । त्याची स्वयें वाहे चिंता ॥ २ ॥ अर्जुनासाठीं वरी । स्वयें शस्त्र घेत करीं ॥ ३ ॥ प्रल्हादाकारणें । स्तंभामाजीं गुरगुरणें ॥ ४ ॥ बळिया द्वारीं आपण । रूप धरी गोजिरें सगुण ॥ ५ ॥ ऐसा अंकीत भावाचा । एका जनार्दनीं साचा ॥ ६ ॥

२२६३ शरणागता नुपेक्षी हरी । ऐसी चराचरीं कीर्ति ज्याची ॥ १ ॥ बिभीषणें नमस्कार केला । राज्यधर केला श्रीरामें ॥ २ ॥ उपमन्या दुधाचा पैं छंद । क्षीरसागर गोविंद त्या देतु ॥ ३ ॥ ध्रुव बैसविला अढळपदीं । गणिका बैसली मोक्षपदीं ॥ ४ ॥ ऐसी कृपेची साउली । एका जनार्दनीं माउली ॥ ५ ॥

२२६४ होउनी भक्तांचा अंकीत । पुरवितसे मनोरथ । ऐसी हे प्रचीत । उघड पहा ॥ १ ॥ देव भक्तांचा अंकिला । धांवे आपण वहिला । भक्ताचिया बोला । उणें पडों नेदी ॥ २ ॥ उपमन्यूचिया काजासाठीं । क्षीरसिंधु भरूनि वाटी । लाविली त्याचे होटीं । आपुली म्हणोनी ॥ ३ ॥ वनीं एकटें ध्रुव बाळ । तयासी होउनी कृपाळ । दिधलें पद अढळ । आपुलिया लाजा ॥ ४ ॥ प्रल्हाद पडतां सांकडीं । खांबांतून घाली उडी । दैत्य मारी कडोविकडी । आपुलिया चाडा ॥ ५ ॥ पडतां संकट पांडवांसी । जाहला सारथी धुरेसी । मारविली बापुडी कैसी । कौरवें सहकुळ ॥ ६ ॥ ऐसा भक्तांचिया काजा । धांवे न धरत लाजा । एका जनार्दना दुजा । एकपणें एकटु ॥ ७ ॥

## श्रीकृष्ण-उद्धव प्रश्न.

२२६५ द्वारकेमाजीं श्रीकृष्ण । एकदां करी देवार्चन । उद्धवें कर जोडोन । केला प्रश्न श्रीकृष्णा ॥१॥ सर्व देवांचा तूं देव । ईश्वरा न कळे तुझा भाव । शिणले सर्व ऋषी गणगंधर्व । परी तूं नाकळ सर्वथा ॥ २ ॥ तुम्ही बैसोनि एकांतीं । काय करितां श्रीपती । हें होतें पुसणें माझे चित्तीं । बहु दिवस श्रीहरी ॥ ३ ॥ ऐकोनी उद्धवाची मात । तया बोले जगन्नाथ । एका जनार्दनीं विनवीत । सावधान परियेसा ॥ ४ ॥

२२६६ ऐके उद्धवा प्रेमळा । सांगतो जीवाचा जिव्हाळा । तूं भक्तराज निर्मळा । सुचित्तें ऐके ॥१॥ मी बैसोनि आसनीं । पूजा करितों निशिदिनीं । ते पूज्य मूर्ति तुजलागुनी । नाहीं ठाउकी उद्धवा ॥२॥ जयाचेनि मातें थोरपण । वैकुंठादि हें भूषण । तयाचें पुजेचें महिमान । एक शिव जाणे ॥ ३ ॥ येरा न कळेचि कांहीं । वाउगें पडती प्रवाहीं । उद्धवा तूं पुसिलें पाही । म्हणोनि तुज सांगतो ॥ ४ ॥ माझें जें आराध्य दैवत । तें कोण म्हणसी सत्य । भक्त माझे जीवीचे हेत । जाणती ते ॥५॥ तयाविण मज आवड । नाहीं कोणता पोवाड । माझा भक्त मज वरपड । काया वाचा मनेंसी ॥ ६ ॥ माझें विश्रांतीचें स्थान । माझे भक्त सुखनिधान । काया वाचा मन । मी विकलों तयांसी ॥ ७ ॥ ते हे भक्त परियेसी । उद्धवा सांगे हृषिकेशी । एका जनार्दनीं सर्वांसी । तेंचि वदतसे ॥ ८ ॥

२२६७ ऐकोनि कृष्णाचें बोलणें । उद्धव संतोषला तेणें । म्हणे कृपा करुनी मज दाखवणें । भक्ताचें मंदीर ॥ १ ॥ मग धरुनी उद्धवाचा हात । स्वयें दावी श्रीकृष्णनाथ । आणिकांसी नोहे तें प्राप्त । हरिभक्तावीण ॥ २ ॥ देवें देवघर उघडिलें । सन्मुख उद्धवा बैसविलें । देव सांगतसे वाहिलें । तया उद्धवाप्रती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रेम । भक्ताचें ऐकतां नाम । प्राणी होती निष्काम । अहर्निशीं जपतां ॥ ४ ॥

२२६८ मुख्य आदिनाथ प्रणवाचें निज । पार्वतीतें बीज उपदेशिलें ॥ १ ॥ सनकसनंदन अत्रि कपिल मुनी । नारदादि शिरोमणी भक्तराज ॥ २ ॥ व्यास आणि वसिष्ठ वाल्मिकादिक । ध्रुव प्रल्हाद देख शिरोमणी ॥ ३ ॥ एक जनार्दनीं भक्तांचें महिमान । स्वयें नारायण वाढवीत ॥ ४ ॥

२२६९ उद्धव अक्रूर गोपाळ सवंगडे । हनुमंतादिक बागडे भक्त देखा ॥ १ ॥ गुहक बिभीषण नळ नीळ देखा । ऐशी भक्तमालिका शोभतसे ॥ २ ॥ एका जनार्दनीं घेतां त्यांचें नाम । सर्व हरती कामक्रोधादिक ॥ ३ ॥

२२७० गोपाळ गौळणी शोभती त्या मूर्तीं । तें सुख परीक्षिती संतजन ॥ १ ॥ ऐसे अपरंपार भक्त ते असती । स्वयेंचि श्रीपती वाचितसे ॥ २ ॥ एका

जनार्दनीं भक्तांचा तो मेळ। दावीत सकळ वैभव हरिभक्तां ॥ ३ ॥

२२७१ पुढें कलीमाजीं होणार जे भक्त। ते मूर्तिमंत उद्धव पाहे ॥ १ ॥ पाहतां पाहतां समाधी उन्मनी। गेलासे बुडोनी सुखामाजीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाठवेचि कांहीं। देहींचा विदेहीं होउनी ठेलों ॥ ३ ॥

२२७२ द्वारकेहुनी धांवणें। केलें पुंडलिका कारणें ॥१॥ ऐसा कृपाळु उदार। उभा विटे शामसुंदर ॥ २ ॥ न बोले म्हणोनी पाहे पुढें। चित्त ठेविलें तिकडे ॥ ३ ॥ एका म्हणे जनार्दनीं। धन्य पुंडलीक मुनी ॥ ४ ॥

२२७३ नाना अवतार घेशी भक्तांसाठीं। कृपाळु जगजेठी म्हणोनियां ॥ १ ॥ मत्स्य कूर्मरूप धरूनियां देव। साधिलें केशवा भक्तकाज ॥२॥ एका जनार्दनीं भक्तांचा कैवारी। गाती वेद चारी तुम्हांलागीं ॥३॥

२२७४ उतरावया धरा भार। घेतला अवतार इहीं जगीं ॥ १ ॥ ते हे बळिये रामकृष्ण। केलें कंदन दैत्यासी ॥ २ ॥ केला जो जो कीर्तिघोष। उच्चारितां निर्दोष होती प्राणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कृपाळु। भक्त स्नेहाळु समर्थ ते ॥ ४ ॥

२२७५ उतरावया धरा भार। धरी अवतार कृपाळु ॥ १ ॥ पाळीतसे भक्तलळा। नोहे वेगळा वेगळीक ॥ २ ॥ जया आवडे जें कांहां। देतां न म्हणे थोडें कांहीं ॥ ३ ॥ पुरवी इच्छा जैसी आहे। मच्छ कच्छ तयासाठीं होये ॥ ४ ॥ ऐसा कृपेचा कोंवळा। एका जनार्दनीं पाहूं डोळा ॥ ५ ॥

## अद्वैत

### जीवशिव–ब्रह्म–ऐक्य.

२२७६ नोहे ब्रह्मज्ञान लेंकुरांचा खेळ। अवघाचि कोल्हाळ आशाबद्ध ॥ १ ॥ वाढवुनी जटा म्हणती ब्रह्मज्ञानी। परी पतनालागुनी न चुकेची ॥ २ ॥ लावुनी विभुती बांधूनियां मठा। ब्रह्मज्ञान चेष्टा दाविताती ॥३॥ माळा आणि मुद्रा लेवूनियां सांग। ब्रह्मज्ञान सोंग दाविताती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं संतसेवेवीण। ब्रह्मज्ञान खूण न कळेचि ॥ ५ ॥

२२७७ अष्टांग साधन धूम्रपान अटी। ब्रह्मज्ञानासाठीं करिताती ॥ १ ॥ परी तें न लभे न लभे सर्वथा। वाउग्याची कथा बोलताती ॥ २ ॥ शाब्दिकाचा कुंठित ते ठायीं। वाउगें कांहींबाहीं बोलूं नये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतकृपा होतां। ब्रह्मज्ञान तत्त्वतां रिघे ॥ ४ ॥

२२७८ ब्रह्मज्ञानालागीं ब्रह्मादिक पिसे। तें तुम्हां आम्हां कैसें आकळेल ॥ १ ॥ प्रत्यक्ष परब्रह्म श्रीरामचंद्र। वसिष्ठ मुनींद्र गुरु त्याचा ॥ २ ॥ कृष्ण बळीराम सांदीपना शरण। तेणें गुह्य ज्ञान कथियेलें ॥३॥ प्रत्यक्ष वामांकीं असोनि पार्वती। वेळोवेळां विनंति करीतसे ॥ ४ ॥ सुलभ नव्हे देवा सुलभ नव्हे जीवा। सुलभ गौरवा न कळेची ॥५॥ एका जनार्दनीं श्रीगुरुवांचून। ब्रह्मज्ञान खूण न कळेची ॥ ६ ॥

२२७९ ब्रह्मज्ञानासाठीं वेदशास्त्र पुराण। करितां श्रवण नातुडेचीं ॥ १ ॥ नातुडेचि कदा गीता भागवती। वाचितां हो पाथी जन्मवरी ॥२॥ द्वारकापट्टण क्षेत्र वाराणसी। करितां तीर्थाटनासी प्राप्त नोहे ॥३॥ प्राप्त नोहे गुरुमंत्र तंत्र घेतां। शब्दज्ञान कथितां प्राप्त नोहे ॥ ४ ॥ ज्यासी पुनरावृत्ति स्थिर नोहे बोध। अखंडीत भेद मनामाजीं ॥ ५ ॥ ज्यावें जन्मांतर सरूनियां जाये। तेथें स्थिर होय गुरुबोध ॥ ६ ॥ एका जनार्दनीं ऐसा जो का पुरुष। कोटीमाजीं एक ब्रह्मज्ञानी ॥ ७ ॥

२२८० ब्रह्मज्ञान वाचे सांगतां नये। जें कृपा होये श्रीगुरूची ॥ १ ॥ लाभेल लाभेल ब्रह्मज्ञान क्षणीं। वाउगी कहाणी बोलुनी काय ॥ २ ॥ हृदयींच बोध ठसतां अंतरीं। कामक्रोध वैरी पळताती ॥ ३ ॥ तैसें ब्रह्मज्ञान कळलियावरी। सर्वभावें वैखरी गुण वाणी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं वंदूं गुरुपाय। आणिक उपाय नाहीं नाहीं ॥ ५ ॥

२२८१ ब्रह्मज्ञानाची कसवटी। अनुभव नाहीं पोटीं। बोला चावटी। वाउगी बापा ॥ १ ॥ शुद्ध ब्रह्मज्ञान। एक आत्मा भूतमात्रीं प्रमाण। विनोदें छळण। कवणाचें न करी ॥ २ ॥ जीव शिवा नाहीं भेद। अवघा नित्य परमानंद। आनंदाचा कंद। तोचि ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धर्म। भाविकांसी सुधर्म। अभाविकांसी भ्रम। जाणिवेचा ॥ ४ ॥

२२८२ ब्रह्मज्ञानासाठीं। हिंडताती पाठोपाठीं ॥१॥ नोहे नोहे वा फुकाचें। बोल बोलतां नये साचें ॥२॥ ऐसें आहे तैसें आहे। वाउगा तो भ्रम पाहे ॥ ३ ॥

जनार्दनकृपा पूर्ण । तैंचि कळे ब्रह्मज्ञान ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । चालून येईल ब्रह्मज्ञान ॥ ५ ॥

२२८३ वाउगे ते बोल बोलती चावटी । ब्रह्मज्ञान कसवटी अंगीं नाहीं ॥ १ ॥ संसारीं असोनि अलिप्त नलिनी । तैसा ब्रह्मज्ञानीं विरक्त तो ॥ २ ॥ आकाशमंडळीं रवि तो भ्रमला । परी रांजणीं बिंबला नाथिलाची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रसादावांचुनी । ब्रह्मज्ञान मनीं न ठसे कधीं ॥ ४ ॥

२२८४ अनुतापाविण । नोहे कदा ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ हें तो मागील रहाटी । अनुताप घ्यावा पोटीं ॥ २ ॥ अनुतापावांचून । कधग तरलासे जाण ॥ ३ ॥ अनुताप नाहीं पोटीं । वायां बोलूं नये गोष्टी ॥ ४ ॥ अनुतापांवाचून जाण । नाहीं नाहीं ब्रह्मज्ञान ॥ ५ ॥ एका जनार्दनीं अनुताप । होतां निवारे त्रिविधताप ॥ ६ ॥

२२८५ निर्गुण निर्विकारु । तोच जगीं पैं ईश्वरु ॥ १ ॥ नित्य निर्विकल्प देख । सदा वाहे समाधीसुख ॥ २ ॥ ऐसें ब्रह्मज्ञान जोडे । तैं गुरुकृपा तेथें घडे ॥ ३ ॥ कापूर घातलीया जळीं । स्वयें नुरेची परिमळीं ॥ ४ ॥ एकपणें तो एकला । एका जनार्दनीं देखिला ॥ ५ ॥

२२८६ वर्म जाणे तो विरळा । तयांचीं लक्षणें पैं सोळा । देहीं देव पाहे डोळां । तोचि ब्रह्मज्ञानी ॥ १ ॥ जन निंदो अथवा वंदो । जया नाहीं भेदाभेद । विधिनिषेधांचे शब्द । अंगीं न बाणती ॥ २ ॥ कार्य कारण कर्तव्यता । हें पिसें नाहीं सर्वथा । उन्मनी समाधी अवस्था । न मोडे जयाची ॥ ३ ॥ कर्म अकर्माचा ताठा । न बाणेचि अंगीं वोखटा । वाउग्या त्या चेष्टा करीना कांहीं ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं । तोचि एक ब्रह्मज्ञानी । तयाचे दरुशनीं । प्राणीयासी उद्धार ॥ ५ ॥

२२८७ जप तप निष्ठा नेम । ऐसा साधिला दुर्गम ॥ १ ॥ तरी ब्रह्मज्ञान नये हातां । क्रोध भरे अधिक चित्ता ॥ २ ॥ ब्रह्मज्ञानाची प्रौढी । न घडेचि अर्धघडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । कोठें नाहीं वुजेपण ॥ ४ ॥

२२८८ निरपेक्ष निर्द्वंद्व तोचि ब्रह्मज्ञानी । नायकेचि कानीं परापवाद ॥ १ ॥ सर्वदा सबाह्य अंतरीं शुचित्व । न देखे न दावी महत्त्व जगीं वांया ॥ २ ॥ एका जनार्दनीं पूर्णपणें धाला । शेजेचा मुराला रसीं उतरे ॥ ३ ॥

२२८९ येणेंचि आश्रमें साधती साधनें । तुटतीं बंधनें यमपाश ॥ १ ॥ काया क्लेश न करणें व्रत तप दान । न लगे हवन तीर्थाटन ॥ २ ॥ संतांचा सांगात गावें रामनाम । सुखें सुख विश्राम लाभे तुजसी ॥ ३ ॥ प्रपंच परमार्थ ऐक्य रूपें दोन्ही । तोचि ब्रह्मज्ञानी मनीं समजा ॥ ४ ॥ व्यापक तो जगीं व्यापुनी निराळा । एका जनार्दनीं वेगळा सुखदुःखां ॥ ५ ॥

२२९० भाव अभावना निमाली अंतरीं । वायां हावभरी नाहीं मन ॥ १ ॥ काम क्रोध ज्याचे दमोनियां गेले । इंद्रियें समरसलीं एके ठायीं ॥ २ ॥ एकपणें सर्व होऊनियां मेळा । रतलें गोपाळचरणीं मन ॥ ३ ॥ तोचि ब्रह्मज्ञानी जगामाजीं धन्य । एका जनार्दन चरण वंदी ॥ ४ ॥

२२९१ भक्तीचे उदरीं जन्मलें ज्ञान । भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान ॥ १ ॥ भक्ति तें मूळ ज्ञान तें फळ । वैराग्य केवळ तेथींचें फूल ॥ २ ॥ फूल फळ दोन्ही येरयेरा पाठीं । ज्ञान वैराग्य तेविं भक्तीचे पोटीं ॥ ३ ॥ भक्तीविण ज्ञान गिंवसिती वेडे । मूळ नाहीं तेथें फळ केवि जोडे ॥ ४ ॥ भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन । भक्ति माता तया करीतसे जतन ॥ ५ ॥ शुद्ध भक्तिभाव तेथें तिष्ठे देव । ज्ञानासी तो ठाव सुखवस्तीसी ॥ ६ ॥ शुद्ध भाव तेथें भक्तियुक्त ज्ञान । तयाचेनि अंगें समाधी समाधान ॥ ७ ॥ एका जनार्दनीं शुद्ध भक्ति क्रिया । ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पाया ॥ ८ ॥

२२९२ नित्य काळ जेथें नामाचा घोष । तेथें जगन्निवास लक्ष्मीसहित ॥ १ ॥ ब्रह्मज्ञान तेथें लोळतें अंगणीं । सेवुनी पायवणी घरीं राहे ॥ २ ॥ विष्णुदास तयाकडे न पाहती फुका । नाम मुखीं देखा रामकृष्ण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा ज्याचा नेम । तया घरीं पुरुषोत्तम सदा वसे ॥ ४ ॥

२२९३ विष्णुदासा घरीं ब्रह्मज्ञान लोळे । म्हणतसे बळें घ्या घ्या कोणी ॥ १ ॥ आरुष सावडे मुखीं नाम जया । ब्रह्मज्ञान तया विनवितसे ॥ २ ॥ माझा अंगिकार करा संतजन । ऐसें ब्रह्मज्ञान कींव भाकी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांचे चरणीं । होउनी दीनवदनीं कींव भाकी ॥ ४ ॥

२२९४ अर्थ तो विवाद ज्ञान ते उपाधी । आम्हां उघड समाधी नाममात्रें ॥ १ ॥ हेंचि निरु-

पण उद्धवा श्रीकृष्ण । सांगतसे खूण जीवीची ते ॥ २ ॥ स्तुती अथवा निंदा परस्त्री परधन । तेथें कदा मन घालूं नये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हेंचि ब्रह्मज्ञान । यापरतें साधन आन नाहीं ॥ ४ ॥

२२९५ असोनि कुळींचा हीन । परी ज्यासी ब्रह्मज्ञान । त्यासी तिन्ही देवादि सुरगण । वंदिताती ॥१॥ त्याची मृत्युलोकीं सेवा । जयासी घडे सदैवा । मा ब्राह्मण भूदेवा । असंख्य पुण्य जोडे ॥ २ ॥ तयासी वस्त्र अन्न । जठर करिती तृप्त जाण । त्यासी वैकुंठादि आंदण । देव देतो ॥ ३ ॥ त्यासी जो करी शीतळ । त्यासी पुण्य जोडे सकळ । एका जनार्दनीं केवळ । तोची साधु ॥ ४ ॥

२२९६ बहु पुण्य होय गांठीं । तैच ऐशियाची भेटी । तयाचिये कृपादृष्टी । सहज ब्रह्म लाभे मनुष्या ॥ १ ॥ देहीं असोनि विदेही । करुनी कर्म अकर्ते पाही । वैषम्याची नाहीं । वाटाघाटी तयांसी ॥ २ ॥ देहीं कष्ट किंवा सुख । शीत उष्ण समान देख । वा उगाचि शोक । नाहीं जया मानसीं ॥ ३ ॥ तोचि जाणा ब्रह्मज्ञानी । वायां न बोले बोलोनी मौनी । लक्ष्मी सदा परध्यानीं । एका जनार्दनीं तो धन्य ॥ ४ ॥

२२९७ ब्रह्मज्ञानाचा क्षण । विचारी ज्याचें मन । त्याचीं महत्पापें जळोन । गेलीं स्वयें ॥ १ ॥ गंगादि सप्त सागर । पुष्करादि तीर्थें अपार । व्रतादि पवित्र । पर्वकाळ जे ॥ २ ॥ वेदशास्त्र पुराण । त्यासी घडलें श्रवण । अश्वमेधादिक यज्ञ । केले जेणें ॥ ३ ॥ मेरुसमान सुवर्णी । अनर्घ्य रत्न मेळवोनी । भरूनी दिधली मेदिनी । ब्राह्मणासी ॥ ४ ॥ कामधेनूच्या थाटी । कल्पतरू कोट्यानकोटी । कौस्तुभादि राशी । दिधली तेणें ॥५॥ अमृतासमान । तेणें दिधलें अन्न । त्रैलोक्यीचे ब्राह्मण । तृप्त केलें ॥६॥ सत्य कैलास वैकुंठ । सप्त पाताळादि श्रेष्ठ । गरुडादि वरिष्ठ । दिधलीं वहनें ॥ ७ ॥ ऐसें एक क्षणें प्राप्त । ज्याचें सोहं ध्यानीं चित्त । तयासी सुकृत । इतुकें जोडे ॥ ८ ॥ जो अहोरात्र मनीं । ब्रह्मज्ञानी चिंतनीं । एका जनार्दनीं । तोचि वंदा ॥ ९ ॥

२२९८ ऐसें हें वचन ऐकोन । श्रोतीं केलासे प्रश्न । कैसें अपरोक्ष ज्ञान । सांगा मज ॥ १ ॥ हा शब्द अलौकिक । श्रवणीं झालें सुख । मग जनार्दनाचा रंक । बोलता झाला ॥२॥ पंचभूतें तिन्ही गुण । स्थूल सूक्ष्म कारण । हें अपरोक्ष अज्ञान । पंचीकरण ॥३॥ यासी जो जाणता । साक्षित्व देखतां । तोचि अपरोक्ष ज्ञाता । जाणावा पैं ॥ ४ ॥ सोहमाचा साक्षात्कार । एका जनार्दनीं निवडोनि साचार । वस्तूचें घर । दाखविलें ॥ ५ ॥

२२९९ सद्गुरु तोचि जाण । जो अपरोक्ष सांगे ज्ञान । देहत्रय निरसून । परमपदीं ठेवी ॥ १ ॥ जेणें देहत्रय निरसिलें । ज्ञान अग्नीमाजीं जाळिलें । अच्युतपद प्राप्त केलें । त्यासी वेळ नाहीं ॥ २ ॥ निराकार निरामय । निर्भय तें अद्वय । तयामाजीं लिंगदेह । मरूनियां गेलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्राप्ती । जे लिंगदेहाची होय शांती । मग सायुज्य मुक्ती । पायां लागे ॥ ४ ॥

२३०० तरी सोहं नव्हे याग । सोहं नव्हे त्याग । आणि अष्टांग योग । सोहं नव्हे ॥१॥ सोहं नव्हे दान । सोहं नव्हे तीर्थ । मंत्रादि दीक्षित । सोहं नव्हे ॥२॥ सोहं नव्हे वारा । पंचभूतांचा पसारा । सोहंच्या विचारा । साधु जाणती ॥ ३ ॥ एका जनार्दनें । आपण आपणासी जाणणें । साक्षित्व देखणें । तेंचि सोहं ॥ ४ ॥

२३०१ सोहं नव्हे नाद । कर्णद्वयाचा भेद । लक्ष्य भ्रूमध्य । नव्हे सोहं ॥१॥ चवदा चक्रें बावन्न मात्रा । अकार उकार मकारा । यासी जाणें अर्धमात्रा । तेंचि सोहं ॥ २ ॥ अधिष्ठानीं सहासें जप । स्वाधिष्ठानीं सहासें जप । तितुकें ओळखा निःशेष । मणीपुरीं ॥३॥ अनुहातीं सहस्र । विशुद्ध अग्नी चक्र सहस्र । तीन ठायीं तीन सहस्र । जप होय ॥ ४ ॥ एकविस सहस्र साशत । हें अवघेंचि मारुत । त्यासी सोहं म्हणत । ते नाडिले ॥ ५ ॥ एका जनार्दन । सोहं नोहे पवन । पवनाचें वर्तन । सोहं सत्ता ॥ ६ ॥

२३०२ सोहं नव्हे प्रपंच ज्ञान । अंतःकरण चतुष्टय योजन । इंद्रियांचें वर्तन । नव्हे सोहं ॥ १ ॥ सोहं नव्हे विषयपंचक । सोहं नव्हे त्रैशोधक । सोहमाचा विवेक । विरळाचि जाणें ॥ २ ॥ सकार जाण माया । हंकार पुरुष दिप्यमय । शबल शुद्ध द्वये । जाणावें पैं गा ॥ ३ ॥ ब्रह्मा विष्णु महेश्वर । हा शबल पैं साकार । शुद्ध तो हंकार । ईश्वर पैं ॥ ४ ॥ स्थूल सूक्ष्मकारण । हा सकारचि जाण । हकार तो महाकारण । ज्ञानरूप ॥ ५ ॥ एका जनार्दनीं तुर्या । सोहं ते दैवी माया । साक्षित्वें जाण असे श्रोतियां । सांगितलें ॥ ६ ॥

२३०३ अभ्यासी द्रष्टा आटला । अहं सोहंचा घोट भरला । साक्षित्व देखोनि विराला । वस्तूमाजीं ॥ १ ॥ जो जो वस्तू झाला केवळ । तैंचि अंतःकरण निश्चळ । त्रिगुणाची तळमळ । हारपोनि गेली ॥ २ ॥ हारपलें ब्रह्मांड । हारपलें पिंड अंड । वस्तु झाला अखंड । त्यासी खंड नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जाण । द्वैत गेलें मावळोन । मग वस्तुचि परिपूर्ण । भरली असे ॥ ४ ॥

२३०४ या देहा अमंगळा । पासुनी आत्मा वेगळा । ऐसा ज्ञानाचा डोळा । प्रत्यक्ष दिसे ॥ १ ॥ ज्ञान म्हणजे शुद्ध सत्त्वगुण । जेथें द्वैत प्रकृतीचें अधिष्ठान । जीपासाव सव्विस लक्षणें । बोलिलें षोडशाध्यायीं ॥ २ ॥ ते दैवी प्रकृतीचे घरीं । परमात्मा राज्य करी । तो जयातें अंगीकारी । तो सुटला गा ॥३॥ या पुरुषाचें बेचाळीस कुळ । पद पावलें अढळ । आत्मतत्त्वीं सकळ । मिळणी आली ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तेचि भेटी । जे अहंभावाची सुटे गांठी । तो दैवीप्रकृतीचे मुगुटीं । सहजचि बैसे ॥ ५ ॥

२३०५ पिंडीच्या प्रळयासी सांगेन तुम्हांसी । जो कां या देहासी होत आहे ॥ १ ॥ पृथ्वी बोलिजे प्राणी प्राणरंध्र । परिमळ घेऊनि जाये तें घर ॥ २ ॥ मग तो नेणे सुमनाचा सुवास । पृथ्वी ते अंशें जीवन मिळे ॥३॥ रसनेसी स्वाद ते जनवृंदा खाद्य । जीवनाचा जो स्वाद तोचि मिळे ॥ ४ ॥ असोनियां नेत्र न देखे मंत्र । नयना ते दीप्त पवन मिळे ॥ ५ ॥ नाडीचा तो त्वरित निघोनि जाय मारुत । सेवितां तो कोलीत या शुद्धी नाहीं ॥६॥ कंठा खालता काळ तो धुंडीत । मेळवोनि समस्त एक करी ॥ ७ ॥ एका जनार्दनीं मेळा जो झाला । काळ घेऊनि गेला लिंगदेहा ॥ ८ ॥

२३०६ आतां उरलें तें मत । तेथें वस्तु सदोदित । त्यासी नाहीं अंत । कवणे काळीं ॥ १ ॥ महाकारण शरीर । ज्याचा अभिमानी ईश्वर । मूर्ध्नीं तें घर । ब्रह्मांडींचें ॥ २ ॥ तेथें नाहीं काळ । ज्यासी नाहीं वेळ । उत्तम स्थळ । पवित्र असे ॥ ३ ॥ प्रभा आणि ज्योती । रत्न आणि दीप्ती । किरण आणि गभस्ती । एकरूप ॥४॥ तैशी वस्तु आणि ईश्वर । एक पैं प्रकार । पृथ्वी अंबर । दोन्ही एक ॥५॥ तैशा शरीरा ज्योती । आदी मध्य अंती । वस्तु ते तत्त्वार्थी । भरली असे ॥६॥ देह जावो अथवा राहो । आम्ही वस्तूचि आहों । एका जनार्दनीं भावो । दृढ झालिया ॥ ७ ॥

२३०७ मृत्तिका आणि अन्न । देहासी दहन । वस्तूतें व्यापून । घेतली दोनी ॥१॥ अग्निमाजीं अग्निरूप । मृत्तिकमाजीं मृत्तिकारूप । जैसें आपीं आप । मिळोनी गेलें ॥ २ ॥ वस्तु नाहीं एकदेशी । ते सर्वत्र समरसी । जया प्रकाशीं । त्रैलोक्य वर्ते ॥ ३ ॥ तैसे मेले आणि जीत । हें अज्ञान भासत । ते वस्तूतें नांदत । दोहींमाजीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं । विचारूनि ज्ञानी । संशयापासोनी । मुक्त झाले ॥५॥

२३०८ साक्षित्वें जीत त्याचा होय अंत । विचारें मुरत वस्तुमाजीं ॥ १ ॥ पिंडीचे ते दोन्हीं ब्रह्मांडींचे दोन्ही । हे प्रळय पुराणीं बोलिलेती ॥ २ ॥ प्रळय आत्यंतिक जेथें संहारत । विवेक आपणचि येत सर्वां ठायीं ॥ ३ ॥ मग प्रचीत सहज बरवें वाईट वोज । निपजे तेथें दुजें भाव नाहीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भला आपणचि ईश्वर झाला । तो भरुनि उरला साक्षित्वेंसी ॥ ५ ॥

२३०९ निरसुनी ज्ञान म्हणविती विज्ञान । त्याहुनी अभिन्न स्वरूप माझें ॥ १ ॥ पिंड आणि ब्रह्मांड म्हणजे अखंड । याहुनी उदंड स्वरूप माझें ॥ २ ॥ माया आणि ममत्व शोधुनी शुद्ध सत्त्व । सत्त्वाचें निज सत्त्व स्वरूप माझें ॥ ३ ॥ सद् आणि चिद् म्हणती आनंद । त्याहूनि अभेद स्वरूप माझें ॥४॥ एका जनार्दनीं एकपणातीत । चित्ताचें अचिंत्य स्वरूप माझें ॥ ५ ॥

२३१० नेत्रींची बाहुली वस्तुरूप झाली । पहातां सोहं मेळी चिदानंद ॥१॥ अर्ध मात्रा स्थान नयनींचें निधान । मसुरेप्रमाण महावर्ण तेथें ॥ २ ॥ सुषुम्ना कुंडलिनी कासीया सांगाती । नयनीं व निश्चित्तीं बिंदुरूप ॥ ३ ॥ सर्वगत डोळा ती जगामाझारीं । जगाचिया हारी डोळियामाजीं ॥ ४ ॥ दाखवी संपूर्ण स्वामी जनार्दन । एका एकपण नाहीं जेथें ॥ ५ ॥

२३११ छत्तिसांतील चेतना । तोची पुरुष जाणा । हेंचि निवडुनी अर्जुना । सांगितलें ॥ १॥ तेची दैवी प्रकृती माया । तेची बोध आणि तुर्या । ऐसें धनंजया । सांगितलें ॥ २ ॥ तेची ॐकार अर्धमात्रा । तेची महाकारण जाणा परा । एका जनार्दनीं सारा । निधाडा केला ॥ ३ ॥

२३१२ सांगतां ते खूण न बिंबे पोटीं । वाया आटाआटी करुनी काय ॥ १ ॥ जे गुरूचे दास पूर्ण अधिकारी । ब्रह्मज्ञान सरी तया लाभे ॥ २॥ अभ्यास

पूर्वींचा पुण्यलेश जन्मावा । तैं ब्रह्मज्ञानाचा लाभ होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण कृपा होतां । सहज सायुज्यता पाठीं लागे ॥ ४ ॥

२३१३ जगाचिये नेत्रीं दिसे तो संसारीं । परि तो अंतरीं स्फटिक शुद्ध ॥ १ ॥ घायांचि हाव न धरी कांहीं पोटीं । वाउगी ती गोष्टी न करी जगीं ॥ २ ॥ स्त्रिया पुत्र धन नाहीं तेथें मन । इष्टमित्र कारण नाहीं ज्याचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रपंच परमार्थ । सारिखाचि होत तयालागीं ॥ ४ ॥

२३१४ अभेदाचे उत्तम गुण । तेचि भक्ति तेंचि ज्ञान ॥ १ ॥ अभेद भक्ति वाडेंकोडें । देवा आवडे तें गोड ॥ २ ॥ अभेद भजनीं सुख देवा । एका जनार्दनीं विसरे जीवा ॥ ३ ॥

२३१५ अभेद भक्तांचें निजमंदीर । तें मज निर्गुणाचें घर ॥ १ ॥ निर्गुणासी घर ठावो । बोलणें हेंचि दिसे वावो ॥ २ ॥ सांडूनि आकाराचें ज्ञान । निराकारी सुखसंपन्न ॥ ३ ॥ सुखें सुखासी मिळणी । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

२३१६ सोहमाची साक्षा मंत्र तोचि दीक्षा । तयाची परीक्षा सांगा मज ॥ १ ॥ सोहमाचें ज्ञान निवडोनियां खूण । अनुभव मज जाण करावा जी ॥ २ ॥ ऐसे श्रोते जन विनंति करून । एका जनार्दन नमस्कारिला ॥ ३ ॥

२३१७ देखो तितुकें आहे ब्रह्म । वायां सांडी कीं भवभ्रम ॥ १ ॥ पोटीं नाहीं परमार्थ । धरिती स्वार्थाचा अर्थ ॥ २ ॥ अर्थ नाहीं जयापाशीं । अनर्थ स्पर्शेना तयासी ॥ ३ ॥ अर्थापाशीं असत्य जाण । एका जनार्दनीं शरण ॥ ४ ॥

२३१८ ब्रह्मीं नाहीं भवभ्रांती । ब्रह्मीं नाहीं दिवस राती ॥ १ ॥ ब्रह्मीं नाहीं रूपवर्ण । ब्रह्मीं नाहीं काळ कारण ॥ २ ॥ ब्रह्मीं नाहीं ध्येय ध्यान । ब्रह्मीं नाहीं ज्ञेय ज्ञान ॥ ३ ॥ ब्रह्मीं नाहीं मातापिता । ब्रह्मीं नाहीं देव देवता ॥ ४ ॥ ब्रह्मीं नाहीं वर्णाश्रम । ब्रह्मीं नाहीं क्रियाकर्म ॥ ५ ॥ सर्व देहीं ब्रह्म आहे । एका जनार्दनीं तें पाहे ॥ ६ ॥

२३१९ ब्रह्म निर्गुण निर्विकार । ब्रह्म सगुण साकार । ब्रह्म रूप चराचर । सच्चिद्घन शुद्ध हें ॥ १ ॥ ब्रह्म अचिंत्य अव्यक्त । ब्रह्म अच्छेद्य सदोदित । ब्रह्म परात्पर पूर्ण भरित । समरस आणिजे ॥ २ ॥ एका जनार्दनीं ब्रह्म । प्राप्तीलागीं हेंचि वर्म । सद्गुरूचें पादपद्म । दृढभावें धरावें ॥ ३ ॥

२३२० निरालंब सहज माय पहातां कैसें । सबाह्य अभ्यंतर व्यापुनी पूर्ण अखंड दिसे । लक्ष वो अलक्ष पाहतां देहीं देह न दिसे । निर्गुण गुणासी आलें अवघें ब्रह्मचि दिसे ॥ १ ॥ ऐसा हा व्यापकु हरि आहे सर्वां ठायीं । ज्ञानांजन लेऊनि पाहे देहींच्या देहीं ॥ धृ० ॥ पिंड ब्रह्मांड व्यापुनी अतित कैसा । आदि अंत ज्याचा न कळे श्रुति मुराडिल्या कैशा । नेति नेति शब्द बोलती हरि अगाध ऐसा । म्हणवोनि गुरुमुखें दृढ विश्वास धरीं ऐसा ॥ २ ॥ प्रसिद्ध आत्मा देखोनि विरालें मन । मनचि उन्मन जालें तेथें कैंचें ज्ञान । ज्ञान ध्यान हेंहि न कळे अवघा जनार्दन । एका जनार्दनीं शरण कायावाचामनें जाण ॥ ३ ॥

२३२१ वेद वंदे ब्रह्म एक । स्वानुभवें तैसेंच देख ॥ १ ॥ हा वेदाचा गौरव । कोण घेतो अनुभव ॥ २ ॥ वेद ब्रह्मस्थिती । कोण प्रतिपाद्य करिती ॥ ३ ॥ वेदीं ब्रह्माचें ब्रह्मपण । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

२३२२ वेदवचनें सुतक पावे । ब्रह्म म्हणतां ब्रह्म नव्हे ॥ १ ॥ वेद न कळेचि साचार । देहबुद्धि अविचार ॥ २ ॥ सकळ ब्रह्म पैं अद्वैत । वेद परिसोनि ना तुटे द्वैत ॥ ३ ॥ श्रुती सांगती परमार्था । हिंसा न करावी सर्वथा ॥ ४ ॥ संकल्प नाशी तो संन्यासी । तेथें तो कल्पना कायसी ॥ ५ ॥ वेद बोले सर्वां ठायीं । एकावांचुनी दुजे नाहीं ॥ ६ ॥ एका जनार्दनीं बोधु । नाहीं तंव न कळे वेदु ॥ ७ ॥

२३२३ नाहीं नामरूप गुण कर्म । पहातां अवघें परब्रह्म ॥ १ ॥ पिंडीं आणि ब्रह्मांडीं । भरला असे नवखंडीं ॥ २ ॥ रिता नाहीं कोठें ठाव । जिकडे पाहे तिकडे देव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । अवघा माझा गुरुराव ॥ ४ ॥

२३२४ मी ब्रह्म जाहलों म्हणे अंतरीं नव्हे ऐसें कांहीं । ब्रह्मावीण अनु न दिसे कोठें तितुकें ब्रह्म पाही ॥ १ ॥ होय नाहीं ऐसा संशयचि नाहीं निश्चयेंसी तेंचि आहे । आहे तेंचि ब्रह्म नाहीं तेंचि ब्रह्म अवघेंचि ब्रह्म पाहे ॥ २ ॥ वर्णाश्रम धर्म साचार मानुनी यथाविधी आचरती । स्वमताचा देहीं अभि-

मान धरुनी पृथक पृथक वाद करिती ॥ ३ ॥ पाषांडाच्या बळें होताती तोंडागळें भेदें एाचि हें आम्हीं ना हो म्हणती । सर्वदा तरी ब्रह्म आहे ऐसें न कळे तयांप्रती ॥ ४ ॥ जळेंशी लवण वेगळें नाहीं जाण । तैसें आदिमध्य अंतीं ब्रह्मचि असे तेथें कैंचें न्यून पूर्ण ॥ ५ ॥ कर्ता कार्य कर्म अभिन्न तेथें बद्ध आणि मुक्त कवण । एका जनार्दनीं ऐक्यपणें मुळींच नाहीं भिन्न ॥ ६ ॥

२३२५ शुद्ध ब्रह्मज्ञानाचा धडा । पंचभूतांचा खचला खडा । देह चतुष्टय पुसिला वाडा । धन्य धडफुडा आत्मा मी ॥ १ ॥ शुद्ध ब्रह्मज्ञानाचा मार्ग । मृत्यु पातला सरलें सर्ग । पिंड ब्रह्मांडाचे दुर्ग । विरोनि सर्व आत्मा मी ॥ २ ॥ ॐनमोजी जगद्गुरु । सर्वां भूतीं साक्षात्कारु । ब्रह्मा विष्णु महेश्वरु । ॐकार तो बोळखीजे ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडाचा टिळा । लाउनी बैसे ब्रह्म कपाळा । त्यांतही बळी तरंग जळा । वरी तेविं ब्रह्मांड ॥ ४ ॥ ऐशा अनंत विभूती । दिगंबर अंगीं चार्चिती । घडीनें घडी लेप देती । पुसोनी जाती क्षणक्षणां ॥ ५ ॥ तैसें नव इंद्रियां सबाह्य । ब्रह्म कोंदलें अनुभव पाहे । घट जळीं बुडोनि राहे ऐसा आहे दृष्टांत ॥ ६ ॥ गगन ग्रासोनि अपार । तैसा मी आहे सर्वेश्वर । अनंत ब्रह्मांडीं अवतार । तरंग फिरे मजवरी ॥ ७ ॥ तुम्हाआम्हा मध्यें जें अवकाश । तें सबाह्य ब्रह्म सावकाश । अनंत ब्रह्मांडें फुटती तयास । निराभास निर्गुण ॥ ८ ॥ हें ब्रह्म हे माया । का बोट लाउनी दाखऊं शिष्यराया । आधारापासोनी सहस्त्रदळ काया । बुडे ठाया तें ब्रह्म ॥ ९ ॥ ब्रह्म म्हणजे अकाश । कीं ब्रह्म म्हणजे महादाकाश । कीं ब्रह्म म्हणजे निर्गुण निराभास । आदि अवकाश ते ब्रह्म ॥१०॥ ब्रह्म म्हणजे तें पोकळ । कीं ब्रह्म म्हणजे आकाशाहून पातळ । कीं ब्रह्म म्हणजे शून्य सकळ । मिथ्या मूळ तें ब्रह्म ॥ ११ ॥ सोहं नाद सर्वांसी । विश्वनाथ विश्वासी । अमृतफळ अंबियासी । लक्ष चोऱ्यांसी लोंबती ॥१२॥ तैसें जन फळ जनार्दनीं लोंबे । सोहं देठ दोहींकडे झोंबे । फळ दे वृक्ष लोंबे । अद्वैत बिंबलें एका जनार्दनीं ॥ १३ ॥

२३२६ ज्या सुखासी नाहीं अंत । तें सुख पाहे हृदयांत ॥ १ ॥ सुख सुखाची मिळणी करुनी । घेईं आपुलें मर्मी ॥ २ ॥ सुखें सुखानुभव । हाचि ब्रह्मविद्येचा भाव ॥ ३ ॥ सुखें सुखाची मांडणी । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

२३२७ ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शुद्र वर्ण चारी । हें स्थान मान निर्धारीं तो मी ॥ १ ॥ ब्रह्मचारी गृहस्थ संन्यासी वानप्रस्थ । आश्रमधर्म समस्त नव्हें मी ॥२॥ बावन मात्रा चौदा चक्रें सहा शत एकविस हजार । स्थान मान पवित्र नाहीं मज ॥ ३ ॥ स्थूळ सूक्ष्म कारण महाकारणाचें ज्ञान । चहूं देहाचें बंधन नाहीं मज ॥ ४ ॥ ओहं सोहं दोन्ही वेगळा यापासुनी । चहूं मुद्रेचे ध्यानीं नाहीं गा मी ॥ ५ ॥ या सकळातें जाणता विरळा पैं पहातां । एका जनार्दनीं तत्त्वतां निजबोधा तो मी ॥ ६ ॥

२३२८ ज्यासी आत्मलाभ झाला । त्याचा देह प्रारब्धें वर्तला । कायावाचामनें आपुला । व्यापार करिताती ॥ १ ॥ हातें हाणितलें तोंडावरी । तेथें इंद्र अग्नि झुंजारी । पैं शून्य बोले परस्परीं । अग्नीसी इंद्र ॥२॥ हात नमस्कारी चरण । तेथें सुसरी ते झाले इंद्रियमन । हातां त्वचेसी केलें मर्दन । तो वामन वायु ॥३॥ शिश्न मुखामाजीं मुतती । तेथें भांडती वरुण प्रजापती । तेथें नैऋत्य वसती । अश्विनीदेवो ॥ ४ ॥ कीं मुखीं गालीप्रदान । ते ऐको पैं श्रवण । तेथें दिशा आणि अन्न । भांडती पैं ॥५॥ कीं तापले नेत्रींचे पाती । तेजें सूर्या सूर्य भांडती । ऐसें इंद्रियें वर्तती । आपुलें परी ॥ ६ ॥ ऐसा विवेक ज्यासी कळला । त्याचा कामक्रोध भस्म झाला । तेणें शांतीचा रोविला । ध्वजस्तंभु ॥ ७ ॥ त्याचा विवेक करुनी । तो वर्ते जनीं वनीं । परी आत्मसुखाचा धनी । झाला तोचि एक ॥ ८ ॥ एका जनार्दनीं या विवेकें । राज्य केलें भीष्में जनकें । भिक्षुका आत्मसुखें । पावले तेणें ॥९॥

२३२९ भगवद्भावो सर्वां भूतीं । हेंचि ज्ञान हेंचि भक्ती । विवेक विरक्ती । याचीं नांवें ॥ १ ॥ हें सांडूनि विषयध्यान । तेंचि मुख्यत्वें अज्ञान । जीवींजीवा बंधन । येणेंचि दृढ ॥ आठव तो परब्रह्म । नाठव तो भवभ्रम । दोहींचें निजवर्म । जाण बापा ॥ ३ ॥ आठव विसर चित्तीं । जेणें जाणिजेती । तेंचि एक निश्चिती । निजरूप ॥ ४ ॥ स्मरण तेंचि निजमुक्ती । विस्मरण तेचि अधोगती । ऐसें पुराणें गर्जती । बाह्या उभारुनी ॥५॥ एका जनार्दनीं । सहज निजबोध मनीं । सबाह्याभ्यंतरीं । पूर्ण परमानंद ॥६॥

२३३० लोह तांबें सोनें। रुपें माती पाषाण। टवाळी भिन्न। निर्मित होती ॥ १ ॥ वाती दोह भरती। पदार्थ वेगळे दिसती। परि तयामाजीं ज्योती। असे एकरूप ॥ २ ॥ तैसे अठरा वर्ण। अंत्यजादि ब्राह्मण। मेरु मशक धरून। भरले जीव ॥ ३ ॥ यांचें शरीर भिन्न। आत्मा एक परिपूर्ण। नामरूप जाती वर्ण। नाहीं तेथें ॥ ४ ॥ आत्मा स्वयंप्रकाश ज्योती। जे ज्योती तो तूर्या म्हणती। ती तूर्या ज्ञानशक्ति। ईश्वराची असे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं शरण। उजळलें आत्मज्ञान। पदार्थ जाती जळून। क्षणमात्रें ॥ ६ ॥

२३३१ ऐसी मी मी करता। अज्ञानाची अहंता। तेव्हां तैसी ईश्वरसत्ता। वर्तू लागे ॥ १ ॥ सज्ञान अज्ञान। दोघे अदृष्टाधीन। साधुत्वें वर्ते सज्ञान। अज्ञानी अहंकर्ता ॥ २ ॥ अदृष्टाधीन देह। त्यांत ज्ञान मुरुनी जाय। मग द्रष्टा होउनी पाहे। जग ब्रह्मरूप ॥ ३ ॥ तेथें निंदा आणि स्तवन। हारपले दोष गुण। ऐसें एका जनार्दन। सांगतसे ॥ ४ ॥

२३३२ शाब्दिक शब्दाचा करिती कंटाळा। द्वेषाचा उमाळा अंगीं वसे ॥ १ ॥ शब्द ब्रह्मज्ञानें फुगविती अंग। धाउगाची सोंग गर्व वाहाती ॥ २ ॥ सर्वा भूतमात्रीं शब्द तो संचला। न कळे तयाला शब्दभेद ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शब्दाचा भेद। न कळे प्रसिद्ध ज्ञानीयासी ॥ ४ ॥

२३३३ ज्ञानाभिमान विश्वामित्रा। रंभेमागें जाला कुत्रा ॥ १ ॥ ज्ञानाभिमान दुर्वासासी। म्हणोनी शापी अंबऋषी ॥ २ ॥ ज्ञानाभिमान ब्रह्मीयासी। म्हणोनि चोरिलें गाईवत्सांसी ॥ ३ ॥ ज्ञानाभिमान नको देवा। एका जनार्दनीं देईं सेवा ॥ ४ ॥

२३३४ नग घडतां सोनें साचें। न घडतां सोनें पण न वचे ॥ १ ॥ मेघापूर्वीं शुद्ध गगन। मेघ सबाह्य गगनीं जाण ॥ २ ॥ कुलाळ जें भांडें घडीत। त्यासी मृत्तिका नित्य व्याप्त ॥ ३ ॥ सागरीं जे जे उपजे लहरी। तैसा व्यापक श्रीहरी ॥ ४ ॥ जन तोचि जनार्दन। एका जनार्दनीं व्यापक पूर्ण ॥ ५ ॥

२३३५ जैसी फांशाची गति पडे। तैसा सोंगटी डाव पडे। त्याचें कर्तृत्व थाडें। फांशाधीन ॥ १ ॥ झाला देखणा परी। उगला वर्तू लागे शरीरीं। तैसी शक्ति ईश्वरीं। भूतें चळती ॥२॥ अदृश्य वर्तती। तेथें ईश्वराची शबल शक्ति। तेथें आणिकाची मती। काहीं न चले ॥ ३ ॥ यालागीं प्राचीनाधीन। ब्रह्मा विष्णु रुद्र पूर्ण। यांचें कार्यभूत जाण। सृष्ट्यादिक ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जाण। बाधक अदृश्य शक्ति जाण। जैसें ज्याचें प्राचीन। तैसें ते वर्तती ॥ ५ ॥

२३३६ हेंचि वेदोक्ति निजसार। आत्मा अविनाश साचार ॥ १ ॥ नाहीं जन्ममरणाचा धाक। बोले शुद्ध बुद्ध ऐसा वेद ॥ २ ॥ श्रुतिशास्त्र तेंहि वदती। आत्मा अविनाश म्हणती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं मरण। मग कैंचें देहीचें स्फुरण ॥ ४ ॥

२३३७ मी तूं ऐसी परी। जैसे तरंग सागरीं ॥१॥ दोहींमाजीं एक जाणा। कृष्ण द्वारावती राणा ॥ २ ॥ तंतु वस्त्र दोनी एक। तैसें जगासी व्यापक ॥ ३ ॥ देवभक्त ऐसी बोली। भ्रांती निरसेनासी जाली ॥४॥ सरिता सागरीं मीनल्या। तैसें होय भ्रांती गेल्या ॥५॥ एका जनार्दनीं कृपा। भ्रांती कैसी जगीं पहा पां ॥६॥

२३३८ जागृती स्वप्न सुषुप्ती। तिही अवस्थांतें प्रकाशिती ॥१॥ जे जागृतीत जागले। तेचि स्वप्नातें चेइले ॥ २ ॥ क्षणें जागृती क्षणें सुषुप्ती। क्षणें एक स्वप्नचि प्रतीती ॥ ३ ॥ सर्व दिसे तितुकें मिथ्याभूत। एका जनार्दनीं शाश्वत ॥ ४ ॥

२३३९ देहीं कैंचें सुख कैंचें दुःख। कैंचा बंध कैंचा मोक्ष ॥ १ ॥ देहीं कोण देव कोण भक्त। कोण शांत कोण अशांत ॥ २ ॥ देहीं कैंची क्रिया कैंचें कर्म। देहीं विराले धर्माधर्म ॥ ३ ॥ देहीं कैंचें शास्त्र कैंचा वेद। कैंची बुद्धि कैंचा बोध ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देह। ब्रह्मीं ब्रह्म होत आहे ॥ ५ ॥

२३४० अहा रे अभाग्या काय केलें। फुकट नरदेह गमाविलें ॥१॥ भजें भजें रामकृष्ण वासुदेवा। धाउगा सांडोनि देईं हेवा ॥ २ ॥ मूळ संकल्प तोडोनियां टाकीं। अहंकार ममता वासना उपाधी शेखीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं टाकुनी परता होय। वाचे सदा गाय वासुदेव ॥ ४ ॥

२३४१ प्रपंचाचें भान। आहे मृगजळासमान ॥ १ ॥ नाथिलेंचि सत्य दिसे। सत्य आहे तें आभासे ॥ २ ॥ मृगजळीं उत्पत्ति नाहीं। पाहतां अवघें मिथ्या पाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। मिथ्या अवघे देह जाण ॥ ४ ॥

२३४२ सागरींची लहरी। मी एक म्हणे सागरीं। तैसा तुझा तूंचि तुजवरी। एकदेशी ॥ १ ॥ शुद्ध

आणि शबल । तूंचि एक सकळ । औट हात केवळ । ते तंव कल्पना तुझी ॥ २ ॥ डोळे झांकून किती पहासी आतौतें । बाहेर न करी ते वोस पाडूं ॥ ३ ॥ सबाह्य संमतु असतां वाडें कोडें । एक देशी थोडें कल्पनेसाठीं ॥ ४ ॥ लेंकुराचे खेळणीं । दिवसा म्हणती जाली रजनी । उठती लटिकें निजोनी । आतां उदयो जाला ॥ ५ ॥ तेथें अखंड प्रकाश पाहो । उदयो अस्त दोन्हीं वावो । तैसा भावो आणि अभावो । एका जनार्दन चरणीं ॥ ६ ॥

२३४३ स्वप्नीं दिसे स्वयेंचि नासे । तैसें काल्पनिक जग भासे ॥१॥ मुळींच मिथ्या मृगजळ । त्यामाजीं नसे शीतळ जळ ॥ २ ॥ पिंपळावरुनी मार्गु आहे । एकोनी वृक्षा वेघों जाये ॥ ३ ॥ ऐसे अभागी पामर । न कळे तयासी विचार ॥ ४ ॥ म्हणोनि शरण जनार्दनीं । एका जनार्दनीं एकपणीं ॥ ५ ॥

२३४४ मृगजळाचे डोहीं निःशेष जळ नाहीं । यापरी माया समुळ मिथ्या पाहीं ॥ १ ॥ माया नाहीं माया नाहीं । जगाचि ब्रह्मरूप पाही ॥ २ ॥ दोराचें सर्पत्व जिताचि मेलें । मायेचि बद्धता तुजाचि तुझेनी बोलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहतां चैतन्यघन । बद्धता समूळ मिथ्या जाण ॥ ४ ॥

२३४५ मृगजळ जेथें नसे । तेथें वसे कोरडें ॥ १ ॥ ऐसा घ्यावा अनुभव । ५दोपदीं भाव जीवासी ॥ २ ॥ जें दिसे तें नासे । ऐसें असे सर्वत्र ॥ ३ ॥ यापरी जाणावें मिथ्यापण । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

२३४६ मृगजळीं पहातां दिसतसे जळ । परी तें कोरडेंचि केवळ ॥ १ ॥ तेवीं दिसे जगदाभास । अवघा मिथ्या साभिलाष ॥ २ ॥ जेथें मिथ्या द्वैत भाविक । पाहतां जनार्दनची एक ॥ ३ ॥ तरंग हरपले पाणी । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

२३४७ दोरा अंगीं जैसा नसता सर्प दिसे । मिथ्या देह तैसा वस्तूवरी आभासे ॥ १ ॥ देह मी नव्हें देह मी नव्हें । देह मी नव्हें माझेनी अनुभवें ॥ १ ॥ घटा वर्तुळ आकाश परी तें महदाकाश । विकारवंत देह चैतन्य विलास ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दो नांवीं एक । देह झाला मेला समूळ मिथ्या देख ॥ ४ ॥

२३४८ आकाशापासोनि वायु झाला । तो गगना वेगळा नाहीं गेला ॥१॥ अग्नीपासुनी जळाचा अंशु । जळापासुनी पृथ्वीप्रकाशु ॥ २ ॥ तैसें कार्य आणि कारण । परस्परें अभिन्न जाण ॥ ३ ॥ जेवीं तंतु आणि पटु । दोन्ही दिसती एकवटु ॥ ४ ॥ साखरेचे नारळ केळ । परि साखरत्वा नाहीं मुकले ॥५॥ जेवीं कां पृथ्वी मृत्तिका । मृत्तिकेचें भांडें देखा ॥ ६ ॥ ऐसें कार्यकारण विशेष । एका जनार्दनीं निजदास ॥ ७ ॥

२३४९ वांझेचिया बाळा बागुलें ग्रासिलें । तैसें मिथ्या देह कळिकाळें ग्रासिलें ॥ १ ॥ नेणा नवलावो जाणा ब्रह्मभावो । देहांचा संभव समूळ मिथ्या ॥२॥ जळगार पाषाण तें जैसें जीवन । साकार देह तैसा ब्रह्मार्पण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकत्व पाहीं । देह-विदेह समूळ तेथें नाहीं ॥ ४ ॥

२३५० अष्टही दिशा पूर्ण भरला देव । मी पूर्व पश्चिम भाव तेथें कैंचा ॥ १ ॥ पाहे तिकडे देव व्यापुनी भरला । रिता ठाव उरला कोठें नाहीं ॥ २ ॥ समाधी समाधान मनाचें उन्मन । मी देवा भिन्नपण नाहीं नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपणासाठीं । देव पाठींपोटीं भरलामागें ॥ ४ ॥

२३५१ अष्टदिशीं व्यापक नारायण । तेथें नाहीं पूर्वपश्चिमेचें भान ॥ १ ॥ पहा कर्माची राहाटी । सर्व व्यापक संकल्प म्हणती उठाउठी ॥ २ ॥ नको विष्णु म्हणतां भेद उरला नाहीं । भेदभावें पाहाती सर्वां ठायीं ॥ ३ ॥ भेदाभेद टाकुनी देई वेगें । एका जनार्दनीं शरण रिघे ॥ ४ ॥

२३५२ साखर दिसे परि गोडी न दिसे । ते काय त्या वेगळी असे ॥ १ ॥ तैसा जनीं आहे जनार्दन । तयातें पहावया सांडीं अभिमान ॥ २ ॥ कापुराअंगीं परिमळु गाढा । पाहतां उघडा केवीं दिसे ॥ ३ ॥ पाठपोट जैसें नाहींच सुवर्णा । एका जनार्दनीं यापरी जाणा ॥ ४ ॥

२३५३ भजतां भजन एका जनार्दन । ब्रह्म परिपूर्ण सर्व एका ॥१॥ सांडूनि वासना भजतां भजन । ब्रह्म परिपूर्ण सर्व एक ॥२॥ विषयवासना त्यागितां संपूर्ण । ब्रह्म तें संपूर्ण सर्व एक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकत्व भाव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ४ ॥

२३५४ जैशी देहापाशीं छाया । तैशी दिसे मिथ्या माया ॥ १ ॥ आत्मा शुद्ध माया मळीन । काया जड आत्मा चिद्घन ॥ २ ॥ जीव अलिप्त माया गुणी । मायावेष्टण जीवालागुनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शिव । सदा असे स्वयमेव ॥ ४ ॥

२३५५ ऐसा ज्याचा एक भाव। तेथें नाहीं द्वैता ठाव ॥ १ ॥ द्वैत अद्वैत हारपलें। अवघें एकरूप जाहलें ॥२॥ संकल्प विकल्प विराला। अवघा देहीं देव जाहला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ठाव। स्वयमेव भरला देव ॥ ४ ॥

२३५६ परमात्मा एकला एक। एकपणें तोची अनेक ॥१॥ तेथें जाती विजाती नाहीं देखा। महासुखा सुखपात्र ॥ २ ॥ म्हणे जनार्दनाचा एका। आत्मा सारिखा सर्व देहीं ॥ ३ ॥

२३५७ आत्मा केवळ एकला एक। तेथें सुखदुःख कैंचें ॥ १ ॥ आत्मा सुखदुःखा वेगळा। हें तों न कळे कळा तयाची ॥ २ ॥ म्हणे जनार्दनाचा एका। आत्मा देखा सर्वघटीं ॥ ३ ॥

२३५८ घटामाजीं घालिजे अमृत। अथवा घालिजे खात मूत ॥ १ ॥ घट घाई करितां चूर। आकाशासी नमुटे चीर ॥ २ ॥ घट फोडुनी केला नाश। आकाश तैसेंचि अविनाश ॥ ३ ॥ तेवीं देव नश्वर जाण। एका जनार्दनीं परिपूर्ण ॥ ४ ॥

२३५९ घटामाजीं जीवन घालितां। अभ्र दिसो लागे सर्वथा ॥ १ ॥ घट फुटलिया जाण। अभ्र न नासेचि पूर्ण ॥ २ ॥ घटाकार देहस्थिती। जाणावीं पां त्वां निश्चितीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण। सबाह्य आत्मा परिपूर्ण ॥ ४ ॥

२३६० देहीं असोनि देहातीत। भूतीं भूतात्मा भगवंत ॥ १ ॥ भिन्न खाणी भिन्नाकार। चिदात्मा हा निर्विकार ॥ २ ॥ एक निश्चयो नाहीं चित्तीं। एका जनार्दनीं वायां भ्रमती ॥ ३ ॥

२३६१ वायां शिणती साधक जन। साधन तितुकें ज्ञानघन। साध्य मानितां भिन्न। निजात्म पूर्ण नव्हती ॥१॥ साखरेवेगळी पाहतां गोडी। पाहीं म्हणती ते बुद्धि कुडी। साखर अवघी गोड धाकुडी। आत्मा निरवडी जग तैसें ॥ २ ॥ साधनीं साधू आत्मयासी। ऐसें म्हणती ते परम पिसी। आत्मा प्रकाशी साधनासी। तो केवीं त्यासी आकळे ॥ ३ ॥ एक ते मंत्र उपदेशिती। जपू करावा नेणों किती। जेणें होय निजात्मप्राप्ती। ते मंत्रयुक्ती न कळे ॥४॥ मंत्रीं मंत्रामाजीं अक्षर। ॐनमः इत्यादि उच्चार। अक्षरीं अक्षर चिन्मात्र। मंत्र साचार परब्रह्म ॥ ५ ॥ पाठका साधन वेदपठण। अक्षर उच्चार स्वर वर्ण। कोरडी वाची तोंड पठण। नव्हे बोळवण कामक्रोधा ॥ ६ ॥ वेदमूळ तो ॐकार। तोचि परब्रह्म साचार। अकार उकार मकार। वेद चिन्मात्र पठणेंसी ॥ ७ ॥ शास्त्र श्रवण साधन शुद्ध। देहाभिमानें केलें विरुद्ध। युक्ती प्रयुक्तीचे बोध। अति विवाद पंडितीं ॥ ८॥ शास्त्र तितुकें ज्ञानसंपन्न। जे जे युक्ति तें केवळ ज्ञान। शास्त्रामाजीं जाणपण। तेंचि ब्रह्मपूर्ण श्रवणार्थें ॥ ९ ॥ प्रल्हादा साधन केवळ हरी। हरि सर्वांगें विघ्न निवारी। अनाम भक्तवचनें करी। नर केसरी होऊन ठेला ॥ १० ॥ जैसा जैसा भक्तांचा पैं भावो। तैसा तैसा भाळे देवो। भावें घायूनियां पाहो। होय अभावो देवाचा ॥ ११ ॥ ऐसें साध्य तेंचि साधन। ज्ञेय तेंचि वृत्तिज्ञान। ध्येय तेंचि होय ध्यान। समाधान गुरुवाक्यें ॥ १२ ॥ जें जें विषयांचें गोडपण। तें तें गोडी चैतन्यघन। विषयीं विषय ब्रह्मपूर्ण। इंद्रिय स्फुरण चिन्मात्र ॥ १३ ॥ जेथें जो म्हणविसी अज्ञाना अज्ञान। देखणें तों ज्ञानघन। आम्हीं नेणों ज्ञानाज्ञान। तो ब्रह्मपूर्ण सहजेंची ॥ १४ ॥ एका पाहता एकपण। जन तोचि जनार्दन। एका जनार्दनीं शरण। जग संपूर्ण परब्रह्म ॥ १५ ॥

२३६२ एक आधार खोंचुनी स्वाधिष्ठाना येती मणिपुरीं घेताती झटे। चंद्रसूर्य कळा म्हणती वारा सोळा पवनासी करिती उफराटें। सत्रावीचें क्षीर सेऊनि शरीर कळिकाळ वंचनी ताठे। सबाह्य आत्माराम नेणुनि विश्राम व्यर्थचि करिती या चेष्टे ॥१॥ तें वर्म चुकलें रे तें वर्म चुकलें रे। जवळींच असतां अतरीं न पाहे। ब्रह्मप्राप्ती केवीं होय ॥ धृ० ॥ मीमांसक मत्त कर्माचा आचार स्नानसंध्या यथायुक्ती। एक दोन तीन स्नानें झाली तरी आगळी लाविती माती। द्वादश जपतां घरींची चिंता करिती नारायण स्मरण चित्तीं। स्वयें नारायण कीं तेथें आपण नेणती स्वरूपस्थिती ॥ २ ॥ चारी वेद पूर्ण आचार होम क्रिया नित्य नेम आचरती। शिखासूत्र मंत्र त्रिकाळ क्रिया संध्यादि यथा पद्धती। पूजा ब्रह्मज्ञान उपवास पारणें मध्यमातें नातळती। आत्मज्ञानेंवीण न तुटे बंधन कष्टचि पावत अंतीं ॥३॥ विष्णु उदरीं त्रिभुवन अवघें म्हणउनी वैष्णव झाले। तुळसी वृंदावनें हरीचें पूजन विष्णुपदीं मिरविले। हरिहर भेद करिताती वाद जाणिवेनें नागविले। आत्मज्ञानेंविण न तुटे बंधन कणेविण उपणिलें ॥ ४ ॥ दैवत शिवापरतें नाहीं जंगम राहिले नेहटी। शैव

पाशुपत रुद्राक्ष विभुती आचार लिंगें कंठीं । पाषाण पुजूनि पवाडा करिती घालूनिया शस्त्रें पोटीं । आत्म ज्ञानेविण न तुटे बंधन मरण पावती हटा ॥ ५ ॥ दरवेश काजी सैद मुलाना पढताती नित्य किताबा । करिती पंच वक्त निमाज गळा घालुन पोकळ जुमा । परमात्मा देहीं न पडेचि ठायीं पश्चिम मारिती बांबा । आत्मज्ञानेविण न तुटे बंधन अंतीं करिती तोबा तोबा ॥ ६ ॥ शक्तीचे उदरीं त्रिभुवन अवघे आवडी पुजिती शक्ती । अर्चन हवन पूजन कामना वाढवुनि फळें घेती । जारण मारण स्तंभन मोहन अभक्त लाविले भक्ती । आत्मज्ञानेवीण न तुटे बंधन चुकले ते निजमुक्ती ॥ ७ ॥ बौध्यरूपालागीं क्षपणिक जाहाले करिताती लुंचि कर्मे । वेद विरोधन मनीं निरोधन आचरती जैन कर्मे । वस्त्रें फेडूनियां नग्न फिरताती न चुकती मरण जन्में । आत्मज्ञानेविण न तुटे बंधन चुकलीं त्या गुरुवर्मे ॥८॥ भ्रष्टाचा आचार पालव माथा उफराटी काठी धरिती । पंचक्रोशी ध्यान पंथीचें स्मरण षट्चक्रा उलटिती । दर्शन खंडिती सज्जन निंदिती दुष्ट कर्मे आचरती । आत्मज्ञानेविण न तुटे बंधन व्यर्थ तनु विटंबिती ॥ ९ ॥ ऐसा एक एका संवाद करितां अहंता ममताची पाहीं । अनुभवाची खूण नेणता निपुण बुडाले संसार डोहीं । स्वकर्माचरणमताचें विवरण परमात्मा न पडेचि ठायीं । एका जनार्दनीं अनुभवीं तो जाणे सर्वेश्वर याच देहीं ॥ १० ॥

२३६३ चौ देहांचा पूर्णघट । त्याचा अवघा बोभाट ॥ १ ॥ माझें माझें म्हणती वेडे । घट भरला रिता फुटे ॥ २ ॥ ऐसे भांबावले देहा । दिवसां नागविले पहा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण घट । एक नांदे उघड प्रगट ॥ ४ ॥

२३६४ फुटालिया घट । नसे जीवन प्रगट ॥ १ ॥ घटामाजीं जीवन । घट फुटता नसे जाण ॥२॥ घटामाजीं आकाश । आकाश घटेंचि न नासे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मिथ्या । घट विरालिया सत्या ॥ ४ ॥

२३६५ व्यापक स्थापक सर्वदेशीं भरला । पहातां तो भला पंढरीये ॥ १ ॥ असोनियां नसे नसोनियां असे । योगिया हृदयीं वसे दृष्टी न पडे ॥ २ ॥ एका जनार्दनीं भूवैकुंठ नायक । उभा असे सम्यक विटेवरी ॥ ३ ॥

२३६६ जेथोनि त्रिपुटीचें विंदान । दृश्य द्रष्टा आणि दर्शन ॥१॥ अध्यात्म अधिभूत असतां पाहीं । अधिदेव सूर्य जेथें नाहीं ॥ २ ॥ अध्यात्म अधिदेव दोन्ही आहे । आधिभूत दृश्य दरुशन पाहे ॥ ३ ॥ जेथें दृश्याचें दरुशन । तेथें एका जनार्दन ॥ ४ ॥

२३६७ सूर्य आहे डोळा नाहीं । तेथें पाहणें न चले कांहीं ॥ १ ॥ सूर्य आणि दृष्टी दोन्ही आहे । परि दृश्य पाहणें नाहीं होय ॥ २ ॥ सूर्य प्रकाशी रूपासी । एका जनार्दनीं स्वरूपासी ॥ ३ ॥

२३६८ उदकीं साखर पडत । विरोनि उदका गोड करीत ॥ १ ॥ तेथें हेतूसी नाहीं ठावो । निमाला भाव आणि अभावो ॥२॥ सांडोनी मीपणासी । खेव दिधला समरसीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । एकपणें एकचि जाण ॥ ४ ॥

२३६९ पंचभूतांचें हें शरीर खरें । निर्माण तें बरें केलें देवें ॥ १ ॥ पृथ्वी आप तेज वायु हें आकाश । याचा हा सौरस आत्माराम ॥ २ ॥ एका जनार्दनीं पंचभूत आत्मा । सर्व परमात्मा नेणती ते ॥ ३ ॥

२३७० जगाचिये देहीं नांदतो आपण । तरी करतें कर्म परियेसा ॥१॥ जीव शिव दोन्ही शरीरीं नांदती । कर्म धर्म स्थिती तया हातीं ॥ २ ॥ शिव तो उपाधी वेगळाचि वसे । कामक्रोध पिसें जीवालागीं ॥ ३ ॥ लिगाडाचे मिसें जीवासी बंधन । एका जनार्दनीं जाण शिव मुक्त ॥ ४ ॥

२३७१ एका देहामाजीं दोघे पैं वसती । एकासी बंधन एका मुक्त गती ॥१॥ पहाहो समर्थ करीं तैसें होय । कोण त्यासी पाहे वक्र दृष्टी ॥ २ ॥ पापपुण्य दोन्ही भोगवी एका हातीं । ऐशी आहे गती अतर्क्य ते ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जनी जनार्दन । तयासी नमन सर्वभावें ॥ ४ ॥

२३७२ जाणीव फेडा जाणीव फेडा । जाणिवेनें वेडा लावियेलें ॥ १ ॥ नेणपणें मज होता जो भाव । जाणिवेनें कैसें मज नागविलें ॥ २ ॥ नेणपणें मी सर्वांसी मानी । जाणीव येतां कोण्हा न मानी ॥ ३ ॥ जाणीव नेणीव नेणेंचि कांहीं । एका जनार्दनीं लागला पायीं ॥ ४ ॥

२३७३ माझा देहीं असतां डोळा । काय जालें रे गोपाळा ॥ १ ॥ माझा डोळा गिवसोनि दीजे । मी पाऊल न सोडीं तुझें ॥ २ ॥ डोळा मुराला डोळिंयांत । कवण जाणे तेथील मात ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अघलीळा । पाहतां त्रैलोक्य जाहला डोळा ॥४॥

२३७४ मीच देवो मीच भक्त। पूजा उपचार मी समस्त ॥ १ ॥ मीच उपासना भक्ती। धर्म अर्थ सर्व पुरती ॥ २ ॥ मीच गंध मीच अक्षता। मीच वाहें मीच पुर्ता ॥ ३ ॥ मीच धूप मीच दीप। मी माझें देख स्वरूप ॥ ४ ॥ मीच माझी करी पूजा। एका जनार्दनीं नाहीं दुजा ॥ ५ ॥

२३७५ मी तो स्वयें परब्रह्म। मीचि स्वयें आत्माराम ॥ १ ॥ मी तो असें निरुपाधी। मज नाहीं आधिव्याधी ॥ २ ॥ मी तो एकट एकला। द्वैतभाव मावळला ॥ ३ ॥ मजवीण नाहीं कोणी। एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

२३७६ ब्रह्मीं स्फुरे जें स्फुरण। शुद्ध सत्वाचें लक्षण तो तूं लक्षी लक्ष्यातीत परिपूर्ण रे ॥ १ ॥ कान्हु सच्चिदानंदु शब्द अरुता रे। त्याही परतां तूं निजानंदु रे ॥ २ ॥ जेथें नाहीं गुणागुण। नाहीं कार्यासी कारण। तो तूं गुणी गुणातीत परिपूर्ण रे ॥ ३ ॥ एकाएकीं जनार्दन। भेद भाष्य वचन। तो तूं शब्दार्थी गिळून राहिलासी रे ॥ ४ ॥

२३७७ सर्व देशीं सर्व जीवीं तो हरी। सर्वा ठायीं सर्व भावें मुरारी ॥ १ ॥ सर्व गांवीं सर्व रूपी भरूनी उरला। सर्व व्यापक सर्वभूतीं तो व्यापला ॥ २ ॥ सर्व आदि सर्व अंतीं सर्वा सर्व भावो। एका जनार्दनीं देखा देवाधिदेवो ॥ ३ ॥

२३७८ माझ्या देहाचें देहपण। नागवितां नारायण ॥ १ ॥ माझें मीपण पाडिलें वोस। वायां कां मज ठेविला दोष ॥ २ ॥ जेथें मीपण जालें वाव। तेथें करतेपणाचा ठाव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अभिमान। सांडोनियां झाला लीन ॥ ४ ॥

२३७९ तुझें तुझ्या ठायीं तुजाचि शुद्धि नाहीं। मी मी म्हणसी काई न कळे तुज ॥ १ ॥ मीपण ठेवितां ठायीं तूंचि परब्रह्म पाहीं। इतर साधन कांहीं न लगे येथें ॥ २ ॥ मीपण तत्वतां साच जेथें अहंता। एका जनार्दनीं तोचि ते निजात्मता ॥ ३ ॥

२३८० कानावाटे मी नयनासी आलों। शेखीं नयनाचा नयन मी जाहलों ॥ १ ॥ दृष्टिद्वारां मी पाहें सृष्टी। सृष्टि हारपली माझे पोटीं ॥ २ ॥ ऐसें जनार्दनें मज केलें। माझें चित्ताचें जीवपण नेलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जाणोनि भोळा। माझा सर्वांग जाहला डोळा ॥ ४ ॥

२३८१ आम्हा येणें ना जाणें जिणें ना मरणें। करणें ना भोगणें पापपुण्य ॥ १ ॥ जैसें असों तैसें आपोआप प्रकाशों। कवणा न दिसों ब्रह्मादिकां ॥ २ ॥ नवल नवल सांगतां सखोल। अनुभवी हे बोल जाणताती ॥ ३ ॥ आम्हा कवण पदा जाणें ना कवण देवा भेटणें। आप आपणामाजीं राहणें अखंडित ॥४॥ सत्य कैलास वैकुंठ हें आम्हांमाजीं होती जाती। या सकळां विश्रांती आमुच्या रूपीं ॥ ५ ॥ चंद्र सूर्य तारा हा पंचभौतिक पसारा। आम्हांमाजीं खरा होत जात ॥ ६ ॥ इतुकें दिधलें आम्हा गुरुजनार्दनीं। एका जनार्दनीं व्यापियेला ॥ ७ ॥

२३८२ सात्विकाभरणें रोमासी दाटणें। स्वेदाचें जीवन येऊं लागे ॥ १ ॥ कांपे तो थरारी स्वरूप देखे नेत्रीं। अश्रु त्या भीतरीं वाहताती ॥ २ ॥ आनंद होय पोटीं स्तब्ध जाला कंठीं। मौन्य वाक्‌पुटीं धरूनी राहे ॥ ३ ॥ टाकी श्वासोच्छ्वास अष्टभाव देखा। जिरवुनी एका स्वरूप होय ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसे अष्टभाव। उत्पन्न होतां देव कृपा करी ॥५॥

२३८३ बोधभानु तया नाहीं माध्यान्ह। सायंप्रातर्नाहीं तेथें कैंचा अस्तमान ॥ १ ॥ कर्मचि खुंटलें करणेंचि हारपलें। अस्तमान गेलें अस्तमाना ॥ २ ॥ जिकडे पाहे तिकडे उदयोचि दिसे। पूर्व पश्चिम तेथें कैंचा भासे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नित्य प्रकाशा। कर्माकर्म जाले दिवसा चंद्र जैसा ॥ ४ ॥

२३८४ श्रवणीं ऐकोनी पहावया येणें। तंव डोळेचि जाले देखणें ॥ १ ॥ आतां पहावें तें कायें। जें पाहे तें आपणाचि आहे ॥ २ ॥ जें जें देखों जाये दिठी। तें देखणें होउनी नुठी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहे लीला। पाहतां पाहणें अवलीला ॥ ४ ॥

२३८५ रतीच्या अंतीं जें होय सुख। सर्वांगीं तें सर्वदा देख ॥ १ ॥ इंद्रियांवीण आहे गोडी। तेथींचा स्वादु कवण काढी ॥ २ ॥ आधीच करणी कैसी यक्षिणी। गोडपण कैसी देत आहे धणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लागला छंदु। एकपणेंविण घेतला स्वादु ॥४॥

२३८६ पाहतां पाहतां कैसें पालटलें मन। देखणेंचि दाविलें चोरुनी गगन ॥ १ ॥ आनंदें जनार्दना लागलों मी पाया। गेली माझी माया नाहींपणें ॥ २ ॥ देखणेंचि केवळ दिसताहे सकळ। तुर्याचें निष्फळ

वेतिलें जग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निमाला एकपणें । मोहाचें सांडणें माया घेउनी ॥ ४ ॥

२३८७ ताट भोक्ता आणि भोजन । जो अन्नघाचि झाला आपण ॥ १ ॥ भली केली आरोगण । सिद्ध स्वादुचि झाला आपण ॥ २ ॥ कैसी गोडी ग्रासोग्रासीं । चवी लागली परम पुरुषीं ॥ ३ ॥ रस सेवितां स्वमुखें । तेणें जगदुदर पोखे ॥ ४ ॥ संतृप्त झाली तृप्ती । क्षुधेतृषेची झाली शांती ॥ ५ ॥ एका जनार्दनीं तृप्त झाला । शेखीं संसारा आंचवला ॥ ६ ॥

२३८८ मारग ते बहु बहुत प्रकार । प्रणव विचार जयापरी ॥ १ ॥ आदि अंतु नाहीं मार्गाची ग्वाही । साधनें लवलाही वायां पंथें ॥ २ ॥ जया जी भावना तोचि मार्ग नीट । परी समाधान चित्त नोहे तेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतमार्ग खरा । येर तो पसारा हाव भरी ॥ ४ ॥

२३८९ शेय्या शयन आणि शेजार । तें अवघेंचि जालें शरीर ॥ १ ॥ कैसें निज घेतसे निजे । निज देखोनी समाधी लाजे ॥ २ ॥ जागृती जागे निजे । स्वप्न सुषुप्तीचें निजगुजें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निजला । तो निजाचि होउनी ठेला ॥ ४ ॥

२३९० सन्मुख देखोनियां भेटी धांवा । तंव दशदिशा उचलल्या खेदा ॥ १ ॥ आतां नवल भेटी देव । पुढें आलिंगितां सर्वांगीं खेव ॥ २ ॥ आलिंगनीं गगन लोपे । खेव देतां गगन हारपे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भेटी भावो । जिण्या मरण्या नुरेचि ठावो ॥ ४ ॥

२३९१ तळीं हारपली धरा । वरी ठावो नाहीं अंबरा ॥ १ ॥ ऐसा सहजीं सहज निजे । एका एकपणेंवीण शेजे ॥ २ ॥ डावे उजवे कानीं । निजे निज कोंदली नयनीं ॥ ३ ॥ दिवस निशीं हारपली दोन्ही । एका निजिजे जनार्दनीं ॥ ४ ॥

२३९२ पाहूं जातां नारायणा । पहातां मुकिजे आपणा ॥ १ ॥ ऐसा भेटीचा नवलाव । पाहतां नुरे भक्त देव ॥ २ ॥ पहातां नाठवेचि दुजें । तेंचि होईजे सहजें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भेटी । जन्म मरणा होय तुटी ॥ ४ ॥

२३९३ मुनीजन साधिती साधनीं । तो हरि कोंदला नयनीं ॥ १ ॥ नवल हो नवल वाटलें । निरखितां निरखितां मनहि आटलें ॥ २ ॥ स्थूल देहीं देहधर्मा । गोष्टी केली हो परब्रह्मा ॥ ३ ॥ व्यापला तो एका जनार्दनीं । पहातां दिसे जनीं वनीं ॥ ४ ॥

२३९४ उघडा देव दिगंबर भक्त । दोहींचा सांगात एक जहाला ॥ १ ॥ देव नागवा भक्त नागवा । कोणाची केशवा लाज धरूं ॥ २ ॥ देव निलाजरा भक्त बाजारी । देहामाझारीं उरी नाहीं ॥ ३ ॥ उघडें नागवें जाहलें एक । एका जनार्दनीं देखणें देख ॥ ४ ॥

२३९५ भूमि शोधोनी साधिलें काज । गुरुवचन बीज पेरियलें ॥ १ ॥ कैसें पिक पिकलें प्रेमाचें । सांठवितां गगन टाचें ॥ २ ॥ सहाचारी शिणले मापारी । कळला नव्हे अद्याप घरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निजभाव । देहा पिकला अवघा देव ॥ ४ ॥

२३९६ मी मी म्हणतां अवघें मीच मी जालों । तूंपणाच्या बोला लाजूनियां ठेलों ॥ १ ॥ मी ना कोणाचा ना माझें कोणी । एकूविण एकु सहज निर्वाणीं ॥ २ ॥ माझें मीपण मजमाजीं निमालें । एकानेक सकळ सहजीं सहज जालें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गणित नवानी येकु । परापरती सारुनी उगला सिद्धांकु ॥ ४ ॥

२३९७ मी मी म्हणतां माझें मीच मी नेणें । चुकलीं रविकिरणें सूर्या धुंडिती ॥ १ ॥ मजलागीं मी तों म्यां भेटावें कैसें । दीपप्रभा पुसे दीपकासी ॥ २ ॥ सबाह्य अभ्यंतरीं गगन सावकाश । तैसे घटकाश । महदाकाशीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकत्वें जन वन । जन आम्हां दिसे जनार्दन ॥ ४ ॥

२३९८ भावीं देव कीं देवीं भाव । दोहींचा उगव करुनी दावा ॥ १ ॥ भाव थोर कीं देव थोर । दोहींचा निर्धार करुनी दावा ॥ २ ॥ जंव जंव भाव तंव तंव देव । भाव नाहीं तेथें देवाचि वाव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावेंचि देव । लटिकें म्हणाल तरी हृदयीं साक्ष पहाहो ॥ ४ ॥

२३९९ पहालें रे मना पहालें रे । बुद्धि बोधें इंद्रियां सम जालें रे ॥ १ ॥ नयनीं पहातां न दिसे बिंब । अवघा प्रकाश स्वयंभ ॥ २ ॥ एका जनार्दनीं पहाट । जनीं वनीं अवनीं लखलखाट ॥ ३ ॥

२४०० कवण देव कवण भक्त । एक दिसे दोहीं आंत ॥ १ ॥ भक्त ध्यानीं जंव बैसला । पूज्य पूजक स्वयें जाहला ॥ २ ॥ ध्यानीं हारपलें मन । सरलें ध्याता ध्येय ध्यान ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव । देव म्हणण्या नुरे ठाव ॥ ४ ॥

२४०१ घर सोडोनी जावें परदेशा । मजसवें देव सरिसा ॥ १ ॥ कडे कपाटेसी घरी । जिकडे पाहे तिकडे हरी ॥ २ ॥ आतां कोणीकडे जावें । जिकडे पाहे तिकडे देव ॥ ३ ॥ एका बैसला निरंजनीं । न जाइजे जनीं वनीं ॥ ४ ॥

२४०२ आतां काय पुजूं देवा । माझी मज घडे सेवा ॥ १ ॥ तोडूं गेलों तुळशीपान । तेथें पहातां मधुसूदन ॥ २ ॥ अन्न गंध धूप दीप । तेंहि माझेंचि स्वरूप ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूजा । पूज्य पूजक नाहीं दुजा ॥ ४ ॥

२४०३ कृष्ण चंदन आणिलें । सकळ वेधिलें परिमळें ॥ १ ॥ तेणें फुटती अंकुर । अंगीं भावाचे तरुवर ॥ २ ॥ खैर धामोडे चंदन । कृष्णवेधें वेधिलें मन ॥ ३ ॥ एका एक हरिख मनीं । वसंत दाटे जनार्दनीं ॥ ४ ॥

२४०४ बोलिजे तें नव्हे । बोलणें तेंहि तो आहे । बोला आंतु बाहेर पाहे । पहातां कवण आहे ॥ १ ॥ हरि हरि हरि हरि । अहं सोहं नुरेचि उरी । आत्मा एक चराचरी । एकपण नाहीं निर्धारी ॥ २ ॥ दृश्य तो जाला नाहीं । दृश्यमात्रें त्या तैच पाही । आहे नाहीं ऐसें जें कांहीं । प्रकाशे त्याच्याच ठायीं ॥ ३ ॥ एकपणें पाहे अनेक । अनेकीं आहे एक । एक ना नव्हे आणीक । एका जनार्दनीं तोचि देख ॥ ४ ॥

२४०५ राहातें एक जातें दोनपणें । तेथेंचि नाहीं पा देखणें ॥ १ ॥ एकचि एक बोलतां रे साचें । एक नाहीं तेथें अनेक कैंचें ॥ २ ॥ अनेकीं एक निर्धारितां पाहीं । मुळीं मन ठेवूनियां ठायीं ॥ ३ ॥ राहातें जातें दोन्हींहि वाव । एका जनार्दनीं एकचि भाव ॥ ४ ॥

२४०६ भाव भावित भाव भावित भावित निजभाव भावना । निजबोध जालिया कैंची भाव भावित भावना ॥ १ ॥ भावि भाविक शाक्ति बोधीत शोधीत निजतत्त्व । भक्ति मुक्ति विरहित बाधित निजसत्त्व ॥ २ ॥ माया मोहीत काय कामातें क्षोभती निजक्रोधा । एका जनार्दनीं एकपणें आणिती निजबोधा ॥ ३ ॥

२४०७ रसने रस भोग्य रसाचा भोक्ता रस ग्रासी होय भेटी । रसस्वादाचा सौरसु तोचि ब्रह्मरसीं कृष्णा पडतसे गांठी ॥ १ ॥ आत्मा कान्हा भोगनिधी । आम्हां सकळां भोग अवधी ॥ ध्रु० ॥ श्राव्य श्रावक श्रवणा समाधान सहजी सिद्धचि पाहे । गगन गर्भे सरे गगना अलिप्त शब्द कोंदाटलें ठायीं राहे ॥ २ ॥ दृष्टि दृश्य नसे दृश्या सबाह्य दिसे दृष्टीविण डोळा पाहे । अरूपाचें रूप अगुणी होउनी देख देखणें कवण आहे ॥ ३ ॥ घ्राणाचें जें घ्राण वासाचा अवकाशु ऐसी मात्र आहे शुद्ध । गंधाचा गंधु सुवास जीवन दृष्टि भोग सुगंध ॥ ४ ॥ देहाचे आंतील कठोण की कोंवळें न कळे तेथींचा भावो । आत्मारामीं वृत्ति जडोनी गेली मा सबाह्य रिता नुरेची ठावो ॥ ५ ॥ मनाचाहि वेगु दिसताहे सर्वें गुप्तमाजीं उभा देवो । म्हणवोनी मन होतें तें उन्मन जालें पडिला कृष्ण स्वभावो ॥ ६ ॥ काष्ठ भक्षितां दाहकु काष्ठामाजीं असे मंथिलिया काष्ठचि अग्नी । एका जनार्दनीं कृपा देहीचाचि देहीं मा भोग भोगितां राहे कृष्ण होउनी ॥ ७ ॥

२४०८ प्रतिमाचि देवो ऐसा ज्याचा भावो । तो न करी निर्वाहो आम्हालागीं ॥ १ ॥ असतां सचराचरित बाहेर जो अंतरीं । तो संपुष्टामाझारी म्हणती देवो ॥ २ ॥ द्वारका पंढरी देवयात्रा करी । सर्वत्र न धरी तोचि भावो ॥ ३ ॥ सुक्षेत्रीं पुण्य मा अन्यत्र तें पाप । नवल हा संकल्प कल्पनेचा मतवादा ॥ ४ ॥ द्वारका पंढरी देवयात्रा करी । येर काय भारी वोस पडे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं स्वतः सिद्ध असे । विस्मरण होत असे नाथिलें तें पिसें ॥ ६ ॥

२४०९ स्मरण स्वयाती न लगे ती जपमाळ हातीं । नाठवितां चित्तीं स्मरण होय ॥ १ ॥ तैसा देहीं देवो परिसूनि भावो । नाठव तोचि आठवो होत असे ॥ २ ॥ वस्तु वस्तुपणें जडोनि गेली अंगीं । आठवूं तो विसरूं वेगीं जाला वावो ॥ ३ ॥ अगाध डोहीं गगन बुडालें दिसे । परी न बुडतांचि असे गगनीं गगन ॥ ४ ॥ तैसा देहीं देव असतांचि संचला । म्हणतो हारपला लाज नाहीं ॥ ५ ॥ मृगजळाचि व्यक्ति जळपणाची प्रतीती । भासत असतां स्थिति मिथ्या जैसी ॥ ६ ॥ एका जनार्दनीं एकपणें निर्वाहो । असतांचि देह वावो देहपणें ॥ ७ ॥

२४१० सर्वां भूतीं दिसे देव । जया ऐसा अनुभव ॥ १ ॥ तया चित्तीं देव वसे । जिकडे पाहे तिकडे दिसे ॥ २ ॥ देव जन देव विजन । देवीं अडलें तन मन ॥ ३ ॥ देव घरीं देव दारीं । देव दिसे व्यव-

हारीं ॥ ४ ॥ देव काम देव धंदा । देवीं पावला स्वानंदा ॥ ५ ॥ देव मागें देव पुढें । दृष्टी चैतन्य उघडें ॥ ६ ॥ माता देव पिता देव । देवरूप स्वयमेव ॥ ७ ॥ देव बंधु देव जाया । देवरूप अवघी माया ॥ ८ ॥ देव गुण देव निर्गुण । गुणातीत देव जाण ॥ ९ ॥ देवाविण कांहीं नाहीं । ऐसी ज्याची दृष्टी पाहीं ॥ १० ॥ एका जनार्दनीं देव । सहज चैतन्य स्वयमेव ॥ ११ ॥

२४११ पाहों गेलों देवालागीं । देवरूप झालों अंगीं ॥ १ ॥ आतां मीतूंपणा ठाव । उरला नाहीं अवघा देव ॥ २ ॥ सुवर्णाचीं झालीं लेणीं । देव झाला जगपणीं ॥ ३ ॥ घटीं मृत्तिका वर्तन । जगीं देव तैसा व्याप्त ॥ ४ ॥ एकानेक जनार्दन । एका जडला एकपणें ॥ ५ ॥

२४१२ ब्रह्मीं नाहीं कर्म नाहीं उपासना । नाहीं ध्येय ध्याना ठाव जेथें ॥१॥ जाणीव नेणीव भगवंतीं नाहीं । विज्ञान जें तेंहि लया जाय ॥ २ ॥ नामरूपा ठाव नाहीं जया ठायीं । ज्ञेय ज्ञाता तेंहि नाहीं जेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आहे एकरूप । सहज स्वरूप नित्य शुद्ध ॥ ४ ॥

२४१३ आजीचा सुदीन आम्हा झाला आनंदु । सकळा स्वरूपीं स्वयें देखे गोविंदु ॥ १ ॥ पाहिला ग माय आतां सांगू मी कैसें । जेथें पाहे तेथें गोविंदु दिसे ॥२॥ पहातां पहाणें तटस्थ ठेलें । सबाह्य अभ्यंतरीं पुरुषोत्तम कोंदलें ॥ ३ ॥ यापरी पहातां हरुष होतसे मना । एका जनार्दनीं धणी न पुरे मना ॥४॥

२४१४ साधन कांहीं न नेणें मी अबला । शाम हें रूप बैसलेंसे डोळा । लोपली चंद्रसूर्याची कळा । तो माझा राम जीवींचा जिव्हाळा ॥ १ ॥ राम हें माझें जीवींचें जीवन । पहातां मन हें झालें उन्मन ॥२॥ प्रकाश दाटला दाही दिशा । पुढेंहि मार्ग न दिसे आकाशा । खुंटली गती श्वासोच्छ्वासा । तो राम माझा भेटेल हो कैसा ॥ ३ ॥ यासी साच हो परिसा कारण । एका जनार्दनीं शरण । त्याची कृपा होय परिपूर्ण । तरीच साधे हें साधन ॥ ४ ॥

२४१५ पातला रे भवगजपंचानन । निरसूनियां जन झाला जनार्दन ॥१॥ नाभी नाभीसी काह्या । नाथिला संसार लटकी ही माया ॥ २ ॥ वचनाचेनि घायें संशय तोडिले । अनेकत्व मोडूनि एकत्व जोडिलें ॥३॥ वांझेचा पुत्र कळिकाळाचा वैरी । एका जनार्दनीं संसार तोडरीं ॥ ४ ॥

२४१६ पातला तो दीन हरिखाचा आम्हा । सर्वां भूतीं अभिन्न सदा देखो श्रीरामा ॥ १ ॥ काय सांगूं गोविंदा तुझी आवडी । जनीं वनीं नयनीं नीच नवी गोडी ॥२॥ निमिष्य जैसें वर्ष तैसे आम्हां गोडी । हरिरूप पहातां हरिखे मन बुद्धि वेडी ॥ ३ ॥ जन वन मन अवघें जालें जनार्दन । एका एकीं पहातां तेथें हारपलें मन ॥ ४ ॥

२४१७ हरिखाची गुढी बोधाचा आला । अहंकार गर्जतु अविवेकु मारिला ॥ १ ॥ संतोषें विवेक आपआपणिया विसरला । लाजूनिया महा हरूष आनंदाशीं गेला ॥ २ ॥ मारविला क्रोध ममता सती निघाली । तुटला मत्सर शांती सुखें सुखावली ॥३॥ एका जनार्दनीं पाहतां सहजीं पैं सहजें । स्वराज्य सांग तेथें नाहीं पैं दुजें ॥ ४ ॥

२४१८ वेणुनादाचिया किळा । पान्हा फुटला निराळा ॥१॥ आर्तवृत जीव तिन्ही । चातक निवाले जीवनीं ॥ २ ॥ स्वानुभवाचे सरितें । जेवीं जीवना दाटे भरतें ॥ ३ ॥ एका एक गर्जे घनीं । पूर आला जनार्दनीं ॥ ४ ॥

२४१९ उपवास पडिले भारी । ती वेदना जाणें हरी ॥ १ ॥ मज जाली नाहीं बाधा । देहीं देखता गोविंदा ॥ २ ॥ देहींचें दुःख अथवा सुख । भेटों नयेचि सन्मुख ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुख । विसरला तहान भूक ॥ ४ ॥

२४२० पहातां पहातां वेधलें मन । झालें उन्मन समाधिस्था ॥१॥ ऐसा परब्रह्म पुतळा देखिलासे डोळा । पाहिला सांवळा डोळेभरी ॥ २ ॥ तनु मन वेधलें तयाचे चरणीं । शरण एका एकपणें जनार्दनीं ॥ ३ ॥

२४२१ कल्पित देह कल्पित प्रबंध । कल्पित षट्चक्रमाळा । कल्पित धारणा कल्पित सुषुम्ना । कल्पित मेरूमंडळ रे ॥ १ ॥ कल्पित छांडो कल्पित छांडो । निर्विकल्प वृत्ति मांडो । सहजीं सहज भरपूर भरलें । देह विदेह दुरी छांडो ॥ ध्रु० ॥ कल्पित द्विदळ कल्पित चतुर्दळ । कल्पित अष्टकमळ । कल्पित द्वादश कल्पित षोडश । कल्पित तें सहस्र दळ रे ॥२॥ कल्पित श्रीहट कल्पित गोल्हाट । कल्पित औठ पीठ कल्पित भ्रमर गुंफा । कल्पित हंसपद कल्पित योग

अबाट रे ॥ ३ ॥ कल्पित शिव कल्पित शक्ती । कल्पित ते निजप्राप्ती जनार्दनीं निजकल्पयोगें । सहज चैतन्य निज शांती रे ॥ ४ ॥

२४२२ खांबसूत्राची बाहुली । सूत्राअधीन उगली ॥ १ ॥ माझें मीपण नाहीं स्वतंत्र । क्रियाकर्म तें परतंत्र ॥ २ ॥ बाहुलीये नाहीं स्वतंत्रता । तैसा नव्हे कर्म कर्ता ॥३॥ एका एकपणाचें सूत्र । जनार्दनपायीं स्वतंत्र ॥ ४ ॥

२४२३ वेदे तो कल्पित शास्त्र तें शाब्दिक । पुराण सकळिक बाष्कळचर्ची ॥ १ ॥ बाहुली तो जीव सूत्रधारी तो शिव । मिथ्याचि हे भाव जग सर्व ॥ २ ॥ येथें कैंचा मुक्त मुळींच नाहीं बद्ध । सर्वहि अबद्ध दिसे जें कां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसी याची खूण । जाणे तोचि धन्य गुरुपुत्र ॥ ४ ॥

२४२४ जेथें निरसोनियां द्वैत म्हणताती अद्वैत । त्याहुनी अतीत स्वरूप माझें ॥ १ ॥ तें मी लक्ष्याहि लक्ष्य पराचेंहि पर । जेथें वेदशास्त्रें लाजोनी गेलीं ॥ २ ॥ गिळोनी अज्ञान निखळ म्हणती ज्ञान । उभयाहुनी भिन्न स्वरूप माझें ॥३॥ सच्चिदानंदा प्रतिपादिती वेद । याहुनी अगाध स्वरूप माझें ॥ ४ ॥ निरसूनियां कर्म म्हणती परब्रह्म । याहुनी उत्तम स्वरूप माझें ॥ ५ ॥ माया आणि ममत्व निरसुनी शुद्ध सत्त्व । सत्त्याचें निजसत्त्व स्वरूप माझें ॥ ६ ॥ जेथें पद आणि पिंड अभिन्न अखंड । त्याहुनी उदंड स्वरूप माझें ॥ ७ ॥ जेथें शुद्ध आणि शबल म्हणताती केवळ । याहुनी निर्मळ स्वरूप माझें ॥ ८ ॥ ब्रह्म स्फुरण स्फुर्तीचि कारण । याहुनी परतें जाण स्वरूप माझें ॥ ९ ॥ एका जनार्दनीं एकपणा अतीत । चित्ताचें अचिंत्य स्वरूप माझें ॥ १० ॥

२४२५ देव जाला पाठीं पोटीं । तया नाहीं आटाआटी ॥ १ ॥ जेथें जाय तेथें देव । नाहीं भेव सर्वथा ॥ २ ॥ संसारासी मारुनी लाथा । केला तत्त्वता देशोधडी ॥ ३ ॥ विषयाचें ठेचिलें तोंड । मोडिलें बंड पांचांचें ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका म्हणे । देवा पाहणें पाठीं पोटीं ॥ ५ ॥

२४२६ साचपणें देवा शरण पैं जातां । तया वैकुंठपती विसरेना ॥ १ ॥ जैसी कन्या दूरदेशीं एकटी । रात्रंदिवस संकटीं घोकी मायबाप ॥ २ ॥ पतिव्रतेचें सर्व मन पतिपायीं । तैसा देव ठायीं तिष्ठतसे ॥३॥ एका जनार्दनीं मज हा अनुभव । जनार्दनें देव दाखविला ॥ ४ ॥

२४२७ नेणतिया ठायीं पाहूं जाय देवा । तों अवघें या केशवा व्यापियेलें ॥ १ ॥ नेणतपण गेलें जाणतपण हारपलें । एकचि उरलें नाम साचें ॥ २ ॥ पाहतां पाहणें पडियेलें ठक । अवघाचि हरीख वोसंडला ॥३॥ एका जनार्दनीं पडियेलें ठक । जाणतां नेणतां सर्वां भूतीं देख ॥ ४ ॥

२४२८ जाणती हे कळा हारपोनि गेली । वृत्ति मावळली तयामाजीं ॥ १ ॥ पाहतां पाहणें हारपोनि गेलें । मी माझें सरलें तयामाजीं ॥ २ ॥ अंतर बाहेरी पाहतां शेजारी । शून्याची वोवरी ग्रासियेली ॥ ३ ॥ ग्रासियेले तेणें चंद्र सूर्य दोन्ही । एका जनार्दनीं आनंद झाला ॥ ४ ॥

२४२९ सत्व रज तम गेलें निरसोनी । हृदयाची लावणी कैसी झाली ॥ १ ॥ गेलिया माघारी पाहतां न दिसे । स्वतः तो प्रकाशे सदोदित ॥ २ ॥ अंतर बाहेरी पाहतां शेजारीं । प्रकाशतां अंतरीं लखलख ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रकाश संपूर्ण । सर्व नारायण विवलासे ॥ ४ ॥

२४३० चित्त चैतन्या पडली गांठी न सुटे मिठी । संचित कर्माची झाली आटी उफराटी दृष्टी ॥ १ ॥ कैंचा आठव हृदयाचा । खुंटली वाचा उदय झाला सुखाचा ॥ २ ॥ देह विदेह वाढिलें मीतूंपणें । एका जनार्दनीं सहज एकपणें ॥ ३ ॥

२४३१ देखिलें कंदर्पाच्या बापा । आम्ही नेणों पुण्य पापा ॥ १ ॥ कैंचें पाप कैंचें पुण्य । देहनामें पडलें शून्य ॥ २ ॥ शून्य म्हणताती विठ्ठलें । तेंचि विश्वाकार झालें ॥ ३ ॥ एका शून्याचा विस्तारू । जनार्दनीं जगदाकारू ॥ ४ ॥

२४३२ ध्येय ध्यातेवीण ध्यान । ज्ञेय ज्ञातेविण ज्ञान ॥ १ ॥ ऐसें जनार्दनाचें ध्यान । साधनाचें निज साधन ॥ २ ॥ साध्य साधनेंवीण साधनें । दृश्य द्रष्टत्वेंवीण देखणें ॥ ३ ॥ बोल बोलणेंवीण बोलणें । एका एकी जनार्दनें ॥ ४ ॥

२४३३ नेत्राचेनी तेजें पोळला चंडांश । नभचि नाहीं तेथें कैंचे अवकाश ॥ १ ॥ रात्र हारपली पाहूं मी कोठें । दिवस रचुनी गेला पहातां न भेटे ॥ २ ॥ अंगावेगी तेजें डोळां आली चवी । पाहूं गेलों तंव

बुडाला रवी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पहातां पहाणें । रात्रंदिवस दोन्ही गेले हारपोन ॥ ४ ॥

२४३४ जळ स्पर्शा जातां स्नानीं । तंव चिन्मात्र भासे जीवनीं ॥ १ ॥ कैशी वहाताहे गंगा । स्नानीं हारपलें अंगा ॥ २ ॥ अंगत्व मुकलें अंगा । स्नानीं सोवळी जाली गंगा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मज्जन । सकळ तीर्थे जालीं पावन ॥ ४ ॥

२४३५ येणें जाणें खुंटलें क्रियाकर्म ठेलें । मज माझें भेटलें आत्मरूप ॥ १ ॥ त्यागूं तें काय भोगूं तें काय । सर्व ब्रह्मरूप पाहे कोंदाटलें ॥ २ ॥ क्रिया कर्म धर्म निखिळ परब्रह्म । त्यागूं भोगूं तेथें केवळ भ्रम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सहजीं सहज एक । एकीएक पहातां कैंचें अनेक ॥ ४ ॥

२४३६ जाणपणें वस्तु जाणों मी जाये । माझी जाणीव कैसी मज आड ठाये ॥ १ ॥ जाणों मी कैसें जाणो मीं कैसें । जाणपणें पिसें लावियेलें ॥ २ ॥ जाणपणाचें पडळ जें आलें । जवळीच वस्तुचें देखणें ठेलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुदलें अंजन । पडळ भेदोनियां दाविलें निधान ॥ ४ ॥

२४३७ शून्य निरशून्य तयामाजीं बीज । तया नांव गुज निजवस्तू ॥ १ ॥ जाणण्याचें मूळ अकुळाचें कुळ । अलक्ष्याचें स्थळ तया ठायीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं प्रसाद लाधला । जनार्दन बोलला सुखरूप ॥ ३ ॥

२४३८ सोनियाचा देव सोनियाचें देऊळ । सोनियाचा भक्त पूजी सोनियाच्या कमळें ॥ १ ॥ नामचीं पैं रूप तें अभिन्न । जनीं जनार्दन तोचि पाहे ॥ २ ॥ मृत्तिकेचा घट मृत्तिकेची वेळणी । मृत्तिकेचें आलें तेथें मृत्तिकेची माथणी ॥ ३ ॥ भिन्न भिन्नाकारीं मृत्तिका दिसते साकार । एका जनार्दनीं निज निर्विकार ॥ ४ ॥

२४३९ अभेदाच्या द्वारापाशीं । तीर्थें प्रयागादि काशी ॥ १ ॥ भुक्तिमुक्तीचें माहेर । अभेदाचें तें घर ॥ २ ॥ ऐसी अभेद भक्ति घडे । कामक्रोध तेथें दडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । अभेद भक्ति मुख्य ज्ञान ॥ ४ ॥

२४४० समुळ मुळीं पाहतां पहाण्या उपरम । भोग भोक्ता तेथें सहज परब्रह्म ॥ १ ॥ भोगूं मी काय त्यागू मी काय । त्याग भोग दोन्ही चैतन्य भाय ॥ २ ॥ भोग भोगितां भोग त्यागितां त्याग । दोन्हींचे निखळ अधिष्ठान अंग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपण त्यागी । ब्रह्मरूप जग आदळे अंगीं ॥ ४ ॥

२४४१ देह जाईल तरी जावो राहील तरी राहो । दोराचिया सर्पा जिणें मरणें ना वावो ॥ १ ॥ आम्ही जितांचो मेलों जितांची मेलों । मरोनियां जालों जीवेंविण ॥ २ ॥ मृगजळाचें जळ भरलें असतां नाहीं । आटलिया तेथें कोरडें होईल काई ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जगचि जनार्दन । जिणें मरणें तेथें सहज चैतन्यघन ॥ ४ ॥

२४४२ पाणियाचा मासा जाला । नामरूपा नाहीं आला ॥ १ ॥ ते पूर्वीच पाणी आहे । तेथें पारधी साधील काय ॥ २ ॥ जंव पारधी घाली जाळें । तंव त्याचेंच तोंड काळें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सर्वहि पाणी । माशियांची कैंची खाणी ॥ ४ ॥

२४४३ मीच देवो मीच भक्त । पूजा उपचार मी समस्त ॥ १ ॥ मीच माझी करी पूजा । मीच माझा देवो सहजा ॥ २ ॥ हेंचि उपासनाकांडाचें सार । आगमनिगमाचें गुह्य भांडार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव । स्वयें पाहे देवाधिदेव ॥ ४ ॥

२४४४ लागलें दैवत अक्षत सांगा । देव देऊळ आलें अंगा ॥ १ ॥ देव देऊळ अवघाचि देव । देखोनियां भाव लागतसे ॥ २ ॥ जाणतां नेणतां उरी नुरे मना । यालागीं शरण एका जनार्दना ॥ ३ ॥

२४४५ सकळ गोडिये जें गोड आहे । तें रसनाची जाली स्वयें ॥ १ ॥ आतां चाखावें तें काये । जिव्हा अमृता वाकुल्या वाये ॥ २ ॥ तया गोडपणाच्या लोभा । कैशा सर्वांगा निघती जिभा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गोडी । तया क्षणएक रसना न सोडी ॥ ४ ॥

२४४६ जो जो कोणी मनीं ध्याये । तो मीचि होऊनियां राहे ॥ १ ॥ ऐसा अनुभव बहुतां । अर्जुनादि सर्वथा उद्धवा ॥ २ ॥ एक एक सांगता गोष्टी । कल्प कोटी न सरेची ॥ ३ ॥ शरण येता जीवेंभावें । एका जनार्दनीं भावें हरीसी ॥ ४ ॥

२४४७ साक्षीभूत आत्मा म्हणती आहे देहीं । वांया कां विदेही जाहला मग । नाना मतें तर्क करितां विचार । पापांचे डोंगर अनायासें ॥ २ ॥ देहीं असोनि देव वांया कां शिणती । एका जनार्दनीं फजिती होती तयां ॥ ३ ॥

२४४८ आत्मत्वाचे ठायीं सर्व एकाकार । नाहीं नारीनर भेद भिन्न ॥ १ ॥ वर्णाश्रम धर्म ज्ञाति कुळगोत । एकाकारी होत आत्मतत्वीं ॥ २ ॥ सर्वो-

दित पाहे सर्वां ठायीं आहे । एका जनार्दनीं सोय धरी त्याची ॥ ३ ॥

२४४९ देहीं वाढे जों जों शांती । तों तों विरक्ती बाणे अंगीं ॥ १ ॥ ऐसा आहे अनुभव । देहीं देव प्रकाशे ॥ २ ॥ देहीं आत्मा परिपूर्ण । भरला संपूर्ण चौदेहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रिता ठाव । नाहीं वाव पाहतां जगीं ॥ ४ ॥

२४५० बहुतां पुण्यें करुनी जोडला नरदेह । नाहीं त्याचा वेवसाव घडला कांहीं ॥ १ ॥ न करावें तें केलें मनामागें धांवणें । परि नारायणें करुणा केली ॥ २ ॥ आवरूनि इंद्रियें धरियेलीं हातीं । कामक्रोधाची केली शांती ॥ ३ ॥ सर्व गांठा जाये परी श्रीगुरु भेटला । एका जनार्दनीं जाहला कृतकृत्य ॥ ४ ॥

२४५१ विदेह देह विस्मृती पावले । देहादेहीं फिटलें द्वैताद्वैत ॥ १ ॥ ऐसें जनार्दनें उघड दावलें । देहींच आटलें देहपण ॥ २ ॥ एका जनार्दनीं चौदेहां वेगळा । दाविलासे डोळा उघड मज ॥ ३ ॥

२४५२ निमाले राहिले गेले ऐसें म्हणती । वाया फजित होती आपुल्या मुखें ॥ १ ॥ नासलें कलेवर घेऊनियां मांडी । वाउगें तें तोंडीं बोलताती ॥ २ ॥ स्वयें आत्मज्योती जया नाहीं आदि अंत । तो आत्मा प्रत्यक्ष निमाला म्हणती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उफराटी बोली । कैशी भ्रांती पडली त्याचे मनीं ॥ ४ ॥

२४५३ व्याघ्रामुखीं सांपडे गाय । अद्वैती तूं रामनाम ध्याय ॥ १ ॥ वाचे गातां रामनाम । निवारेल क्रोधकाम ॥ २ ॥ भेदभावाची वासना । रामनाम निरसे जाणा ॥ ३ ॥ एकपणें जनीं वनीं । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

२४५४ रामराम स्मरे पुरुषोत्तम रे । सहज विद्या ज्ञेय ज्ञान हाहि अविद्या धर्म रे ॥ १ ॥ अहं आत्मा हेंही साही सर्व क्रिया भ्रमरे । विजन वन निरंजन जनार्दन रे ॥ २ ॥ अगम्य गति ध्येय ध्यान साधन बंधन रे । एका जनार्दन एका स्वानंद परिपूर्ण रे ॥ ३ ॥

२४५५ दर्पणामाजीं आपण । जीवरुपें शिव जाण ॥ जेणें स्वरूपें आपण । तद्रुप बिंब दिसे जाण ॥ २ ॥ अग्नि राखे झांकोळिला । तरी अग्निपणें संचला ॥ ३ ॥ जीवशिव दोन्ही होका एक । तरी एक मलीन एक चोख ॥ ४ ॥ थिल्लरीं प्रतिबिंब भासे । बिंबाअंगीं काय सविता वसे ॥ ५ ॥ निर्वाळुनी पहातां वेगीं । बिंब प्रतिबिंब वाउगी ॥ ६ ॥ ऐसें भुलूं नये मन । शरण एका जनार्दन ॥ ७ ॥

२४५६ आपणा आपण पाहे विचारुनी । विचारतां मनीं देव तूंचि ॥ १ ॥ तूंचि देव असतां फिरशी वनावनां । प्रगटती कहाणी बोलायासी ॥ २ ॥ देहींच देउळां आत्माराम नांदे । भांबावला भक्त हिंडे सदा रानें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भ्रमाची गोष्टी । वांयाचि शिणती होती कष्टी ॥ ४ ॥

२४५७ श्रमेंनी वाउग्या बोलती चावटी । परी हातवटी नये कोणा ॥ १ ॥ ब्रह्मज्ञानीं ऐसें मिरविती वरी । क्रोध तो अंतरीं वसतसे ॥ २ ॥ सर्वरूप देखे समाचि सारिखें । द्वैत अद्वैत पारखें टाकुनियां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ब्रह्मज्ञान बोली । सहजचि आली मज अंगा ॥ ४ ॥

२४५८ देव मनुष्य सुताचें बाहुलें । बापें बोळवणा सांगाते दिलें ॥ १ ॥ शेवट पालऊन दिसे मधु । नेणो जाय तंव अवघाची संबंधू ॥ २ ॥ आंत बाहेरी अवघेंची सूत । स्वरूप देखतां निवता हें चित्त ॥ ३ ॥ नीच नवा शोभतु साउला । एका जनार्दनीं मिरवला ॥ ४ ॥

२४५९ मस्तकीं केश चिकटले होती । जैं ते निघती आपुले हातीं ॥ १ ॥ मिळती जैशा मायबहिणी । हातीं घेउनी तेलफणी ॥ २ ॥ ऐसा त्रिगुणाचा ठावो । एका जनार्दनीं पहा वो ॥ ३ ॥

२४६० एकचि मोहरा नाथिली । हे तंव जाण भ्रांती बोली ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल रोकडा । विठ्ठल पाहे चहूंकडा ॥ २ ॥ आपण आंतबाहेरी पाहे । विठ्ठल देखोनी उगाची राहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । विठ्ठल विठ्ठल परिपूर्ण ॥ ४ ॥

२४६१ सूर्य अंधारातें नाशी । परी तो सन्मुख नये त्याशी ॥ १ ॥ माझें जिणें देखणपण । तेंवि मायेचें लक्षण ॥ २ ॥ देहीं देह अभिमान । जीवीं मायेचें तें ध्यान ॥ ३ ॥ एका जनार्दनीं माया । देहाधीन देवराया ॥ ४ ॥

२४६२ नित्य नूतन दीप ज्वाळा । होती जाती देखतां डोळा ॥ १ ॥ जागृती आणि देखती स्वप्न । दोहींसी देखतां भिन्न भिन्न ॥ २ ॥ भिन्नपणें नका राहूं । एका जनार्दनीं पाहूं ॥ ३ ॥

२४६३ कारवट पाहतां कडू तें होय । परिपाकीं पाहतां गोडचि गूळ ॥ १ ॥ कडू तेंचि गोड कडू तेंचि

क्रोड । समरस कोड सोयरीक ॥२॥ साखरेचें वृंदावन केलें । चाखों नेणें तें नाडोनि गेले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रपंच एकु । नश्वर म्हणतां नाडला लोकु ॥ ४ ॥

२४६४ जनार्दनें मज केला उपकार । पाडिला विसर प्रपंचाचा ॥ १ ॥ प्रपंच पारखा जाहला दुरा वारी । केलीसे बोहरी कामक्रोधां ॥ २ ॥ आशा तृष्णा यांचे तोडियेलें जाळें । कामनेचें काळें केलें तोंड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तोडिलें लिगाड । परमार्थ गोड दाखविला ॥ ४ ॥

२४६५ जनार्दनें केलें अभिनव देखा । तोडियली शाखा अद्वैताची ॥ १ ॥ केला उपकार केला उपकार । मोडियलें घर प्रपंचाचें ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकपणें देख । दाविला नवलाव अभेदाचा ॥ ३ ॥

२४६६ कामक्रोध वैरीयांचे तोडियले फांसे । जनार्दनें सरसें केलें मज ॥ १ ॥ देहाची वासना खंडून टाकिली । भ्रांतीची उडाली मूळ दोरी ॥ २ ॥ कल्पनेचा कंद समूळ उपडिला । हृदयीं दाविला आरसा मज ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सहज आटलें । स्वदेहीं भेटलें गुरुकृपें ॥ ४ ॥

२४६७ भुक्ति आणि मुक्ति फुकाचें ठेवणें । श्रीगुरु जनार्दनें तुच्छ केलें ॥ १ ॥ येर ब्रह्मज्ञाना काय तेथें पाड । मोक्षाचें कावाड वारियेलें ॥ २ ॥ साधन अष्टांग यज्ञ तप दान । तीर्थी तीर्थाटन शीण वांया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दाविला आरिसा । शुद्धि त्या सरसा सहज जाहलों ॥ ४ ॥

२४६८ देहाचें देऊळ देवळींच देव । जनार्दन स्वयमेव उभा असे ॥ १ ॥ पूजन ते पूज्य पूजकु आपण । स्वयें जनार्दन मागें पुढें ॥ २ ॥ ध्यान तें ध्येय धारणा स्वयमेव । जनार्दनीं ठाव देखियला ॥३ ॥ एका जनार्दनीं समाधीसमाधन । पडिलेंसें मौन देहीं देहा ॥ ४॥

२४६९ आतां यजन कैशापरी । संसारा नोहे उरी ॥ १ ॥ सद्गुरुवचन मंत्र अरणी । तेथोनि प्रगटला निर्धूम अग्नी ॥ २ ॥ सकळीं सकळांच्या मुखें । आर्पितसे यज्ञपुरुषें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं यज्ञें अर्पी । अर्पी त्यामाजी समर्पी ॥ ४ ॥

२४७० शांतीचेनि मंत्रें मंत्रुनी विभुती । लाविली देहाप्रती सर्व अंगा ॥ १ ॥ तेणें तळमळ हारपली व्यथा । गेली सर्व चिंता पुढिलाची ॥ २ ॥ लिगाडाची मोट बांधोनि टाकिली । वासना भाजली क्रोध अग्नी ॥३॥ एका जनार्दनीं शांत जाहला देव । कामनीक देव प्रगटला ॥ ४ ॥

२४७१ अहं सोहं कोहं सर्व आटलें । हृदय द्रुग्रुत्व सर्व फिटलें ॥ १॥ ऐसी कृपेची साउली । माझी जनार्दन माउली ॥ २ ॥ द्वैत अद्वैताचें जाळें । उगविलें कृपाबळें ॥ ३ ॥ अवघें एकरूप जाहलें । दुजेपणाचें ठाव पुशिले ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं । एकपणें भरला अवनीं ॥ ५ ॥

२४७२ पहा कैसी नवलाची ठेव । स्वयमेव देहीं देखिला देव ॥ १ ॥ नाहीं जप तप अनुष्ठान । नाहीं केलें इंद्रियांचें दमन ॥२॥ नाहीं दान धर्म व्रत तप । अवघा देहीं जालों निष्पाप ॥ ३ ॥ पापपुण्याची नाहीं आटणी । चौदेहासहित शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

२४७३ त्रिभुवनींचा दीप प्रकाशु देखिला । हृदयस्थ पाहिला जनार्दन ॥ १ ॥ दीपाचा ती वाती वातीचा प्रकाश । कळिकामय दीप देहीं दिसे ॥ २ ॥ चिन्मय प्रकाश स्वयं आत्मज्योती । एका जनार्दनीं भ्रांती निरसली ॥ ३ ॥

२४७४ उदारपणें उदार सर्वज्ञ । श्रीजनार्दन उभा असे ॥ १ ॥ तयाचे चरणीं घातली मिठी । जाहली उठाउठी भेटी मज ॥ २ ॥ अज्ञान हारविलें ज्ञान प्रगटलें । हृदयीं बिंबलें पूर्ण ब्रह्म ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नित्यता समाधी । वाउग्या उपाधी तोडियेल्या ॥४॥

२४७५ सोलीव ब्रह्मज्ञान सांगत जे गोष्टी । तें उघड नाचे दृष्टी संतांसंगें ॥ १ ॥ गळां तुळशीहार मुद्रांचे शृंगार । नामाचा गजर टाळ घोळ ॥ २ ॥ दिंडी गरुड टके मकरंद वैभव । हारुषे नाचे देव तया सुखी ॥३॥ एका जनार्दनीं सुखाची मांदुस । जनार्दनें समरस केलें मज ॥ ४ ॥

२४७६ माझें मीपण देहींच मुरालें । प्रत्यक्ष देखिलें परब्रह्म ॥ १ ॥ परब्रह्म सुखाचा सोहळा । पाहिलासे डोळां भरूनियां ॥२॥ ब्रह्मज्ञानाची तें उघडली पेटी । जाहलों असे पोटीं शीतळ जाणा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ज्ञानाचें तें ज्ञान । उघड समाधान जाहलें जीवा ॥ ४ ॥

२४७७ दीपाचें तें तेज कळिकें ग्रासिलें । उदय अस्त ठेले प्रभेवीण ॥ १ ॥ लोपलीसे प्रभा तेजाचें तेजस । जाहली समरस दीपज्योती ॥ २ ॥ फुंकिल्यावांचुनी तेज तें निमालें । त्रिभुवनीं प्रकाशिलें नवल

देख ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ज्योतीचा प्रकाश। जाहला समरस देहीं देव ॥ ४ ॥

२४७८ जेथें परापश्यन्तीची मावळली भाष। तो स्वयंप्रकाश दावी गुरु ॥ १ ॥ तेणें माझें मना जाहलें समाधान। निसरला शीण जन्मोजन्मीं ॥ २ ॥ उपाधी तुटली शांती हे भेटली। सर्व तेथें आटली तळमळ॥३॥ एका जनार्दनीं प्रेमाचें तें प्रेम। दाविलें सप्रेम हृदयांत ॥ ४ ॥

२४७९ उदार विश्वाचा दीपकु तेजाचा। प्रकाशु कृपेचा दावियेला ॥ १ ॥ हारपलें विश्व विश्वंभरपणें। दाविलें जनार्दनें स्वयमेव ॥ २ ॥ अकार उकार मकार शेवट। घेतिलासे घोट परब्रह्मीं ॥३॥ एका जनार्दनीं विदेह दाविला। सबराभरी दाटला हृदयामाजीं ॥४॥

२४८० देहाची आशा टाकिली परती। केलीसे आरती प्रपंचाची ॥ १ ॥ स्थूळ सूक्ष्म याची रचूनियां होळी। दावाग्नि पाजळी भक्तिमंत्रें ॥२॥ एका जनार्दनीं देहासी मरण। विदेही तो जाण जनार्दन ॥ ३ ॥

२४८१ फिरलों मी दशदिशा। वायां सोसा हाव भरी ॥ १ ॥ नाहीं जाहलें समाधान। वाउगा शीण जाहला पोटीं ॥ २ ॥ उरला हेत पंढरीसी। सुखराशी लाधली ॥३॥ एका जनार्दनीं सुखाचें भांडार। जोडिलें निर्धार न सरेची ॥ ४ ॥

२४८२ आणिकांची धरितां आस। होतो नाश जीवित्वा ॥१॥ म्हणोनि निर्धारिलें मन। धरिलें ठाणें रामकृष्ण ॥ २ ॥ न धांवे आतां कोठें मन। हृदयीं ध्यान धरिलें तें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्राण। ठेविला जाण समूळ चरणीं ॥ ४ ॥

२४८३ मागें बहुतांसी सांभाळिलें। ऐसें वरदान ऐकिलें ॥ १ ॥ म्हणवोनि धरिला लाहो। मनींचा संदेहो टाकुनी ॥२॥ अजामेळ पापराशी। नेला निज नित्य वैकुंठासी ॥ ३ ॥ तारिलें उदकीं पाषाण। ऐसें महिमान नामाचें ॥४॥ एका जनार्दनीं जाहलों दास। नाहीं आस दुसऱ्याची ॥ ५ ॥

२४८४ उपाधींच्या नांवें घातियेलें शून्य। आणिका दैन्यवाणें काय बोलूं ॥ १ ॥ टाकूनियां संग धरियेला देव। आतां तो उपाव दुजा नाहीं ॥ २ ॥ सर्व वैभव सत्ता तयाचे पदरीं। जालों अधिकारी आम्हीं बळें ॥३॥ एका जनार्दनीं तोडियेला संग। जालों आम्ही निःसंग हरिभजनीं ॥ ४ ॥

२४८५ सकळ प्रपंचाचें भान। तें तंव मृगजळा समान ॥१॥ जन्ममरणापुरता। त्रिगुणातें नातळता ॥२॥ प्रपंचाची अलिप्त युक्ती। ऐशी आहे देहस्थिती ॥३॥ प्रपंचीं न दिसे भान। एका शरण जनार्दन ॥ ४ ॥

२४८६ उघड दाखविलें देवा। नाहीं सेवा घेतली ॥ १ ॥ ऐसी प्रेमाची माउली। जगीं व्यापक व्यापली ॥ २ ॥ नाहीं घालीती भार कांहीं। आठव देहीं रामकृष्ण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। मन माझें नेलें चोरून ॥ ४ ॥

२४८७ मनाचे माथां घातिला धोंडा। वासना कापुनी केला लांडा ॥ १ ॥ जनीं लांडा वनीं लांडा। वासना रांडा सांडियेलें ॥२॥ वासना सांडेनि जालों सांड्या। कामना कामिक म्हणती गांड्या ॥ ३ ॥ कामना सांडे विषयीं लाताड। एका जनार्दनीं तयाची चाडे ॥ ४ ॥

२४८८ मनाचें तें मन ठेविलें चरणीं। कुर्वंडी करुनी जनार्दनीं ॥ १ ॥ ध्यानाचें तें ध्यान ठेविलें चरणीं। कुर्वंडी करुनी जनार्दनीं ॥२॥ ज्ञानाचें तें ज्ञान ठेविलें चरणीं। कुर्वंडी करुनी जनार्दनीं ॥ ३ ॥ शांतीची शांती ठेविली चरणीं। कुर्वंडी करुनी जनार्दनीं ॥४॥ दयेची ते दया ठेविली चरणीं। कुर्वंडी करुनी जनार्दनीं ॥ ५ ॥ उन्मनी समाधी ठेविली चरणीं। कुर्वंडी करुनी जनार्दनीं ॥ ६॥ एका जनार्दनीं देहाची कुर्वंडी। वोवाळोनि सांडी जनार्दनीं ॥ ७ ॥

२४८९ एक भाव दुजा न राहो मनीं। श्रीरंगावांचूनि दुजें नाहीं ॥ १ ॥ मनासी ते छंद आदर आवड। नामामृत चाड गोविंदाची ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम वाचे गाऊं। आणीक न ध्याऊं दुजें कांहीं ॥ ३ ॥

२४९० अवघें देवा तुजसमान। मज नाहीं भिन्न भिन्न ॥ १ ॥ नाम वाचे सदा गाऊं। आवडी ध्याऊं विठ्ठल ॥ २ ॥ वारंवार संतसंग। कीर्तनरंग उल्हास ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सार। विठ्ठल उच्चार करूं आम्ही ॥ ४ ॥

२४९१ भुक्तिमुक्तीचें कारण। नाहीं नाहीं आम्हां जाण ॥ १ ॥ एक गाऊं तुमचें नाम। तेणें होय सर्व काम ॥ २ ॥ धरलिया मूळ। सहज हातीं लागे फळ ॥ ३ ॥ बीजाची आवडी। एका जनार्दनीं गोडी ॥ ४ ॥

२४९२ लौकिकापुरता नोहे हा विभाग । साधिलें अव्यंग सुखसार ॥ १ ॥ अविट विटेना बैसलें वदनीं । नाम संजिवनी ध्यानीं मनीं ॥ २ ॥ बहुता काळाचें ठेवणें शिवाचें । सनकसनंदनाचें कुळदैवत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाग्य तें चांगलें । म्हणोनि मुखा आलें रामनाम ॥ ४ ॥

२४९३ वेदाचा वेदार्थ शास्त्राचा शास्त्रार्थ । आमुचा परमार्थ वेगळाची ॥ १ ॥ श्रुतींचें निजवाक्य पुराणींचें गुज । आमुचें आहे निज वेगळेंची ॥ २ ॥ तत्त्वांचें परमतत्त्व महत्त्वासी आलें । आमुचें सोनुलें नंदाघरीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ब्रह्मांडाचा जीव । आमुचा वासुदेव विटेवरी ॥ ४ ॥

२४९४ गाढवासांगातीं सुकाळ लाथांचा । श्रम जाणिवेचा वांया जाय ॥ १ ॥ आम्हासी तो एक प्रेमाचें कारण । नामाचें चिंतन विठोबाच्या ॥ २ ॥ एका जनार्दनीं आवडी हे माझी । संतचरण पूजीं सर्वकाळ ॥ ३ ॥

२४९५ दास्यत्वें चोखट । रामनामें सोपी वाट ॥१॥ करितां लाधले चरण । मना जाहलें समाधान ॥२॥ होतो जन्मोजन्मीं तापलों । तुमचे दरुशनें निवांत ठेलों ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । जनार्दनीं एकपणीं ॥ ४ ॥

२४९६ रामकृष्णनाम । कथा करूं कीर्तन ॥ १ ॥ हाचि आम्हां मंत्र । सोपा दिसे सर्वत्र ॥ २ ॥ संतांचे संगती । मुखीं नामामृत तृप्ती ॥ ३ ॥ वसो कीर्तनीं सदा । माझी मती गोविंदा ॥ ४ ॥ जनार्दनीचा एका । म्हणे माझी कींव भाका ॥ ५ ॥

२४९७ चरणाची सेवा आवडी करीन । कायावाचामन धरुनी जीवीं ॥१॥ यापरतें साधन न करीं तुझी आण । हाचि परिपूर्ण नेम माझा ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकत्वें पाहीन । हृदया ध्याईन जनार्दन ॥३॥

२४९८ मागें बहुतांनीं मानिला विश्वास । म्हणोनि मी दास सत्य जाहलों ॥१॥ काया वाचा मन विकिलें चरणीं । राहिलों धरूनि कंठीं नाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं नामाचा प्रताप । भक्त आपेआप तरताती ॥३॥

२४९९ वांयाविण करूं नये बोभाट । सांपडली वाट सरळ आम्हां ॥ १ ॥ आतां नाहीं भय तत्त्वता । ठेविला माथा चरणावरी ॥ २ ॥ धरिल्या जन्माचें सार्थक । निवारला थोर धाक ॥ ३ ॥ गेला मागील तो शीण । तुमचें दरुशन होतांची ॥ ४ ॥ पूर्णपणें पूर्ण जाहलों । एका जनार्दनीं धालों ॥ ५ ॥

२५०० अवघा व्यापक दाविला । माझा संदेह फिटला ॥ १ ॥ मन होतें गुंडाळलें । आपुले चरणीं पैं ठेविलें ॥ २ ॥ केलें देहाचें सार्थक । तुटला जन्ममरण धाक ॥ ३ ॥ नाहीं पहावया दृष्टी । अवघा जनार्दन सृष्टी ॥ ४ ॥ कार्य कारण हारपलें । द्वैत अवघें निरसलें ॥ ५ ॥ उडाले वैरियाचें ठाणें । आतां एकचि जहालें एकपणें ॥६॥ दुजा हेत हारपला । एका जनार्दनीं एकला ॥ ७ ॥

२५०१ सखेये अनुतापें वैराग्यतापें अति संतप्त । नयनीं अश्रु अंगीं स्वेद रोमांच जीवीं जीव मूर्च्छित वो ॥१॥ माझें मजमाजीं गुरुकृपा मन तें जालें उन्मन वो । देहीं देह कैसा विदेह जालें क्रिया चैतन्यघन वो ॥२॥ माझें मीपण पाहतां चित्तीं चित्त अचिंत वो । वृत्ति निवृत्ति तेथें चिद्रूप जाली परमानंदें तृप्त वो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकत्वें जन वन समसमान एक । एकपणें परिपूर्ण जाला त्रैलोक्य आनंदघन वो ॥ ४ ॥

२५०२ असोनि देहीं आम्ही विदेही भाई । नातळों कर्म अकर्माचे ठायीं ॥१॥ माझें नवल म्यांच पाहिलें डोळां । शब्द निःशब्द राहिलों वेगळा ॥ २ ॥ काय सांगूं नवलाची कहाणी । पाहतें पहाणें बुडालें दोन्ही ॥ ३ ॥ न पहावे न देखवे नायकवे कानीं । कायावाचामनें शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

२५०३ जाहली गेली तुटली खुंटली हाव । पहातां पाहणें एकचि जाहला देव ॥ १ ॥ जंगम स्थावर अचळ चळाचळ । अवघा व्यापुनी राहिला अकळ ॥ २ ॥ न कळे लाघव खेळ खेळे करूणदानी । कायावाचामनें शरण एका जनार्दनीं ॥ ३ ॥

२५०४ देव पाहतां मजमाजीं भेटला । संदेह फिटला सर्व माझा ॥ १ ॥ माझा मीच देव माझा मीच देव । सांगितला भाव श्रीगुरुनें ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाहिलासे देव । फिटला संदेह आतां माझा ॥ ३ ॥

२५०५ पहावया गेलों देव । तों मीचि स्वयमेव ॥ १ ॥ आतां पाहणेंचि नाहीं । देव भरला हृदयीं ॥ २ ॥ पाहतां पाहतां खुंटलें । देवपण मजमाजीं आटलें ॥ ३ ॥ परतलें दृष्टीचें देखणें । अवघा देव ध्यानेंमनें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देव । पुरे रिता कोठें ठाव ॥ ५ ॥

२५०६ कायावाचामनें। कृपाळु दीनाकारणें ॥ १ ॥ ऐसा समर्थ तो कोण। माझ्या जनार्दनावांचून ॥२॥ माझें मज दाखविलें। उघड वाचे बोलविलें ॥ ३ ॥ जनीं जनार्दन। एका तयासी शरण ॥ ४ ॥

२५०७ सर्व देवांचा हा देव। उभा राहे विटेवरी ॥ १ ॥ त्याचे ठायीं भाव माझा। न दिसे दुजा पालटू ॥ २ ॥ वारंवार ठेवीन डोई। उगेच पायीं सर्वदा ॥ ३ ॥ न मागें भुक्ती आणि मुक्ती। संतसंगती मज गोड ॥ ४ ॥ त्याचें वेड माझे मनीं। शरण एका जनार्दनीं ॥ ५ ॥

२५०८ आजीं देखिलीं पाउलें। तेणें डोळे धन्य जाहलें ॥ १ ॥ मागील शीणभारू। पाहतां न दिसे निर्धारू ॥ २ ॥ जन्माचें तें फळ। आजी जाहलें सुफळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं डोळा। विठ्ठल देखिला सांवळा ॥ ४ ॥

२५०९ सायासाचें बळ। तें आजी जाहलें अनुकूळ ॥ १ ॥ धन्य जाहलें धन्य जाहलें। देवा देखिले हृदयीं ॥२॥ एका जनार्दनीं संशय फिटला। देव तो देखिला चतुर्भुज ॥ ३ ॥

२५१० मज करूं दिली नाहीं सेवा। दाविलें देवा देहींच ॥ १ ॥ जग व्यापक जनार्दन। सदा वसे परिपूर्ण ॥ २ ॥ भिन्न भिन्न नाहीं मनीं। भरलासे जनीं वनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। सर्वा ठायीं व्यापक जाण ॥ ४ ॥

२५११ मानसींच ध्यान मानसींच स्नान। मानसींच अर्चन करूं आम्ही ॥ १ ॥ न करूं साधन लोकिकापुरतें। न पुजूं दैवतें आन वांयां ॥ २ ॥ मानसींच तप मानसींच जप। मानसीं पुण्यपाप नाहीं आम्हां ॥३॥ मानसीं तीर्थयात्रा मानसीं अनुष्ठान। मानसीं धरूं ध्यान जनार्दन ॥४॥ एका जनार्दनीं मानसीं समाधी। सहज तेणें उपाधी निरसली ॥ ५ ॥

२५१२ मानसींच अर्थ मानसींच स्वार्थ। मानसीं परमार्थ दृढ असे ॥ १ ॥ मानसींच देव मानसींच भक्त। मानसींच अव्यक्त दिसतसे ॥२॥ मानसींच संध्या मानसीं मार्जन। मानसीं ब्रह्मयज्ञ केला आम्हीं ॥ ३ ॥ मानसीं आसन मानसीं जनार्दन। एका जनार्दनीं शरण मानसींच ॥ ४ ॥

२५१३ बहुत पुराणें बहुत मतांतरें। तयांच्या आदरें बोल नोहे ॥ १ ॥ शाब्दिक संवाद नोहे हा विवाद। सबाह्य परमानंद हृदयामाजीं ॥ २ ॥ नोहे हें कवित्व प्रेमरस काढा। भवरोग पीडा दुरी होय ॥ ३ ॥ नोहे हें कामनिक आहे पैं निष्कामानिक। स्मरतां नासे दुःख जन्मांतरींचें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं माझा तो निर्धार। आणीक विचार दुजा नाहीं ॥ ५ ॥

२५१४ जो काळासी शासनकर्ता। तोचि आमुचा मातापिता ॥ १ ॥ ऐसा उदार जगदानीं। जनार्दन त्रिभुवनीं ॥ २ ॥ आघात घात निवारी। कृपादृष्टीं छाया करी ॥ ३ ॥ जन तोचि जनार्दन। एका जनार्दनीं भजन ॥ ४ ॥

२५१५ आम्हां काळाचें भय तें काय। जनार्दन बापमाय ॥ १ ॥ पाजी प्रेमाचा तो पान्हा। नये मना आन दुजें ॥ २ ॥ दिशाद्रुम भरला पाही। जनार्दन सर्वां ठायीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ध्यात। जनार्दन तो ध्यानाआंत ॥ ४ ॥

२५१६ स्वर्ग मृत्यु पाताळ सर्वांवरी सत्ता। नाही पराधीनता जिणें आमुचें ॥ १ ॥ नाहीं त्या यमाचें यातनेचें भय। पाणी सदा वाहे आमुचे घरीं ॥ २ ॥ नाहीं जरामरण व्याधीचा तो धाक। सुखरूप देख सदा असों ॥३॥ एका जनार्दनीं नामाच्या परिपाठी। सुखदुःख गोष्टी स्वप्नीं नाहीं ॥ ४ ॥

२५१७ जन्मोजन्मीं आम्हीं बहु पुण्य केलें। मग या विठ्ठलें कृपा केली ॥ १ ॥ जन्मोनी संसारीं झालों याचा दास। माझा तो विश्वास पांडुरंगीं ॥ २ ॥ भ्रमर सुवासीं मधावरी माशी। तैसें या देवासी मन माझें ॥ ३ ॥ आणिका देवासी नेघे माझें चित्त। गोड गातां गीत विठोबाचें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मज तेथें न्यावें। हाडसोनी द्यावें संतांपाशीं ॥ ५ ॥

२५१८ अगाध तुझी लीला आकळ कैसेनी कळे। ब्रह्मा मुंगी धरुनी तुझें स्वरूप सांवळें ॥ १ ॥ तुज कैसें भजावें आपणा काय देखावें। तुजमाजीं राहूनि तुजला कैसें सेवावें ॥ २ ॥ अगा देव तूं आम्हा म्हणसी मानवी। हेम अलंकार वेगळे निवडावे केवीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सबाह्याभ्यंतरी नांदे। मिथ्या स्वप्नजात जेवीं जाय ते बोधे ॥ ४ ॥

२५१९ निरासिया वरु आपरूपें। नुपजतां लग्न लाविलें बापें ॥ १ ॥ निरासिया वरू निरासिया वरू।

निरासी गमला केला संसारू ॥ २ ॥ निरासिया वरू साजिरा कैसा । अंगींचिया तेजें आरसा जैसा ॥ ३ ॥ निरासिया जोंवरी आस । संकल्पाशीं जो तोडितो पाश ॥ ४ ॥ आस निरास जाली पाही । एका जनार्दनीं सलग्न पायीं ॥ ५ ॥

२५२० अविवेकें देखा नवल केलें । अभिमानें कैसें लग्न लाविलें ॥ १ ॥ गुणाची नोवरी अवगुणाचा नोवरा । सख्या सहोदरा लग्न केलें ॥ २ ॥ पांचे सुखवाडी सासुरवाडीये । अकल्पीचे शेजे निजलींये ॥ ३ ॥ अंगसंगेवीण संतती जाहली । आब्रह्म कैसी तात्काळ व्याली ॥ ४ ॥ गुणाचेनि बळें वरसोनि पोटें । घरोघरीं भेटी नेत असे ॥ ५ ॥ सत्कर्म विवेकु पोटासी आला । तेणें जागविला आपुला व्याला ॥ ६ ॥ उठोनियां वरु संतती खाये । नोवरीसहित गेली माये ॥ ७ ॥ पितामहाचा पिता सुभानुतेजें । एका जनार्दनीं न दिजे दुजें ॥ ८ ॥

२५२१ एक माझी माता दोघेजण पिता । मज तीन कांता दोघे सुत ॥ १ ॥ वेद जाणा बंधु दशक बहिणी । कन्या झाल्या तिन्ही माझे पोटीं ॥ २ ॥ बंधु बहिणी संलग्न तें लाविलें । विपरीत झालें सांगवेना ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांगतसे गूढ । नाहीं तरी मूढ होउनी राहे ॥ ४ ॥

२५२२ विपरीत अर्थ ऐकतां कानीं । पुरुष गाभणी स्त्रीचेनि चिंतनीं ॥ १ ॥ नवल गे माय नवल गे माय । तीन पोरें व्याला सांगूं काय ॥ २ ॥ एक ब्रह्मचारी काळि लावा मोठा । साठ पोरें व्याला पहा चोहटा ॥ ३ ॥ एक मेलें गर्भीं असतां गे माय । बारा वर्षें लपलें सांगू मी काय ॥ ४ ॥ एका जनार्दनीं उघडली दृष्टी । अर्थ पहातां सुख होय पोटीं ॥ ५ ॥

२५२३ विटाळेंविण पोटा आला । अवघा संसार मिंधा केला ॥ १ ॥ लग्न लागतां आला पोटा । मग सोडिलें अंतरपाटा ॥ २ ॥ ॐकारेसी बुडाली घडी । लग्न लाविलें औटावे घडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लग्न समरसें । पाहों गेलिया त्या लाविलें पिसें ॥ ४ ॥

२५२४ बोलूं नये तें आलें बोला । आमुचा बाप गरवार जाला ॥ १ ॥ नवलहि ऐकिलें एका जी तुम्ही चोज । ऐकूं जातां तोचि नाचे भोज ॥ २ ॥ प्रौढ जाली आमुची आई । बापासी नांवें त्या ठेविलीं पाही ॥ ३ ॥ लेकीनें बापासी केले सावेव । एका जनार्दनीं पहा नवलाव ॥ ४ ॥

२५२५ अवघ्या संसाराचा कळस जाला । आपुलाची कैसा पोटा आला ॥ १ ॥ पाठीं बैसला तोचि पोटीं । उघड्या दिठी देखतसे ॥ २ ॥ अमोल्याचें कूळ न सांगवे तोंडें । सोय धरी तरी सख्खीं भावंडें ॥ ३ ॥ पाठीं पोटी बैसला पाठीं । सोयरीक गोष्टी एका जनार्दनीं ॥ ४ ॥

२५२६ बोलणें बोलतां हेंचि दुर्घट । नुपजत लेकासी लाविला पाट ॥ १ ॥ बोलूं नये याचे सत्ते भेणें । मौनची राहणें हेंचि शहाणपण ॥ २ ॥ तेथील संतती म्हणाल पवित्र । न म्हणतां तरी घात कुळगोत्र ॥ ३ ॥ कांहीं एक वेद बोलुं गेला बोली । चवंढाई चिरूनी तीन कांडें केलीं ॥ ४ ॥ श्लाघोनि भक्ती बोलूं गेलीं तोंडें । बोल बोले तंव केलीं नवखंडें ॥ ५ ॥ लडिवाळ भक्त बोलोनि हांसे । बोल बोले तंव लावियेलें पीसें ॥ ६ ॥ बोलावला येतां चढला अभिमाना । बोल बोले तंव दवडिलें राना ॥ ७ ॥ एका जनार्दनीं मौनची घोटी । एकपणें तेंहि घातलें पोटीं ॥ ८ ॥

२५२७ बाप तोचि माय होऊनि आला पोटीं । जातक वर्णितां गुंती पडली भेटी ॥ १ ॥ बाप कीं माय म्हणावा पुत्र । भुललीया श्रुति करितां वृत्तांत ॥ २ ॥ मीं बापापोटीं कीं बापु माझ्या पोटीं । वर्णितां ज्योतिषी विसरले त्रिपुटी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जातक मौनी । जन्मनाम ठेविलें निशब्द देउनी ॥ ४ ॥

२५२८ एकाची दिठी एकाचे डोळे । एक चाले कैसें एकाचिये खोळे ॥ १ ॥ सबाह्य अभ्यंतरीं सारिखा चांग । दोघे मिळोनियां एकचि अंग ॥ २ ॥ यापरी रिगाली अभिन्न अंगी । दोघे सामावले अंगींच्या अंगीं ॥ ३ ॥ ऐसें लेकीनें बापासी बांधिलें कांकण । एका जनार्दनीं केलें पाणिग्रहण ॥ ४ ॥

२५२९ माये आधीं लेक जन्मली । दोघींच्या लग्नाची आयती केली ॥ १ ॥ कोण नोवरा कोण नोवरी । अर्थ पाहतां हें न कळे निर्धारीं ॥ २ ॥ बापा आधीं लेक जन्मला । लग्नाचा सोहळा बापाचा केला ॥ ३ ॥ वरात निघाली नोवरा नोवरी । एका जनार्दनीं जाहली नवल परी ॥ ४ ॥

२५३० स्वामी सेवका अबोला । ऐसा जन्मचि अवघा गेला ॥ १ ॥ जन्मवरी जुनें भातें । साधन शिऊं नेदी हातें ॥ २ ॥ काम करूं नेदी हातीं । उसंत नाहीं अहोरातीं ॥ ३ ॥ श्रद्धेवीण अचाट सांगे । ढळे

नेदी पुढें मागें ॥४॥ न गणी दिवस मास वरुषी। भागों जातां वहीच पुसी ॥५॥ चावा चावी करूं नेदी। सगळें गिळवी त्रिशुद्धी ॥६॥ जो कां ग्लानी साधन मागें। तेंचि बंधन त्यासी लागे ॥७॥ जो सेवा करी नेटका। त्यासी करुनी सांडी सुडका ॥८॥ झोंप लागों नेदी कांहीं। निजे निजवी पाहीं ॥९॥ एका जनार्दनीं निज सेवा। जीवें उरो नेदी जीवा ॥१०॥

२५३१ गो गोरसातीत स्वानंद साखरेसी। प्रेमें पेहें पाजीन सख्यासोयऱ्यासी ॥१॥ घेई घेई बाळा घोट एक। झणीं पायरव होईल कुशलीं पडे तर्क ॥२॥ दृश्य न दिसे तें काळीं अवघें लावीं होटीं। सद्‌गुरुकांचे शिंपीवरी गिळी तैसें पोटीं ॥३॥ अंतर तृप्त झालें सबाह्य कोंदलें। निज गोडिये गोडपणें तन्मय जाहलें ॥४॥ सद्‌गुरु माउली पेहे पाजी अंगीं भरला योग। तेणें देहबुद्धी समूळ केला त्याग ॥५॥ पंचभूतांचें अंगुलें सुवर्ण हारपलें। माझें माझें म्हणत होतें त्या गुणा विरालें ॥६॥ आर्तीची हारली भूक जालें सुख। निजानंदीं पालखीं पहुडलें स्वात्मसुख ॥७॥ पेहे पाजायाचें मिसें देतसे पुष्टी तुष्टी। एका सामावला जनार्दना पोटीं ॥८॥

२५३२ नयन तान्हेलें पाजावें काई। मना खत झालें फाडूं कवणे ठायीं ॥१॥ ऐसा कोणीहि वैद्य मिळता का परता। सुखरूप काढी मनाची का व्यथा ॥२॥ डोळ्याची बाहुली पाहातां झडपली। तिसी रक्षा भलां केविं करूं ॥३॥ निढळींचीं अक्षरें चुकलीं कानामात्रें। शुद्ध त्याहावें कैसें लिहिणारें ॥४॥ जीवाचिया डोळा पडळ आलें। अंजन सुदलें केविं जाय ॥५॥ एका जनार्दनीं जाणे हातवटी। पुण्य घेउनी कोणी करा भेटी ॥६॥

२५३३ धरा अधर जाली वोटंगणें काई। जळें मळें तें घ्यावें कवणे ठायीं ॥१॥ ऐसा कोण्ही गुणीयां मिळों का निरुता। भूतें धरे धरी आपुलीया सत्ता ॥२॥ अग्नि हिंवेला तापावें कोठें। पवना प्राणु नाहीं कवण लावी वाटे ॥३॥ गगन हारपलें पाहावो कवणे ठायीं। मन मुळीं लागलें शांतीक तें पाहीं ॥४॥ स्वादें जेवणार गिळिला पैं जाणा। चवी सांगावया सांग तें कवणा ॥५॥ एका जनार्दनीं जाणे एक खुणे। त्यासी भेटी कोणी घ्या एकपणें ॥६॥

२५३४ हें सहजचि थोरावलें। पृथ्वी आप तेज झालें। वायु आकाश संचलें। आनंदलें सकळही ॥१॥ तें मोहरी येवढें चक्र। गगनीं हा निर्धार। याचा पाहे पां विचार। चैतन्यामाजीं ॥२॥ तेथें वेदासी बोबडी। अनुभवी पैलथडी। एका जनार्दनीं गोडी। नित्य घेतसे ॥३॥

२५३५ आतां आम्ही सहजचि थोर। ब्रह्मा विष्णू महेश्वर। परब्रह्म स्वयें ॐकार। परात्पर जगदात्मा ॥१॥ आम्ही सहजचि स्वतःसिद्ध। जागृति सुषुप्ति साध्य। तूर्या त्रिसाक्षिणी बोध। अति अगाध उन्मनी ॥२॥ ते उन्मनी परात्पर। निर्गुण हो निराकार। तूर्या तिचा आकार। एका जनार्दनीं सगुणाकार। देह झाला ॥३॥

२५३६ उन्मनीचा हेलावा। तूर्या त्रिनयनीं दावावा। त्रिगुण तूर्या सांठवावा। तें कारण उन्मनीं ॥१॥ हातां देऊनि बावन कस। भूमंडळीं फिरवा भलत्यास। नाहीं लांछन हीणकसास। बाळकास तेवीं तें ॥२॥ एका जनार्दनीं हा बोध। उघड बोलिलों सुबोध। अनुभवोनि हा बोध। संतचरण धरावे ॥३॥

२५३७ नाभिस्थानीं ठेवा हृदयकमळीं पहावा। द्विदळीं अनुभवा एकभाव ॥१॥ अर्धमात्रा बिंदु पहातां प्रकार। होऊनि साचार सुखी राहे ॥२॥ प्रणव ओंकारु विचार करितां। बिंदूची तत्त्वता सर्वगत ॥३॥ कुंडलिनी गति सहजचि राहे। सहस्रदळीं पाहे आत्मरूप ॥४॥ भिन्नाभिन्न नाहीं अवघेंचि स्वरूप। पाहतां निजरूप रूप होय ॥५॥ तेथें कैंचा विचारू कैंचा पां अनाचारू। एका जनार्दनीं साचारू सर्वां घटीं ॥६॥

२५३८ रात्रंदिवस जप होती साठ घटिका। संख्या त्याची ऐका निरनिराळी ॥१॥ दीड घटिका पळें दहा निमिष दोन। प्रथम तें स्थान आधारचक्र ॥२॥ साडेसोळा घटिका दहा पळें लेखा। निमिषें तीन देखा स्वाधिष्ठानीं ॥३॥ दहा पळें देखा घटिका साडेसोळा असती। मणिपूर गणती निमिष चार ॥४॥ आणिक घटि पळें तितुकीचि पाहीं। अनुहत ठायीं निमिष पांच ॥५॥ पावणेतीन घटिका दाहा पळें जाणा। विशुद्धीचि गणना निमिष एक ॥६॥ आज्ञाचक्रावरी पावणेतीन घटिका। दीडपळ देखा निमिष एक ॥७॥ पळ आठ घटिका अडिचाची गणती। निमिष चवदा असती सहस्रदळीं ॥८॥ सहाशें ते सहस्र एकविस होती। जनार्दनप्राप्ती एका उपायें ॥९॥

२५३९ आंगुलीवरी आंगुली । खेळतसे तान्हुली । पडली तिची साउली । भिन्न माध्यान्ही ॥१॥ दिवसाचें पाहणें । पाहतां दिसे लाजिरवाणें । खेळ मांडिला विदानें । नवल ऐका ॥२॥ बारा सोळा घागरी । पाणी नाहीं थेंब वरी । नाहायासी बैसली नारी । मुक्त केशीं ॥३॥ घरधनी उभा ठेला । तेणें रांजण उचलिला । जाउनी समुद्रीं बुडाला । नवल ऐका ॥ ४ ॥ नाहतां नारी उठली । परपुरुषा भेटली । आनंदानें बैसली । निजस्थानीं ॥ ५ ॥ काळें निळें नेसली । जाउनी दारवंटां बैसली । एका जनार्दनीं देखिली । नवल ऐका ॥ ६ ॥

२५४० जगामध्यें काय हालत । तें दृष्टीसी नाहीं भरत । अचळ असोनि चळत । चंचळ म्हणतां आहे मुठींत ॥ १ ॥ कैसें बोटानें दाखवूं तुला । सावध होई गुरूच्या मुला । हा शब्द अचोज वेगळा । अर्थ जाणे सहस्रांत विरळा ॥२॥ कांहीं नसोनि तें दिसत । नाहीं म्हणतां सत्य भासत । आकारीं आकार लपत । वाउगें जाणत्यासी भासत ॥ ३ ॥ अहं सोहं कोहं लपाला । उघड दृष्टीरूपा आला । जगीं व्यापक नसोनि व्यापला । एका जनार्दनीं गुरुपुत्र भला ॥४॥

२५४१ चक्षुदर्पणीं जग हें पहा । जगज्जीवनीं मुरुनी रहा । तूर्या कालिंदी तीर्थी नाहीं । पापपुण्यासी तिळांजुळी वहा ॥ १ ॥ डोळ्यांनो सत्य ही गुरुची खुण । आपुलें स्वरूप घ्या ओळखून ॥ ध्रु० ॥ तिन्ही अवस्था सांडुनी मागें । अर्धचंद्राच्या चांदण्यांत वागे । चांदणें ग्रासुनि त्या ठायीं जागे । गड उन्मनीं झडकरी वेगें ॥२॥ एवढें ब्रह्मांडफळ ज्या देठीं । तें आटलें देखण्याचे पोटीं । त्यासी पहातां पाठी ना पोटीं । मीतूंपणाची पडली तुटी ॥ ३ ॥ चहूं शून्यांचा निरसी जेणें । शून्य नाहीं तें शून्यपणें । शून्यातीतचि स्वयंभ होणें । शून्य गाळूनि निरशून्यपणें ॥ ४ ॥ चार सहा दहा बारा सोळा । ह्या तो आटल्या देखण्याच्या कळा । कळातीत स्वयंभ निराळा । एका जनार्दनीं सर्वांग डोळा ॥ ५ ॥

२५४२ एक पांच तीन नवाचे शेवटीं । अठरा हिंपुटी जयासाठीं ॥ १ ॥ सात तेरा चौदा घोकितां श्रमले । पंचवीस शिणले परोपरी ॥ २ ॥ तेहतिसां आटणी चालिसां दाटणी । एकुणपन्नासाची काहाणी काय तेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपणें एक । बावन्नाचा तर्क न चालेची ॥ ४ ॥

## श्रीविठ्ठलाचें वृक्षरूपीं वर्णन.

२५४३ कान्होबा नवल सांगतों गोष्टी । एक वृक्ष दृष्टी देखिला तयावरी सृष्टी ॥ १ ॥ कोडें रे कोडें कान्होबा तुझें कोडें । जाणती जाणती अर्थ पाहतां उघडें ॥ ध्रु० ॥ वृक्षासी नाहीं मूळ वर शेंडा नाहीं सरळ । बावन शाखा पल्लव पत्र पुष्प भरलें सकळ ॥ २ ॥ एका जनार्दनीं वृक्ष सुढाळ । तयावरी खेळे एक एकुलतें बाळ ॥ ३ ॥

२५४४ पंचभूतें नव्हतीं जंई । तैं वृक्ष देखिला भाई । अधोभागा शेंडा मूळ पाहीं । वरी वेधली तिसी पाय नाहीं ॥ १ ॥ सांगे तूं आमचें कोडें कान्होबा सांगे तूं आमचें कोडें । नाहीं तरी जाऊं नको पुढें ॥ ध्रु० ॥ नवलक्ष जया शाखा । पत्रपुष्पें तेचि रेखा । पंचभूतें कोण लेखा । ऐसा वृक्ष देखिला देखा ॥२ ॥ तयावरी एक सर्पीण । तिनें खादलें त्रिभुवन । शरण एका जनार्दन । हें योगियाचें लक्षण रे ॥ ३ ॥

२५४५ सगुण निर्गुण नोहे वृक्ष । पाहतां नेत्रीं न भासे सादृश्य । देखतां देखत होतो अदृश्य ॥ १ ॥ सांग रे कान्होबा हें कोडें । तुझें तुजपाशीं केलें उघडें । आम्हां न कळे वांडेंकोडें ॥ २ ॥ एक मुळीं वृक्ष देखिला । द्विशाखा तो शोभला । पाहता पत्रें पुष्पें न देखिला ॥ ३ ॥ ऐसे वृक्ष अपरंपार । एका जनार्दनीं करा विचार । मग चुकेल वेरझार ॥ ४ ॥

२५४६ अलक्ष अगोचर म्हणती वृक्ष । तो दृष्टी न दिसे साक्ष । योगी म्हणती पाहिला लक्ष ॥ १ ॥ कान्होबा तुझें कोडें । तुजपुढें केलें उघडें । सांगतां वेद जाहले वेडे रे ॥ २ ॥ सहा अठरांची मिळणी । छात्तिसांचें पातलें पाणी । तो वृक्ष देखिला नयनीं रे ॥ ३ ॥ पंचाणवाची एक शाखा । एका जनार्दनीं वृक्ष देखा । अर्थ पाहतां मोक्ष रेखा रे ॥ ४ ॥

२५४७ अहं सोहं वृक्षा तो निघाला बोहं । याचा शेंडा नाहीं मा कोठें कोहं ॥ १ ॥ कान्होबा उघड माझें कोडें । बोल बोलतो सावडें । अर्थ करी कां रे निवाडे ॥ २ ॥ वृक्ष जाहला मन पवन । वृक्ष तो सहजाचि हवन । वृक्षें वेधलें चराचर गहन रे ॥ ३ ॥ वृक्षें भेदिलें आकाश । एका जनार्दनीं निरवकाश । वृक्षचि जाहला अलक्ष रे ॥ ४ ॥

२५४८ नीलवर्ण वृक्ष तो अति दृश्य । पाहतां सावकाश दृष्टी न पडे ॥ १ ॥ भलें कोडें कान्होबा हें

तुझें । लय लक्षा न कळे म्हणती माझें आणि तुझें ॥ २ ॥ हीवृक्षाची बोलख घरा बरी । निवृत्ति ज्ञानदेव सोपान अधिकारी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वृक्ष सगुण निर्गुण । जाहला पुंडलिकाकारणें ब्रह्म सनातन ॥ ४ ॥

२५४९ वृक्ष व्याला आकाश पाताळ । वृक्षीं प्रसवले लोकपाळ । अठ्यांशीं सहस्र ऋषिमंडळ ॥ १ ॥ कान्होबा बोलों तुझें कोडें । अर्थ ऐकतां ब्रह्म जोडे । अभवत होती केवळ वेडे रे ॥२॥ वृक्षाअंगीं पंचभूतें । प्रसवला तत्त्वें निरुतें । अहं सोहं पहातां तें होतें ॥३॥ एका जनार्दनीं पाहिला वृक्ष । गुरुकृपें बोळखिला साक्ष । भेदभाव गेला प्रत्यक्ष रे ॥ ४ ॥

२५५० निर्गुण निराकार वृक्ष आकारला । पंचतत्वें व्यापक जाहला ॥ १ ॥ कान्होबा हें बोलणें माझें कोडें । पंचविसांचें ध्यानीं नातुडे रे ॥ २ ॥ साठ ऐशी शोभती शाखा । नवलक्ष पल्लव भोंवती देखा रे ॥ ३ ॥ चौऱ्यांशी लक्षांची मिळणी । वृक्षरूपीं एका जनार्दनीं रे ॥ ४ ॥

२५५१ ॐकार हा वृक्ष विस्तारला । चतुःशाखें थोर जाहला । पुढें षड्‌तर शाखे विस्तारला । अठरांचा तया मोहोर आला ॥ १ ॥ उघडें माझें कोडें । जाणती न जाणती ते वेडे । पडले विषयांचे सांकडें । तयां न कळे हें कोडें रे ॥ २ ॥ चौऱ्यांशीं लक्ष पत्रें असती । सहस्र अठ्यायशीं पुष्पें शोभती । तेहतीस कोटी फळें लोंबती । ऐशी वृक्षाची अनुपम्य स्थिती रे ॥ ३ ॥ आदि मध्य अंत पहातां न लगे मूळ । एकविस स्वर्ग सप्त पाताळ । एका जनार्दनीं वृक्ष तो सबळ । उभा विटेवरी समूळ वो ॥ ४ ॥

२५५२ वृक्ष पहातां परतला आगम । निगमा न कळे दुर्गम । वेदशास्त्रांसी निरुतें वर्म । तो वृक्ष देखिला विठ्ठलनाम ॥ १ ॥ माझें सोपें कोडें । कान्होबा करी तूं निवाडे । अर्थ सखोल ब्रह्मांडें । भक्ति भाव तयासी उघडें रे ॥ २ ॥ साहांची येथें न चाले मती । चार गुंतले न कळे गती । अठरा भाटीव वर्णिती । ऐशीयासी न कळे स्थिती रे ॥ ३ ॥ चौऱ्यांशीं लक्ष भुलले वांया । अठ्यांयशीं सहस्र भोगिती छाया । तेहतीस कोटी न कळे आयतया । एका जनार्दनीं लागे पायां रे ॥ ४ ॥

२५५३ सोपा वृक्ष फळासी आला । विठ्ठलनामें विस्तारला ॥ १ ॥ वेदां न कळे मूळ शेंडा । शास्त्रें भांडती पैं तोंडा ॥ २ ॥ पुराणें स्तवितां व्याकुळ जाहलीं । निवांत होऊनियां ठेलीं ॥ ३ ॥ मूळ वृक्ष जनार्दन । एका जनार्दनीं विस्तार पूर्ण ॥ ४ ॥

२५५४ एक दोन तीन विचार करिती । परि न कळे गति त्रिवर्गातें ॥ १ ॥ त्रिरूप सर्व हा मायेचा पसर । त्रिवर्ग साचार भरलें जग ॥ २ ॥ त्रिगुणात्मक देह त्रिगुण भार आहे । त्रिमूर्ती सर्व होय कार्यकर्ता ॥ ३ ॥ एका जनार्दनीं त्रिगुणांवेगळा । आहे तो निराळा विटेवरी ॥ ४ ॥

२५५५ चार देह चार अवस्था समाधी । कासया उपाधी करिसी बापा ॥ १ ॥ चार वेद जाण चार युगें प्रमाण । पांचवें विवरण न करीं बापा ॥ २ ॥ जनार्दनाचा एका चतुर्थ शोधोनी । पांचवे ते स्थानीं लीन झाला ॥ ३ ॥

२५५६ पंचक पंचकाचा पसारा पांचांचा । खेळ बहुरूपिया पांचांपासोनी ॥ १ ॥ पृथ्वी आप तेज वायु आकाश जाण । पंचप्राण मन पांचांमाजीं ॥ २ ॥ इंद्रियपंचक ज्ञान तें पंचक । कर्म तें पंचक जाणें बापा ॥ ३ ॥ धर्म तो पंचक स्नान तें पंचक । ध्यान तें पंचक जाणें बापा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पंचकावेगळा । पाहें उघडा डोळा विटेवरी ॥ ५ ॥

२५५७ सहा ते भागले वेवादती सदा । सहांची आपदा होती जगीं ॥ १ ॥ सहांचे संगती घडतसे कर्म । सहा तो अधर्म करिताती ॥ २ ॥ सहांचे संगती नोहे योगप्राप्ती । होतसे फजिती सहायोगें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सहांच्या वेगळा । सातवा आठवो मज वेळोवेळां ॥ ४ ॥

२५५८ सातवा तो सर्वां ठायीं वसे । शंकरादिक ध्याती तया अपेक्षा ॥१॥ तो सातवा हृदयीं आठवा । आठवितां तुटे जन्ममरण ठेवा ॥ २ ॥ सातवा हृदयीं ध्यावा जनीं वनीं पहावा । पाहूनियां ध्यावा मनामाजीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सातवा वसे मनीं । धन्य तो जनीं पुरुष जाणा ॥ ४ ॥

२५५९ आठवा आठवा वेळोवेळ आठवा । श्रीकृष्ण आठवा वेळोवेळां ॥ १ ॥ कलीमाजीं सोपें आठवा आठवण । पावन तो जन्म आठव्यानें ॥ २ ॥ आठवा नामें तारी पांडवां सहकारी । दुराचारियां मारी

आठवा तो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आठव्याची आठवण । हृदयीं सांठवण करा वेगीं ॥ ४ ॥

२५६० नववा बैसे स्थिर रूप । तया नाम बौद्धरूप ॥ १ ॥ संत तया दारीं । तिष्ठताती निरंतरी ॥ २ ॥ पुंडलिकासाठीं उभा । धन्य धन्य विठ्ठल शोभा ॥ ३ ॥ शोभे चंद्रभागा तीर । गरुड हनुमंत समोर ॥ ४ ॥ ऐसा विठ्ठल मनीं ध्याऊं । एका जनार्दनीं त्याला पाहूं ॥ ५ ॥

२५६१ मूळची एक सांगतों खूण । एक आधीं मग दोन । तया पासात्र चार तीन । व्यापिलें पांचें परिपूर्ण ॥१॥ तें भरुनी असे उरलें । सर्वां ठायीं व्यापिलें । जळीं स्थळीं सर्व भरलें । शोधीं पाहतां नाहीं उरलें ॥ २ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान । हेचि जाणती प्रेमखूण । समाधी पावले समाधान । नाहीं उरलें भिन्नाभिन्न ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । खूण बाणली निजमनीं । व्यापक दिसे तिहीं त्रिभुवनीं । गेला देहभाव विसरुनी ॥ ४ ॥

२५६२ एक एक म्हणती सकळ लोक । पाहतां एका एक हारपलें ॥१॥ एकाविण एक गणीत नाहीं देख । तें नित्य वोळख निजीं आत्मीया रे ॥ २ ॥ त्वंपद असिपद नाहीं । ठायींच्या ठायीं निवोनि पाही ॥३॥ सच्चिदानंद तिन्ही नाम माया । सूक्ष्म कारण तेथें भुलूं नको वांया ॥ ४ ॥ अहं ते मीपण सोहं तें तूंपण । अहं सोहं सांडोनि पाहे निजकानन ॥ ५ ॥ एका जनार्दनीं सांडी एकपण । सहज चैतन्य तेणें नाहीं जन्ममरण॥ ६ ॥

२५६३ लक्ष गांवें तरणी । पृथ्वी व्यापी निजकिरणीं । तो साक्षी अलिप्तपणीं । जेथींच्या तेथें ॥ १ ॥ तैसा आत्मा देहीं । म्हणती त्यासी ज्ञान नाहीं । तो व्यापुनी सर्वां ठायीं । साक्षित्वें असे ॥ २ ॥ सदगुरुमुखींचा विचार । जयासी झाला साक्षात्कार । उदेला ज्ञानभास्कर । अज्ञानतिमिरीं ॥ ३ ॥ हिरवा पिवळा संगे रंग जा[illegible] निळा । स्फटिक या वेगळा । आत्मा तैसा ॥ ४ ॥ तैसी ज्ञानकिल्ली । जयांचे हातां आली । तयानें उगविली । अज्ञान कुलुपें ॥५॥ एका जनार्दनाचा रंक । त्याचे बोधें कळला विवेक । पूर्ण बोधाचा अर्क । उदया आला ॥ ६ ॥

२५६४ परेहूनि कैसें पश्यंती बोळले । मध्यमीं पणावले सोहं बीज ॥ १ ॥ वैखरियेसी कैसें प्रगट पैं जालें । न वचे ते बोल एकविध ॥ २ ॥ साक्षात्कारें कैसें निजध्यासा आलें । मननासी फावलें श्रवणद्वारें ॥ ३ ॥ सुखासुख तेथें जालीसे आटणी । एका जनार्दनीं निजमुद्रा ॥ ४ ॥

२५६५ स्वयंप्रकाशामाजीं केलें असे स्नान । द्वैतार्थ त्यागून निर्मळ जाहलों ॥ १ ॥ सुविद्येचें वस्त्र गुंडाळोनि बैसलों । भूतदया त्यालों विभुती अंगीं ॥ २ ॥ चोविसापरतें एक वोळखिलें । तेंचि उच्चारिलें मूळारंभीं ॥ ३ ॥ अकार हारपला उकार विसरला । मकारातीत केला प्रणव तो ॥ ४ ॥ अहं कर्म सर्व सांडियेल्या चेष्टा । तोचि आपोहिष्ठा केलें कर्म ॥ ५ ॥ संसाराली तीन वोंजळी घातलें पाणी । आत्मत्वालागुनी अर्घ्य दिलें ॥ ६ ॥ सोहं तो गायत्री जप तो अखंड । बुद्धिज्ञान प्रचंड सर्वकाळ ॥ ७ ॥ एका भावें नमन भूतां एकपणीं । एका जनार्दनीं संध्या जाहली ॥ ८ ॥

२५६६ झाली संध्या संदेह माझा गेला । आत्माराम हृदयीं शेजे आला ॥ धृ० ॥ गुरुकृपा निर्मळ भगिरथी । शांती क्षमा यमुना सरस्वती । असीपदें एकत्र जेथें होती । स्नानुभव स्नान हे मुक्तस्थिती ॥ १ ॥ सद्बुध्दीचें घालूनि शुद्धासन । वरी सद्गुरूची दया परिपूर्ण । शमदम विभुती चर्चुनी जाण । वाचे उच्चारी केशव नारायण ॥ २ ॥ बोध पुत्र निर्माण झाला जेव्हां । ममता म्हातारी मरोनि गेली तेव्हां । भक्ति बहिण धांऊनि आली गांवा । आतां संध्या कैशी मी करूं केव्हां ॥ ३ ॥ सहज कर्मे झालीं तीं ब्रह्मार्पण । जन नोहे अवघा हा जनार्दन । ऐसें ऐकतां निवती साधुजन । एका जनार्दनीं बाणली निज खूण ॥ ४ ॥

## स्थूल देह.

२५६७ स्थूल देहाचा विचार । ज्ञातां आलिया साचार । तेथें देहीं अहंकार । विरोनि जाये ॥ १ ॥ स्थूल ब्रह्मस्थान नेत्रीं । स्थूलभोग जागृती वैखरीं । हें नव्हे मी ऐसा अंतरीं । बोध झाला ॥ २ ॥ मग देहें मारितां तोडितां । पूजितां कां गांजितां । नसे हर्ष खेदवार्ता । तया पुरुषा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं । लीन झाला संतचरणीं । दर्पणामाजीं बिंबोनी । दर्पणातीत ॥ ४ ॥

## सूक्ष्म देह.

२५६८ ऐसी वाढलीया सद्वासना। तेथे जिराली मनाची कल्पना। इंद्रियें विषयें प्राणा। बोध जाला ॥ १ ॥ लिंग विष्णु स्वप्न कंठस्नान। काल्पनिक भोग जाण। वाचा मध्यमा ऐसी खूण। मिळोनी ठेली त्या पदा ॥ २ ॥ तेथें इंद्रिया ऊर्वशी। आलीया सेजेसी। जयाचिया मानसीं। काम तुटी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोध। अवघा झाला ब्रह्मानंद। लिंग देहाचा खेद। वस्तु जाला ॥ ४ ॥

## कारण देह.

२५६९ आतां कारण जें अज्ञान। तेंही गेलें वोस रोन। बोधाचें आसन। बैसलें तेथें ॥ १ ॥ कारण रूप सुषुप्ती। आनंद भास हृदयप्राप्ती। या समस्ताची वस्ती। वस्तु झाली ॥ २ ॥ ऐसा असोन वोहोट झाला। ज्ञानरसें पैं भरला। मग सर्वा ठायीं देखिला। आत्मबोध ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आत्म्याची भेटी। तेथें उडाली त्रिगुण त्रिपुटी। मग बोधासी राहटी। तेथें तेथें ॥ ४ ॥

## महाकारण देह.

२५७० महाकारण जें देहज्ञान। त्याचाही साक्षी आत्मा आपण। जैसा सेजे ये आंबा मुरोन। तैसा तो जाण ॥ १ ॥ ऐशी मुराली तूर्या अवस्था। मग साक्षी जाला परौता। तो मुरोनि वस्तुता। वस्तु जाला ॥ २ ॥ ऐशी विवेकाची राबणूक। विवेक आत्मा वोळख। एका जनार्दनीं परम सुख। प्राप्त झालें ॥ ३ ॥

## नवविधा भक्ति.

२५७१ नवविधा भक्ति नव आचरती। त्याची नाम कीर्ति सांगूं आतां ॥ १ ॥ एक एक नाम घेतां प्रातःकाळीं। पापा होय होळी क्षणमात्रें ॥ २ ॥ श्रवणें परीक्षिती तरला भूपती। सात दिवसां मुक्ती जाली तया ॥ ३ ॥ महाभागवत करूनि श्रवण। सर्वांगाचें कान केले तेणें ॥ ४ ॥ श्रीशुक आपण करुनी कीर्तन। उद्धारिला जाण परीक्षिती ॥ ५ ॥ हरिनामघोषें गर्जे तो प्रल्हाद। स्वानंदें प्रबोध जाला त्यासी ॥ ६ ॥ स्तंभीं अवतार हरि प्रगटला। दैत्य विदारिला तयालागीं ॥ ७ ॥ पायावा महिमा स्वयें जाणे रमा। प्रीय पुरुषोत्तमा जाली तेणें ॥ ८ ॥ हरी पदांबुज सुकुमार कोंवळें। तेथें करकमळें अखंडित ॥ ९ ॥ गाईचिया मागें श्रीकृष्ण पाउलें। अक्रूरें घातलें दंडवत ॥ १० ॥ करूनी चंदन घाली लोटांगण। स्वानंदें निमग्न जाला तेणें ॥ ११ ॥ दास्यत्व मारुती अर्चे देहस्थिती। सीताशुद्धी कीर्ति केली तेणें ॥ १२ ॥ सेव्यसेवक भाव जाणे तो मारुती। स्वामी सीतापती संतोषला ॥ १३ ॥ सख्यत्व स्वजाती सोयरा श्रीपती। स्वामी सर्वभावें प्रीति अर्जुनासी ॥ १४ ॥ उपदेशिली गीता सुखी केलें पार्था। जन्ममरणवार्ता खुंटविली ॥ १५ ॥ आत्मनिवेदन करूनियां बळी। जाला वनमाळी द्वारपाळ ॥ १६ ॥ औट पाऊल भूमी घेऊनि दान। याचक आपण स्वयें जाला ॥ १७ ॥ नवविधा भक्ति नवजणें केली। पूर्ण प्राप्ति जाली तयालागीं ॥ १८ ॥ एका जनार्दनीं आत्मनिवेदन। भक्ति दुजेपण उरलें नाहीं ॥ १९ ॥

२५७२ हरिकथा श्रवण परीक्षिती सुजाण ऐकतां आपण अंगें होये। होय न होय ऐसा संशय नाहीं पूर्णत्व राहे। राहिले गेले देह ज्याचा तो नेणे देहींच विदेही होये। श्रवण समाधी नीच नवा आनंद ब्रह्माहमस्मि न साहे रया ॥१॥ नवविधा भक्ति नवविधा व्यक्ति अवघिया एकचि प्राप्ती। एका जनार्दनीं अखंडता मुक्तीची फिटे भ्रांती रया ॥धृ०॥ हरीच्या कीर्तनें शुक आणि नारद छेदिती अभिमानाचा कंदु। गातां पैं नाचतां अखंड पैं उल्हास कीर्तनीं प्रेमाल्हादु। हरिनाम गजर स्वानंदें डुंबरें जिंतिला मायेचा बाधू। श्रोता वक्ता स्वयें सुखरूप जाला वोसंडला ब्रह्मानंदु रया ॥ २ ॥ हरीचेनि स्मरणें द्वंद्व दुःख नाहीं हे भक्ति प्रल्हादा ठायीं। कृतांत कोपलिया रोमहि वक्र नोहे मनीं निर्भयता निज देहीं। अग्नि विष आप नेदा त्या संताप न तुटे शस्त्राचे घाई। स्मरणाचेनि बळें परिपूर्ण जाला देह विदेह दोन्ही नाहीं रया ॥ ३ ॥ हरिचरणामृत गोड मायेसी उठी चाड लाहे जाली रमा। चरणद्वय भजतां मुकली द्वंद्वभावा म्हणोनी पढिये पुरुषोत्तमा। हरिपदा लागली शिळा उद्धरिली अगाध चरणमहिमा। चरणीं विनटोनी हरिपदा पावली परि चरण न सोडी रया ॥ ४ ॥ शिव शिव यजिजे हे वेदींचें वचन पृथुराया बाणलें पूर्ण। पूज्यपूज्यक भाव सांडोनी सद्भावें करी पूजन। देवीं देव दाटला भक्त प्रेमें आटला मुख्य हें पूजेचें विधान। त्रिगुण त्रिपुटी छेदूनियां पूजेमाजीं समाधान रया ॥ ५ ॥ हरिचरण.

रजरेणु वंदूनियां पावन जाला अक्रूर । पावनपणें प्रेमें घोसंडे तेणें वंदी श्वानसूकर । वृक्ष वल्ली तृणा घाली लोटांगण सद्भावें पूर्जी गौखुर । दंडाचिये परी लोटांगण घाली हरिस्वरूप चराचर रया ॥ ६ ॥ जीव जावो जिणें परी वचन नुलंघणें सेवेचा मुख्य हा हेतु । या सेवा विनटोनीं सर्वस्वें भजोनि दास्य उद्भट हनुमंतु । शस्त्रावेनि बळें न तुटे न बुडे न जळे देहीं असोनी देहातीतु । जन्ममरण होळी कासे भासे बळी भजनें मुक्त कपिनाथु रया ॥७॥ सख्यत्वें परपार पावला अर्जुन त्यासी न पुसत दे ब्रह्मज्ञान । स्वर्गाची खणखण बाणाशी सणसण उपदेशा तेंचि स्थान । युद्धाचिये संधि लाविली समाधी कल्पांतीं न मोडे जाण । निज सख्य दोघां आलिंगन पाडिलें भिन्नपणें अभिन्न रया ॥ ८ ॥ बळीची ज्ञानदीक्षा कैसी जीवें देउनी सर्वस्वेंसी निजबळें बांधी देवासी । अनंत अपरंपार त्रिविक्रम सधर आकळिला हृषिकेशी । हृदयींचा हृदयस्थ आकळितां तंव देवची होय सर्वस्वेंसी । यापरी सर्वस्व देवासी अर्पुनी घरींदारीं नांदे देवेशीं रया ॥ ९ ॥ भक्ति हे अखंड अधिकाराचें तोंड खंडोनि केलें नवखंड । एकएका खंडें एक तरला बोलणें हें वितंड । अखंडतां जंव साधिली नाहीं तंव मुक्त म्हणणें हें पाषांड । वद्धता मुक्तता दोन्ही नाहीं ब्रह्मत्व नुरे ब्रह्मांड रया ॥ १० ॥ सहज स्वरूपस्थिति तया नांव भक्ति नवविधा भक्ति भासती । ऐसी भक्तीप्रती अंगें रावे मुक्ति दास्य करी अहोराती । दासीसी अनुसरलें हें तंव लाजिरवाणें मूर्ख ते मुक्ति मागती । एका जनार्दनीं एकविधा भक्ति तैं चारी मुक्ति मुक्त होती रया ॥ ११ ॥

## सार.

२५७३ वेदामाजीं ओंकार सार । शास्त्रसार वेदांत ॥१॥ मंत्रामाजीं गायत्री सार । तीर्थ सार गुरुचरणीं ॥ २ ॥ ज्ञान सार ध्यान सार । नाम सार सर्वांमाजीं ॥ ३ ॥ व्रतामाजीं एकादशी सार । द्वादशी सार साधनीं ॥ ४ ॥ पूजेमाजीं ब्राह्मण सार । सत्य सार तपामाजीं ॥५॥ दानामाजीं अन्नदान सार । कीर्तन सार कलियुगीं ॥ ६ ॥ जनामाजीं संतभजन सार । विद्या सार विनीतता ॥ ७ ॥ जिव्हा उपस्थ जय सार । भोग सार शांतीसुख ॥ ८ ॥ सुखामाजीं ब्रह्मसुख सार । दुःख सार देहबुद्धी ॥ ९ ॥ एका जनार्दनीं एका सार । सर्व सार आत्मज्ञान ॥ १० ॥



## कलिप्रभाव.

२५७४ येऊनिया नरदेहीं वांया जाय । नेणें संतसंग कांहीं उपाय ॥ १ ॥ कलीं वाढलासे अधर्म । ब्राह्मण सांडिती आपुलें कर्म ॥ २ ॥ शुद्ध याती असोनि चित्त । सदा नीचाश्रय करीत ॥ ३ ॥ देवपूजा नेणें कर्म । न घडे स्नानसंध्या धर्म ॥ ४ ॥ ऐसा कलीचा महिमा । कोणी न करी कर्माकर्म ॥ ५ ॥ एका जनार्दनीं शरण । घडो संतसेवा जाण ॥ ६ ॥

२५७५ मंत्रतंत्रांची कथा कोण । गायत्री मंत्र विकिती ब्राह्मण ॥ १ ॥ ऐसा कलीमाजीं अधर्म । करिताती नानाकर्में ॥ २ ॥ वेदशास्त्रीं नाहीं चाड । वांया करिती वडबड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धर्म । अवघा कलीमाजीं अधर्म ॥ ४ ॥

२५७६ कलीमाजीं नोहे अनुष्ठान । कलीमाजीं नोहे हवन । कलीमाजीं नोहे पठण । नोहे साधन मंत्रांचें ॥१॥ नोहे योगयागविधी । नसती अंगीं ये उपाधी । वाढतसे भेदबुद्धी । नोहे सिद्धी कोणती ॥ २ ॥ न चले कर्माचें आचरण । विधिनिषेधाचें महिमान । लोपली तीर्थें जाण । देवप्रतिमा पाषाण ॥ ३ ॥ न ठाके कोणाचा कोठें भाव । अवघा लटिका वेवसाव । एका जनार्दनीं भेव । जेथें तेथें वसतसे ॥ ४ ॥

२५७७ कोणासी न कळे अवघे जहाले मूढ । म्हणती हें गूढ वांया शास्त्र ॥ १ ॥ आपुलाला धर्म नाचरती जनीं । अपीक धरणी पीक न होय ॥ २ ॥ अनावृष्टि मेघ न पडे निर्धार । ऐसा अनाचार कलीमाजीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नीचाचा स्वभाव । न कळे तया भाव कोण कैसा ॥ ४ ॥

२५७८ पंडित शास्त्री होती नीच याती । त्यांचे ऐकताती नीति ते धर्म ॥१॥ स्वमुखें ब्राह्मण न करती अध्ययन । होती भ्रष्ट जाण मद्यपी ते ॥ २ ॥ नीचाचें सेवन करती घरोघरीं । श्वानाचिये परी पोट भरती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आपुला स्वधर्म । सांडूनियां वर्म होती मूढ ॥ ४ ॥

२५७९ या पोटा कारणें न करावें तें करिती । वेद ते विकिती थोर याती ॥ १ ॥ नीचासी शब्दज्ञान सांगती ब्राह्मण । ऐकती ब्रह्मज्ञान त्यांचे मुखें ॥ २ ॥

श्रेष्ठवर्ण होउनी नीचकर्म करिती। कांहीं न ते भीती पुण्यपापा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांडोनि आचार। करिती पामर नानामतें ॥ ४ ॥

२५८० कलिमाजीं थोर जालें पाषांड। पोटासाठीं संत जाले उदंड ॥ १ ॥ नाहीं विश्वास संतदया मानसीं। बोलती वांयाविण सौरस अवघा उपहासी ॥ २ ॥ वेद पठण शास्त्र संभाषे पुराणमत। अवघे बोधोनी ठेविती बोलती वाचाळ मत्त ॥ ३ ॥ देवभजन संतपूजन तीर्थ महिमान न कळे मूढा। ऐसे कलियुगीं जाले जाणत जाणत दगडा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं काया वाचा राम जपा। सोपें हें साधन तेणें नोहे पुण्यपापा ॥ ५ ॥

२५८१ अल्प तें आयुष्य धन कलीं। मर्यादा हे केली संतजनीं ॥ १ ॥ जनमय प्राण न घडे साधन। नोहे तीर्थाटन व्रत तप ॥ २ ॥ असत्याचें गृह भरलें भांडार। अवघा अनाचार शुद्धबुद्ध ॥३॥ एका जनार्दनीं म्हणोनि येते कींव। बुडताती सर्व महाडोहीं ॥४॥

२५८२ कोण मानील हा नामाचा विश्वास। कोण होईल उदास सर्वभावें ॥ १ ॥ कलियुगामाजीं अभाविक जन। करिती उच्छेदन भक्तिपंथा ॥ २ ॥ नानापरीची मतें नसती दाविती। नानामंत्र जपती अविधीनें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पातकांची राशी। नाम अहर्निशीं न जपती ॥ ४ ॥

२५८३ वंदूं अभाविक जन। ऐकावें साधन पावन। कलयुगीं अज्ञान। अभाविक पैं होती ॥ १ ॥ न कळे श्रुती वेदशास्त्र। पुराण न कळे पवित्र। ज्ञान ध्यान गायत्री मंत्र। जप तप राहिले ॥ २ ॥ यज्ञ यागादिक दान। कोणा न कळे महिमान। अवघे जाहलें अज्ञान। न कळे कांहीं ॥ ३ ॥ लोपले मंत्र औषध। गाईस न निघे दुग्ध। पतिव्रता ज्या शुद्ध। व्यभिचार करिती ॥ ४ ॥ ऐशियानें करावें काय। तिहीं ध्यावे विठ्ठल पाय। एका जनार्दनीं ध्याय। विठ्ठल नाम आवडी ॥ ५ ॥

## वेषधाऱ्याच्या भावना.

२५८४ कलिमाजीं दैवतें उघड दिसती फार। नारळ आणि शेंदूर यांचा भडिमार ॥ १ ॥ लटिका देव लटिका भक्त लटिके सर्व वाव। सात धान्यांचें घपाटे मागती काय त्याचा बडिवार ॥ २ ॥ तेल रांधा मागती मलीदा वरती काजळ कुंकूं। फजीतखोर ऐसे देव तयांचे तोंडांवर थुंकूं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सर्वभावें सोपा पंढरीराव। तया सांडोनि कोण पुसे या देवांची कायसी माव ॥ ४ ॥

२५८५ भक्त रागेला तवकें। देव फोडोनि केले कुटके ॥ १ ॥ कटकट मूर्ति मागुती करा। मेण लावूनि मूर्ति जडा ॥ २ ॥ न तुटे न जळे कांहीं न मोडे। त्या देवाचे केले तुकडे ॥ ३ ॥ रांडवा म्हणती आगे आई। कैसा देव फोडिला बाई ॥४॥ जवळीच शुद्ध असतां देवो। भक्तांसी पडिला संदेहो ॥ ५ ॥ शाळीग्राम शुद्ध शिळा। हारपलीया उपवास सोळा ॥ ६ ॥ चवदा गांठींचा बांधिला दोरा। तोहि अनंत नेला चोरा ॥ ७ ॥ अनंतासी अंतु आला। भक्तां तेथें खेदु जाहला ॥ ८ ॥ एका जनार्दनीं भावो। नाहीं तंव कैंचा देवो ॥ ९ ॥

२५८६ देव म्हणती मेसाबाई। पूजा अर्चा करिती पाही ॥ १ ॥ नैवेद्य वाहती नारळ। अवघा करिती गोंधळ ॥ २ ॥ मेंढरें बोकड मारिती। सुकी रोटी तया म्हणती ॥ ३ ॥ वळेंचि आणिताती अंगा। नाचताती शिमगीं सोंगा ॥ ४ ॥ सकळ देवांचा हा देव। विसरती तया अहंभाव ॥ ५ ॥ एका जनार्दनीं ऐसा देव। येथें कैंचा आमुचा भाव ॥ ६ ॥

२५८७ प्रेमें पुजी मेसाबाई। सांडोनियां विठाबाई ॥ १ ॥ काम देईल ती वोगळा। सदा खाय अमंगळा ॥ २ ॥ आपुलीये इच्छेसाठीं। मारी जीव लक्ष कोटी ॥३॥ तैसी नोहे विठाबाई। सर्व दीनांची ती आई ॥ ४ ॥ न सांडीचि विठाबाई। एका जनार्दनीं पाही ॥ ५ ॥

२५८८ सांडोनियां विठाबाई। कां रे पूजितां मेसाई ॥ १ ॥ विठाबाई माझी माता। चरणीं लागो इचे आतां ॥ २ ॥ अरे जोगाई तुकाई। इजपुढें बापुड्या काई ॥ ३ ॥ एका जनार्दनीं माझी आई। तिहीं लोकीं तिची साई ॥ ४ ॥

२५८९ आलों ऐकोनि खंडोबाची थोरी। वाघ्या होऊनि मज मागा म्हणती वारी ॥१॥ ठकलों ठकलों वाउगा शीण। वारी मागतां पोट न भरे जाण ॥२॥ सदा वागवी कोटंबा आणि झेंडा। रांडापोरें त्यजिली जालों काळतोंडा ॥ ३ ॥ गेलें दोनी ठाव आतां कोठें उरला वाव। एका जनार्दनीं भेटवा मज पंढरीरावो ॥४॥

२५९० पूजिती खंडेराव पतर भरिती। विठ्ठल विठ्ठल न म्हणती अभागी ते ॥ १ ॥ लाऊनि भंडार दिवटी घेती हातीं। विठ्ठल म्हणतां लाजती पापमती ॥ २ ॥ ऐसियासी भाव सांगावा तो कवण। एका जनार्दनीं काया वाचा शरण ॥ ३ ॥

२५९१ फजितीचे देव मागती सुकी रोटी। आपणासाठीं जगा पीडिती काळ तोंडें मोठी ॥ १ ॥ नको तया देवा आठव मजसी। विठ्ठल मानसीं आम्हीं ध्याऊं ॥ २ ॥ अविचारी देव अविचारी भक्त। देवाकारणें मारिती पशुघात ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जळो जळो ऐसा देव तो भांड। विठ्ठल विठ्ठल न म्हणे त्याचें काळें तोंड ॥ ४ ॥

२५९२ म्हणती देव मोठे मोठे। पूजिताती दगड गोटे ॥ १ ॥ कष्ट नेणती भोगिती। वहा दगडातें म्हणती ॥ २ ॥ जीत जीवा करूनि वध। दगडा दाविती नैवेद्य ॥ ३ ॥ रांडापोरें मेळ झाला। एक म्हणती देव आला ॥ ४ ॥ नाक घासुनी गव्हार। देवा म्हणती गुन्हेगार ॥ ५ ॥ एका जनार्दनीं म्हणे। जन भुललें मूर्खपणें ॥ ६ ॥

२५९३ पाषाणाची करूनि मूर्ती। स्थापना करिती द्विजमुखें ॥ १ ॥ तयां म्हणताती देव। विसरुनी देवाधिदेव ॥ २ ॥ मारिती पशूंच्या दावणी। सुरापानीं आल्हाद जयां ॥ ३ ॥ आमुचा देव म्हणती भोळा। पहा सकळां पावतसे ॥ ४ ॥ ऐशा देवा देव म्हणे न कोण्ही। एका विनवी जनार्दनीं ॥ ५ ॥

२५९४ प्रतिमेचा देव केला। काय जाणें ती अबला ॥ १ ॥ नवस करिती देवासी। म्हणती पुत्र देई वो मजसी ॥ २ ॥ न कळेचि मूढा वर्म। कैसें जाहलेंसे कर्म ॥ ३ ॥ प्रतिमा केलीसे आपण। तेथें कैंचें देवपण ॥ ४ ॥ देव खोटा नवस खोटा। एका जनार्दनीं रडती पोटा ॥ ५ ॥

२५९५ देव दगडाचा भक्त तो मेणाचा। ऐका दोहींचा विचार कैसा ॥ १ ॥ खरेपणा नाहीं देवाचे ते ठायीं। भक्त अभाविक पाहीं दोन्ही एक ॥ २ ॥ एका जनार्दनीं ऐसें देवभक्तपण। निलाजरे जाण उभयतां ॥ ३ ॥

२५९६ करूनि नवस मागती ते पुत्र। परी तो अपवित्र होय पुढें ॥ १ ॥ नासोनिया धर्म करी वेडचार। भोगिती अघोर पापमती ॥ २ ॥ सदा सर्वकाळ निंदावे सज्जन। काया वाचा मन परद्रव्या ॥ ३ ॥ परनारी देखतां सुख वाटे मनीं। भोगी वित्त हानी पाप जोडे ॥ ४ ॥ ऐशिया पामरा दंड तो कोण। तयाचें वदन कृष्णवर्ण ॥ ५ ॥ एका जनार्दनीं नवसाचें फळ। कुळीं झाला बाळ बुडवणा ॥ ६ ॥

२५९७ जयाचेनि तुटे भवबंधन। तयासी जाण विसरती ॥ १ ॥ करिती आणिकांची सेवा। ऐसे ते अभागी निर्दैवा ॥ २ ॥ मुळीं नाहीं देवपण। तेथें करती जपध्यान ॥ ३ ॥ विसरूनी खऱ्या देवासी। भुलले आपल्या मानसीं ॥ ४ ॥ सत्य सत्य बुडती जनीं। एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

२५९८ वोस घर वस्तीस काह्या। तैसें देवा कोण पुसे ॥ १ ॥ सांडोनियां पंढरीराणा। वोस राना कोण धांवे ॥ २ ॥ घेती मांसाचे अवदन। देवपण कैंचे तेथें ॥ ३ ॥ ऐसिया देवासी पूजणें। एका जनार्दनीं खोटे जिणें ॥ ४ ॥

२५९९ येउनी नरदेहा भूतातें पूजिती। परमात्मा नेणती महामूर्ख ॥ १ ॥ दगडाच्या देवा शेंदुराचा भार। दाविती बडिवार पूजनाचा ॥ २ ॥ रांडा पोरें घेती नवसाचें बगाड। नुगवे लिगाड तयाचेनी ॥ ३ ॥ आपण बुडती देवा बुडविती। अंतकाळीं होती दैन्यवाणे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसिया देवा। जो पूजीं गाढवासम होय ॥ ५ ॥

२६०० भजन चालिलें उफराटें। कवण जाणें खरें खोटें ॥ १ ॥ जवळी असतां देव। भक्तां उपजला संदेह ॥ २ ॥ सचेतन तुळशी तोडा। वाहाती अचेतन दगडा ॥ ३ ॥ बेला केली ताडातोडी। लिंगा लाखोली रोकडी ॥ ४ ॥ अग्नहोत्राचा सुकाळ। शमी पिंपळासी काळ ॥ ५ ॥ तिन्ही देव पिंपळांत। अग्नहोत्रीं केला घात ॥ ६ ॥ मुख बांधोनि बोकड मारा। म्हणती सोमयाग करा ॥ ७ ॥ चवदा गांठींचा अनंत दोरी। तो प्रत्यक्ष नेला चोरी ॥ ८ ॥ शाळीग्राम शुद्ध शिळा। हारपलीया उपवास सोळा ॥ ९ ॥ एका जनार्दनीं एक भाव। कुभाविका कैंचा देव ॥ १० ॥

२६०१ प्रतिमा देव ऐसा ज्याचा भाव। न करी निर्वाहो अंगोअंगीं ॥ १ ॥ असतां सर्वत्र बाहेरी अंतरीं। संपुष्टाभीतरी म्हणे देव ॥ २ ॥ तेचि ते द्वारका तेचि हे पंढरी। सर्वत्र न धरी तोची भाव ॥ ३ ॥ तीर्थयात्रा करी देव असे क्षेत्रीं। येर काय सर्वत्र

वोस पडले ॥ ४ ॥ पुण्यक्षेत्रीं पुण्य अन्य क्षेत्रीं पाप। नवल संताप कल्पनेचा ॥ ५ ॥ एका जनार्दनीं स्वतः सिद्ध असे। नाथिलेंचि पिसें मतवाद ॥ ६ ॥

२६०२ देव देहीं आहे सर्व ते म्हणती। जाणतिया न कळे गती देव नेणे ॥१॥ ऐसे ते भुलले देवा विसरले। तपताती वहिले करूनी कष्ट ॥ २ ॥ देवांची ती भेटी नाहीं जाहली तया। शिणताती वांया कर्महीन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जवळी असोनी देव। कल्पनेनें वाव केला मनें ॥ ४ ॥

२६०३ सर्वात्मक भरला देवो। तेथें न ठेविती भावो ॥ १ ॥ ऐशी भूलली कर्मासी। आचरती ती दोषासी ॥ २ ॥ सर्वां ठायीं व्यापक हरी। कोण द्वेषी कोण वैरी ॥ ३ ॥ ऐसे अभागी ते हीन। भोगिताती जन्मपतन ॥ ४ ॥ नको ऐसे ब्रह्मज्ञान। एका जनार्दनीं शरण ॥ ५ ॥

२६०४ देव सर्वां ठायीं वसे। परि न दिसे अभाविकां ॥ १ ॥ जळीं स्थळीं पाषाणीं भरला। रिता ठाव कोठें उरला ॥ २ ॥ जिकडे पाहे तिकडे देव। अभाविका दिसे वाव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं भाव। तंव तया न दिसे देव ॥ ४ ॥

२६०५ लटिक्या भावाचें। देवपण नाहीं साचें ॥ १ ॥ भाव नाहीं जेथें अंगीं। देव पाहतां न दिसे जगीं ॥ २ ॥ सर्वकाळ मनीं कुभाव। जैसा पाहे तैसा देव ॥ ३ ॥ लटिकी भंड फजिती। एका जनार्दनीं निश्चिती ॥ ४ ॥

२६०६ देहीं असोनियां देव। वाउगा करिती संदेहो ॥ १ ॥ जाय देवळासी स्वयें। मनीं आशा दुसरी वाहे ॥ २ ॥ बैसोनी कीर्तनीं। लक्ष लावी सदा धनीं ॥३॥ करूं जाय तीर्थयात्रा। गोविलें मन विचारा ॥ ४॥ ऐशियासी न भेटे देव। एका जनार्दनीं नाहीं भाव ॥५॥

२६०७ ब्रह्म एक परिपूर्ण। तेथें नाहीं दोष गुण ॥१॥ पराचा देखती जे दोष। तेचि दोषी महा दोष ॥ २ ॥ ब्रह्मी नाही दोष गुण। पहाती ते मूर्ख जाण ॥ ३ ॥ जे गुण दोष देखती। एका जनार्दनीं नाडती ॥ ४ ॥

२६०८ मी तेचि माझी प्रतिमा। तेथें नाहीं आन धर्मा ॥ १ ॥ तेथें असे माझा वास। नको भेद आणि सायास ॥ २ ॥ कलियुगीं प्रतिमेपरतें। आन साधन नाहीं निरुतें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। दोन्हीं रूपें देव आपण ॥ ४ ॥

## ब्राह्मण

२६०९ स्नानसंध्या शौचाचार। स्वधर्म नावडे साचार ॥ १ ॥ कनक फळ नाम गोमटें। बाहेर आंत दिसे कांटे ॥ २ ॥ शरीर श्वेत निर्नासिक। तोंडाळ ओढाळ पतिनिंदक ॥ ३ ॥ ऐशी आचारहीन बापुडी। एका जनार्दनीं न धरी गोडी ॥ ४ ॥

२६१० सुंदर विभूती लावी अंगीं। मिरवी जगीं भूषण ॥ १ ॥ घालूनियां गळां माळा। वागवी गवाळा वोंगळ ॥ २ ॥ नेणें कधीं योगयाग। दावी सोंग भाविकां ॥३॥ एका जनार्दनीं भाव। नाहीं तेथें कदा देव ॥ ४ ॥

२६११ द्रव्याचिया लोभें। तीर्थामध्यें रहाती उभे ॥ १ ॥ सांगती संकल्प ब्राह्मण। तेणें निर्फळ तीर्थ जाण ॥ २ ॥ संकल्पानें नाड। उभयतां ते द्वाड ॥३॥ संकल्पाविरहित धन। एका जनार्दनीं पावन ॥ ४ ॥

२६१२ नवल दंभाचें कौतुक। अग्नहोत्री म्हणती याज्ञिक ॥ १ ॥ मंत्र तंत्राची कथा कोण। मुख्य गायत्री विकिती ब्राह्मण ॥ २ ॥ आम्हीं स्वधर्मनिष्ठ पावन। दंभे म्हणती आपणां जाण ॥३॥ दांभिकाची भक्ति वाव। एका जनार्दनीं नाहीं ठाव ॥ ४ ॥

२६१३ वेदाचिया बोला कर्मीं गोंविला। परी नाहीं भजला संतालागीं ॥ १ ॥ घोकूनियां वेद द्वैत नवजाय। वाउगाचि होय श्रम तया ॥ २ ॥ तया अद्वैताच्या वाटा जाय तो करंटा। शीण तो अव्हाटा आदि अंत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतासी शरण। गेलिया पठण सर्व जोडे ॥ ४ ॥

## विद्यावंत

२६१४ विद्या जालिया संपूर्ण। पंडित पंडिता हेळसन ॥ १ ॥ धन जालिया परिपूर्ण। धनाढ्यासी हेळसन ॥ २ ॥ कळतां आत्मज्ञानास्थिती। भलत्या सवें वाद घेती ॥ ३ ॥ वृश्चिका अंगीं विष थोडे। तैसा वादालागीं चढे ॥ ४ ॥ भुलोनि पामर। एका जनार्दनीं बुडवी घर ॥ ५ ॥

## वेदपाठक

२६१५ वेदविधि कांहीं न कळे पाठका। गुणदोष देखा मळीन सदा ॥ १ ॥ दशग्रंथी ज्ञान होतांचि

जाण । निंदितो देखोन भलत्यासी ॥ २ ॥ सर्व ब्रह्मरूप ऐसें बोले वेद । तेथें वाद विवाद उरला नाहीं ॥ ३ ॥ ओहं सोहं कोहं नाहीं ठाव । उगेचि गौरव मिरवी ज्ञान ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ब्रह्मज्ञानासाठीं । हिंडताती कोटी जन्म घेत ॥ ५ ॥

२६१६ वेद वोलिला जो जो गुण । तो तो नव्हेचि पठण ॥ १ ॥ वेदें सांगितलें न करी । ब्रह्मद्वेषी दुराचारी ॥ २ ॥ न करा सुरापान । कन्या गोविक्रय जाण ॥ ३ ॥ ऐसी वेदाची मर्यादा । न कळेचि मति मंदा ॥ ४ ॥ निजमुखें स्वयें बोले वेदु । न करावा परापवादु ॥ ५ ॥ एका जनार्दनीं शरण । वेदाचें नोहे आचरण ॥ ६ ॥

२६१७ करूनि वेदशास्त्र पठण । निर्धारितां निज ज्ञान । करूनि वेदशास्त्र श्रवण । होय शिश्नोदरपरायण ॥ २ ॥ महा मोहो गिळिला ज्ञाना । शरण एका एका जनार्दना ॥ ३ ॥

२६१८ वेदशास्त्र वक्ता अति निःसिम पाहीं । सिद्धांत बोलतां उरी न ठेवी कांहीं । लयलक्ष ध्यान मुद्रा दावी आपुलें ठायीं । वेडे वेडेचार करितां मोक्ष नये हातीं ॥ १ ॥ ती खूण वेगळी विरळा जाणे एक । जाणीव ग्रासोनि त्यासी बाणे देख ॥ ध्रृ० ॥ अष्टांग योग जाणें मंत्र तंत्र कळा । प्रवोध भक्तीनें वश्य सिद्धी सकळा । वर्म चुकला भाग्यहीन अंधळा । मी कोण हेंचि नेणे कळा त्या विकळा ॥ २ ॥ सिद्धांत एक निका सावध ऐका । सुखासी मेळवितें वर्म नातुडे फुका । भाव धरूनि संतांपायीं नाम वोळखा । तैच एका जनार्दनीं भेटी देखा ॥ ३ ॥

## पुराणिक

२६१९ पतन्याचा भया नोळखे पामर । करी वेरझार नानापरी ॥ १ ॥ नायके कीर्तन न पाहे पंढरी । वैष्णवाचे दारीं न जाये मूढ ॥ २ ॥ नानापरीचे अर्थ दाखवी वोंगळ । सदा अमंगळ बोले जना ॥ ३ ॥ हिंडे दारोदारीं म्हणे पुराणीक । पोटासाठीं देख सोंग करी ॥४॥ वाचाळ आगळा वोलों नेदी लोकां । एका जनार्दनीं देखा फजीत होय ॥ ५ ॥

२६२० भांडाचें तोंड भांड पुराण । वरी शिम ग्याचा सण ॥ १ ॥ काय उणे मग भांडा । बोलती वाऊगें तें तोंडा ॥ २ ॥ वेद शास्त्र नीति नाहीं । वैरा वोलणें पाही ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाषांड । हाणोनि फोडा त्याचें तोंड ॥ ४ ॥

२६२१ सांगे ब्रह्मज्ञान गोष्टी । माते पहातां होतो कष्टी ॥ १ ॥ काय ज्ञान तें जाळावें । वदन तयाचें तें न पाहावें ॥२॥ करी कथा सांगे पुराण । वायां मिरवी थोरपण ॥ ३ ॥ जन्मला जिचे कुशीं । तिसी म्हणे अवदसा ऐसी ॥ ४ ॥ ऐसें नसो तें संतान । एका विनवी जनार्दन ॥ ५ ॥

२६२२ आवडीनें माता वोले वाळकासी । तंव तो म्हणे विवसी पाठीं लागे ॥ १ ॥ सांगे लोकांपाशीं मुखें ब्रह्मज्ञान । झाला स्त्रीअधीन स्वदेहें तो ॥ २ ॥ वैसोनी बाजारीं सांगे ज्ञानगोष्टी । मातेसी करंटी म्हणे नष्ट ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ते जन अधम । चौऱ्यांशी लक्ष जन्म भोगिताती ॥ ४ ॥

२६२३ सांगे वहु सोपया गोष्टी । करूं नेणे तो हातवटी ॥ १ ॥ ऐसें याचें नको ज्ञान । ज्ञान नोहे तें पतन ॥ २ ॥ सांगे लोकां उपदेश । आपण नेणे तो सायास ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं त्याची अमंगळ वाणी ॥ ४ ॥

२६२४ सांडोनी आचार करिती अनाचार । ब्रह्माचा विचार न कळे ज्यांसी ॥ १ ॥ वाहाती भार वेदाचा आधार । शास्त्रांचा संभार सांगताती ॥ २ ॥ पुराण व्युत्पत्ती वाउग्या त्या कथा । सांगती सर्वथा हितपर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अनुभवावांचुनी । कोरडी ती कहाणी ब्रह्मज्ञान ॥ ४ ॥

२६२५ येवढा मंत्र सोपा सांडोनी सायासीं । कां रे प्रपंचासी गुंतुनी पडसी ॥ १ ॥ वाचे ब्रह्मज्ञान गोष्टी ते फोल । अंतरींचे बोल सर्व वांया ॥ २ ॥ वृंदावनाचे परी वरवर रेखा । तैसे पढतमूर्खा वेद गोष्टी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रपंच टाकुनी । परमार्थ साधनीं रिघे वाहिला ॥ ४ ॥

## संन्यासी

२६२६ रडती पोटासाठीं । झालों म्हणती संन्यासी ॥१॥ वर्म न कळेची मूढां । होतो फजित रोकडा ॥२॥ जनीं नारायण । अवघा भरला जनार्दन ॥ ३ ॥ तडातोडी करुनी वर्म । चुकला तो अधम ॥ ४ ॥ सर्वां ठायीं नारायण । एका जनार्दनीं भजन ॥ ५ ॥

२६२७ त्यागूनियां स्त्री संन्यासी जे होती। पतना ते जाती अंतकाळीं ॥ १ ॥ घेउनी संन्यास ध्यान पैं स्त्रियांचें। गुंतलासे आशे वांया जाये ॥ २ ॥ नारायणनामीं नाहीं पैं आचार। सर्व अनाचार स्त्री तें लक्ष्मी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संन्यास लक्षण। गीतेमाजीं कृष्ण बोलियेला ॥ ४ ॥

२६२८ त्यागून कर्म जाहला संन्यासी। ज्ञान ध्यान नाहीं मानसीं ॥ १ ॥ शिखा सूत्र त्यागून जाण। करी दंडासी ग्रहण ॥ २ ॥ नित्य भिक्षा पुत्राघरीं। मठ बांधोनि राहे द्वारीं ॥३॥ एका जनार्दनीं संन्यास। वांयाचि नाश कावेचा ॥ ४ ॥

२६२९ डोई बोडोनि केली खोडी। काया विटंबिली बापुडी ॥ १ ॥ ऐसें नोहे निर्मळपण। शुद्ध करी कां अंतःकरण ॥ २ ॥ राख लाउनी वरच्यावरी। इंद्रियें पीडिलीं भरोवरी ॥ ३ ॥ संध्यास्नान द्वादश टिळे। फांसे घालुनी कापी गळे ॥ ४ ॥ बगळा लावूनियां टाळी। ध्यान धरूनि मत्स्य गिळी ॥ ५ ॥ पाय घालुनी आडवा। काय जपतोसी गाढवा ॥ ६ ॥ कन्येसमान घरची दासी। तिशी व्यभिचार करिसी ॥७॥ लोकांमध्यें मिरविसी थोरी। घरची स्त्री परद्वारीं ॥ ८ ॥ श्वान आलें बुद्धीपणा। चघळोनि सांडी तो वहाणा ॥ ९ ॥ एका जनार्दनीं निर्मळ भाव। तेथें द्वेषा कैंचा ठाव ॥ १० ॥

२६३० दीनाचें उपार्जन करी पोटासाठीं। म्हणे मज लंगोटी द्याहो कोण्ही ॥ १ ॥ घेउनी संन्यास हिंडे दारोदारीं। नारायण करी पोटासाठीं ॥ २ ॥ कामक्रोध वैरी सदोदित पिंडी। वरी शेंडी बोडी करुनी काई ॥ ३ ॥ व्यर्थ विटंबना करिती जनांत। संन्याशाची मात सोंग दावी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं संन्यास साचा। रामनाम वाचा उच्चार करी ॥ ५ ॥

२६३१ षड्वैरियांचा करावा आधीं नाश। मग सुखें संन्यास घ्यावा जगीं ॥ १ ॥ आशा मनीशा यांचा तोडोनियां पाश। मग सुखें संन्यास घ्यावा आधी ॥ २ ॥ एका जनार्दनीं संकल्पाचा त्याग। सुखें संन्यास मग घ्यावा आधीं ॥ ३ ॥

२६३२ संन्यासी करी गृहस्थाश्रम। तेणें तया अधर्म वोढवला ॥ १ ॥ करपात्रीं भिक्षा हाचि त्याचा धर्म। न करितां अधर्म स्वयें जोडे ॥ २ ॥ नाश करावे षड्वैरी नेमें। तया संन्यास कर्मे म्हणिजेती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गृहस्थची बरा। फजिती बाजारा उभ्या होय ॥ ४ ॥

२६३३ नुपजे अनुताप ज्ञान। काय घेऊनि विज्ञान ॥ १ ॥ अनुतापाविण। व्यर्थ संन्यासग्रहण ॥ २ ॥ संन्यास घेतालयापाठीं। काम नुपजावा पोटीं ॥ ३ ॥ ऐसें संन्यासलक्षण। एका जनार्दनीं खूण ॥ ४ ॥

२६३४ भिक्षेलागीं पाणीपात्र। सांठवण उदर मात्र ॥ १ ॥ सायंकाळीं प्रातःकाळासी। भिक्षासंग्रह नसावा निश्चयेसी ॥ २ ॥ संग्रह यत्नाचीया चाडा। मोहोळ बांधिती अवघा कडा ॥ ३ ॥ मोहोळ झाडितां त्यांसी। नाश होतो मासीयांसी ॥ ४ ॥ सर्व मायीक पदार्थ। एका जनार्दनीं परमार्थ ॥ ५ ॥

२६३५ वासनेचें वसन समूळ फाडी। त्रिगुण जानवें तयावरी सोडी ॥ १ ॥ यापरी जाणोनि संन्यासु घेई। गुरुवचनें सुखें विचरतु जाई ॥ २ ॥ मन दंडिजे तोचि घेई सुदंडु। जीवनेविण कमंडलु अखंडु ॥ ३ ॥ एकाक्षर जप करी। क्षराक्षरातीत धारणा धरी ॥ ४ ॥ स्वानंदाचें करीं कर पात्र। सहजीं सहज सेवी नारायण वक्त्र ॥ ५ ॥ एका जनार्दनीं सहज संन्यासु। सहजीं सहज तेथें न लगे आयासु ॥६ ॥

## जपी-तपी

२६३६ आहारे निर्दैवा काय करिसी तप। वाउगाचि जप शांतीविण ॥ १ ॥ आहारे पामरा नेणसी देवासी। वाउगा शिणसी काय काजा ॥ २ ॥ आहारे तामसा कोण तुझी गती। संतांची प्रचीति नाहीं तुज ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा हीन भागी। भूभार जगीं वांया जाहला ॥ ४ ॥

२६३७ कामक्रोध लागले मागें। तप करुनी काय सांगे ॥ १ ॥ कासया जाशी वनांतरीं। कामक्रोध भरले अंतरीं ॥ २ ॥ वनीं जाऊनियां चिंता। रात्रंदिवस घोकिशी कांता ॥ ३ ॥ भोग अभ्यास न कळे वर्म। शिणतो मूढ धांवतें कर्म ॥ ४ ॥ कर्मी लिहिली न चुके रेखा। म्हणे जनार्दनीं एका ॥ ५ ॥

२६३८ अष्टांग साधन मौनी जटाधारी। एक चरणावरी करिती तप ॥ १ ॥ वायु ते आहार असती दिगंबर। परी न कळे विचार देव कोठें ॥ २ ॥ कैसी तया भ्रांती असोनि देव जवळा। रिघती साधनकळा हुडकिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तया नाहीं सुख। संतांवाचुनी देख मार्ग न लागे ॥ ४ ॥

२६३९ विसरोनि विठोबासी । भरले हव्यासी साधन ॥ १ ॥ काय त्यांचा कळे मंत्र । कोण पवित्र म्हणे तयां ॥ २ ॥ दाविती वरी वरी भक्ति । अंतरीं युक्ति वेगळीच ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जप । वाउगें तप करिती ते ॥ ४ ॥

२६४० सर्पें दर्दुर धरियेला मुखीं । तोहि मक्षिका शेखीं धरीतसे ॥ १ ॥ तैसे ते अभागी नेणतीच काळ । वाउगा सबळ करिती धंदा ॥ २ ॥ नेणती नेणती रामनाममहिमा ! व्यर्थ तपश्रमा शिणती वांया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तपाचें हें तप । तो हा सोपा जप श्रीरामनाम ॥ ४ ॥

२६४१ जीवाचें जीवन जनीं जनार्दन । नांदतो संपूर्ण सर्व देहीं ॥ १ ॥ वाउगीं कां वांया शिणतीं बापुडीं । काय तयां जोडी हातीं लागे ॥ २ ॥ पंचाग्नि साधन अथवा धूम्रपान । तेणें काय संपूर्ण हरि जोडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाउगीं तीं तपें । मनाच्या संकल्पें हरि जोडे ॥ ४ ॥

## योगी

२६४२ योग साधोनि पंचाग्नि साधिती । न कळे योगाची गती फजीतखोरा ॥ १ ॥ वाउगें साधन वाउगें साधन । तेणें विटंबन होत असे ॥ २ ॥ एका जनार्दनीं योगाचा योग । भजे पांडुरंग एका भावें ॥ ३ ॥

## तीर्थी

२६४३ तीर्थां जाती उदंड । त्याचे पाठीमागें तोंड ॥ १ ॥ मन वासना ठेउनी घरीं । तीर्था नेली भांड-खोरी ॥ २ ॥ गंगेंत मारितां बुडी । मन लागलें बिन्हाडीं ॥ ३ ॥ नमस्कार करितां देवासी । मन पायपोसापाशीं ॥ ४ ॥ लवकर करी प्रदक्षिणा । उशीर झालासे भोजना ॥ ५ ॥ एका जनार्दनीं स्थिर मन । नाहीं तंव काय साधन ॥ ६ ॥

२६४४ केलें काय तुवां जाऊनियां तीर्थां । सर्वदा विषयार्थी भुललासी ॥ १ ॥ मनींचीं तीं पापें नाहीं धोवियेलीं । वृत्ति हे लाविली संसारींच ॥ २ ॥ तीर्थस्नानें अंग तरी शुद्ध केलें । नाहीं धोवियेलें अंतरासीं ॥ ३ ॥ वरी दिससी शुद्ध अंतरीं मलीन । तोंवरी हें स्नान व्यर्थ होय ॥ ४ ॥ तीर्थयात्रा योगें कीर्तिही पावली । बुद्धि शुद्धि झाली नाहीं तेणें ॥ ५ ॥ शांती क्षमा दया नाहीं पैं अंतरीं । वांया येरझारी कष्ट केले ॥ ६ ॥ एका जनार्दनीं सद्गुरुपाय धरी । शांतीचे जिव्हारी पावशील ॥ ७ ॥

## महंत

२६४५ ब्रह्मचारी म्हणती महंत । सदा विषयावरी चित्त ॥ १ ॥ नेसोनियां कौपीन । अंतरी तो विषय-ध्यान ॥ २ ॥ बोले जैसा रसाळ । भाव अंतरीं अमंगळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोंग । तया न मिळे संतसंग ॥ ४ ॥

२६४६ घालुनी आसन पोटीं भाव नाहीं । वांया केली पाहीं विटंबना ॥ १ ॥ देव सर्वभूतीं तयासी न कळे । वाउगें गवाळें पसरिलें ॥ २ ॥ अंतरीं तो हेत द्रव्य मिळेल कांहीं । वरपांग दावी वेषधारी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐशिया सोंगासी । काय देवा त्यासी दंड करा ॥ ४ ॥

## मुक्त

२६४७ आम्ही मुक्त म्हणोनि विचरती महीं । मुक्त ही पदवी नाहीं अंगीं ॥ १ ॥ सैर धांवे मन नाहीं पैं अटक । मुक्तज्ञान मौक्तिक वांया जाय ॥ २ ॥ भूत-मात्रीं द्रोहो करिती नानापरी । वेदशास्त्र निर्धारी ठाउके नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कायसे ते मुक्त । जगीं जाणा फजीत निलाजिरे ॥ ४ ॥

## वैरागी

२६४८ काय तें वैराग्य बोकडाचे परी । भलतिया भरीं पडतसे ॥ १ ॥ काय ती समाधी कुकुटाचे परी । पुढेंचि उकरी लाभ नेणें ॥ २ ॥ बैसोनि आसनीं वाउगें तें ध्यान । सदा लक्षी मान आपुलाची ॥ ३ ॥ घालूनियां जेठा बैसतो करंटा । करितसे चेष्टा मर्कटापरी ॥ ४ ॥ नाहीं शुद्ध कर्म योगाच विचार । सदा परद्वार लक्षितसे ॥ ५ ॥ ऐशिया पामरा कासया तो बोध । एका जनार्दनीं शुद्ध खडक जैसा ॥ ६ ॥

२६४९ वांया शब्दज्ञान बोलाचा गौरव । पोटीचा पैं भाव मिथ्या सोंग ॥ १ ॥ मैंदाचिये परी बैसती ध्यानस्थ । सदा चित्त ओढत परधनीं ॥ २ ॥ वैराग्य तें फोल सांगताती गोष्टी । काय ते चावटी मिथ्या बोल ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐशिया सोंगासी । कैं हृषिकेशी प्राप्त होय ॥ ४ ॥

२६५० बांधूनियां पर्णकुटी मढी । त्यावरी गुढी अद्वैताची ॥ १ ॥ ऐसें मिरविती सोंग वांया । नरका जावया उल्हासें ॥ २ ॥ नेणें कधीं संतांचें पूजन । सदा सर्वदा परधनीं मन ॥ ३ ॥ शरण एका जना-र्दनीं । ऐसें सोंग मिरविती जनीं ॥ ४ ॥

२६५१ मुखीं वसे ब्रह्मज्ञान । चित्तीं चिंती धन-मान ॥ १ ॥ ऐसे ठक जे पतीत । तयां साधेना स्वहित ॥ २ ॥ स्त्रीसंगीं सदा सक्त । वदनीं गोष्टी परमार्थ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तया । देव भेटेल कासया ॥ ४ ॥

२६५२ गांठीं बांधोनियां धन मिरविती भक्ती । मनीं ते आसक्तीं अधिक व्हावी ॥ १ ॥ चित्त वित्ता-वरी भक्ति लोकाचारीं । देव अभ्यंतरीं केवी भेटे ॥ २ ॥ असे चित्त वित्ता लावी कळांतरीं । अनु-ष्ठान करी दिवसगणी ॥ ३ ॥ जप तप विधान अव-घेंचि सांडी । धरणिचि मांडी सावकाश ॥ ४ ॥ धन सांडोनि मन धरीं जनार्दन । एकाएकीं भक्ति फळेल तेणें जाण ॥ ५ ॥

२६५३ मी एक शुची जग हें अपवित्र । कर्माचि विचित्र वोढवलें ॥ १ ॥ देखत देखत घेतसे विख । अंतीं तें सुख केवि होय ॥ २ ॥ अल्प दोष ते अव-घेचि टाळी । मुखें म्हणे सर्वोत्तम बळी ॥ ३ ॥ अभि-लाषें अशुचि झालासे पोटीं । एका जनार्दनीं नव्हेचि भेटी ॥ ४ ॥

२६५४ कनक फळ भक्षितां सहज भ्रांती येती । तैशी ही फजिती संसारिकां ॥ १ ॥ मर्कटाचीये परी नाचे घरोघरीं । नाचवोनी भरे पोट तैसे ॥ २ ॥ करिती तितुकें अवघें सोंग । नाहीं कांहीं रंग भाव-भक्ती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाडिलासे भ्रांती । नेणें कधीं स्तुती देवाची तो ॥ ४ ॥

## गोसावी

२६५५ लावूनीयां अंगा राख । म्हणती सुख आम्हांसीं ॥ १ ॥ भोळे भाविकां भोंदिती । भलते मंत्र तया देती ॥२॥ म्हणती आम्हां करा गुरु । उप-चारु पूजेचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ते मंद । नाहीं गोविंद तयापाशीं ॥ ४ ॥

२६५६ अंगा लाऊनियां राख । करी भलतेंचि पाप ॥ १ ॥ मेळवी शिष्यांचा मेळा । अवघा भांगेचा घोटाळा ॥ २ ॥ नानापरी सांगे मंत्र । नेणें विधी अप-वित्र ॥ ३ ॥ न कळे ज्ञानाची हातवटी । सदा पर-दार राहाटी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सोंग । तेथें नाहीं पांडुरंग ॥ ५ ॥

२६५७ आम्हीं जाहलों गोसावी । आमची विभूत चालवावी ॥ १ ॥ भांग भुरका हें साधन । शिष्य मिळाले चहुकोन ॥ २ ॥ हें तों सोंगाचें साधन । राजी नाहीं जनार्दन ॥३॥ एका जनार्दनीं भाव । भाव तेथें वसे देव ॥ ४ ॥

२६५८ आम्हीं योग साधियेला । भांग भुरका तो आणिला ॥ १ ॥ योग न कळे तया मूढा । साधन काय तें दगडा ॥ २ ॥ आंत काळा बाहेर काळा । नाम नाहीं अमंगळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ते पामर । साधन साधिती ते खर ॥ ४ ॥

२६५९ अंगासी राख ढुंगासी लंगोटी । गोसावी हातवटी मिरविती ॥ १ ॥ अलख म्हणोनि भिक्षा मागताती । अलखाची गती न कळे मूढां ॥ २ ॥ भांगेचा सुकाळ चेले करी मूढ । तया यम दृढ दंड करी ॥ ३ ॥ अलक्ष अलक्ष आलख कळेना । जगीं विटंबना उगीच करिती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नका ऐसें सोंग । तेणें पांडुरंग अंतरेल ॥ ५ ॥

२६६० संसाराचा धाक घेऊनियां पोटीं । जाहला हटतटीं गोसावी तो ॥ १ ॥ पाहिल्या परीस याता. याती मागें । शिणला उद्योगें भीक मागूं ॥ २ ॥ उठो नियां पहाटे अलख मागावें । परतोनी यावें झोप डीसी ॥ ३ ॥ नाहीं तेथें कोणी दिसे केविलवाणा । मग म्हणे नारायणा व्यर्थ जिणें ॥ ४ ॥ जरी असतों घरवारी स्त्री पुत्र असती । आतां ही फजेती नको देवा ॥ ५ ॥ टाकूनियां वेष स्त्री करूं धांवे । तो आयु-ष्याचे हावें ग्रासियेला ॥ ६ ॥ राहिलो वासना संसार करणें । एका जनार्दनीं म्हणे जन्म घेती ॥ ७ ॥

## गुरु

२६६१ आहाच वाहाच झकाविलें लोकां । ऐसिया ठका देव कैंचा ॥१॥ शिकवुनी जन वंचला आपण । नरकीं पतन होत असे ॥ २ ॥ मी ज्ञाता म्हणोनि फुगोनी बैसला । ब्रह्मविद्येचा पसारा घातिला ॥३॥ अभ्यासी ते मिरवी लोकीं । पडलिया चुकी निज-पंथें ॥ ४ ॥ ज्यासी दंभ तो काय नेणें । लोकीं मान-

वर्णे होंवि पाहे ॥ ५ ॥ घरोघरीं गुरु आहेत आइते। गुळ घेऊनियां विकिती रायतें ॥ ६ ॥ संसारापासोनी सोडवी साचे। सद्‌गुरु ऐसें नांव त्याचें ॥७॥ बोलाचेनि ज्ञानें पावोनी देवा। भुलविलें भावा अभिमानें ॥८॥ एका जनार्दनीं नव्हे त्या भेटी। वोसणतां भेटी साव होय ॥ ९ ॥

२६६२ असत्य जन्मलें असत्याचे पोटीं। अर्थवळें चावटी शिकाविती ॥ १ ॥ अर्थी धरुनी आस असत्य बोलणें। अर्थासाठीं घेणें मंत्र तंत्र ॥ २ ॥ अर्थासाठीं प्राण त्यजिती जनीं। अर्थे होत हानी प्राणीमात्रा ॥३॥ एका जनार्दनीं अर्थाचा संबंध। तेथें भेदाभेद सहज उठे ॥ ४ ॥

२६६३ सांगती लोकां गुरु करा। आपुली आपण शुद्धि धरा ॥ १ ॥ त्यांचें बोलणें वितंड। शिष्य मिळती तेही भांड ॥ २ ॥ उपदेशाची न कळे रीत। द्रव्यासाठीं हात पसरीत ॥ ३ ॥ ऐशा गुरूच्या ठायीं भाव। एका जनार्दनीं वाव ॥ ४ ॥

२६६४ जळतीया घरा। कोण वस्तीं करी थारा ॥१॥ तैसे अभागी पामर। गुरुपण मिरविती वरवर ॥२॥ नाहीं मंत्र शुद्धीचें ज्ञान। भलतियाचे फुंकिती कान ॥ ३ ॥ मनुष्य असोनि गुरू पाही। एका जनार्दनीं तें नाहीं ॥ ४ ॥

२६६५ शिष्यापासून सेवा घेणें। हें तों लक्षण अधमाचें ॥ १ ॥ ऐसे असती गुरु बहु। नव्हेवि साहूं भार त्यांचा ॥ २ ॥ एकपणें समानता। गुरुशिष्य उरता उपदेश ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। गुरु माझा जनार्दन ॥ ४ ॥

## मानभाव

२६६६ होउनी मानभाव। अवघा बुडविला ठाव ॥१॥ नाहीं चित्त शुद्ध गती। द्वेष देवाचा करिती ॥ २ ॥ धरिती उफराटी काठी। रांडा पोरें भोंदी वाटी ॥३॥ नेसोनियां काळेपण। अंगा लाविती दूषण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देवा। जळो जळो त्यांची सेवा ॥५॥

२६६७ सांगती ते ज्ञान तैसें। श्वान सूकरा सरिसें ॥ १ ॥ अंगीं नसोनि वर्म। दाविताती गुण कर्म ॥ २ ॥ द्वैताची दावणी वाढ। भुलविती रांडा नाड ॥ ३ ॥ अभागी ते पामर। नर्क भोगिती अघोर ॥ ४ ॥ सांगती पुराणकथा। उभे बाजारीं सर्वथा ॥ ५ ॥ एका जनार्दनीं नाहीं भाव। तेथें कैंचा उभा देव ॥ ६ ॥

## फकीर

२६६८ आशा टाकूनी फकीर जाला। परी भिक्षा मागणें जन्म गेला ॥ १ ॥ तैसी नोहे परमार्थ रहाटी। शुद्ध मन करिजे पोटीं ॥ २ ॥ सर्वा भूतीं नांदे एक देव। वाउगा कां वाढावा अहंभाव ॥ ३ ॥ जे जे वाणी स्तुती केली। ती ती देवासी पावली ॥ ४ ॥ ऐसा धरी दृढभाव। एका जनार्दनीं मागे ठाव ॥ ५ ॥

## अर्थी

२६६९ अर्थ नाहीं जयापाशीं। असत्य स्पर्शेना तयासी ॥ १ ॥ अर्थापाशीं असत्य जाण। अर्थापाशी दंभ पूर्ण ॥ २ ॥ अर्थापोटीं नाहीं परमार्थ। अर्थापोटीं स्वार्थ घडतसे ॥ ३ ॥ अर्थ नका माझे मनीं। म्हणे एका जनार्दनीं ॥ ४ ॥

## आशाबद्ध

२६७० आशाबद्ध करिती देवाचें पूजन। तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ १ ॥ आशाबद्ध करिती वेदाचे पठण। तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ २ ॥ आशाबद्ध करिती पुराण श्रवण। तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ ३ ॥ आशाबद्ध करिती दैवतउपासन। तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ ४ ॥ आशाबद्ध करिती जप तप हवन। तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ ५ ॥ निराशी करिती देवाचें कीर्तन। एका जनार्दनीं तुष्ट होय ॥ ६ ॥

## संत

२६७१ कलीमाजीं संत जाले। टिळा टोपी लाविती भले ॥ १ ॥ नाहीं वर्माचें साधन। न कळे हृदयीं आत्मज्ञान ॥ २ ॥ सदा सर्वदा गुरगुरी। द्वेष सर्वदा ते करी ॥ ३ ॥ भजनी नाहीं चाड। सदा विषयीं कवाड ॥ ४ ॥ ऐशिया संतांचा सांगात। नको मजसी आदिअंत ॥ ५ ॥ भोळियाच्या पायीं। एका जनार्दनीं ठाव देई ॥ ६ ॥

२६७२ होती पोटासाठीं संत। नाहीं हेत विठ्ठलीं ॥ १ ॥ तयांचा उपदेश नये कामा। कोण धर्मा वाढवी ॥ २ ॥ घालुनी माळा मुद्रा गळां। दाविती

जिव्हाळा वरीवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ते पामर । भोगिती अघोर यातना ॥ ४ ॥

## फडकरी

२६७३ शहाणा हो म्हणविसी । हरिभक्ती कां रे वरवर करिसी ॥ १ ॥ उगीच कासया करसील फडे । जग हें बोधावया बापुडें ॥ २ ॥ अंतर भक्ति न करिसी मूढा । कासया लौकिकीं मिरविसी बापुडा ॥३॥ एका जनार्दनीं धरुनी कान । संतांपायीं नाचे सांडुनी अभिमान ॥ ४ ॥

## भजनी

२६७४ आहारालागीं करी देवाचें भजन । मिळे मिष्टान्न भोजनासी ॥ १ ॥ आहारालागीं करी तीर्थांचें भ्रमण । आहारें जिंकलें मन सर्वपरी ॥२॥ आहारालागीं करी तीर्थ प्रदक्षिणा । आहारें व्यापिलें जना एकमय ॥ ३ ॥ आहार निर्धार नाहीं जनार्दनीं । एका जनार्दनीं निराहार ॥ ४ ॥

२६७५ बैसोनीं एकांतीं । सांगती कोरड्या त्या गोष्टी ॥ १ ॥ म्हणती करा रे भजन । आपण नेणें जैसा श्वान ॥ २ ॥ म्हणे करा पंढरीची वारी । आपण हिंडे दारोदारीं ॥ ३ ॥ पेशियाचा उपदेश । एका जनार्दनीं म्हणे नाश ॥ ४ ॥

## पुजारी

२६७६ आहारालागीं देवपूजा । आहारें खादलेंसे निजा ॥ १ ॥ न कळेचि हिताहित । आहारें खादली पंचभूतें ॥ २ ॥ आहारालागीं कर्म धर्म । भुलला वर्म आहारेंची ॥ ३ ॥ आहारालागीं मंत्र तंत्र । आहारालागीं करी अपवित्र ॥४॥ आहारालागीं जाला भांड । एका जनार्दनीं काळें तोंड ॥ ५ ॥

## कथेकरी

२६७७ आहारालागीं कथा । करिताती पैं सर्वथा ॥ १ ॥ आहार न मिळतां जाण । कथेलागीं पुसे कोण ॥ २ ॥ आहार मिळतां पोटभरी । पुराण सांगे बरव्या परी ॥ ३ ॥ आहार मिळतां संध्यास्नान । आहारार्थ जप ध्यान ॥४ ॥ आहारालागीं उपासना । नीच सेवना आहारेंची ॥ ५ ॥ आहाराकारणें सर्व हेत । एका जनार्दनीं गात आहारेंची ॥ ६ ॥

२६७८ द्रव्याचिया आशे । कथा करणें सायासें ॥ १ ॥ उभयतां नरका जोडी । मेळविलीं तीं बापुडीं ॥ २ ॥ निराश करूनि मन । करा कथा तें कीर्तन ॥ ३ ॥ देवा आवड भक्तीची । एका जनार्दनीं साची ॥ ४ ॥

२६७९ द्रव्य घेऊनियां कथा जे करिती । उभयतां जाती नरकामध्यें ॥ १ ॥ तयाचिया दोषा नाहीं परिहार । वेदाचा विचार कुंठितची ॥ २ ॥ शास्त्रांची तो मती न चाले सर्वथा । पुराणें हीं तत्त्वतां मौनावली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दोषा नाहीं पार । रवरव निर्धारें भोगिताती ॥ ४ ॥

२६८० द्रव्याचिये आशे करी जो कथा । चांडाळ तत्वतां जाणावा तो ॥ १ ॥ द्रव्याचिये आशे वेद जे पढती । रवरव भोगिती कल्पवरी ॥ २ ॥ द्रव्याचिये आशे पुराण सांगती । सकुळ ते जाती नरकामध्यें ॥ ३ ॥ द्रव्याचिये आशे कथेचा विकरा । प्रत्यक्ष तो खरा मातंगची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नैराश्य भजन । तो प्राणी उत्तम कलियुगीं ॥ ५ ॥

२६८१ द्रव्य घेऊनियां उपदेश देती । मार्जार ते होती जन्मोजन्मीं ॥ १ ॥ द्रव्य घेऊनियां तीर्थयात्रा करिती । श्वान ते होती जन्मोजन्मीं ॥ २ ॥ देऊनियां दान परतोनि घेती । सुकर ते होती जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ द्रव्य घेऊनियां रंगीं जे नाचती । वैष्णव ते न होती जन्मोजन्मीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निर्धनीं भजन । तेणें नारायण संतुष्टची ॥ ५ ॥

२६८२ करिताती कथा । द्रव्य मागती सर्वथा ॥ १ ॥ नाहीं पुण्य दोघां गांठीं । हीन भाग्य ती करंटी ॥ २ ॥ नैराश्य कथा भजन । तेणें तुष्टे नारायण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाणी । व्यास बोलले पुराणीं ॥ ४ ॥

२६८३ बाजारीं बैसोनि सांगे ज्ञानगोष्टी । कथेचि राहाटी चोपावोपी ॥ १ ॥ मेळवोनि जन सांगे निरूपण । वाचे ब्रह्मज्ञान पोटासाठीं ॥ २ ॥ न कळे पामरा आपुला विचार । करी अनाचार जगामध्यें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसे फजीतखोर । भोगिती अघोर नरक देखा ॥ ४ ॥

२६८४ प्रत्यक्ष ती कथा जगाची माऊली । विक्रयें करिती वाहिली दोषी देखा ॥ १ ॥ आपुली ती माता

आपण भोगितां। प्रायश्चित्त सर्वथा काय द्यावें ॥ २ ॥ पतिव्रतेनें जैसा पतीचि वधिला। प्रायश्चित्त तिला कोणें द्यावें ॥ ३ ॥ मातें बाळकासी विषपान दिलें। प्रायश्चित्त या बोलें कोणें द्यावें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कथा ती माऊली। विकितां घडली ब्रह्महत्या ॥ ५ ॥

२६८५ कोटी ब्रह्महत्या घडे। कथा विक्रय तया जोडे ॥ १ ॥ हा तों पुराणीं निवाडा। पाहे कीं रे दगडा ॥ २ ॥ एका जनार्दनीं जाण। पंचमहापातकी तो पूर्ण ॥ ३ ॥

२६८६ बैसोनियां हाटवटीं। सांगे गोष्टी लौकिक ॥१॥ तैसें नव्हे भक्तपण। घातला दुकान पसारा ॥२॥ वर्माचें तें पाठांतर। केला भार बहूतची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सार। भुंके फार खर जैसा ॥ ४ ॥

२६८७ पोट भरावया भांड। जैसा बडबडी तोंड ॥१॥ तेवि विषयालागीं जाण। शास्त्र व्युत्पुत्ति श्रवण ॥२॥ विषयवासना धरुनी थोर। दावीं वरवर आचार ॥३॥ जेवि काग विष्ठा देखे। तेवि विषय देखोनी पोखे ॥४॥ म्हणे जनार्दनाचा एका। सुटिका नोहे तया देखा ॥५॥

२६८८ अडक्याकारणें जीव जात। म्हणती आम्ही उदार भक्त ॥ १ ॥ पोसिया दांभिकांसी। दुरी होय हरि त्यांसी ॥ २ ॥ गाजराची तुळासाची। वाट पाहती विमानाची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खोटा भाव। तयासी न भेटे देव ॥ ४ ॥

२६८९ विषयप्राप्तीलागीं जाण। धरी बकापरी ध्यान ॥ १ ॥ विषयीक गायन करी। जैसा खर भुंके खरीं ॥ २ ॥ नाहीं संतचरणीं मन। सदा विषयावरी ध्यान ॥ ३ ॥ विषय लोटी परता होई। एका जनार्दन पायीं ॥ ४ ॥

२६९० नाहीं ध्यान तें अंतरीं। सदा विषयीं दुराचारी ॥ १ ॥ स्वप्नीं नेणें नामस्मरण। करी विषय सेवन ॥ २ ॥ अतीत अभ्यागत। जया नावडे चित्तांत ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं। ऐसा पामर तो जनीं ॥ ४ ॥

२६९१ वरीवरी दाविती आचार। अंतरीं तो अनाचार ॥ १ ॥ मुखीं नाहीं कधीं नाम। सदा काम विषयाचा ॥ २ ॥ नेणें कधीं संतसेवा। न करी देवा पूजन ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। ऐसा जन्मला तो जनीं ॥ ४ ॥

२६९२ वासना विषयीं सदा वसे। तेथें देवा कोण पुसे ॥ १ ॥ सदा तळमळी मन। करी ध्यान विषयाचें ॥ २ ॥ रात्रंदिवस चिंता। नाठवी सर्वथा रामनाम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं भाव। तंव कैंचा भेटे देव ॥ ४ ॥

२६९३ दांभिकाची भक्ति। वरीवरी देहस्थिती। अंतरीं तो गती। वेगळी बापा ॥ १ ॥ नाम गाय प्रेमभरीत। रडे स्फुंदे डोळे पुसीत। अंतरींचा हेत। वेगळा बापा ॥ २ ॥ वृंदावनाचें तें फळ। कडु जैसें सर्वकाळ। तैसा मनोमेळ। वेगळा बापा ॥ ३ ॥ धरुनी ध्यान। बक जैसा लक्षी मीन। परस्त्री देखोन। विव्हळ बापा ॥ ४ ॥ सांगे आत्मज्ञान स्थिती। अंतरीं तो वेगळी रिती। द्रव्य जोडे कैशा रीती। हेंचि ध्यान बापा ॥ ५ ॥ न कळे कांहीं स्वहित। सदा द्रव्यदारावर चित्त। तयासी भगवंत। प्राप्त नाहीं ॥ ६ ॥ शरण एका जनार्दन। नको मज तयाचें दरुशन। अभाविकासी भाषण। नको देवा ॥७॥

२६९४ तोंडभरी विवेक मनीं वाहे अभिलाख। विवेक केला रंक विषयाचा ॥ १ ॥ वैराग्यवीण ज्ञान बोलती तें उणें। घरोघरीं पोसणें लाविताती ॥ २ ॥ जुनाट परिपाठीं सांगताहे गोष्टी। विरक्तीविण पोटीं ज्ञान नेघे ॥३॥ परिसोनी ग्रंथ निरोपी ज्ञानकथा। मनीं वाहे आस्था विषयांची ॥ ४ ॥ आरंभींच डाव पडियेला खोटा। पचलें नाहीं पोटा रामनाम ॥ ५ ॥ घडघडीत वैराग्य वरी वाहे विवेक। ज्ञानासी तो एक अधिकारी ॥ ६ ॥ वैराग्य विवेक बाणलेंसे अंगीं। ज्ञान तयालागीं वोरसलें ॥ ७ ॥ एका जनार्दनीं विवेकेशीं भेटी। वैराग्यावीण गोष्टी फोल होय ॥ ८ ॥

२६९५ करितां हरिकथा श्रवण। स्वेद रोमांच नये दारुण। रुका वेंचितां प्राण। जाऊं पाहे ॥ १ ॥ द्रव्य दारा लोभ अंतरीं। हरिकथा वरीवरी। बीज अग्नी माझारीं। विरुढे कैसें ॥ २ ॥ टाळी लावूनियां जाण। दृढ घालिती आसन। अंतरीं तो ध्यान। वल्लभेचें ॥ ३ ॥ धनलोभाचा वोणवा। तेथें जाळिलें जीवभावा। हरिकथेचा करी हेवा। लोकारूढी ॥ ४ ॥ धनलोभी आसक्तता। हरिकथा करी वृथा। तयासी तो परमार्थ तत्त्वतां। न घडे जाणा ॥ ५ ॥ एकलीच कांता। नाश करी परमार्था। तेथें धनलोभ येतां। अनर्थचि होय ॥ ६ ॥ एका जनार्दनीं। काम क्रोध लोभ तिन्ही। द्रव्यदारा त्यजोनी। नित्य तो मुक्त ॥७॥

२६९६ शतावर्ती श्रवण आधिक पै जालें । तेणें अंगा आलें जाणणेंपण ॥ १ ॥ पुराण श्रवण लौकिक प्रतिष्ठा । विचार चोहटा जाणिवेचा ॥ २ ॥ श्रवण तो लौकिक मनीं नाहीं विवेक । बुद्धीसी परिपाक कैसेनि होय ॥ ३ ॥ मी एक ज्ञाता मिरवी लौकिक । म्हणोनि आक्षेपक सभेमाजीं ॥४॥ नानापरी व्याधि मिरवी लोकांप्रती। वाडवितो महंती मानालागीं ॥५॥ मी एक स्वयंपाकी मिरवी लौकिकीं । इतर कर्मासी शुद्धि नाहीं ॥ ६ ॥ कर्माकर्मी कांहीं न धरी कंटाळा। मानितो विटाळा ब्राह्मणाच्या ॥७॥ मजहूनी ज्ञाता आणिक तो नाहीं । ऐसें जाणिवेचे डोहीं गर्व गेला ॥ ८ ॥ नित्य पुढिलाचे गुणदोष आरोपिती । श्रवणाची निष्पत्ति फळली ऐशी ॥९॥ लौकिक प्रतिष्ठा घनावरी आस्था। वरी वरी हरिकथा काय करिसी ॥१०॥ एका जनार्दनीं साच न रिगे मन । तंववरी समाधान केवि होय ॥ ११॥

२६९७ वेष घेउनी नुसता कां । उगेंच जगावरी रुसतां कां । भोग देखोनि घुसतां कां । आम्ही भले म्हणोनि पुसतां कां ॥१॥ थिता बाईल कां सांडिली । आशा परवधु कां धुंडिली। शुभ्र सांडोनि भगवी कां गुंडिली । ऐशी भंडी कांहो मांडिली ॥ २ ॥ तुम्हां प्रपंचावर एके घाई रुसवेना । अहंज्ञातेपणा कोण्हा पुसवेना । एका जनार्दनीं मन जिंकवेना । मेल्या कुतऱ्यासारखें कां बसवेना ॥ ३ ॥

## अभाविक–खल–दुर्जन

२६९८ अभाविकाचे कर्म। तया न कळे कांहीं वर्म। संतां म्हणती भ्रम । यासी झाला ॥१॥ हरुषें मुखें नाम गाय । तया म्हणती वेडा होय । अभाविकाचे भय। जन मनीं वाहे ॥२॥ बोले जैसा का भाट । वर्म कांहीं न कळे नीट । नामस्मरण स्पष्ट । न घडे तया ॥ ३॥ ऐशियाची संगती। न घडावी निश्चिती। एका जनार्दनीं अप्रीती । तयाची देवा ॥ ४ ॥

२६९९ वरुषला मेघ खडकावरुता । चिखल ना तत्त्वतां थेंब नाहीं ॥ १ ॥ वांया तो प्राणी आला नरदेहा । गेला वांया पहा भक्तीविण ॥ २ ॥ अरण्यांत जैशीं सुकरें बैसती । तैसें मठाप्रती करूनि बैसे ॥३॥ उदय होतांची लपते उलुक । तैसा तो मुर्ख समाधी बैसे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं वांया गेले सर्व । संसार ना देव दोन्ही शून्य ॥ ५ ॥

२७०० भलतीयासी म्हणती। अहो महाराज निश्चिती ॥ १ ॥ ऐसे अंधळे हे जन। गेले भुलोन संसारें ॥२॥ महाराज जनार्दन । नेणती तयाचे चरण ॥ ३ ॥ दीना महाराज म्हणती । एका जनार्दनीं सांगूं किती ॥४॥

२७०१ सर्व महाराजांचा रावो । विटेवरी पंढरीरावो ॥ १ ॥ तया न जाती हे शरण । दीना घालिती लोटांगण ॥ २ ॥ तारा म्हणती आम्हासी । ऐसे अभागी ते दोषी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं भाव । तया अवघेंचि वाव ॥ ४ ॥

२७०२ स्वप्नामाजीं नेणें देवा । करी सेवा भूतांची ॥१॥ नाना साधन ते चेष्टा । तेथें कष्टा भारी भरला ॥२॥ जे जे करिती उपाधी। मंत्र जपे तो अविधी ॥ ३ ॥ सकळ मंत्रा मंत्रराज । एका जनार्दनीं नेणें निज ॥४॥

२७०३ शिकलासे टाणाटोणा। तेणें ब्रह्मज्ञाना तुच्छ मानी ॥ १ ॥ बोले बहु चावट वचन । वेदां म्हणे तो अप्रमाण ॥ २ ॥ सिद्धांत-धातांतासी म्हणे । हें तो पापांडी बोलणें ॥ ३ ॥ ऐसा पामर दुराचारी। वाचे न वदे कधीं हरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन । ज्याचें पाषाणाचि जाण ॥ ५ ॥

२७०४ गायत्रीमंत्राचा मानूनि कंटाळा। जाय तो वेताळ पूजावया ॥ १ ॥ देवाचें पूजन करितां वाटे दुःख । आवडतो देख भांग घोटीं ॥ २ ॥ ब्राह्मणासी पाणी देतां मानी शीण । वेश्येचें धूवण वस्त्रें धुई ॥३॥ कीर्तनीं बैसतां म्हणे निद्रा येत । खेळतसे द्यूत अहोरात्रीं ॥ ४ ॥ पुराण श्रवणीं मानीत कंटाळा । नटनाट्य खेळा पाहो जाय ॥ ५ ॥ एका जनार्दनीं ऐसा तो गव्हार । चंद्रअर्कवर नरक भोगी ॥ ६ ॥

२७०५ हरिकथा परिसोनि जरी देखसी दोष । पयपान भुजंगा तेंचि परतलें विष ॥ १ ॥ हरिनाम ऐकतां जरी न वाटे सुख । अंतरीं तूं देख पाप आहे ॥ २ ॥ कस्तुरीचे आळां पेरिला पलांडू । सुवास लोपोनि कैसा वाढे दुर्गंधु ॥ ३ ॥ धारोष्ण पय परि ज्वरिताचें मुख । थुंकोनि सांडा म्हणे कडु वीख ॥४॥ पान लागलिया गूळ न म्हणे गोडु । गोडाचें गोड तें झालें कडु ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भाव नुरजे नरा । नरदेहीं आयुष्य तेंहि केला मातेरा ॥ ६ ॥

२७०६ सचेतनीं द्वेष अचेतनीं पूजा । भक्ति गरुडध्वजा केवि पावे ॥ १ ॥ व्यर्थ खटाटोप नाथिला पसारा । गोविंदा गव्हारा केवीं कळे ॥ २ ॥ हरि-

दासाचेनि गुणें शिळा दैवतपणें । त्या शिळा पुजोनि त्यातें द्वेषी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाथिलाजी दावी । सजीव निर्जिवीं गोंवियेलें ॥ ४ ॥

२७०७ मत्सर ज्ञानीयातें न सोडी । मा इतर कायसी बापुडी ॥ १ ॥ शिणतातीं मत्सरवेधें । भोगिताती भोग विविधें ॥ २ ॥ निर्मत्सर भजनीं गोष्टी । ऐसा कोण्ही नाहीं सृष्टीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मत्सर । तेणें परमार्थ पळे दूर ॥ ४ ॥

२७०८ जाहला बहु दीन । मग म्हणे नारायण ॥१॥ तया हीन पामरासी । ब्रह्महत्त्या घडल्या राशी ॥२॥ जें न करावें तें केलें । मग राम म्हणोनि डोले ॥३॥ काय तयाचें तें गाणें । जैसें मोलाचें रडणें ॥ ४ ॥ शुद्ध भावावांचुनी निका । एका जनार्दनीं नाहीं सुटका ॥ ५ ॥

२७०९ कामधेनु देउनि पालटा । अजा घे जैसा करंटा ॥१॥ तैसा टकला कीर्तनीं । निशीदिनीं गाय गाणीं ॥ २ ॥ दवडोनियां हिरकणी । वेचि आनंदे गारमणी ॥ ३ ॥ ऐसा अभागी पामर । एका जनार्दनीं म्हणे खर ॥ ४ ॥

२७१० ज्ञान ध्यान वर्म शाब्दिक कवित्व । हें तो न कळे अर्थ मूढांप्रती ॥ १ ॥ राम मुखें गांवा राम मुखें गांवा । वाचे आठवावा कृष्ण सदा ॥ २ ॥ एका जनार्दनी राम कृष्ण मनीं । भजा आसनीं शयनीं सर्वकाळ ॥ ३ ॥

२७११ भजन तें साचें भोळ्याभाविकांसी । पैं अभाविकांसी नरकवास ॥ १ ॥ भोळियाचा देव अंकीत भोळा । अभाविकां चांडाळां जवळी नसे ॥२॥ एका जनार्दनीं भावाचें कारण । अभाविकां जाण दुःख पीडा ॥ ३ ॥

२७१२ गजाचें तें वोझें गाढवासी न साजे । भाविकांचें भजन अभाविकां न विराजे ॥ १ ॥ पतिव्रतेची रहाटी शिंदळीसी न साजे । श्रोतियाचें कर्म हिंसका लाजे ॥ २ ॥ एका जनार्दनाचें कवित्व सर्वांसी साजे । वाचे श्रीगुरु म्हणता कदा न लाजे ॥ ३ ॥

२७१३ जया अनुताप वैराग्य । तया म्हणती पहा अभागी ॥ १ ॥ वरी वरी दांभिक अचार । तया म्हणती पवित्र नर ॥ २ ॥ जया बोले मनुष्य मरे । तया म्हणती सिद्धत्व खरें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोध । अभाविकांसी हाचि खेद ॥ ४ ॥

२७१४ अविश्वासी वाडंकोडें । जेथें जाय तेथें सांकडे ॥ १ ॥ अंगोअंगीं कष्ट सदा । ऐसी तयासी अपदा ॥ २ ॥ जिकडे जाय तिकडे कष्ट । नोहे परमार्थीं वरिष्ठ ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं । अविश्वास त्यागा झणीं ॥ ४ ॥

२७१५ अभाविकासी न रुचे भजन । सदा पिशाच्चपूर्ण देह त्याचा ॥ १ ॥ असोनी संसारी प्रेतवत देहे । काळमुखा वाहे भार सदा ॥ २ ॥ जगीं अपकीर्ती फजितीचें जिणें । सदा तें लपणें श्वानापरी ॥३॥ एका जनार्दनीं ऐसें ते पामर । भोगिती अघोर कल्पकोटी ॥ ४ ॥

२७१६ गर्दभाचे अंगीं चंदनाची उटी । व्यर्थ शीण पोटीं लावूनियां ॥ १ ॥ श्वान तो भोजनीं बैसविला अढळ । परी वोकावरी ढाळ जाऊं नेदी ॥ २ ॥ सूकरा लेपन कस्तुरीचें केलें । परी तो लोळे चिखलीं सदा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अभाविकांचे गुण । व्यर्थ शीण जाण प्राणियांसी ॥ ४ ॥

२७१७ केलिया कर्मा येत असे वांटा । अभावी करंटा मतिमंद ॥ १ ॥ जेथें राहे उभा दिसे दैन्यवाणा । चुकला भजना गोविंदाच्या ॥ २ ॥ एका जनार्दनीं नामाच्या उच्चारा । न करितां अघोरा जाती प्राणी ॥ ३ ॥

२७१८ ब्राह्मणाचें तीर्थ घेतां त्रास मोठा । प्रेमें पितो घोटा घटघटा ॥ १ ॥ हातें मोऱ्या उपशी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कंटाळतो ॥ २ ॥ गाईस देखुनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसे झाले प्राणी । जन्मोनिया जनीं व्यर्थ आले ॥ ४ ॥

२७१९ शूद्रादिक वर्ण त्याचे पाय धुती । उपदेश घेती तयाचे गा ॥ १ ॥ वेदशास्त्रालागीं अव्हेर करिती । आपुलाले मतीं पाषांडी ते ॥ २ ॥ आचार सांडोनी होती शब्दज्ञानी । व्यर्थ अभिमानी पडताती ॥ ३ ॥ एका जनार्दनी ऐसिया पामरा । केवीं विश्वंभरा पावशील ॥ ४ ॥

२७२० नित्य हाटपाठ आचार सपाट । कारभार दाट असत्याचा ॥ १ ॥ कैंचें सोंवळें । कैंचें ओवळें । प्रातःकाळीं शिळें भक्षिताती ॥ २ ॥ कैंचें चोखटपण अंतरीं मळीन । दिसे कळाहीन पापिष्ट तो ॥ ३ ॥

एका जनार्दनीं अवघा अनाचार। दाविती आचार वरी वरी ॥ ४ ॥

२७२१ पोटासाठीं लागे नीचाचिया पायां। करीना भलीया नमस्कार ॥ १ ॥ स्वयंपाकीयाच्या करितो टवाळ्या। आपण खाये शिळ्या भाकरी तें ॥ २ ॥ अग्निहोत्रादिक त्याचा करी निंदा। आपण घेई सदा गुरगुडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐशी याची मात। नको तयाचा संगात मज देवा ॥ ४ ॥

२७२२ दुर्जनाचें संगें दुर्जन लागत। नाना विटं-बीत सज्जनांसी ॥ १ ॥ दुर्जनाचें अन्न सेउनी दुर्वास। छाळिलें पांडवास निशीमाजीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं दुर्जनाचा संग। तेणें होय भंग भाविकांचा ॥ ३ ॥

२७२३ सकळ दोषां मुगुटमणी। निंदी जनीं संता तो ॥ १ ॥ जन्मतांची नाहीं मेला। व्यर्थ वांचला भूभार ॥ २ ॥ त्याचियानें दुःखी धरा। नाहीं थारा जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ दांत खाय यमधर्म। देखोनियां त्याचें कर्म ॥ ४ ॥ अभागी तो वसे जनीं। एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

२७२४ नाम गातां करी आळस। निंदा करी बहू उल्हास ॥ १ ॥ कोणी गातसे हरिनाम। तयासी तो अधम उपहासीं ॥ २ ॥ आपणां घरीं नाहीं कण। भांडा-रियां म्हणे बुद्धिहीन ॥ ३ ॥ नेणे कधीं स्वप्नीं भाव। मानी देव वेगळाची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ते पामर। भोगिती अघोर चौऱ्यांशी ॥ ५ ॥

२७२५ वेद तो प्रमाण। वचन करी जो अप्रमाण ॥ १ ॥ तो स्वहितां नाडला। जन्मोजन्मीं कुडा जाहला ॥ २ ॥ वेदाची जे मर्यादा। नायकेचि जो कदा ॥ ३ ॥ वेदें सांगितलें कर्म। करी सदा तो अधर्म ॥ ४ ॥ जन्मतांचि प्राणी। एका जनार्दनीं वांझ जनीं ॥ ५ ॥

२७२६ जन्मला जो प्राणी। रामनाम नेघे वाणी ॥ १ ॥ महापातकी चांडाळ। अधम खळाहुनी खळ ॥ २ ॥ सदा परद्वारीं हिंडे। नाम घेता कानकोंडे ॥ ३ ॥ करूं नये तेंचि करी। सदा परद्रव्य हरी ॥ ४ ॥ जन्मोनिया अंड। एका जनार्दनीं रांड ॥ ५ ॥

२७२७ मर्कटासी मदिरा पाजिली। तैशी भुलली विषयांसी ॥ १ ॥ मातला गज नावरे जैसा। विषय फांसा त्यावरी ॥ २ ॥ रेडा जैसा मुसमुशी। तैसा लोकांशीं बोलत ॥ ३ ॥ श्वाना जैसे पडती किडे। तैसा चहूंकडे रडे ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं। अंतीं यमाची जांचणी ॥ ५ ॥

२७२८ भक्तिहीन जन्मला पशू। केला नाशू आयु-ष्याचा ॥ १ ॥ नाहीं कधीं संतसेवा। करी हेवा भूतांचा ॥ २ ॥ मुखीं नये रामनाम। सदा काम प्रपंचीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ते नर। जन्मोनी पामर भूभार ॥ ४ ॥

२७२९ मानी नामाचा कंटाळा। तया वोंगळा न पहावें ॥ १ ॥ सदा त्याचे विषयीं ध्यान। वाचे बोले भलतें वचन ॥ २ ॥ आलिया तो घरा। तया न द्यावा पैं थारा ॥ ३ ॥ ऐसा चांडाळ जन्मला। वांया भूमीभार पैं जाहला ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निर्धार। तया थार नाहीं कोठें ॥ ५ ॥

२७३० शिकविलें नाइके वचन। वारितां करी कर्म जाण ॥ १ ॥ न देखे आपुले गुणदोष। परावियाचें बोले निःशेष ॥ २ ॥ न करावें तें करी। न बोलावें तें बोले निर्धारीं ॥ ३ ॥ न मानी स्वयातीचा आचार। सदा करी अनाचार ॥ ४ ॥ शिकविलें गेलें वांया। शरण एका जनार्दन पायां ॥ ५ ॥

२७३१ दीपकाचे ठायीं नाहीं द्वैतभाव। चोर आणि साव सारिखाची ॥ १ ॥ तैसें ब्रह्मज्ञान सांगताती गोष्टी। अभाविकां पोटीं स्थिर नोहे ॥ २ ॥ शुद्ध पंचा-मृतें काग तो न्हाणिला। परी कृष्णवर्ण पालटला नोहे त्याचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खळाचा स्वभाव। पालट वैभव नोहे त्यासी ॥ ४ ॥

२७३२ कस्तुरी परिमळ नाशितसे हिंग। ऐसा खळाचा संग जाणिजेती ॥ १ ॥ साकरेचे आळा निंब जो पेरिला। शेवटीं कडू त्याला फळें पत्रें ॥ २ ॥ चंदनाचे संगें हिंगण वसती। परी चंदनाची याती वेगळीच ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हा अभाविकाचा गुण। वमनासमान लेखूं आम्ही ॥ ४ ॥

२७३३ मृगजळाचेनि काय तृषा हरे। अर्कफळें निर्धारें नोहे तृप्ता ॥ १ ॥ पाहतां गोजिरें दिसे वृंदा-वन। कैं गोडपण नये त्यासी ॥ २ ॥ वचनाग खातां आधीं लागे गोड। शेवटीं अवघड देहपीडा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दुर्जन अभाविक। खळ अमंगळ देख संसारांत ॥ ४ ॥

२७३४ कथा कीर्तन नेणे । सदा बोलणे वाचाळ ॥१॥ ऐसा अभागी जन्मला । कोण सोडवी तयाला ॥२॥ गाये डफगाणे नानापरी । स्वप्नीं नेणे वाचे हरी ॥३॥ आपण बुडोनि बुडवी लोकां । शरण जनार्दनीं एका ॥४॥

२७३५ नये मनासी अभागिया गोष्टी । म्हणे बोलती चावटी बहु बोल ॥ १ ॥ सांगतां सांगतां बुडतसे डोहीं । पुढिलाची सोई नेणती ते ॥ २ ॥ वाचेसी स्मरण नाहीं कधीं जाण । सदा मद्यपान बडबडतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नायके सांगतां । कोण याच्या हिता हित करी ॥ ४ ॥

२७३६ अमंगळाचा अमंगळ वाण । नये वाचे नारायण ॥ १ ॥ सदा सर्वकाळ परनिंदा करी । वाचे हरि हरि न म्हणे पापी ॥ २ ॥ कस्तुरी उत्तम परि शेजार हिंगाचा । अमंगळासी सावा बोध नोहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तयाची पैं गोष्टी । बोलणें चावटी परमार्थ नोहे ॥ ४ ॥

२७३७ अभक्ता दुर्जना यमदूत यातना । नानापरी जाणा करिताती ॥ १ ॥ नाम नाहीं मुखीं दूत तया ताडिती । नेऊन घालिती कुंभपाकीं ॥ २ ॥ ताम्र भूमीवरी खैराचे इंगळ । लाविताती ज्वाळ अंगालागीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं यातनेचें दुःख । कोणा सांगेल मूर्ख यमलोकीं ॥ ४ ॥

२७३८ निर्दय मानसीं मारिताती दूत । कां रे चुकलेति रामनाम ॥१॥ प्रपंचाचे कामीं करूनि हव्यास । विसरला मुखास नाम घेतां ॥ २ ॥ म्हणोनि वोढिती तोडिती निष्ठुरा । दया ते अंतरा नये त्यांच्या ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निर्दय साचार । नाहीं आन विचार तये ठायीं ॥ ४ ॥

२७३९ नावडे जयासी पंढरी । तोचि जाणा दुराचारी ॥ १ ॥ नावडे जया चंद्रभागा । तोचि अपवित्र पैं गा ॥ २ ॥ नावडे पुंडलिका वंदन । तोचि चांडाळ दुर्जन ॥ ३ ॥ नावडे विठ्ठलाची मूर्ती । तोचि जगीं पापमती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । तोचि दुराचारी जाण ॥ ५ ॥

२७४० स्वप्नींचा भांबावला । म्हणे मज चोरें नागविला ॥ १ ॥ ऐसी अभाग्याची मती । वांया भुले चित्तवृत्ती ॥ २ ॥ नेणे कधीं मुखीं नाम । सदा वसे क्रोधकाम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव । नाहीं भेव निरसीत ॥ ४ ॥

२७४१ कां रे जन्मला अभागी । प्रीति न धरी पांडुरंगीं ॥ १ ॥ उत्तम चांगलें रे मुख । रामनाम न म्हणतां विख ॥ २ ॥ उत्तम कर ते दिसती । दानधर्म न घडे हातीं ॥ ३ ॥ उत्तम पद ते शोभती । परि तीर्थयात्रे न जाती ॥ ४ ॥ पुष्ट दिसतें शरीर । व्यर्थ वांचोनि भूमीभार ॥ ५ ॥ ऐसे अभागी जन्मले । एका जनार्दनीं वांया गेले ॥ ६ ॥

२७४२ भूमीभार वांया । कां रे जन्मली ही काया ॥१॥ न घडे वाचे नामस्मरण । जिव्हा नव्हे चर्म जाण ॥२॥ न घडे करें दानधर्म । कर नोहेती सर्प जाण ॥ ३ ॥ पायीं तीर्थयात्रा न घडे । पाय नोहेत ते केवळ लांकडें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ते वेडे । नरदेहीं प्रत्यक्ष रेडे ॥ ५ ॥

२७४३ आयुष्य तें तीन भाग जाहलें । परी मुखीं राम न बोले ॥ १ ॥ सदा प्रपंचासी मन । वरवर ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ चित्त शुद्ध झालें नाहीं । ज्ञान कोरडे सांगोनि कायी ॥ ३ ॥ उपाधीचा निषेध भेद । सदा वाद अपवाद ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मना । तेथें राहूं नको जना ॥ ५ ॥

२७४४ साधनें कासया करसी रे गव्हारा । चौऱ्यायशीचा फेरा चुकवी कांहीं ॥ १ ॥ वाउगेंचि माझें म्हणोनी घेशी वोझें । आदी अंतीं तुझे कोण होती ॥ २ ॥ वाउगीयाच्या छंदा लागशी तूं मूढा । पतनाचा खोडा चुकवी वेगें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं श्रीरंगावांचुनी । धांवण्या धावणीं कोण धांवे ॥ ४ ॥

२७४५ क्रोधयुक्त अंतःकरण । तेणें नासे स्वधर्माचरण ॥ १ ॥ ऐसें द्वेषें बांधलें घर । ते ठायीं क्रोध अनिवार ॥ २ ॥ ऐशिया स्वभावावरी । नर अथवा हो कां नारी ॥ ३ ॥ स्वभाव बाधी सत्य जाण । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

२७४६ अज्ञानी विश्वासें साधूसी वंदी । ज्ञानिया तो सदा तया निंदी ॥ १ ॥ ऐशी उभयतांचि क्रिया । पाहतां चर्या एकची ॥ २ ॥ वंदूं निंदूं कोणी ऐसा एक भाव । तेथें तो देव वसे सदा ॥ ३ ॥ ज्ञान अज्ञानाचा निवाडा होय । एका शरण जनार्दनीं जाय ॥ ४ ॥

२७४७ पराचे ते दोष आणूं नये मनीं । जयाची ते करणी त्याजसवें ॥१॥ विषाचिया अंगीं नोहे अमृतपण । मारक तें जाण विष होय ॥ २ ॥ सर्पाचिये

अंगीं शांतीचा कळवळा । कोण पाहे डोळा भरूनि दृष्टी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जैसा ज्याचा गुण । तैसें तें लक्षण बद्धक त्यासी ॥ ४ ॥

२७४८ एकासी शुद्ध एकाशीं अशुद्ध । बोलतां अबद्ध नरका जोडे ॥ १ ॥ शुद्ध अशुद्ध हें विठोबाचें नाम । जपतां घडे सकाम मोक्ष मुक्ती ॥ २ ॥ सकाम निष्काम देवाचें भजन । तेणें चुके पतन इहलोकीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शुद्ध आणि अशुद्ध । टाकूनियां भेद भजन करी ॥ ४ ॥

२७४९ भाविकांचें स्थान पंढरी पावन । अभाविकां जाण नावडे तें ॥ १ ॥ म्हणोनि चिंतन विठ्ठलाचें वाचे । अभाविकां साचें नावडे नाम ॥ २ ॥ वैष्णवाचा संग नावडे कीर्तन । अभाविकांचा दुर्गुण हाचि देखा ॥ ३ ॥ अभाविकांच्या संगें परमार्थ नावडे । एका जनार्दनीं न घडे सेवा कांहीं ॥ ४ ॥

२७५० नाशिवंत शरीर ओंगळ वोखटें । परी तया भेटे कर्म धर्म ॥ १ ॥ अशाश्वत शाश्वत हेंचि उमगा मनीं । तया चक्रपाणी धांवे मागें ॥ २ ॥ देहींचें देहपण देहाचिये माथां । कर्म धर्म सत्ता देहालागीं ॥३॥ एका जनार्दनीं कर्म धर्म पाठीं । वांया भ्रम पोटीं घेती जीव ॥ ४ ॥

२७५१ देहींचेनि सुखें सुखावत । सुख सरतां दुःख पावत ॥ १ ॥ ऐशी आहे बरोबरी । वांया शिणतो निर्धारी ॥ २ ॥ सुख दुःख तें समान । मुळींचेंच हें दोन्ही जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुखदुःख । अवघा जनार्दन एक ॥ ४ ॥

२७५२ देहबुद्धि जयापाशीं । पाप वसे त्या मानसीं ॥ १ ॥ दोष जाणा अलंकार । तेणें सत्य हा संसार ॥ २ ॥ समूळ अहंतेच्या नाशीं । ब्रह्मप्राप्ती होय त्यासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अहंकार । त्याग करावा सत्वर ॥ ४ ॥

२७५३ होउनी विठोबाचा दास । करी आस दुजियाची ॥ १ ॥ वांया माता व्याली तया । भूभार कासया अवनीसी ॥ २ ॥ पूर्वज तया कंटाळती । जन्मला म्हणती खर हा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे । तया पेणें यमलोकीं ॥ ४ ॥

२७५४ राहुनी पंढरी । आणिकाची आस करी ॥१॥ तो पातकी चांडाळ । खळाहुनी अमंगळ ॥ २ ॥ सोडोनियां विठ्ठल देव । आणिकासी म्हणे देव ॥ ३ ॥ सांडोनियां पुंडलिका । गाय आणिकासी देखा ॥४॥ ऐसा पातकी तो खळ । तयाचा न व्हावा विटाळ ॥५॥ म्हणे जनार्दनाचा एका । तया तेथें ठेऊं नका ॥ ६ ॥

२७५५ हीन जे पामर नावडे वाचे नाम । सदा कामी काम प्रपंचाचें ॥ १ ॥ भोगिती यातना न सुटे कल्पकोडी । चौऱ्यांयशींची बेडी दृढ पायीं ॥ २ ॥ जैसें कर्म केलें तैसें फळ आलें । कुंथतां वाहिले भार माथां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संशय न धरावा । आला तो भोगावा विषमकाळ ॥ ४ ॥

२७५६ जन्मोनि प्राणी नाम घेत वाचे । त्याचिया जन्माचें व्यर्थ वोझें ॥ १ ॥ प्रसवोनि तया वांझ ती जननी । बुडविली दोन्ही कुळें त्यानें ॥ २ ॥ पूर्वज पतनी पडती बेचाळीस । नाम नये मुखास ऐसा प्राणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पतीत दुराचारी । यम तया अघोरीं घालितसे ॥ ४ ॥

२७५७ अभागी तो जाण । न करी विठ्ठलस्मरण ॥ १ ॥ तया व्यालीसे जननी । अभागी तो पापखाणी ॥२॥ न जाय पंढरपुरा । मांडी वेदान्त पसारा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे । श्वानापरी जयाचें जिणें ॥ ४ ॥

२७५८ नरदेह प्रमाण शतवर्षें म्हणती । अभागी घालविती वांया जाण ॥ १ ॥ न करी भजन न जाय पंढरीं । अभाविक दुराचारी सदा मनीं ॥२॥ जनार्दनाचा एका न पाहे त्याचें मुख । नरदेहीं देख पशूवत ॥ ३ ॥

२७५९ अभागियां नावडे वैष्णवांचा संग । सदा तो उद्योग परनिंदेचा ॥ १ ॥ ऐसे जे पामर भोगिती अघोर । सुटका निर्धार नोहे त्यासी ॥ २ ॥ जन्मोनि मरती पुन्हां जन्मा येती । होतसे फजिती मागें पुढें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नरकाचें बिढार । यमाचें तें घर माहेर केलें ॥ ४ ॥

२७६० ऐसें कृपण मनाचें । तें या पंढरीशी न वचे ॥ १ ॥ पापियासी पंढरपूर । नावडे ऐसा निर्धार ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान पाषांडीया । नावडे काया वाचा जीवेंसी ॥ ३ ॥ विषयी जो दुराचारी । तया नावडे ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥ अभक्तांसी संतभेटी । झाल्या नावडे म्हणे चावटी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं म्हणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥ ६ ॥

२७६१ विषयीं जो लंपट । तया नावडे ही वाट । पंढरी सुभट । नावडेचि पापिष्टा ॥ १ ॥ अमृत फळें पूर्ण आलीं । कागा जैसी परी जाली । तैसीं हे चाली । पापिष्टांची जाणावी ॥ २ ॥ धनलुब्धका नावडे धर्म । मद्यपिया नावडे कर्म । जाराची संतसमागम । नाठवेचि सर्वथा ॥ ३ ॥ स्त्रीलुब्ध परद्वारीं । काय तया गीता निर्धारीं । एका जनार्दनीं हरी । नको संग तयाचा ॥ ४ ॥

२७६२ एक नरदेह नेणोनि वांया गेले । एक न ठके म्हणोनि उपेक्षिले । एक ते गिळिले ज्ञानगर्वें ॥१॥ एक ते साधनीं ठकिले । एक ते करूं करूं म्हणतांचि गेले । करणें राहिलेंसे तैसें ॥ २ ॥ यापरी अभिमान जगीं । ठकवितसे अंगसंगीं । नडी लागवेगीं जाणत्यासी ॥ ३ ॥ जें जें करी साधन । तेथें होय अभिमान । नागवी लावणें तेथें साचाधांवा करी कोण ॥४॥ ज्ञानें व्हावी ब्रह्मप्राप्ती । तें ज्ञान वेंचि विषयासक्ती । भांडवल नाहीं हातीं । मा मुक्ति कैंची ॥ ५ ॥ स्वप्नींचें निजधनें जाग्रती नोहे धर्म । ब्रह्माहमस्मि हेंहि समाधान । सोलीव भ्रम ॥ ६ ॥ अभिमानाचिया स्थिती । ब्रह्मादिकां पुनरावृत्ती । ऐशी वेदश्रुति । निश्चयो बोले ॥ ७ ॥ एका जनार्दनीं एकपण अनादी । अहमात्मा तेथें समूळ उपाधी ॥ ८ ॥

२७६३ विषयाचे अभिलाषें सबळ भेदु भासे । विषय लेशु तेथें मुक्ति केवि वसे ॥ १ ॥ विषय तृष्णा सांडी मग तूं साधन मांडी । वैराग्याची गोडी गुरूसी पुसे ॥ २ ॥ स्त्रीपुरुष भावना भेदु भासे मना । तेथें ब्रह्मज्ञाना गमन कैंचें ॥ ३ ॥ कणुभरित जो डोळा शरिरासी दे दुःख । अणुमात्र विषय तो संसारदायक ॥ ४ ॥ शुद्धभाव तें वैराग्य आवडे । अति विषय विषयाधीन ते किडे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निजज्ञानशक्ती । निर्विषय मन ते अभेद भक्ती ॥ ६ ॥

२७६४ प्रत्यक्ष देव असोनी नाहीं म्हणती । न कळे मूर्खा देशकपाटे धुंडिती ॥ १ ॥ देहींच देहीं देव तो आहे । भ्रांतीचेनि लोभें नाहींसा होय ॥ २ ॥ एका जनार्दनीं सबळ ती भ्रांती । देहीं देव असोनी वांया हुडकिती ॥ ३ ॥

२७६५ कासियासी तपा धांवा । जवळी असतां दोजे गांवा ॥ १ ॥ राम जवळी चुकले । जप तपें भांबावले ॥ २ ॥ तीर्थी नाहीं क्षेत्रीं नाहीं । जवळीं असतां भ्रांती पाही ॥ ३ ॥ असतां सबाह्याभ्यंतरी । नाहीं म्हणोनि दैन्य करी ॥ ४ ॥ तयालागीं सैरा हिंडे । तोचि तया मागें पुढें ॥ ५ ॥ एका जनार्दनीं योग । रामचि होय सर्वांग ॥ ६ ॥

२७६६ हृदयस्थ असोनी कां रे फिरसी वांया । दीप आणि छाया जयापरी ॥ १ ॥ आत्मतीर्थी सुस्नात झालिया मन । आणिक साधन दुजें नाहीं ॥२॥ साधन तें मन करी आपुले आधीन । यापरतें कारण आन नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मनासी आवरी । मग तूं संसारीं धन्य होसी ॥ ४ ॥

२७६७ उलट पालट कासया खटपटी । नको तूं कपाटीं रिघूं वांया ॥ १ ॥ आसन मातृका साधन समाधी । वाउगी उपाधी तेणें होय ॥ २ ॥ एका जनार्दनीं वाउगा सायास । नामेंचि सौरस पुरे काम ॥ ३ ॥

२७६८ जाणोनियां वेडा होसी कां गव्हारा । भजें तूं पामरा श्रीविठ्ठला ॥१॥ नको रे साधन व्युत्पत्तीचा भार । चुकवी वेरझार विठ्ठलनामें ॥ २ ॥ एका जनार्दनीं विठ्ठलावांचुनी । सोडविता कोणी नाहीं दुजा ॥ ३ ॥

२७६९ अष्टांग साधनें करिताती योगी । परी मन अव्यंगी होत नाहीं ॥ १ ॥ जिंकिताचि मन साधनें साधती । न जिंकितां फजिती मागें पुढें ॥ २ ॥ एका जनार्दनीं काया वाचा मन । धरूनि बंधन त्यासी करी ॥ ३ ॥

२७७० दुजेपणें नको पाहूं सर्वां ठायीं । एकरूप देहीं देव दिसे ॥ १ ॥ येणें सर्व काम सुगम सोपारें । दुजेपणें वावरे देहबुद्धी ॥ २ ॥ मन चित्त अहंकार करणें हा विचार । दुजेपणें पार केवि तरे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दुजेपणा सांडीं । विठ्ठलचि मांडी हृदयामाजीं ॥ ४ ॥

२७७१ एका स्तुति एका निंदा । करितां अंगीं आदळे बाधा ॥ १ ॥ अर्धांगीं लक्ष्मी काय वंदावी । चरणींची गंगा निंदावी ॥ २ ॥ भज्य करावें भजन भजनीं । निंदा स्तुती सांडोनी दोन्ही ॥ ३ ॥ तेची भक्ति निजस्थिती । आवड चित्तीं भजनाची ॥ ४ ॥ वसावें सदा चरणीं मन । एका शरण जनार्दन ॥ ५ ॥

२७७२ अकळ तो खेळ नाकळे वेदांती । वाउगे कुंथती भारवाही ॥ १ ॥ ऐसा तो अकळ न कळेची

कळां। लावियेला चाळा सर्व जीवां ॥ २ ॥ परस्परें एकएका पैं मैत्री। ऐशी चाले धात्री पंचभूतें ॥ ३ ॥ जगतपटतंतू आपणचि होय। ऐसा हा निश्चय सत्ता ज्याची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सर्व सत्ताधारी। न माये चराचरीं कीर्ति ज्याची ॥ ५ ॥

२७७३ लोखंडाची बेडी तोडी। आवडी सोनियाची घडी ॥ १ ॥ मी ब्रह्म म्हणतां अभिमान। तेथें शुद्ध नोहे ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ जळापासुनी लवण होय। ते जळींचें जळीं विरुनी जाये ॥ ३ ॥ जैशी देखिली जळगार। शेवटीं जळाचि निर्धार ॥ ४ ॥ मुक्तपणें मोला चढलें। शेवटीं सोनियाचे फांसां पाडिलें ॥५॥ एका जनार्दनीं शरण। बद्धमुक्ता ऐसा शीण ॥ ६ ॥

२७७४ अभिमानासाठीं। वेंचिती तपाचिया कोटी ॥ १ ॥ अभिमान दुर्वासासी। व्यर्थ शापिला अंबऋषी ॥ २ ॥ अभिमान ब्रह्मियासी। नेलें गाई गोप वत्सांसी ॥ ३ ॥ अभिमान नाडला पूर्ण। विश्वामित्र ऋषि जाण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण। समूळ सांडावा अभिमान ॥ ५ ॥

२७७५ कलत्रपुत्रबाधा अभिमानाची। तेहि त्यजिल्या शेखीं त्यागी म्हणे निजाची ॥ १ ॥ अभिमान कैसेनी सरे। ही कृपा कीजे माहेरें दातारा ॥२॥ देहीं देहातीत प्रतिपादिजे ज्ञान। तेणेंचि ज्ञानें देहीं येतुसे अभिमान ॥ ३ ॥ जें जें होय रुतें तें अहंकारु। त्यागी भोगी होय दिगंबरु ॥ ४ ॥ ब्रह्मज्ञानें म्हणती अभिमानाची तुटी। सोहं सोहं म्हणोनि तेथेंहि लागे पाठीं ॥ ५ ॥ द्वैत नाहीं जगीं मीच येकला येकु। येणें स्फुरणें आला अभिमान घातकु ॥ ६ ॥ अति सूक्ष्म अभिमान कवणा न पडे ठायीं। देहातीत ज्ञानी म्हणती जो विदेही ॥ ७ ॥ एका जनार्दनीं जगद्‌गुरु न्याहाळी। गौखुर वंदितां अभिमानाची धुळी ॥ ८ ॥

२७७६ आणिकाचे मनीं आणीक संकल्प। न धरा विकल्प वासनेचा ॥ १ ॥ नका यातायाती वाउगी फजिती। उगवा गोवागुंती आपुलाली ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकचि स्मरा। जन्म वेरझारा खंड होती ॥३॥

२७७७ सबराभरित देव असोनी जवळी। व्यर्थ ते कवळी मृत्तिका जळ ॥ १ ॥ ज्याचिया सत्तेचा पंचभूत खेळ। विसरती गोपाळ तयालागीं ॥ २ ॥ वल्कलें वेष्टन भस्माचें धारण। करिती धूम्रपान वाउगेंची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हृदयस्थ असतां। कां हो शीण तत्त्वतां करिताती ॥ ४ ॥

२७७८ गाण्याचें कीर्तन वाखाणिलें। जाणिवेचें ज्ञान तें जाणिवेनें खादलें ॥ १ ॥ भवार्णव हा अवघा उभारी। तो कळे जाणिवेवरी रे ॥ २ ॥ पंडिताचा बोध। विध्वंसी वाद। तापसाचें तप निर्दाळी क्रोध ॥३॥ योगियांचा योग नाडियेला सिद्धी। अभिमान नाडी सज्ञान बुद्धी ॥ ४ ॥ कर्माकर्म नाडी वर्णाश्रम। संबंधीं विषम विकल्प करी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं भगवत्कृपा पूर्ण। निरभिमानें चरण धरियेले ॥ ६ ॥

२७७९ एकांतीं बैसणें शरीर रोधणें। अष्टांग साधनें श्रम नको ॥ १ ॥ गुदातें अंगुष्ठ लावुनी बैसणें। शरीरीं रोधणें पंचप्राण ॥ २ ॥ नको नको व्यर्थ जीवासी यातना। रामनामस्मरणा करी सुखें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नको यातायाती। नामस्मरण मुक्ती सत्वर जोडे ॥ ४ ॥

२७८० लांब लांब तुम्ही सांगाल गोष्टी। तत्त्वेंसी भेटी करी उठाउठी ॥ १ ॥ मीपण जोंवरी गेलें नाहीं। तोंवरी तुम्ही केलें काई ॥ २ ॥ मीपण देहीं प्रपंच दुष्टा। कोरड्या सांगाल काय गोष्टी ॥३॥ एका जनार्दनीं बोधाचें सत्त्व। बोलामाजीं तेणें दाखविलें तत्व ॥ ४ ॥

२७८१ वरीवरी दावी भक्ती। अंतरीं असे कामासक्ती ॥ १ ॥ माझें घर माझें कलत्र। माझें गोत्र माझा पुत्र ॥ २ ॥ ऐसा प्रपंचीं गुंतला। तयावरी काळ घाला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। काळ वंदितसे चरण ॥ ४ ॥

२७८२ अंतरीं शुद्ध नाहीं भाव। वरी मिरवी वैराग्य ॥ १ ॥ जळो जळो त्याचें ज्ञान। काय नटाचें भाषण ॥ २ ॥ टीळा टोपी दावी सोंग। बकध्याना मिरवी रंग ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। त्याचा मंत्र न घ्यावा कानीं ॥ ४ ॥

२७८३ अंतरीं भरला दृढ काम। वरी वरी दावितसे नेम ॥ १ ॥ जैसें फळ वृंदावन। परी अंतरीं कडू पूर्ण ॥ २ ॥ सदा वाहे तळमळ चित्त। वरी वरी दावी परमार्थ ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं। ऐसे नर पापखाणी ॥ ४ ॥

२७८४ किती काकुलती यावें। किती वेळां फजीत व्हावें ॥ १ ॥ न भीचि तो यमदंडा। जैसा मेंढा

मातलासे ॥ २ ॥ भलतियावरी धांवे । श्वान जैसें तें स्वभावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जाण । वाहातो. देवाची आण ॥ ४ ॥

२७८५ किती बोलूं किती सांगू । नायकती त्यांचा नसरे पांगू ॥ १ ॥ जातां न राहती आडवाटे । मोडती कांटे कर्मधर्म ॥ २ ॥ वाउगे पंथे असती जनीं । तये मांडणी गुंतूं नका ॥ ३ ॥ एका जनार्दनीं लडिवाळ । पूर्ण कृपाळ संतांचा ॥ ४ ॥

२७८६ पंडितांच्या वचना द्यावें अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणें कांहीं ॥१॥ शास्त्रीयांचें वचना द्यावें अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणें कांहीं ॥ २ ॥ वेदान्ताच्या वचना द्यावें अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणें कांहीं ॥ ३ ॥ पुराणिकांचें वचना द्यावें अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणें कांहीं ॥ ४ ॥ संतांच्या वचना द्यावें अनुमोदन । एका जनार्दनीं तेणें हित होय ॥ ५ ॥

२७८७ पवित्र अंतर शुद्ध करा मन । तेणें घडे जाण सर्व कर्म ॥ १ ॥ वेदयुक्त मंत्र जपतां घडे पाप । मी मी म्हणोनि संकल्प उठतसे ॥२॥ यज्ञादिक कर्में घडतां सांग । मी मी संसर्ग घडतां वायां ॥ ३ ॥ दानधर्मविधी धरितां शुद्ध मार्ग । मी मी म्हणतां योग वायां जाय ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मीपणा टाकून । करी कृष्णार्पण सर्व फळ ॥ ५ ॥

२७८८ समूळ कामनेतें दंडावें । मग शिरादिक मुंडावें ॥ १ ॥ अंतरीं अनिवार कामना । विरक्ति तो दाखवी जना ॥ २ ॥ नाम गर्जतां हें होटीं । एका जनार्दनीं काम पळे नेहटीं ॥ ३ ॥

२७८९ आलासी पाहुणा नरदेहीं जाणा । चुकवी बंधनापासूनियां ॥ १ ॥ वाउगाचि सोस न करीं सायास । रामनामें सौरस जप करीं ॥ २ ॥ यज्ञयागादिक न घडती साधनें । न्यून पडतां पतन सहज जोडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चुकवी वेरझार । करी तूं उच्चार रामनाम ॥ ४ ॥

२७९० तूं नायकसी कवणाचें । बोलतां नये वहू वाचे । तुझें तुज हिताचें । वर्म आम्हीं सांगूं ॥ १ ॥ होई सावध झडकरी । नको पडूं आणिकें भरीं । वायांची धांवसी दिशाभरीं । श्रमू निर्धारीं तुजवी ॥२॥ ब्रह्मज्ञानाची भरोवरी । वाउगी न करीं निर्धारीं । कर्म अकर्म आधीं सारी । मग निर्धारीं सुख पावे ॥३॥ जेणें तुष्टे जनार्दन । हेंचि करीं पां साधन । शरण एका जनार्दन । वाउगा शीण न करी ॥ ४ ॥

२७९१ जेथें कष्टे न लभे ज्ञान । आधीं पाहिजे समाधान । योगयाग तपाचें नाहीं कारण । शांती क्षमा दया जाण मुख्य धरीं ॥ १ ॥ आणिक नकोरे साधन । वायां शीण ब्रह्मज्ञान । आम्ही मुखीं गाऊं रामकृष्ण । हेंचि समाधान आमुचें ॥ २ ॥ आलिया जन्माचें सार्थक । जन्मजरा निवारूं दुःख । कायावाचामनें संतसेवा देख । दुजा हेतु नाहीं मनीं ॥ ३ ॥ जन तेचि जनार्दन । साक्षी तया लोटांगण । एका जनार्दना शरण । कायावाचामनेंसी ॥ ४ ॥

२७९२ ममता ठेवूनि घरींदारीं । वायां कां जाशी बाहेरी ॥ १ ॥ आधीं ममत्व सांडावें । पाठीं अभिमाना खंडावें ॥ २ ॥ ममता सांडी वाडेकोडें । मोक्षसुख सहजीं घडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । ममता टाकी निर्दाळून ॥ ४ ॥

२७९३ लज्जा अभिमान टाकूनि परता । परमार्थ सरतां करी कां रे ॥ १ ॥ वादक निंदक भेदक ऐसे त्रिविध । याचा टाकूनि भेद भजन करी ॥ २ ॥ एका जनार्दनीं त्रिविधापरता । होऊनि परमार्था हित करी ॥ ३ ॥

२७९४ रस सेविल्यासाठीं । भोगवी जन्माचियां कोटी ॥ १ ॥ रसनें आधीन सर्वथा । रसनाद्वारें रस घेतां ॥ २ ॥ जंव रसना नाहीं जिंतिली । तंव वाउगीच बोली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । रस रसना जनार्दन ॥ ४ ॥

२७९५ उपाधी या नांव भूतांचा तो द्वेष । तो तूं या निःशेष सांडी वापा ॥ १ ॥ सर्वा ठायीं देव जगीं तो भरला । व्यापूनिया ठेला जळीं स्थळीं ॥२॥ काम अकाम सकाम निष्काम । हें सोपें उपाय साधकांसी ॥ ३ ॥ आसन ध्यान धारणा तें ध्येय । हें सोपें उपाय साधकांसी ॥ ४ ॥ दंडन मुंडन नको तीर्थाटण । एका जनार्दन हृदयीं धरीं ॥ ५ ॥

२७९६ जिवा रस चाखी अवलोकी नेत्र । प्रेरक पवित्र आत्माराम ॥ १ ॥ बोलतसे मुख त्वचे कळे स्पर्श । प्रेरक परेश आत्माराम ॥ २ ॥ सुखदुःख ज्ञान होतसें पैं चित्ता । प्रेरक पंढरीनाथावीण नाहीं ॥ ३ ॥ घ्राणा परिमळ ऐकती श्रवण । प्रेरक नारायण सर्व साक्षी ॥ ४ ॥ हस्तें घेणें देणें चरणीं गमन । प्रेरक

ईशान आत्माराम ॥ ५ ॥ ज्याच्या सत्ताबळें हाले वृक्षपान । प्रेरक भगवान सर्वांचा तो ॥ ६ ॥ एका जनार्दनीं पाय हे धरावे । ध्यान हें करावें हृदयीं त्याचें ॥ ७ ॥

२७९७ वैराग्य प्रथम असावी शांती । तेणें विरक्ति अंगीं जोडे ॥ १ ॥ हेंचि मुख्य वर्म साधतां साधन । येणें जनार्दन जवळी असे ॥ २ ॥ उपासना मार्ग हेंचि कर्मकांड । हेंचि जें ब्रह्मांड जनीं वनीं ॥ ३ ॥ हेंचि देहस्थिति विदेह समाधी । तुटती उपाधी कर्माकर्म ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शांती क्षमा दया । यावीण उपाय उपाधी ते ॥ ५ ॥

२७९८ सत्य असत्य दोन्हीं देहींच भासत । तेणेंचि नासत सर्व काम ॥ १ ॥ एकासी वंदावें एकासी निंदावें । ऐसिया भावा काय सत्य तें मानावें ॥ २ ॥ देह जातो गोष्टी असत्य न बोलूं । सर्वज्ञ विठ्ठलु म्हणों आम्हीं ॥ ३ ॥ सत्य असत्याची वार्ता नको देवा । एका जनार्दनीं जीवा हेंचि प्रेम ॥ ४ ॥

२७९९ असत्याचा शब्द नको वाचे माझे । आणिक होकां ओझें भलतैसें ॥ १ ॥ परि संतरज वंदीन मी माथां । असत्य सर्वथा नोहे वाणी ॥ २ ॥ अणुमात्र रज डोळां न साहे । कैसा खुपताहे जनदृष्टी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं असत्याची वाणी । तोचि पापखाणी दुष्टबुद्धी ॥ ४ ॥

२८०० एक एक मंत्रा करिती अनुष्ठान । परि विठोबाचें चरण दुर्लभ ते ॥ १ ॥ एक एक तीर्थां करिती प्रदक्षिणा । परि विठोबाचे चरण दुर्लभ ते ॥२॥ एक एक ग्रामीं करिती भ्रमण । परि विठोबाचें चरण दुर्लभ ते ॥ ३ ॥ एक एक देह करवतीं घालिती । परि विठोबाची प्राप्ती दुर्लभ ते ॥४॥ एका जनार्दनीं सत्संगावांचुनी । परि विठोबाची मिळणी दुर्लभ ते ॥ ५ ॥

२८०१ नाहीं नामासी साधन । निराहार न लगे उपोषण । नको दंडन मुंडन । सुखें वाचे आठवी ॥१॥ काया कष्ट नको कांहीं । देश विदेशासी न जाई । निवांतची ठायीं । बैसोनिया जपे ॥ २ ॥ नको वित्त धन नाश । होउनी देहींच उदास । एका जनार्दनीं नाश । नको करूं शरीराचा ॥ ३ ॥

२८०२ स्नानदानाचें एक फळ । त्याहुनीं नामाचें सुफळ । कोटी गुणें विशाळ । पुण्य हातां चढतसे ॥ १ ॥ धन्य धन्य नाम श्रेष्ठ । गाय अखंड नीलकंठ । आणिक श्रेष्ठ श्रेष्ठ । नाम मुखीं जपताती ॥ २ ॥ नाम त्रिभुवनीं साजिरें । नाम पावन गोजिरें । एका जनार्दनीं निर्धारें । सांगे बाह्या उभारुनी ॥ ३ ॥

२८०३ जप जाप्य तप नको अनुष्ठान । पंचाग्नि साधन योग नको ॥ १ ॥ नको तीर्थाटण नको मंत्रावळी । वेदशास्त्रजाळी गुंतूं नको ॥२॥ नको आत्मस्थिती नको ब्रह्मज्ञान । नको अष्टांग साधन नको वायां ॥ ३ ॥ नको यंत्र मंत्र नको रे कल्पना । भ्रांत भुली जाणा नको नको ॥ ४ ॥ नको तूं करूं सायास धरी पां विश्वास । एका जनार्दनास पाहें डोळां ॥५॥

२८०४ ज्यांचें नाम स्मरतां कळिकाळ ठेंगणा । तयां नारायणा विसरलें ॥ १ ॥ करिती पूजन आणिकांची स्तुती । दैन्यवाणें होती अंतकाळीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं तयाचें बंधन । कोण करील खंडन जन्मकर्मा ॥३॥

२८०५ न लगे न लगे जीवाचा तो नाश । नाम गातां उल्हास माना चित्तीं ॥ १ ॥ पंचाग्नि साधन नको धूम्रपान । योगायाग तपन नको कांहीं ॥ २ ॥ सुखें वाजवा टाळी मुखीं नामघोष । पातकांचा नाश कल्पकोडी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम एक समर्थ । तेणें पुरे स्वार्थ सर्व जीवा ॥ ४ ॥

२८०६ जों जों धरिसी वासना । तों तों नोहे रे उगाणा । पंढरीचा राणा ध्यानामाजीं आणिकां ॥१॥ हेंचि सर्व साधनाचें सार । नको व्युत्पत्तीचा भार । या वचनीं निर्धार । धरीं संतपायीं ॥ २ ॥ नको योग याग तप । वाउगा मंत्र खटाटोप । येणें न धाये माप । जन्मजरा मृत्यूचें ॥ ३ ॥ नको पडूं याचे भरी । वाचे म्हणे कृष्ण हरी । एका जनार्दनीं निर्धारीं । निष्पाप होसी तूं ॥ ४ ॥

२८०७ नका करूं कर्माकर्म । तुम्हां सांगतों मी वर्म । श्रीरामाचें नाम । अट्टाहास्ये उच्चारा ॥ १ ॥ तेणें तुटेल उपाधी । निरसेल भेदबुद्धी । होईल सत्त्वशुद्धी । भक्तिलागीं देवाच्या ॥ २ ॥ त्रिविध तापाचें दहन । कामक्रोधांचें नाशन । होईल प्रसन्न । चित्त रामप्रसादें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नेम । नित्य वाचे रामनाम । कैवल्याचें धाम । प्राप्त होय तात्काळ ॥ ४ ॥

२८०८ साधावया स्वरूपसिद्धी । सिद्ध साधका स्वामी समाधी । बैसोनि ध्यानस्थ बुद्धी । परी तो हरि न सांपडे ॥ १ ॥ धन्य धन्य वैष्णवसंग । खेळ तेथें

पांडुरंग। कीर्तनीं नाचतसे स्वयंभ। सदा काळ सर्वदा ॥ २ ॥ घेतां नाम धांवे विठ्ठल। नको तप नको मोल। न लगती कष्ट बहुसाल। तो कृपाळू दीनांचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। भक्तीस तुष्ट नारायण। त्याचें करितां चिंतन। आपोआप येतसे ॥४॥

## वेदोपासक-ब्राह्मण-ब्रह्मकर्म-पूजा-योग-समाधि उपदेश.

### ब्रह्म-कर्म-पूजा-समाधियोग.

२८०९ गुरू जनार्दन सांगे राममंत्र। पूजावे पवित्र द्विजवर ॥ १ ॥ जोडिली संपदा ब्राह्मणासी द्यावी। अखंड करावी चरणसेवा ॥ २ ॥ ब्राह्मणाचें तीर्थ जे नर सेविती। हरिहर येती वंदावया ॥ ३ ॥ ब्राह्मणाचें तीर्थ ज्या नरा मस्तकीं। सायुज्यता मुक्ति पायां लागे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मुक्ति हे तो वाव। भजा हे भुदेव कोटी जन्मीं ॥ ५ ॥

२८१० जनार्दनें आम्हां सांगितले गुज। पुजावे हे द्विज आवडीनें ॥ १ ॥ मुखीं वेद ज्याच्या तोचि नारायण। भिन्नभाव जाण भावूं नको ॥ २ ॥ भावि-काहि भिन्न तयासी दंडिती। रवरव भोगिती कुळा-सहित ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ब्राह्मणाची पूजा। चुक-वील खेपा संसारीच्या ॥ ४ ॥

२८११ ब्राह्मणवाक्यबळें वेद नेमी जगा। येरव्ही राहे उगा थोटावला ॥ १ ॥ ब्राह्मण तो ब्रह्म ब्राह्मण तो ब्रह्म। जयाचेनि कर्माकर्म दाटुगें जगीं ॥ २ ॥ ब्रह्मवाक्याची राणीव ते शास्त्राची जाणीव। येऱ्हवीं नुसधें पेव पाषाणाचें ॥ ३ ॥ ब्राह्मण वचनार्थे याग-कर्म समर्थ। येरव्ही तें समस्त जीत ना मेली ॥४॥ जीवाचें जीवपण शिवाचें शिवपण। याहूनी ब्रह्म पूर्ण ब्राह्मणवाक्य ॥ ५ ॥ पाठ नाहीं पोट नाहीं ब्रह्म तें निघोट। हाहि अनुभव स्पष्ट ब्राह्मणवचनें ॥ ६ ॥ ब्रह्म तें निर्मळ संसार तो मृगजळ। हेंहि होय विठ्ठळ ब्राह्मणवचनें ॥ ७ ॥ एका जनार्दनीं ब्राह्मण पूर्ण बोधु। जाणें तया बाधु न शके कर्माकर्म ॥८॥

२८१२ शम दम तप शौच आणि क्षमा। आर्जव तो प्रेमा ज्ञानालागीं ॥ १ ॥ आत्मानुभव वेदीं सत्य भाव। ब्राह्मणस्वभाव कर्म ऐसें ॥ २ ॥ ब्राह्मणाच्या ठायीं गुण शुद्ध सत्व। वसे ब्रह्मतत्व तया चित्तीं ॥३॥ सर्वां भूतीं दया असे तयापाशीं। विटला उपाधीसी सर्वभावें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसे हे ब्राह्मण। तयाचे चरण नित्य वंदूं ॥ ५ ॥

२८१३ ब्राह्मणा स्वधर्म नित्य नैमित्तिक। व्हावें उपासक वेदालागीं ॥ १ ॥ स्नानसंध्या वंदन हेंचि नित्य कर्म। तैसेंचि हें वर्म पितृतृप्ती ॥ २ ॥ ब्रह्मयज्ञ आणि अग्नीची ते पूजा। तेणें अधोक्षजा पाविजेत ॥३॥ अतिथी आलिया तया अन्नदान। करावें तर्पण द्रव्य-योगें ॥ ४ ॥ भूतदया गाई पशूतें पाळावें। मुखीं उच्चारावें रामनाम ॥ ५ ॥ एका जनार्दनीं हेंचि कर्म नित्य। तेणें परब्रह्म हातीं चढे ॥ ६ ॥

२८१४ नित्य कर्माचें लक्षण। स्नानसंध्या पितृ-तर्पणें ॥ १ ॥ ब्रह्मयज्ञ देवपूजा। करावी त्या अधो-क्षजा ॥ २ ॥ वैश्वदेव अतिथीपूजन। आचरावें नित्य जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कर्म। तेंचि जाणा पर-ब्रह्म ॥ ४ ॥

२८१५ तयालागीं ज्ञानी म्हणती नैमित्तिक। पितृ-श्राद्धादिक जाणावें तें ॥ १ ॥ संतांचें दर्शन ज्ञानी यांची भेटी। उत्थापन अटी करणें लागे ॥ २ ॥ एकादशी शिवरात्री प्रदोषादी। रामजयन्त्यदि नाना पर्वे ॥ ३ ॥ नैमित्तिक ऐसें तयासी म्हणती। त्यायोगें पावती आत्मतत्वीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं यातें आच-राल। तरीच पावाल चित्तशुद्धी ॥ ५ ॥

२८१६ ब्रह्म जाणे ब्राह्मण याती। त्याची घडावी संगती ॥ १ ॥ ब्राह्मण तयासी म्हणावें। त्याचे पायीं लीन व्हावें ॥ २ ॥ गळां घालोनि सूत्रदोरी। म्हण-विती ब्रह्मचारी ॥ ३ ॥ परी ब्रह्म नाहीं ठावें। लोका सांगतसे भावें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पूर्ण। ब्रह्म जाणे तो ब्राह्मण ॥ ५ ॥

२८१७ कोणा ब्रह्मकर्म कळेना हें वर्म। नासिलें जीवन संध्या वेळे ॥ १ ॥ धरिलें नासिक अनुभवा-वांचुनी। त्रिपुटीस पाणी लावियेलें ॥ २ ॥ डोळिया चंदन शिंटकारिलें कान। तेथें वर्म कोण नेणवेची ॥३॥ हृदयावरी हात नाभीसी लाउनी। डोळे ते झांकुनी नाश केला ॥ ४ ॥ करी प्रदक्षिणा गुरुगुह्याविण। व्यर्थ केला शीण वायांचि तो ॥५॥ वेळ चुकवुनी संध्या करी भलते वेळ। केलें अमंगळ ब्रह्मकर्म ॥६॥ फिरवितो मणी बुटबुटा ते होटें। अजब तो कोठें स्थान नेणे ॥ ७ ॥ नेणे तो आचार करी वेडेचार।

काय तो गव्हार संध्या जाणे ॥ ८ ॥ एका जनार्दनीं चूकविला नेम। काय पशु अधम जन्मा आले ॥९॥

२८१८ असोनि ब्राह्मण । न करी जो संध्यास्नान ॥ १ ॥ तो पातकी चांडाळ। अधम खळा हुनी खळ ॥ २ ॥ वेद मंत्र नये मुखा। सदा द्वेष निंदा देखा ॥ ३ ॥ नाहीं श्राद्धसंकल्प घरीं । हिंडे सदा दारोदारीं ॥ ४ ॥ हरिनामीं न बैसे चित्त। लोकां पुराण सांगत ॥ ५ ॥ ऐसे पामर अभागी । तयाचे दोष कोण भंगी ॥ ६ ॥ एका जनार्दनीं नाम । वाचे होउनी वदा निष्काम ॥ ७ ॥

२८१९ आम्ही ब्रह्मपुरींचे ब्राह्मण । यातिकुळ नाहीं लहान ॥ १ ॥ आम्हां सोंवळें वोवळें नाहीं । विटाळ न देखें कवणे ठायीं ॥ २ ॥ आम्हां सोयरे जे जाहले । ते यातिकुळा वेगळे केले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोधु । यातिकुळींचा फिटला संबंधू ॥ ४ ॥

२८२० उचित अनुचित कळे तुम्हां । सदैव निदैवा हांसती ॥ १ ॥ ऐशी राहे कर्मगती । वायां फजिती होते जगीं ॥ २ ॥ कर्म सोडिना या नरा। करी आयुष्याचा मातेरा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निजसार । कर्म हिंडवी गिरिगव्हार ॥ ४ ॥

२८२१ जें जें कर्म करावें या देहीं । भोगावें तेंहि देहादेह ॥ १ ॥ देहींचें कर्म देहींच भोगावें । वायां कां शिणावें हावभरी ॥ २ ॥ आपुलें संचित तैसा कर्मभोग। वाउगा उद्योग बोलून काय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कर्माची जे रेखा । न चुके सकळिकां भोग त्याचा ॥४॥

२८२२ विपरीत सुपरीत हा तो काळाचा विभाग । तेथें त्याग भोग करुनी काय ॥ १ ॥ होणार तें होतें आपुरें न चले कांहीं । वायां दुःख पाही मानूं नये ॥ २ ॥ जी जी संचितीं लिहिलीसे रेखा । ती तो ब्रह्मादिकां न चुकेची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वायां कां सायास । सुख दुःख लेश पूर्व कर्म ॥ ४ ॥

२८२३ सम आणि विषय हीं तों काळाचीं फळें । भोगिल्यावीण बळें न सुटती कधीं ॥ १ ॥ वाउगी कल्पना वाउगी कल्पना । वागविती मना परम मूर्ख ॥ २ ॥ उसनें आणितांना जीवा वाटे गोड । देतां तें लिगाड होय मग ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हाहि अनुभव । सुखदु खा ठाव याचपरी ॥ ४ ॥

२८२४ जो कनकबिजें भुलविला । तो गाये नाचे उडे भला ॥ १ ॥ शुद्धि नाहीं पा देहाची । सैरावैरा बोले वाचे ॥ २ ॥ देह अभिमानें उन्मत्त । अतिकामें कामासक्त ॥ ३ ॥ ज्यासी विष चढलें गहन । तया करविती विष्ठापान ॥ ४ ॥ एका जनार्दनीं वर्म । हारपे तेणें कर्माकर्म ॥ ५ ॥

२८२५ आतां धर्माधर्म विचार । तो ऐका सविस्तर ॥ १ ॥ शुद्र पतीत गृहींचें अन्न । एक रात्र पावन जाण ॥ २ ॥ व्याघ्र नख गज दंत । अपवित्र जंव स्नेहयुक्त ॥ ३ ॥ पटतंतू स्वयें पुनीत । वायुनें शुद्ध उर्णावस्त्र ॥ ४ ॥ गोक्षीर पवित्र कास्यपात्रीं । तेंचि अपवित्र ताम्रपात्रीं ॥ ५ ॥ घृत्त पवित्र अग्निसंस्कारीं । अग्नि पवित्र ब्राह्मणमंत्रीं ॥ ६ ॥ वेद पवित्र गुरुमुखें । गुरु पवित्र निजात्मसुखें ॥ ७ ॥ पृथ्वी पवित्र जळसंस्कारी । जळ पवित्र पृथ्वीवरी ॥ ८ ॥ व्याघ्राजिन मृगाजिन । हें स्वाभाविक पवित्र जाण ॥ ९ ॥ एका जनार्दनीं निर्धार । मुख्य पवित्रता अंतर ॥ १० ॥

२८२६ गंगोदक तें पवित्र । येर कडु अपवित्र ॥ १ ॥ दोन्ही उदकें तंव सारखीं । शुद्ध, अशुद्ध काय पारखीं ॥ २ ॥ गंगा देवापासून जाली । येर काय मध्यवर्ती केलीं ॥ ३ ॥ शुद्धाशुद्ध हे वासना । शरण एका जनार्दना ॥ ४ ॥

२८२७ वेदांत प्रतिपाद्य करावा हा धर्म । न करिता अधर्म सहज लागे ॥ १ ॥ मुख्य चारी वर्ण यांचा पैं धर्म । न करितां अधर्म सहज लागे ॥ २ ॥ जयां जे जे धर्म तयां तें तें कर्म । न करितां अधर्म सहज लागे ॥ ३ ॥ ब्राह्मणांचा धर्म संध्या षट्कर्म । न करितां अधर्म सहज लागे ॥ ४ ॥ शरणागताचें रक्षण क्षत्रियांचा धर्म । न करितां अधर्म सहज लागे ॥५॥ वैश्यांचा धर्म वेव्हारिक कर्म । न करितां अधर्म सहज लागे ॥ ६ ॥ शूद्रांचा धर्म सर्वभावें पूजन । एका जनार्दन तृप्त तेणें ॥ ७ ॥

२८२८ अधर्मे अदृष्टाचें चिन्ह । विपरीत वचन तें ऐका ॥ १ ॥ भांडारी ठेविला कापुर उडे । समुद्रामाजीं तारूं बुडे ॥ २ ॥ ठक येवोनि एकांतीं । मुलाम्याचें नाणें देती ॥ ३ ॥ परचक्र विरोध धाडी । खणीत लावुनीं तळघरें फोडी ॥ ४ ॥ पाणी भरे पेवा आंत । तेणें धान्य नासे समस्त ॥ ५ ॥ गोठण शेळ्या रोग पडे । निमती गाईम्हशींचे वाडे ॥ ६ ॥ भूमीक्षेप करूं जाती । तें आपुल्याकडे धुळी वोढिती

॥ ७ ॥ बुद्धि सांगे वाडोवाड । तेथानी तोंडीं घाला दगड ॥ ८ ॥ ऐशी कर्माची अधर्म स्थिती । एका जनार्दनी सोशी फाजिती ॥ ९ ॥

२८२९ फणस खातां लागे गोड । तेथे अधिक खाय तोंड ॥ १ ॥ सूर्या पूजितां पुण्य घडे । तेथें जें बेलपत्रीं चढे ॥ २ ॥ ऐसा कर्माकर्म विनाश । गुण तेचि होती दोष ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जाण । वायां दोषाचें हें चिन्ह ॥ ४ ॥

२८३० जेणें घेतलेंसे विख । तया सर्प लाविती देख ॥ १ ॥ जें केलें आपुलें आपण । तें भोगितां दुःख कोण ॥ २ ॥ एका जनार्दनीं कर्म । कर्मामाजीं घडे वर्म ॥ ३ ॥

२८३१ ज्यासी करणें चित्तशुद्धी । कर्मे आचरावीं आधीं ॥ १ ॥ तरीच होय मनःशुद्धी । सहज तुटती आधिव्याधी ॥ २ ॥ चित्ताची स्थिरता । होय उपासनें तत्त्वतां ॥ ३ ॥ चित्त झालीया निश्चळ । सहज राहील तळमळ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन । होय ब्रह्मरूप जाण ॥ ५ ॥

२८३२ जया करणें आतमहित । स्वधर्म आचारावा सतत ॥ १ ॥ कर्मे नित्य नैमित्तिक । ब्रह्मप्राप्तिलागीं देख ॥ २ ॥ तीवि नित्य आचरावीं । चित्तशुद्धि तेणें व्हावी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कर्म । ईशभक्तीचें हें वर्म ॥ ४ ॥

२८३३ आलिया द्विजासी द्यावें अन्नदान । नसतां अभ्युत्थान द्यावें त्यासी ॥ १ ॥ तेणें जोडे यज्ञ सर्व धर्म जाण । विन्मुख गेलिया पतन घडतसे ॥ २ ॥ एका जनार्दनीं घडतां नमस्कार । तेणें हरिहर संतोषती ॥ ३ ॥

२८३४ देवातळींचें वस्त्र तें म्हणती अपवित्र । उदकें भिजविले तें जालें पवित्र ॥ १ ॥ देवापरीस जळ सबळ केलें । ज्ञान तें दुर्बळ होउनी ठेलें ॥ २ ॥ नीचाचेनी स्पर्शें देवो विटाळला । प्राणीये प्रक्षाळुनी सोवळा केला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साच नाहीं भाव । संशयचीं देव नाहीं केला ॥ ४ ॥

२८३५ कर्म धर्म ऐसा आहे । ब्रह्मीं शोधूनियां पाहे ॥ १ ॥ स्नानें करावें तें कैसें । संध्या आपरूप असे ॥ २ ॥ कैसा आहे ब्रह्मयज्ञ । मन अर्जवा तें नमन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भजे । कर्म धर्म सहज बुझे ॥ ४ ॥

२८३६ विचारीं पां घडफुलें । देह तंव केवळ जडमूढें । कर्मबंधन तयाकडे । केवी लागे ॥ १ ॥ आत्मनी न रिघे कर्म । कर्म केवळ श्रम । थिल्लरी जेवीं सोम । मेळी कांपे । देह जगत्व न लगे देहीं । अथवान लगे आत्म्याच्या ठायीं । आतां कर्म तें मिथ्या पाहीं । भ्रमरूप ॥ ३ ॥ भ्रमरूप वाढवितां कर्मठपण । ठकलें सज्ञान जन । एका जनार्दनीं कर्म भ्रमण । बोळवण रया ॥ ४ ॥

२८३७ कर्म केवळ देहाच्या माथां । आत्मा देहीं असोनि विदेहता । शेखी म्हणती तत्त्वतां । कर्मे बांधला आत्मा ॥ १ ॥ आकाश जातां दळे । तैं कर्मी ब्रह्म आतळे । कर्म अकर्मा नातळे । परब्रह्म रया ॥ २ ॥ कर्माचें न कळे वर्म । तंव केवी फळे परब्रह्म । म्हणोनि न सोडीं श्रम । साधकासी ॥ ३ ॥ कर्माकर्म विवंचना । न कळे पैं सज्ञाना । एका शरण जनार्दना । परि तुझीच कल्पना रया ॥ ४ ॥

२८३८ कर्माच्या पोटीं भ्रम । कीं भ्रमाच्या पोटीं कर्म । हें दोहींचें न कळे वर्म । जाणत्यासी ॥ १ ॥ घटीं उदक भरिलें । तेणें घटकाश नव्हे वोलें । कर्मी ब्रह्म संचलें । कर्मातीत ॥ २ ॥ वाढवितां कर्मभ्रम । न कळे परब्रह्म । मीमांसक धर्म । अनिश्वर ॥ ३ ॥ कर्माची कर्मगती । न सोडी पुनरावृत्ति । निःशेष कर्म निश्चतीं । ब्रह्मप्राप्ती ॥ ४ ॥ निष्कर्मैं लभ्यते सिद्धी । हें कृष्णें उपदेशिलें कृपानिधी । तरी कर्माची कर्मवुद्धी । न सोडी आत्मा ॥ ५ ॥ कर्माचें निजकर्म । केवळ परब्रह्म । एका जनार्दनीं मिथ्या । कर्मश्रम ॥ ६ ॥

२८३९ करूं आतां निजकर्म । कर्मक्रिया अति दुर्गम ॥ १ ॥ कर्म केवळ देहाचे माथां । आत्मा देहीं विदेहता ॥ २ ॥ कर्म अकर्माचें सांकडे । कांहीं न घडे आत्म्याकडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कर्म । देहाचे देहीं परब्रह्म ॥ ४ ॥

२८४० उदयो अस्तु मावळलें भान । कर्माकर्मी सहज समाधान ॥ १ ॥ कर्म तें गेलें करणें हारपलें । सहजीं पारुषले धर्माधर्म ॥ २ ॥ उदयो अस्तुभान न देखे समाधान । अवघा जनार्दन वर्नीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपणें कर्म । देहींच देहधर्म एकरूप ॥ ४ ॥

२८४१ वेदवाणी देवें केली । येर काय चोरापासून झाली ॥ १ ॥ सकळ वाचा वदवी देव । कां वाढावा अहंभाव ॥ २ ॥ ज्या ज्या वाणीं स्तुती केली । ते ती

देवासी पावली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मातु । वाचा वाचक जगन्नाथु ॥ ४ ॥

२८४२ आब्रह्म भुवन एक । तर्पन जाहलें ऐक्य ॥१॥ कैसा होता हे ब्रह्मयज्ञ । ब्रह्मदृष्टीं ब्रह्मार्पण ॥ २ ॥ सव्य अपसव्य न लगे जाण । तितरापितर जनार्दन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तिलोदक । ब्रह्मरूप तिन्ही लोक ॥ ४ ॥

२८४३ कर्म करितां फलाशा वाढे । तें तें फल भोगणें घडे ॥ १ ॥ कर्म करितां फळ बाधक । न करितां प्राप्त नरक ॥ २ ॥ ऐशी कर्माची रहाटी । सदैव देखे उफराटी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कर्म । तेथें कैचा भवभ्रम ॥ ४ ॥

२८४४ कर्म करितां कांहीं न कळे विचार । परी द्वेषाद्वेषा संचार होतां असे ॥१॥ राजस तामस सात्विक तें देखा । उपाधी ते देखा मूळ जाणा ॥२॥ यथाविधी कर्म न घडे निश्चयें । उणें पडतां जाय पतनासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम मुखीं गातां । सर्व कर्म तत्वतां घडतीं सांग ॥४ ॥

२८४५ नाना कर्मांचिया लागतां पाठीं । भ्रमचि जगा होय शेवटीं ॥ १ ॥ नोहे कर्म यथासांग । वाउगाचि मग श्रम होय ॥ २ ॥ जाय तळा येत वरी । बुडक्या परि बुडतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । कर्म न करूं आम्हीं जाण ॥ ४ ॥

२८४६ संध्यावंदनीं प्रणव जपावा । वाच्य वाचकु प्रणव अवघा ॥ १ ॥ कैसी साधिली संधी । देहीं हारपलीं देहबुद्धी ॥ २ ॥ छंद ऋषिमंत्र उच्चार । तीं अक्षरीं झालें अक्षर ॥ ३ ॥ जपी जपमाळा मौनी । संध्या साधिली निज समाधानी ॥ ४ ॥ सायं प्रातः माध्यान्हीक । तिहीं संधीं निःसंदेह एक ॥ ५ ॥ काळें काळ तीन चुळा पाणी । संध्या साधिली एका जनार्दनीं ॥ ६ ॥

२८४७ कर्म करिसी तरी कर्माचि होसी । परि निष्कर्म नसतां कर्मामाजीं ॥ १ ॥ ब्रह्मालागीं कर्म सांडणें हें कूडें । पाय सांडोनि पुढें चालुं पहासी ॥ २ ॥ डोळ्याची नव्हाळी घेवों जातां करतळीं । पाहों जातां मुळीं पहाणीच नाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सर्व कर्म पाहीं । सांडी मांडी नाहीं तये ठायीं ॥४॥

२८४८ कर्मक्रिया जेणें कळे । तोचि कर्मी कां ना कळे ॥१॥ काय करुनी कर्म सकळ । हरिप्राप्तीवीण निर्फळ ॥ २ ॥ ब्रह्मप्रतीति नाहीं । तरी त्या कर्म केलें काहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कर्म । कर्मी पाहे परब्रह्म ॥ ४ ॥

२८४९ कोटि जन्म आम्हां करूं हरिकथा । कर्मकांड माथां धरूनियां ॥ १ ॥ ऐहिकादि कर्मे करुनी सर्वदा । भजो जी गोविंदा निरंतर ॥ २ ॥ यजन याजन करुनी अग्निहोत्र । पूजोनि पवित्र द्वीजवर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कर्म ब्रह्म एक । वेदांतीं विवेक बोलियेला ॥ ४ ॥

२८५० मर्दुनी शंखासुरा हातें वागवीसी कलीवरा । तेवीं निवटोनि अहंकारा माझ्या वागविशी शरीरा ॥ १ ॥ येथें नवल नव्हे पहा हो । माझा देहचि वागवी देवो ॥ २ ॥ शंख वाजविशी नाना स्वरा । तें तंव न बाधी शंखासुरा ॥ ३ ॥ तैसी चेतउनी माझी गिरा । बोली बोलविता तूं खरा ॥ ४ ॥ कर्म कार्य कर्तव्यता । माझेंनि नांवें तूंचि आतां ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निजात्मता । कर्म करून नित्य अकर्ता ॥६॥

२८५१ जाणतेपणें विधिनिषेध पोटीं । अज्ञान तें दृष्टी पळे दूर ॥ १ ॥ अज्ञान बरवें अज्ञान बरवें । सज्ञान तें हावें बुडोनि जाय ॥ २ ॥ अज्ञान ज्ञान होतसे आपण । सज्ञानें मीतूंपण घडतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अज्ञानची बरा । सज्ञानाचा वारा नको मज ॥ ४ ॥

२८५२ आम्हां विधिनिषेधाचें नाहीं पैं कारण । नाम मुखीं स्मरण गोविंदाचें ॥ १ ॥ घडेल ते घडो जोडेल तें जोडो । आम्ही तो न सोडो रामकृष्ण ॥२॥ शरीर पतन घडे अनायासें । काय तें सायासें जतनेची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं श्रीरामावांचुनी । दुजा छंद मनी हा न वाहे ॥ ४ ॥

२८५३ विधीनिषेध कवणेपरी । कार्या कारण ते परी ॥ १ ॥ नाम जपतां सादर । निधीनिषेध पळे दूर ॥ २ ॥ व्रत करा एकादशी । कंठी मिरवा तुळशी ॥ ३ ॥ करा घोष हरिकथा । विधीनिषेध वंदील माथा ॥ ४ ॥ एकपणें जनार्दनें । एका विधीनिषेध नेणें ॥ ५ ॥

२८५४ काय जाणों विधी । निषेधाचे ते बुद्धी ॥१॥ आम्ही गाऊं नाम मुखें । नाचुं सुखें कीर्तनीं ॥ २ ॥ न पडो भलतिया भरी । वाचें म्हणों हरि हरि ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । विधीनिषेध गेला पूर्ण ॥ ४ ॥

२८५५ विधीनिषेध धरितां मनीं । सहजीं कार्य होय हानी ॥ १ ॥ जे जे वेळ जे जे घडे । विधीनिषेध सर्व जोडे ॥ २ ॥ अन्य नाहीं विचारणा । कार्या कारण सर्व जाणां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खूण । जाणते ते परिपूर्ण ॥ ४ ॥

२८५६ पूजा यथासांग संपूर्ण । न घडे तरी संतपूजन ॥ १ ॥ करितां ऐसा संकल्प । तेणें जोडे महातप ॥ २ ॥ ध्यानीं ध्यातां संतचरण । होईल मना समाधान ॥ ३ ॥ ऐसा पूजेचा सोहळा । एका जनार्दनीं पाहे डोळां ॥ ४ ॥

२८५७ पूजा करूं तरी पूजे नाहीं ठाव । भाव धरूं तरी देवचि देव ॥ १ ॥ करूं तरी पूजा कवणाची सांगा । देवावीण जागा रिती कोण ॥ २ ॥ एका जनार्दनीं पूजेसी नाहीं ठाव । अवघा व्यापला देवाधिदेव ॥ ३ ॥

२८५८ पूजेचे प्रकार असती सोळा बारा । ते मी दातारा नेणें कांहीं ॥१॥ म्हणवितों दास मनीं धरूनि आस । धरिलीसे कास जनार्दना ॥ २ ॥ सायास संकट न करी व्रताचार । गाईन निरंतर जनार्दनु ॥३॥ एका जनार्दनीं शरण मनें वाचे । तया पूजनाचें सुख होय ॥ ४ ॥

२८५९ पूजा करूं कैशी देवा । वाचे आठवूं केशवा ॥ १ ॥ हेचि माझी पूजाविधी । सर्व टाकिली उपाधी ॥ २ ॥ घालूनि निर्मळ आसन । पुजूं संतांचे चरण ॥ ३ ॥ दृढ करूं भाव साचा । सदा छंद रामनामाचा ॥४॥ एका जनार्दनीं पूजा । सर्व भावें गरुडध्वजा ॥५॥

२८६० देव पूजे ठेवितां भावो । तो स्वयेंची जाला देवो ॥ १ ॥ आतां कैसेनी पुजुं देवा । माझी मज होतसे सेवा ॥ २ ॥ अन्न गंध धूप दीप । तेहि माझेंचि स्वरूप ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करी पूजा । तेथें पूज्य पूजकु नाहीं दुजा ॥ ४ ॥

२८६१ पूजन तो एक पुरे । वाचे स्मरे रामनाम ॥ १ ॥ नको गंधाक्षता तुळशी । मुखीं नाम अहर्निशीं ॥ २ ॥ धूप दीप नैवेद्य तांबुल । सदा वाचे नाम बोल ॥ ३ ॥ आर्ती धुपार्ती अक्षता । राम गाऊं निःसीमता ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । सहज पूजा घडे जाण ॥ ५ ॥

२८६२ सहजाची पूजा पुरे । श्रम वाउगाची नुरे ॥१॥ आठवीन वेळोवेळां । केशवा माधवा गोपाळा ॥ २ ॥ मंत्रस्नान विभुती । मुखीं राम जपविती ॥ ३ ॥ नाहीं आणीक काम । वाचे म्हणे रामनाम ॥ ४ ॥ एका जनार्दनीं बरवी । पूजा करीन देवदेवीं ॥ ५ ॥

२८६३ देवाचें पूजन । घडतां रामस्मरण ॥ १ ॥ हेंचि एक पूजा सार । वायां कासया पसार ॥ २ ॥ करूं बैसे देवपूजे । मनीं भाव आन दुजे ॥ ३ ॥ ऐसें पुजेचें लक्षण । सांगे एका जनार्दन ॥ ४ ॥

२८६४ बरवी ती पूजा । जेणें पावे अधोक्षजा ॥१॥ मुखीं नाम वाहे टाळी । पूजा केली उत्तम हे ॥ २ ॥ तुळशीमाळा गोपिचंद । पूजा छंद हाचि मनीं ॥ ३ ॥ व्रत करी एकादशी । जाग्रण निशीं सर्वदा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तुष्ट देव । पूजा भाव तेणें पावे ॥ ५ ॥

२८६५ देवपूजा करी आदरें । अतीत आलिया न बोले सामोरें ॥ १ ॥ कासया पूजन दांभीक । तेणें देवा नोहे सुख ॥ २ ॥ अतिथासी देणें पूजा । तेणें संतोषें पावे पूजा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पूजा । ऐसी न करी गरुडध्वजा ॥ ४ ॥

२८६६ डोळियानें रूप पाहावें साचार । मुखानें उच्चार रामनाम ॥ १ ॥ ह्रदयी आठव नाम तें वसावें । करें पै अर्चावे संतचरण ॥ २ ॥ पदें प्रदक्षिणा करा तीर्थाटण । हेंची पै कारण पूजनाचे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐशी करा पूजा । तेणें गुरुराजा तोष पावे ॥ ४ ॥

२८६७ जीव शिव दोन्ही एकचि आसनीं । पूजी अवसानीं सर्वकाळ ॥ १ ॥ कामक्रोध यांचा मानुनी विटाळ । पूजन सर्वकाळ बरें होय ॥ २ ॥ परद्रव्य परस्त्री येथें आसक्त नोहे मन । तेणें जनार्दन पूजा पावे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ममता टाकुनी । संतांचें चरणीं पूजन करी ॥ ४ ॥

२८६८ आपुली पूजा आपण करावी । ही जंव ठावी राहाटी नाहीं ॥ १ ॥ कासया ती पूजा जाणिवेचा शीण । त्याहुनि अज्ञान बरें दिसे ॥ २ ॥ एका जनार्दनीं ज्ञानाज्ञानें । पूजावे श्रीचरण विठोबाचे ॥ ३ ॥

२८६९ नाना तें चरित्र श्रीहरीचें वाचें । आठवावें साचें अघहरणा ॥ १ ॥ केशव माधव अच्युत गोपाळ । गोविंद गोकुळपाळ वाचे वदा ॥ २ ॥ वामन श्रीरामकृष्णातें आठवा । ह्रदयीं सांठवा वेळोवेळां ॥३॥ एका जनार्दनीं ऐसा जया हेत । तो वसे अगांत जगरुप ॥ ४ ॥

२८७० हृदयींच स्नान हृदयींच ध्यान। हृदयींच भजन सर्वकाळ ॥ १ ॥ हृदयींच दान हृदयींच धर्म । हृदयींच नेम सर्व जोडे ॥ २ ॥ हृदयींच कथा पुराण श्रवण । हृदयींच चिंतन सर्व सदा ॥ ३ ॥ हृदयींच दिसे एका जनार्दनीं । हृदयींच एकपणीं बिंबलासे ॥ ४ ॥

२८७१ हृदयींच देव हृदयींच भक्त । हृदयींच होत पूजा सर्व ॥ १ ॥ हृदयींच ध्यान हृदयीं जें मन । हृदयीं तें आसन देव वसे ॥ २ ॥ हृदयीं तें भुक्ति हृदयीं ते मुक्ति । हृदयीं सर्वस्थिति देव जाणो ॥३॥ एका जनार्दनीं हृदयींच पाहाल । तें सुख घ्याल हृदयामाजीं ॥ ४ ॥

२८७२ हृदयस्थ जया नाहीं ठावा देव । पूजा करती वाव सर्वभावें ॥ १ ॥ जाणावा अंतरीं मानावा हृदयीं । पहावा सर्वांतरी परमात्मा ॥ २ ॥ एका जनार्दनीं व्यापक सर्वां ठायीं । भरूनि उरला ठायीं जेथें तेथें ॥ ३ ॥

२८७३ देवासी तो पुरे एक प्रेमभाव । पूजा अर्चा वाव सर्व जाणा ॥ १ ॥ मनापासूनियां करितां कीर्तन । आनंदे नर्तन गातां गीत ॥ २ ॥ रामकृष्ण-हरि उच्चार सर्वदा । कळिकाळ बाधा तेणें नोहे ॥३॥ एका जनार्दनीं हाचि पैं विश्वास । सर्वभावें दास होईन त्याचा ॥ ४ ॥

२८७४ सप्रेमें करितां भजन । तेणें घडती कोटी यज्ञ ॥१॥ प्रेम सार प्रेम सार। वायां भार कुंथेचा ॥२॥ प्रेमेंवीण न भेटे देवो । अवघा वावो पसारा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रेम सार। तुटे येरझार येणें जाणें ॥४॥

२८७५ ब्रह्मांडाची दोरी । हालवी जो एक्या करीं ॥ १ ॥ भूतां परस्परें मैत्री । ती एके ठायीं असती बरी ॥ २ ॥ पंच प्रणांचें जें स्थान । तये कमळी अधिष्ठान ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सूत्रधारी । बाहुली नाचवी नानापरी ॥ ४ ॥

२८७६ मिथ्या मायेच्या धाकासाठीं । योगीं रिगाले कपटी ॥ १ ॥ आसन घालूनियां जाण । आकळिती पंचप्राण ॥ २ ॥ क्षुधेनें खादली भूक । तृषा तहान प्याली देख ॥ ३ ॥ बुद्धि सुबुद्धि धरूनि हातीं । आकळितसे इंद्रियवृत्ती ॥ ४ ॥ शांतीचेनि बळें । संकल्प त्यागिले सकळ ॥ ५ ॥ ऐसी योगाची कहाणी । शरण एका जनार्दनीं ॥ ६ ॥



२८७७ प्राणापानांची मिळणी । शक्ती चेतवी कुंडलिनी ॥ १ ॥ ती आधार शक्ति अचाट । चढे पश्चिमेचा घांट ॥ २ ॥ कुडलिनी चालतां वाटा । चुकल्या आधिव्याधीच्या हाटा ॥ ३ ॥ साधितां उल्हाट शक्ति उलट । उघडले ब्रह्मरंध्रांचें कपाट ॥ ३ ॥ शरिराकारें ते वोतिली । एका जनार्दनीं पुतळीं ॥ ५ ॥

२८७८ समुद्र क्षोभे वेळोवेळीं । योगिया क्षोभेना कोण्हे काळीं ॥ १ ॥ समुद्रा भरतें पर्वसंबंधें । योगी परिपूर्ण परमानंदें ॥ २ ॥ समुद्र सर्वदा तो क्षार । तैसा नव्हे योगीश्वर ॥ ३ ॥ समुद्रीं वरुषतां घन । जीवनीं मिळतसे जीवन ॥ ४ ॥ योगियांची योगस्थिती । सदा परमार्थ भक्ती ॥ ५ ॥ एका जनार्दनीं शरण । योगियांचें जें योग चिन्ह ॥ ६ ॥

२८७९ सर्प बिळामार्जी रिगे । हें तों देखती सवेगें ॥ १ ॥ तैसा योगियांचा योग । सर्पापरी भूमी व्यंग ॥ २ ॥ दावितां आचारू । हांसताती लहान थोरू ॥ ३ ॥ म्हणती एक कर्मठ । एक म्हणता योगभ्रष्ट ॥ ४ ॥ एक निंदिती वंदिती । ऐशी आहे योगस्थिती ॥ ५ ॥ यापरीस उत्तम साधन । एका जनार्दनीं शरण ॥ ६ ॥

२८८० प्राणरक्षणापुरतें । योगि मागती भिक्षेतें ॥१॥ तैसा साधावा हा योग । जेणें साधे अंतरंग ॥ २ ॥ रिघोनि कमळिणीपाशीं । भ्रमर लोधे आमोदासी ॥३॥ कोरडें काष्ठ भेदूनि जाय । तो कमळदळीं गुंतोनि राहे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं योग । ऐसा साधावा अनुराग ॥ ५ ॥

२८८१ चार मुद्रा आणि समाधी त्या चारी । दिसती चक्राकारी स्वरूप हें ॥ १ ॥ चहूं समाधींचें पाहीं हें देखणें । विकळता तेणें सहजीं व्हावी ॥ २ ॥ जिकडे पाहतां तिकडे स्वरूपचि दिसे । तयामाजीं ठसे आणिक बिंब ॥ ३ ॥ मसूरप्रमाण शून्य महा तें कारण । गुरुमुखें खूण जाणावी पैं ॥ ४ ॥ साचार स्वरूपाची मेळवणी केली । परात्पर ठेली हेचि ज्योति ॥ ५ ॥ त्याच वस्तूसाठीं भांडतीं पुराणें । वेदशास्त्रें तेथें मौनावलीं ॥ ६ ॥ गुह्य हें पंचक देखोनि समाधी । बोलोनियां वेदीं निश्चयो केला ॥ ७ ॥ एका जनार्दनीं स्वरूप उरलें पाहीं । द्वैत गेलें पायीं सद्गुरुच्या ॥ ८ ॥

२८८२ कैसें झालें देवदर्शन । देवा पाहातां आहे कोण ॥ १ ॥ डोळा उघडोनियां पाहे । पैल देव

दिसताहे ॥ २ ॥ पैल देव तो मी भक्त । दोहींसी कोण आहे देखत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहे । पाहणें पाहतां देवचि आहे ॥ ४ ॥

२८८३ दुबार बाहुली वस्तुरूप झाली । पाहतां सोहं मेळी चिदानंद ॥ १ ॥ अर्धमात्रा स्थान नयनींच प्रमाण । मसुरेसमान हा वर्ण जेथें ॥२॥ सुषुम्ना कुंडलिनी कासीया सांगातिनी । निश्चितीं तें नयनीं बिंदुरूप ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहे डोळियांभीतरीं । सबाह्य अभ्यंतरी तरीच दिसे ॥ ४ ॥

२८८४ स्वहिताकारणें विचार न कळे । संध्येचे हे मुळ आम्हीं जाणो ॥१॥ अर्ध बिंबी सूर्य धरूं माध्यान्हासी । अस्तु जातां त्यासी अर्घ्य देतो ॥ २ ॥ नासिकेचें अग्र सुषुम्ना विंदान । करी प्राणायाम वेगळाची ॥ ३ ॥ साही चक्र जप वर्णदळी संकल्प । पूजा तर्पणयुक्त मंत्र सहज ॥ ४ ॥ त्रिपुटीपासोनि डोळियां वंदन । रक्त श्वेत गुण पीत भासे ॥ ५ ॥ अर्धा कीं पाहे अणुरेणु सरी । गगन शून्याकारी विखुरलें ॥६॥ निराजली संध्यां बैसली जे बाळा । चंद्र सूर्य कळा लाजविल्या ॥ ७ ॥ हृदयापासोनि नाभीचा नेट । मनीं बळकट पुष्टी व्हावी ॥ ८ ॥ मूळ बंधापासूनि दिघली आटणी । हृदयीं कुंडलिनी सिद्धसंघ ॥९॥ दाही दिशा करी प्रदक्षिणा वेडा । गगनी बीज सडा माज विलें ॥ १० ॥ एका जनार्दनीं संध्या हेचि रिती । सहस्त्रदळी ज्योति निजबिंदु ॥ ११ ॥

२८८५ विधियुक्त नोहे संध्यास्नान । तेणें घडे पतन कल्पकोटी ॥ १ ॥ रेचक पूरक कुंभक त्राहाटक । प्राणायाम देख न साधेची ॥ २ ॥ मूळ मंत्र न्यास विधि बीज । न घडतां सहज दोष लागे ॥३॥ हृदय कवच शिखा शिरीं । नेत्र अस्त्रादीक फटकारीन साचे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं यातायाती । पुढें फजिती जन्मोजन्मीं ॥ ५ ॥

२८८६ निर्लज्ज होऊनि नाचे महाद्वारीं । वाचे वदे हरि सर्वकाळ ॥ १ ॥ व्रत करी सदा नामाचे पारणें । अखंड ते पेणें रामकृष्ण ॥२॥ पंढरीची वारी घडे सर्व काळ । किर्तनकल्लोळ मुखीं सदा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भजनी सादर । सर्व वेरझार खुंटे त्याची ॥ ४ ॥

## जनांस उपदेश.

### देह.

२८८७ मिथ्या भूतकाया मिथ्या भूतमाया । मिथ्या भूतछाया जेवी वसे ॥ १ ॥ मिथ्याभूत नाशिवंत जाण । मिथ्या भूतभान सर्व दिसे ॥ २ ॥ मिथ्या भूत जन मिथ्या भूत वन । एका जनार्दन शरण वेगीं ॥ ३ ॥

२८८८ नाशिवंत धन नाशिवंत मान । नाशिवंत जाण काया सर्व ॥ १ ॥ नाशिवंत देह नाशिवंत संसार । नाशिवंत विचार न करिती ॥२॥ नाशिवंत स्त्रीपुत्रादिक बाळें । नाशिवंत बळें गळां पडती ॥३॥ एका जनार्दनीं सर्व नाशिवंत । एकाचि शाश्वत हरिनाम ॥ ४ ॥

२८८९ नाशिवंत देह जाणार जाणार । हा तो निराधार स्वप्नवत ॥ १ ॥ अभ्रींची छाया क्षणिक साचार । तैसा हा प्रकार नाशिवंत ॥ २ ॥ मृगजळाचें जीवन क्षणीक निर्धार । तैसा हा विचार व्यर्थ सर्व ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाशिवंतासाठीं । केवढी आटाआटी प्राणी करिती ॥ ४ ॥

२८९० रडती रांडापोरे नाशिवंतासाठीं । केवढी आटाआटी जीवी होसी ॥ १ ॥ कुडीसी मरण न कळेचि जाण । आत्मा अविनाश परिपूर्ण स्वयंज्योती ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाथिलाची भास । विठ्ठलनामें सौरस न घे कोणी ॥ ३ ॥

२८९१ भांबावले जन म्हणती माझें माझें । वाउगेची वोझें वहाताती ॥ १ ॥ खराचिये परी उकिरडा सेविती । नोहे तयां गती अधम जाणा ॥ २ ॥ स्तंभ असोनियां चोर म्हणती आला । नसोनि प्रपंच खरा भासिला ॥ ३ ॥ मृगजळवत जाणार सर्व । अभ्रींचें सावेव वायां जैसें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं धरी का रे सोय । पुनरपि नये गर्भवासा ॥ ५ ॥

२८९२ पांचाजणांचें । आणिलें जायाचें । मिरवण तयाचें । कोण सुख ॥ १ ॥ नवल विस्मयो कैसा । देखत देखत झांसा । मृगजळाची आशा । केवीं आहे ॥ २ ॥ आतां नेती मग नेती । ज्याचे ते घेउनी जाती । मूढ जन म्हणती माझें माझें ॥३॥ स्वप्नींचें निज भोज । कोल्हार मंडपींचें चोज । गंधर्व नगरी राज्य । केवी घडे ॥ ४ ॥ ऐसें जाणोनी अरे जना ।

भुललासी अज्ञाना । मी माझी कल्पना । करिसी वायां ॥५॥ एका जनार्दनीं हरी । व्यापक तो चराचरीं । तोची एक निर्धारीं । वाउगे येर ॥ ६ ॥

२८९३ फूल झडे तंव फळ सोसे । तया पाठीं तेंहि नासे ॥ १ ॥ एक मागें एक पुढें । मरण विसरलें बापुडें ॥ २ ॥ शेजारीं निमाले कोणाचे खांदीं । लपों गेला सापें खादली मांदी ॥ ३ ॥ मरण ऐकतां परता पळे । पळे तोहि मसणीं जळे ॥ ४ ॥ प्रेत देखोनी ओझ्याच्या जाती । ओझें म्हणती तेहि मरती ॥ ५ ॥ मरण म्हणतां थूं थूं म्हणती । थुंकते तोंडें मसणीं जळती ॥ ६ ॥ पळेना चळे तोचि सांपडे । जाणतां जाणतां होताती वेडे ॥ ७ ॥ एका जनार्दनीं शरण । काळ वेळ तेथें न रिघे मरण ॥ ८ ॥

२८९४ त्रिगुणात्मक देह पंचभूतीं खेळ । शेवटीं निर्फळ होईल रया ॥ १ ॥ दिसती भूताकृति वाउगी ते मिथ्या । शेवटीं तत्त्वतां कांहीं नुरे ॥ २ ॥ पंचभूतें विरती ठायींचे ठायीं । वायां देहादेहीं बद्धमुक्त ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाथिलाचि खेळ । अवघा मायाजाळ जाईल लया ॥ ४ ॥

२८९५ गर्भवासींचें दुःख सांगतां अटक । मळमूत्र दाथरीं जननी जठरीं अधोमुख ॥ १ ॥ शिव शिव सोहं सोहं । कोहं सोहं सांडुनि पाहे निजजीवन ॥२॥ गर्भवासीचें सांकडे सांगावें कवणापुढें । सर्वांगीं विष्ठालेपु नाकीं तोंडीं किडे ॥३॥ एका जनार्दनीं भेटी तैं जन्ममरणा तुटी । जननी पयपान पुढती न करणें गोष्टी ॥ ४ ॥

२८९६ उगम संगम प्रवाह गती । ऐशी त्रिविध देहस्थिती ॥ १ ॥ बाळत्व तारुण्य वृद्धत्व । ऐसें देहाचें त्रिविधत्व ॥ २ ॥ जरामरण नाश पावे । ऐसा देह व्यर्थ जाये ॥३॥ ऐसियाचा भरंवसा । एका जनार्दनीं ठसा ॥ ४ ॥

२८९७ एक एक योनी कोटी कोटी फेरा । नरदेह थारा अवचटा ॥ १ ॥ मांडिलासे खेळ मांडिलासे खेळ । मांडिलासे खेळ नरदेहीं ॥ २ ॥ स्त्री पुत्र नातु बाहुले असती । नाचविती पती त्रैलोक्याचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मांडियेला खेळ । त्रैलोक्य सकळ बाहुलें त्याचें ॥ ४ ॥

२८९८ चौऱ्यांयशी लक्ष योनी फिरतां । अवचट नरदेह आला हातां ॥ १ ॥ करीं याचें समाधान । वाचे गाई नारायण ॥ २ ॥ सोडवितां तुज कोणी । नाहीं नाहीं त्रिभुवनीं ॥ ३ ॥ भुलूं नको जाशी वायां । एका जनार्दनीं लागे पायां ॥ ४ ॥

२८९९ कोटी कोटी फेरे घेऊनि आलासी । अद्यापि पडसी गर्तें रया ॥ १ ॥ कोण तुज सोडी कोण तुज सोडी । पडेल जेव्हां बेडी पायीं रया ॥ २ ॥ हाणिती मारिती निष्ठुर ते दूत । विचकूनियां दांत पडसी रया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मागील आठव । कांहीं तरी भेव धरी रया ॥ ४ ॥

२९०० ऐसे वेरझारी कोटी कोटी फेरा । परि त्या पामरा समजेना ॥ १ ॥ माझें माझें म्हणोनि झोंबतसे बळे । केलेसे वाटोळें नरदेहा ॥ २ ॥ फजितीचा जन्म मरावें जन्मावें । हें किती सांगावें मूढ जनां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं माझें माझें टाकुनी । वैष्णव कीर्तनीं नाचे सुखें ॥ ४ ॥

२९०१ किती किती जन्म किती किती फेरे । किती किती अघोरें भोगिताती ॥ १ ॥ न सुटे न सुटे न सुटे बंधन । याची आठवण धरा चित्तीं ॥ २ ॥ किती किती विषय भोगिती वासना । यमाचे सदना जावयासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न करीं विचार । नरक तो अघोर भोगिताती ॥ ४ ॥

२९०२ इकडुनि तिकडे चालू जैसें माप । तैशी जन्ममरण खेप प्राणियासी ॥ १ ॥ भोगितां नूतन सांडिती ते जाण । तैसें जन्ममरण प्राणियांसी ॥ २ ॥ पुष्पांचा परिमळ घेऊनि सांडिती जाण । तैसे जन्म-मरण प्राणियांसी ॥ ३ ॥ देह धरूनी आला न करी स्वहित । करी अपघात आपणासी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दोषी तोचि जाणा । न भजे चरणा संताचिया ॥५॥

२९०३ मरणापाठीं जन्म जन्मापाठीं मरण । ही शिदोरी जाण पडलीं पदरीं ॥ १ ॥ शतवर्ष कराल घेतां वाटे गोड । कर्माकर्म सुघड न कळे कांहीं ॥२॥ मरणार्ची भ्रांती विसरूनी गूढ । वागवी कावाड प्रपंचाचें ॥ ३ ॥ बाळ तरुण दशा वृद्धाप्य पावला । सर्वेचि तो गेला अधोगती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मापाचिये परी । सर्वेचि गोणी भरी सर्व रीती ॥ ५ ॥

२९०४ माझें माझें म्हणोनी करितोसी कष्ट । उडाला तो हंस राहिलें फलकट ॥ १ ॥ तनांचे बुजगवणे तैशी देहस्थिती । चिता अग्नि उजळोनि मिळे मातीसी माती ॥ २ ॥ स्वजन सगोत्र सोर करती विचार ।

काढा काढा म्हणती जाला भूमीभार ॥ ३ ॥ देहाची जनके केवळ मातापिता। गेला गेला म्हणती तोचि देह असतां ॥ ४ ॥ अष्टही प्रहर भोगी देह गेह वित्त। सेजेची भार्या पळ म्हणे भूतभूत ॥ ५ ॥ यापरी जाणोनी सांडी देहाची खंती। एका जनार्दनीं राहिला विदेह स्थिती ॥ ६ ॥

२९०५ आयुष्य भविष्य हें तंव कवणा 'हातीं। वायांची वहाती कुंथाकुंथी ॥ १ ॥ आयुष्याचा अंत आलिया जवळी। कोण तया वेळीं सांभाळींत ॥२॥ गुंतुनी संसारीं पडती अघोरीं। न चुकेची फेरी येतां जातां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतकृपेवीण। कोण वारी शीण जन्ममृत्यु ॥ ४ ॥

२९०६ नरदेहीं आयुष्य शत तें प्रमाण। अर्धरात्र जाण जाय मध्यें ॥ १ ॥ बाळत्व तारुण्य जरामय जाणा। संपलें गणना हाती त्याची ॥ २ ॥ एका जनार्दनीं राहिलें भजन। सर्वांचि मरण पावला वेगीं ॥ ३ ॥

२९०७ शत वरुषांची घेऊनी आला चिठ्ठी। अर्ध रात्रीं खादलें उठाउठी ॥ १ ॥ केव्हां जपशील रामनाम वाचे। आयुष्य सरलीया पडतील यमफांसे ॥ २ ॥ अज्ञानतत्व गेलें वरुषें बारा। खेळतसे विटीदांडु भोंवरा ॥ ३ ॥ उपरी तारुण्य मदाचा ताठा। करी बैसोनी विषयाच्या चेष्टा ॥ ४ ॥ ऐशी पन्नास वर्षे गेलीं भरोभरी। एका जनार्दनीं पडला चौऱ्यांशीचे फेरीं ॥ ५ ॥

२९०८ शत वर्षांचा कऊल घेऊनी। आलासी योनीं नरदेहा ॥ १ ॥ गर्भ जठरीं सोहं सोहं। जन्मतांची म्हणसी कोहं कोहं ॥ २ ॥ ऐसा ठकडा पापिष्ठा। पुढें करिसी विषयचेष्टा ॥ ३ ॥ बाल तारुण्य गेलें। पुढें वृद्धाप्य वयाहि आलें ॥ ४ ॥ नाहीं घडलें कीर्तन। तो पुढें आले मरण ॥ ५ ॥ घेऊनी जाती यमदूत। कुंभपाकीं तुज घालीत ॥ ६ ॥ नाना यातना ते करिती। अग्निस्तंभा भेटविती ॥ ७ ॥ तेथें कोण सोडी तुज। आतां म्हणसी माझें माझें ॥ ८ ॥ ऐसा भुलला गव्हार। भोगी चौऱ्यांशीचा फेर ॥ ९ ॥ फेरे फिरुनी नरदेहीं आला। एका जनार्दनीं वायां गेला ॥ १० ॥

२९०९ येती नरदेहा गमाविती आयुष्य। प्रथम बाळदशेस भोगिताती ॥ १ ॥ वाचा नाहीं तया रडे आक्रंदोनी। जननी तो स्तनीं लावी बळें ॥ २ ॥ क्षुधा लागलीया औषध पाजिती। उदर दुखतां देती स्तन बळें ॥ ३ ॥ संपतां द्वादश जालासे शहाणा। करूनि अंगना वेगीं देती ॥ ४ ॥ विषयाचें बळे मातलासे सर्व। सदा धुस् धुस् दर्प अंगीं वसे ॥ ५ ॥ सरलीया तारुण्य आला वृद्ध दशे। भोगितसे क्लेश नाना व्याधी ॥ ६ ॥ रामनाम वाचें सदा आठवणी नाहीं। धन दारा पुत्र पाही माझें माझें ॥ ७ ॥ शेवटील घडी परिपूर्ण भरली। माती जड झाली पापिष्टाची ॥ ८ ॥ येउनि यमदूत नेताती बांधून। नानापरी ताडन करिताती ॥९॥ यातना ती सर्व भोगुनि ढकलीती। पुनरपी येती गर्भवासा ॥ १० ॥ चौऱ्यांयशीं लक्ष योनी फिरतां फिरतां। एका जनार्दनीं तत्त्वतां नरदेह ॥ ११ ॥

२९१० जंव देहातें देखती तंव माझें म्हणती। निमालियां रांडा पोरें रडती ॥ १ ॥ पहा कैसा अनुभव लौकिकाचा। देह निमाला कीं न कळे साचा ॥२॥ जीव आत्मा न मरे कोणे काळीं। निमाला देह चतुष्टयाची होळी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देहा देखती मरण। गेला आला नाहीं तो तैसाचि जाण ॥ ४ ॥

२९११ निमालियां देहांसाठीं। रांडा पोरें म्हणती होटीं ॥ १ ॥ तयासाठीं न रडती। आपुलें म्हणती कैसें होती ॥२॥ ऐसे भुलले पामर। नरक भोगिती अघोर ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं। रामनाम न घेती कोणी ॥ ४ ॥

२९१२ गत तें आयुष्य गत तें धन। गत दृष्यमान पदार्थ तो ॥ १ ॥ गत अंबर गत तो पवन। गत तें हवन गत होय ॥ २ ॥ एका जनार्दनीं अगत तें नाम। म्हणोनि विश्राम योगियांसी ॥ ३ ॥

२९१३ जें जें दिसें तें तें नासे। अवघें वोसे जायाचें ॥ १ ॥ नाशिवंत सर्व काया। भेणें उपाया करा कांहीं ॥ २ ॥ पदार्थमात्र जात असे। कांहीं नसे आनु दुजें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सर्व वाव। धरा भाव विठ्ठलीं ॥ ४ ॥

२९१४ मी मी म्हणतां वायां गेलें सर्व। पाहे तूं अपूर्व नवल बापा ॥१॥ रावण नासला मीपणें गेला। रामें क्षय केला पुत्रपौत्रीं ॥ २ ॥ मीपणें दुर्योधन बहुत गर्वीत। नासले जीवींत रणांगणीं ॥ ३ ॥ ऐसें ते बहुत मीपणें नासले। एका जनार्दनीं भले मीपणरहित ॥ ४ ॥

२९१५ अहा रे पामरा मीपण फुगारा । व्यर्थ का रे भारा वागविसी ॥ १ ॥ शस्त्राचेनि रोम वक्र नोहे अंगा । तया सहस्र भगा जाहले देखा ॥ २ ॥ विष अग्नीचेनी मेळें । तया कांहीं न पोळे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । देवापायीं केलें अर्पण ॥ ४ ॥

२९१६ मी म्हणोनियां भार वाहे । वाउगा जाय कुंथत ॥ १ ॥ रात्रंदिवस जैसा खर । वोझें अपार वहातुसे ॥२॥ नावडे भजन पूजा कथा । संसाराची वाहे चिंता ॥ ३ ॥ आला आयुष्याचा काळ । परि न राहे तळमळ ॥ ४ ॥ आपण मरुनीं आणिकां मारी । ऐसा नष्ट दुराचारी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं नाहीं भाव । तेथें न भेटेचि देव ॥ ६ ॥

२९१७ नाशिवंत देह नाशिवंत माया । नाशिवंत काया काय काज ॥ १ ॥ यमाचा पाहुणा जाणार जाणार । काय उपचार करूनि वायां ॥ २ ॥ छायेसी बैसला सवेंचि तो गेला । वृक्ष रडूं लागला गेला म्हणोनि ॥३॥ पांथस्थ मार्गस्थ येउनी राहिला । उदय होतां निघाला आपुल्या मार्गें ॥ ४॥ तो घरधनी रडत धांवे मागें । काय काज वेगें सांगा तुम्ही ॥५॥ उसनें आणितां सुख वाटे जीवा । देतां दुःख जीवा काय काज ॥६॥ पाहुणा हा देह जाईल टाकुनी । एका जनार्दनीं काय दुःख ॥७॥

२९१८ हें शरीर नाशिवंत साचें । जायाचें हो जायाचें अंतकाळीं ॥१ ॥ काय याचें सुख मानिती हे जन । पडिलेंसे जाण मायाचक्रीं ॥२॥ संसाराचा या करिती विचार । भुलले पामर अधोगती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वायांचीं भ्रमती । पुढें ती फजिती नेणवेची ॥४॥

२९१९ नाशिवंत देह नाशिवंत माया । नाशिवंत छाया वायां जैशी ॥ १ ॥ मृगजळाचें परी नाशिवंत धन । यासी तूं भूलून गुंतलासी ॥ २ ॥ व्यापारी बाजारीं घातिलें दुकान । स्त्री पुत्र स्वजन तैसे बापा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐशियाच्या छंदा । भूलोनि गोविंदा विसरसी ॥ ४ ॥

२९२० क्षणभंगुर देह । याचा मानिसी संदेह ॥ १ ॥ उदकावरी तरंग । तैसें दिसे सर्व जग ॥ २ ॥ पाहतां मृगजळा । जळ नोहेची निर्मळा ॥ ३ ॥ साउली अभ्राची । वायां जाय जैसी ॥ ४ ॥ करितां लवण पुतळा । विरे जैसा मिळतां जळा ॥ ५ ॥ एका जनार्दनीं तैसें । दिसतां देह नासे जैसें ॥ ६ ॥

२९२१ असत्याचें मूळ नरदेह साचें । वायां काय याचें कवतूक ॥ १ ॥ हरिनाम सारें सेवीं तूं निर्धारें । आणीक पसारे शीण वायां ॥२॥ एका जनार्दनीं मृगजळ वोखटे । दिसें तें गोमटें तृषा न हरे ॥३॥

२९२२ जाणतां जाणतां कां रे वेडा होसी । नाथिल्याच्या पिसीं हांव भरी ॥ १ ॥ दोन दिवसांचें उसणें व्यापारी । काय त्यांची थोरी मानितोसी ॥ २ ॥ दिवसांची छाया पूर्व पश्चिमेसी । तैशी या देहाची स्थिति जाणा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हरिकृपेविण । दावील ही खूण कोण बापा ॥ ४ ॥

२९२३ देहींच्या अवसाना । कोणी कामा नये कोण्हा ॥ १ ॥ हे तो मिळाले अपार । अवघा मायेचा बाजार ॥ २ ॥ तुजसाठीं शोक । कोण्ही न करतीच दुःख ॥ ३ ॥ रडती पडती । पुढें कैसें होईल म्हणती ॥४॥ आपुलिया हिता । रडती जना देखतां ॥५॥ याचें मानूं नको खरें । एका जनार्दनीं त्वरें ॥ ६ ॥

२९२४ नका करूं वाद विवाद पसारा । वाऊगा मातेरा नरदेहीं ॥१॥ आयुष्याचें अंतीं कामा नये कोणी । नेती ढकलुनी एकलेंची ॥२॥ स्वजन स्वगोत्र नये कोणी कामा । सांडी त्यांचा प्रेमा परता होई ॥३॥ एका जनार्दनीं मधाचिये माशी । तैसा सांपडशी यमफांशी कोण सोडी ॥ ४ ॥

२९२५ कां रे भांबावसी नास्तिकासाठीं । कोरडी कां आटी करसी वायां ॥ १॥ हें तों पोसणें आणिलें उसणें । जयाचें तया देणें अनायासें ॥ २॥ घ्यावें त्याचें द्यावें ऐशी आहे नीत । तूं रे दुश्चित वाउगा मनीं ॥ ३ ॥ न देतां तरी देणें आहे केव्हां । वाऊगा तो हेवा धरिती पोटीं ॥४॥ एका जनार्दनीं भरतां मापोडी । पडतसे उडी खालीं मग ॥५॥

२९२६ आशेपाशीं काम आशेपाशीं क्रोध । आशेपाशीं भेद लागलासे ॥ १ ॥ आशेपाशीं कर्म आशेपाशीं धर्म । आशेपाशीं नेम नानात्वाचा ॥ २ ॥ आशेपाशीं याती आशेपाशीं जाती । आशेपाशीं वस्ती अहंकाराची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं निराशी तो धन्य । ज्यासी नारायण सांभाळिता ॥ ४ ॥

२९२७ काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर । षड्वैरी तत्पर हेचि येथें ॥ १ ॥ क्षुधा तृषा मोद शोक जरा मरण । षड्ऊर्मी पूर्ण देहीं हेची ॥ २ ॥ आशा मनिछा कल्पना इच्छा तृष्ण वासना । हे अठरा गुण जाणा

देहामाजीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं त्यजोनि अठरा । तोचि संसारामाजीं शुद्ध ॥ ४ ॥

२९२८ अस्थिमांसाचा हा कोथळा । ऐसा देह अमंगळा ॥ १ ॥ प्राणी म्हणती माझें माझें। खर जैसें वाहे वोझें ॥२॥ न कंटाळे कधीं मन। जेवीं भुलें सर्प जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देवा । याचा विसर पाडावा ॥ ४ ॥

२९२९ मिळती सख्या माय बाहिणी। हातीं घेऊनी तेलफणी ॥ १ ॥ जंव आहे शरीर चांग । तंव काढिताती चांग भांग ॥ २ ॥ नासलिया शरिरातें । टाकिताती तया परतें ॥ ३ ॥ पहा देहीं देव असतां । नाहीं म्हणती सर्वथा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पंचत्व । मग म्हणती भूत भूत ॥ ५ ॥

२९३० देहींचें आयुष्य पूर्ण तें भरलें। मग नाहीं उरलें मागील कांहीं ॥ १ ॥ देहीं देह आहे तोंवरी अहंता। निमालिया तत्त्वतां वाव सर्व ॥ २ ॥ देहीं देहपण मी मी माझें म्हणे । मिथ्या सर्व जाणें देहाअंतीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मिथ्या देह आहे। रामनाम बा हें सबराभरीत ॥ ४ ॥

२९३१ म्हणती नरदेह पावन। परी अत्यंत निंद्य जाण ॥ १ ॥ योनिद्वारें ज्याचें जनन । सवेंचि मरण लागलेंसे ॥ २ ॥ जंव जन्मलेंचि नाहीं । तंव ते मरण लागलें पाही ॥ ३ ॥ गर्भाच्याहि ठायीं भेवो । मरण भावीं न चुकेची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाहीं मरण। तेथें नाहीं जनन येणें जाणें ॥ ५ ॥

२९३२ स्वप्नामाजीं बंधन । जागृती पहातां लटिकें स्वप्न ॥ १ ॥ ऐशी जाणा देहस्थिती । जागृती स्वप्न ते भासे चित्तीं ॥ २ ॥ जागृती धरितां भाष। स्वप्नीं दिसे तो प्रकाश ॥ ३ ॥ जागृती स्वप्न दोन्ही पाही । एका जनार्दनाचें पायीं ॥ ४ ॥

२९३३ स्वप्नामाजीं अनिरुद्धे देखिलासे उखा। तयालागीं घेउनीं गेली चित्ररेखा ॥ १ ॥ तया सोडवण्या हरी । धांव घेतसे झडकरी ॥ २ ॥ पाहे स्वप्नाचेनि कांतें । अनिरुद्धा केलेंस निरुतें ॥ ३ ॥ स्वप्नेंचि देखे सारा । एका जनार्दनीं पसारा ॥ ४ ॥

२९३४ मनुष्य देहीं व्हावें ब्रह्मज्ञान । घेतो पुढिलें आमंत्रण ॥ १ ॥ पुढें जन्माचा विसार । घेतो अतिमानें तो पामर ॥ २ ॥ चौऱ्यांयशी लक्ष योनीप्रती। कोटी कोटी फेरे होती ॥३॥ ऐसा मनुष्यदेह पावन। तो वेंचि विषयाकारण ॥ ४ ॥ होतां विषयीं वासना। नाठवेची एका जनार्दना ॥ ५ ॥

२९३५ आत्मा तो देही नाशिवंत नाहीं। अशाश्वत पाहीं कलेवर ॥१॥ समजोनी उमजोनी झांकिती डोळे। बळेंचि आंधळे होती मूर्ख ॥ २ ॥ मरणाचे हावें एकमेकां बोलती । गेला गेला म्हणती असोनी जवळी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसे ते अंध । भुलले मतिमंद भ्रांतियोगे ॥ ४ ॥

२९३६ उलट भावना पालट मनाची। काया वाचा देहाची स्थिती एक ॥ १ ॥ होणार तें होय देहाचे पतन । तेथें कोणा कर्मीपण येतें जाते ॥२॥ आणिलें जयाचें तें देणेंचि आहे। सोस वाउगा वाहे काय फळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाउगा पसार। व्यर्थ हांवभर प्राणी जाहले ॥ ४ ॥

२९३७ धरिसी देहाची तूं आशा । तेणें फांसा पडशील ॥ १ ॥ सोडवितां नाहीं कोण्हीं । पाहे विचारुनी मनामाजीं ॥ २ ॥ येती तैसे सवेचि जाती। व्यर्थ कुंथती माझें माझें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पैलपार। तरसी निर्धार विठ्ठलनामें ॥ ४ ॥

२९३८ वायांची आयुष्य जातसे खरें। उपाय तो बरें हरि एक ॥ १ ॥ अवघा वेळ अवघा काळ । नका पोकळ घालवूं ॥ २ ॥ जे जे घडी जे जे वेळीं । करा कल्लोळीं हरिकथा ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। भजा अनुदिनी संतासी ॥ ४ ॥

२९३९ देहाची ममता न धरी साचार। करीं कां रे विचार पैलथडी ॥१॥ भरिला भरिला सागर भरिला। उतरीं कां रे वहिला संतसंगे ॥२॥ शामाची सांगडी बांधीत निर्धारें । तेणें पैलपार तरसी देखा ॥ ३ ॥ सांगड नामाचि धरी प्रेमभावें । संता शरण जावें एकाविधा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण गेलिया। कळिकाळ पाया वंदी यम ॥ ५ ॥

२९४० नरदेहीं आयुष्य गमाविलें सारें । परी रामभजन खरें केलें नाहीं ॥ १ ॥ ऐसें जे अभागी पावतीं पतनीं । तया सोडवणीं कोण करी ॥ २ ॥ एका जनार्दनीं मानीं हा विचार। राम चराचर जप करी ॥ ३ ॥

२९४१ हिताकारणें तुम्हां सांगतसें गुज । कांहीं तरी लाज धरा आतां ॥ १ ॥ अवचट नरदेह पावलें निधान। कांहीं सोडवण करीं बापा ॥ २ ॥ पूर्वे

सुकृताचें फळ तें पदरीं । म्हणोनि हा देह निर्धारीं प्राप्त तुज ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वायां जातो काळ । कांहीं तरी गोपाळ आठव वेगें ॥ ४ ॥

## प्रपंच.

२९४२ प्रपंचीं गुंतती । बळें माझें माझें म्हणती ॥१॥ ऐसे अभागी ते खर । नेणे विचार सारासार ॥ २ ॥ चिखलीं रुतती । आणिकातें धांवा म्हणती ॥ ३ ॥ बळें कृशान पदरीं । बांधितातीं दुराचारी ॥४॥ कुंथा-कुंथी बळें । यम मारितसे सळें ॥ ५ ॥ शरण जना र्दना । कोण्हा नोहेंचि वासना ॥ ६ ॥ जनार्दनाचा एका । बोल बोलतसे देखा ॥ ७ ॥

२९४३ प्रपंचाचा भार वाहतसे खर । न कळे विचार साधनाचा ॥ १ ॥ गुंतलासे मीन गळाचिये परी । आमिष देखोनी वरी गिळीतसे ॥ २ ॥ टाळी लाऊ नियां बैसला सेवक । तैसाचि तो देख नामहीन ॥ ३ ॥ आवडी आदरें न ये नाममुखीं । एका जना-र्दनीं सुखीं केवीं होय ॥ ४ ॥

२९४४ न कळेचि मूढा सुखाची ती गोडी । पायीं पडली बेडी प्रपंचाची ॥ १ ॥ पान लागलिया गूळ न म्हणे गोड । तैसे ते मूढ विसरले नाम ॥ २ ॥ शुद्ध वैराग्याचा मानिती कंटाळा । पाळिती अमंगळा प्रपंचासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं भाव खरा । तया त्या पामरा सांगुनी काय ॥ ४ ॥

२९४५ भासतसे दोर विखाराचे परी । तैसीच थोरी प्रपंचाची ॥ १ ॥ भुलले भुलले प्रपंची गुंतले । वायां उगले बोल कां हे ॥ २ ॥ श्वानाचियेपरी मागे पुढें पाहे । माझा म्हणोनि बाह्या कवटाळिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अवकाळीं मेघ । तैसा प्रपंची दंभ लटिकाची ॥ ४ ॥

२९४६ प्रपंच आमिष गुंतशील गळीं । शेवटीं तळ-मळीं होईल रया ॥ १ ॥ स्त्री पुत्र धन हें केवळ जाळें । गुंतशील बळें यांत रया ॥२॥ पुढील विचार धरी कांहीं सोय । संतसंग लाहे अरे मूढा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सत्संगावांचुनी । कोण निर्वाणी तारील तुज ॥ ४ ॥

२९४७ बाळ तरूण वृद्ध ऐसे ते पाहिले । पाहुनी निमाले देखसी रया ॥ १ ॥ प्रपंच काथाड कोंब-ड्याचे परी । पुढेंचि उकरी लाभ नाहीं ॥ २ ॥ तुज सुख दुःख मागील आठव । आतां भाकी कींव कांहीं रया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अहा रांडलेका । भोगिसी अनेका योनी रया ॥ ४ ॥

२९४८ जाणते नेणते दोघेहि गुंतती । वाया कुंथा-कुंथी करिती रया ॥ १ ॥ प्रपंच व्यसन न चुके पामरा । करिती येरझारा न चुके रया ॥२॥ वोढाळ सांपडतां बांधिती दावणी । कोण करुणावचनीं सोडी रया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करितां प्रयाणा । नाहीं ती करुणा यमासी रया ॥ ४ ॥

२९४९ ऐशी प्रपंचाची गोडी । जन्ममरण घेती कोडी ॥ १ ॥ नाहीं तया कांहीं धाक । जन्ममरणाचा देख ॥२॥ आलिया देहासी । नाठविती हृदयस्थासी ॥३॥ जरा आलिया निकटीं । करी प्रपंचाची राहाटी ॥४॥ एका जनार्दनीं शरण । न ऐकती मूर्ख जन ॥ ५ ॥

२९५० दीपाचिया अंगसंगा । कोण सुख आहे पतंगा ॥ १ ॥ दीपा रूपाचेनि कोडें । पतंग स्नेहांत उडी पडे ॥ २ ॥ एक निमाले देखती । दुजा उडी घाली अवचिती ॥ ३ ॥ ऐशीं भुलली बापुडीं । एका जनार्दनीं धरूनि गोडी ॥ ४ ॥

२९५१ काळ आला रे जवळी । वाचे जपें नामा-वळीं ॥१॥ अंतकाळीं जाण । तुज होईल बंधन ॥२॥ नको गुंतु संसारा । चुकवी जन्ममरण फेरा ॥ ३ ॥ कोणी कोणाचें न सांगाती । अवघे सुखाचेच होती ॥४॥ एका जनार्दनीं शरण । कायावाचामनें जाण ॥५॥

२९५२ संसार पसर करिसी तळमळ । कां रे घन-नीळ नाठविसी ॥ १ ॥ पुत्रदाराधन कवण हे कव-णाचे । आहे तोंवरी माझें माझें म्हणती ॥२॥ लटिका प्रपंच सर्व नाशिवंत । एक हें शाश्वत हरिनाम ॥३॥ म्हणे जनार्दन एकनाथा घेई । प्रेमसुख पाहीं पाव-शील ॥ ४ ॥

२९५३ अवघे सुखाचे सांगाती । दुःख देखतां पळती ॥ १ ॥ सुख देखोनि म्हणती माझें । दुःख देखतां पळती वोजे ॥ २ ॥ यापरी अवघें लटिकें देख । एका जनार्दनीं पाहे सुख ॥ ३ ॥

२९५४ नरदेहा येऊनि गमावि आयुष्य । धरीना विश्वास रामनामीं ॥१॥ अंतकाळीं तया कोणी नये कामा । वाउगाचि श्रमा पडतो डोहीं ॥ २ ॥ माझें माझें म्हणोनियां कवटाळितो वाहीं । प्रपंचप्रवाही धांव

घाली ॥३॥ एका जनार्दनीं करितां कल्पना । गेलासे पतना यमलोकीं ॥ ४ ॥

२९५५ कां रे नाठविसी दिवसाचे चोरी । प्रपंच भोंवरी पडसी रया ॥ १॥ वाचे नाम गाय वाचे नाम गाय । नाम न गातां होय दुःख रया ॥२॥ सुख-दुःखें दोन्ही भातुकी असती । प्रपंचाचे अंतीं भोगिसी रया ॥ ३ ॥ रामनाम वाचे सदा गात जाय । न घरीं तूं हाय वाउगी रया ॥४॥ एका जनार्दनीं किती सांगूं मूढा । वायां तूं दगडा भूमीभार ॥ ५ ॥

२९५६ कां रे हावभरी जाहलासी पामरा । भार वाहसी खरा प्रपंचाचा ॥ १ ॥ नाम श्रीरामाचे नित्य घेई वाचे । तुटलें जन्माचें दुःख जाण ॥ २ ॥ यातना यमाची दुःखाची परवडी । नामें धरीं गोडी आव डीनें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नायकसी मूढा । अहा रे दगडा धर्मलंडा ॥ ४ ॥

२९५७ भक्ती नाहीं नामीं तो चांडाळ पतीत । तोचि जाणावा कुश्चित नष्ट येथें ॥ १ ॥ प्रपंचकर्दमीं बुडोनियां ठेले । संतावीण उगले फजीत होती ॥ २ ॥ पुत्र मित्र कांता मानुनी भरवंसा । याचा मोह खासा जन्मवरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अंतीं आहे कोण । न कळे संतावीण निश्चयेंसीं ॥ ४ ॥

२९५८ नवल देखिलें संसाराचें बंड । त्याचें कोणी तोंड न ठेंचिती ॥ १ ॥ गुंतलेची बळें विखलें माखलें । कर्मा जन्मफळें भोगिताती ॥ २ ॥ नाथिला पसारा मानिती वो साचा । वेध तो तयाचा वागविती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाडलेसें मोहें । संदेह संदेहें गोंवियलें ॥ ४ ॥

२९५९ वाउगाची पसारा । कां रे वाढविला गव्हारा ॥ १ ॥ म्हणसी माझें माझें । अंतीं कोण आहे तुझें ॥ २ ॥ भुललासी वायां । गमाविसी व्यर्थ काया ॥ ३ ॥ कोण हे कोणाचें । एका जनार्दनीं साचें ॥ ४ ॥

२९६० वाउगाची शीण करिसी सर्वथा । चुकशी परमार्था मूढा जाण ॥ १ ॥ किती करिशी सोस माझें माझें म्हणोनी । शेवटीं बंधनीं पडशीं मूढा ॥ २ ॥ अंतकाळीं कोणी नाहीं रे सांगाती । होईल फजिती तुझी तुला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाउगाचि धंदा । त्यजुनि गोविंदा सेवी बापा ॥ ४ ॥

२९६१ उपजोनि प्राणी गुंतला संसारी । आपुला आपण वैरी होय रया ॥ १ ॥ न कळे पामरा नरकाचें तें मूळ । विषयसुख अमंगळ भोगी रया ॥ २ ॥ नाथि-लिया प्रपंचा गुंतला बराडो । सैर वोढावोढी होईल रया ॥ ३ ॥ न कळे तयासी जाहला बुद्धिहीन । माझें माझें कवळोन रडे रया ॥ ४ ॥ एका जनार्दनीं अभागीं पामर । भोगिती अघोर नरक रया ॥ ५ ॥

२९६२ दुःखाच्या खडकीं आदळती प्राणी । परी संसाराचा मनी वीट नये ॥ १ ॥ कामाचीया लाटें कर्दमाचे पुरीं । बुडे तरी हाव धरी अधिकाराची ॥२॥ वारितां नायके भ्रमलासे कीर । सांपडे सत्वर पार-धीया ॥३॥ एका जनार्दनीं यमाचीया फांसा । पडेल तो सहसा न कळे मूढा ॥ ४ ॥

२९६३ सर्पें धावोनी धरिल्या तोंडीं । सर्वांगा घालितसे वेढी ॥१॥ सर्प बाधेची सांकडी । निवारी मंत्र वादी गारुडी ॥ २ ॥ रिघतां सद्गुरूसी शरण । तैसे निरसे जन्ममरण ॥ ३ ॥ संसार सर्प मिथ्या देहीं । एका जनार्दनीं सदा ध्याई ॥ ४ ॥

२९६४ अशाश्वत देह जाईल जाईल । वायांचि गमावील अभागी तो ॥ १ ॥ नये मुखीं कदा श्रीराम चरित्र । वायांचि पै वक्त्र जल्पे सदा ॥ २ ॥ दिन-निशीं करी संसाराचा धंदा । नाठवी गोविंदा मूढ कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अभागी तो खरा । तपाच्या डोंगरा हाव धरी ॥ ४ ॥

२९६५ भजन करितां लाजतो पामर । संसारीं चित्त स्थिर सदा वाहे ॥ १ ॥ तीर्थयात्रे जाये संसार-चिंता वाहे । पुराण कीर्तनीये निद्रा बळें ॥२॥ ऐसा तो पापिष्ठ कर्म तें सबळ । एका जनार्दनीं म्हणे दोषी अमंगळ ॥ ३ ॥

२९६६ मधाचिया बोटा गुंतले लिगाडीं । तैशी परवडी संसाराची ॥ १ ॥ वाउगाची सोस रचिलीया कंद । झाडूनि नेतां वेध मक्षिकेसी ॥ २ ॥ एका जना-र्दनीं विचारी मानसी । वायां अवपाशीं गुंतूं नको ॥३॥

२९६७ पाहतो देखतो कानीं जें ऐकतो । परी सदाचि पाहतो संसार मनीं ॥ १ ॥ मीनाचीजे परी गुंतलासे जळीं । परी संसारा कवळीं अधम तो ॥२॥ दानधर्म कांहीं न वेचे आडका । रुक्यासाठीं धडका घेत असे ॥३॥ एका जनार्दनीं संसारा वेगळा । कैं मी गोपाळा होईन साचा ॥ ४ ॥

२९६८ भरला तो हावे म्हणे माझें माझें। वाहतसे ओझें संसाराचें ॥ १ ॥ कुंथत कुंथत वेरझारा करी। खराचीये परी पृष्ठी वाहे ॥ २ ॥ न मिळेचि अन्न बहुत आपदा। परी त्या गोविंदा स्मरेचिना ॥ ३ ॥ ऐसे जन्मोनियां दास संसाराचे। एका जनार्दनीं त्याचें तोंड काळें ॥ ४ ॥

२९६९ न कळे पामरा कांहीं हा विचार। भोगावे अघोर किती जन्म ॥ १ ॥ मरुनी जन्मावें मरुनी जन्मावें। पुनरपि मरावें वेरझारीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं न मानीं विश्वास। दृढ धरी पाश संसाराचा ॥ ३ ॥

२९७० पाहतां पाहतां नेत्र गेले। परी भुललेसें मेळे संसाराच्या ॥ १ ॥ जाऊनि धरितो माझें म्हणोनियां। परी तें वायां जाती सर्व ॥ २ ॥ विषय भोगितो गर्द भाचे रीतीं। लाभ तो निश्चितीं लत्ताप्रहर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मंडुकाचे परी। वटवट खरी संसारीं ते ॥ ४ ॥

२९७१ पिसाळलें श्वान पाणीयासी बीहे। तैसा नरदेह संसारासी ॥ १ ॥ वाउगाची शीण पावती पतन। नेणें आपुलें विंदान भुलला वायां ॥ २ ॥ मर्कटासी जेवीं मदिरा पाजिली। भूतबाधा झाली तयावरी ॥ ३ ॥ सैरा वैरा नाचे कोण तया हांसे। एका जनार्दनीं तैसें मनुष्यदेहीं ॥ ४ ॥

२९७२ अवघें आयुष्य काळाधीन जाहलें। परी चित्त गुंतले संसारांत ॥ १ ॥ सापें दर्दुर गिळियेला मुखीं। तेणेंचि तो शेखीं माक्षिका धरीं ॥२॥ ऐसे हावभरी प्राणी पै नाडले। म्हणती माझे वहिले कन्यापुत्र ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मृगजळाची आशा। पडे तेणें फांसा गळा बळे ॥ ४ ॥

२९७३ काय सुख आहे संसारीं। म्हणोनि भरलासी हावभरी। वाचे स्मरे श्रीहरी। दीननिशीं प्रपंचीं ॥ १ ॥ जन्म जाहलीया पासोन। सदा संसाराचे ध्यान। नाहीं कधीं आठवण। न ये मुखी राम नाम ॥ २॥ ऐसा भार वाही खर। परि तया न कळे साचार। आहे पुढें यातना अघोर। हें कांहीं नाठवी ॥ ३ ॥ ऐसें होतां भरलें आयुष्य। मृत्यु पुन्हां येत जन्मास। ऐशा भोगी चौऱ्यांयशी निःशेष। एका जनार्दनीं म्हणे त्यास लाज नाहीं ॥ ४ ॥

२९७४ अशाश्वतासाठीं। कां रे देवासवे तुटी ॥१॥ अंतकाळींचें बंधन। कोण निवारी पतन ॥२॥ तूं म्हणसी हें माझें। खरा ऐसें वाहसी वोझे ॥ ३ ॥ पावलीया अवसानी। कोणी नाहीं बा निर्वाणी ॥ ४ ॥ यावा न धरीं विश्वास। एका जनार्दनाचा दास ॥५॥

२९७५ उघडा अनुभव असोनिया देहीं। वायांचि प्रवाही कां पडसी ॥ १ ॥ संसार दुस्तर कूप हा निर्धार। पडतां अंधकार सुटे जाण ॥ २ ॥ भ्रमतां भ्रमतां नयेचि बाहेरी। चौऱ्यांयशी फेरी पुनः पुनः ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नको हा विचार। वायां फजितखोर होशी बापा ॥ ४ ॥

२९७६ नेणतां नेणतां कां रे अंध होशी। माझें म्हणविशी कां रे बळें ॥ १ ॥ तूं कोण कोठील आहेसी कोणाचा। शिणतोसी साचा मी माझें म्हणुनी ॥२॥ रहाट माळ जैसी जात येत वरी। तैशीच ये परी जन्म देहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करी बा विचार। वायां हावभर फिरूं नको ॥ ४ ॥

२९७७ गुंतला सर्प भुलला नादा। तैशी प्राणियासी आपदा संसाराची ॥ १ ॥ सदा तळमळ मन नाहीं स्थिर। भोगिती अघोर जन्मोजन्मीं ॥ २ ॥ नळिका यंत्रामाजीं सांपडे वानर। संसारी तो नर तैसा गुंते ॥३॥ एका जनार्दनीं करितां नाना युक्ति। मागें ही फजिती पुढें होती ॥ ४ ॥

२९७८ कासयासी मूढा करिसी संसार। पुढें तो अघोर थोर आहे ॥ १ ॥ बळेंचि कां रे नागवसी पाहतां। विषयभोग भोगितां दुःख बहु ॥ २ ॥ पातकाची राशी हे तो कन्यापुत्र। तूं कां रे पवित्र त्यासी म्हणसी ॥३॥ एका जनार्दनीं नाशिवंतासाठीं। देवा सवें तुटी पाडितोसी ॥ ४ ॥

२९७९ वायांचि भुली पडली गव्हारा। भ्रमली भोंवरा संसारींच्या ॥ १ ॥ कां रे सावध न होशी मूढा। शिणसी दगडा फजितखोरा ॥ २ ॥ गुंतुनी पडसी वाउग्या व्यसनीं। संसारघसणीं चौऱ्यांयशीच्या ॥ ३ ॥ एका जनार्दनीं किती हें सांगावें। जाणत जाणत नागवे निलाजिरा ॥ ४ ॥

२९८० आमिष लाउनी मीनातें गोंविती। तैसी संसारस्थिति जाणे बापा ॥ १ ॥ पान लागलिया गूळ न म्हणे गोड। नामामृतीं चाड न धरती ॥ २ ॥ पहाती डोळां देखती प्रकार। परी विषयाचा आदर

न सांडिती ॥ ३ ॥ माझें माझें म्हणोनि दृढ धरिताती । एका जनार्दनीं भोगिती चौऱ्यांयशी ॥ ४ ॥

२९८१ संसाराचें सुख कोण पैं सांगती । होत फजिती लहानथोरां ॥ १ ॥ सर्पें मंडूक धरिलासे मुखीं । तेणें पैं शेखीं मक्षिका धरीं ॥ २ ॥ मरती बापुडी हाव धरती गोडी । तरी तीं वेडीं नागवती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न धरी सोय । वायांचि धावो जाय हांवभरी ॥ ४ ॥

२९८२ काय ऐसा यासी मानला विचार । संसारपसर गोड वाटे ॥ १ ॥ बुडतां देखती आणिकासी डोळे । परि नुमजे अंधळे बळें होती ॥ २ ॥ सायासें शिणती माझें म्हणोनियां । एका जनार्दनीं वायां जाती हीन ॥ ३ ॥

२९८३ मक्षिकेनें जैसा रचियेला कंद । वाउगाचि वेध तैशापरी ॥१॥ आणिकें झाडितां गुंतोनि पडती । तैशी ही फजिती संसाराची ॥ २ ॥ एका जनार्दनीं कृपा न करी देव । तोंवरी अभाव सर्व जाणा ॥ ३ ॥

२९८४ स्वप्नवत संसार माना हा निर्धार । अशाश्वत जाणार छाया जैशी ॥ १ ॥ मृगजळ नाथिलें दिसतसे जळ । पहा हो प्रबळ पटल मेघ जैसें ॥ २ ॥ एका जनार्दनीं वाउगा आभास । देवावीण सौरस वाउगा भासे ॥ ३ ॥

२९८५ वाउगाचि सोस वहाताती वोझें । म्हणती माझें माझें हीन भाग्य ॥ १ ॥ जाणती नेणती राहाटी देखती । मरती रडती देखती त्या ॥ २ ॥ एका जनार्दनीं भुलले ते वायां । परी देवराया शरण न जाती ॥ ३ ॥

२९८६ धरसी संसारासी हाव । माझें माझें म्हणती सर्व । हें तंव कोणाचें वैभव । तुज न कळे पामरा ॥ १ ॥ आयुष्य मान जंव आहे । तंव सर्वा होशी सहाय्य । अंतकाळीं पाहे । कोणी कामा न येती ॥ २ ॥ तुज जे म्हणती उत्तम । त्यांचा तुज मोठा भ्रम । अंतकाळीं पावशी श्रम । एकलाचि पामरा ॥ ३ ॥ म्हणोनि सर्व भावें हरी । स्मरण करी निरंतरीं । एका जनार्दनीं निर्धारीं । नाम स्मरें वेळोवेळां ॥ ४ ॥

२९८७ छाया पैं वृक्षाची बैसतां सुख । तैसा संसार देख प्राणिमात्रा ॥ १ ॥ गुंडती बळे गुंडती बळे । माझें माझें सर्व काळ तोंडे ॥ २ ॥ असतां बरवी करिती आणिक सेवा । आडली या देवा धांवे म्हणती ॥ ३ ॥ ऐसा काळ तोंडा जनीं जाला वेडा । एका जनार्दनीं रेडा पशुजन्मीं ॥ ४ ॥

२९८८ सुखावोनि पतंग दीपावरी पडे । परी शेवटी जोडे देह अंत ॥ १ ॥ तैसें प्राणीमात्र संसारी भुलले । कष्ट ते उगलें करिताती ॥ २ ॥ भिलाव्याचे परी प्रपंच गोमटा । परी काढी चपेटा अंतरीचा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भुलले पामर । वायां नरका घोर भोगिताती ॥ ४ ॥

२९८९ मिथ्या हा संसार । अवघा मायेचा बाजार ॥ १ ॥ स्त्रिया पुत्र धन । हें तों सर्व मायिक जाण ॥२॥ यांत गुंतूं नको नरा । न करी आयुष्यमातेरा ॥ ३ ॥ वाचे वदे हरिहर । करी ध्यान निरंतर ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नरा । नित्य भज हरिहरा ॥ ५ ॥

२९९० कोणाचे घरदार मृगजळ संसार । तुझा तूं विचार करी बापा ॥ १ ॥ सोयरा तूं देव करी पा संसारीं । वायां हावभरी होऊं नको ॥ २ ॥ द्वैत अद्वैत टाकुनी परता । होई पां सरतां देवापायीं ॥३॥ एका जनार्दनीं देवावीण तुज । राखील पां सहज कोण दुजा ॥ ४ ॥

२९९१ कोण हरी आतां संसाराचा छंद । न स्मरतां गोविंद दुःख बहु ॥ १ ॥ शाहाणे बुडती शाहाणे बुडती । शाहाणे बुडती भवडोहीं ॥ २ ॥ तत्वज्ञानाच्या सांगताती गोष्टी । परि संसार हिंपुटी होती मूढ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संसाराचा छंद । टाकुनी गोविंद भजे कां रे ॥ ४ ॥

२९९२ संसार सागरीं बुडालिया प्राणी । करी सोडवणी कोण त्याची ॥ १ ॥ अविद्यादि पंचक्लेश हे तरंग । बुडाले सर्वांग प्राणियाचें ॥ २ ॥ भ्रमाच्या आवर्तामाजीं सांपडला । सोडवी तयाला कोण आतां ॥ ३ ॥ स्त्रियापुत्र आप्त बंधु हे सोयरे । ओढिताती सारे मत्स्या ऐसीं ॥ ४ ॥ प्रचंड या कामें पसरिलें जाळें । त्यामाजीं गुंतलें प्राणीजात ॥ ५ ॥ एका जनार्दनीं उच्चारील नाम । सुखाचा आराम प्राप्त होय ॥६॥

२९९३ फट गाढवाच्या लेका । संसार केला फुका ॥ ध्रु० ॥ खटपट करितां खटपट करितां गेला सारा वेळ । रामनाम घेतां तुझी बैसे दातखिळ ॥१॥ कैंचा आपा कैंचा बापा कैंचा मामा काका । कैंची आई कैंची ताई कैंची बहीण आका ॥ २ ॥ कैंचें घर कैंचें

द्वार भुललासी फुका । कैंची सासू कैंची बाईल त्यांनीं नेला पैका ॥ ३ ॥ बारा सोळा मुलें झालीं त्याला झाले नातु । द्रव्य होतें तें सरुनी गेलें कंबरेवर हातु ॥ ४ ॥ एका जनार्दनीं म्हणे हा संसार खोटा । हरिस्मरण करा कधीं नये तोटा ॥ ५ ॥

२९९४ किती वेळां जन्म किती वेळां मृत्यु । हाचि न कळे अंतु भाग्यहीना ॥ १ ॥ जन्मोनि संसारीं मानितो बरवा । परी या राघवा न शरण जाय ॥२॥ पावलिया मरण सहज नरकुंडीं । कोण तया सोडी अधमासी ॥ ३ ॥ स्वप्नामाजीं नेणे परमार्थ मानसीं । सदा चौऱ्यांयशी फेरे भोगी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नोहेचि सुटिका । भाग्यहीन देखा मरे जन्मे ॥ ५ ॥

२९९५ मृगजळाच्या पुरीं गुंतशी पामरा । कोण तुज निर्धारा सोडवील ॥ १ ॥ पडशी पतनीं चौऱ्यांयशीं आवर्ती । तेव्हां तुझी गती कैशी होय ॥ २ ॥ जीवीं जीवपण शिवी शिवपण । वेगळें तें जाण दोन्ही होती ॥ ३ ॥ यातना अनंत तुज भोगविती । तेथें काकुळती कोणा येशी ॥ ४ ॥ यमाचे ते दूत मारिती पामरा । कां रे संसारा न चुकशी ॥ ५॥ एका जनार्दनीं सांगतो विचार । रामनामें परिकर जप करी ॥ ६ ॥

२९९६ संसारीं तरले बोलती तें कुडें । जाती ते बापुडे अधोगती ॥१॥ नेणती आचार विचार स्वधर्म । करिताती कर्म मना तैसें ॥ २ ॥ न तरती भवसागरीं बुडती ह्व्यासें । लागतसें पिसें धन आशा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आशा हे सांडोनी । गोविंदचरणीं मिठी घाला ॥ ४ ॥

२९९७ आपुलें पारखें सांगतां नायकती । करितसे खंती संसारासी ॥१॥ काय संसाराचें सुख तें तयासी । कोण फांसाफांशी चुकवील ॥ २ ॥ कधीं रामनाम नाठवी पामर । भोगितो अघोर जन्म कोटी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपणें शरण । जनीं जनार्दन आम्हा आहे ॥ ४ ॥

२९९८ देह नाशिवंत अभ्राची साउली । तैशी परी बोली संसाराची ॥१॥ जळगारी जैसें उदक नाथिलें । कीं मृगजळ पसरिलें चहूंकडे ॥ २ ॥ पुरुषाची छाया वाउगाचि भास । चोराचा पैं लेश काय तेथें ॥ ३ ॥ रज्जु देखतांचि भासतसे सर्प । एका जनार्दनीं दर्प संसाराचा ॥ ४ ॥

२९९९ वायांचि कासया करितां आटाआटी । क्षणें पाडा तुटी संसारासी ॥ १ ॥ संसारकर्दमीं गुंतलेली बापा । किती वेळां खेपा कराव्या त्या ॥ २ ॥ मरावें जन्मावें मरावें जन्मावें । खंडन केव्हां व्हावें न धरा शुद्धी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं किती तें सांगावें । नायकती हावें भरले जीव ॥ ४ ॥

३००० जे आसक्त संसारीं । ते अघोरी पडती ॥१॥ तया नाहीं सोडविता । सद्गुरुनाथावांचुनी ॥ २ ॥ त्याचे चरण धरा चित्तीं । मग भीति कासया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । जन्ममरण चुकलें ॥ ४ ॥

३००१ संसार म्हणसी माझा । कां रे गुंतसी वोजा ॥ १ ॥ राहें अलिप्त संसारीं । अंतरीं धरूनियां हरी ॥ २ ॥ तेणें चुकती बंधनें । पावन करिती संत जन ॥ ३ ॥ त्रैलोक्यीं ज्याचा शिक्का। एका जनार्दनीं नाम घोका ॥ ४ ॥

३००२ मागें बहुतांसी सांगितलें संतीं । वांया हे फजिती संसार तो ॥ १ ॥ अंधाचे सांगाती मिळालेसे अंध । सुख आणि बोध काय तेथें ॥ २ ॥ विष खाऊनियां प्रचीत पाहे कोणी । तैसा अधमपणीं गुंतूं नको ॥३॥ एका जनार्दनीं जाऊं नको वायां । संसार माया लटिकी ते ॥ ४ ॥

३००३ नोहे सायास रामनामीं । संसारासी गुंते प्राणी ॥ १ ॥ आठवी वाचे रामनाम । संसार नुरेची श्रम ॥ २ ॥ नको करूं वायां श्रम । वाचे म्हणे राम राम ॥ ३ ॥ आवडीनें नाम घोका । म्हणे जनार्दनाचा एका ॥ ४ ॥

३००४ आठही प्रहर करिसी संसाराचा धंदा । कां रे त्या गोविंदा स्मरसी ना ॥ १ ॥ अंतकाळीं कोण सोडवील तूंतें । कां रे स्वहितातें विसरलासी ॥ २ ॥ यमाची यातना न चुके बंधन । सोडवील कोण तुजलागी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गुंतलासी वायां । भज यादवराया विसरूं नको ॥ ४ ॥

३००५ वायांची सोस संसार कामाचा । रामनामी वाचा रंगो कां रे ॥ १ ॥ यापरती जीवा सोडवण नाहीं । वेदशास्त्रीं पाहीं भाष्य असे ॥ २ ॥ पुराणें डांगोरा पिटिती नामाचा । तें तूं कां रे वाचा न वदसी ॥ ३ ॥ सायास साधनें न लगे आणिक । एका जनार्दनीं ऐक्य मन करी ॥ ४ ॥

३००६ साडीं पां सांडीं संसाराचा छंद । आठवी गोविंद वेळोवेळां ॥ १ ॥ न लगे सायास न लगे सायास । आठवी श्रीहरीस मनोभावें ॥ २ ॥ षड् वैरीयांचें तोडी पां बिरडे । करीं तूं कोरडे आशापाश ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण स्वभावें । भोगी तूं गौरव वैकुंठीचें ॥ ४ ॥

३००७ अहा रे मूढा अहा रे मूढा । जन्मोनी दगडा काय केलें ॥ १ ॥ साठीं कारिसी संसाराचा छंद । वाचे तो गोविंद नुच्चारिसी ॥ २ ॥ एका जनार्दनीं श्रीरामावांचून । चुकवील बंधन कोण मूढ ॥ ३ ॥

३००८ बुडालिया जळीं धांवतसे कोण । तैसे प्राणी जन बुडताती ॥१॥ संसार हा डोहो दुस्तर पारखा । सांगड ती देखा रामनाम ॥ २ ॥ एका जनार्दनीं संतांचा आधार । उतरूं पैलपार भवडोहीं ॥ ३ ॥

३००९ अल्प आयुष्य अल्प सर्व । अल्प वैभव समजेना ॥ १ ॥ म्हणे सदा माझें माझें । परी न लाजे काळासी ॥ २॥ त्यासी ऐसे न कळे कदा । संसार धंदा मिथ्या हा ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । नाठवी मनी श्रीहरीसी ॥ ४ ॥

३०१० संसारा आलिया प्राणी । तया यमाची जाचणी । अंती तयासी निर्वाणीं । कोणी नाहीं ॥ १ ॥ करी नामाचें स्मरण । तेणें तुटेल बंधन । काया वाचा मनें जाण । संतां शरण जाई ॥ २ ॥ नासती पापें होय होळी । विठ्ठलनामें वाजवी टाळी । कळीकाळ पायांतळीं । वैष्णवासांगातें ॥ ३॥ भाव धरी बळकट । आशापाश तोडी नीट । रामनाम जपे स्पष्ट । यातना तें चुकती ॥४॥ सोस करी नामाचा । आणिक शीण उगाचि साचा । एका जनार्दनीं म्हणे वाचा । रामनाम गाये ॥ ५ ॥

३०११ करूं करूं म्हणतां गेले वायांवीण । संसार तो शीण केला वेगीं ॥ १ ॥ अधमा न कळे अधमा न कळे । झाकोनियां डोळे घाणा नेती ॥ २ ॥ यमदूत नेती तयांसी तातडीं । मारिती वरी कोडी यमदंडें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चुकवी या यातना । संतांच्या चरणा शरण रिघे ॥ ४ ॥

३०१२ मी माझें आणि तुझें । टाकी परतें हें वोझें । नामें पावन होसी सहजें । तेंचि सेवी आवडी ॥ १ ॥ नको गुंतूं या लिगाडा । सोडीं सोडीं या दगडा । भवबंधनाचा हुडा । पडेल अंगावरुता ॥ २ ॥ देई टाकुनी लवलाही । रामनाम सुखें गाई । एका जनार्दना पायीं । तरी सुखा काय उणें ॥ ३ ॥

## स्त्री.

३०१३ पावला जनन मातेचे उदरीं । संतोषली माता तयासी देखोनी ॥ १ ॥ जो जो जो म्हणोनि हालविती बाळा । नानापरी गाणें गाती करिती सोहळा ॥२॥ दिवसेंदिवस वाढला सरळ फोक । परि कर्म करी अचाट तया न साहावें दुःख ॥ ३ ॥ शिकवितां नायके पडे भलते वेसनीं । एका जनार्दनीं पुन्हां पडतसे पतनीं ॥ ४ ॥

३०१४ देह भोगितसे गोडी । स्त्री भोगितो आवडी ॥ १ ॥ स्त्री हातीं धरितां देख । वाढे प्रपंचाचें दुःख ॥ २ ॥ जें जें आणी तें तें थोडें । धनधान्य आवडे कुडें ॥ ३ ॥ ऐसा भुलला संसारा । लक्ष चौऱ्यांयशीं येरझारा ॥ ४॥ सोडवितां नाहीं कोण्ही । एका जनार्दना वाचुनी ॥ ५ ॥

३०१५ अभागी ते पामर । भोगिती नरक अघोर ॥१॥ जाहला बाईलेचा अंकीत । वर्ते जाणोनि मनोगत ॥ २ ॥ नावडे मातापितयाची गोष्टी । म्हणे हे बोलती चावटी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दुर्जन । पावती नरकीं ते पतन ॥ ४ ॥

३०१६ पिता सांगतां गोष्टी । तयासी करितो चावटी ॥ १ ॥ नायके शिकविलें । म्हणे म्हाताऱ्याशी वेड लागलें ॥ २ ॥ बाईल बोलतांचि जाण । पुढें करून धांवे कान ॥ ३ ॥ ऐसें नसावें संतान । वायां भूमीभार जाण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं अमंगळ । त्याचा होईल विटाळ ॥ ५ ॥

३०१७ व्हावें निसंतान । हेंचि एक बरें जाण ॥१॥ येर श्वान ते कसूर । जन्मा येवोनियां खर ॥ २ ॥ मातापित्यांचा कंटाळा । न पाहावें त्या चांडाळा ॥३॥ देखतांचि सचैल स्नान । करावें तें पाहुनी जाण ॥४॥ पुत्र नोहे दुराचारी । एका जनार्दनीं म्हणे वैरी ॥५॥

३०१८ नवमास वरी वाहिलें उदरीं । तिसी दारोदारीं हिंडवितो ॥१॥ लालन पालन करीत आवडी । जोडली ती जोडी नेदी तिसी ॥ २ ॥ सर्वभावें दास बाईलेचा जाहला । एका जनार्दनीं अबोला धरी माते ॥ ३ ॥

३०१९ मायबापा न घाली अन्न । बाईलेच्या गोता संतर्पण ॥ १ ॥ मायबापा नसे लंगोटी । बाईलेच्या गोता नेसवी घट्टी ॥ २ ॥ मायबापा न मिळे गुंजभर सोनें । बाईलेच्या गोता घडी अलंकार लेणें ॥३॥ मायबापे श्रमोनियां मेली । एका जनार्दनीं बाईल प्रिय जाहली ॥ ४ ॥

३०२० मातेचिया गळां न मिळे गळसरी । बाईलेसी सरी सोनियाची ॥ १ ॥ मातेचिये हातां न मिळे कांकण । बाईले करी तोडे घडी जाण ॥ २ ॥ मातेसी न मिळे अंगीं चोळी । बाईलेसी नेसवी चंद्रकळा काळी ॥ ३ ॥ बाइले आधीन ठेविलें जिणें। एका जनार्दनीं नरकी पेणें ॥ ४ ॥

३०२१ मातेसी न मिळे खावयास अन्न। बाईलेसी घाली नित्य मिष्टान्न ॥ १ ॥ म्हणे बाईल माझी संसारी बहु । मातेनें मज बुडविलें बहु ॥ २॥ मातेनें माझा संसार बुडविला । माझ्या बाईलेनें वाढविला ॥ ३ ॥ माता माझी अभागी करंटी । बाईल प्रत्यक्ष सभागी मोठी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं बाईले आधीन जाहला । मातेसी अबोला धरिला तेणें ॥ ५ ॥

३०२२ बाईलेचा जाहला दास । न करी आस मातेसी ॥ १ ॥ नव महिने वोझें वागवून । तिचा उतरी तो शीण ॥ २ ॥ बाईलेच्या बोला । धरी मातेसी अबोला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पुत्र । जन्मला तो अपवित्र ॥ ४ ॥

३०२३ बाइलेच्या बोला । धरी मातेसी अबोला ॥१॥ बाईलेसी नेसवी घट्टी । माते न मिळे लंगोटी ॥ २ ॥ बाइले षड्रस भोजन । माते न मिळे कोरान्न ॥ ३ ॥ बाईल बैसवी आपुले घरीं । माते हिंडवी दारोदारीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । ऐसे पुत्राचे अवगुण ॥ ५ ॥

३०२४ बाईल सांगतांची गोठी । म्हणे मातेसी करंटी ॥ १ ॥ जन्मापासुनी आमुचे मागें । अवदसा लागली सांगे ॥ २ ॥ इचे उत्तम नाहींत गुण । ऐसा बोले अभागी जाण ॥ ३ ॥ नरदेहीं ते गाढव । एका जनार्दनीं नाहीं भाव ॥ ४ ॥

३०२५ बाइलेचा जाहला दास । करी आस मातेची ॥ १ ॥ माकड जैसें गारुड्याचें । तैसा बाईलेपुढें नाचे ॥ २ ॥ पिता सांगतां हित गोष्टी । दुःख वाटे तया पोटीं ॥ ३ ॥ ऐसें बाइलेनें गोंविले । एका जनार्दनीं वायां गेले ॥ ४ ॥

३०२६ बाइलेआधीन होय ज्याचें जिणें । तया अधमा नरकीं पेणें ॥१॥ बाईल मनोगतें ऐसा चाले। नावडती कोणाचे तया बोल ॥ २ ॥ वाईल देवाचाहि देव । ऐसा ज्याचा दृढ भाव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे मूढाला । बाईलेनें भुलविला ॥ ४ ॥

३०२७ रात्रंदिवस भार वाहे खर । बाइलेचे उदर भरतसे ॥ १ ॥ नेणे दानधर्म व्रत आचरण । अतिथी पूजन स्वप्नीं नाहीं ॥ २ ॥ नेणें श्राद्ध पक्ष आपुला आचार । सदा दुराचार कर्मे करी ॥ ३ ॥ पत्नीगृहीं सदा वसतसे मन । न वेची कांहीं धन कवडी एक ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसा हीनभागी । जोडीतसे अभागी नरकवास ॥ ५ ॥

३०२८ निर्धन पुरुषाची देखा । स्त्री बोले अतिशय ऐका ॥ १ ॥ दिवसा पोराची ताडातोडी। रात्रीं तुमची वोढावोढी ॥ २ ॥ नाहीं घरीं खावया अन्न। संततीनें भरलें सदन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देवा। ऐसा स्त्रीचा हेलावा ॥ ४ ॥

३०२९ सदा सर्वकाळ बाईलेचा दास। होउनी कामास श्वान जैसा ॥ १ ॥ नेणें भीड कधी मर्यादा स्वजनीं । बाईलेचे कानीं गुज सांगे ॥ २ ॥ बैसता राउळी बाइले एकांत । देवापाशीं चित्त न बैसेची ॥३॥ एका जनार्दनीं ऐसा तो पतीत । अघोर भोगीत कल्पकोटी ॥ ४ ॥

३०३० स्त्री पुत्र दारा धन। देखोनियां नाचे श्वान ॥ १ ॥ जातां वळे कीर्तनीं । बका ऐसा बैसे ध्यानीं ॥ २ ॥ लक्ष ठेउनी बाहेरी । वरवर डोले दुराचारी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे । श्वानापरी त्याचें जिणें ॥ ४ ॥

३०३१ स्त्रियांचे संगती । नोहे परमार्थ निश्चिती॥१॥ स्वप्नीं होतां दरुशन। तेथेंच गुंततसे मन ॥ २ ॥ पहा स्त्रियांचे अंगसंगे । भुलविला ऋषिशृंग ॥ ३ ॥ विश्वामित्र तपिया खाणी । कुत्रा करुनी हिंडे वनीं ॥४॥ ऐसे भुलले थोर थोर । तेथें जीव किती पामर ॥५॥ एका जनार्दनीं भुलले । वायां स्त्रीसंगी गुंतले ॥६॥

३०३२ प्रपंचाचा कठीण लाग। नाशासी मूळ स्त्रीसंग ॥ १ ॥ भोगावें जें जें सुख। तें तें प्रत्यक्ष घेती विख ॥ २ ॥ दीपाचीया अंगसंगा। कोण सुख

आहे पतंगा ॥ ३ ॥ पुढील निमाले देखती । पाहुनी पुढें उडी घालिती ॥ ४ ॥ ऐसे भुलले तया संगीं । एका जनार्दनीं जगीं ॥ ५ ॥

३०३३ कन्येचा करी जो नर विकरा । चांडाळतो खरा अधमची ॥ १ ॥ तयाचिया मुखी श्वानाची ते विष्ठा । पातकी वरिष्ठा सर्वांहुनी ॥२॥ पंचमहापातकी विश्वासघातकी । या परता दोष कां तया अंगी ॥३॥ एका जनार्दनीं त्याचे नाम घेतां । संचेल सर्वथा स्नान कीजे ॥ ४ ॥

३०३४ गौ आणि कन्या कथेचा विकरा । चांडाळ निर्धारा पापराशी ॥ १ ॥ तयाचें ते मुख न पाहती जन । अपावित्र दुर्जन पातकी तो ॥ २ ॥ एका जनार्दनीं दोषां न परिहार । भोगिती अघोर कल्प कोटी ॥ ३ ॥

३०३५ व्याही जांवयांच्या कोडी । पोशितसे अति आवडी ॥ १ ॥ देहसुखाचीया चाडा । अवघे सेळविले वोढा ॥ २ ॥ देहीं वाढवी अति प्रीति । पुत्र दारा माझे म्हणतीं ॥ ३ ॥ जैसा जोंधळा कणा चढे । कणभारें क्षितीं पडे ॥ ४ ॥ वृक्षा फळें येतीं अपारें। फळभारें वृक्ष लवे ॥ ५ ॥ ऐसा भुलला स्वजनासी । एका जनार्दनीं सायासी ॥ ६ ॥

३०३६ कन्या पुत्रादिक धन । हें तों जण भ्रमवत् ॥ १ ॥ मागील अनुभव घेउनी कसवटी । पडलीसे तुटी रामनामी ॥ २ ॥ नाथिले याचा काय तो धिंवसा । कवण तो आकाशा कुंपण घाली ॥ ३ ॥ अभ्रीची छाया मृगजळ पाणी । काय ते रांजणीं भरतां येतें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सारीमारीचे वचन। काय तें प्रमाण आयुष्यावीण ॥ ५ ॥

३०३७ लेकुरातें बाप खेळवी साचें । बाईल देखतां ती पुढें नाचे ॥ १ ॥ माझा बाप माझी आई। बाईल देखतां नाचतो पायीं ॥ २ ॥ घडसेनी तोंडें बोबडें बोले । आवडीनें म्हणे पाहे बाइले ॥ ३ ॥ सासु सासरा पहाती साला । नाचतो जांवई घेउनी मुला ॥ ४ ॥ यापरी ममता नाचवी जन । देवद्वारीं आलीया घरी अभिमान ॥ ५ ॥ एका जनार्दनीं सांडोनि अभिमान । संतांपुढें नाचे धरूनिया कान ॥ ६ ॥

३०३८ गुंतलासी मायापाशीं । कोण सोडवील तुजसी । घाये मोकलोनि रडसी । नये करुणा कवणातें ॥ १ ॥ वाचे सदा नाम गाय । तेणें चुकती अपाय । सहजचि सोय । नाम मुखीं वदतां ॥ २ ॥ बंधनाची तुटेल बेडी । होईल कैवल्याची सहज जोडी । एका जनार्दनीं आवडी । रामनामीं धरितां ॥ ३ ॥

३०३९ वेद गुरु माता पिता । ऐसा भाव जया चित्ता ॥ १ ॥ नाहीं दुजा आठव कांहीं । चित्त जडलें चौघांपायीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं साचें । ऐसें मनीं नित्य ज्याचे ॥ ३ ॥

३०४० माता पिता देव गुरु । ऐसा ज्याचा एक विचारु ॥ १ ॥ धन्य धन्य तयाचें शरीर । नर नोहे तो ईश्वर ॥ २ ॥ चारी दैवतें समान मानी । शरण एका जनार्दनीं ॥ ३ ॥

३०४१ मातापितियांसी जो करी नमन । धन्य त्याचें पुण्य इह जनीं ॥ १ ॥ मातापितियांचें करी जो पूजन । धन्य तयाचें पुण्य इहलोकीं ॥ २ ॥ मातापितियांची करीत जो सेवा । एका जनार्दनीं देवा वरिष्ठ तो ॥ ३ ॥

## धन.

३०४२ धन कामासाठीं देख । न मनीं दोष महा दोषी ॥ १ ॥ कवडीये लोभें केला असे मूर्ख । नाठवेची नरक पतितासी ॥ २ ॥ कवडा येकु लाभू होतां । तें श्राद्ध करी मातापिता ॥ ३ ॥ मी उत्तम पैलहीन । ही धनलोभ्या नाठवे आठवण ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । काय तया ब्रह्मज्ञान ॥ ५ ॥

३०४३ घालूनियां काखे धन । सदा मागे जो कोरान्न ॥ १ ॥ धन्य वायां जिणें पाहीं । श्वान सूकर सम तेही ॥ २ ॥ असोनियां दरिद्रता । सदा धर्मावरी चिंता ॥ ३ ॥ द्रव्य पदरीं बहु आहे । अतिथी रिक्त हस्तें जाये ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐसे पामर । नरक भोगिती अघोर ॥ ५ ॥

३०४४ घरीं धनधान्य पुरून । सदा मागे जो कोरान्न ॥ १ ॥ द्रव्य असोनि नाहीं म्हणे । केविलवाणें म्हणे मी दीन ॥ २ ॥ असोनि द्रव्याचीया राशी । भिक्षा मागे अहर्निशीं ॥ ३ ॥ ऐसा संचय करून । सर्वेची पावला मरण ॥ ४ ॥ वायां गेला नरदेहीं । एका जनार्दनीं पाहीं ॥ ५ ॥

३०४५ कवडी कवडी घाली खांचे । नित्य नूतन भिक्षा वाचे ॥ १ ॥ अथितासी दान । तें तों स्वप्नीं

नाहीं जाण ॥ २ ॥ पर्वकाळ विधी । न कळे अभाग्यासी कधीं ॥ ३ ॥ ठेवुनी चित्त धनावरी । सर्वेचि फिरे बरोघरीं ॥ ४ ॥ जन्मा येवोनि अघोर । एका जनार्दनीं भोगिती पामर ॥ ५ ॥

३०४६ गाठीं बांधोनियां धना । क्षणक्षणा पाहे त्यातें ॥ १ ॥ न जाय तीर्थयात्रेप्रती धनाशा चित्तीं धरूनी ॥ २ ॥ बैसलासे सर्प द्वारीं । तैशापरी धुसधुसी ॥ ३ ॥ नको धनाशा मजशीं जाण । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

३०४७ धनलोभ्याचें जाय धन । शोधितसे रात्रं दिन ॥ १ ॥ त्याची निंदा करतील लोक । रांडा पोरें थुंकती देख ॥ २ ॥ भिकेलागीं जेथें गेला । म्हणती काळतोंडा आला ॥ ३ ॥ हा तो धनलोभें भुलला । संचितें बरा नागविला ॥ ४ ॥ ऐसें धनाचें कारण । शरण एका जनार्दन ॥ ५ ॥

३०४८ पाया शोधोनियां बांधिताती घर । ऐसें या दुस्तर नरदेहीं ॥ १ ॥ म्हणती पुत्र माझे नातु हे कलत्र । मिळती सर्व गोत्र तये ठायीं ॥ २ ॥ संपत्ति देखोनि गिंवसिती तयासी । माझें माझें म्हणती रांडापोरें ॥ ३ ॥ चाले बरवा धंदा । बहिणी म्हणती दादा । आलिया दरिद्रबाधा । पळुनी जाती ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका करितसे विनंती । संतसंग चित्तीं जीवीं धरा ॥ ५ ॥

३०४९ डोळा फोडोनिया काजळ त्याला । नाक कापून शिमगा खेळला ॥ १ ॥ वेंचिता धन लक्ष कोटी । आयुष्य क्षणवि नोहे भेटी ॥ २ ॥ मिथ्या बागुलाचा भेवो । बाळें सत्य मानिती पहाहो ॥३॥ ऐसे मिथ्या नको मनीं । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

३०५० अविद्येचें भ्रांतपण । मिथ्या दावी साच धन ॥ १ ॥ तेथें गुंततीं लिगाडा । तेणें पडे पायीं खोडा ॥२॥ जन्ममरण भोंवरा । भ्रमें फिरसी निर्धारा ॥ ३ ॥ कळोनि कां रे वेडा होसी । एका जनार्दनीं न पाहसी ॥ ४ ॥

३०५१ संपत्ति देखोनि म्हणती माझें माझें । वागविती वोझें खरा ऐसा ॥ १ ॥ क्षणिक आयुष्य क्षणिक संपत्ति । न कळे तयाप्रती अंध जैसा ॥ २ ॥ जाणार जाणार सर्व हें जाणार । हरीनाम सार जपें सदा ॥३॥ जनार्दनाचा एका सांगतसे मातु । धरी रे सांगातु वैष्णवांचा ॥ ४ ॥

## विषय

३०५२ मातला बोकड भलत्यावरी धांवे । तैसा भरला विषय हावे ॥ १ ॥ नाठवेचि आपपर । सदा हिंडे परद्वार ॥२॥ शिकविलें मानीं वोखटें । उताणा नेटें चालतसे ॥ ३ ॥ कर्म धर्म नावडेचि कांहीं । विषयप्रवाहीं बुडतसे ॥ ४ ॥ एका जनार्दनी तें पामर । भोगिती अघोर कुंभपाक ॥ ५ ॥

३०५३ परदारा परधन । येथें धांवतसे मन ॥ १ ॥ मन जाय दूरदेशीं । वोढुनी आणा चरणापाशीं ॥२॥ दुर्बुद्धि मनाचे ठाणे । मोडोनी टाका पुरतेपणें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । आपुले पदीं राखा जाण ॥ ४ ॥

३०५४ जोडोनिया धन नाशी वेश्या घरीं । अतिथी आलिया द्वारीं नाहीं म्हणे ॥ १ ॥ वेश्या ती अमंगळ जगा भुलवणी । पडे निशीदिनीं तेथें श्वान ॥ २ ॥ घरीं कोणी अभ्यागत आलिया मागता । धांवतो सर्वथा श्वानासम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा दुराचार । नरक अघोर भोगीतात ॥ ४ ॥

३०५५ वेश्येचिया घरा जातो उतावीळा । जातांचि देउळा रडतसे ॥ १ ॥ काय ऐशा पामरा सांगावें गव्हारा । भोगितो अघोरा नर्कवासा ॥ २ ॥ एका जनार्दनीं नको त्याचा संग । अंतरे पांडुरंग तयाचेनि ॥ ३ ॥

३०५६ करितां विषयाचें ध्यान । जीव होय मनाधीन ॥ १ ॥ ऐसे भुललें विषयासी । अंचवले परमार्थासी ॥ २ ॥ संसार सागरीं वाहिला । गोड परमार्थ राहिला ॥ ३ ॥ गेलें भुलोनिया मन । विसरला आठवण ॥ ४ ॥ जन्मा येवोनियां देख । एका जनार्दनीं ते मूर्ख ॥ ५ ॥

३०५७ सलगीनें सर्प हातीं तो धरिला । परी दंश तो वहिला करील बापा ॥ १ ॥ तैसें विषयांसीं सलगी पैं देतां । नेती अधःपाता प्राणीमात्र ॥ २ ॥ विष उत्तम चांगलें घातलेंसें मुखीं । परी प्राण शोखी क्षण मात्रें ॥ ३ ॥ जाणोनी जाणोनी नको भुलूं वायां । एका जनार्दनीं पायां भजे आधीं ॥ ४ ॥

३०५८ बंधनाचा फांसा बैसलासे गळीं । मीनापरी गिळी सर्वकाळ ॥ १ ॥ आमीष विषया भुलला पामर । भोगिती अघोर चौऱ्यांयशी ॥ २ ॥ गुंततांचि गळीं जाईल कीं प्राण । हें तो अधम जना न कळे

कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न कळेचि मूढा । सांगावें दगडा किती किती ॥ ४ ॥

३०५९ इंद्रियें नाना छळिती पामरें । समाधान शरीरें नोहे कधीं ॥ १ ॥ ज्याचा जो व्यापार करती सैरावैरा । परी त्या सर्वेश्वरा न भजती ॥ २ ॥ विषयाचें कामें करिती विवंचना । परी नारायण न स्मरती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कृपा न होतां पूर्ण । इंद्रियां समाधान केवीं होय ॥ ४ ॥

३०६० काम क्रोध मद मत्सर शरीरीं । रात्रंदिवस निर्धारीं छळिताती ॥ १ ॥ आशा तृष्णा भ्रांती भुली हे वासना । सदोदित मना छळिताती ॥ २ ॥ एका जनार्दनीं यांचा टाकीं संग । मग पांडुरंग हातीं लागे ॥ ३ ॥

३०६१ अमृत विकूनि कांजी प्याला । तैसा नरदेह गमाविला ॥१॥ लाहोनि उत्तम शरीर । वेंचिलें तें विषयपर ॥ २ ॥ ऐशी मूर्खाची गोष्टी । एकनाथ देखोनि होतसे कष्टी ॥ ३ ॥

३०६२ श्वानाचिये परी धांवे । विषयासक्त जीवें भावें ॥ १ ॥ नेणे मान अपमान । सदा विषयावरी ध्यान ॥ २ ॥ नाहीं देवाची स्मृती । सदा लोळे विषयावरती ॥ ३ ॥ नाठवेचि कांहीं धंदा । भुलला तो विषय मदा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देवा । नाठवी अभागी न करी सेवा ॥ ५ ॥

३०६३ श्वानाचा तो धर्म करावी वसवस । भलें बुरें त्यास न कळे कांहीं ॥ १ ॥ वेश्यांचा धर्म द्रव्य तें हरावें । भलें बुरें भोगावें न कळे कांहीं ॥ २ ॥ निंदकाचा धर्म निंदा ती करावी । भलें बुरें त्यागावी न कळे कांहीं ॥ ३ ॥ सज्जनांचा धर्म सर्वां भूतीं दया । भेदाभेद तया न कळे कांहीं ॥ ४ ॥ संतांचा तो धर्म अंतरीं ती शांती । एका जनार्दनीं वस्ती सर्वां ठायीं ॥ ५ ॥

३०६४ चंदनाचे झाडा भुजंग वेष्टला । प्राणी तो गुंतला तैसा व्यर्थ ॥ १ ॥ कमळणी पुष्पीं भ्रमर गुंतला । प्राणी वोथंबला जयापरी ॥ २ ॥ मंजुळ गायनीं कुरंग वेधिला । प्राणी तो गुंतला तैशापरी ॥ ३ ॥ मोहळ कंदासी मक्षिका गुंतली । तैशी परी जाहली प्राणियासी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं गुंतू नको वांया । जाशी भोगावया सुखदुःख ॥ ५ ॥

३०६५ बहु बोलतां वो तोंडें । नायकती जाहले लंडे ॥ १ ॥ करिती कुंथाकुंथी । शिकविलें नायकती ॥ २ ॥ फजितखोर खर । तैसा अभागी पामर ॥ ३ ॥ सुनी धांवे वसवसी । तैसा झोंबे विषयासी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण । शिकवितां नायके ज्ञान ॥ ५ ॥

३०६६ तरठ्या तरठ मारूं केला । बुडत्याचे डोई दगड दिला ॥ १ ॥ तैसें जन्मोनियां प्राणी । विषयानें गेले भुलोनी ॥ २ ॥ अंधाचे संगती । कोणसुख चालतां पंथीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देवा । नोहे सांगात बरवा ॥ ४ ॥

३०६७ विषयालागीं उपाय जाण । नानापरी करिसी शीण ॥ १ ॥ पोट भरावया भांड । वाजविताती जैसें तोंड ॥ २ ॥ विषयवासना ती थोर । वरी दाविती आदर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । तंव न चुके देहींचें पतन ॥ ४ ॥

३०६८ दुःखाचीया भोगीं कोडी । रसना गोडी बाधक ॥ १ ॥ पाहतां रस उत्तम दिसत । भीतरीं रोगाचें गळ गुप्त ॥ २ ॥ गळीं आडकला जो मासा । तो जीत ना मरे चरफडी जैसा ॥ ३ ॥ जन्ममरण लागलें खांदी । एका जनार्दनीं धरा शुद्धी ॥ ४ ॥

३०६९ अडके कमळिणी कोशीं । भ्रमरु जैसा आमोदासी ॥ १ ॥ तैसा विषया लोधला । रामनामें विवंचला ॥२॥ कोरडें काष्ठ भेदोनिया जाये । तो कमळादळीं गुंतला राहे ॥ ३ ॥ ऐसा विषयीक सायासी । एका जनार्दनीं धरी मानसीं ॥ ४ ॥

३०७० साकरेची गोडी साकर सांडूनी उभी घडी । तैसें आयुष्य जोडिलें जोडी नरदेहा ॥ १ ॥ मोतियाचे अवदाणें घालिताती अंगीं । भोगावया लागी विषयसुख ॥ २ ॥ गेलें गेले बापा हित हातोहातीं । पुढें आली राती काळवंखी ॥ ३ ॥ आयुष्याच्या शेवटीं सुखाचिया गोष्टी । काळा नळा पोटीं पडशील बापा ॥ ४ ॥ सोलीव सुकृत भरूनियां मापा । विषयासाठीं पाहे पा लावितोसी ॥ ५ ॥ अमृत जोडोनि सायासी गळीं कां लावितोसी । घालुनी मत्स्यासी कवण काज ॥ ६ ॥ मीनली चिंतामणीची शिळा घोटिव चौखळा । कां रे नेऊनी पायातळा रचितोसी ॥७॥ तेथें जें जें कांहीं चिंतीसी तें अधिकची पावसी । नरकासी चौपासी वाढविली ॥ ८ ॥ कल्पतरु देखोनि

डोळां उभा राहुनी तया तळां। म्हणसी मर मर निर्फळा काय करूं ॥ ९ ॥ तेथें मर मर उच्चारिलें। मरण अधिक जालें। तुझिया कल्पना केलें वैर तुज ॥ १० ॥ येवोनि ये जनीं जन्म उत्तम योनी। कां रे भजन नारायणीं चुकलासी ॥ ११ ॥ जंववरी आयुष्य आहे तंववरी हिताची सोये। एका जनार्दनीं शरण जाये एकपणें ॥ १२ ॥

३०७१ व्याघ्रमुखीं सांपडतां गाय। तेथें धांवण्या कोण जाय ॥ १ ॥ तैसा विषयभोग साचा। भोगितां सुखाचा सुख म्हणती ॥ २ ॥ येतां यमदूतें बापुडी। कोण सोडी अधमासी ॥ ३ ॥ म्हणोनि मारितसे हाका। भुलूं नको संसारा ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं। सोडवील धनी त्रैलोक्याचा ॥ ५ ॥

३०७२ भोगितां काम भोगाचे सोहळे। परी अंतःकाळीं कळे वर्म त्याचें ॥ १ ॥ चालतां देह भोगातें भोगिती। अंतःकाळीं होती दैन्यवाणे ॥ २ ॥ भुलला पामर धरुनी भोग आशा। पुढें यमपाश कळेचिना ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न कळेचि वर्म। कोण भवकर्म सोडवील ॥ ४ ॥

३०७३ विषयाचे सुख मानितो पामर। भोगितो अघोर नरकगती ॥ १ ॥ मारिती ताडिती यमाचे किंकर। कोण सोडी साचार त्यासी तेथें ॥ २ ॥ कळोनि पडती न कळोनि पडती। कोण होईल गती न कळे तयां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं येतसे करुणा। म्हणोनि वचना बोलणें हें ॥ ४ ॥

३०७४ छेदीं विषयाचा समूळ कंदु। मग भेदु तुटेल ॥१॥ मूळ छेदितां वृक्ष खुडे। तैं समूळ विषय उडे ॥ २ ॥ ऐसा अनुराग धरी मनीं। देईं विषयासी पाणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गोडी। सहज परमार्थ उघाडी ॥ ४ ॥

३०७५ विषया होउनी उदास। सांडी संसाराची आंस ॥ १ ॥ तरीच पावाल चरण। संतसेवा घडेल जाण ॥२॥ होऊन उदास वृत्ती। भजन करा दिनरातीं ॥३॥ ऐसी आवड धरा मनीं। शरण एका जनार्दनीं ॥४॥

३०७६ कल्पनेचे जळीं वासना कल्लोळी। बुडाले भवजळीं नामहीन ॥ १ ॥ तयाच्या धांवण्या कोण धांवे देव। ऐसा तो उपाय नेणेचिना ॥२॥ दुःखाचे डोंगर भोगिती बापुडी। कोण काढाकाढी करील त्यांची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांवाचूनियां। त्या अभाग्याची दया कोण करी ॥ ४ ॥

३०७७ न सुटेचि आशा गुंते बळें पाशें। दुःखाचिया सरसें म्हणे देव ॥ १ ॥ ऐसे अमंगळ गुंतले कर्दमीं। भोगिताती कर्मीं जन्मदशा ॥२॥ एका जनार्दनीं संतासी शरण। गेलिया बंधन तुटे वेगीं ॥ ३ ॥

३०७८ फजितखोरांचे जीवीं। लाज नाहीं सर्वथा ॥ १ ॥ सांगतां ते न धरती मनीं। नायकती कानीं शिकाविलें ॥ २ ॥ म्हैसा जैसा उन्मत्त मदें। कामछंदें तेवीं नाचे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ते पामर। जन्म वेरझार भोगिती ॥ ४ ॥

३०७९ आवडीं विष खाउनी मेला। तो स्वयें नरका गेला ॥ १ ॥ कवणा कवण ठेवी दोष। ऐसा मूर्ख तो तामस ॥२॥ अमृत सांडुनी कांजी प्याला। तैसा नरदेह गमाविला ॥ ३ ॥ लाहूनि उत्तम शरीर। गमाविलें परिकर ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं। कोण लाभ जाहली हानी ॥५॥

३०८० हें तों अवघे फजितीचें भांड। अंतकाळीं तोंड काळें करिती ॥१॥ चालतां इंद्रियें म्हणती माझें माझें। अंतकाळींचें वोझें न घेती हे ॥ २ ॥ जरा आलिया निकट भरुनी। जाती हे पळोनि आपुलें गृहां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धरी हा विश्वास। रामनामीं ध्यास सुखें करी ॥ ४ ॥

३०८१ आळस निद्रा सांडी। रामनाम म्हणे तोंडी ॥ १ ॥ धन वित्त मान। हें तो श्वान विष्ठेसमान ॥२॥ पुत्र पत्नी संसार। वायां व्यर्थचि भार ॥ ३ ॥ हें पदें सांडी मनें। एका जनार्दनीं जिणें ॥४॥

३०८२ हींच दोनी पैं साधनें। साधकें निरंतर साधणें ॥१॥ परद्रव्य परनारी। यांचा विटाळ मनें धरी ॥ २ ॥ नको आणिक उपाय। सेवी सद्गुरूचे पाय ॥ ३ ॥ म्हणे एका जनार्दन। न लगे आन तें साधन ॥४॥

## संसार.

३०८३ थोर गर्भींची यातना। आठवितां दुःख मना ॥ १ ॥ नऊ मास वरी। पचे विष्ठेचे दाथरीं ॥ २ ॥ जन्म होतांचि जननी। सुख मानी अनुदिनीं ॥ ३ ॥ बाळ वाढतसे सायासें। तों तों माउली संतोषे ॥ ४ ॥

तारुण्याचा येतां भरा। मातेसी करी पाणउतारा ॥५॥ पावला सर्वे म्हातारपण। नाकीं तोंडीं लाळ जाण ॥६॥ नाठवेचि राम राम। एका जनार्दनीं तो आधम ॥७॥

३०८४ धन मानबळें नाठविसी देवा। अंतकाळीं तेव्हां कोण आहे ॥ १ ॥ यमाचे ते दंड बैसतील माथां। मग तुज रक्षितां कोण आहे ॥ २ ॥ माता पिता बंधू सोइरे धाइरे। जोंवरी इंद्रियें चालताती ॥ ३ ॥ सर्वस्व कामिनी म्हणविसी कांता। ती ही केश देतां रडूं लागे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं जातांचि शरण। स्वप्नीं जन्ममरण नाहीं नाहीं ॥ ५ ॥

३०८५ जरा पावली निजसंधी। अनिवार येती आधीव्याधी ॥ १ ॥ पायीं पडतसे वेंगडी। अंघारीं धरणें लागे काठी ॥ २ ॥ डोळांचि पडे तोंडा लाळ। नाका येत शेंबुड वोंगळ ॥ ३ ॥ चुंबन देतां पोरांप्रती। बाउ म्हणोनि पोरें पळती ॥ ४ ॥ ऐशी दशा येईल अंगा। एका जनार्दनीं शरण रिघा ॥ ५ ॥

३०८६ बधिर जाले पैं श्रवण। जाले दंत उन्मळण ॥ १ ॥ अझुनी काय धरिसी माया। गेलीं इंद्रियें विलया ॥ २ ॥ नाकीं श्लेष्माचा खळाळ। तोंडावाटे पडे लाळ ॥ ३ ॥ टरपुर वाजे गुदद्वार। चरणीं सांडिला व्यापार ॥४॥ वृषण आलें गुडघ्यावरी। शिश्न लोंबे पीठचावरी ॥ ५ ॥ कफवात पैं सुटला। शरीर कांपे चळचळा ॥ ६ ॥ लहान थोर ते हांसती। फे फे वांकुल्या दाविती ॥७॥ वागतां चांचपडे भिंती। पोरें बाऊ म्हणोनी पळती ॥ ८ ॥ भार्या केली रे आवडी। ती तुजवर बोटें मोडी ॥ ९ ॥ स्त्रिये पाहिजे पुरुषभोग। तुज लागला खोकला रोग ॥ १० ॥ तुज जाणें निरयाकडे। ती काजळकुंका रडे ॥ ११ ॥ प्राण आला डोळियासी। कैसा स्वार्थ न सांडिसी ॥१२॥ आंगण जालें रे विदेश। किती करिसी विषयसोस ॥ १३ ॥ आप्त म्हणती कां मरेना। पालटु जाला याचिया चिन्हा ॥ १४ ॥ एका जनार्दनीं निष्काम। भजा भजा रे परब्रह्म ॥ १५ ॥

३०८७ डोळां न दिसे न्याहारी। दृष्टी जाली पाठी मोरी ॥ १ ॥ अझुनी काइसा रे मोहो। मिथ्या विषयाचा संदेहो ॥ २ ॥ कानीं बैसलीसे टाळी। आली यमाची उथाळी ॥ ३ ॥ अंग वाळलें कांचरी। चंद्रबिंब चढलें शिरीं ॥ ४ ॥ शिश्न अंगुळी सांडूं मागें। मूत्रीं चोरपान्हा लागे ॥ ५ ॥ नाना विषयीं करीन सुखी। म्हणतां स्त्री प्रत्यक्ष थुंकी ॥ ६ ॥ वेश्या धन घेउनी सांडी बोला। स्त्री वार्धक्यें घाली टोला ॥७॥ अग्नी आंचवल्या पोळी। पुत्र नाना स्नेह जाळी ॥८॥ लाळ सुटलीसे तोंडें। तरी खेळवीं नातुंडें ॥ ९ ॥ मान कापुली विषयावरी। मरण चढलेसें शरीरीं ॥ १० ॥ बळ प्रौढी स्त्रीनें धन। क्षीण जाल्या उदासीन ॥ ११ ॥ पाठीं बैसविली आवडी। शेखीं नागउनी सोडी ॥ १२ ॥ पुरुष वार्धक्य नावडे। मेल्या कानकेशा रडे ॥ १३ ॥ दांत पडोनी सांगे गोष्टी। नाक लागतसे हनुवटी ॥ १४ ॥ मोह ममता सांडी काम। अखंड जपे रामनाम ॥ १५ ॥ रामनामें होईल हित। येऱ्हवी बुडाले स्वाहित ॥ १६ ॥ एका जनार्दनीं पुरा। बालतारुण्य न रिघे जरा ॥ १७ ॥

३०८८ बारा वर्षे बालपण गेलें। परी रामनाम मुखीं नाहीं आलें ॥ १ ॥ अहा रे मूढा जन्मलासी दगड। गमाविलें वाड आयुष्याची ॥ २ ॥ बारा वर्षे तारुण्य अवस्था। कामक्रोधें लाहो घेतला पुरता ॥३॥ बारा वरुषें वृद्धाप्य आलें समुळी। जरा व्याधीं देहासी कवळी ॥ ४ ॥ ऐसें आयुष्य गेलें वायांविण। एका जनार्दनीं म्हणे नाहीं घडलें भजन ॥ ५ ॥

३०८९ देहो जैं पासूनि झाला। तैं पासूनि मृत्यु लागला ॥ १ ॥ साप बेडूकांते गिळी। बेडूक मुखें माशी कवळी ॥ २ ॥ ऐसा काळ गिळिंतो जना। न कळेचि बुद्धिहिना ॥ ३ ॥ मरण जाणती वापुडी। धरिती प्रपंची आवडी ॥ ४ ॥ ऐसे पामर आत्मघाती। यासी महा होये फजिती ॥५॥ असो जनीं जनार्दन। एका जनार्दनीं शरण ॥ ६ ॥

३०९० जन्मलें तें बाळ। परी वाट पाहे काळ ॥१॥ नाहीं संतसमागम। सदा विषयाचें काम ॥ २ ॥ मुखीं रामनाम नाहीं। सदा संसारप्रवाही ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भुलोन। स्त्रीअधीन जाहला दीन ॥ ४ ॥

३०९१ आमीष देखोनि मीन गुंतलासे गळीं। तैसा काळ बळी पाश घाली ॥ १ ॥ आप्त गोत्रज असोनि जवळी। नेताती बळिलीं यमकाळ ॥२॥ दांत विचकुनियां म्हणती गेला गेला। ऐशा अभाग्याला काय बोध ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मनुष्य देहीं मूढ। प्रत्यक्ष दगड अवनीभार ॥ ४ ॥

३०९२ जाणार जाणार देह हा जाणार। काय उपचार करिसी वायां ॥ १ ॥ मृत्तिकेचें घर बांधिता खचलें। तैसें परी जाहले न कळे तुज ॥ २ ॥ गृह-

धनदारा पुत्रपौत्र वायां। स्मरें देवरायां एका भावें ॥३॥ एका जनार्दनीं घेई अनुतापा। चुकवी खेपा हें जन्म-मृत्यु ॥ ४ ॥

३०९३ धनदारापुत्र अपत्यें म्हणसीं माझें। परी हें काळाचें खाजें जाणें बापा ॥ १ ॥ गंगेलागी पूर अवचित आला। लोटोनियां गेला मागुती जैसा ॥ २ ॥ तैसा याचा विश्वास न धरीं तूं मनीं। यमाची जाचणी तुजसी होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोडोनि देई संग। नाम तूं अभंग हरीचें वदे ॥ ४ ॥

३०९४ ज्याचें आयुष्य नोहे लेखा। तेहि देखा निमालें ॥ १ ॥ इतरांचा पाड कोण। नेमिले ज्ञाण न चूके तें ॥२॥ आणिलें तें उसनें साचा। देणें तयाचा प्रकार ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। करी विनवणी सर्वांसी ॥ ४ ॥

३०९५ पिता पुत्र नातु सर्व काळें ग्रासिले। उरले ते गेले काळमुखीं ॥ १ ॥ सायास करूनि वाढविति माझें। परी काळाचें हें खाजें नेणती ते ॥ २ ॥ बाळ-तरुण वृद्धदशातें पावती। परी न म्हणती रामराम ॥३॥ एका जनार्दनीं भूलला गव्हार। न करीं विचार स्वहिताचा ॥ ४ ॥

३०९६ एक पाठी एक पुढा। आहे मरणाचा हुडा ॥ १ ॥ आज मेलें उद्या मरती। मागें राहती तेहि रडती ॥ २ ॥ मरण जाणोनियां पाही। उगेच बोलती प्रवाही ॥ ३ ॥ ऐसी उगेच भूली पडली देखा। एका जनार्दनीं भुलले एका ॥ ४ ॥

३०९७ नको गुंतूं मायाजाळी। काळ उभा हा जवळीं ॥ १ ॥ नाहीं तुजलागी तत्वतां। सोडविणार मातापिता ॥ २ ॥ स्त्रिया पुत्र बंदीजन। करिती तुज लागी बंधन ॥ ३ ॥ धनवित्त कुळें। सोडतील अमंगळें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन। ठेवीं गुरुपायीं बांधोन ॥ ५ ॥

३०९८ इष्ट मित्र बंधु चूलते पुतणे। काळाचे पोसणें सर्व देख ॥ १ ॥ यमाची यातना पडतां जीवा ती। कोणा काकुलती करिसी मूढा ॥ २ ॥ जोंवरी आहे तुज जवळी धन। तोंवरी पिशुन म्हणती माझें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जवळी आला काळ। तेव्हां ते निर्बळ सर्व होती ॥ ४ ॥

३०९९ एक एक मरती पाहती। दुजियाची भ्रांती कैशी बापा ॥ १ ॥ अरे ग्रासिलें शरीर काळें देखा। परी तया मूर्खा न कळे कांहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं भूलला प्रपंचा। कोण दुःखा त्याच्या सोडवील ॥३॥

३१०० कन्यादान केल्या पाहें। तो आपलें घरां घेउनि जाये ॥ १ ॥ वायां कायशी तळमळ। तेथें कांहीं न चले बळ ॥ २ ॥ आयुष्याचे अंतीं। पडसी काळाचीये हातीं ॥ ३ ॥ करी कांहीं पां विचार। कवणाचें घरदार ॥ ४ ॥ जनीं जनार्दनीं एकला। एका जनार्दनीं देखिला ॥ ५ ॥

३१०१ पहा पहा उसां बैसलासे काळ। भरली ते वेळ न चुके मग ॥ १ ॥ सर्वेहि संबंधी असतां जवळी। नेईल तात्काळीं तुजलागीं ॥ २ ॥ पाहे पां तो बोका बैसतो टपुनी। जातो उचलुनी घेउनी अंश ॥३॥ एका जनार्दनीं किती भाकूं कींव। नायकती जीव गुंतले ते ॥ ४ ॥

३१०२ काळाचे आहारीं पडती। शेवटीं निर्धारीं ॥ १ ॥ ऐसें असोनि ठाउक मना। परि न स्मरे रामराणा ॥ २ ॥ गुंतले ते मायाजाळीं। न कळे गळीं लागती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। वाचे न म्हणती नारायण ॥ ४ ॥

३१०३ नेमिला काळ लागला पाठीं। हें तो दिठीं पाहती ॥ १ ॥ एकापाठीं दुसरें जाय। वायां हाय हाय उरते ॥२॥ न सोडीं तो लागला मागें। शिणती वाउगे मूर्ख ते ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। पडती वदनीं काळाचे ॥ ४ ॥

३१०४ अगाध जीवनीं मत्स्य ते असती। नाहीं दुःखप्राप्ती तयां कधीं ॥ १ ॥ परी आलिया ढीवर घालितसे गळ। मग तळमळ करुनी काय ॥ २ ॥ आमीष देखोनि भक्षावया जाय। परी नेणे काळ आहे म्हणोनियां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्राणी ते भुलले। आमीषा गुंतले मीनापरी ॥ ४ ॥

३१०५ देखती निमाले आपुले पूर्वज। पितापुत्र सहज तेहि गेले ॥ १ ॥ नाहीं त्या यमासी करुणा कवणाची। भोगविती दुःखाची नाना योनी ॥ २ ॥ सुकृत पदरीं मूळ नाहीं दोरा। घालितां अघोरा अंत न लगे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं तेथें सुख। भोगविती दुःख न सांगवे ॥ ४ ॥

३१०६ आयुष्य जातें पळ पळ तुजला कैसें कळेना। दो दिवसांची तनु हे साची आलासी रे पाहुणा ॥१॥

चौसष्ट घडीयामाजीं रात्र गेली समजेना । आयुष्य खातो काळ तुम्ही राम कां रे म्हणाना ॥ २ ॥ नरदेह पांचांचा आणिलासे उसना । कांहीं तरी स्वहित करा व्यर्थ कां रे वल्गना ॥ ३ ॥ राम दृढ धरशील तरी तुटेल यातना । भ्रांती माया काढी नको पडूं बंधना ॥ ४ ॥ वाल्मिक तरला उलट्या नामस्मरणा। एका जनार्दनीं म्हणे जाई साधुदर्शना ॥ ५ ॥

३१०७ जैसा गळीं लागला मासा । तैसा फांसा यमाचा ॥ १ ॥ जाणते परी वेडे होती । फेरे घेती चौऱ्यांयशी ॥ २ ॥ परी नेघे रामनाम । सदा काम विषयाचे ॥ ३ ॥ म्हणे जनार्दनीं एका । यासी सुटका कैसेनी ॥ ४ ॥

३१०८ घटिका भरतां न लगे वेळ । उभा काळ वाट पाहे ॥ १ ॥ कोणी नये रे सांगाती । वायां होतसे फजिती ॥ २ ॥ माप भरतां नाहीं गुंती । वायां कुंथी फळ काय ॥ ३ ॥ शरण रिघा जनार्दनीं । मोक्षदानीं उदार ॥ ४ ॥ एका विनवी जनार्दनीं । अंतकाळीं नाहीं कोणी ॥ ५ ॥

३१०९ देह अवसानीं काळाची तों संधी । पोहोंचली आधीं येवोनियां ॥ १ ॥ कोण सोडवील तुजलागीं बापा । श्रीराम जपा लवलाही ॥ २ ॥ छाया जैसी हाले नाशिवंत खरी। तैशीच ही परी देहाचिया ॥३॥ एका जनार्दनीं भुलूं नको माया । काळ तो लवलाह्या नेईल बापा ॥ ४ ॥

३११० आळस करसी नाम घेतां । जासी यमाचिये पंथा । कोण ती सर्वथा । सोडवील तुजलागीं ॥ १ ॥ बंधु बहिणी नये कामा । काय सांगावें तुज अधमा । गुंतलासी स्त्रीभोग कामा । तेव्हां दूर पळती ते ॥ २ ॥ कोण्ही न होती कोणाचे । तूं म्हणसी मामे भाचे । एका जनार्दनीं साचे । कोणी नाहीं पामरा ॥३॥

३१११ काळें ग्रासिलें सकळ । उरला जाऊं नेदी वेळ । घटिका आणि पळ । रामनाम स्मरे जना ॥१॥ अरे आले नो संसारा । कांहीं तरी विचार करा । आयुष्याचा दोरा । तुटे तो न कळेची ॥ २ ॥ करुणा नाहीं तया यमासी । काढिती ओढिती जीवासी । भोगविता चौऱ्यांयशी । यातना ते दुस्तर ॥ ३ ॥ म्हणोनि येतसे करुणा । शरण एका जनार्दना । वाचे राम राम म्हणा । मग सुख पावाल ॥ ४ ॥

३११२ नरदेहीं सुखसोहळा संस्कार । परी तेथें विकार दैवयोगें ॥ १ ॥ बालत्वाचें सुख अज्ञान दशेंत। रामनाम मुखांत नये कधीं ॥ २ ॥ तरुण अवस्था विषयाचें ध्यान । नये तें भजन मुखीं कदा ॥ ३ ॥ जरेनें वेष्टिलें आलें वृद्धपण । एका जनार्दन भजन नेणें ॥४॥

३११३ भोगोनी नाना योनी । आलासी आतां या जनीं ॥ १ ॥ ऐसा धरी मागील आठव । करी देहाचे वाटीव ॥ २ ॥ नाहीं तरी जाशील वायां । पुनरपि यमालया ॥ ३ ॥ येतां जातां शिणतोसी । एका जनार्दनीं कां न भजसी ॥ ४ ॥

३११४ अल्प आयुष्य नरदेहीं जाण । कांहीं तरी भजन करी वाचे ॥ १ ॥ जाणार जाणार नरदेह जाणार । न चुके वेरझार जन्ममृत्यु ॥२॥ करी धंदा आठवी गोविंदा । वायां तूं आपदा नको घेऊं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पंढरी पाहून । तेथें न करी मनें ठेवणें देखा ॥ ४ ॥

३११५ पळ पळ आयुष्य खातसे काळ । कां रे होसी सबळ पोसना तूं ॥१॥ वाढविसी देह काळाचें भातुकें । कां रे तुज कौतुकें सुख वाटे ॥ २ ॥ नामस्मरण करितां लाजसी पामरा । भोगिसी अघोरा यमदंडा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांगतसे हित । कां रे न घ्या त्वरित हरिनाम ॥ ४ ॥

३११६ काळानें ग्रासिलें सावधान व्हा रे । सोडवण करा रे हरिनामें ॥ १ ॥ आयुष्य सरलीया कोण पां सांगाती । पुढें हो फजिती यमदंड ॥ २ ॥ उपाय तो सोपा नामाचा गजर । न करी विचार पुढें कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तूं कां रे अंधळा । देखतोसी डोळां सुख दुःख ॥ ४ ॥

३११७ आपुलिया हिता आपण जागिजे । वायां नागविजे देहीं देहा ॥ १ ॥ हाचि अनुताप घेऊनियां मना । करी पां चिंतना रामनाम ॥ २ ॥ नाहीं कांहीं मोल सुलभ फुकाचें । घेई सदा वाचे रामनाम ॥३॥ एका जनार्दनीं किती हें सांगावें। गुंतलें ते हावें नायकती ॥ ४ ॥

३११८ कां रे नागविसी काळा । मानिसी संसारसोहळा। शेवटीं तो गळां । यमपाश पडतील ॥ १ ॥ वाचे म्हणे रामनाम । आणिक नको दुजें काम । मोक्ष मुक्ति धाम । नामें एका जोडती ॥ २ ॥ वाउगें जप तप कर्म । याचा न धरी संभ्रम । वाचे गाय सदा नाम। तेणें सर्व जोडतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं

नेम । काया वाचा मनें सप्रेम। वाचे स्मरतसे नाम । श्रीराम सर्वदा ॥ ४ ॥

३११९ अशाश्वत देह काळाचें भातुकें। पंचप्राण कौतुकें खेळ तेथें ॥ १ ॥ जीव शिव दोन्हीं मध्य बैसाकार। व्यापारी व्यापार सर्व त्याचा ॥ २ ॥ जीव गुंतलासे विषयाचे वोढी। शिव जाणे गोरी आत्मस्वरूप ॥ ३ ॥ ऐसा हा खेळ अनादि पसर। एका जनार्दनीं निर्धार नाम जपा ॥ ४ ॥

३१२० देहाचिये माथां काळाची तो सत्ता। म्हणोनि सर्वथा घोका राम ॥ १ ॥ आदि मध्य अंतीं काळ लागलाहे। क्षणक्षणां पाहे वास त्यासी ॥ २ ॥ सर्व जाणोनियां अंधळे पैं होती। काळ नेतांचि देखती ते दुजा ॥ ३ ॥ परि रामनामीं न धरिती विश्वास। निकट समयास धांवाधावी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भुलले ते प्राणी। तया सोडवणी कोण करी ॥ ५ ॥

३१२१ येवोनियां काळ बैसलासे उसां। झांकितोसी कैसा डोळे आतां ॥ १ ॥ वाचे नारायण वदें तूं सादर। काळपाश साचार चुके जेणें ॥ २ ॥ वायां हा संसार करिसी हावभरी। काळाची तो फेरी निकट आली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नको यातायाती। संसार फजिती जन्मदुःख ॥ ४ ॥

३१२२ आला रे आला काळ निकटीं। रामनाम कोटी केव्हां जपसी ॥ १ ॥ बाळ तरुण वृद्ध दशा ती पावली। काळाची पडली छाया अंगा ॥ २ ॥ यातायाती करतां जन्म वायां गेला। परी नाहीं वदला मुखीं राम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं फजितखोर जिणें। सर्वांचि मरणें पुढती जन्म ॥ ४ ॥

३१२३ देह हा काळाचा जाणार शेवटीं। याची धरुनी मिठी गोडी काय ॥ १ ॥ जाणार जाणार जाणार हें विश्व। वाउगाचि सोस करसी काय ॥ २ ॥ प्रपंच काबाड एरंडाचे परी। रसस्वाद तरी कांहीं नाहीं ॥ ३ ॥ नाशिवंतासाठीं रडतोसी वायां। जनार्दनीं शरण रिघे तूं पायां ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भेटी होतां संतांची। मग जन्ममरणाची चिंता नाहीं ॥ ५ ॥

३१२४ सावधान सर्व आहे। तुझे हात आणि पाये। तोंवरी तूं जाये। तीर्थयात्रेकारणें ॥ १ ॥ सरलीया आयुष्यकाळ। इंद्रियें होतील विकळ। कांहीं न चले बळ। वाउगी ते तळमळ ॥ २ ॥ डोळे कान नाक आहे। तोंवरी संता शरण जाय। हीं मावळलीया होय। हाय हाय तुजलागीं ॥ ३ ॥ काय म्हणशी माझें माझें। हें तो शेवटींचें वोझें। एका जनार्दनीं दुजें। तुज कोण सोडवील ॥ ४ ॥

३१२५ काय याची मुखीं बैसे दांतखीळ। नामोच्चारा बळ क्षीण होतें ॥ १ ॥ काय याचे कर्ण बधिर पैं वहिले। हरिकीर्तनीं जाहले पांगुळ ते ॥ २ ॥ काय याचे नेत्रां अंधत्व ते आलें। न देखती सांवळें रूप कधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा तो चांडाळ। त्याचा मज विटाळ नको नको ॥ ४ ॥

३१२६ सुखरूप असतां म्हणे माझें माझें। संकट देखोनियां घाली देवावरी वोझें ॥१॥ पापी तो अधममती। कदा नेणें नामस्मरण गती ॥ २ ॥ नामा- वांचोनि गती नाहीं। ऐसें वेदशास्त्र बोलती पाहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे भुलला। पुनः अधम जन्मा आला ॥ ४ ॥

३१२७ होईं शरणागत भाकीं रे करुणा। तरीच बंधना चुकशील ॥ १ ॥ आपुलें तूं हित करूनियां घेईं। सदा वाचे गाईं रामनाम ॥ २ ॥ जंववरी आहे इंद्रियसंबंध। तंववरी तूं बोध करी मना ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मावळलिया दीप। सहजची खेप येईल बापा ॥ ४ ॥

३१२८ चौऱ्यांयशी लक्ष योनि फिरे। परी मनीं सोय न धरे ॥ १ ॥ दोंचि अक्षरांचे काम। अधम कुव्हारी रामनाम ॥ २ ॥ मरतीयां हांसे। आपण स्वयें मरतसें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भांड। जन्मोनि लाजविली रांड ॥ ४ ॥

३१२९ चौऱ्यांयशी लक्ष देहांप्रती। कोटी कोटी फेरे होती ॥ १ ॥ अवचट देह मनुष्य जन्म। तेथें साधावें परब्रह्म ॥ २ ॥ जन्मोनियां मनुष्य देहीं। परमार्थ साधिला तो नाहीं ॥ ३ ॥ सदा विपर्यी अनुसंधान। भुले प्रपंचीं अनुदिन ॥ ४ ॥ तया नोहे संतभेटी। एका जनार्दनीं जातां भेटी ॥ ५ ॥

३१३० देहाचि तों देह जोडीं। साधी परमार्थ घडी ॥ १ ॥ हेंचि निकें रे साधन। येणें न घडे बंधन ॥ २ ॥ देहीं देह शुद्ध पाहे। सहज परमार्थ होये ॥ ३ ॥ सांडोनियां देहीं आटी। एका जनार्दनीं तैं भेटी ॥ ४ ॥

३१३१ आयुष्य देहींचें जंव पुरलें नाहीं। तंवचि हृदयीं राम जपा ॥ १ ॥ आपुलेंच देहीं करा सोडवण। चुकवा पतन यमलोकीं ॥ २ ॥ संसाराचा छंद वाउगा

पसारा । यांत सैरावैरा हिंडूं नका ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धरा भरवंसा । श्रीराम सरसा वाचे वदा ॥ ४ ॥

३१३२ तूं म्हणशील बा हें माझें । वायां वहासी वाउगें ओझें ॥ १ ॥ सोडी दे टाकुनी दे परतां येई । रामनाम वाचे सदा गाई ॥ २ ॥ नामाचि जाण सत्य सार । वायां कां वहाशील भार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम सार । वेदशास्त्रीं हा निर्धार ॥ ४ ॥

३१३३ जन्ममरणाच्या चुकवा रे खेपा । यासी तो सोपा राममंत्र ॥ १ ॥ वेळोवेळां वाचे उच्चारावें नाम । तेणें निष्काम प्राणी होय ॥ २ ॥ सायास नाहीं अनायासें वर्म । वाचे रामनाम आठवावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामावीण कांहीं । आणिक थोर नाहीं कलीमाजीं

३१३४ सांडा वाउगे ते बोल । वाचे म्हणा विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥ तेणें तुटती यातना । भवपाश तुटेल जाणा ॥ २ ॥ बैसला जिव्हारीं । व्यापुनी ठेला तो अंतरीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ध्यान । ध्यानीं मनीं विठ्ठल पूर्ण ॥ ४ ॥

३१३५ शिमगीयाचे सणीं । रामकृष्ण न म्हणे कोणी ॥ १ ॥ महाशब्द उच्चारण ! कैसें भुललें अज्ञान ॥ २ ॥ गजरें शब्द करी । एका जनार्दनीं म्हणा हरी ॥ ३ ॥

३१३६ नामाचा उच्चार करितां कोणी हांसे । तयासी होतसे नरकवास ॥ १ ॥ साबडे बोबडे गावोत भलते । परी ते सरते पांडुरंगा ॥ २ ॥ अभाविकानें मांडिला पसारा । तया नाहीं थारा उभयलोकीं ॥३॥ एका जनार्दनीं भावावें भजन । दंभाचें कारण नाहीं देवा ॥ ४ ॥

३१३७ नेणतेपणा पांडुरंगा ध्याई । सदोदित गाई रामनाम ॥ १ ॥ मग तुज सोपे मार्ग ते असती । पांडुरंग चित्तीं दृढ धरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं काया वाचा मन । करी समर्पण देवापायीं ॥ ३ ॥

३१३८ कां रे नायकसी गव्हारा । कां रे न भजसी ईश्वरा ॥ १ ॥ सोपा मंत्र विठ्ठलराज । तेणें पुरे सर्व काज ॥ २ ॥ नको संसाराचें कोड । अंतकाळीं यमदंड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कींव भाकी । रामनाम वदा मुखीं ॥ ४ ॥

३१३९ मंत्रामाजीं मंत्र विठ्ठल त्रिअक्षरीं । जपतां निर्धारीं सुख होय ॥ १ ॥ म्हणोनिया करा लागपाठ बळें । संसारीं अंधळे होऊं नका ॥ २ ॥ संसारसागर भरला दुस्तर । विठ्ठल पैलपार नौका जगीं ॥ ३ ॥ तापत्रयें तापली भवार्णवी पिडीली । तयां विठ्ठलवल्ली प्रकाशली ॥ ४ ॥ जाणिवेचे डोहीं नको पडूं फेरे । विठ्ठल उच्चारें कार्यसिद्धी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं विठ्ठलाची आण । दुजा तारी कोण मज सांगा ॥ ६ ॥

३१४० एक वेळ वाचे वदे कां रे नाम । निरसे सर्व श्रम भवदुःख ॥१॥ नाम हे नौका नाम हें नौका । जगीं तारक देखा भाविकांसी ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम हें अमृत । सेवितां त्वरित मुक्ति होय ॥३ ॥

३१४१ घ्यावया वोखदाची वाटी । माता साखर दे चिमुटी ॥ १ ॥ तेणें घोटी गोडपणें । हरे व्याधी नाना पेणें ॥ २ ॥ तयासाठीं घावरी । माता होय ती निर्धारीं ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । तैसा लोभ ठेवा मनीं ॥ ४ ॥

३१४२ भवरोगा औषध जाण । नाममात्रा नारायण ॥ १ ॥ तेणें निरसे भवरोग । न लगे साधन अष्टांग ॥ २ ॥ कामक्रोधांची झाडणी । नामें होय तत्क्षणीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाममात्रा । उद्धरील कुळगोत्रा ॥ ४ ॥

३१४३ सुख एक आहे हरि आठवितां । इतर जपतां दुःख बहु ॥ १ ॥ ऐशी आठवण धरुनी मानसीं । हरि गावा मुखासीं दिननिशीं ॥ २ ॥ सारे दिन करा संसाराचा हेत । परी भजनीं प्रीत असो द्यावी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं धरूनि विश्वास । होई कां रे दास संतचरणीं ॥ ४ ॥

३१४४ नाथिलाचि देह नाथिला प्रपंच । नाथिली कचकच अवघी वांच ॥ १ ॥ नाथिलेंचि दान नाथिलेंचि धर्म । नाथिलेंचि कर्म नाथिलें हें ॥ २ ॥ नाथिला आचार नाथिला विचार । नाथिला अविचार सर्व देहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाथिलाचि देह । नाथिला संदेह मिथ्या जाणा ॥४॥

३१४५ स्वप्नवत देह स्वप्नवत संसार । नाहींच पारावार दुःखा तेथें ॥ १ ॥ काय त्याची गोडी लागलीसे मूढा । नाचतो माकोडा गारोड्याचा ॥ २ ॥ स्त्री पुत्र धन कवणाचे ते आप्त । वायां भुललें चित्त म्हणे माझें ॥ ३ ॥ सावध होउनी गाये रामनाम । एका जनार्दनीं विश्राम तेणें तुज ॥ ४ ॥

३१४६ जिता मायबापा न घालिती अन्न । मेल्या प्रेतावरी करिती पिंडदान ॥ १ ॥ पहा पहा संसारींचा कैसा आचारु । जिता अबोला मा मेल्या

उच्चारू ॥ २ ॥ जित्या मायबापा न करिती नमन। मेल्यामागें करिती मस्तकवपन ॥ ३ ॥ जित्या माय बाया धड गोड नाहीं। श्राद्धीं तळण मळण परवडी पाही ॥ ४ ॥ जित्या मायबापा गालीप्रदान। मेल्या त्याचेनी नांवें देती गोदान ॥ ५ ॥ जित्या मायबापा नेदी प्याया पाणी। मेल्या पितरांलागीं बैसती तर्पणीं ॥ ६ ॥ प्याया पाणी न घालिती सासरा जिता। पिंडापाशीं येती मग दंडवता ॥ ७ ॥ एका जनार्दनीं कृपेचें तान्हें। विधिनिषेध दोन्हीं आतळों नेदी मनें ॥ ८ ॥

३१४७ जगाची ती राहाटी। जैशी अंधाहातीं दिली काठी। विखलाची पाउटी। काय मार्ग दिसे ॥ १ ॥ तैसें भुलोनियां जन। गेले म्हणती माझें जाण। बा कवणाचे कवण। कामा नये शेवटीं ॥ २ ॥ चालतो पाहतो ऐकतो कानीं। दुजियाचे गुणदोष मनीं। नका आणूं चुकवा पतनीं। पुढील पेणें अंतरूं नका ॥ ३ ॥ हेंचि बोधाचें लक्षण। धरा हृदयीं याची खूण। शरण एका जनार्दन। वारंवार विनवितसे ॥ ४ ॥

३१४८ प्रपंचीं सदा सक्त। रामनामीं नाहीं चित्त ॥ १ ॥ तया म्हणावें ते काय। व्यर्थ शिणविली माय ॥ २ ॥ वायां जिणें पैं तयाचें। सदा मान दंभीं नाचे ॥३॥ एका जनार्दनीं शरण। तया सोडवील कोण

३१४९ कैंचे ध्येय ध्याता ध्यान। अवघें विषयावरी मन ॥ १ ॥ तेथें कैंचें कर्माचरण। सदा विषयींच मन ॥ २ ॥ कैंचा दोष कैंचा गुण। अवघें विषयींच मन ॥ ३ ॥ कैंचा बोध कैंचा भेद। सदा विषयीं तो धुंद ॥ ४ ॥ ऐसा भुलोनि विषयीं। एका जनार्दनीं बुडे पाही ॥ ५ ॥

३१५० ऐसें लागलिया ध्यान। अंतकाळीं ठसावें मन ॥ १ ॥ म्हणोनि भोगक्षयें जाण। मागील देहाचें अनुसंधान ॥ २ ॥ मागील सांडी रे दगडा। कां घालिसी पायखोडा ॥ ३ ॥ भुलोनि जाऊं नको वायां। एका जनार्दनीं लागे पायां ॥ ४ ॥

३१५१ वैर करूनी मन मारावें। मनाधीन पैं न व्हावें ॥ १ ॥ मनामागें जाऊं नये। मन आकळुनी मन पाहे ॥ २ ॥ मन म्हणे तें न करावें। मनीं मनासी बांधावें ॥ ३ ॥ मन म्हणेल तें सुख। परी पाहतां अवघें दुःख ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन। दृढ ठेवावें आकळुन ॥ ५ ॥

३१५२ पांथस्थ घरासीं आला। प्रातःकाळीं उठोनि गेला ॥ १ ॥ तैसें असावें संसारीं। जैसी प्राचीनाची दोरी ॥ २ ॥ बाळीं घराचार मांडिला। तो सर्वांचि मोडूनि गेला ॥ ३ ॥ एका विनवी जनार्दना। ऐसें करी गा माझ्या मना ॥ ४ ॥

३१५३ लटिका संसार। वाचे उच्चारी हरिहर ॥१॥ तरी दुःख निरसन। मना होय समाधान ॥ २ ॥ नित्य करी संतसेवा। शुद्धभावें भजें देवा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं घाला। तोचि संसार तरला ॥ ४ ॥

३१५४ दुबळ्यासी धन। सांपडलिया नोहे जतन। अभाविकांसी नाम जाण। तैशा रीतीं ॥ १ ॥ धनलोभीयाचे परी। जैसें चित्त धनावरी। तैसें हृदयामाझारी। नाम जपे ॥ २ ॥ कामीं पुरुषाचें ध्यान। तया न कळे आप्तजन। जैसा पारध्यार्धान। मग होय ॥ ३ ॥ अभाविकाचे बोल। नव्हती ते फोल। एका जनार्दनीं मोल। तया नाहीं वेंचत ॥ ४ ॥

३१५५ देह अशाश्वत नाम हें शाश्वत। म्हणोनि विवादत श्रुति शास्त्रें ॥ १ ॥ नाशिवंतासाठीं रामनाम तुटी। संसाराची आटी करिती जन ॥ २ ॥ जडत्व पाषाण नामेंचि तरलें। अभेद भरले देह ज्याचें ॥ ३ ॥ शुद्धभाव पोटीं वासना निर्मळ। संकल्प बरळ नच जाती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं दृढ हा निश्चय। राम सखा होय तया लागीं ॥ ५ ॥

३१५६ नाशिवंत सकळीक। शाश्वत माझा नायक ॥ १ ॥ बरवें मजला कळलें। पूर्वपुण्य तें फळलें ॥२॥ प्रपंच अवघा दुःखरूप। सुखरूप आत्मस्वरूप ॥ ३ ॥ स्वरूपीं रमल्या भय नाहीं। एका जनार्दनाचे पायीं ॥४॥

३१५७ उपाय यासी एक आहे। जो या जाय शरण विठ्ठला ॥ १ ॥ मग न चले काळाचें बळ। घेतां सरळ नाम वाचे ॥ २ ॥ आम्हां आलीसे प्रचीत। म्हणोनि मात सांगतों ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। विठ्ठल वदनीं उच्चारा ॥ ४ ॥

३१५८ नाकळे जो आकळ। भक्तिप्रेमाचा वत्सल। रूप धरूनि कोमळ। भीमातटीं उभा ॥ १ ॥ त्याचा छंद असो जनीं। काया वाचा आणि मनीं। संचिताची हानी। कदा काळीं न होवो ॥ २ ॥ जें जें होत

कर्माकर्म। अथवा उत्तम ते धर्म। प्राचीन ते कर्म। तयापासूनि सोडवी ॥ ३ ॥ एकविध धरी भाव। मागें देवापदीं ठाव। संचिताची हाव। तयापाशीं नुरेचि ॥४॥ ऐसा बळकट करी नेम। धरी संतसमागम। एका जनार्दनीं धाम। पावसी तूं वैकुंठ ॥ ५ ॥

३१५९ अवघा वायां संसार। अवघा सार विठ्ठल ॥ १ ॥ अवघे आले वायां जाती। फजिती हे समजेना ॥ २ ॥ अवघे नरदेहीं चोर। अवघा सार विठ्ठल ॥३॥ अवघें वायां जातें जन्म। अवघें कर्म चुकेना ॥ ४ ॥ अवघा लटिका साच नव्हे। अवघा वायां जात असे ॥ ५ ॥ अवघा जनीं भरला। एका जनार्दनीं उरला ॥६॥

३१६० शिणल्या भागल्या विठोबाचें नाम। विश्रांतीचें धाम पंढरपूर ॥१॥ म्हणोनियां करा नामाचिया लाहो। पंढरीचा नाहो पहा डोळां ॥ २ ॥ एका जनार्दनीं पुरविल आशा। पंढरीं निवासा पाहतांची ॥ ३ ॥

३१६१ तोचि एक संसारी। वाचे हरिनाम उच्चारी ॥ १ ॥ न करी आणिक पैं धंदा। नित्य आठवी गोविंदा ॥ २ ॥ हरिनाम चिंतना। ज्याची रंगली रसना ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत। ज्याचें समाधान चित्त ॥ ४ ॥

३१६२ चौऱ्यांयशी भोगितां। दुःख न सरे सर्वथा। संतसमागम घडतां। दुःख नासे तात्काळ ॥ १ ॥ नको गुंतूं या संसारीं। पडसी काळाचे आहारीं। संतसमागम धरी। तैं यातना चुकती ॥ २ ॥ मागें बहुतांचा उद्धार। संतीं केलासे साचार। तोचि हा धरी निर्धार। संतसंग सर्वदा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। संतसंग सुलभ जाण। भोळ्याभाविका तारण। समागम संतांचा ॥ ४ ॥

३१६३ आशापाश सोडोनि देईं। संतांशीं तूं शरण जाईं। चौऱ्यांशीचें भय नाहीं। प्राणिया तुज ॥ १ ॥ आवडीं धरीं संतसंग। कामक्रोधा होय भंग। षड्वैरीयां मार्ग। मोकळाची ॥ २ ॥ संतसंग धरितां चित्तीं। उपाधी ते सर्व तुटती। भावें होय मोक्षप्राप्ती। क्षणमात्रें ॥ ३ ॥ नाहीं आणीक साधन। संतसंगतीवाचून। शरण एका जनार्दन। संतसंग धरी ॥ ४ ॥

३१६४ पळभरी संतसंगती। कोटीयुगें तया विश्रांती। ऐसें बोलतसे श्रुती। पाहे पां जना ॥ १ ॥ वेदशास्त्र पुराण। महिमा संतांचाचि जाण। शुकादिक रंगून। रंगलें रंगीं ॥ २ ॥ अर्जुना उपदेशिलें। उद्धवातें बोधिलें। व्यासादिक रंगले। हृदयीं सदा ॥ ३ ॥ तें दृढ हृदयीं धरी। आणीक नको पडूं फेरी। एका जनार्दनीं धरीं। हृदयामाजीं ॥ ४ ॥

३१६५ देहीं धर्मविहित करी। अद्वैत भाव चित्तीं धरी। सर्वभावें नमस्कारी। एक आत्मा म्हणोनी ॥ १ ॥ तेणें तुटे रे बंधन। वाचे जपे जनार्दन। आणिक नको रे साधन। रामकृष्ण स्मर सुखें ॥ २ ॥ पवित्र त्याचें हें कुळ। आचार त्याचाची सुशील। अखंड जे सर्वकाळ। नाम जपती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम। परब्रह्म तें निष्काम। हरे भवश्रम। जन्मजराव्याधी ॥ ४ ॥

३१६६ येणें पंथें बहुत तरले निश्चिती। आवडी जे गाती विठोबासी ॥ १ ॥ तारक हा मंत्र सोपा पैं सर्वांसी। उच्चारितां अहर्निशीं सर्वसिद्ध ॥ २ ॥ पापा प्रायश्चित कलियुगीं नाम। आणिक सोपें वर्म संतसेवा ॥ ३ ॥ न लगे दंडन मुंडन तें आटीं। नाम घेतां होटीं सर्व जोडे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं संताशीं शरण। चुके जन्ममरण नानापीडा ॥ ५ ॥

३१६७ भाव धरी कां रे साचा। उच्चार करी नामाचा। पंथ विठोबाचा। दृढ धरी ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वाचे। वदे कां रे तूं साचें। दोष जातील जन्माचे। संदेह नाहीं ॥ २ ॥ आळस न करीं क्षणभरी। वाचे उच्चार श्रीहरी। यमयातना बोहरी। तेणें होय ॥ ३ ॥ भक्ति दृढ धरा नामीं। पडूं नको वाउगा श्रमीं। विठोबाचे नामीं। विश्वास धरीं ॥४॥ पतीत पावन। नाम हें सत्य वचन। एका जनार्दनीं चरण। दृढ धरीं ॥ ५ ॥

३१६८ दुस्तर सायास न करी। वाचे म्हणे हरि हरी। वैकुंठ पायरी। सोपी तेणें ॥१॥ तें नाम विठोबाचें। सुलभ वदे कां रे वाचे। अनंता जन्मांचें। दोष जाती ॥२॥ प्रचीत पाहे अर्धक्षण। नाम उच्चारी रे जाण। तेणें तुटे भवबंधन। यमदूतांचें ॥ ३ ॥ नाम घेतां उठाउठी। पातकांच्या पळती थाटी। पूर्वज उद्धरती कोटी। बेचाळिसांसहित ॥ ४ ॥ एका जनार्दनीं प्रेम। गाई तूं विठ्ठल नाम। आणिक सोपें वर्म। नाहीं नाहीं ॥ ५ ॥

३१६९ संसार असार जाणोनि निर्धार। केलासे विचार सनकादिकीं ॥१॥ नामीं आतुडलें नामीं आतुडलें। साधन साधिलें हेंचि एक ॥२॥ अर्जुना उपदेश हाचि सांगे कृष्ण। एका जनार्दनीं खूण बाणलीसे ॥३॥

३१७० घाली देवावरीं भार । आणिक न करी विचार । योगक्षेम निर्धार । चालवील तुझा ॥ १ ॥ वाचे गाय नामावळी । वासुदेवीं वाहे टाळी । प्रेमाचे कल्लोळीं । नित्यानंदें सर्वथा ॥ २ ॥ सोस घेई कां रे वाचे । रामकृष्ण वदतां साचें । धरणें उठतें यमाचें । निःसंदेह ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । करी रामनाम ध्वनीं । कैवल्याचा दानीं । रक्षी तुज निर्धारें ॥ ४ ॥

३१७१ नेम धरी विठ्ठलनामीं । पडूं नको वाउगा श्रमीं । सांगतसें गृहस्थाश्रमीं । साधन सोपें ॥ १ ॥ करीं नामस्मरण । वाचे म्हणे नारायण । चुकेल पतन । यातायाती ॥ २ ॥ इहलोक परलोक । धन्य होती सकळीक । उभय कुळ पावन देख । नाम स्मरतां ॥ ३ ॥ कलीमाजीं सोपें वर्म । उच्चारी तूं श्रीराम । आणिक नको श्रम । वाउगाचि ॥४॥ जाऊनी पाहे तूं पंढरी । उभा असे विटेवरी । एका जनार्दनीं धरी । चरण त्याचे ॥ ५ ॥

३१७२ बहू जन्मांचे सायास । विटे उभा हृषीकेश । पाहे पुंडलिकास । समचरणीं ॥ १ ॥ जाई जाई पंढरपुरा । स्नान करीं तूं भीवरा । जन्माचा तो फेरा । तेणें चुके ॥ २ ॥ व्रत करीं एकादशी । जागरण अहर्निशीं । संतसभेसरसी । टाळी वाहे ॥ ३ ॥ आळस तूं न करी । वाचे म्हणे विठ्ठल हरी । सांडोनियां थोरी । नाम घे आवडी ॥ ४ ॥ जनीं वसे जनार्दन । एका दृढ धरीं चरण । अर्पियेलें तन मन । विठ्ठल वाचें ॥ ५ ॥

३१७३ जया म्हणती नीचवर्ण । स्त्रीशूद्रादी हीनजन ॥ १ ॥ सर्वां भूतीं देव वसे । नीचा ठायीं काय नसे ॥ २ ॥ नीच कोठोनि जन्मला । पंचभूतां वेगळा जाला ॥ ३ ॥ तयां नाहीं कां जनन । सर्वांचि होत पतन ॥ ४ ॥ नीच म्हणोनि काय भुलीं । एका जनार्दनीं देखिली ॥ ५ ॥

३१७४ शास्त्रज्ञ पंडित हो कां वेदभक्त । परी हरिभजनीं रत वंद्य सदा ॥ १ ॥ भक्तीचें कारण तेणें सरतेपण । वाउगाचि शीण जाणिवेचा ॥ २ ॥ मी एक जाणतां पैल तो नेणतां । ऐसा विकल्प भावितां पतन जोडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विकल्प त्यजोनि । विठ्ठलचरणीं मिठीं घाली ॥ ४ ॥

३१७५ साधितां साधन योगी शिणताती । तेथें तुझी मति काय बापा ॥ १ ॥ उलट पालट न करी गोल्हाट । आहे तोचि नीट पाहे बापा ॥२॥ पंचाग्नी साधन धूम्रपान यज्ञ । आहे तो संपूर्ण उभा बापा ॥३॥ साधन खटपट वाउगा बोभाट । एका जनार्दनीं नीट उभा बापा ॥ ४ ॥

३१७६ शिणसी कां रे वायां । वाचें वदे पंढरीराया ॥ १ ॥ मग तुज नाहीं रे बंधन । पारुषे पां कर्माकर्म ॥ २ ॥ कर्म धर्म न करी तूं सोस । अवघा विठ्ठलचि देख ॥ ३ ॥ नको करूं कुंथाकुंथी । तेणें होते फजिती ॥ ४ ॥ अनुभव घेई देखा । एका जनार्दनीं सुखा ॥ ५ ॥

३१७७ जरी न बनेची गुरुवचनी । तरी बैसोनि सहजासनी । हेचि एक निर्वाणी । साधीजे सुख ॥१॥ सकळीं सकळपणें । अखंडरूप पाहणें । साध्य तेंचि साधनें । करुनी घेई ॥ २ ॥ जया संतचरणीं नाहीं भावो । त्यासी लडिवाळ संदेहो । तेथें साधनामाजीं देव । दिसे कैसा ॥ ३ ॥ हेतु मातु अनुमाना । आकळी दृढ एकमना । अधिकचि कल्पना । वाढविली ॥ ४ ॥ जाणीव नेणीव हे वाड । कल्पनेचें समूळ झाड । तुझे तुजाचि आड । उभे ठाकती ॥५॥ नाना हेतु विवंचना । सांडूनियां कल्पना । एका जनार्दना । शरण रिघे ॥६॥

## मुमुक्षूस उपदेश.

३१७८ लक्ष चौऱ्यांयशी फिरतां । अवचितां लाभ हातां ॥ १ ॥ उत्तम पावला नरदेह । त्याचे सार कांहीं पाहे ॥ २ ॥ नको श्रमूं विषयकामा । कांहीं तरी भजे रामा ॥ ३ ॥ मरण जन्मांच्या खेपा । निवारी निवारी रे बापा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं गुज सोपे । रामनाम सदा जपे ॥ ५ ॥

३१७९ देह सांडावा ना भांडावा । येणें परमार्थूची साधावा ॥ १ ॥ जेणें देहीं वाढे भावो । देहीं दिसतसें देवो ॥ २ ॥ ऐसे देहीं भजन घडे । त्रिगुणात्मक स्वयें उडे ॥ ३ ॥ त्रिगुणात्मक देहो वावो । एका जनार्दनीं धरा भावो ॥ ४ ॥

३१८० देहा ऐसें वोखटें । पृथ्वीमाजीं नाहीं कोठें ॥ १ ॥ वोखटे म्हणोनि त्यागावें । मोक्ष सुखार्थ नागवावे ॥ २ ॥ जैसे भाडियाचे घोडे । दिनु सरल्या पंथ मोडे ॥ ३ ॥ हेतु ठेवूनी परमार्था । एका जनार्दनीं ठेवी माथा ॥ ४ ॥

३१८१ देह आहे तुम्हां अधीन। तोंवरी करा भजन ॥ १ ॥ पडोनी जाईल शरीर। मग कराल विचार ॥ २ ॥ यातना यमाची अपार। कोण तेथें सोडविणार ॥ ३ ॥ आला नाहीं अंगीं घाव। तंव भजा पंढरीराव ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सांगे। वाउगे मार्गे नका जाऊं ॥ ५ ॥

३१८२ आलासी पाहुणा नरदेहीं जाणा। चुकवी बंधनापासूनियां ॥ १ ॥ वाउगाची सोस न करी सायास। रामनाम सौरसा जप करीं ॥२॥ यज्ञयागादिक न घडती साधनें। न्यून पडतां पतन सहज जोडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चुकवी वेरझार। करी तूं उच्चार अखंड वाचे ॥ ४ ॥

३१८३ काय मनुष्य देहाचें होय। नाशिवंत जाय शेवटीं ॥ १ ॥ हे तो काळाचें खाजें सहजीं। कांहीं-तरी राजी हरी करा ॥ २ ॥ जातां आयुष्य न लगे वेळ। स्मरे घननीळ रामराणा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाकी कींव। वायां हांव धरूं नका ॥ ४ ॥

३१८४ आयुष्य सरतां न लगे वेळ। यम काळ उभाची ॥ १ ॥ म्हणोनियां लाहो करा। विश्वंभरा आळवावें ॥ २ ॥ धरा संतसमागम। करा सप्रेम कीर्तन ॥ ३ ॥ जावें सुखें पंढरीसी। नाचा सरसें वाळुवंटीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल भेटी। होता लाभा नोहे तुटी ॥ ५ ॥

३१८५ काळाची ती ऐशी सत्ता। भरतां न पुरे एक क्षण ॥ १ ॥ यांत कांहीं हित करा। राम स्मरा निशिदिनीं ॥ २ ॥ तुमगे शेवट घडी येती। गुंतती तत्वता देह आशा ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं। करा सोडवणी देहाची ॥ ४ ॥

३१८६ काळे काळ वायां जातु। तेणें होये आयुष्य अंतु ॥ १ ॥ जाणोनियां रक्षी कोण। सोडी देहाचा अभिमान ॥ २ ॥ अभिमान सांडोनी झडकरी। एका जनार्दनीं दास्य करी ॥ ३ ॥

३१८७ अदृष्टीं असेल जे जे वेळे। तें तें मिळेल ते ते काळे ॥ १ ॥ ऐशी प्रारब्धाची गती। ब्रह्मादिकां न चुकती ॥ २ ॥ जे जै होते ज्या संचिती। तें तयांसवें चालती ॥ ३ ॥ जैशी जैशी कर्मरेषा। तैसें भोगणें सहसा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भोग। भोगविल्याविण न चुके सांग ॥ ५ ॥

३१८८ होणार जाणार न चुके कल्पांती। वाउगी कुंथाकुंथी करुनी काय ॥१॥ लिहिलें संचित न चुके कल्पांती। वाउगाचि भ्रांतीं फळ काय ॥ २ ॥ एका जनार्दना प्रारब्धाचा भोग। करिता उद्वेग न टळेची ॥

३१८९ नेणती ब्रह्मादिक ऐसें याचें कर्म। दृढादृढ वर्म सबळ मागे ॥ १ ॥ न चुके न चुके भोगिल्या वांचुनि। वांयाचि तो मनीं शीण वाहे ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण एकपणीं। गाय चक्रपाणी एक भावें ॥

३१९० प्रारब्ध क्रियमाण संचिताचा भोग। भोगिल्याची भोग तो न सुटे ॥ १ ॥ ज्या जैसी कल्पना त्या तैसी भावना। अंती ते वासना जडोनि ठेली ॥ २ ॥ एका जनार्दनीं वासना टाकुनी। हरीचे भजनीं सावध होई ॥ ३ ॥

३१९१ स्वप्नीं चालतां लवलाही। आडामध्यें पाडिला पाही ॥ १ ॥ धाबरुनी म्हणे धांवा। तैसे भुलले जीवजीवा ॥२॥ मृगजळ भासे नीर। वायां मायेचा पसर ॥ ३ ॥ सावध होऊनि जंव पाहे। वायां स्वप्न मिथ्या आहे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भुलले। वायां गेले अधोगती ॥ ५ ॥

३१९२ आंविया पाडूं लागला जाण। अंगीं असे आंबटपण ॥ १ ॥ सेजे मुराल्याची गोडी। द्वैतावीण ते चोखडी ॥ २ ॥ टीकाळलेंसे जे घालिती। तयासंगें दुजे नासती ॥ ३ ॥ अग्निपोटीं निपजे अन्न। वाफ न जिरतां परमान्न ॥ ४ ॥ एका जनार्दनीं गोडी। तोडी लिगाडीची बेडी ॥ ५ ॥

३१९३ मनासी खोचिलें मायेसी मोकलिलें। तें शास्त्र आपुलें सज्ज करी ॥ १ ॥ यापरी सैरा होय कारणीं। माया ममता दोन्ही मारूनियां ॥ २ ॥ जागृती स्वप्न निवटिलें पाहे। सुषुप्ती सळीयेलें सुखाचे धाये ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मांडियेलें खळें। धुरेंचि जिंकिलीं अंगींचेनी बळें ॥ ४ ॥

३१९४ जेथें पापपुण्य कर्माचरण। वाढविताहे जन्ममरण ॥ १ ॥ जया पुण्याचीया गोडी। स्वधर्म जोडिताती जोडी ॥ २ ॥ जया नाहीं हा विश्वास। असोनी न दिसे जगीं भाष ॥ ३ ॥ एका जनार्दनीं डोळा। असोनी देहीं तो अंधळा ॥ ४ ॥

३१९५ देहबुद्धि खुंटली येथें माया तुटली। देहाची स्थिति दैवाधीन ठेली ॥ १ ॥ दैवाचेनी बळें देहीचें कर्म चळे। स्वसुखाचे सोहळे विदेह भावें ॥ २ ॥

भोगी कां त्यागी अथवा हो योगी । देहीं देहपण न लगे त्याच्या अंगीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपणाच्या तुटी । सहज चैतन्यासी मीनला उठाउठी ॥ ४ ॥

३१९६ नरदेह परम पावन । तरी साधी ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ ब्रह्मज्ञानावीण । वायां होत असे शीण ॥ २ ॥ ब्रह्मज्ञानप्राप्ति नाहीं । वायां देहत्व असोनी देहीं ॥३॥ एका जनार्दनीं ज्ञान । तेणें होय समाधान ॥ ४ ॥

३१९७ नरदेहीं येउनी करी स्वार्थ । मुख्य साधी परमार्थ ॥ १ ॥ न होतां ब्रह्मज्ञान । श्वान सूकरां समान ॥ २ ॥ पशुवत जिणें । वायां जेवीं लाजिरवाणें ॥ ३ ॥ सायं प्रातर्चिंता । नाहीं पशूंसी सर्वथा ॥ ४ ॥ मरणा टेकलें कलीवर । परी न सांडी व्यापार ॥५॥ एका जनार्दनीं पामर । भोगिती अघोर यातना ॥

३१९८ ब्रह्मस्थितीचें हें वर्म । तुज दावितें सुगम ॥ १ ॥ सर्वा भूतीं भगवद्भाव । अभेदत्वें आपणचि देव ॥ २ ॥ संसार ब्रह्मस्फूर्ती । सांडोनियां अहंकृती ॥३॥ शरण एका जनार्दन । कृपें पावला परिपूर्ण ॥४॥

३१९९ लहानाहूनि लहान न धरी अभिमान । तेणें हा कारण सर्व बापा ॥ १ ॥ उंचपणें पाहतां वेळूचिये परी । लोहळा अंतरीं नम्र होये ॥ २ ॥ भक्ति करितां मुक्ति संतांचे संगती । मग मनीं विश्रांती हरि जोडे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांसी शरण । धरूनियां कान नाचूं द्वारीं ॥ ४ ॥

३२०० सानपणासाठीं । गर्भवास सोसी जगजेठी ॥ १ ॥ सानपण भलें सानपण भलें । सानपण भलें संतांपायीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं सानपणावांचुनी । कैवल्याचा धनी हातां नये ॥ ३ ॥

३२०१ सानपणें धुरु अढळीं बैसला । सानपणें केला कृतकृत्य ॥ १ ॥ सानपणें प्रल्हादें साधियेलें काज । सानपणें सहज बळी पूजी ॥ २ ॥ सानपणें बिभीषण शरण आला । राज्यधर केला श्रीरामें त्यासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सानपणावांचुनी । ब्रह्मज्ञान जनीं नातुडेची ॥ ४ ॥

३२०२ उपमन्यु सान देवासी कळवळ । क्षीरसिंधु तात्काळ दिला त्यासी ॥ १ ॥ सानपणें अर्जुनें साधियेलें काज । श्रीकृष्ण निजगुज सांगतसे ॥ २ ॥ सानपणें उद्धव झालासे विमुक्त । सानपणें तो निश्चित तारियेला ॥ ३ ॥ सानपणें सुख गोपाळ गौळणी । एका जनार्दनीं सदोदित ॥ ४ ॥

३२०३ सानपणें तरले अनंत भक्त अपार । जाणिवेचा भार टाकूनियां ॥ १ ॥ सानपणें शुक व्यास नारदमुनी । जाहले मुगुटमणी सानपणें ॥ २ ॥ सानपणें गज तारिली गणिका । उद्धरिला देखा अजामिळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सानपणावांचुनी । न चुके आयणी प्रपंचाची ॥ ४ ॥

३२०४ सानपणें साधे सर्व येत हातां । जाणिवेनें तत्वतां नागवसी ॥१॥ महापूर येतां वृक्ष तेथें जाती । लव्हाळे राहती नवल कैंचें ॥ २ ॥ चंदनाचे संगें तरुवर चंदन । सानपणा कारण संगतीचें ॥ ३ ॥ संतांचे संगती अभाविक तरती । एका जनार्दनीं निश्चितीं सानपणें ॥ ४ ॥

३२०५ जाणिवेच्या मागें होत कुंथाकुंथी । हे तों प्रवृत्ति निवृत्ति मार्ग दोन्ही ॥१॥ जाणीव शहाणीव येथ नाहीं काम । वाचे वदतां नाम सर्व साधे ॥२॥ जाणिवा जाणपण नेणिवा नेणपण । दोहींचें अधिष्ठान एक नाम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामापरतें आन । दुसरें साधन शीण जगीं ॥ ४ ॥

३२०६ विवाद वाद हें तो अधम लक्षण । भक्तीचें कारण न साधे येणें ॥ १ ॥ मुख्य एक करी एकविधपण । सम दृश्शनें देखे जगीं ॥ २ ॥ नर अथवा नारी असो भलते याती । वंदावे विभुती म्हणोनियां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोध धरीं मना । होऊनियां साना सानाहुनी ॥ ४ ॥

३२०७ धांवूं नको सैरा कर्मचियासाठीं । तेणें होय दृष्टि उफराटी ॥१॥ शुद्ध अशुद्धाच्या न पडे वेवादा । वाचे म्हणा सदा नारायण ॥ २ ॥ एका जनार्दनीं ब्रह्मार्पण कर्म । तेणें अवघे धर्म जोडतील ॥ ३ ॥

३२०८ करितां वेदशास्त्र श्रवण । गर्वाचें भरतें होय गहन ॥ १ ॥ करूं आतां निजकर्म । कर्मक्रिया अति दुर्गम ॥ २ ॥ कर्म केवळ देह असे । एका जनार्दनीं ते नसे ॥ ३ ॥

३२०९ चित्त समाधानें । सुख दुःख सम जाणे ॥ १ ॥ न करी आणीक उपाधी । निवारली आधि व्याधी ॥ २ ॥ वृत्ति झाली समरस । सेवी नित्य ब्रह्मरस ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चित्त । ब्रह्मरसें झालें शांत ॥ ४ ॥

३२१० आशेपाशीं नाहीं सुख । आशेपाशीं परम दुःख ॥ १ ॥ आशा उपजली देवासी । तेणें नीचत्व

आलें त्यासी ॥ २ ॥ आशेसाठीं जगदानीं । मागे बळासी स्वयें पाणी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आशा । तिनें गुंताविलें महेशा ॥ ४ ॥

३२११ निराशीयाचे भेटी पाहे । वैकुंठीचा राव धांवे ॥ १ ॥ निराशेपायीं नये व्याधी । निराशेपायीं सकळ सिद्धी ॥ २ ॥ निराशेचें जेथें नांव । तेथें देव घेतसे धांव ॥ ३ ॥ निराशेचा जिव्हाळा । एका जनार्दनीं पाहे डोळां ॥ ४ ॥

३२१२ निःशेष कांहीं नेणिजे । तें शुद्ध ज्ञान म्हणिजे । मा सर्व जें जेणें जाणिजे । तें अज्ञान कैसें बा ॥ १ ॥ ज्ञान तें कवण अज्ञान तें कवण । दोहींचें लक्षण पाहातें पाहा ॥ धृ. ॥ ज्ञानाचें जें ज्ञातेपण । तया नांवची अज्ञान । अज्ञानाचें जें ज्ञान । तया नांव शुद्ध ज्ञान ॥ २ ॥ ज्ञान तें अज्ञाना आलें । अज्ञान तें ज्ञाना गेलें । एका जनार्दनीं मुलें । बागुलाचीं दोनीं ॥ ३ ॥

३२१३ एक म्हणती आत्मा सगुण । एक म्हणतातीं निर्गुण ॥ १ ॥ एक प्रतिपादितीं भेद । प्रतिपादितसे अभेद ॥ २ ॥ एक म्हणती मिथ्या भूत । प्रत्यक्ष दिसत जीं येथें ॥ ३ ॥ ऐसे नानाभेद वाद सकळ । विचारितां अज्ञान मूळ ॥ ४ ॥ अज्ञान तें मिथ्या जाणा । शरण एका जनार्दना ॥ ५ ॥

३२१४ सुटलों म्हणतां बांधला होता । मुक्त म्हणे त्याचे अंगीं ये बद्धता ॥ १ ॥ बद्धता येथें नाहीं मुक्त ते काई । भ्रान्ती दो ठायीं झोंबतसे ॥ २ ॥ स्वप्नींचेनि सुखें सुखासनीं बैसे । जागा जालिया कांहींच नसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकापणा तुटी । बद्ध मोक्षाची तेथें वार्ताहि तुटी ॥ ४ ॥

३२१५ अविश्वासा घरीं । विकल्प नांदे निरंतरी ॥ १ ॥ भरला अंगीं अविश्वास । परमार्थ तेथें सदा भूस ॥ २ ॥ सकळ दोषांचा राजा । अविश्वास तो सहजा ॥ ३ ॥ अविश्वास धरितां पोटीं । एका जनार्दनीं नाहीं भेटी ॥ ४ ॥

३२१६ मूळ नाशासी कारण । कनक आणि स्त्री जाण ॥ १ ॥ जो न गुंते येथें सर्वथा । त्याचा परमार्थ पुरता ॥ २ ॥ जया सुख इच्छा आहे । तेणें एकांतासी रहावें ॥ ३ ॥ दृष्टी नाणी मनुष्यासी । तोचि परमार्थाची राशी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं धन्य । त्याचा परमार्थ पावन ॥ ५ ॥

३२१७ अविश्वासापुढें । परमार्थ कायसें बापुडें ॥ १ ॥ अविश्वासाची राशी । अभिमान येतसे भेटीसी ॥ २ ॥ सदा पोटीं जो अविश्वासासी । तोचि देख गुणदोषांसी ॥ ३ ॥ सकळ दोषां मुकुटमणी । अविश्वास तोचि जनीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं विश्वास । नाहीं त्यास भय कांहीं ॥ ५ ॥

३२१८ परमार्थ सोयरा अहोरात्र करी । गाई निरंतरी रामकृष्ण ॥ १ ॥ नरदेहा यातना चुकतील फेरे । वायां हांवभरी होऊं नको ॥ २ ॥ रात्रंदिवस करी नामाचाचि पाठ । मोक्षमार्ग फुकट प्राप्त होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामापरतें सार । न करी विचार आन दुजा ॥ ४ ॥

३२१९ शुद्धभावें गावें नाम श्रीहरीचें । भेदभाव साचे टाकूनियां ॥ १ ॥ भोळे भाविक ज्याचा आहे देव जवळा । टवाळास निराळा भास दिसे ॥ २ ॥ अविश्वासियासी होय बोध वायां । ब्रह्मज्ञान तया सांगून काय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अभाविक खळ । बोध तो सकळ जाय वायां ॥ ४ ॥

३२२० पक्षी आंगणीं उतरती । ते कां गुंतोनिया राहती ॥ १ ॥ तैसें असावें संसारीं । जोंवरी प्राचीनाची दोरी ॥ २ ॥ वस्तीकर वस्ती आला । प्रातःकाळीं उठोनि गेला ॥ ३ ॥ शरण एका जनार्दन । ऐसें असतां भय कवण ॥ ४ ॥

३२२१ विषयीं होऊनि उदास । सांडीं संसाराची आस ॥ १ ॥ ऐशी मुक्ताची वासना । मुमुक्षु चिंती तुझ्या चरणा ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान लाळ घोटी । येरा वाउगी ती आटी ॥ ३ ॥ शब्द निशब्द खुंटला । एका जनार्दनीं देखिला ॥ ४ ॥

३२२२ विषयवासना भाजी त्यांचे मूळ । मग सुखकल्लोळ प्राप्ती तुज ॥ १ ॥ आशेचे काबाड कल्पना सगळी । उपटोनि मुळीं टाकी परती ॥ २ ॥ भेदाचे भांडे वैराग्याचें हातें । धुवोनि सरतें करी बापा ॥ ३ ॥ शांतीचेनि सवें धरीं वेगें सोय । एका जनार्दनीं पाय पावशील ॥ ४ ॥

३२२३ विकल्प वासना समूळ दे टाकुनी । मग तुज भजनीं सुख बापा ॥ १ ॥ आशापाश मोह सांडी तूं निराळा । भजन तें गोपाळा प्रिय वाटे ॥ २ ॥ भेद अभेदाचें मूळ आधीं खंडी । भजन तें तोंडी मग गोड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शुद्ध हे वासना । तें नारायणा प्रिय भक्ती ॥ ४ ॥

३२२४ विषयाच्या व्यथें दुःख भोगितो अघोर । तया दुजा थार कोठें नाहीं ॥ १ ॥ शुद्ध करूनि मन ध्यावें रामनाम । संतांचें पूजन क्रिया हेची ॥ २ ॥ उपदेश किती सांगावा वेळोवेळां । अमंगळ अंधळा नेणें कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विषयाच्या संगे । कर्मकांड लागे भोगणें तेथें ॥ ४ ॥

३२२५ भुलले पामर नेणती ते शुद्धी । बुडतील भवनदीमाजीं जाणा ॥ १ ॥ म्हणवोनि येते करुणा । परी संतचरणा न लागती ॥ २ ॥ खरें खोटें ऐसें न कळेचि जीवां । कां न भीति भेवा यमाचिया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं किती हें सांगावें । उगवेना दावें गळां बंध ॥ ४ ॥

३२२६ देहबुद्धी सांडी कल्पना दंडी । वासनेचि शेंडी वाढवूं नको ॥ १ ॥ तूं तें तुंचि पाही तूं तें तुंचि पाही । पाहूनिया राही जेथींच्या तेथें ॥ २ ॥ तूं तें तुची पाही जेथें देहो नाहीं । मीपणें कां वायां गुंतलासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मीपण तूंपण । नाहीं नाहीं मज तुझीच आण ॥ ४ ॥

३२२७ निजदृष्टीवरी जाण । काम निवारी दारुण ॥ १ ॥ याचा नको घेऊं वारा । सैर सांडी हा पसारा ॥ २ ॥ कामक्रोधांचें हें बंड । याचें छेदी विवेकें तोंड ॥३॥ शांती क्षमा धरूनि आधीं । ब्रह्मज्ञान मग साधी ॥ ४ ॥ हेंचि भक्तीचें लक्षण । सांगे एका जनार्दन ॥५॥

३२२८ सर्व भावें सुख असतां घेई अनुताप । मग करी संकल्प भजनाचा ॥ १ ॥ ऐसा अनुताप घडतां मनासी । भजन तें मुखासी येत स्वभावेंची ॥ २ ॥ एका जनार्दनीं अनुतापावीण । भजन प्रमाण नोहे देवा ॥ ३ ॥

३२२९ अनुताप नाहीं ज्यासी । विवेक नुमजे मानसीं ॥ १ ॥ मुख्य पाविजे अनुताप । तेणें निरसे त्रिविध ताप ॥२॥ अनुतापावांचून । ब्रह्मज्ञान होय दीन ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । तैंच अनुताप बाणे पूर्ण ॥ ४ ॥

३२३० वैराग्य अनुताप जाहलियावांचून । रामनाम वदनीं नये बापा ॥ १ ॥ मुख्यत्वें कारण साधीं हें भजन । येणें समाधान होय बापा ॥ २ ॥ विरक्ती हेही जाहलियावाचुनी । शांती समाधानी नये बापा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सत्संगावाचुनी । जन्माची आयणी न चुके बापा ॥ ४ ॥

३२३१ अनुतापावांचुनी नाम नये मुखा । वाउगाचि देखा शीण होय ॥ १ ॥ मुख्य तो संकल्प अनुताप वाहे । मग चित्त होय शुद्ध तेणें ॥ २ ॥ अनुताप जाहलिया सहज समाधी । तुटेल उपाधी सहजची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अनुतापें पाहे । मग देव आहे जवळी तया ॥ ४ ॥

३२३२ मुख्य पाहिजे अनुताप । हेंचि वैराग्याचें रूप ॥ १ ॥ कोरड्या त्या ज्ञानगोष्टी । अनुताप नाहीं पोटीं ॥ २ ॥ अनुतापावीण ज्ञान । कदा नोहे समाधान ॥३॥ एका जनार्दनीं तप । अनुताप हेंचि देख ॥

३२३३ सावध पाहतां तुम्ही ज्ञानाचे अज्ञान । मानूं तोचि म्हणे महंता महाधन ॥ १ ॥ ज्ञानाचें अज्ञान कवण ज्ञाता फेडी । अनुतापाची जंव जीवीं नाहीं आवडी ॥ २ ॥ नश्वर देह म्हणोनी ज्ञानेंच निंदिजे । तोचि देह येउनी ज्ञातेपणें फुंजे ॥ ३ ॥ सच्चिदानंद माया या नावें । याहुनी परती स्थिति तें तें ज्ञान जाणावें ॥ ४ ॥ एका जनार्दनीं अनुतापाची गोडी । ज्ञानज्ञानाची तोडोनी सांडिली बेडी ॥ ५ ॥

३२३४ प्रकाश भासे सर्पाकार । सर्प नसोनी जेवीं दोर ॥ १ ॥ कृष्णवर्ण रक्त श्वेत । स्फटिकीं जेवीं भासत ॥ २ ॥ ऐशी त्रिगुणाची मिळणी । शरण एका जनार्दनीं ॥ ३ ॥

३२३५ साधक सर्वदा पुसती । कोण बाधा चित्तवृत्ती ॥ १ ॥ एकाचि गुण जैं पुरता जोडे । तैं एकविधा वृत्ति वाढे ॥ २ ॥ एकाचि न जोडे गुणावस्था । यालागीं नोहे एकविधता ॥३ ॥ एका जनार्दनीं पूर्ण । चित्तचैतन्य संपूर्ण ॥ ४ ॥

३२३६ पहा कैसा देवाचा नवलावो । पाहे तिकडे अवघा देवो ॥ १ ॥ पाहाणें परतलें देवें नवल केलें । सर्वहि व्यापिलें काय पाहों ॥ २ ॥ पहाणियाचा ठाव समूळ फिटला । अवघा देहीं दाटला देव माझ्या ॥३॥ एका जनार्दनीं कैसें नवल जाहलें । दिशाद्रुम दाटलें देहें सहजीं ॥ ४ ॥

३२३७ तेजाचें जें तेज तेंचि परब्रह्म । परम मंगलधाम त्यासी म्हणती ॥ १ ॥ तेंचि नमियेलें जोडोनियां कर । व्यापुनी चराचर भरलेंसे ॥ २ ॥ एका जनार्दनीं तोचि पुरुषोत्तम । मनासी आराम तया ठायीं ॥ ३ ॥

३२३८ चतुर्भुज शाममूर्ति । शंखचक्र ते शोभिती । पीतांबर वैजयंती । रुळती गळां ॥ १ ॥ देव देखिला

देखिला। तेणें संसाराचा ठावो पुसिला। विदेही तो भेटला। भक्त तयाते ॥ २ ॥ दोघां होतांचि मिळणी। नुरे देव भक्तपणीं। फिटली आयणी। सर्व कोड कठीण ॥ ३ ॥ छंद पाहिजे नामाचा। निश्चयो काया मनें वाचा। एका जनार्दनीं त्याचा। देव होय अंकीत ॥

३२३९ ब्रह्मादिक देव त्यांचे रंगीं नाचती। सनकादिक त्याचे ध्रुपद धरिती ॥ १ ॥ त्यापुढें गीत नृत्य करिती। त्यापुढें मानव केवीं ताल धरिती ॥ २ ॥ हरि हरि हरि म्हणतां वाचे। हरिरंगी नाचे तोचि धन्य ॥३॥ शास्त्राची व्युत्पत्ती प्रसन्न वागेश्वरी। ती सारजा मुख्य करी नृत्य तेथें ॥ ४ ॥ शास्त्र अभिमानें चढला ताठा। मुक्ती ते फुकटा अंतरले ॥ ५ ॥ एका जनार्दनीं स्वहितीं तूं नाचे। बोलणें अभावाचें बोलूं नको ॥६॥

३२४० हरिकीर्तनालागीं प्रल्हाद गाढा। द्वंद्वांचा रगडा तेणें केला ॥ १ ॥ कोरडिया काष्ठीं प्रगटले हरी। म्हणवोनी नृत्य करी तयापुढें ॥ २ ॥ विणा वाहातु गातु नारदु नाचे। न कळे तयाचें महिमान ॥ ३ ॥ जनाभिमानें धरिली प्रतिष्ठा। वंचला करंटा मुक्तीसीव ॥ ४ ॥ साच अथवा लटिकें नाचतु रंगीं। अभिमान भंगी पैं होय ॥ ५ ॥ निरभिमानिया जवळीच देवो। एकाएकीं भावो जनार्दनीं ॥ ६ ॥

३२४१ जाणा याचा तुम्ही भाव। देहीं देव प्रगटे ॥ १ ॥ एकाविध भक्ति करा। तेणें घरां धांवतो ॥२॥ सर्वभावें अर्पा मन। हेंचि साधन तुम्हांसी ॥ ३ ॥ संसाराचा नका घोक। सर्व देख पुरवितो ॥ ४ ॥ लाजतसे आपुल्या नांवा। म्हणोनि सेवा करी त्यासी ॥ ५ ॥ ब्रीद साच हें जगीं। नुपेक्षी यालागी दीनातें ॥६॥ एका जनार्दनीं ठाव। धरा दृढ भाव मनीं ॥७॥

३२४२ कायीक वाचिक मानसीक भाव। ठेवी हा निःसंदेह देवापायीं ॥ १ ॥ काय उणें मग न लगे साकडें। उगवेल कोडें द्वैताचें तें ॥ २ ॥ आशा मनीशा तृष्णा पडतील वोस। धरितां उल्हास रामनामीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विश्वास हो मनीं। प्रत्यक्ष पुराणीं बोलिले तें ॥ ४ ॥

३२४३ आधीं शुद्ध करा भाव। पाठीं पहा मग देव ॥ १ ॥ नका पडूं वायां भरी। चित्त नागवें निर्धारीं ॥ २ ॥ भाव जाहलीया शुद्ध तत्त्वतां। मग देव होय प्राप्त ॥३॥ एका जनार्दनीं देव। जेथें जाय तेथें आहे॥

३२४४ देव देव म्हणोनि फिरताती वेडे। चित्त शुद्ध नाहीं तंव देघ केवी जोडे ॥ १ ॥ पाहे तिकडे देव आहे। दिशा व्यापुनी भरला आहे ॥ २ ॥ एका जनार्दनीं आर्तभूत। देव उभा असे तिष्ठत ॥ ३ ॥

३२४५ देहींच देहीं विंबला देवो। न कळेचि पामरा पडिला संदेहो ॥ १ ॥ आहे नाहीं संशयबुद्धी। तेणें ते गुंतले कर्माचे सिद्धी ॥२॥ एका जनार्दनीं भरला देव। तयावीण रिता नाहीं ठाव ॥ ३ ॥

३२४६ देवासी तो भाव पुरे। तेणें देव सदा झुरे। भक्तालागीं सेर। वैकुंठासी ॥१॥ भाव धरावा बळकट। आणीक नको कांहीं कष्ट। साधन हें श्रेष्ठ। कलीमाजीं ॥ २ ॥ भावें प्राप्ति होय देव। अभक्तासी संदेह। जवळी असोनी देव। नाहीं म्हणती ॥ ३ ॥ भावें देव घरीं नांदे। एका जनार्दनीं आनंदें। म्हणोनी संतवृंदे। तयां न विसरती ॥ ४ ॥

३२४७ मेघ वर्षे निर्मल जळ। जैसें बीज तैसें फळ ॥१॥ तया परी भक्ती कीजे। बीजासारिखें फळ घेइजे ॥२॥ उत्तम अलंकार गोमटें। तेथें नाक असे नकटें ॥ ३ ॥ भजना जातां लाज वाटे। वेश्याघरीं भांग घोटे ॥४॥ एका जनार्दनीं नर। प्रत्यक्ष जाणावा तो खर ॥ ५ ॥

३२४८ एक निष्ठा धरी बापा। मार्ग सांगतो हा सोपा ॥ १ ॥ देहीं भाव धरीं भोळा। पाहें विठ्ठल सांवळा ॥ २ ॥ मन करिती चंचळ। देव नयेचि जवळ ॥३॥ ऐसा कल्पनेचा संग। तिळभरी नको अंग ॥४॥ सच्चिदानंद निरंजन। शरण एका जनार्दन ॥५॥

३२४९ तळीं पृथ्वीवरी गगन। पाहतां दोन्हींहि समान ॥१॥ रूप नाम वर्णाश्रम। कर्म अकर्म बद्धतां ॥ २ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष। ऐसीं वेद बोले साक्ष ॥३॥ एका जनार्दनीं शुद्ध। नाहीं भेद भूतमात्रीं ॥४॥

३२५० गजाचे भार वोझें। गाढवा ते न साजे ॥१॥ तैसें भक्त अभक्त दोन्हीं। वेगळीक वेगळेपणीं ॥२॥ मेघ वरुषे निर्मळ जळ। परी जैसें बीज तैसें फळ ॥३॥ एका जनार्दनीं गुण। चंदन वेळु नोहे समान ॥ ४ ॥

३२५१ देव नाहीं ऐसें स्थळ। रितें कोठें आहे सकळ ॥ १ ॥ पाहतां सर्वां ठायीं देव आहे। अणुरेणू भरूनी उरला पाहे ॥ २ ॥ एका जनार्दनीं देव। पाहतां समूळ एकभाव ॥ ३ ॥

३२५२ एक धरलिया भाव। आपणचि होय देव ॥१॥ नको आणिक सायास। जाय जिकडे देव भास ॥२॥

ध्यानीं मनीं शयनीं । देव पाहे जनीं वनीं ॥३॥ अवलोकीं जिकडे । एका जनार्दनीं देव तिकडे ॥ ४ ॥

३२५३ भोगें चेतविसील नाना दुःखें । तो तूं भोगाचि भोगशील सुखें ॥१॥ मीपण कैचें काये । हानी लाभ तुझा तूंच पाहे ॥ २ ॥ भोग जे आले वाडावाड । तुझें आंख अंग आम्हां आड ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एक वर्म । माझेनि नांवें तूंचि भोगीं कर्म ॥ ४ ॥

३२५४ त्रिभुवनीं ज्याची सत्ता । लाज वाटे त्यासी गातां ॥ १ ॥ म्हणा काया वाचा त्याचे दास । न करी आणिकांची आस ॥२॥ एका जनार्दनीं भाव । त्याचे पायीं ठेवा जीव ॥ ३ ॥

३२५५ मातेचा आठव बाळावरी स्नेहो । तैसा धरा देवो मनीं सदा ॥ १ ॥ बाळा पाहुनियां माता संतोषत । तैसा धरा हेत देववारी ॥ २ ॥ बोबडें साबडें असोच तें बाळ। तैसी धरा कळवळ देवावरी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव धरा मनीं । आसनीं शयनीं विसरूं नका ॥ ४ ॥

३२५६ वत्सालागीं गाय धाउनी वोरसे। तैसें असो पिसें देवा ठायीं ॥ १ ॥ पाडला चुकली हरीण पाहे वास । तैसी धरा आस देवा ठायीं ॥ २ ॥ मातेलागीं चुके बाळ एकुलतें। तैसें देवापरतें न धरा मनीं ॥३॥ एका जनार्दनीं देव करा सखा । प्रपंच पारिखा सहज तेणें ॥ ४ ॥

३२५७ नमस्कारीं जंव अष्टांगें । तंव देवचि जाला अंगें ॥१॥ आतां नमन कैसें हो कीजे । देवपणा नयेचि दुजें ॥ २ ॥ स्तुतिस्तवन बोलों भावो । तंव वायांची जाली देवो ॥ ३ ॥ स्तवन करूं आता कैसें। स्तवावया दुजें नसे ॥ ४ ॥ आतां भजन कैशापरी । संसारा नुरेचि उरी ॥५॥ एका जनार्दनीं शरण । तंव तो जाला जनार्दन ॥ ६ ॥

३२५८ निकट असतांची देव । नेणता ते अहंभाव ॥१॥ ऐसे व्यापलें मूढपणें । विसरले जनार्दनें ॥२॥ जे पासाव सर्व युक्ती । तयातें मुमुक्षू वदती ॥ ३ ॥ ऐसा ज्ञानियाचा भाव । तया देवपण दिसे वाव ॥४॥ ज्ञानविज्ञान नको देवा । मज चरणाजवळीं ठेवा ॥५॥ एका जनार्दनीं वाणी । दुजी नको अंतःकरणीं ॥ ६ ॥

३२५९ ऐसा रोगाचा पवाडु । परमार्थ गोडु तो जाहला कडु ॥ १ ॥ कामक्रोधाचा उफाडा । शांती क्षमेचा दिला काढा ॥ २ ॥ देता नाममात्रा रसायन । प्रपंच रोग जाहला क्षीण ॥ ३ ॥ निघडा वैद्य जनार्दन । एका जनार्दनीं शरण ॥ ४ ॥

३२६० कनक कांता नये चित्ता । तोंवि परमार्थी पुरता ॥१॥ हेंचि एक सत्य सार । वायां व्युत्पत्तीचा भार ॥ २ ॥ वाचा सत्यत्वें सोंवळीं । येर कवितां वोवळी ॥३॥ जन तेचि जनार्दन । एका जनार्दनीं भजन ॥

३२६१ प्रपंच परमार्थ एकरुप होत । आहे त्याचा हेत रामनामीं ॥ १ ॥ परमार्थ साधे सहज संसार। येथें वेरझार नाहीं जरा । ॥ २ ॥ सहज संसारें घडे परमार्थ । लौकिक विपरीत अपवाद ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाहीं तया भीड । लौकिकाची चाड कोण पुसे ॥

३२६२ सुखें संसार हा करी। वाचे उच्चारावा हरी ॥ १ ॥ दुःखरूप हा संसार। रामनामें सुख साचार ॥ २ ॥ रामनामाचें स्मरण । नाश पावे जन्ममरण ॥ ३ ॥ जयापाशीं नाम असे । नारायण तेथें वसे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम । संसार हा परब्रह्म ॥ ५ ॥

३२६३ निवांत बैसे तूं अचळ । मन करूनि निश्चळ । नको कांहीं तळमळ । नाम गाय सर्वदा ॥ १ ॥ सोडी मागिलाची आस । दृढ मना घाली कास । भक्तिभाव समरस । रामनामीं तूं धरी ॥ २ ॥ नको समाधी उन्मनी । धावूं नको सैरा रानीं । एका जनार्दनाचे चरणीं । दृढभावें विनटे ॥ ३ ॥

३२६४ नित्य ध्यातां हरीचे चरण । करी भक्त दुःखहरण ॥ १ ॥ चरणरज पवित्रता । सदा ध्यावेवि माथा ॥ २ ॥ लागला पाषाणा चरण । ती स्त्रीच जाली पावन ॥ ३ ॥ ऐसें चरणींचें मान । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

३२६५ स्वगोत्र परगोत्र यांचा भरंवसा । मानूं नये सहसा अरे मूढा ॥ १ ॥ वेदींचें वचन वेदीं तें प्रमाण । एक नारायण सार जप ॥ २ ॥ शास्त्राचा प्रभाव शास्त्रिकांसी ठावा । उघड जपावा राममंत्र ॥ ३ ॥ न करीं आळस नको पडों भरीं । एका जनार्दनीं हरि स्मरे देहीं ॥ ४ ॥

३२६६ चिंतातुर मन नसावें कदा काळीं । हृदयीं नामावळी जप करी ॥ १ ॥ श्रीअनंता माधवा गोविंदा । हाचि जप सदा चित्तामाजीं ॥ २ ॥ वारंवार चिंतावीं देवाचीं पाउलें । जेणें जन्मजाळें उक-

लले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आलासे प्रत्यक्ष । सर्व-भावें गाय नाम त्याचें ॥ ४ ॥

३२६७ गोविंद गोपाळ वदतां वाचे । पायीं यमदुताचें भय नाहीं ॥ १ ॥ नित्य जया ध्यान गोविंद स्मरण । संसारबंधन तया नाहीं ॥ २ ॥ उठतां बैसतां खेळतां हांसतां । गोविंद गीतीं गातां मोक्ष जोडे ॥ ३ ॥ गोविंदाचें नाम सदा ती समाधी । एका जनार्दनीं उपाधी तुटली त्याची ॥ ४ ॥

३२६८ सांडा सांडा वार्या छंद । धरा गोविंद मानसीं ॥ १ ॥ नका भरूं आडरानीं । सोडविता कोणी मग नाहीं ॥ २ ॥ पडाल यमाचें पीडणीं । लक्ष चौऱ्यांयशीं पतनी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । एकपणें जनार्दन ॥ ४ ॥

३२६९ वेरझार खुंटे नाम वदतां वाचे । आणिक सायासाचे न करी कोड ॥ १ ॥ तुटे रे बंधन नोहेचि पतन । वाचे जनार्दन जप करी ॥ २ ॥ एका जनार्दनीं वाचे जपे नाम । आणिक दुर्गम साधन नको ॥ ३ ॥

३२७० हित अनहिताचे असतीं वचनें । तेथें अनु-मोदन देतां भले ॥ १ ॥ परमार्थाचें वचनीं द्यावें अनुमोदन । तेणें नारायण संतोषत ॥ २ ॥ विषयिक वचना देतां अनुमोदन । तेणें नारायण क्रोध पावे ॥ ३ ॥ भक्तिप्रेम वचना द्यावें अनुमोदन । तेणें नारायण संतोषत ॥ ४ ॥ दुर्बुद्ध वचना देतां अनु-मोदन । तेणें नारायण क्रोध पावे ॥ ५ ॥ संतांचे वचना द्यावें अनुमोदन । तेणें नारायण संतोषत ॥६॥ असंतांचे वचनीं देतां अनुमोदन । तेणें नारायण क्रोध पावे ॥ ७ ॥ एका जनार्दनाचे वचनीं द्यावें अनु-मोदन । तेणें जनार्दन संतोषतो ॥ ८ ॥

३२७१ दाता तोचि म्हणावा । नामांवांचोनि नेणें जीवा ॥ १ ॥ थोर तोचि म्हणावा । नेणें भुताचा तो हेवा ॥ २ ॥ लहान तोचि म्हणावा । काया वाचा भजे देवा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे । देवावांचुनी कांहीं नेणें ॥ ४ ॥

३२७२ उत्तम पुरुषाचे उत्तम लक्षण । जेथें भेद-शून्य मावळला ॥ १ ॥ भेदशून्य जाला बोध स्थिरा-वला । विवेक प्रगटला ज्ञानोदय ॥ २ ॥ जिकडे पाहे तिकडे उत्तम दरुशन । दया शांती पूर्ण क्षमा अंगीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उत्तम हे प्राप्ती । जेथें मावळती द्वैताद्वैत ॥ ४ ॥

३२७३ जेथें सत्त्वाचें प्राधान्य । जेथें सात्त्विकाचें आचरण । तो परलोक साधून । साधूनी गेला ॥१॥ जेथें रजाचे प्राधान्य । त्याचें लोभीं वसे मन । ज्ञान सांगे सख्य करून । परी निष्ठा नाहीं ॥ २ ॥ जेथें प्राधान्य तामस । तो द्वेशी आणि कर्कश । ज्ञान सांगे अपरोक्ष । परी अंतरीं कठीण ॥ ३ ॥ जेथें प्राधान्य तूर्या । तेथें सत्त्व शांती दया । विवेक वैराग्य करूनियां । सर्वांसी भजे ॥ ४ ॥ जो वस्तू झाला केवळ । त्याचें अंतर केवळ । भूतमात्रीं दयाळ । सर्वांपरी भजत ॥ ५ ॥ जेथें रज तम वसती । तेथें द्वेष लोभ नांदती । त्यांचे संगें ज्ञानज्योती । विझोनि जाये ॥ ६ ॥ एका जनार्दनीं शरण । जेथें शुद्ध सत्त्वाचें प्राधान्य । तो वस्तूसी जाय मिळोन । सहजीं सहज ॥ ७ ॥

३२७४ म्हणा तुम्ही विष्णुदास । तेणें पुरे तुमची आस । काळा पडे त्रास । नामस्मरणें करुनी ॥ १ ॥ उघडा मंत्र विठ्ठल हरी । सदा वाचे जो उच्चारी । होतसे बोहरी । पातकांसी तात्काळ ॥ २ ॥ न लगे कांहीं साधन । वाचे म्हणा रामकृष्ण । एका जनार्दनीं शरण । कायावाचामनेंसी ॥ ३ ॥

३२७५ आपुला न टाकी पां आचार । उपजले कुळींचा वेव्हार । स्वधर्म तो सार । पाळीं पाळीं बापा ॥ १ ॥ त्यातें म्हणणें संसार । येर बोलणें असार । निष्ठावंत जे नर । देवाचि समान ॥ २ ॥ अतिथासी द्यावें अन्न । गोब्राह्मणांचें पूजन । मुखीं नामस्मरण । तोचि एक संसारी ॥ ३ ॥ सांडोनियां गृहदारा । धांव घेतली डोंगरा । अंतरीं भरला सारा । विपर्यीक भाव ॥ ४ ॥ बकाचें परि ध्यान । नको नको अनुष्ठान । एका जनार्दनीं मन । स्थिर करीं सर्वदा ॥५॥

३२७६ नित्य नैमित्तिक कर्मे आचरावीं । तिहीं तें पावावी चित्तशुद्धी ॥ १ ॥ चित्त स्थिर होण्या करीं उपासना । भजे नारायणा एका भावें ॥ २ ॥ विवेक वैराग्य प्राप्ति तत्प्रसादें । चित्ता लागे वेध सद्गुरूचा ॥ ३ ॥ सद्गुरुकृपेनें पूर्ण बोध होय । नित्य त्याचे पाय हृदयीं धरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ठेवूनियां मन । मनाचे उन्मन पावलासे ॥ ५ ॥

३२७७ न कळे जयाचें विंदान । हरिहर नेणती महिमान । शिणलें शेषाचें वदन । तो तटस्थ राहिला ॥ १ ॥ ऐसा आकळ त्रिभुवनीं । न कळे वेदशास्त्रां मनीं । पुराणांची आयणी । कुंठीत जाहली ॥ २ ॥ तो

सोपा नाम मंत्रें । वाचे वर्णितां पवित्रें । एका जनार्दनीं वक्त्रें । म्हणा रामकृष्ण हरी ॥ ३ ॥

३२७८ कायावाचामनें छंद । धरा गोविंद हृदयीं ॥ १ ॥ नका जाऊं लिगाडामागें । ऐसें सांगे वेदशास्त्र ॥ २ ॥ पुराण पठण यज्ञयाग । नोहे भाग कलीमाजीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम सार । उतरील पार भवसागरीं ॥ ४ ॥

३२७९ निवांत श्रीमुख पहावें डोळेभरी । तेणे नुरे अंतरीं इच्छा कांहीं ॥ १ ॥ चरणीं ते मिठी घालावे दंडवत । तेणें पुरे आर्त सर्व मनींचें ॥ २ ॥ ध्यान तें दृष्टि भरूनि पहावें । आलिंगन द्यावें वेळोवेळां ॥ ३ ॥ हृदयकमळीं पहावा तैसा ध्यावा । एका जनार्दनीं विसावा सहजची ॥ ४ ॥

३२८० शरणागत आलिया नुपेक्षी सर्वथा । ऐसा बोध चित्ता आहे माझ्या ॥ १ ॥ सर्व भावें जावें नाम वाचे गावें । जिवलगा भेटावें विठोबासी ॥ २ ॥ साधुसंत गाती आनंदें नाचती । क्षेम तयां प्रती द्यावें सुखें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहतां विठ्ठल । जन्ममरण निवारेल हेळामात्रें ॥ ४ ॥

३२८१ व्यापूनिया भरला देव । रिता ठाव कोठें पां ॥ १ ॥ तयाचें करा रे चिंतन । मग तुम्हां न पडे न्यून ॥ २ ॥ वाचे वदा विठ्ठल साचा । सोइरा साचा अंतकाळीं ॥ ३ ॥ मागें पुढें उभा असे । एका जनार्दनीं दिसे ॥ ४ ॥

३२८२ भुक्तिमुक्तीचा पांग आमुचिये गांवीं । जनीं जनार्दन वागवी देह सर्व ॥ १ ॥ भुक्ति आणि मुक्ति कासया तें वोझें । जनार्दनें सहजें निर्दाळिलें ॥ २ ॥ काल्पिक कल्पना आवरुनी ठायीं । जनार्दन पाहीं सबराभरित ॥ ३ ॥ त्याचियेनि सत्ते जाहलीसे मिळणी । एका जनार्दनीं एकमय ॥ ४ ॥

३२८३ विश्वपाळिता हे हरी । दासा केवीं तो अव्हेरी ॥ १ ॥ नवमास गर्भवास । नाहीं भागला आम्हांस ॥ २ ॥ बाळपणीं वांचविलें । स्तनीं दुग्ध तें निर्मिलें ॥ ३ ॥ कीटक पाषाणांत वसे । त्याचे मुखीं चारा असे ॥ ४ ॥ धरा धरा हा विश्वास । एका जनार्दनीं त्याचा दास ॥ ५ ॥

३२८४ जनार्दन पायां धरूनियां राहे । संसार तो काय करील तुह्मं ॥ १ ॥ स्वरूपाचें ज्ञान नोहे अनायासें । ज्याचें श्रुति पिसें लागलेंसे ॥ २ ॥ जाणीव नेणीव सांडोनियां मागें । शरण रिघे वेगें एका जनार्दनीं ॥ ३ ॥

३२८५ मेघदर्शनें मयूर नाचती । चंद्रदरुशनें चकोर सुखावती ॥ १ ॥ धेनुदरुशनें वत्सें सुखावती । साधुदरुशनें जीवां आनंदवृत्ती ॥ २ ॥ सूर्यदर्शनें जीवातें सुख होय । पितृदर्शनें सुपुत्रा आनंद होय ॥ ३ ॥ मातृदर्शनें कन्या सुख माने । मित्रदर्शनें सुमित्रा आनंदी ठाणें ॥ ४ ॥ या रीती सतत चिंतितां हरी । एका जनार्दनीं धन्य संसारीं ॥ ५ ॥

३२८६ स्वामीदर्शनें पतीता आनंद । देवदर्शनें संतोषे भक्तवृंद ॥ १ ॥ यापरी आनंद सदा मनीं हरी । वाचुनी छंद दुजा नाहीं मनीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं प्रेमयुक्त छंद । गीतीं गातां आवडी गोविंद ॥ ३ ॥

३२८७ होउनी उदास । मागा प्रेम सावकाश ॥ १ ॥ उभा विटेवरी उदित । देतां न पाहे चित्त वित्त ॥ २ ॥ जें जें पाहिजे जयालागीं । तें तें देतो त्या प्रसंगीं ॥ ३ ॥ न म्हणे उत्तम चांडाळ । ऐसा भक्तीचा सुकाळ ॥ ४ ॥ एका जनार्दनीं म्हणा दास । करा आस निर्भय ॥ ५ ॥

३२८८ अगाध चरणाचें महिमान । वेदशास्त्रां पडिलें मौन ॥ १ ॥ चरणें तारिले पाषाण । चरणें तारिलें भक्तजन ॥ २ ॥ तारियेलें प्रल्हादासी । उद्धरिलें अजामेळासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । चरण तिहीं लोकीं पावन ॥ ४ ॥

३२८९ चरणांची थोरी । जाणे गौतम सुंदरी ॥ १ ॥ हृदयाची थोरी । भक्त जाणती परोपरी ॥ २ ॥ करांची थोरी । जाणे सुदामा निर्धारीं ॥ ३ ॥ समचरणींची शोभा । एका जनार्दनीं उभा ॥ ४ ॥

३२९० चरण वंदिती कां निंदिती । तेहि हरिपदा जाती ॥ १ ॥ एक तरले चरण पुजितां । कोणी तरले चरण ध्यातां ॥ २ ॥ चरण वंदितां तरली शिळा । निंदितां तारिलें शिशुपाळा ॥ ३ ॥ ऐसें चरणांचें महिमान । एका जनार्दनीं शरण ॥ ४ ॥

३२९१ नीर मंथुनी मंथन पैं केलें । सार असार तें चवीस आलें ॥ १ ॥ ताक तेंहि गोड दुध तेंहि गोड । रसनेची चाड पारुषली ॥ २ ॥ मंथन करितां बुडाला रवी । सर्वांगी सर्व निजनाचवी ॥ ३ ॥ एका

जनार्दनीं अवघेंचि सार। मानस मंथोनि पावलों पार ॥४॥

३२९२ नवजों योगाचिया वाटा। न चढों आगम निगम ताठा। न लागों उपमाळा खटपटा। आत्मनिष्ठा होउनी असों ॥१॥ विठ्ठल उघडा विराजित। सबाह्य अभ्यंतर नांदत ॥२॥ कर्में करूनी मव्हों कर्मठा। निष्कर्माच्या न लागों झटा। संतरज आमुचा वांटा। मुक्ति फुकटा तेणें लागे ॥३॥ न करूं दुस्तरें तीं तपें। न पडों अध्यात्म खटपें। एका जनार्दनीं कृपे। आत्मसुख अमुप विचरिजे ॥४॥

३२९३ शहाणा तो जाण रे। उद्धवा आत्मत्वें पाहे रे। नेणता तो जाण रे। उद्धवा देहबुद्धीस वाहे रे ॥१॥ उद्धव म्हणे कान्होबा सांग रे। गोडा गोडी गोष्टी स्वभाव रे। निज गोडा गोष्टी ऐकतां। चित्त चैतन्य फावे रे ॥२॥ सज्ञान तोचि रे उद्धवा। ज्याची जाणीव विरे। अज्ञान तोचि रे उद्धवा। ज्ञानगर्वे हुंबरे ॥३॥ साधु तोचि रे उद्धवा। जो सद्वस्तूतें दावी। असाधु तोचि रे उद्धवा। देहीं प्रपंचीं गोवी ॥४॥ धर्मिष्ठ तोचि रे उद्धवा। जो जन्ममरण निवारी। अधर्मी तोचि रे उद्धवा। लोभ दंभ शरीरीं ॥५॥ सुख ते जाण रे उद्धवा। जेथें मीतूंपण नुरे। दुःख ते जाण रे उद्धवा। काम सुखासी झुरे ॥६॥ शम तो जाण रे उद्धवा। ज्याची आत्मत्वें बुद्धी। दम तो जाण रे उद्धवा। जो त्यागी उपाधी ॥७॥ धृतीची धारणा रे उद्धवा। जिव्हा उपस्थ जिंके। सोलीव करंटा तोचि रे उद्धवा। जिव्हा उपस्थी आटके ॥८॥ तप तें जाण रे उद्धवा। नित्य नामस्मरण। अभागी तोचि रे उद्धवा। नामीं विन्मुखपण ॥९॥ बळिया बळिष्ठ तोचि रे उद्धवा। निज मानसीं जिंकणें। नपूंसक तोचि रे उद्धवा। मनामागें धांवणें ॥१०॥ लाभ तो जाण रे उद्धवा। नित्य भगवद्भक्ती। अलाभ तो जाण रे उद्धवा। नित्य विषयासक्ती ॥११॥ सत्य तें जाण रे उद्धवा। सम ब्रह्म देखणें। असत्य तेंचि रे उद्धवा। जो देह मी म्हणें ॥१२॥ वाचा सत्य अनुवादणें रे उद्धवा। तें लोक सत्य। सम ब्रह्म न देखणें। तें आलस्य निर्धूत ॥१३॥ उत्तम धर्म तोचि रे उद्धवा। निज धर्म ज्या गांठीं। अधम तोचि रे उद्धवा। धनलोभीया दृष्टी ॥१४॥ पावन यज्ञ तोचि रे उद्धवा। द्विजमुखीं अर्पे। अधम यज्ञ तो उद्धवा। लोभावरी समर्पे ॥१५॥ वरिष्ठ लक्ष्मी ती जाण रे उद्धवा। सर्व भावीं निरास। अलक्ष्मीते रे उद्धवा। ज्यासी आशापाश ॥१६॥ भाग्य तें जाण रे उद्धवा। वैराग्य बाणें। अभाग्य तेंचि रे उद्धवा। जो देहीं मी म्हणें ॥१७॥ ईश्वर तोचि रे उद्धवा। ज्याची सर्वसत्ता। अनीश्वर तोचि रे उद्धवा। ज्याचें स्त्रीआधीन जीविता ॥१८॥ पवित्र तोचि रे उद्धवा। कर्मी ब्रह्म प्रीती। अपवित्र तोचि रे उद्धवा। कर्मी बद्धप्राप्ती ॥१९॥ पंडित तोचि रे उद्धवा। जो देह अहंता छेदी। मूर्ख तोचि रे उद्धवा। देह अभिमानी बुद्धी ॥२०॥ संन्यासी तोचि रे उद्धवा। सर्व संकल्प त्यागी। परगृहीं तोचि रे उद्धवा। मोह ममता अंगीं ॥२१॥ स्वर्ग तो जाण रे उद्धवा। नित्य संग संती। नरक तो जाण रे उद्धवा। नित्य अधर्मी वृत्ती ॥२२॥ सखा तो जाण रे उद्धवा। स्वयें सद्गुरुराव। वैरी तो जाण रे उद्धवा। देहीं अहंभाव ॥२३॥ दरिद्री तो जाण रे उद्धवा। ज्यासी लोलुप चित्तीं। कृपण तोचि रे उद्धवा। द्रव्यदारा आसक्ती ॥२४॥ एका जनार्दनीं कवित्व। चित्तीं चैतन्य गोडे। एकी एकहि धरितां। पुरे सर्वहि कोड ॥२५॥

३२९४ भावें जनार्दन बोले उद्धवासी। बा रे तूं परियेसी गुह्य गोष्टी ॥१॥ गुह्य गोष्टी तुज सांगतो निभ्रांत। हृदये फुटत आनंदेसी ॥२॥ आनंदाचा रस न संडी प्रसंग। होसी जीवलग म्हणोनियां ॥३॥ म्हणोनी उद्धवा तुजसी बोलतां। भेदाचीये वार्ता नाहीं मज ॥४॥ मज तुज कांहीं नाहीं भिन्न भेद। कैवल्याचा सिद्ध तूंचि एक ॥५॥ तूंचि एक भक्तामाजीं शिरोमणी। आवडसी मनीं सर्व काळ ॥६॥ सर्व काळ तुज ध्याइ अहर्निशी। आनंद मानसीं समाधान ॥७॥ समाधी विश्रांती मंडण ज्ञानाचा। नाहीं प्रपंचाचा लेश कांहीं ॥८॥ कांहीं एक कृष्णमुखीं गोष्टीलागीं। उद्धव सर्वांगीं श्रवणार्थ ॥९॥ श्रवणी सादर हरिमुख न्याहाळी। सुखाचे कल्लोळीं प्रेमयुक्त ॥१०॥ प्रेमयुक्त पाहे सांवळे रूपडें। तेज चहूंकडे फांकतसे ॥११॥ फांकतसे तेज कुंडलाचे दाटी। वैजयंती कंठीं वनमाळा ॥१२॥ वनमाळा मुद्रिका दिव्यरत्नें मुगुटा। कांसेसी गोमटा पितांबर ॥१३॥ पीतांबरधारी श्रीमुख सुंदर। चरणीं तोडर गर्जतसे ॥१४॥ गर्जती नेपुरे आरुणें रंगाला। टिळक रेखिला केशराचा ॥१५॥ केशराचा टिळक

कुंकमाचीं पदें । उद्धव स्वानंदें लोळतसे ॥ १६ ॥ लोळतां देखिला भक्त वेळाइते । आलिंगन देत उद्धवासी ॥ १७ ॥ उद्धवा मज चाड नाहीं तपसाधनीं । नामसंकीर्तनी प्रीत सदा ॥ १८ ॥ सदा माझें नाम गाती जे भावेंसी । त्यासी मी मानसीं न विसंबे ॥ १९ ॥ न विसंबे भक्ता नाम जया मुखीं । सरता तिहीं लोकीं होय जाणा ॥ २० ॥ जाणा नामासरी न पवे ब्रह्मज्ञान । तीर्थादि भ्रमण व्यर्थ पाही ॥ २१ ॥ पाहे पां प्रल्हाद आसनीं शयनीं । नामाहि वांचोनि दुजें नेणें ॥ २२ ॥ दुजें नेणे एक द्रौपदी बहीणुली । हर्षे ते वेल्हाळी नाम स्मरे ॥ २३ ॥ नाम स्मरतां गजेंद्रा तुटलें बंधन । पतीतपावन नाम श्रेष्ठ ॥ २४ ॥ नाम सुखानंदें भवानीशंकर । जपे निरंतर नाम माझें ॥२५॥ माझ्या नामरंगीं गोपाळ गजरी । घालती घुमरी आल्हादेसी ॥२६॥ आल्हादें नाचती प्राण माझे ठायीं । सर्वांसी मी पाही त्यासारिखा ॥ २७ ॥ सारिखाची होय थोरा आणि साना । जैसी हे वासना जनार्दनीं ॥२८॥ जनार्दनीं गातां धाक यमदूतां । येणें जाणें वार्ता तेथें कैंची ॥ २९ ॥ कैचा कळिकाळ पळे दशदिशा । माझ्या नामासारिसा न राहेचि तो ॥ ३० ॥ चित्त मनें शुद्ध गाती माझें नाम । त्याचे दासीकाम करीन सत्य ॥ ३१ ॥ सत्य बोलंगणें भक्ताचे अंगणीं । वंदीं पायवणी निजभावें ॥३२॥ भावाचा मी भोक्ता नावडेची कांहीं । नामालागी पाहीं अंकीत मी ॥ ३३ ॥ अंकीत मी होय श्रवणी संतुष्ट । तयासी वैकुंठ आइतेची ॥ ३४ ॥ आइताची ठेवी जीव तयावरी । निंबलोण करी वेळोवेळां ॥ ३५ ॥ वेळोवेळां त्याचे द्वारींच तिष्ठत । नाहींच पहात मानामान ॥३६॥ मानामान सर्व सांडिले उद्धवा । भक्तिप्रेमभावा लागोनियां ॥ ३७ ॥ लागवेग मज सप्रेम कीर्तनीं । लक्ष्मी डावलोनि नामप्रेम ॥ ३८ ॥ प्रेम नाहीं मज योगी हृदय कमळीं । सविता मंडळी स्थिर नव्हे ॥ ३९ ॥ नव्हे मी संतुष्ट महा यज्ञदानीं । पंचाग्नी साधनीं चाड नाहीं ॥ ४० ॥ चाड असे जेथें हरिनाम गाती । त्यांच्या पुण्या मिती ब्रह्मा नेणें ॥ ४१ ॥ ब्रह्मयाचा सुत नारद विख्यात । स्वबोधें डुल्लत नामबळें ॥ ४२ ॥ नामबळें देखा तरला चांडाळ । नेला अजामेळ मुक्तिपंथा ॥ ४३ ॥ मुक्तिपंथें नेली नाम घेतां वाणी । तात्काळ कुंटिणी उद्धरियेली ॥ ४४ ॥ तारिल्या गोकुळीं गोपिका सुंदरी । तयांचे शरीरीं मीच वसें ॥ ४५ ॥ वसें घरोघरीं प्राण माझे ठायीं । न विसंबती पाही क्षण मज ॥ ४६ ॥ मज आठवितां उठतां बैसतां । दळिता कांडितां नाम माझें ॥ ४७ ॥ मज आठविती चालतां बोलतां । गाइते दुहीतां नाम माझें ॥ ४८ ॥ माझिये स्मरणीं सुखाचे शेजारी । प्रीति पाडेभरी चित्त त्याचें ॥ ४९ ॥ चित्ताचा चोरटा ज्यासी जैसा भाव । त्यासी मी वासुदेव तैसा होय ॥ ५० ॥ होय ज्यासी माझें भजनीं संभ्रम । त्यासी मी आत्माराम प्रियकर ॥५१॥ प्रियकर आत्मा म्हणोनियां जाण । केलें निरूपण भक्तराया ॥ ५२ ॥ भक्तासी उपाय नामींच विस्तार । नाहीं आन थोर नामेंवीण ॥ ५३ ॥ नाम सारासार ओवीया चौपन्न । करिती पठण निजभावें ॥ ५४ ॥ भावें उच्चारी होय पापधुणी । एका जनार्दनीं संकीर्तन ॥ ५५ ॥

## मनास उपदेश.

३२९५ मन एके ठायीं । राहे ऐसें करी कांहीं ॥१॥ सर्व साधनांचें सार । मनीं करावा विचार ॥२॥ एकाग्र तें मन । करूनीं करावें भजन ॥ ३ ॥ मन जिंकावें पां आधीं । तेणें तुटेल उपाधी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन । दृढ ठेवावें बांधून ॥ ५ ॥

३२९६ मनें करूनि विश्वास । संतचरणा व्हा रे दास ॥ १ ॥ आणीक न लगे साधन । मन आवरुनी करी भजन ॥ २ ॥ मन धरीं मुष्टीमाजीं । वाव तूं न शिणें सहजीं ॥ ३ ॥ मन दृढ देवापायीं । एका जनार्दना पाहीं ॥ ४ ॥

३२९७ मनें कल्पोनियां केली विटंबना । हिंडविलें राना वासनेच्या ॥१॥ तैसें नका करूं वाउगें चिंतन । मन आकळून कार्य करा ॥ २ ॥ मनाचें आकलन करावें पां आधीं । वाउगी उपाधी तुटतसे ॥३॥ एका जनार्दनीं आवरूनी मन । मग करी भजन सुखरूप ॥४॥

३२९८ नका धांवूं तुम्हीं सैरा । मनामागें या सत्वरा ॥१॥ मन करा पैं आधीन । तेणें जोडे संतचरण ॥२॥ मन आहे महापापी । लावावें तें हरिरूपीं ॥३॥ मन स्थिर करूनी निश्चयें । एका जनार्दनीं पाहे ॥ ४ ॥

३२९९ करितां अनुष्ठान । मन धावे सहज जाण ॥१॥ मंत्र तंत्र यंत्र भेद । मनें केला वादावाद ॥ २ ॥ आधीं मनातें जिंकावें । सहज रूप मग पहावें ॥ ३ ॥ मन करी आधीन आधीं । एका जनार्दनीं तुटे व्याधी ॥

३३०० मन करूनियां सावध। याचे स्मरे तूं गोविंद ॥१॥ तेणें साधे सर्व काज। सकळ साधनांचे निज ॥२॥ मन धरीं एकमुष्टी। वाचे जपे नाम गोष्टी ॥३॥ मन धांवे भलतीकडे। साधन वायां जाय कोडें ॥४॥ मन आवरुनी साधन। तेणें पावसी निजखूण ॥ ५ ॥ खूण संतांवांचुनी। एका जनार्दनीं ध्यानीं ॥ ६ ॥

३३०१ न करी सायास आणिक संकल्प। वायांचि विकल्प न धरी मनीं ॥ १ ॥ मनाचें जें मन करीं तें स्वाधीन। तेणें नारायण कृपा करी ॥२॥ एका जनार्दनीं टाकूनि कल्पना। श्रीसंतचरणां शरण जाई ॥३॥

३३०२ अखंड सदा ध्यान। पांडुरंगीं लावा मन ॥१॥ ऐसा उदार हा हिरा। टाकुनि वेचिताती गारा ॥२॥ अमृत सांडोनि। बळें घेती कांजवणी ॥ ३ ॥ कामधेनु कल्पतरु। एका जनार्दनीं आगरु ॥ ४ ॥

३३०३ मन करूनियां स्थिर। हृदयीं ध्यायीं तो साचार ॥ १ ॥ मग सुखाची वसती। सदा समाधान चित्तीं ॥ २ ॥ समाधी समाधान। सहज घडे ब्रह्मज्ञान ॥ ३ ॥ तुटे संसाराचा कंद। वाचा नामस्मरण छंद ॥ ४ ॥ हेंचि साधनांचें सार। सदा चित्तीं परोपकार ॥ ५ ॥ एका जनार्दनीं ध्यान। ध्यानीं मनीं जनार्दन ॥ ६ ॥

३३०४ मन मनाशीं होय प्रसन्न। तेव्हां वृत्ति होय निरभिमान ॥ १ ॥ पावोनि गुरूकृपेची गोडी। मना मन उभवी गुढी ॥ २ ॥ साधकें संपूर्ण। मन आवरावें जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण। मनें होय समाधान ॥ ४ ॥

३३०५ संकल्प विकल्प जाण। हेंचि मनाचें लक्षण ॥ १ ॥ सुख दुःख उर्मी। मन वर्ते धर्माधर्मी ॥ २ ॥ स्वर्ग नरक बंध मोक्ष। मन जाणतें प्रत्यक्ष ॥ ३ ॥ शुभ अशुभ कर्म। मनालागीं कळे वर्म ॥ ४ ॥ करा निःसंकल्प मन। म्हणे एका जनार्दन ॥५॥

३३०६ मनाचा सविस्तर। ऐका तुम्ही वो निर्धार ॥ १ ॥ मनें केलें सगुण निर्गुण। मनें दाखविलें चैतन्य ॥२॥ मनें नामाविलें देवां। मनें लोळविलें जीवां ॥३॥ मन अज्ञानाची राशी। मन धावें तें सायासी ॥४॥ एका जनार्दनीं मन। दृढ ठेवावें बांधोन ॥ ५ ॥

३३०७ मना तूं परम चांडाळ। अधम खळाहूनि खळ। विषयीं तळमळ। बहु करसी पापिष्ठा ॥ १ ॥ धरीं विठ्ठलीं विश्वास। आणिक नको रे सायास। वाउगा तो सोस। सांडी सांडी अधमा ॥ २ ॥ करी संतांचा सांगात। पूर्ण होती मनोरथ। न धरी दुजा हेत। विठ्ठलांवाचुनी ॥ ३ ॥ बहु सांडीं तूं भाषण। आणिक न करी साधन। एका जनार्दनीं शरण। विठ्ठलासी निघे पां ॥ ४ ॥

३३०८ मना तूं अधीर अधीर। बहु पातकी पामर। न राहासी स्थिर। क्षणभर निश्चयें ॥ १ ॥ किती शिकवावें तूंतें। नायकसी एक चित्तें। बहु गुणें बोलतां तूंतें। नायकसी पामरा ॥ २ ॥ एकपणें धरीं भाव। दृढ चित्तीं विठ्ठलराव। वाउगा तो भेव। नको धरूं आणिक ॥ ३ ॥ हेंचि तरीं शिकविलें। कांहीं नको आन दुजें वहिलें। एका जनार्दनीं बोलें। करूणाभरित मनासी ॥ ४ ॥

३३०९ बैसतां निश्चळ। मन करी तळमळ ॥ १ ॥ ध्यान धारणा ते विधी। मनें न पावेची सिद्धी ॥२॥ जप तप अनुष्ठान। अवघें मनेंची मळीन ॥ ३ ॥ दया शांती क्षमा। मनें न येती समा ॥ ४ ॥ ऐशा मना काय करावें। कोठें निवांत बैसावें ॥ ५ ॥ एका जनार्दनीं शरण। मन धांवे सहजपणें ॥ ६ ॥

३३१० कौतुक वाटतें मनाचें। नामस्मरण नेणें साचें ॥ १ ॥ कां रे मानिशी कंटाळा। मना खळा अधम तूं ॥ २ ॥ नायकसी शिकविलें। धांवसी वहिलें स्वइच्छा ॥ ३ ॥ सांगतों तें नायकसी। एका जनार्दनीं म्हणे तुजसी ॥ ४ ॥

३३११ सांडी मांडी नको करूं। वाउगा भरू श्रमाचा ॥ १ ॥ जेथें तेथें धांवे मन। करा खंडन तयाचें ॥ २ ॥ नका घालूं गोवागुंती। तेणें फजिती मागें पुढें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भाव। अवघा दिसे देवाधिदेव ॥ ४ ॥

३३१२ देहीं शत्रू वसती दूरदेशीं। येतां बहु दिवस लागती तयांसी ॥ १ ॥ बाह्य शत्रूचें अल्प दुःख। मन शत्रूचें वर्म अशोख ॥ २ ॥ आसनीं शयनीं एकांतीं। जपीं अथवा ध्यानस्थिती ॥ ३ ॥ ऐशिया मनातें न जिंकितां। देवपण न ये हातां ॥ ४ ॥ देवपणाचे भुलले हावें। एका जनार्दनीं नेणती देवें ॥५॥

३३१३ मनें ब्रह्मादिकां केलीसे थोकडी। तेथें परवडी कोण मानवाची ॥ १ ॥ इंद्रिय न चाले मनावीण देखा। मनाची मनरेखा दुलंघवे ॥ २ ॥ शस्त्रें तें न तुटे जळें तें न बुडे। ऐसे ते पोवाडे मनें होती

॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन ते स्वाधीन । करितां सर्व यज्ञ हातीं जोडे ॥ ४ ॥

३३१४ मना दुजी बुद्धि नको बा ही । संतसमागमीं राही । यापरतें कांहीं । दुजें नको सर्वथा ॥ १ ॥ मीपणाचा ठावो । टाकी हा संदेहो । पडसी प्रवाहो । वाउगाची शिणसी ॥ २ ॥ बहुत मतमतांतरें । कासया शिणसी रे आदरें । संतचरणीं झुरे । रात्रंदिवस मानसीं ॥ ३ ॥ कायीक वाचीक सर्वथा । भजे भजे पंढरीनाथा । एका जनार्दनीं तत्त्वतां । संतचरणीं लीन होय ॥ ४ ॥

३३१५ दुजियाची निंदा नको रे करूं मना । चिंती या चरणा संतांचिया ॥१॥ होउनी उदास । गाई सदा नाम । बैसोनि निष्काम एकांतासी ॥ २ ॥ एकांतींची गोडी शंभु जाणे जोडी । आणिक परवडी न कळे कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रामनाम सार । करितां उच्चार आळस नको ॥ ४ ॥

३३१६ मना नको नको हिंडों दारोदारीं । कष्ट झाले भारी येतां जातां ॥ १ ॥ कल्पना सोडोनि संतांसंगें राहें । सर्व सुख आहे त्यांचे पायीं ॥ २ ॥ ज्याचिया दरुशनें शोक मोह जळे । पाप ताप पळे काळभय ॥ ३ ॥ जवळीच दिसे भावितां भावितां । एका जनार्दनीं ध्यातां सुख मोठें ॥ ४ ॥

३३१७ मना सांडीं विषय खोडी । लावी विठ्ठलेंशी गोडी ॥१॥ आणीक नलगे साधन । एकलें मन करी उन्मन ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल सांवळा । पाहें पाहें उघडा डोळा ॥३॥ एका जनार्दनीं शरण । मनचि होय विठ्ठल पूर्ण ॥ ४ ॥

३३१८ अरे अरे मना । कांहीं करी विचारणा ॥१॥ शरण विठोबासी जाई । मग राही भलते ठायीं ॥ २॥ वाउगा तूंचि सोस । मना न करी सायास ॥ ३ ॥ येतो काकुलती । एका जनार्दनीं प्रीती ॥ ४ ॥

३३१९ न करी तळमळ मना । चिंतीं चरणा विठोबाचे ॥ १ ॥ राहे क्षणभरी निवांत । न करी मात दुजी कांहीं ॥२॥ संतचरण वंदी माथां । तेणें सर्वथा सार्थक ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मात । मना ऐकें तूं निवांत ॥ ४ ॥

३३२० आणिक साधनीं नको गुंतूं मना । धरी या चरणां विठोबाच्या ॥ १ ॥ वाउगा बोभाट कासया खटपट । पंढरीची वाट सोपी बहु ॥ २ ॥ एका जनार्दनीं कायावाचामनें । सतत राहणें संतांपायीं ॥ ३ ॥

३३२१ आणिकाची आस नको करूं मना । चिंती तूं चरणा विठोबाच्या ॥ १ ॥ वाचे नाम गाये । वाचे नाम गाये । वाचे नाम गाये विठोबाचें ॥ २ ॥ करकटीं उभा चंद्रभागे तटीं । पुंडलिकापाठीं धरुनि ध्यान ॥ ३ ॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी । वाट पाहे हरि भाविकांची ॥४ ॥ एका जनार्दनीं उभारुनी बाह्या । आलंगीत आहे भोळे भोळे ॥ ५ ॥

३३२२ अंतरींचा भाव दृढ धरी मना । सेवी तूं चरणा विठोबाच्या ॥ १ ॥ साधन आणिक नको कष्ट कांहीं । राममुखीं गाई सदा नेमें ॥ २ ॥ आकार निराकार सर्वहि व्यापक । तो उभा सम्यक समपदीं ॥३॥ एका जनार्दनीं वाहुनियां आण । विठ्ठलाचे चरण ध्यावे आधीं ॥ ४ ॥

३३२३ वाउगी उपाधी न करीं रे मना । चिंती या चरणा राघवाच्या ॥१॥ अंतकाळीं सखा कोणी नाहीं दुजा । पुत्र पत्नी ओजा नये कामा ॥२॥ चालतांचि देह म्हणती माझा माझा । अंतकाळीं पैजा यम बांधी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सर्व हें मायिक । शाश्वत तें एक श्रीरामनाम ॥ ४ ॥

३३२४ मना तूं ऐक माझी मात । श्रीविठ्ठलीं धरी कां रे हेत ॥ १ ॥ कांहीं पडतां जड भारी । वाचे म्हणे विठ्ठल हरी ॥ २ ॥ तुज ही खूण निर्वाणी । शरण एका जनार्दनीं ॥ ३ ॥

३३२५ मना ऐक हे विनंती । तूं न करी दुजी खंती । विठ्ठलावांचुनी प्रीती । दुजी नको आणिक ॥ १ ॥ वाउगा तूं न करी सोस । दृढ घालीं तूं कास । धरी पां विश्वास । विठ्ठलचरणीं ॥ २ ॥ सांडो माझें आणि तुझें । वाउगें नको वाहूं वोझें । निपजती बीजें । संतचरणीं सकळ ॥ ३ ॥ हेंचि साधनांचें सार । विठ्ठलमंत्र उच्चार । एका जनार्दनीं घेरझार । येणें तुटे समूळ ॥ ४ ॥

३३२६ मना निश्चय तूं करी । म्हणे जाईन पंढरी ॥ १ ॥ नेमधर्म हाचि माझा । पंढरीवांचुनी नाहीं दुजा ॥ २ ॥ सर्व तीर्थांचें माहेर । विटे उभा कटीं कर ॥ ३ ॥ आवडीनें धरा भाव । एका जनार्दनीं भेटे देव ॥ ४ ॥

३३२७ भक्त करुणाकर दीनाचा वत्सल। उभा श्रीविठ्ठल विटेवरी ॥ १ ॥ मना जाय तेथें मना जाय तेथें। मना जाय तेथें पंढरीये ॥ २ ॥ पुरतील काम निवारेल गुंती। आहे ती विश्रांति संतसंगें ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी सोहळा आनंद। मिळालासे वृंद वैष्णवांचा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं आनंदी आनंद। तेणें परमानंद डुल्लतसे ॥ ५ ॥

३३२८ विठ्ठल पंढरपुरनिवासी। विठ्ठल उभा भीवरेसी। विठ्ठल पुंडलिकापाशीं भक्ति प्रेमेशी तिष्ठत ॥१॥ जाई जाई मना तेथें। सुखें वैष्णव नाचती जेथें। ब्रह्मानंदपद दरुशनमात्रें। देत आहे भक्तांसी ॥ २ ॥ सुलभ सुलभ मंत्रराज। शंभु जाणे निज-बीज। एका जनार्दनीं गुज। सांगतसे भाविकां ॥३॥

३३२९ लाभें लाभ हातांसी ये। हेचि सोय धरीं मना ॥ १ ॥ वाउगा सोस नको वाहूं। सुखें गाऊं विठ्ठला ॥ २ ॥ नको नको श्रम पसारा। सैरा वैरा धावूं नको ॥ ३ ॥ निवांत सेवीं हरिकीर्तना। एका जनार्दनीं म्हणे मना ॥ ४ ॥

३३३० निवांतपणें मना चिंती तूं चरणा। आणिक कल्पना न करी कांहीं ॥ १ ॥ चिंती पां विठ्ठल काया वाचा मनें। संसारबंधन तुटेल तेणें ॥ २ ॥ संसाराची वार्ता नुरेचि पां कांहीं। आणिक प्रवाहीं पडूं नको ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठलनामीं छंद। मना तूं गोविंद आठवी कां रे ॥ ४ ॥

३३३१ मना ऐक एक मात। धरी हरिनामीं हेत ॥ १ ॥ तेणें चुकति बंधन। वाचे म्हणे नारायण ॥ २ ॥ नारायण नाम। तेणें सर्व होय काम ॥ ३ ॥ दृढ धरीं भाव। न करीं आणिक उपाव ॥ ४ ॥ उपाव न करीं कांहीं। शरण देवासी तूं जाई ॥ ५ ॥ एका जनार्दनीं मन। करीं देवासी अर्पण ॥ ६ ॥

३३३२ मना तूं एक करी। वाचे आठवीं श्रीहरी ॥ १ ॥ आणिक न करी साधन। वाचे म्हणे नारायण ॥ २ ॥ सर्व काळ हाचि धंदा। वाचे आठवी गोविंदा ॥ ३ ॥ तेणें जीवा सोडवण। शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

३३३३ अरे अरे मना। सत्य सत्य धरी ध्याना। पंढरीचा राणा। वेध ठेवीं तयांचा ॥ १ ॥ तुज नाहीं रे बंधन। सहज आकळे ब्रह्मज्ञान। वाउगें शोधन। नको करूं ग्रंथांचें ॥ २ ॥ मागां तुज शिकविलें। परी तूं रे नायकशी वहिलें। तुझें हितगुज कथिलें। शुद्धि करी कांहीं ते ॥ ३ ॥ तूं अनिवार सर्वांसी। म्हणोनि कींव भाकितों तुजसी। शरण गुरु जनार्दनासी। एका भावें जाई तूं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं शरण। जातां होईल समाधान। वाउगें नको भ्रमण। चरणीं राहे निवांत ॥ ५ ॥

३३३४ अरे माझ्या मना। नित्य भजें नारायणा ॥१॥ तेणें तुटेल बंधन। उभय लोकीं कीर्ति जाण ॥ २ ॥ मिळेल सकळ संपत्ती। नाश पावेल विपत्ती ॥ ३ ॥ प्राप्त होय ब्रह्मपद। वाचे वदावा गोविंद ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मन। सदा चिंती नारायण ॥ ५ ॥

३३३५ माझ्या मना लागो छंद। नित्य गोविंद गोविंद ॥१॥ तेणें निरसेल बंधन। मुखीं वदे नारायण ॥२॥ ब्रह्मरूप होय काया। माया जाईल विलया ॥ ३ ॥ होय सर्व सुख धणी। चुके जन्ममरण खाणी ॥ ४ ॥ म्हणे एका जनार्दन। सदा समाधान मन ॥ ५ ॥

३३३६ मनें नागविलें बहुतापरी। धांव धांव तूं श्रीहरी ॥ १ ॥ आतां माझें मन। दृढ ठेवावें आकळून ॥ २ ॥ वाहात चालिलों मनामागें। बुडतसे प्रपंचगंगें ॥ ३ ॥ धांवे धांवे विठाबाई। एका जनार्दनीं लागे पायीं ॥ ४ ॥

३३३७ काय तुझें वेंचे देवा। मन आपुले स्वाधीन ठेवा ॥ १ ॥ हेंचि मागणें तुजप्रती। वारंवार हे विनंती ॥२॥ माझी ठेवा आठवण। म्हणे एका जनार्दन ॥३॥

३३३८ माझ्या मनाचें तें मन। चरणीं ठेवावें बांधून ॥ १ ॥ मग ते जाऊं न शके कोठें। राहे तुमच्या नेहटें ॥ २ ॥ मनासी तें बळ। देवा तुमचें सकळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देवा। दृढ मन पायीं ठेवा ॥ ४ ॥

३३३९ पायीं ठेविलिया मन। सहज होईल उत्तीर्ण ॥ १ ॥ आलों ज्या कारणा। तेंचि करवा पंढरीराणा ॥ २ ॥ वाउगी ती आंस। मनीं नसावी सायास ॥ ३ ॥ येतो काकुलती। एका जनार्दना प्रती ॥ ४ ॥

३३४० तापलिया तापें शिणलीया मार्गीं। पोहे ठाकी वेगें कृष्णकथा ॥ १ ॥ कृष्णकथा गंगा सावळे उदक। मनां बुडी दे कां वोल्हावसी ॥ २ ॥ वोल्हावलें मन इंद्रिया टवटवी। गोपिराज जीवीं सांठविलें ॥ ३ ॥ सांठविलें जीवीं जाणा याची खुणा। जरी

होय करुणा सर्वां भूतीं ॥४॥ सर्वां भूतीं राम दृष्टीचें देखणें । नाहीं दुजे पेणें आडवस्ती ॥५॥ आडवस्ती नाहीं एका जनार्दनीं । श्रीरामावांचुनी आन नेणें ॥६॥

३३४१ तुज सांगतसें मना । पाहे पंढरीचा राणा ॥ १ ॥ नको दुजा छंद कांहीं । राहे विठ्ठलाचे पायीं ॥ २ ॥ विषयीक वासना । सोडी सोडी सत्य जाणा ॥ ३ ॥ जेणें घडे सर्व सांग । फिटे संसाराचा पांग ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । सुलभ उपाय नेटका ॥ ५ ॥

३३४२ जन्ममरण सांकडे निवारावया कोडें । विठ्ठल उघडें पंढरीये ॥ १ ॥ तयाचे चरणा मिठी घाली मना । नाहीं तुज यातना जन्मकोटी ॥ २ ॥ चंद्रभागे स्नान पुंडलीक भेटी । पूर्वजा वैकुंठीं मार्ग सोपा ॥ ३ ॥ महाद्वारीं नाचा जोडोनियां पाणी । पुढें चक्रपाणी उभा विटे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं तयासी भेटतां । मोक्ष सायुज्यता पायीं लागे ॥५॥

३३४३ मन रामीं रंगले अवघें मनचि राम जालें । सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें ॥ धृ. ॥ चित्तचि हारपलें अवघें चैत्यनचि जालें । देखतां देखतां अवघें विश्व मावळलें । पहातां पहातां अवघें सर्वस्व ठकलें ॥ १ ॥ आत्मयारामाचें ध्यान लागलें मज कैसें । क्रिया कर्म धर्म अवघे येणेंचि प्रकाशे । सत्य मिथ्या प्रकृति पर रामचि अवघा भासे ॥ २ ॥ भक्ति अथवा ज्ञान शांती आणिक योगस्थिती । निर्धारितां न कळे रामस्वरुपीं जडली प्रीती । एका जनार्दनीं अवघा रामची आदि अंतीं ॥ ३ ॥

## भाग ] पौराणिक कथानकें. [ ४ था

### दशावतार.

३३४४ वेद नेतां शंखासुरीं । मत्स्य अवतार होय हरी ॥ १ ॥ मारूनियां शंखासुरा । ब्रह्मया तोषविलें निर्धारा ॥२॥ रसातळा जाता अवनी । तळीं कासव चक्रपाणी ॥ ३ ॥ काढोनिया चौदा रत्नें । गौरविला सुरभूषण ॥४॥ हिरण्याक्षें नेतां धरा । आपण सूकर पैं जाहला ॥ ५ ॥ मारूनि दैत्यासी । सुखी केलें देवासी ॥ ६ ॥ प्रल्हादाकारणें । स्तंभामाजीं गुरगुरणें ॥ ७ ॥ धरूनियां जानूवरी । वधिला हिरण्यकश्यपु निर्धारीं ॥ ८ ॥ इंद्राच्या कैवारें धांवून । रूप धरिलें वामन ॥ ९ ॥ बळी पाताळीं घातिला । आपण द्वारपाळ जाहला ॥ १० ॥ सहस्त्रार्जुनें पीडिलें । आपण परशुराम जाहले ॥ ११ ॥ पितृआज्ञा मानुनी खरी । माता वधिली निर्धारीं ॥ १२ ॥ सीतेचें करूनी मीस । केला राक्षसांचा नाश ॥ १३ ॥ चौदा वर्षें वनांतरीं । वनवास सेवी हरी ॥१४॥ वसुदेव देवकी-साठीं । अवतार धरिला पोटीं ॥ १५ ॥ मारूनियां कंसासुर । उतरिला मेदिनीचा भार ॥ १६ ॥ येऊ-नियां पंढरपुरा । धरिला विटेवरी थारा ॥ १७ ॥ पुंडलिकासाठीं उभा । एका जनार्दनीं शोभा ॥१८॥

३३४५ वेदान उद्धरंते । मीनरूपेण जगन्निवंते । कच्छरूपेण भूगोलंते । पृथ्वी चक्रमुष्टिभ्रामंते ॥ १ ॥ ऊर्ध्व धारयंते । हिरण्याक्ष दैत्य शोधियंते । दंतावरी पृथ्वी धरियंते । वराहरूपेण दैत्य मारियंते ॥ २ ॥ दैत्य प्रल्हाद छळयंते । स्तंभीं प्रगट रूपंते । हिरण्य-कश्यपु विदारयंते। नृसिंह रूपेणंते ॥ ३ ॥ बळी दैत्य छळयंते । क्षत्र निक्षत्र कुर्वेते । त्रिपाद पृथ्वी दान मागंते । वामनरूपेण दारंते ॥ ४ ॥ क्षत्रिय कुलनाशो कुर्वेते । जमदग्नीरेणुका उद्धरंते । सहस्त्र अर्जुन दैत्य मारियंते । निःक्षत्रिय पृथ्वी कुर्वेते । परशुरामरूपेण ॥ ५ ॥ पौलस्ती रावण जयंते । सीता रत्न चोरियंते । रामरूपेण लंका हालयंते । रावण सहकुल वधियंते ॥ ६ ॥ द्वापारीं कलह कलहयंते । शिशुपाळ वक्र-दंत कंसंते । विध्वंसी रामभद्र रूपंते । करुणादया वृंद माते ॥७॥ म्लेंछ नित्यजान्मूर्छयंते । विश्व बोध-रूपेणते । नाशयंते कलीरूपेणंते । एका जनार्दन तया कृपे वर्णियंते ॥ ८ ॥

३३४६ मच्छरूप धरुनी शंखासुर मारिला । तेव्हां श्रमोनी जघनीं कर ठेविले ॥ १ ॥ कर्मरूप धरुनी पृथ्वी धरिली पृष्ठीं । तेणें श्रमोनी कर ठेविले कटीं ॥ २ ॥ हिरण्याक्ष मर्दुनीं दाढेवरी धरिली अवनीं । तेणें श्रमोनी कर धरिले जघनीं ॥ ३ ॥ रक्षिला प्रल्हाद भक्त विदारिला क्रूर दैत्य । भागला तेणें कटावर कट मिरवत ॥ ४ ॥ बळी पाताळीं घातला दार राखितां श्रम जाहला । म्हणोनि कटावरी कर ठेउनी राहिला ॥ ५ ॥ एकवीस वेळां निक्षत्रीं निर्वैर धरित्री । तेणें श्रमोनी कर जघनीं धरित्री ॥ ६ ॥ लंकेपुढें वज्रठाण मांडिलें रावणातें भंगिलें । म्हणोनि कर जघनीं धरियेले ॥ ७ ॥ लागला काळयवन पाठी पळता जाला कष्टी । म्हणोनि उभा येथें कर ठेउनी कटीं ॥८॥ लोक देखोनी उन्मत्त दारा धनीं आसक्त ।

न बोले बौद्धरूप ठेविले जघनीं हात ॥ ९॥ पुढें म्लेंछ संहार म्हणोनि कर कटीं। एका जनार्दनीं पाहतां चरणीं घातली मिठी ॥ १० ॥

३३४७ वेद घेऊनियां गेला शंखासुर। मत्स्य अवतार जयालागीं ॥ १ ॥ तोचि महाराज भीवरेचे तटीं। उभा जगजेठी विटेवरी ॥ २ ॥ घेउनी अवतार वेद आणियेले। ब्रह्मीया स्थापिलें ब्रह्मपुरीं ॥३॥ शंखासुर वधुनी विजयी पैं धाला। वर्णिता पैं धाला जनार्दन ॥

३३४८ इंद्राचे कैवारें कांसव पैं झाला। देव घुसळित पृष्ठीं भार वाहिला ॥ १ ॥ तोचि हा महाराज विटे उभा नीट। भक्त तारावया केली पंढरी पेठ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रत्नें चौदा काढिलीं। देव सुरवर जेणें सुखीं केलीं ॥ ३ ॥

३३४९ रसातळां जातां अवनी। घेतलें वराहरूप चक्रपाणी ॥ १ ॥ तोचि महाराज पुंडलिकासाठीं। कर ठेउनी कटीं उभा विटे ॥ २ ॥ हिराण्याक्ष वधुनी सुखी केले देव। एका जनार्दनीं त्याचे पायीं ठाव ॥३॥

३३५० भक्त प्रल्हादाकारणें नरसिंह झाला। विदारूनि दैत्य स्तंभीं उद्‌भव केला ॥१॥ तोचि महाराज कर ठेऊनि कटीं। उभा राहिला अठ्ठावीस युगें पाठी ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्तकाज कैवारी। संहारुनी दैत्य वाढवी भक्तांची थोरी ॥ ३ ॥

३३५१ बळीचे दारीं आपण वामन झाला। इंद्राच्या कैवारें बळी पाताळीं घातिला ॥ १ ॥ तोचि महाराज उभा विटेवरी। कर धरिले कटीं पाउलें दोन्ही साजिरी ॥२॥ भक्ताचिया काजा विटे उभा राहिला। एका जनार्दनीं देव डोळा पाहिला ॥ ३ ॥

३३५२ मातेच्या कैवारा सहस्रार्जुन वधी। एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय शोधी ॥ १ ॥ तोचि मायबाप चंद्रभागे तीरीं। कर कटावरी ठेउनि उभा ॥ २ ॥ एका जनार्दनीं ज्याची कीर्ती वर्णितां। द्वैत हारपलें ममता देशधडी चिंता ॥ ३ ॥

३३५३ सीतेच्या कैवारें रावण वधियेला। जाऊनियां लंकें बिभीषण स्थापिला ॥ १ ॥ तोचि महाराज चंद्रभागे तीरीं। कट दोनी धरूनी उभा विटेवरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं रामनाम कीर्ती। त्याचें चरित्र ऐकतां समाधान वृत्ती ॥ ३ ॥

३३५४ द्वापारीं अवतार आठवा। कंसासूर वधियला श्रीकृष्ण साठवा ॥ १ ॥ तोचि महाराज चंद्रभागे तटीं। उभा राहिलासे कर ठेऊनि कटीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं चरणीं पडली मिठी। आठवा आठवितां तुटे जन्मकोटी ॥ ३ ॥

३३५५ पुंडलिकाकारणें वाळुवंटीं उभा। भक्ताच्या कैवारें दिसतसे शोभा ॥ १ ॥ पुढें चंद्रभागा वाहे अमृतमय। आषाढी कार्तिकी वैष्णवांची दाटी होय ॥ २ ॥ एका जनार्दनीं जया वैष्णव गाती। विठ्ठलनाम उच्चारितां सायुज्य मुक्ती ॥ ३ ॥

३३५६ कलंकी अवतार पुढें होईल श्रीहरी। लोपोनी जातां धर्म मग अवतार धरी ॥ १ ॥ दहा अवतार भक्ताकारणें घेतो। भक्ताची आवडी म्हणोनी गर्भवासा येतो ॥ २ ॥ अंबऋषी कैवारें दहा अवतार। घेतले एका जनार्दनीं त्याचें चरित्र वर्णिलें ॥ ३ ॥

३३५७ लटकीयाची आण। लटिकेंचि प्रमाण। ऐसियासी कोण। विश्वासेल ॥१॥ ममता बळें बळी। उदकीं देत चळी। आतिशय तळमळी। मीन जैसा ॥ २ ॥ मागतां मांसा मासा। मुरडूं धांवे घसा। डावेनी हातें कैसा। शंख करी ॥३॥ अतिशय कृपण। शरण एका जनार्दन। बाळा दे स्तनपान। पिली पोसी ॥ ४ ॥

३३५८ मागतां देखोनि दिठी। हातपाय घालूनी पोटीं। पर्वत पडिल्या पाठीं। देणें नाहीं ॥ १ ॥ मागतां न देसी। दांतीं भोये धरिसी। पांढरा डुकर होसी। तेणें कर्मे ॥ २ ॥ ठेवणें न देतां। जावों नेदी सर्वथा। बळीचिया ऐसा आतां। बांधीन पाया ॥३॥ मागत निजानिर्धारीं। खांबामाजी तूं गुरगुरी। तिखट नखें बोंचकरी। क्रोधें करुनी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं त्यातें। माग त्याच्या बापातें। फाडोनी आंतें। ठेविलें निश्चितें। देणें नाहीं ॥ ५ ॥

३३५९ मागतां कवतुक। दीन होउनी रंक। दारोदारीं भीक। मागों धावे ॥ १ ॥ मग ते करी काय। पाठी देउनी पाय। रसातळीं पाहे। घालूं धावे ॥२॥ मागों जाता पुढें। मायेचें काढी मढें। उकसाबुकसी रडे। माये माये म्हणोनी ॥ ३ ॥ फरश घेउनी करीं। ज्यातें त्यातें मारी। रक्तें रक्त उरी। परी देणें नाहीं ॥ ४ ॥ मागतां रोकडे। एका जनार्दनीं सांकडें। मेळवोनी माकडें। पाठी लागे ॥ ५ ॥

३३६० ज्यासी दहा शिरें माथा। वीस हातीं येतां। छेदुनी सर्वथा। जीवें मारी ॥ १ ॥ गांठी घ्यावया

नाहा । आतां करील काई । म्हणोनि राखी गाई । गवळीयांच्या ॥ २ ॥ तेथेंहि न सांडी परी । दहीं दूध चोरी । भोगिल्या परनारी । मूळ माईके ॥ ३ ॥ बुद्धी बोध ठेला । एका जनार्दनीं अबोला । कांहीं न बोले बोला । ठेवणें गट्ट करुनी ठेला ॥ ४ ॥

३३६१ मागतां पैं कैवाडें । लुंची लोग मुंडे । नागवा होउनी पुढें । उभा ठाके ॥ १ ॥ मागतां फाडोवाडे । धाऊनियां घोडा चढे । स्वर्ग घेऊनि वाढे । करी मारामारी ॥ २ ॥ कलंक होऊनि पुढें । ऋणामाजीं बुडे । कलीच्या अंतीं घडे । कर्म ऐसें ॥ ३ ॥ मागतां दाटोदाटी । नवल त्याची गोठी । लाविली लंगोटी । एका जनार्दनीं नारदासी ॥ ४ ॥

३३६२ सनकादिक वेडे । शुक नागवें उघडे । भुलाविले रोकडे । जडभरतासी ॥ १ ॥ पुंडलिकें जग जेठी । उभा केला वाळुवंटीं । अद्यापि पैं नुठी । धरणें त्याचें ॥ २ ॥ कटवा ठेउनी हात । उभा असे तिष्ठत । घेतलें तें निश्चित । देणें नाहीं ॥ ३ ॥ धरणें न मागतां पूर्ण । उडवी माणुसपण । जीवा जीवपण । उरों नेदी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं । एकपणाच्या वाणी । आपणा देउनी । देवो समूळ खत फाडी ॥ ५ ॥

३३६३ एका अयोध्ये अवतार । दुजा गोकुळीं निर्धार ॥ १ ॥ एकें ताटिका मारिली । एकें पूतना शोषिली ॥ २ ॥ एकें आहिल्या उद्धरिली । एक कुब्जा पावन केली ॥ ३ ॥ एकाएक पत्नीव्रत । एक गोपीतें भोगीत ॥ ४ ॥ एक हिंडे वने वनीं । एक हिंडे वृंदावनीं ॥ ५ ॥ एकें रावण मर्दिला । एकें शिशुपाळ वधिला ॥ ६ ॥ एकें बिभीषणा पाळिलें । एकें अर्जुना सांभाळिलें ॥ ७ ॥ एका वहनी हनूमंत । एका गरूड शोभत ॥ ८ ॥ एका शोभे धनुष्यबाण । एका काठी कांबळी संपूर्ण ॥ ९ ॥ ऐसा भक्ताचा कळवळा । एका जनार्दनीं बोधिला ॥ १० ॥

३३६४ एकें वनवास सेविला । एक नंदगृहीं राहिला ॥ १ ॥ एकें समुद्रीं पायवाट केली । एकें द्वारका वसविली ॥ २ ॥ एकें वानर मिळविले । एका गोपाळ सवंगडे ॥ ३ ॥ एकें पार्णियली सीता । एकें भीमकी तत्त्वतां ॥ ४ ॥ एका शोभे पीतांबर । एका मिरवे वैजयंती हार ॥ ५ ॥ ऐसे दोघे ते समर्थ । एका जनार्दनीं शरणागत ॥ ६ ॥



## एकादशीमहात्म्य.

३३६५ ऐका पुण्य पवित्र कथा । सावधान व्हावें श्रोतां । जयाचेनि अवधानें सर्वथा । कलीकल्पषें नासती ॥ १ ॥ जें आचरला अंबऋषी । रुक्मांगद सूर्यवंशीं । तेंचि व्रत एकादशी । निजधर्मासी सांगेन ॥ २ ॥ परिसा एकादशीचा महिमा । तोचि दिवस प्रिय पुरुषोत्तमा । मुकुटमणी सकळ धर्मा । विचित्र कर्मा सोडवण ॥ ३ ॥ तिथित्रयाचें महिमान । त्रैरुप अभिन्न जाण । परिसा तियेचें लक्षण । तात्त्विकार्थे तो ऐसा ॥ ४ ॥ दशमी जाणा महाविष्णु । एकादशी श्रीनारायणु । द्वादशी श्रीभगवाणु । भक्त साहाय्याकारणें ॥ ५ ॥ संक्रमणादि दान श्रेष्ठ । याहूनी ग्रहणींचें घरिष्ठ । ग्रहणाहुनी वरिष्ठ व्यतिपात वैधृती ॥ ६ ॥ याहूनी अनंत गुणें अधिक । एकादशीचें दान विशेष । दानमिषें एकाएक । देवाचि देख पैं लाभे ॥ ७ ॥ यालागीं एकादशीचें दान । तें होय देवाची समान । दानयोगें तेणें जाण । देव अपैसा पैं केला ॥ ८ ॥ अर्धोदय कपिलाषष्ठी । एकादशीच्या चरणांगुष्ठीं । योगयागांची कोटी । टाळीसाठीं न सरती ॥ ९ ॥ दशमी व्रताचा आरंभु । दिंडीपुढें समारंभु । मिळोनि वैष्णवांचा कदंबु । गीत नृत्य उत्साह ॥ १० ॥ आली एकादशी परिसोनि । उल्हास उपजे ज्याचे मनीं । धन्य धन्य त्याची जननी । पवित्र अवनी तेणें केली ॥ ११ ॥ अनंत व्रतांचिया राशी । पायां लागती एकादशी । यालागीं हरिदिनी आख्या ऐशी । त्या दिवसा पैं आली ॥ १२ ॥ एकादशी हरीचा प्रसंग । आठहि प्रहर ते अष्टांग । जे नर भाग्याचे सभाग्य । पूजा सांग करिताती ॥ १३ ॥ प्रातःकाळापासून । तेथें प्रगटे नारायण । त्यासीच म्हणती हरिदिन । व्यास वाल्मीक नारद ॥ १४ ॥ यालागीं तो हरीचा दिवस । तो सत्य जाणा हृषिकेश । धन्य धन्य भाग्य सौरस । गीत नृत्य उत्साह ॥ १५ ॥ ऐशी हरितनु एकादशी । म्हणोनि आवडे वैष्णवासी । नारद प्रल्हाद अंबऋषी । या व्रतासी विनटले ॥ १६ ॥ बरवें करावें हरिपूजन । शृंगारावें देवसदन । आठहि प्रहर हरिकीर्तन । जागरण करावें उल्हासें ॥ १७ ॥ जागरणा एकादशी । येतां होती पुण्यराशी । पदोपदीं कोटी यागांसी । फळ समारंभेसी जोडती ॥ १८ ॥ जे तेथें बैसोनि सावधान । परिसती हरिकीर्तन । त्याचें निरसे भवबंधन । समाधान ते पावत ॥ १९ ॥ वैष्णव होउनी एकादशी ।

अंग चोरी हरिकीर्तनासी। भाग्य विन्मुख आलें त्यासी। मुळ्यापासी पेणें केलें ॥ २० ॥ यालागीं एकादशीस वाडेंकोडें। नामासाठीं मोक्ष जोडे। तेथेंहि अभिमान चढे। खरत्र पुढें तयासी ॥ २१ ॥ एकादशी रंगापुढें। रंगीं नाचती वेडे बागडें। नाम गर्जती सावडें। तें आवडे गोविंदा ॥ २२ ॥ नामा सरसी वाजे टाळी। महादोषा होय होळी। सांडोनि वैकुंठ नव्हाळी। तया जवळी हरि तिष्ठे ॥ २३ ॥ जाग्रणा येऊनि एकादशी। जो हरिभक्तासी उपहासी। तो जाणावा पापराशी। नरक त्यासी पैं भीति ॥ २४ ॥ देखोनि निंदकाचा भावो। खरच पडिला संदेहो। निंदेपरतें पाप पहा हो। जगामाजीं पैं नाहीं ॥ २५ ॥ जेणें निंदिली एकादशी। तो जिताचि नरकवासी। कुष्ट लाविलें मुखासी। ये मुखासी मुखरोग ॥ २६ ॥ ज्यासी न माने एकादशी। तनू जाणावी ती राक्षसी। त्यासी संगत घडे ज्यासी। नरकवासी तो होय ॥२७॥ जे एकादशीस अन्न। तें श्वान विष्ठेसमान। तांबुल तें रुधिरपान। रजस्वले स्त्रियेचें ॥ २८ ॥ एकादशीस स्त्रीसंभोग। तयासी लागे क्षयरोग। यमयातना दुःखें अनेक। व्यथा अंगीं तो पावे ॥ २९ ॥ बाह्य मिरवी एकादशी। चोरुनी खाये अन्नासी। उदर शूळ लागे त्यासी। नातरी कुक्षीं गुल्म होती ॥३०॥ एकादशीस स्नेहमार्जन। बुद्धि अंध होय तेणें। नेत्ररोगासी उठणें। क्षुद्र पाहणें हरिभक्ता ॥ ३१ ॥ जो निंदी एकादशी। नरका जाणें न लगे त्यासी। तो स्वयेंचि नरकवासी। क्षणी आतळला ॥ ३२ ॥ जेणें दुषिलें एकादशी। क्षणी त्याचें नाम घेशी। रामनाम म्हणतां वेगेसी। त्या पापासी प्रायश्चित्त ॥३३॥ ज्यासी निष्ठा एकादशीचें भजन। त्यासी सर्वथा नाहीं पतन। पूर्वज उद्धरती जाण। यमयातनेपासुनी ॥ ३४ ॥ गर्जती हरिनामाचा घोष। त्यांचा यमदूतां पडे धाक। नामें प्रायश्चित्त शीक। लागली भीक महापापा ॥३५॥ यमयातनेचे पितर। वांछिताती निरंतर। एकादशी हरिजागर। वंशीं तत्पर हो कोणी ॥३६॥ पुत्र अथवा भातृपुत्रा। दुहित्र अथवा दुहिता। करितां एकादशी हरिजागरी। यमप्रहार ते चुके ॥ ३७ ॥ जो एकादशी व्रत धरी। तो अतिशय पढीये हरी। यालागीं देव त्याचे घरीं। निरंतरीं तिष्ठत ॥ ३८ ॥ जेथें राहिले हरि वरिष्ठ। तोचि आश्रम होय श्रेष्ठ। ब्रह्मानंदें पिकली पेठ। ग्राहिक तेथें हरिभक्त ॥ ३९ ॥ ऐसें एकादशीचें व्रत। निर्विकल्प जे आचरत। त्याचे घरीं हरि तिष्ठत। कांतेसहवर्तमान ॥ ४० ॥ तीर्थव्रताचें पारडें। तुकितां एकादशी पुढें थोडें। तेथेंहि जागरण घडे। भाग्य केवढें तयाचें ॥ ४१ ॥ द्वादशीस शीत मात्र अन्न। तें होय मेरुमंदरसमान। तेथेंहि निर्विकल्प ब्राह्मणभोजन। आत्मा गमन तेणें चुके ॥ ४२ ॥ द्वादशीच्या अन्नदानीं। देव भक्ताचा जाला ऋणी। यालागीं पैं चक्रपाणी। भक्तवाणी नुलंघी ॥ ४३ ॥ द्वादशीचें फळ संधान। अमर्याद पुण्य गहन। कोटी यागांचें श्रेय जाण। निंबलोण करिताती ॥ ४४ ॥ द्वादशीच्या ग्रासोग्रासीं। तृप्ति होय यज्ञपुरुषीं। तें फळ लाधलें अंबऋषी। गर्भवासी देव पैं आला ॥४५॥ एवं जालिया पारणें विधी। जो आरंभीं क्षीराब्धी। भक्तांमाजीं तो आधीं। वैकुंठ पीठीं राहे ॥ ४६ ॥ क्षीराब्धीचा प्रातःकाळ। मिळोनि वैष्णवांचा मेळ। नानापरी करिती गदारोळ। तो सोहळा हरिप्रिय ॥ ४७ ॥ एकादशी देवजागरा आला। क्षीरापतिलागीं टोंकों लागला। जैसा मुमुक्षु दुकाळला। तैसा वाट पहातसे ॥ ४८ ॥ ऐकोनि क्षीरापतीच्या गोष्टी। आवडी देव लाळ घोटी। हरीखा न समाय सृष्टी। उल्हास पोटीं न समाये ॥ ४९ ॥ क्षीरापति वाळुवंटीं। संत वैष्णवांची दाटी। देखोनि देवा आवडी मोठी। येत उठाउठी पैं तेथें ॥ ५० ॥ क्षीरापति सेवितां वैष्णव। मुखामाजीं मुख घरितो देव। नवल भावार्थाचा भाव। अगम्य पहाहो सुरनरां ॥५१॥ सेवितां क्षीरापतीची गोडी। येर येरापुढें घालिती उडी। हर्षें नाचतां आवडी। धरिती गोडी उल्हासें ॥ ५२ ॥ क्षीरापती घालितां वैष्णवांचे मुखीं। तेणें सुखें देव होय सुखी। धन्य भाग्याचे इहलोकीं। व्रत वोळली त्या जाली ॥ ५३ ॥ पडली वैष्णवांचे पायतळीं। जो सेवी क्षीरापतीची खाळी। सकळ पाप होय धुळी। हरिजवळी तो पावे ॥ ५४ ॥ सेवितां वैष्णवां शेष। कालिकल्मषा होये नाश। पायां लागे मोक्षसुख। स्वात्मसुख तो पावे ॥५५॥ यापरी एकादशी। भक्त उद्धरती दो पक्षी। मोक्षाचियां राशी। तिथित्रया जोडिती ॥ ५६ ॥ धरीं जरी व्रतासी दृढभाव। तरी सबाह्य प्रगटे देव। करूनि संसार वाव। निजात्म ठाव निजपदीं ॥ ५७ ॥ व्रतातपाचें कावाड। सकळ धर्मांचें पुरे कोड। धरलियां एकादशीची चाड। सकळहि फळें लाभती ॥५८॥ तो एकादशीचा व्रती। त्यासी

तीर्थे पैं सेविती । तेणें पुण्यें भगवत् प्राप्ती । क्षणमात्र न लागतां ॥ ५९ ॥ एकादशीच्या उपवासी । रुक्मांगद सूर्यवंशी । नगरी नेली वैकुंठासी । निजसुखासी पावला ॥६०॥ तैसीच जाणावी द्वादशी । प्रसन्न जाला अंबऋषी । दहा गर्भवास सोशी । उणें भक्तासी येवों नेदी ॥ ६१ ॥ ज्यासी असे मोक्षाची चाड । तींही नाना साधनें काबाड । सांडोनिया दृढ । व्रत एकादशी करावें ॥६२॥ एका जनार्दनीं सांगे । कां शिणाल योगयोगें । एकादशीच्या प्रसंगें । देवचि अंगे लाधला ॥

## रुक्मांगदाची कथा.

३३६६ ऐका पुण्यपावन व्रताचें महिमान । आचरतां जन दोष जाती ॥ १ ॥ सर्वांमाजीं सार व्रत एकादशी । रुक्मांगद सूर्यवंशी करीं नेमें ॥ २ ॥ तिथि नेमें व्रत करीत आदरें । पूजन स्मरण जागरें यथाविधी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पुण्यपावन व्रत । आदरें आचरत रुक्मांगद ॥ ४ ॥

३३६७ कांतीपुरीमाजीं राजा रुक्मांगद । एकनिष्ठ शुद्ध पुण्यगांठी ॥१॥ सहनशील दया मूर्तिमंत अंगीं । न भंगे प्रसंगी सत्त्वधीर ॥ २ ॥ न्याय नीती राज्य पाळी ब्राह्मणासी । मूर्तिमंत धर्मासी स्थापियेलें ॥३॥ दीनाचें रक्षण साधूंचें पूजन । संतांचे वचन मान्य सदां ॥ ४ ॥ एका जनार्दनीं साधियेला नेम । परि कांहीं कर्म ओढवलें ॥ ५ ॥

३३६८ पुण्यवंत जीवभूमि पुण्य देश । श्रीहरीची विशेष भक्ती जेथें ॥ १ ॥ जाणोनियां इंद्र पाठवी विमान । आणवी सुमनें कांतीयेची ॥ २ ॥ देवाच्या पूजना सुमनें न मिळतां । राय पाचारीत वनपाळा ॥३॥ सेवक म्हणती सायंकाळीं कांहीं । दिसों येत नाहीं रात्रींमाजीं ॥ ४ ॥ रात्रीं जागरणा बैसले रक्षक । लाविला व्रतारक अग्नीकाष्ठीं ॥ ५ ॥ सावधान ठायीं जागती सर्वही । विमान ते समयीं आले तेथें ॥६॥ तोडिली सुमनें गुप्तरुपें त्यांनीं । विमान तो तेथुनीं न चलेची ॥ ७ ॥ एका जनार्दनीं देवदूत कष्टी । न चले त्यांची युक्ति कांहीं केल्या ॥ ८ ॥

३३६९ उगवला दिन दूत ते धांवती । सांगती रायाप्रती धरिले चोरा ॥१॥ उगवलें कोटी भानुप्रभा तेवीं दिसे । येउनियां पुसे राजा तेथें ॥ २ ॥ इंद्रें पाठविलें न्यावया सुमनें । तुम्हीं पुण्यवंत जाण म्हणोनियां ॥ ३ ॥ धन्य ग्राम पुण्यवंत भूमी जन । आम्हालागीं विघ्न कां हें आलें ॥ ४ ॥ राहावया तुम्हां कोणते कारण । लागला धूम्र जाण व्रतारकाचा ॥५॥ एका जनार्दनीं यांसी उपाय । पतिव्रता होय एकादशी व्रतीं ॥ ६ ॥

३३७० आणविल्या सर्व गांवींच्या युवती । नुचले कल्पांती विमान तें ॥ १ ॥ आतां यासी काय करावा उपाय । येरु म्हणती पाहे ग्रामामाजीं ॥२॥ पतिव्रता हो कां भलते यातींची । शुद्ध वासनेची एकनिष्ठ ॥३॥ एका जनार्दनीं घडेल एकादशी । तिचें पुण्य हाती विमान जाये ॥ ४ ॥

३३७१ रात्रीं जागरण नामस्मरण चित्तीं । घडली जे तिथि एकादशी ॥ १ ॥ तियेचे हातीं विमानासी गती । चालावया पंथीं वेळ नाहीं ॥ २ ॥ तेव्हां पाचारिल्या अन्य याती नारी । नेणत्या कुमारी होत्या त्याही ॥३॥ तिळभरी नाहीं चालावया रीग । दवंडी पिटी वेगें शीघ्र राजा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निघालिया सर्व । तो तेथें अपूर्व नवलाव ॥ ५ ॥

३३७२ तरुणीं रजकीं नूतन यौवनी । बैसली रुसुनी एकांतासी ॥ १ ॥ धुंडूनियां मातें धाडी सासुरिया । तो म्हणे मी राया ऐसा नोहे ॥ २ ॥ येरी म्हणे मी तों कुळींची निर्दोष । शुद्ध माझा वंश रजकाचा ॥३॥ ऐकिला संवाद दौंडीकरें त्याचा । आणि विनोदाचा समाचार ॥ ४ ॥ एका जनार्दनीं धाऊनिया दूत । रायासी तो मात सांगताती ॥ ५ ॥

३३७३ पाठवुनि दूत आणविलें तिसी । विस्मयो सर्वांसी होत जाला ॥ १ ॥ साशंकीत राजा लावीं म्हणे हात । विमान क्षणांत उचलिलें ॥ २ ॥ धन्य म्हणे राजा ही माझी प्रजा । रजकाची भाजा धन्य झाली ॥ ३ ॥ सांगे सकळांसी एकादशी करा । हरिदिनीं जागरा निजूं नका ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सांडोनि अभिमान । तेव्हांची कारण साध्य होय ॥५॥

३३७४ निर्धारें नेमेंसी करी एकादशी । तृणजीवन पशूंसी घेऊं नेदी ॥ १ ॥ राष्ट्रामाजीं रुढी केली हरिभक्ती । दया सर्वां भूतीं समानची ॥ २ ॥ हरिकीर्तनाच्या भरियेल्या रासी । भेदीत आकाशीं पुण्य जाये ॥ ३ ॥ मध्यें आला कांहीं व्रता अंतराय । अपाय तो पाहे मोहनीचा ॥४॥ एका जनार्दनीं होतां स्त्रीसंग । नेमा होय भंग तात्काळीक ॥ ५ ॥

३३७५ भुलविला राजा लावण्याचा तेजें। नेम व्रतराज खोळंबिला ॥ १ ॥ राजपत्नीपुत्र नाम धर्मांगद। चालवी सुबुद्ध एकादशी ॥ २ ॥ बहूदिन होतां न कळे रायासी। मोहोनियां पाशीं बांधियेला ॥३॥ पुढें आली जाणा तेव्हां हरिदिनी। लोकांलागीं राणी सांगताहे ॥४॥ धेंडा पिटविला श्रीहरि जागरु। करा निरंतरु निजूं नका ॥५॥ एका जनार्दनीं नृपें ऐकिलें कानीं। धिग् म्हणोनि प्राणी जन्मा आलों ॥ ६ ॥

३३७६ उतरला तळीं टाकियेली शय्या। स्नान केलें तया शीतोदकें ॥ १ ॥ बैसे घालोनियां तृणाचें आसन। सारी नित्य नेम यथाविधी ॥ २ ॥ नेम भंग जाला वर्जिली मोहिनी। नायक तो ध्यानी बैसलासे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अनुतापावांचुन। न घडे नामस्मरण कालत्रयीं ॥ ४ ॥

३३७७ अनुतापें करीं नामस्मरणें वाचे। तंव मोहिनी येऊनि साचे कर धरी ॥ १ ॥ आडवी मोहिनी उगवतां दिन। सत्त्वाचें हरण करूं पाहे ॥२॥ मज दिली भाक उगवली आजी। प्रतिज्ञा हे माझी खरी जाली ॥ ३ ॥ देईं मज आज्ञा सोडी का उदक। सुकृत सम्यक व्रताचें तें ॥४॥ चिंतावला राजा मागे म्हणे पाटलासी। इच्छिलें पदार्थासी देईन मी ॥ ५ ॥ येरी म्हणे तुझा कुळींचा दीपक। तो देईं सम्यक मजलागीं ॥ ६ ॥ नाहीं चाड मज पदार्थी अनेकां। कापोनियां दे कां मस्तकासी ॥ ७ ॥ एका जनार्दनीं राजिया संकट। न सुचे आणीक कांहीं तया ॥ ८ ॥

३३७८ धांवे देवा तूं निर्वाणीं। तुजवीण नाहीं कोण्ही ॥ १ ॥ भुली पडली विषयसुखें। पात्र जालों महादुःखें ॥ २ ॥ विसरलों हित। नेणें बुडालें स्वहित ॥ ३ ॥ एका जनार्दनीं। भुललासें नाहीं कोण्ही ॥४॥

३३७९ मात कळो सरे पत्नीपुत्रा वेगें। पातलीसे दोघें रायापाशीं ॥ १ ॥ गोंवियेला राजा दिसे वेडा झाला। राणी बोले तिला माग कांहीं ॥ २ ॥ येरी म्हणे शीर तुझिया पुत्राचें। आपुलीये वाचे रायें दिलें ॥ ३ ॥एका जनार्दनीं मोहिनीचा शब्द। ऐकोनि धर्मांगद काय बोले ॥ ४ ॥

३३८० पित्याचिये काजा देह हे वेचावे। तेव्हांची बरवें दिसे लोकीं ॥ १ ॥ सरसावला पुत्र म्हणे मातेप्रती। वांचवी भूपती सत्त्वाहातीं ॥ २ ॥ तोषेल श्रीपती मज ऐसे किती। पुत्र तुम्हा होती सत्त्वधीर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सत्त्वाचा आगळा। प्रिय तो गोपाळा तोचि एक ॥ ४ ॥

३३८१ वोडवोनि मान आला रायापाशीं। निर्भय मानसीं धर्मांगद ॥ १ ॥ घेऊनियां शस्त्र स्मरला अच्युत। उभारिला हात मारावया ॥ २ ॥ अंतःकाळीं केल्या देवाचें स्मरण। तेव्हां नारायण धांव घाली ॥ ३ ॥ धरियेला हात माथां ठेवी कर। म्हणे माग वर मज कांहीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नाम आलें मुखा। पांडुरंग सखा होय त्यावा ॥ ५ ॥

३३८२ आश्वासिलें भक्ता दिलें सर्व सुख। बैसविले लोक विमानांत ॥ १ ॥ नारी नर पशू जीवजंतु भूतें। विमानीं समस्तें बैसविलीं ॥ २ ॥ पातली मोहिनी म्हणे देवराया। सांडिसी कां वायां मजलागीं ॥ ३ ॥ कोण अपराध घडलासे मज। दीनानाथ साजे नाम तुम्हा ॥ ४ ॥इंद्र आज्ञेमुळें छळियेलें राया। एका जनार्दनीं पायां लागतसे ॥ ५ ॥

३३८३ आली कृपा तिची दिधलासे वर। राहे निरंतर मृत्युलोकीं॥ १ ॥ पुढें हरिदिनीं जे कोणी करिती। द्वादशीसी घेती निद्रा कांहीं ॥ २॥ त्याचे पुण्य फळ तुजलागीं प्राप्त। हो कां जरी आप्त मज प्रिय ॥ ३ ॥ तया पुण्यें तुझा होईल उद्धार। देऊनिया वर ठेविथेली ॥४॥ एका जनार्दनीं उक्ती हे भागवतीं। तुम्हां सर्वांप्रती निवेदिली ॥ ५ ॥

३३८४ सकळ नगरीं वाहिली विमानीं। वैकुंठभुवनीं पावविली ॥ १॥ करा एकादशी जागर कीर्तन। द्वादशी भोजन द्विजपंक्ती ॥ २॥ दिवसा सावध हरीचें चिंतन। रात्रीं जागरण कीर्तनसार ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साधावें हें व्रत। तेणें मोक्ष प्राप्त अर्धक्षणीं ॥

३३८५ व्रतामाजीं व्रत एकादशी पावन। दिंडी जागरण देवा प्रीय॥ १ ॥ अष्टहि प्रहर हरिकथा करी। वाचे विठ्ठल हरि वदोनियां ॥ २ ॥ टाळ मृदंग वाजती गजरें। विठ्ठल प्रेमभरें नाचतुसे ॥ ३॥ एका जनार्दनीं व्रताचा छंद। तेणें परमानंद सुख पावे ॥ ४॥

३३८६ आषाढी पर्वकाळ एकादशी दीन। हरि जागरण देवा प्रीय ॥ १॥ निराहारें व्रत जो करी आवडीं। मोक्ष परवडी त्याचे घरीं ॥ २ ॥ व्रत आचरती हरिकथा करिती। नामघोष गाती आवडीनें ॥ ३॥ प्रदक्षिणा तीर्थ आदरें सेविती। पूर्वज ते जाती वैकुंठासी ॥४॥ पुंडलिकाचें दरुशन चंद्रभागे स्नान।

विठ्ठल दरुशनें धन्य होती ॥५॥ एका जनार्दनीं ऐसा ज्याचा नेम। तया सर्वोत्तम नुपेक्षी तो ॥६॥

३३८७ एकादशी एकादशी। जया छंद अहर्निशीं ॥१॥ व्रत करी जो नेमानें। तया वैकुंठींचें पेणें ॥२॥ नामस्मरण जाग्रण। वाचे गाय नारायण ॥३॥ तोचि भक्त सत्य साचा। एका जनार्दनीं म्हणे वाचा ॥४॥

३३८८ व्रत जे करिती तया जे निंदिती। त्यांचे पूर्वज जाती नरकामधीं ॥१॥ भाळे भोळे भक्त वेडे वाकुडे गाती। तया जे हांसती ते श्वानसम ॥२॥ स्वयंमुखें देव आवडीनें सांगे। तयाचिये मागें हिंडे देवो ॥३॥ एका जनार्दनीं भोळा देव। भक्ताचा गौरव करितुसे ॥४॥

३३८९ दशमी व्रताचा आरंभु। दिंडी कीर्तन करा समारंभु। तेणें तो स्वयंभु। संतोष पावे ॥१॥ एकादशी जाग्रण। हरिपूजन नामकीर्तन। द्वादशी क्षीरापती जाण। वैष्णव जन सेविती ॥२॥ ऐसें व्रत तीन दिन। करी जो आदरें परिपूर्ण। एका जनार्दनीं बंधन। तया नाहीं सर्वथा ॥३॥

३३९० क्षीरसागरीं नावडे सुख। क्षीरापती देख देव आला ॥१॥ कवळ कवळ पहा हो। मुख पसरुनी धांवतो देवो ॥२॥ एकादशीं देव आला। क्षीरापतीलागीं टोकत ठेला ॥३॥ द्वादशी क्षीरापती ऐकोनी गोष्टी। आवडी देव देतसे मिठी ॥४॥ क्षीरापती घालितां वैष्णवा मुखीं। तेणें मुखें देह होतसे सुखी ॥५॥ क्षीरापती सेविता आनंदु। स्वानंदें भुलला नाचे गोविंदु॥६॥ क्षीरापती सेवितां वैष्णवा लाहो। मुखामाजीं मुख घालितो देवो ॥७॥ क्षीरापती चारा जनार्दन मुखीं। एकाएकीं तेणें होतसे सुखी ॥८॥

३३९१ रुक्मांगदाकारणें एकादशीचा छंद। तेणें परमानंद प्रगटला ॥१॥ अंबऋषीकारणें द्वादशीचा छंद। तेणें परमानंद प्रगटला ॥२॥ प्रल्हादकारणें हरिनामाचा छंद। तेणें परमानंद प्रगटला ॥३॥ एका जनार्दनीं एकविध छंद। तेणें परमानंद प्रगटला ॥४॥

३३९२ मागें संतीं सांगितलें। तें हें आलें फळासी ॥१॥ जावें शरण विठोबासी। मग सुखासी काय उणें ॥२॥ करावें व्रत एकादशी। द्वादशीं क्षीरापती सेवन ॥३॥ नेमें जावें पंढरीसी। तेणें चौऱ्यांयशी चुकती ॥४॥ एका जनार्दनीं हेंचि सार। वायां भार कासया ॥५॥

३३९३ नामस्मरण हरिकीर्तन। एकादशी व्रत हरिजागरण। द्वादशीं क्षीरापती सेवन। सुकृता त्या पार नाहीं ॥१॥ घडतां तिन्ही साधन। कलिमाजीं तो पावन। त्याच्या अनुग्रहें करून। तरती जन असंख्य ॥२॥ एका जनार्दनाची भाक। पुन्हां जन्म नाहीं देख। साधन आणिक। दुजे नको करणें ॥३॥

३३९४ करा हरी भक्ति संतांचे पूजन। व्रत एकादशी रात्रौ जाग्रण। वासुदेव नामाचे मुखीं उच्चारण। तेणें न होय यमाचे बंधन ॥१॥ कृष्ण वासुदेव वदे। रामकृष्ण वासुदेव० ॥धृ.॥ नित्य वाचे नामावळी। वदे वदे सर्वकाळीं। पातकाची होळी। क्षणमात्रें होईल ॥२॥ जनासी तारक वासुदेव नाम। आणिक नको साधन वायांचि नेम। गावें तूं सुखें जनीं जनार्दन। एकभावें वंदी एका जनार्दन ॥३॥

## तुळसीमहात्म्य.

३३९५ वैकुंठाहुनी आली। धन्य तुळसी माउली ॥१॥ वंदिती जया हरिहर। सर्व करिती नमस्कार ॥२॥ देव इंद्रादिक सर्वे। तुळशीपूजनें गौरव ॥३॥ ऐसी तुळस माउली। एका जनार्दनीं वंदिली ॥४॥

३३९६ धन्य तुळशीचा महिमा। नाहीं आणिक उपमा ॥१॥ प्रातःकाळीं दरुशन। घडतां पुण्य कोटीयज्ञ ॥२॥ नाम वदतां हे तुळशी। इच्छिले पुरवी मानसीं ॥३॥ तुळशी नामाचा निजछंद। एका जनार्दनीं आनंद ॥४॥

३३९७ तुळशीचें पान। एक त्रैलोक्या समान ॥१॥ उठोनियां प्रातःकाळीं। वंदी तुळशी माउली ॥२॥ मनीचे मनोरथ। पुरती हेंचि सत्य ॥३॥ तुळशीचे चरणीं। शरण एका जनार्दनीं ॥४॥

३३९८ तुळसीकाष्ठाची माळ। गळां घालावी निर्मळ ॥१॥ होतां एकाचि स्नान। सर्व तीर्थांचें मार्जन ॥२॥ नित्य वंदितां तुळशी। काळ पळे देशोदेशीं ॥३॥ तुळशीचें पाणी। वसे त्रैलोक्य चरणीं॥४॥एका जनार्दनीं ध्याऊं। नित्य पाहूं तुळशीसी ॥

३३९९ तुळशी तुळशी ऐसें नाम। वदतां हरे क्रोधकाम ॥१॥ नाहीं आणिक साधन। एक पूजन तुळशीचें ॥२॥ न लगे तीर्थाटना जाणें। नित्य पूजणें तुळशीसी ॥३॥ योगयागन न लगे कांहीं। तुळशी-

वांचुनी देव नाहीं ॥ ४ ॥ तुळशीचे ठायीं वसे । एका जनार्दनीं देव भासे ॥ ५ ॥

३४०० देवासी प्रिय तुळसीपान । नोहे कारण यज्ञाचे ॥ १ ॥ संतुष्ट होय नारायण । तुळशीपत्र पूर्ण आर्पितां ॥ २ ॥ पूजा धूप दीप सर्व उपचार । आर्पितां तुळशीचें पत्र ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । तुळशीपाशीं नारायण ॥ ४ ॥

३४०१ जोडोनियां पाणी । वंदा तुळशी निशीदिनीं ॥ १ ॥ द्वारीं घालुनी वृंदावन । वरी तुळशी बीजारोपण ॥ २ ॥ तयां घालेता हो पाणी । पाप नुरेची मेदिनी ॥ ३ ॥ तुळशीची सेवा । एका जनार्दनीं देवा ॥

३४०२ देव तुष्टे एक पानी । सहस्त्रपाणी देतुसे ॥ १ ॥ पुरे एक तुळसीपान । नाहीं आणिक कारण ॥ २ ॥ जन्मजन्मांतरीची सेवा । फलद्रूप होय देवा ॥३॥ पूजनाचे भावें जाण । एका जनार्दनीं तुष्टे आपण॥

३४०३ कोणे एके दिनीं । तुळशी घालितां हो पाणी ॥१॥ देव मानी त्याचा भार । तोडीतसे वेरझार ॥ २ ॥ शीणभाग कांहीं । तया येऊं देत नाहीं ॥ ३ ॥ ऐसा कृपाळु जनार्दना । एका वंदितसे चरणा ॥ ४ ॥

३४०४ तुळशीं वंदितां मस्तकीं । धन्य धन्य तिही लोकीं ॥ १ ॥ तुळशी करितां नमस्कार । उतरे पार संसार ॥ २ ॥ तुळशीचें नाम घेतां । हरे भवभयाची चिंता ॥ ३ ॥ तुळशीचा करितां जप । नुरे पाप जन्मांतरीचें ॥ ४ ॥ तुळशीची करितां सेवा । होय देवा प्रीय तो ॥ ५ ॥ तुळशीचें अनुष्ठान । एका जनार्दनीं शरण ॥ ६ ॥

३४०५ कलीमाजीं सोपा । तुळशी तुळशी मंत्र जपा ॥ १ ॥ नका खटपट आणीक । तुळशी नामें उत्तम देख ॥ २ ॥ आवडी धरुनी नाम घोका । म्हणे जनार्दनीं एका ॥ ३ ॥

३४०६ पाहूं गेलों तुळशी बन । वृंदावनीं जनार्दन ॥ १ ॥ मूळ डाळ पाहतां पान । तुळशी वास जनार्दन ॥ २ ॥ तुळशीवीण कोठें जावों । तुळशीमाजीं दिसे देवो ॥३॥ एका जनार्दनीं भावो । तुळशी जाला कृष्ण रावो ॥ ४ ॥

३४०७ तुळशी पाहता आपोआप । सहज जाय पापताप ॥ १ ॥ तुळशी सेवा रे जननी । जे पढिये जनार्दनीं ॥ २ ॥ करितां प्रदक्षिणा मनें । भवरोगा उपशमन ॥ ३ ॥ मुळीं निक्षेपितां जळ । कळिकाळा सुटे पळ ॥ ४ ॥ जिवे लागता शिंतोडे । कर्माकर्म समूळ उडे ॥ ५ ॥ भावें करितां पूजन । भगवंती होय समाधान ॥ ६ ॥ मुळीं मृत्तिका कपाळीं । जन्ममरणा होय होळी ॥ ७ ॥ सेवी एका जनार्दन । तुळशी सबाह्य हरि पूर्ण ॥ ८ ॥

३४०८ धन्य भाग्याचे नारीनर । तुळशी नमस्कार करिती ते ॥ १ ॥ घेतां त्यांचें दरुशन । नोहे पतन पूर्वजां ॥२॥ नाम जपा अहर्निशीं । यम पळे भिउनी त्यासी ॥ ३ ॥ ऐसा महिमा तुळशीचा । एका जनार्दनीं साचा ॥ ४ ॥

## सत्यभामाव्रत-कृष्णदान.

३४०९ कृष्ण सर्वांगी सुंदर । लावण्य गुण रत्नाकर । सत्यभामा म्हणे हा वर । जन्मोजन्मीं पावावा ॥ १ ॥ ऐसें विचारिती मनीं । तंव पातले नारदमुनी । चरणां लागली धांवोनी । वरासनीं बैसविलें ॥ २ ॥ ऐका विनोद कथा विचित्र । नारद सत्यभामेसी सांगत । दान दिधालिया कृष्णनाथ । सोडवूं आतां ते नेणें ॥ ३ ॥ करूनी षोडशोपचारें पूजा । मग म्हणे जी योगीराजा । तुम्हांसारिखा न देखे दुजा । परियेसी माझा निर्धारु ॥ ४ ॥ मज मनीं ऐसा भावो । जन्मोजन्मीं कृष्ण नाहो । पावावया सुगमोउपावो । व्रतेंतपें कीं दानें ॥५॥ ऐकोनी हांसे नारदमुनी । म्हणे हे नाहीं मिनली कृष्ण मेळणी । म्हणोनी जन्मजन्मांतर सोसुनी । विषय बुद्धी करितसे ॥ ६ ॥ पाहूनी आधिकाराचा भेदु । तैसाची उपदेश करिती साधू । इच्छा झडे गर्व मदू । तैसा विनोद करूं आजी ॥७॥ म्हणती दिधल्या वांचून नाहीं पावणें । ऐसे बोलती पुराणें । ये विषयीं स्मृती वचनें । पूर्वदत्ते पाविजे ॥ ८ ॥ जरी हा कृष्ण दानासी देसी । तरी जन्मोजन्मीं पावसी । हे जरी मानेल मानसीं । तरी कृष्ण दानासी तूं देईं ॥ ९ ॥ सत्यभामा म्हणे कृष्णाशीं । तुम्हांसी देइन दानासी । हे जरी मानेल मानसीं । तरी आज्ञा मज द्यावी ॥१०॥ ऐकोनी हासिन्नले देवो । म्हणे नारदें विंदान मांडिले पहाहो । जाणोनी तियेचा अभिप्रावो । धन्य भावो प्रिये तुझा ॥११॥ म्हणे तुझी प्रिती मज बहु । तुज मनीं जैसा जिऊ । तुज तैसा भाऊ । भीमकी पैं नाहीं ॥ १२ ॥ दाना न करी वो उशीरु । आजिचा पर्वकाळ थोरु । शुद्ध सप्तमी रविवारु । मकरीं सूर्यो गुरुयुक्त ॥ १३ ॥ सत्य-

भामा म्हणे ब्राह्मणासी। तुम्हांसी कृष्ण देइन दानासी। ते म्हणती गिळील अनुष्ठानासी। ध्येय ध्यानासी उच्छेदू ॥१४॥ जेणें हिरोनी परात्पर नोवरी। येणें घातली निजमंदीरीं। अहं मामा जिवे मारीं। अक्रमें करीन हा कृष्ण ॥१५॥ आम्हीं भिक्षुक ब्राह्मण। कृष्णासी पाहिजे मिष्टान्न। कैंचे पितांबर परिधान। आम्हीं तयासी पुरवावे ॥१६॥ तो सदाच परदारीं। कर्में तितुके अक्रमे करी। विटाळा व्हावा यांच्या घरीं। आम्हां सोवळे स्वयंपाका ॥१७॥ सत्यभामा म्हणे नारदासी। ब्राह्मण दान न घेती कृष्णासी। काय करूं वो देव-ऋषी। तूं दानासी अंगिकारी ॥१८॥ म्हणवूनि धरिले दोनी चरण। कृष्णदानासी तूं पात्र धन्य। आजीचें मानावें वचन। व्रतजेणें परिपूर्ण होय ॥ १९ ॥ नारद म्हणे भले आतां। व्रते तपेविण कृष्ण ये हातां। कवण सरे मागुता। कर्म करंटा कार्मिष्ठु ॥२०॥ सेवक पदीं स्वामी ठावो। सेवेचा सेवक होईल देवो। न कळे दोहोंची अभिप्रावो। येरी लवलाहो दानाचा ॥२१॥ सत्यभामेनें श्रीकृष्ण। आणिला सालंकृत शृंगारून। आपुलेनी पलुवे झांकुन। नारदा करीं देतसे ॥ २२ ॥ येरी म्हणे प्रतीग्रही ताम। प्रतिग्रण्हामि नारद म्हणतां। नमामि म्हणोनि कृष्णनाथा। मग संकल्प घातला ॥२३॥ नारद म्हणे रे कृष्णा। बोध बांधुनी घेई ब्रह्मविणा। तुटो नेदी मुळीच्या खुणा। जिवींचा जिव्हाळा राखावा ॥२४॥ पैल माझ्या सिद्ध पादुका। सावधाने जवळी घे का। येरे वंदिलीया मस्तका। ब्राह्मणाच्या म्हणोनि ॥२५॥ अरे हे देव पूजा घेऊनी खांदीं। माझी बांधोनियां श्रीशुद्धी। बोधे बांधुनियां बुद्धि। अलिप्तपणीं वागवावी ॥ २६ ॥ ओवळेंपणें नातळें क्षिती। विटाळ न व्हावा महा भुतीं। पाऊला पावली आत्मास्थिती। देव निगुती आणावो ॥ २७ ॥ पुढें चालिला नारद। मागे मागे गोविंद। येरु म्हण कारे मंद मंद। गृहसंबंध न सुटे ॥ २९ ॥ नेणसी वैराग्याची ओढी। सांडी स्त्री पुत्राची गोडी। देह-गेहाची आवडी। ते खोडी मज नावडे ॥२९॥ नारद म्हणे रे कृष्णा। शौच्याविधीशी उदका आणा। मृत्तिका अवलोकुनी नयना। जिवेविण आणावी ॥ ३० ॥ येरु म्हणे न दिसे जिऊपद। अवघे भूमंडळीची शुद्ध। कोपेविण कोपला नारद। वेद विरोध बोल तसे ॥ ३१ ॥ अरे हे ब्रह्मी ब्रह्मचर्याची कसोटी। जिवा जिवनें प्रक्षाळिली गोमटी। सोवळें पादु-नियां दृष्टीं। धरी वाळे घालावी ॥ ३२ ॥ येरु म्हणे न दिसे ओवळें। अवघे त्रिभुवनींची सोवळें। विकल्प कल्पना विटाळें। शुद्धासी मळ म्हणताती ॥ ३३ ॥ कृष्णें केलें नारदाचें चरण क्षालन। ते तिर्थ मुखीं मस्तकीं वंदून। हृदयीं धरले आलिंगुन। श्री वत्सलांछनाहुनी आध ॥ ३४ ॥ कृष्णें तीर्थाचे केलें वंदन। कृष्ण तीर्थाचे जन्मस्थान। तोहि करी ब्राह्मण पूजन। धरा अमर पूजी जे ॥३५॥ कृष्ण चुरी नारदाचे चरण। म्हणे मी आजी धन्य धन्य। तुम्हांसी दिधलें दान। परम पावन मी झालों ॥३६॥ अलक्ष दोघांचे महिमान। कवण स्वामी सेवक कोण। ब्रह्मादिका न कळे जाण। विस्मित जन द्वारकेचे ॥३७॥ जन म्हणती हा नारद जाण। आम्हां देखतां वंदी श्रीकृष्ण चरण। त्यास हातां आलियां कृष्ण। येणें माणुसपणा सांडियेले ॥३८॥ निच सेवकाची गती। सेवा घेतो कृष्ण हातीं। बाइलेच्या भिडा श्रीपती। नारद हातीं सांपडला ॥३९॥ नारद कृष्णासी नेतां दुरी। सत्य-भामा रुदन करी। अंतरले श्रीहरी। जन्मांतरी कोण पावे ॥४०॥ नारदें ठकिलें ठकिलें गे फुडी। मजचि बुद्धि ठाकी कुडी। युगासमान जातसे घडी। अति चरफडी मीन जैसी ॥४१॥ सत्यभामेच्या मंदिरीं। मिळाल्या सोळा सहस्र नारी। भली प्रवर्तली सवती मत्सरी। आपण या आपण नाडियेले ॥४२॥ नाक कापुनी आपुलें। वैरियां अपशकुन केलें। तें तुवा साच दाविलें। दाना दिधले निजपती ॥४३॥ मग बोलली नागर जयंती। तुवां आस्वली आणिली आम्हां भोवतीं। अवघिया श्रेष्ठ जावुवंती। जाली सवती तुझेनी ॥ ४४ ॥ कृष्णा अंगीं लागली चोरी। सामास घातला विवरीं। आस्वला वरपडा केला श्रीवरी। पूर्व वोळखी वांचला ॥४५॥ तंव बोलली मित्रवृंदा। तुझी दुष्ट बुद्धि गे सदा। भोगणें सांडूनियां परमानंदा। आजन्मांतर पां इच्छिसी ॥४६॥ अहंभावें सोहं धरणी। तुवां भांडविला शारंगपाणी। कृष्ण पाडिला विकल्प बाणी। कुडी तूं धरणी लोळसी ॥ ४७ ॥ आम्ही सदाच समभाग। तेणें उमजला श्रीरंग। भेदूनीं अहंभावाचें अंग। वरासनीं श्रीकृष्ण ॥४८॥ तेणें परिणल्या अनंत शक्ती। सोळा सहस्र आणिल्या सवती। हें तंव तुझीच ख्याती। न लाजसी चित्तीं निर्लज्जे ॥४९॥ मग बोलिलि लक्ष्मणा। थोर भुलली गे देहाच्या बरवेपणा। केली जन्मांतर तृष्णा। ते तंव कृष्णासी नावडे ॥५०॥ आजन्म न जन्मे श्रीहरी।

कैंचा पावसी जन्मांतरी। नाडलीस दोहोपरी। येथें ना तेथेंसे जाले तुज ॥५१॥ तंव बोलिली कालिंदी। तुझी दृष्टी गे देहबुद्धी। कृष्ण परमात्मा त्रिशुद्धी। मन बुद्धि नातळे ॥५२॥ त्यासी तूं गे निजकल्पना। आणूं पाहसी जन्मबंधना। तुझी तुज गे फळली वासना। दुष्ट बुद्धी ॥५३॥ हांसोनि बोलिली जाबूवंती। जैसा घटामाजी गभस्ती। असोनी अलिप्त चित्तीं। तैसा श्रीपती विषयासी॥५४॥भोग भोगुनी अभोक्ता।कर्म करुनी अकर्ता। त्यासी कैंची जनकथा। कृष्ण सर्वथा आजन्म ॥५५॥ हा साक्षात्कार ब्रह्म जाण। चिन्मात्रैक चैतन्यघन। त्यासी तूं माणूस म्हणसी कृष्ण। कुडी कल्पना हे तुझी ॥५६॥ ज्याची जैसी गे भावना। त्यासी फळे वासना।तुझी तुज भोंवे कल्पना। निजबंधना भवमूळ ॥५७॥ मग बोले सुभद्रा। तुवां कलंक लाविला कृष्णचंद्रा। तुझी बुडाली ज्ञानमुद्रा। जन्म समुद्रा पडलीसे ॥ ५८ ॥ कृष्ण सबाह्य परिपूर्ण। चिन्मात्रैक चैतन्यघन। तयासी कैंसे जन्ममरण। जीवा जीवन श्रीकृष्ण ॥५९॥ तेथें पावली देवकी। म्हणे ज्ञानमूढे सत्रा जिताचे लेकी। म्यां नवमास वाहिला कीं तूं दानासी स्वामिनी ॥६०॥ तुझेंनी बापें घातला आळ। विवरीं सूदला माझा बाळ। ऐसा वरपडा गोपाळ। निजभाग्य वांचला ॥६१॥ तुझेंनी बापे तुज वर। केला सत्यभामा निर्धार। तूं दाढुनी निघालीस घर। मणी आंदणा म्हणवुनी ॥६२॥ त्या मणियाच्या लोभे जाणा। तुझा बाप मुकला प्राणां। तुवां मारिलें सत्यभामा। आणि पळविला अक्रूर ॥६३॥ जें आणविलें हनुमंता। तें तुज म्हणीतलें होयें सीता। नानावेश आणितां। परि सर्वथा नव्हेसी ॥६४॥ लाजा झालीस काळमुखीं। तंव पाचारिली भीमकी। वचन मात्रें झाली जानकी। रामरूपी आरुप ॥६५॥ थितें अंतरलें कृष्णसुख। सत्यभामा अधोमुख। मरमर करिती सकळहि लोक। तेणें दुःख दुणावे ॥६६॥जैसी कां चोराची माये। धाय मोकलोनी रडोन लाहे। तैशीच दशा होत आहे। आंतचे आंत चरफडीं ॥६७॥ हें ऐकोनी कोपला बळिभद्र जाणा। म्हणे वारू पालाना रे पालाना। धाव घातला निशाणा। धांवे धांवण्या बंधूच्या ॥६८॥ कृष्ण पद्मांकित वाट। लागे मागे लगबग सुभट। अश्व गजांचे पैं थाट। घडघडाट पैं रथांचे ॥६९॥ आम्ही म्हणों ब्रह्मनिष्ठ नारद। हा तंव विश्वासघातकी मैंद। आमुचा मुगुटमणी गोविंद। ठकवुनियां नेतसे ॥७०॥ कृष्ण सांगे नारदापुढें। कोपें बळिदेव पातले गाढे। ज्येष्ठपणें दडती पुढें। म्यां कवणीकडे पळावें ॥ ७१ ॥ नारद म्हणे कृष्णासी। तूं स्त्री ना पुरुष होसी। शेखीं नपूंसक नव्हेसी। भवभयासी भिसी तूं ॥७२॥ ऐसाची तूं सदा भ्याडूं। जरासंध युद्धि काढिला मोडूं। कालयवना भेणें आडूं। मुचकुंदाचे रिघालासी ॥७३॥ कृष्ण कांपतसे गदगदा। नारद हांसे खदखदा। सेवक बळेंविण गोविंदा। नामरूप तुज नाहीं ॥७४॥ अवघी आपुलीच जाणसी। आपण आपणीया कां भिसी। तूं राहे माझे पाठिसी। मी कळीकाळासी पैं जाणें ॥७५॥ नारद म्हणे यादयासी। अभिमान धराचा देवाशीं। ते आपण या दिधले दानासी। संबंध तुम्हासी पैं नाहीं ॥ ७६ ॥ देउनी मागुती घेसी दानासी। तें तंव होती खरवयासी। तेथूनी निर्गती नाहीं त्यासी। जेवीं आचळ पां धर ॥ ७७ ॥ कृष्ण मज दिधला दाना। हें काय समस्त नेणां। छळणोक्ति करितां ब्राह्मणा। कुळ क्षयो पावाल ॥ ७८ ॥ जारे पुसा सत्यभामेसी। प्रत्यक्षासी साक्ष या कृष्णासी। ठकवूनि नेइल यादवासी। तरी दंडासी पैं लाभें ॥ ७९ ॥ तेथें पातले वसुदेव उग्रसेन। समस्त यादव मिळोन। धरिले नारदाचे चरण। जीवदान द्यावे आम्हां ॥ ८० ॥ कृष्णाच्या पालटासीं। जें मागाल देवऋषी। ते देउना पदार्थासी। परि कृष्णासी सोडावे ॥ ८१ ॥ नारद म्हणे मज म्हातारपण। म्हणवून कृष्ण घेतला दान। एकलीया न करवे गमन। हा सांगाती जिवाचा ॥ ८२ ॥ एक म्हणे ती देऊ साठा। नारद म्हणे तो काय करंटा। चालो नेणे आमुचिया वाटा। फुकट पोटा कोण घाली ॥ ८३ ॥ आमुच्या चाली कृष्णासी चालणें। आमच्या कर्म कर्तव्यपणें। आमुच्या गुणें होय सगुणें। धर्म संरक्षण श्रीकृष्ण ॥ ८४ ॥ पाहतां श्रीकृष्णाचे मुख। फिके होय समाधीसुख। स्वप्नीं न देखिजे दुःख। हरिचें हरिख कोंदाटे ॥ ८५ ॥ ऐशी कृष्णाची आस केली मोठी। म्हणोनी जिवेभावें घातली मिठी। तुम्हीं आम्हां भोंवतें शेवटी। दिधलें दान मागतसां ॥८६॥ जळो जळो हें आमुचें दुःख। आशा मांडिली निःशेष। तुम्हांसी तंव द्यावे दुःख। अज्ञान मूर्ख म्हणाल ॥ ८७ ॥ कृष्णाच्या पालटासी कवण मागों पदार्थेसी। जें जें उचित मानेल तुम्हांसी। शुद्ध वस्तू मज द्यावी ॥ ८८ ॥ श्रीकृष्ण पालटा सीमंत मणी। नेघो म्हणती नारदमुनी। होईल सत्राजिताचे वाणी। देह घातनी पैं लाभे ॥ ८९ ॥ जितुके

केलें कृष्णाचें तुक। तितुकें देउनि कनक। नारद म्हणे आवश्यक। किती आग्रह करावा ॥९०॥ तुळा उभविली झडझडा। कृष्ण बैसविला पारडा। सुवर्ण घालावें जंव पुढां। तंव सत्यभामा पातली ॥९१॥ म्हणे मी कृष्ण दिधला दाना। तरी मी सोडविन जाणा। मज मर्यादा नाहीं धना। मणी आंदणा बापाचा ॥९२॥ कृष्ण सोडविन अभिमानेसी। म्हणवूनी घाली कनकराशी। कृष्ण न तुके अहंकाराशी। लगड माशी तैसें सोनें ॥९३॥ निःशेष सोनें सरलिया देखा। सत्यभामा अधोमुख। तंव उठलिया यदुनायक। सोळा सहस्र सहमेळीं ॥९४॥ कृष्ण सोडवावा आपणा। उपरा उपरी घालती सुवर्ण। धनासमान नाहीं कृष्ण। नाहीं होणें कल्पती ॥९५॥ गजामुखीं जैसी राइ। तैसें सोनें झाले पाही। गोपीका म्हणती अगे आई। आतां काइ घालावें ॥९६॥ विशेष द्रव्य वेचालिया वरी। लाजलीया सोळा सहस्र नारी। धनघंता नातुडे श्रीहरी। सखा हरी दिनांचा ॥९७॥ घातले द्वारकेचें भांडार। कुमारा कुमरीचे अलंकार। सकळ सुनांचे श्रृंगार। तुळा भार तरी नव्हेची ॥९८॥ नगर नागरिक लोक। देती आपुलाले कनक। द्वारका निर्धन केली देख। तुळा जोख तरी नव्हे ॥९९॥ मोहे पातली देवकी। माझा बाळ मीच सोडवी निकी। म्हणवुनी वरुषली कनकीं। वसुदेव अच्युत ॥१००॥ मोहें घातले कनक। मोहासमान नव्हे कृष्ण तुक। मेरूपुढें जेवीं मशक। तैसें कनक होउन ठेलें ॥१॥ रूपें तांबें पितळ। शिसें कासें वाटोळ। धातु घातलिया सकळ। तुळा आढळ ते न ढळे ॥२॥ कृष्ण स्थूळ सूक्ष्म ना आचाट। सर्व सर्वांगीं निघोट। मेरूपरीस घनदाट। धराधरु बैसलासे ॥३॥ वस्त्रें भुषणें याची फेडा। कांहीं भार होईल थोडा। एक म्हणती कृष्णचि कुडा। येणें वेडा लावियेलें ॥४॥ भोळी सत्यभामा बापुडी। नारदें बुद्धि दिधली कुडी। कृष्ण अनुमोदनी फुडी। आपणा दान देवविलें ॥५॥ एक ठक एक महाठक। ठकिले द्वारकेचे लोक। तरी न सुटे यदुनायक। तुळा तुक अपुरे ॥६॥ रत्नप्रभा प्रवाळें मुक्ताफळें। तुका घातले सुकळें। नारदें केलें वाटोळें। तरी गोपाळा न सुटे ॥७॥ नुचले कृष्णाचें पारडें। धाये मोकलुनी देवकी रडे। वैरीण सत्यभामेने केले पुडे। उपाय पुढें दिसेना ॥८॥ मागें देखिले ना ऐकिले। ते तुवीं दान इया केले। भ्रतारासी दान दिधले। ना ऐकिलें पुराणीं ॥९॥ देवकी धरी नारदाचे चरण। म्हणे मज देगा पुत्रदान। नाहीं वालभरी सुवर्ण। तुझी आण वाहतसे ॥११०॥ नारद म्हणे भिमकीपाशी। आहेत कनकाच्या राशी। वेगीं बोलावा तियेसी। ते कृष्णासी सोडविल ॥११॥ सत्यजनीं जनार्दन। सकळांसी मानिले हे वचन। भीमकींचे शुद्ध पुण्य। कृष्ण सोडवण ते करील ॥१२॥ उद्धव पाठविला भिमकीपाशीं। साष्टांग नमन केलें तियेसी। मग सांगे वृतांतासी। येरी मनासी हासिन्नली ॥१३॥ सपर्वत समुळ धरा। न पुरे कृष्णाचिया भारा। नारद लाघवी खरा। गर्वे परिहारा यादवांच्या ॥१४॥ दोघांनीही दोन्हीपण। नारद तोचि नारायण। कवण जाणे हे विंदान। विचित्र खुण दोघांची ॥१५॥ मग जाऊनी वृंदावना। केली तुळसीस प्रदक्षिणा। पक्क दळ घेतलें जाणा। अपक्क तुका पैं नये ॥१६॥ ते घालुनी कनक ताटी। वरी झांकोनी शिरोदक दुटी। निजात्म भावें गोरटी। चारित्र दृष्टी पाहूं आली ॥१७॥ केलें नारदासि नमन। घेतले चरणतीर्थ प्रार्थून। मग षोडशोपचारी पूजा करोनी। जवळी पैं आली ॥१८॥ शिव भावें भजे देवासी। गंगा तळपे सागरीं जैसी। निजभावें कृष्ण चरणासी। तुळा तुळसी ठेविले ॥१९॥ भावार्थाचे बळ गाढे। उचलले कृष्णाचे पारडें। सुवर्ण आधिक जाले पुढे। ते काढिती लवलाहे ॥१२०॥ भिमकी भावार्थाची देख। तुळसी दळ एकलें एक। देवा समान झाले तुक। पडिले ठक सुरनरा ॥२१॥ भावार्था विकला देव। अर्थासीया नाहीं संदेह। जयासी जैसा भाव। तैसा देव तयासी ॥२२॥ केवळ तुळशीच्या दळीं। सोडविला वनमाळी। धन्य धन्य भीमकबाळी। पिटली टाळी एकदाची ॥२३॥ ऐका भावार्थाचा भावो। भावे सोडविला देवो। भावार्थी संदेहो। अगम्य भावो भीमकीचा ॥२४॥ कृष्ण देव तैं हे देवता। कृष्णराम तैं हे सिता कृष्ण वसंत तैं हे सुगंधता। सर्वांगी समरस ॥२५॥ कृष्ण मंत्र हे मातृका। कृष्ण देव हे वेदिका। कृष्णयज्ञ हे यज्ञशिखा। अनन्यपणें दोघे ॥२६॥ कृष्ण पुरुष हे प्रकृती। कृष्ण चैतन्य हे चित्शक्ती। कृष्ण परमात्मा हे परमज्योती। अनन्यास्थिती दोघांची ॥२७॥ कृष्ण ज्ञेय तैं तें ज्ञान। कृष्ण ध्येय तैं तें

ध्यान । कृष्ण साध्य तें तें साधन । अनन्यपणें पति-व्रता ॥ २८ ॥ सुवर्ण अधिक जाहलें जोखणी । काढूनि टाकिलें धरणी । कर पदक कंकणीं । नाना अलंकार स्त्रियांचे ॥ २९ ॥ तेथें मीनलिया नारी । जैशा आमिषालागीं घारी । झोंबताती परस्परीं । माझें तुझें म्हणउनी ॥ १३० ॥ एकी म्हणती माझा बुडा । दुजी म्हणे ओळख फुडा । तिजी म्हणे याचा जोडा । पाहें माझा मजपाशीं ॥३१॥ एकी म्हणती गे कलगट । तुझें कांखेचें माझें ताट । तिजी म्हणे संपुष्ट । माझें आंदणें बापाचें ॥ ३२ ॥ एकी म्हणे हें माझें कारलें । दुजी म्हणे हिचें की शिजलें । तिजी म्हणे डोळा दांतवण नाहीं केलें । बुरखा स्वार्थ इचा घाण तो ॥ ३३ ॥ येरी म्हणे ग मोठी चोखाट । सलोभ दृष्टा माखले ओंठ । बोल घाणताही मठ । सांडी खटपट देईं माझें ॥ ३४ ॥ एकी म्हणती माझी जडीत आळी राखडीसी । दुजी म्हणे डोळ्यांची आंबोळी पुसीं । तिजी म्हणे नयनीं विटाळसी आलीसी । आलासी रजकी न लावीसी विटाळ ॥ ३५ ॥ येरी म्हणे कटाकटा मठ । म्हणे ये आंवट । किती करशील खटपट । माझा वाटा नीट देईं ॥ ३६ ॥ येरी म्हणे माझें पदक । दुजी म्हणे वो जी वोळख । तिजी म्हणे जीवा सुख । बोलोन कां करिसी ॥३७॥ अगे हे माझे हातसर । दुजी म्हणे परती सर । तिजी म्हणे मरमर । ते अलंकार पैं माझे ॥ ३८ ॥ एकी म्हणे तें हे माझेचि रूपें । कृष्ण धाडिले हे सोपे । दुजी म्हणे माझेनि बापें । मज आंदण दिधलें ॥ ३९ ॥ तुझे हातींची माझी झारी । तुझा गळाची माझी सरी । फुकट चावटी वेरी । तेल्या घरीं घाण्याची ॥ ४० ॥ सुनेस म्हणे देवकी । अगे अगे ओढाळाचे लेकी । ते अलंकार माझे कीं । तूं कैसेनी नेतेसी ॥ ४१ ॥ येरी म्हणे मा मीसे । तुम्हांसी लागलें धनपिसें । म्हातारपणें घेतली सोसें । माझें माझें म्हणतसा ॥ ४२ ॥ यापरी जग विगुंतलें सुवर्णा । रुक्मिणी घेउनी गेली कृष्णा । बाप धन-लाभाची तृष्णा । निजपति कृष्णा विसरल्या ॥ ४३ ॥ मोह रचिला विधातेनी । कनक आणि कामिनी । जो विन्मुख यापासुनी । तोचि जनीं जनार्दन ॥ ४४ ॥ नारदें नमस्कारिली ती भीमकी । म्हणे कृष्ण अनुभवी तूंचि एकी । भली उतरलीस तुकीं । परम सुखी मी झालों ॥ ४५ ॥ दोघां केली प्रदक्षिणा । नमस्कारुनी कृष्णचरणा । मग वाहुनी ब्रह्मवीणा । उर्ध्व पंथे चालिला ॥ ४६ ॥ ऐसी कृष्णलीला विचित्र । महा पातकीयां करी पवित्र । जे आवडी गाती कृष्णचरित्र धन्य धन्य जिवित्व तयांचें ॥ ४७ ॥ एका जनार्दनीं नमन । संकल्पेंसी केलें दान । तेणें निरसिलें मीतूं-पण । कथाकीर्तन तो सेवी ॥ ४८ ॥

## श्रीदत्तात्रयजन्म.

२४१० ऐका दत्तात्रय आख्यान । पार्वतीस सांगे त्रिलोचन । सकळ पतिव्रतामाजीं पूर्ण । अनुसुया जाण पतिव्रता ॥१॥ ऐकोनी शिवाची वाणी । गदगदा हांसे भवानी । आम्ही तिघावरती त्रिभुवनीं । श्रेष्ठ कोणी असेना ॥ २ ॥ गर्व देखोनी पार्वतीचा । बोले त्रिलोचन तेव्हां वाचा । नारद सांगेल महिमा तिचा । तेव्हां तुज कळेल ॥ ३ ॥ ऐकानी पार्वती मनांत । नारदाची मार्ग प्रतिक्षा करीत । तंव तो मुनी अकस्मात । पातला तेथें ते क्षणीं ॥ ४ ॥ देखोनियां नारदमुनी । षोडशोपचारें पूजी भवानी । आम्हा तिघीवरती त्रिभुवनीं । आणिक कोणी असेना ॥ ५ ॥ ऐकोनी हंसला नारदमुनी । ऐके पार्वती चित्त देवोनी । अनुसुया अत्रीपत्नी । तुम्हां तिघीहुनी पतिव्रता ॥ ६ ॥ तुम्हां तिघींचे पुतळे करोनी । बांधिले असे वामचरणीं । असंख्य सामर्थ्य त्रिभुवनीं । सम-तुल्य कोणी असेना ॥ ७ ॥ तों पार्वती झाली चिंता-ग्रस्त । नारदाते उपाय पुसत । तो म्हणे प्रार्थी विश्व नाथ । तो तेथवरी जाईल ॥ ८ ॥ नग्न होवोनी घाली भिक्षा भोजन । तेणें होईल तिचें छळण । त्रिदें तुमचें देइल सोडून । मग गर्व सहजची गळेल ॥९॥ पार्व-तीनें ऐसें सांगोनि । स्वयें वैकुंठासी येत तत्क्षणीं । देखोनी लक्ष्मी संतुष्ट मनीं । मग पूजी आदरें तयाते ॥१०॥ कर जोडोनी करीं विनंती । कांहीं नवल सांगा स्थिती । मागे झाली जे रिती । वदला प्रती विनोदें ॥११॥ म्हणे धन्य अनुसुया पतिव्रता । तुम्हां तिघी-हूनी समर्था । तुमचे पुतळे तत्वता । तिने तोडरीं बांधिले ॥१२॥ ऐकोनी तटस्थ झाली रमा । आतां काय करूं पुरुषोत्तमा । मजहूहि वाट ऐसी सीमा । ते कैसेनी निरसेल ॥ १३ ॥ नारद म्हणे उपाय एक । तेथें पाठवा वैकुंठनायक । नग्न भोजन मागावें देख । तेणें ते छळेल ॥ १४ ॥ सांगूनी ऐसा वृत्तांत । सत्य लोकासी गेला ब्रह्मसुत । सावित्री पुसे त्वरित । कांहीं अपूर्व वर्तलें ॥ १५ ॥ मग तो म्हणे

सावित्रीसी । अनुसुया ऐशी गुणराशी । सामर्थ्य अधिक तियेपाशीं । पदा तिघीसी बांधिले ॥ १६ ॥ सावित्री म्हणे नारदाप्रते । कैसा उपाय करावा शरण तितें । जेणें भंगेल गर्वाते । आम्हां ते येईल ॥ १७ ॥ पाहतां आम्हापासूनि उत्पत्ती । एवढी काय तिची स्थिती । टिटवी काय समुद्राप्रती । शोखूं शके ॥ १८ ॥ आम्हांहूनि काय वाड । ऐसे पीडिलें महामूढ । आतां उपाय सांगा दृढ । जेणें गर्व भंगेल तिचा ॥ १९ ॥ मग ती म्हणे नारदासी । काय करावा तिशीं । तंव तो म्हणे सावित्रीशी । ऐक तुजसी सांगेन ॥ २० ॥ प्रार्थूनिया चतुरानना । पाठवावें आत्रिभुवना । जाये तूं आतां याच क्षणां । अवश्य वचन बोलवी ॥ २१ ॥ म्हणावें दें नग्न भोजन । तेणें होईल तिचें छळण । मग यावें सत्त्व घेऊन । ब्रीद जाण तुटेल ॥ २२ ॥ नारद सांगून गेला । मग तिघी प्रार्थिती तिघांला । श्रुत करोनि नारद गेला । म्हणवूनि विनविती ॥ २३ ॥ ऐकुनी ऐसें वचनी । तिघे निघाले तत्क्षणीं । स्त्रियांची करुणा देखुनी मनीं । कृपा आली तयासी ॥ २४ ॥ मग पवनवेगें ते अवसरी । तिये प्रवेशले आश्रमाभीतरीं । वहनें ठेवूनियां दुरी । माध्यानकाळीं पैं आले ॥ २५ ॥ तंव ते म्हणती तिघेजण । आम्हांस घेणें अनुसुयादर्शन । ऋषीनें आज्ञा करून । दाराबाहेर पाठविली ॥ २६ ॥ ते देखोनि अत्रीऋषीनें । तिघांचे केलें सांग पूजनें । मग म्हणे येणें काय कारणें । आवश्यक पैं झालें ॥ २७ ॥ तंव द्वाराबाहेर तिन्ही मूर्ति । ब्रह्माशीव कमळापती । नमस्कारू झालिया पुसती । काय आज्ञा ते सांगिजे ॥ २८ ॥ ते म्हणे अनुसुयेसी । तूं पतिव्रतेमाजी श्रेष्ठ म्हणविसी । तरी मागतों तें देई आम्हासी । म्हणोनि भाकेसी गोविलें ॥ २९ ॥ मग म्हणती तयाप्रती । तुमचें देणें त्रिजगतां । आणि तुम्ही मागतां मजप्रती । इच्छा जैशी मागिजे ॥ ३० ॥ देव म्हणती होऊनि नग्न । आम्हासी घालावें भोजन । अनुसुया अवश्य म्हणोन । मग काय करिती जाहली ॥ ३१ ॥ ठेवूनियां तिघांचे मस्तकीं कर । तंव ते तिघे झाले कुमर । मग नग्न होऊनि सत्वर । करवी स्तनपान तयातें ॥ ३२ ॥ करूनि तयांची उदरतृप्ती । वसन नेसली शीघ्रगती । मग घालूनि पालखीप्रती । गाती झाली तेधवां ॥ ३३ ॥ मग म्हणे चतुरानना । जो जो जो जो रे सगुणा । उत्पन्न करूनि त्रिभुवना । बहु श्रम पावलासी ॥ ३४ ॥ याकारणें केलें बाळ । आतां राहिलें कर्तृत्व सकळ । स्तनपान करोनि निर्मळ । सुखें निद्रा करावी ॥ ३५ ॥ जो जो जो जो रे लक्ष्मीपती । तुझी तंव अगाध कीर्ती । अवतार धरूनि पंक्ती । दुष्ट संहार पैं केले ॥ ३६ ॥ ते श्रम पावलासी थोर । निद्रा करावी बा सत्वर । म्हणोनि केला कुमर । विश्रांती सुख पावावया ॥ ३७ ॥ जो जो जो जो रे बा शंकरा । महादेवा पार्वतीवरा । करोनि दुष्ट संव्हारा । बहु श्रम पावलासीं ॥ ३८ ॥ तरी आतां सुखें निद्रा करी । कुमारत्व पावले यापरी । आतां क्लेश नाहीं तरी । पालखीभीतरीं पहुडावें ॥ ३९ ॥ आसे आखेद स्तनपान । पालखींत निजवी बाळकें पूर्ण । नित्य गीत गायन । भक्ती ज्ञान वैराग्य ॥ ४० ॥ ऐसे गेले बहुत दिवस । मार्ग नाहीं जावयास । न सुटे बाळपणाचा वेष । सामर्थ्य विशेष अनुसुयेचें ॥ ४१ ॥ उमा रमा सावित्रीतें । थोर गर्व होतां तिघींतें । तो निरसावयातें । विंदान केलें नारदें ॥ ४२ ॥ मागुती सांगे तिघींप्रती । काय निश्चिंत बैसल्याती । बाळकें करूनि तिघांप्रती । अनुसुया सती खेळवितसे ॥ ४३ ॥ नित्य करवी स्तनपान । षण्मासांचीं बाळें करून । पाळण्यामाजीं निजवून । गीत गायन करीतसे ॥ ४४ ॥ पहातां ऋषीपत्नी जाण । परी सामर्थ्य आगळें तुम्हांहून । तिचें तुळणें न पुरे त्रिभुवन । आतां जाणें शरण तियेसी ॥ ४५ ॥ तंव त्या तिघीजणी बोलती । आम्ही तरी आदिशक्ती । आमुचें सामर्थ्य त्रिजगतीं । प्राणी वर्तती एकसरें ॥ ४६ ॥ सुरनर गंधर्व किन्नर । पशुपक्षी अपार । आमुच्या सामर्थ्या थोर । चराचर नांदत ॥ ४७ ॥ तरी आमुचे आम्हीच पती । सोडवूं आपुले सामर्थ्यीं । अनुसुया ते बापुडी किती । काय तिची कीर्ति आपुल्यापुढें ॥ ४८ ॥ ऐसें बोलोनि अभिमानी । तिघी निघाल्या ते क्षणीं । लगबग आल्या धांवुनी । अनुसुया भुवनीं तात्काळ ॥ ४९ ॥ ते देखोनियां ऋषीश्वरें । तिघीं पूजिल्या षोडशोपचारें । काय आज्ञा पुसे त्वरें । ते प्रत्योत्तरें सांगीजे ॥ ५० ॥ त्या तिघीजणी बोलती । पाठवावें अनुसुयाप्रती । येरें आज्ञा करुनी शीघ्रगती । स्त्रीयांप्रती आणाविलें ॥ ५१ ॥ तंव ते पातलीरे त्वरें । केला तिघींसी नमस्कार । आज्ञा पुसेती सत्वर । भाग्य थोर आलेती ॥ ५२ ॥ तिघी म्हणती आमुचे पती । आणून देई शीघ्रगती । तंव त्या बाळकांच्या मूर्ती । पुढें क्षीतीं ठेविल्या ॥ ५३ ॥ तंव ते सारले

बाळ तिन्ही । बोलूं नेणती वचनीं । तिघी चाकित झाल्या मनीं । परी कोण्हा लक्षवेना ॥ ५४ ॥ सर्वहि सामर्थ्य वेंचलें । अभिमान धैर्य गळालें । मग लोटांगण घातलें । चरण वंदिलें सतीचे ॥ ५५ ॥ अनुसुया थोर तूं पतिव्रता । धन्य धन्य तुझी सामर्थ्यता । आम्ही लीन जाहलों पाहतां । नको निष्ठुरता करूं माये ॥ ५६ ॥ जैसे होते आमुचे पती । तैसे करावे पुढती । अगाध धन्य तुझी कीर्ती । पूर्ण सती पतीव्रता ॥ ५७ ॥ ऐकोनि सतीत्रयींचें वचन । तिघांचे मस्तकीं स्पर्श करून । कृपायुक्त अवलोकून । पूर्व चर्या ते आणिले ॥ ५८ ॥ तिघांचें स्वरूप जैसें होतीं । तैसा केल्या तिन्ही मूर्ती । देव अंतरिक्ष कवतुक पहाती । वृष्टी करिती पुष्पांची ॥ ५९ ॥ दुंदुभी वाजविल्या भेरी । आनंद झाला सर्वांतरीं । बोलिले सत्वरीं । अनुसुया तूं पतिव्रता ॥ ६० ॥ त्रये देव म्हणती धन्य माते । अगाध सामर्थ्य तुझें सत्य । प्रसन्न झालों मागा वरातें । मनोरथ पूर्ण करूं हो ॥ ६१ ॥ मग ते बोले करुणावचन । अपूर्व तुमचें दरुशन । मज न गमे तुम्हांवीण । अर्धक्षण जाणिजे ॥ ६२ ॥ तरी तिघे रूप असावें । एवढें वरदान मज द्यावें । आणिक न लगे स्वभावें । म्हणोनि भावें प्रार्थितसे ॥ ६३ ॥ मग देवत्रयाची मूर्ती । करकमळीं जाली शीघ्रगती । दत्तात्रय नामें ऐसी ख्याती । तिहीं लोकांप्रती विशेष ॥ ६४ ॥ वर देऊनि गेला स्वस्थाना । शक्तीसहित आरूढले वहना । सर्व देव समुदाव जाणा । स्वर्गभुवना पातले ॥ ६५ ॥ येरीकडे दत्तात्रय मूर्ती । बालरूपें अनुसुयेप्रती । पुढें व्रतबंध झाले निश्चिती । अभ्यासिल्या सकळ कळा ॥ ६६ ॥ एका जनार्दन म्हणे । दत्तात्रय जन्मकथन । भावें करितां श्रवण । मनोरथ पूर्ण श्रोतियांचे ॥ ६७ ॥

## हनुमानजन्म.

३४११ सुवर्च्चानामें स्वर्गींची देवांगना । ब्रह्मशापें जाणा घारी जाली ॥ १ ॥ अयोध्येचा राजा दशरथ नृपती । यज्ञ पुत्राप्रती करविला ॥ २ ॥ शृंगी पायस पात्र दिधलें वशिष्ठा हातीं । त्वरें करिजेसी तीन भाग ॥ ३ ॥ तीन भाग वसिष्ठ करुनी निश्चितीं । दिधलें राणी हातीं तिघी तीस ॥ ४ ॥ कैकई रुसली तेथें विघ्न जालें । घारीनें ते नेले निजभागा ॥ ५ ॥ एका जनार्दनीं घारीं पिंड नेतां । पुढें जाली कथा श्रवण करा ॥ ६ ॥

३४१२ ऋष्यमुक पर्वतीं अंजनी तप करी । आठविला अंतरीं सदाशिव ॥ १ ॥ तपाचिया अंतीं शिवजाला प्रसन्न । मागे वरदान काय इच्छा ॥ २ ॥ येरी म्हणे तुज ऐसा व्हावा मज पुत्र । ज्ञानी भक्त पवित्र उत्तम गुणी ॥ ३ ॥ म्हणतसे शिव अंजुळी पसरुनी । बैस माझें ध्यानीं सावधान ॥ ४ ॥ वायु देव येउनी प्रसाद देईल तुजला । भक्षीं का वहिला अवलंबें ॥ ५ ॥ एका जनार्दनीं घारीं नेतां पिंड । वायुनें प्रचंड आसुडिला ॥ ६ ॥

३४१३ घारी मुखींचा पिंड अंजनीच्या करीं । पडतां निर्धारी भाक्षियला ॥ १ ॥ नवमास होता जाली ती प्रसूत । दिव्य वायु सुत प्रगटला ॥ २ ॥ वानराचा वेष सुवर्ण कौपीन । दिसती शोभायमान कुंडलें तीं ॥ ३ ॥ जन्मतांची जेणें सूर्यातें धरियलें । इंद्रादिकां दिले थोर मार ॥ ४ ॥ अमरपति मारी वज्र हनुवटी । पाडिला कपाटी मेरूचिया ॥ ५ ॥ वायुदेव येवोनी बाळ तो उचलिला । अवघाचि रोधिला प्राण तेथें ॥ ६ ॥ सकळ देव मिळोनि प्रसन्न पैं होती । वरदान देती मारुतीसी ॥ ७ ॥ सर्व देव मिळोनि अंजनीशी बाळ । देता प्रातःकाल होता तेव्हां ॥ ८ ॥ तिथि पौर्णिमा चैत्रमास जाण । एका जनार्दनीं रूपासी आला ॥ ९ ॥

## प्रल्हादचरित्र.

३४१४ हिरण्यकश्यपाचे पोटीं । भक्त जगजेठी प्रल्हाद ॥ १ ॥ सदा वाचे नारायण । छंद आन नाहीं दुजा ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाहुनी पिता । क्रोधें तत्वतां बोलत ॥ ३ ॥

३४१५ घायां जन्मलें हें पोर । सदा हरि उच्चार करितसे ॥ १ ॥ न कळे आपुली पैं याती । येणें धरिली हरिभक्ती ॥ २ ॥ एका जनार्दनीं निर्धार । याचा आमुचा वैराकार ॥ ३ ॥

३४१६ करीं विचार मानसीं । काय उपदेश पुत्रासी ॥ १ ॥ नावडेचि राज्य धन । सदा पुत्रीं गुंतलें मन ॥ २ ॥ काय जन्मला पामर । एका जनार्दनीं भूमीभार ॥ ३ ॥

३४१७ बोलावुनी एकांतासी । सांगे विद्याभ्यासासी ॥ १ ॥ सकळ विद्यांचें जीवन । मनीं धरीं नारायण ॥ २ ॥ एका जनार्दनीं जाण । सदा घोकी नारायण ॥ ३ ॥

३४१८ नारायणीं बैसला भाव । दुजा ठाव शून्य दिसे ॥ १ ॥ काया वाचा आणि मन । गुंतला प्राण

नारायण ॥ २ ॥ एका जनार्दनीं हेत । बैसला चित्तांत सर्वदा ॥ ३ ॥

३४१९ पिता क्रोधें पुसे बाळा । काय शिकला तें सांगें ॥ १ ॥ येरू म्हणे नारायण । कांहीं यावांचून मी नेणें ॥२॥ एका जनार्दनीं ऐकतां मात । जाहला संतप्त मानसीं ॥ ३ ॥

३४२० ऐसा पुत्र असोनि काय । जो नारायणासी ध्याय ॥ १ ॥ मुख्य आमुचा जो वैरी । त्यासी चिंती हा निर्धारीं । बाळ नोहे केवळ काळ । एका जनार्दनीं लडिवाळ ॥ ३ ॥

३४२१ सांगे स्त्रियेसी एकांतीं । पुत्रें मांडिली भगवद्भक्ती ॥१॥ यासी आतां करावें काय। शिकविलें ऐकों न जाय ॥ २ ॥ एका जनार्दनीं मन । येणें धरिला नारायण ॥ ३ ॥

३४२२ माता म्हणे प्रल्हादासी । वडिलें शिकविलें नायकशी ॥ १ ॥ कांहीं नायकशी शिकाविलें । विद्याभ्यास वहिलें ॥ २ ॥ एका जनार्दनीं ऐकुनी मात। प्रत्युत्तर तया देत ॥ ३ ॥

३४२३ सर्व विद्यांचा जो धनी। मोक्षदानीं चिंतितों ॥ १ ॥ मज आणिकांचें नाहीं काम । माझा सखा पुरुषोत्तम ॥ २ ॥ मायबाप सर्व गोत । एका जनार्दनीं भगवंत ॥ ३ ॥

३४२४ ऐकोनियां पुत्राचें वचन । मातेनें वर्तमान कथियेलें ॥ १ ॥ तेणें तया क्रोध भरलासे मनीं । दूतालागुनी तत्क्षणीं आज्ञा केली ॥ २ ॥ एका जनार्दनीं करिती यातना । परी नारायणा आठवीत ॥ ३ ॥

३४२५ नानापरी दूत मारिती निष्ठुर । शस्त्रांचे दुस्तर घाय हाणिती ॥ १ ॥ अग्नींत घालिती पाणीये बुडविती । ढकलोनियां देती पर्वत शिखरीं ॥२॥ एका जनार्दनीं रक्षी नारायण । कोण करी विघ्न तया भक्ता ॥ ३ ॥

३४२६ विषादि पाजिती पुरीं ढकलिती । परी निर्भय तो चित्तीं घेत नाम ॥ १ ॥ संतप्त होउनी पुसताती बाळा । काय वेळोवेळां आठविसी ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम जपे होटीं । मानीच चावटी बोल त्याचे ॥३॥

३४२७ क्रोधेंयुक्त पिता पुसे प्रल्हादासी । सांग हृषिकेशी कोठें आहे ॥ १ ॥ येरु म्हणे जळीं स्थळीं काष्ठीं भरला । व्यापुनी राहिला दिशाद्रुम ॥ २ ॥ एका जनार्दनीं ऐकतांचि मात । मारितसे लाथ स्तंभावरी ॥३॥

३४२८ दुर्जन तो लाथ मारी खांबावरी । स्तंभीं नरहरी प्रगटला ॥ १ ॥ धांवूनिया हरि आडवा तो घेतिला । हृदयीं विदारिला हस्तनखीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्ताचें रक्षण । स्वयें नारायण करितसे ॥३॥

३४२९ अवतार नरहरी । केली दैत्याची बोहरी ॥१॥ प्रल्हादासी आलिंगन । स्वयें देत नारायण ॥२॥ भक्तवचनाचे मान । एका जनार्दनीं सत्य जाण ॥ ३ ॥

३४३० स्तंभ फोडीत कटकट । दाढा व्यंकट विकट । उद्भट वीर विकट । नरकेसरी ॥ १ ॥ जिव्हा लळलळित लटलट । घुरघुरीत कंठ । श्वासें नासापुट उतट । पिंगट जटाजूट दाट ॥ २ ॥ बाण सणसणाट । वज्र दणदणाट । नखें तिखें तिकट बोट । रागें फोडी पोट ॥३॥ हात तट सुभट भट । नेत्र गरगराट । चंद्र सूर्य गरगराट रे ॥ ४ ॥ शब्द कट कट । साधनीं कष्ट फुकट । एका जनार्दनीं नामें वैकुंठपीठ रे ॥ ५ ॥

## ध्रुवचरित्र.

३४३१ सूर्यवंशामाजीं उत्तानपाद राय । सत्यधर्मी होय पराक्रमी ॥ १ ॥ भूतांचा मत्सर नाहीं तेथें द्वेष । चारी धर्म निर्दोष चालताती ॥ २ ॥ प्रजेचें समाधान अपत्याचे परी । ऐसा राज्य करी न्याय नीती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं होउनी सावधान । ऐका वर्तमान काय पुढें ॥ ४ ॥

३४३२ वडील धाकुली ऐशा दोन जाया । संतान तें तयां नसे कांहीं ॥ १ ॥ वडील पट्टराणी ममता तिजवरी । धाकुलीसी अव्हेरी क्षणक्षणां ॥ २ ॥ ऐसा कांहीं काळ लोटलियावरी । धाकुलीसी निर्धारी पुत्र जाहला ॥ ३ ॥ तयाचें तें नाम ध्रुव पैं ठेविलें । एका जनार्दनीं जाहलें नवल तेथें ॥ ४ ॥

३४३३ पंच वर्षांचा बाळ खेळे नाना खेळ । मेळवोनि मेळ सवंगडियांचा ॥ १ ॥ सवंगड्यांत खेळे विटीदांडू चेंडू । नामाचा छंदु मुखीं सदा ॥ २ ॥ खेळतां खेळतां राजवाड्या आला । न कळे तयाला राजा कवण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहूनियां बाळ । मोहें त्या तात्काळ उचलिलें ॥ ४ ॥

३४३४ अंकावरी घेउनी खेळवी नानापरी । मोहाची तो थोरी ऐशी आहे ॥ १ ॥ वडील ती स्त्री येऊनियां पाहे । राजअंकीं आहे कोण बाळ ॥२॥ सापत्न तो भाव

धरूनियां पोटीं । पदें तयां लोटी अंकावरुनी ॥ ३ ॥ रडत रडत तेथोनि निघाला । एका जनार्दनीं आला माता जेथें ॥ ४ ॥

३४३५ सांगे मातेप्रती सापत्नें लोटिलें । म्हणोनि वाटलें दुःख मज ॥ १ ॥ येरी म्हणे बाळा नको करूं खेद । दैव नाहीं शुद्ध आपुलें तें ॥ २ ॥ आपुलिया दैवीं देवें जें लिहिलें । भोगणें प्राप्त जाहलें आपणासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देवावीण शीण । निवारील कोण दुजा बापा ॥ ४ ॥

३४३६ माता समाधान करी त्या बाळाचें । परी चित्त त्याचें गुंतलें देवीं ॥ १ ॥ मातेलागीं पुसे देव कोठें आहे । येरी म्हणे सबाह्य कोंदलासे ॥२॥ एका जनार्दनीं ऐकोनियां मात । केला प्रणिपात मातेलागीं ॥ ३ ॥

३४३७ सबाह्य अभ्यंतरीं देव आहे हा निर्धार । करूनी सत्वर मार्ग धरी ॥ १ ॥ नुठवी सापत्नमाता ऐसा धरूनी हेत । चालिला त्वरीत वनालागीं ॥२॥ एका जनार्दनीं माता मागे लागे । पुढें लागवेगें पळतसे ॥ ३ ॥

३४३८ जाउनी निरंजनीं तप आरंभिलें। धांवे देवा वहिलें बोभातसे ॥१ ॥ प्रारब्धाचा ठेवा वैष्णवाचा रावो । नारद तो हा हो आला तेथें ॥ २ ॥ पाहिलासे बाळ सुकुमार सांवळा । दृष्टी कळवळा आला मनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहूनीं निर्धारीं । मंत्र द्वादशाक्षरीं सांगतसे ॥ ४ ॥

३४३९ ठेवूनियां हात गेला नारदमुनी । मंत्र हृदयभुवनीं प्रकाशला ॥ १ ॥ उच्चार करितां त्रिभुवन ठेंगणें । विसरला मनें सापत्न दुःख ॥ २ ॥ आठवे गोविंद माधव अच्युत। वाचेशीं जपत रामनाम ॥३॥ एका जनार्दनीं दासाची कळवळ । धांवला तात्काळ देवराव ॥ ४ ॥

३४४० वैकुंठीचा राणा येउनी लवलाहे । सुकुमारा पाहे अवलोकुनी ॥ १ ॥ धांवूनियां देव गळां घाली मिठी । आलिंगीला पोटीं सद्गदीत ॥२॥ म्हणे बाळा काय इच्छा पोटीं आहे । माग लवलाहे पुरवीन ॥३॥ एका जनार्दनीं नुठवी दुजी आई । ऐसें कांहीं देई मजलागीं ॥ ४ ॥

३४४१ ऐकोनियां ऐसें कोमल उत्तर। भक्त करुणाकर कायकरी ॥ १ ॥ अढळ ते पदीं स्थापियेला बाळ । जाहला जयजयकार तये वेळीं ॥ २ ॥ नुठवें दुजी आई ऐसा स्थापियेला । आपण निघाला वैकुंठाली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्ताचें चरित्र । स्वयें राजीवनेत्र वदतसे ॥ ४ ॥

३४४२ अनाथांचा नाथ पतीतपावन । ब्रीद सत्य जाण करितसे ॥१॥ अनंत भक्तांचें अनंते धांवणें । वाढविलें तेणें नामासाठीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्तांचा अंकीत। हांकेसरिसा त्वरित उडी घाली ॥३॥

३४४३ न पाहे यातीकुळाचा प्रचार। धांवे सर्वेश्वर नामासाठीं ॥ १ ॥ आपुलेंचि नाम आपण वाढवी । भक्तपणा मिरवी आपणची ॥ २ ॥ स्वयें अवतार आपणचि घेत। एका जनार्दनीं मात ऐका त्याची॥३॥

## उपमन्युकथा.

३४४४ होऊनि सावधान चित्ता । ऐका उपमन्यूची कथा । एका भावें ऐकतां । सायुज्यता पाविजे ॥१॥ उपमन्यु मागितलें । देवें तयासी दीधलें । तें सांगेन वहिलें। चित्त देऊनी परियेसा ॥ २ ॥ ब्राह्मणासी पुत्र झाला । पित्यासी हर्ष वाटला । थोर कष्टें वाढविला । स्नेहो आशा धरुनी ॥ ३ ॥ बाळक तो जाणता । पित्यासी उपजली चिंता । एका जनार्दनीं तत्त्वतां । वचनार्थ परिसावा ॥ ४ ॥

३४४५ मातेसी म्हणे बाळ। दूध पिती मुलें सकळ। मजहि दूध तत्काळ। माते देई भोजना ॥ १ ॥ मग ते करड्या वांटुनी । जननी काढी शुभ्र पाणी । बा रे दूध म्हणोनी । वाटीये भात कालविला ॥ २ ॥ तंव शेजारीं ब्राह्मणें श्राद्ध केलें । तयाचिया घरां जेवावया नेलें । बरवें उत्तम पक्वान्न वाढिलें । नानापरी भोजन ॥ ३ ॥ बाळासी वाढिली दूध क्षीरी । तें जेविलें पोटभरी । एका जनार्दनीं निर्धारी । गेलें आपुल्या गृहासी ॥ ४ ॥

३४४६ गेला आपुल्या गृहाप्रती । बाळ तो निद्रा न करी रात्रीं । क्षुधा लागलीसे बहुती । मागे दूधभात जेवाया ॥ १ ॥ पुढें ती करड्या वांटुनी । काढिलें शुभ्रपाणी । येरें टाकिलें थुंकोनी । म्हणे माते कालीचें नव्हे ॥ २ ॥ बा रे त्या समर्थाचे घरीं । देवें दिधली दूध क्षीरी । आम्हां दुष्कृताचे घरीं । तें कैंचेरे बाळका ॥३॥ कोठें आहे तो श्रीहरी । दाखवी मज निर्धारीं । एका जनार्दनीं परी । ध्यान लागलें हरीचें ॥ ४ ॥

३४४७ बरवी श्रीहरीची मूर्ती । देव्हारा पूजिली होती । बा रे हा लक्ष्मीचा पती । दूध मागे तयासी ॥ १ ॥ ऐशी तिघे उपवास करिती । मातापितरें चिंतेत पडती । जन मिळाले बहुती । तयासी उठवूं आदरिलें ॥ २ ॥ बाळा रे तुजकारण । बांधू सहस्र गोधन । येरू म्हणे नायके वचन । मज देईल श्रीहरी ॥ ३ ॥ माता म्हणतां हें वचन । दूध आणिलें ब्राह्मणाचे घरींहून । एका जनार्दनीं वचन । असंतोषित बाळ तें ॥ ४ ॥

३४४८ दूध आणिलें परगृहींहुनी । संतोष नाहीं माझे मनीं । श्रीहरि देईल मजलागुनी । तरीच दूध घेईन ॥१॥ पिता म्हणतां हें वचन । बाळा तूं अज्ञान । कां वर्जिलें अन्नपान । क्षुधा बहुत पीडितसे ॥ २ ॥ तंव बोले उपमन्यु । भोजन न करी दुधावांचुन । श्रीहरी देईल मजलागुन । तरीच भोजन करीन ॥ ३ ॥ देवा त्वां ध्रुवा अढळपद दिलें । मजलागीं निष्ठुर मन केलें । एका जनार्दनीं बोले । बाळ घाचे सद्गद ॥ ४ ॥

३४४९ ऐकोनि दुधाची बोली । कां मनीं निष्ठुरता केली । श्रीयाळ सत्त्वें राखिली । नगरी नेली वैकुंठा ॥ १ ॥ अंबऋषीच्या बोला । दाहीहि अवतार नटला । माझें देखोनि उणिवाला । दूध कां हो न देसी ॥ २ ॥ शरीर करवतीं भेदीन । अष्टांगयोग साधीन । भाकिबळें तुज काढीन । हुडकोनि तत्त्वतां ॥ ३ ॥ ऐकोनि तो शब्द करुणा । एका जनार्दनीं धांवें जाणा । माझिया भक्ताचिया वचना । उणीवता येऊं नेदी ॥४॥

३४५० सुदर्शन घेऊनी हातीं । पावला तो लक्ष्मीपती । देखतांची श्रीपती । तन्मय बाळ जाला ॥ १ ॥ बाळकें धरिलें चरण । देवें दिधलें आलिंगन । करें कुर्वाळुनी वदन । चुंबनातें दिधलें ॥ २ ॥ देव म्हणे बाळकातें । काय अपेक्षा माग मातें । बाळ बोले दूधभातें । मातें देई सत्वर ॥ ३ ॥ हांसे वैकुंठीचा राणा । बाळक हें अज्ञान । एका जनार्दनीं शरण । काय मागणें मागत ॥ ४ ॥

३४५१ ऐके देवा सावधान । एवढें पुरवावें जाण । दुधावांचुनी दुसरें आन । न मागें मी सर्वथा ॥ १ ॥ मातापिता उपमन्यु । तिघे गरुडावर बैसून । क्षीरसागरीं नेऊन । इच्छा त्यांची पुरविली ॥ २ ॥ राज्य दिधलें क्षीरसागरीचें । अमर शरीर केलें त्यांचें । नित्य दर्शन श्रीहरीचें । सायुज्यता दिधली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । उपमन्यु आख्यान पावन । श्रीव्यासें कथिले जाण । तेंचि येथें वर्णिलें ॥ ४ ॥

## सुदामचरित्र.

३४५२ सुदामा सवंगडी । त्याची बहु गोडी हरीसी ॥ १ ॥ बाळपणीं खेळले खेळ । विद्या सकळ गुरुगृहीं ॥२॥ कृष्ण द्वारकेसी आला । सुदामा राहिला सुदामपुरीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं साचे । परिसा चरित्र भक्ताचें ॥ ४ ॥

३४५३ पृथ्वीवरुता दुष्काळ पडला । न मिळे कोणाला धान्यकण ॥ १ ॥ समर्थे तीं सत्व टाकिती बापुडीं । दुबळ्या तांतडी कोण पुसे ॥ २ ॥ एका जनार्दनीं काळाचें तें मान । सुदामा ब्राह्मण दैन्यवाणा ॥

३४५४ कन्यापुत्रादिक मरती उपवासी । उपाव तयासी कांहीं न चले ॥ १ ॥ आणूनियां तृण बीज तें भक्षिती । निर्वाह या रीतीं चालविती ॥ २ ॥ वस्तीसी त्या ठाव न देती कोण्ही । दुर्बळ म्हणोनि उपहासिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसें भोगी दुःख । तयासी तें सुख स्वप्नीं नाहीं ॥ ४ ॥

३४५५ एकाचें अंगणीं राहिला परिवारें । उदर तो न भरे दुःख करी ॥ १ ॥ कांता पुत्र स्वयें क्षुधेनें मरती । होतसे फजिती प्रपंचाची ॥ २ ॥ बैसोनियां कांता विचार तो सांगे । द्वारके लागवेगें जावें तुम्ही ॥ ३ ॥ कृष्णजी कृपाळु बंधु तुम्हां मानी । एका जनार्दनीं कांता बोले ॥ ४ ॥

३४५६ तयाचिये भेटी जावें उठाउठी । कृपाळू जगजेठी उदार तो ॥१॥ पूर्वी उपमन्युसी क्षीरसागर दिधला । अढळपदीं ठेविला बाळ ध्रुरू ॥ २ ॥ राक्षसाचे कुळीं बिभीषण जाण । लंकेसी स्थापन चंद्रार्क तो ॥३॥ एका जनार्दनीं उदार सर्वज्ञ । एक नारायण समर्थ तो ॥ ४ ॥

३४५७ ऐकोनियां कांतेचें वचन । चित्त समाधान सुदाम्याचें ॥१॥ म्हणतसे भेटी रिक्तहस्तें नवजावें । हा शास्त्राचा प्रवाहो भाष्य असे ॥ २ ॥ देव द्विज गुरु या तिघांचें दरुशन । रिक्तपणें जाण न घ्यावें जी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करूनि विचार । भेटीचा निर्धार बाणलासे ॥ ४ ॥

३४५८ पतिव्रता सती उठोनि सकाळीं । शेजारिणी सदनीं येती जाहली ॥१॥ अहो माते पती जाती कृष्ण दरुशना । कांहीं तरी धान्या देई मज ॥२॥ ऐकोनियां ऐसें पतिव्रते वचन । जाहलें समाधान चित्त तेणें ॥३॥ एका जनार्दनीं हरिकृपा पूर्ण । पोहे दिले जाण तीन मुष्टी ॥ ४ ॥

३४५९ घेऊनि लवलाही गृहासी ती आली । मनीं संतोषली आनंदभरीत ॥ १ ॥ पतीसी तत्वतां दिले ते पृथक । बांधावया वस्त्र धड नाहीं ॥ २ ॥ शत एक ग्रंथी वस्त्रासीं बांधोनी । निघाला तेथोनि झड झडा ॥ ३ ॥ पतिव्रता बोले लघकरी यावें । एका जनार्दनीं बरवें म्हणोनि निघे ॥ ४ ॥

३४६० निघतां उत्तम शकून ते जाहले । तेणें संतोषले चित्त त्याचें ॥ १ ॥ तांतडीनें द्वारके येऊनि पावला । सभामंडप देखिला दृष्टीं भरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं द्वारपाल पुसती । तुम्हीं कोण तें निश्चिती सांगा द्विजा ॥ ३ ॥

३४६१ करुणावचनीं बोलतसे स्ववाणी । कृष्णाचा बंधु जनीं म्हणताती ॥ १ ॥ ऐकोनियां दूत हांसती मानसीं । जगद्बंधू सर्वांसी होय दुरी ॥ २ ॥ एका जनार्दनीं वंदुनी सांगती । द्विज एक अवचिती बंधू म्हणे ॥ ३ ॥

३४६२ सर्वांचा तो आत्मा कळली तया खूण । बाळपणींचा जाण सुदामा तो ॥ १ ॥ उठोनी सत्वर धांवे आलिंगना । वैकुंठीचा राणा लवलाहे ॥ २ ॥ एका जनार्दनीं देउनी आलिंगन । आणिला संबोखून सुदामा तो ॥ ३ ॥

३४६३ आणूनियां सिंहासनीं बैसाविला । पूजा उपचार षोडशोपचार केला ॥ १ ॥ वस्त्र अलंकार देउनी गौरविला । मग पुसता जाहला क्षेम सर्व ॥२॥ अष्ट नायकादी मिळालीसे मांदी । नमिती आनंदी सुदाम्यासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सारुनी भोजन । सुखरूप शयन करविलें ॥ ४ ॥

३४६४ प्रातःकाळ जाहला मिळाल्या नायका । उष्णोदकें देखा अभ्यंगिती ॥ १ ॥ सोळा सहस्र शत अष्ट त्या नायका । विनोद तो देखा मेहुणपणें ॥ २ ॥ घालूनियां स्नान वस्त्र अलंकार देती । भोजन सारिती यादवपंक्ती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बैसलें निवांत । मग कृष्णनाथ काय बोले ॥ ४ ॥

३४६५ वहिनीनें आम्हां काय धाडियेलें । मग आठवले सुदाम्यासी ॥ १ ॥ म्हणे माझें वस्त्र ग्रंथी कोठें आहे । तंव ती आणुनी देतसे जगन्माता ॥ २ ॥ बंधूची संपदा पहा कृष्णनाथा । सत्यभामा तत्त्वता बोलतसे ॥ ३ ॥ सोडोनियां ग्रंथी समग्र ते केले । पुढें वोढविले कर देवें ॥४॥ एक ग्रास मुखीं घालितांचि जाण । एका जनार्दनीं खूण समजली ॥ ५ ॥

३४६६ मनामधीं तर्क करी भीमकबाळी । त्रैलोक्याची सकळीं देईल राज्य ॥ १ ॥ म्हणोनी विनोदें धरितसे हात । एक ग्रास मुखांत घालितांची ॥ २ ॥ आम्हांसी तो कांहीं प्रसाद तो जी द्यावा । खूण ती केशवा कळली मनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हांसे चक्रपाणी । न कळे कोणा करणी त्याची कांहीं ॥४॥

३४६७ अंतरीं विचार करितो श्रीहरी । सुदाम्याचे घरीं फार कष्ट ॥ १ ॥ विश्वकर्म्यालागीं पाचारिलें तेव्हां । सांगतसे निर्मावा ग्राम ऐसा ॥ २ ॥ जैशी हे द्वारावती दिसती साजिरी । ऐशी सुदामपुरी रचीं वेगीं ॥३ ॥ एका जनार्दनीं तुष्टलासे देव । मग कैंचें भेव दैन्याचें तें ॥ ४ ॥

३४६८ सर्व सामोग्री ते भरुनी ठेविली । द्वारकेसम निर्मिली सुदामपुरी ॥ १ ॥ विश्वकर्मा येउनी वंदोनियां पाय । निर्मिला तो आहे ग्राम तेथें ॥ २ ॥ एका जनार्दनीं ऐसें करुनी कृत्य । मग जगन्नाथ काय बोले ॥ ३ ॥

३४६९ काय चरितार्थ प्रपंचाचा आहे । सुदामा तो लाहे नेत्रीं जळ ॥ १ ॥ एक मास येथें राहिलों निवांत । घरची तो मात न कळे कांहीं ॥ २ ॥ जोडोनियां हात विनवी चक्रपाणी । आज्ञा मजलागुनी द्यावी आतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाटकी तो देव । दावितसे भाव भक्तलागीं ॥ ४ ॥

३४७० रुक्मिणीशी सांगे स्वयें कृष्णनाथ । याचे वस्त्र त्वरित आणूनि द्यावें ॥१॥ आणुनिया ग्रंथीं देई जगन्माता । वस्त्र अलंकार तत्वतां काढूनी ठेवा ॥२॥ जीर्ण तें वस्त्र करुनी परिधान । वंदिले चरण कृष्णाजीचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करुनी नमन । निघाला ब्राह्मण तेथोनियां ॥ ४ ॥

३४७१ ग्रामाचे बाहेरी येवोनि श्रीहरी । सुदाम्यासी भेटुनी करी समाधान ॥ १ ॥ जोडोनियां हात विनवी

सुदामा । पूर्ववत् प्रेमा असों द्यावा ॥२॥ एका जनार्दनीं बोलोनियां ऐसें । तांतडी निघतसे क्रमीत मार्ग ॥ ३ ॥

३४७२ बहुत विचार करीत मानसीं । काय प्रारब्धासी करील कृष्ण ॥ १ ॥ आम्हांसी तो पूर्ण दरिद्र भोगणें । तेथें नारायणें काय कीजे ॥ २ ॥ एका जनार्दनीं करीत विचार। चालिला सत्वर ग्रामपंथें ॥३॥

३४७३ चालतांना वाटे अपूर्व देखिलें । मनीं हें वहिलें द्वारका दिसे ॥ १ ॥ श्रमलासे मनीं न सुचे विचार । म्हणे द्वारके सत्वर कैसा आलों ॥ २ ॥ एका जनार्दनीं करी कवतुक । प्रधान सेवक दूत आले ॥ ३ ॥

३४७४ स मानुनी ब्राह्मण राज्यीं बैसविलें । चित्त आनंदलें सुदाम्याचें ॥ १ ॥ तुष्टला नारायण दिधली सुवर्ण नगरी । द्वारकेसम पुरी पोह्यांसाठीं ॥ २ ॥ भक्ताचे मनोरथ पुरवी वैकुंठपती । ऐशी ज्याची कीर्ति त्रिभुवनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव तो तुष्टला। राज्याधीश केला आकिंचन ॥ ४ ॥

## संदीपनकथा.

३४७५ आवंती क्षेत्रवासी । होते संदीपन ऋषी ॥ १ ॥ कृष्ण बळिराम सुदामा । आले सद्गुरूच्या ग्रामा ॥ २ ॥ लोटांगण नमन करिती । कर जोडोनी तिष्ठती ॥ ३ ॥ स्वामी कर अंगिकार। आम्ही विद्यार्थी अनुचर ॥ ४ ॥ अनन्य भावें आलों शरण । एका विनवी जनार्दन ॥ ५ ॥

३४७६ करिती सडा संमार्जन । आणि गोमुत्र जीवन ॥ १ ॥ वस्त्रें पात्रें प्रक्षाळिती । गुरुसेवेतें सेविती ॥ २ ॥ चौदा विद्या चौसष्ट कळा । शस्त्रास्त्र धनुर्विद्या सकळा ॥ ३ ॥ उपासना बीज मंत्र । आत्मज्ञान देव शास्त्र ॥ ४ ॥ गुरुसेवें सर्व प्राप्ती । एका जनार्दनीं विनंती ॥ ५ ॥

३४७७ गुरुपत्नी आज्ञापिलें । तिघे इंधनासी गेले ॥ १ ॥ घोर क्रमिती कांतार । माथां बांधोनी काष्ठभार ॥ २ ॥ रात्र झाली सुटला वारा । मेघ वर्षे मुसळधारा ॥ ३ ॥ म्हणे चपळा गारा रिचवती । तिघे थरथरा कांपती ॥ ४ ॥ म्हणे एका जनार्दनु । मग उदया आला भानु ॥ ५ ॥

३४७८ कळला गुरूसी वृत्तांत । आले वन धुंडाळीत ॥ १ ॥ गुरू शिष्या हांका मारी । तिघे आले त्या अवसरीं ॥ २ ॥ पोटासी धरुनी आणिले घरां । उतरिला काष्ठभारा ॥ ३ ॥ मुख कुर्वाळुनी हातें । वर दिला सद्गुरुनाथें ॥ ४ ॥ म्हणे मागां गुरुदक्षिणा । एका विनवी जनार्दना ॥ ५ ॥

३४७९ मग बोले संदीपन । माझा पुत्र दे आणून ॥ १ ॥ स्नान करितां अकस्मात । बुडाला तो सागरांत ॥ २ ॥ गोष्ट ऐकोनी रामकृष्ण । गेले समुद्रीं धाऊन ॥ ३ ॥ सिंधु पायासी लागला । गुरुपुत्र पांचजन्यें नेला ॥ ४ ॥ शोधोनि वधियेला नित्य । गुरुपुत्र नाहीं तेथें ॥ ५ ॥ वधियला पांचजन्य । एका विनवी जनार्दन ॥ ६ ॥

## पांडवगृहीं ब्राह्मणभोजन.

३४८० पांडवाचे गृहीं जाण। असंख्य जेविले ब्राह्मण । धर्माचें विस्मित मन । संख्येलागीं ॥ १ ॥ तें कळलें वैकुंठा । निर्मिली तेव्हां घंटा । तेव्हां ते गर्जे देखा । संख्या नाद ॥ २ ॥ तेथें व्यास देवाचा सुत । शुकदेव अवधूत । ब्राह्मण शेष व्हावें प्राप्त । म्हणोनि येतां जाहला ॥ ३ ॥ रात्रसमयीं सुखी एकीं । शीत घातलें मुखीं । घंटानाद सकळिकीं । ऐकिला कानीं ॥४॥ कृष्ण पाहे ध्यानीं । शुकदेव आणिला धुंडोनी । पूजा नमस्कार करुनी । गेलासे वना ॥ ५ ॥ एका जनार्दनीं जाण । धर्मे केला प्रश्न । तोचि सखा श्रीकृष्ण । सांगतसे ॥ ६ ॥

## काशीमहिमा.

३४८१ धन्य काशीपुरी धन्य काशीपुरी। जेथें वास करी विश्वनाथ ॥ १ ॥ तयाच्या दरुशनें प्राणी मुक्त होय । चारी मुक्ती पायां लागताती ॥ २ ॥ भागीरथी स्नान जयालागीं घडे । समूळ हे झडे पाप त्याचें ॥ ३ ॥ काळभैरवाचें दर्शन घेईल। तात्काळ जाईल वैकुंठासी ॥ ४ ॥ प्रदक्षिणा पंचक्रोशीची जो करी । होईल अधिकारी सर्वस्वाचा ॥ ५ ॥ धुंडिराजस्वामी दृष्टीं जो न्याहाळी । होईल त्या होळी सर्व पापा ॥ ६ ॥ तेथें जाऊनियां करी अन्नदान। तया नारायण हृदयीं वसे ॥ ७ ॥ एका जनार्दनीं नित्य काशीवास। परम सुखास पात्र झालों ॥ ८ ॥

## राम-रावणाची एकरूपता.

३४८२ रावण म्हणे नवल चोज। माझें कटक पारखें मज। अश्व आणि नरगज। रामची स्वयें॥१॥ निशाचर वीर। राम जाले साचार। रामरूपें वानर। सरसावले युद्धीं ॥२॥ ठक पडिले लंकानाथा। जीऊचि पारिखा आतां। इंद्रियांची सत्ता। रामरूप जाली ॥३॥ शस्त्रांचें तिखटपण। राम जाला आपण। शत्रु मित्र संपूर्ण। राम स्वयें ॥४॥ युद्धीं पारखें अंतःकरण। मन जालें उन्मन। अहं तें सोहं जाण। होऊनी ठेलें ॥५॥ चित्त जालें चैतन्य। बुद्धि ते समाधी धन। देह तो विदेह पूर्ण। राम जाला ॥६॥ रामें पारखें केलें लंकागड। दृढ राम जाला दुर्ग आगड। न झुंजता अवघड। घेतला रामें ॥७॥ रामें घेतलें घर। राम जाला कलत्रपुत्र। अवयव अलंकार राम जाला ॥८॥ मी म्हणें हा अवघड गड। तंव राम जाला गडीये दगड। महाभार अति गूढ। राम आला ॥९॥ आतां कायसी निज देह निकुंभिला। येथें कोण मानी मोह कुंभकर्णाचे बळा। बळाच्या सबळ बळा। राम जाला ॥१०॥ एका जनार्दन। नीजभावें युद्ध पूर्ण। रावणाचि आपण। राम जाला ॥११॥

३४८३ रामें रावण रणीं। निटविला निजबोध वाणीं। येर सर्वस्व मानुनी। निज सुखीं जाहला ॥१॥ दहा मुखांत छेदिलें। शेखी विश्वमुखें केलें। रणीं रामें सुख दिधलें। परमसुख ॥२॥ राम तो वैरी नव्हे राजा। सखा जिवलग माझा। दहा मुखें वीस भुजा। फेडिला केरू ॥३॥ नश्वरराज्य नेलें। रावणपण गेलें। अक्षयीं राज्य दिधलें। श्रीरघुनाथें ॥४॥ माझे देह संदेह छेदिले। कीं वेदामृत पाजिलें। ऐसें बोलता बोले। बोलवेना ॥५॥ राम रावण रणीं। बोधाची झोट धरणी। एका जनार्दनीं। मीनलें एकपणीं ॥६॥

## सीता-मंदोदरीची एकरूपता.

३४८४ मंदोदरी पोटीं। सीतेसी व्हावी भेटी। तयेसी करूं गोष्टी। स्वानुभवें ॥१॥ तंव दशानन मनीं। वश्य व्हावी शयनीं। धाडिली अशोकवनीं। मंदोदरी ॥२॥ तंव दृष्या दृश्य मिळे। विरालियाही बरवळे। मीनलिया प्रीती मेळे। अहंत्यानें ॥३॥ परेसहित गोष्टी। परतोनी पडली मिठी। शब्द निमाला पोटीं। नभाचिये ॥४॥ निखळ सावधानें। बोलेवीण बोलणें। परिसती शहाणे। सर्वांग श्रोते ॥५॥ तेथींची ही मात। अहाच न चढे हात। जीव हा जीवा आंत। घालूनि पहा ॥६॥ नवल मंदोदरी छंदु। सीतेसी अनुवादु। रामरूपीं संवादु। स्वानुभवाचा ॥७॥ राम सकळ देहोदेहीं। रावणीं काय नाहीं। दुराग्रह तुझा ठायीं। जानकीये ॥८॥ राम सकळां देहीं आहे। रावणें केलें काये। हेंचि सांगणें माये। विशद करोनी ॥९॥ रामीं ठेवुनी रतीं। रावणी अति प्रीती। करितां काय स्थिती। उणी होय ॥१०॥ येरी म्हणे अभेद रामराणा। उरी कैंची रावणा। साचती मीतूंपणा। ठाव नाहीं ॥११॥ ऐसीये हातवटी। रावणा कैंची भेटी। समूळ तुझिया गोष्टीं। आहाच गे बाई ये ॥१२॥ राम व्यापक कीं एकदेशीं। सांगे पा मजपासीं। सकळ देह त्यासी। रिते की पूर्ण ॥१३॥ येरी म्हणे रावणा वेगळे देख। व्याप्य असावें एक। तरी त्यासी व्यापक। होईल सुखें व्यापक ॥१४॥ व्याप्य व्यापक दोन्ही। गेली हारपोनी। रामरावण मानी। कवण तेथें ॥१५॥ दृश्याचिये भेटीं। दृश्यपणेंसी उठी। तेणेंसी झालिया तुटी। तेही नाहीं ॥१६॥ नाहींपणें असे। असे तेंचि दिसे। तेथें रावणाचे पिसें। कायसें गे बाईये ॥१७॥ तेथें अवस्था मंदोदरी। स्वेद कंप शरीरीं। चढली आनंदलहरी। स्वानुभवाची ॥१८॥ कष्टी म्हणे माय। देखीले तुझे पाय। सुख झालें काय। केवी सांगो ॥१९॥ ऐसें बोलता बापा कंठीं। मन मागुती नुठी। चित्तें घातली आठी। चैतन्यासी ॥२०॥ पाहे सावधान। निरसूनिया मन। रामरूपीं नयन। निडारले ॥२१॥ न्याहाळितां आत्मबिंब। उचटत आहे नभ। तंव त्या दोघी स्वयंभ। तेचि जाहालियां ॥२२॥ एका जनार्दनीं। एक जालिया दोन्ही। ऐसीये अशोकवनीं। शोक कैंचा गे बाईये ॥२३॥

## शिवशक्ती-विवाह.

३४८५ हेमवंताच्या पोटीं एक जन्मली गोरटी। तये त्या धुर्जटी वरियलें ॥१॥ मंडपाच्या द्वारीं आला जंव नोवरा। अवगुणाचा म्हातारा रूप नाहीं ॥२॥ नांवा येव्हढीया बाळा। अति वृद्ध नोवरा। कुंवारीच्या संसारा शून्य जालें ॥३॥ येणें जाणें ठेलें भोगणें खुंटलें। नारदाचेनी बोलें ऐशी दशा ॥४॥ काम मारी तया दिधली हे बाळा। शिवेया कपाळीं कवण

आणें ॥५॥ शकुनालागीं दासी उभ्या पूर्ण कळसेंसी ।
पांच मुखें वरासी तिन्ही डोळे ॥ ६ ॥ दारावरु आला
मुद पैं वोवाळी । साजुकासी घाला माळ गळां ॥७॥
सासु म्हणे कवणा दिधली दुर्बुद्धी । विकल्पाचा नंदी
गोमाशा लावी ॥८॥ लग्नघडी आली अंतरपाट्ट धरा।
अतिशयें नोवरा उंच देखा ॥ ९ ॥ डोळ्यासी पुरे
ऐसा नव्हे कां नोवरा । अंतरपाटु पुढा काय धरूं
॥ १० ॥ कन्यादान वरा गोत्र पैं उच्चारा । वृद्ध पर-
परा आहे वेगी ॥ ११ ॥ बापु तो नाठवे माय ते मी
नेणें । कुळगोत्र लाहणें नाहीं आम्हां ॥ १२ ॥ बहुला
वधुवरें संभ्रह सोहळा । अक्षवाणें बाळा करूं आल्या
॥१३॥ तंव कंठींचा वासुकी दिपा फण करी । भुभुः
कारें नारी पळालिया ॥ १४ ॥ प्रातःकाळ जालीया
काढीला भस्मारा । विभुती शरीरा लावियेली ॥१५॥
अगे हा काळाचाहि काळु नव्हे धारी जाणा । संसारीं
लाहाणा जांवई नव्हे ॥ १६ ॥ लग्ना येरे दिशीं उटणें
मांडलें । धवळ आरंभीले संभ्रमेंशीं ॥ १७ ॥ धवळा
माजीं गाणीं गाईलें रामनाम । ऐकोनियां प्रेम वरा
आलें ॥ १८ ॥ रामनाम ध्वनीं ऐकतांच कानीं । स्वेदु
कंपु नयनीं अश्रु आले ॥ १९ ॥ उन्मळितां दृष्टी बाष्प
दाटे कंठीं । मूर्च्छा पूर्ण सृष्टी विकळ पडे ॥ २० ॥ वरा
पायरवूं रक्षा पैं कपाळा । त्रितीय मेत्रीं ज्वाला उठ-
लिया ॥२१॥ नोवरा हा नव्हे संसारू विवसी । देहभावें
कवणासी नेदी उरों ॥ २२ ॥ वेगीं वधुवरा चौक
म्हणें करा । उकलती सुंदरा जटाभारू ॥२३॥ वरा-
चिया माथां सोज्वळ सुंदरी । येरी म्हणे नोवरी मी
महेशाची ॥२४॥ गौरी ते अर्धांगीं सवती बैसे माथां ।
बेसी याची कांता उमा केली ॥ २५ ॥ हा अकुळी
अति वृद्ध कां केला समंधु । जीवेसी विरोधु पडिला
साचें ॥ २६ ॥ जेथें वडिलाधारें नाहीं तेथें बोळवण
काई । कुंवारी कवणें ठायीं दिधली देखा ॥२७॥ जेथें
संघात अभाव तेथें कैंचा येव जावो । जिण्यामरणा
ठावो नुरेची इसी ॥ २८ ॥ विवेकेंसी जेथें परतलिया
श्रुती । गौरी त्याचे हातीं लावियेली ॥ २९ ॥ माया
माहेर खुंटलें संकल्पें तुटलें । ममत्व विटलें आजि-
चेनी ॥ ३० ॥ बहु काळा जुनाटु त्यासी शेषपाटु ।
संसारा शेवटु जाला माये ॥ ३१ ॥ एका जनार्दनीं
प्रकृति प्राणेश्वरें । मिरवती बोहरें एकपणें ॥ ३२ ॥

## गंगा-गौरी कलह.

३४८६ जगाचा तो पिता । म्हणसी ईश्वर नियंता ॥१॥
त्यासि विद्या अविद्या दोघी कांता । एकी माथां
अर्धांगीं ॥ १ ॥ पाहतां ईश्वरकरणी । माथां बैसविली
राणी । हा महिमा वेदीं पुराणीं । गाती कीर्तनीं
निरंतर ॥ २ ॥ अविद्या आणि ईश्वर । दोहीं मांडिला
घराचार । कैसा अनन्य भक्ति सधर । आवडी थोर
पैं देखा ॥ ३ ॥ दोघां एकची नेसणें । दोघां एक
बैसणें । एके अंगीं दोनीपणें । संपादणी करिताती
॥ ४ ॥ दोघां एकची चाखणें । दोघां एकची देखणें ।
दोघां आनुमाजीं असणें । सावकाश सहजें ॥ ५ ॥
दोघां आवडी कैसी देख । येरयेरावीण नेघे उदक ।
दोघां मिळोनि एक सुख । अति संतोष येरयेरा ॥६॥
जैं उभयां मेळविलें । तैंचि शिवा शिवत्व कळे ।
प्रियानें देखतां सगळें । शिवत्वहि सांडिजे ॥ ७ ॥
दोघां एकत्र बैसणें । दोघां मिळोनि एक करणें ।
दोघें वर्तती एके प्राणें । दोनीं दावणें एकपणीं ॥ ८ ॥
शिवत्व लोपुनी शिवें । अंगावरी वाढविलें शांभवें ।
येरी पतिव्रता अहेवें । रूपें नांवें शिव पूजी ॥ ९ ॥
दोघापासुनी जालें जग । परि न दिसे तिसरें अंग ।
न तुटे अनन्यमिळणी योग । भिन्न विभाग दाख-
वितां ॥ १० ॥ पतीविण जे पतिव्रता । अवघीच विरे
पैं तत्वतां । जीवीण असतुची नसतां । होये सर्वथा
गोसावी ॥ ११ ॥ शिव निःसंगु जो पैं सदा । क्रिया
करणेंवीण नुसुधा । त्यासहि सुखदुःखाची बाधा । या
प्रमदा भोगविजे ॥१२॥ यापरी तो नोवरा । अविद्या
गोंविला घराचरा । मग त्याचियाची शरीरा । अर्धांगी
बैसविली ॥ १३ ॥ गंगे न देखवे दृष्टी । सवतीमत्सरू
उठिला पोटीं । सद्विभागें जटाजुटीं । होती मुकटी
मौळली ॥ १४ ॥ सविद्या गंगा मुगुटीं । वैराग्याचे
प्रवाह लोटी । शिवाची उपरमली दृष्टी । न करी गोष्टी
भोगाची ॥१५॥ अखंड वसे ते एकांतीं । प्रकृती न
साहे पार्वती । सांडुनी अवघी हे प्रवृत्ती । मग अद्वैतीं
रहिवासू ॥ १६ ॥ ते संधी आला नारदमुनी । देखोनि
शिव शंकला मनीं । मग बैसला तो ध्यानीं । म्हणे
कळी हा क्षणीं लावा ॥ १७ ॥ गुज सांगितलें प्रियेसी ।
वेगीं लावी ऋषीसी । हांसे आले नारदासी । मग
कलहासी उत्पादी ॥ १८ ॥ नारद नमी पार्वतीसी ।
सांगें शिव केवीं गुंतले ध्यानासी । आवो तूं भोळी
ऐसी कैसी । तो आणिकांसी रतला ॥ १९ ॥ मी
कळीलावा हें पुढें । माझें वचन मानिसी कुडें । पैल
पाहें मुगुटाकडे । दिसे रूपडें सुरेख ॥ २० ॥ आधींच

तंव ते उतावीळ । वरी नारदें चेतविली प्रबळ । मज असतां कोण गे बरळ । मुगुटीं घसे मोकाट ॥२१॥ येरी म्हणे बाई तुम्ही कां नेणा । शिव शिवप्रिया मी अंगना । मान राखो वडीलपणा । कोपू मनीं नाणावा ॥ २२ ॥ पापें जया वसे पैं गा । तेणें आलिंगिजे गंगा । ते तूं जडली शिवा अंगा । नातळे लिंगा उघटे ॥२३॥ माझेनी अंगें पाप पळे । हें जाणिजे अभ्वनिळे । विष निस्तरिजे माझेनी मेळे । द्वेष कुटिलें सांडी पा ॥२४॥ चढला कोपाचा बासट । गंगे तुझा वहु गे नेट । ठकारें भुलविला नीलकंठ । माझा वीट घालिसी ॥२५॥ अगे तूं गौतमी नेलीसी । निर्लज्जे मागुती आलीसी । येरी म्हणे शिवें रावणा दिधलीसी । माझेनी बापें सोडविलें ॥ २६ ॥ गंगे तूं नुसुधें उदक । तुजमाजीं काई रमणीय सुख । येरी म्हणे जनीं त्र्यंबक । जेणें मस्तकीं धरियलें ॥ २७ ॥ अगे तुज जवळी भगवे । आणिक बोडिके आघवे । जत्याळ गाळ्याळ तुजसवें । तेथें काय शिवें भोगिजे ॥ २८ ॥ गिरिजे नोळखिसी पायरी । मी मस्तकीं तूं पायांवरी । तुझ्या अंगीं दोष भारी । परि नव्हेरी भोळा हा ॥ २९ ॥ जैं गे झालें तुझें लग्न । भटां झालें वीर्यस्खलन । एव्हढें अंगिंचें लक्षण । केवीं मस्तक इच्छिसी ॥ ३० ॥ गंगे तूं वाजट गळदट । माथां वाहिलिसी धीट । कांहीं न बोलसी नीट । विद्या उद्भट तुजमाजीं ॥३१॥ अगे तूं शिवें शापिलिसी । तैं गे शांतनूनें नेलिसी । तेथें हिंवसुतें व्यालिसी । केविं आलिसी मस्तका ॥३२॥ उमे भीतसो तुझिये कोपा । आगीं रिघोनि मारविलें बापा । नरसुरां आटूं पहा पां । सुधी संताप पैं नाहीं ॥ ३३ ॥ दक्षा मारविलें यज्ञिष्टा । ब्रह्महत्या तुझा वाटा । येव्हढा अंगीं दोष मोठा । झणें नीलकंठा आतळसी ॥ ३४ ॥ गंगे तुजमाजीं खळाळ । तेणें तूं गर्जसी सबळ । शिवें सोसिजे खळबळ । माझें कपाळ उठिलें ॥ ३५ ॥ माझें लागतां खळाळ । तरेल सुरवर सकळ । तुझेचि कां कठीण कपाळ । द्वेषें छळण करितेसी ॥ ३६ ॥ गंगे तुज ऐसी ओंगळ । आन न देखे मी कुश्चिळ । मच्छ कच्छ विष्ठा तें जळ । आणि शेवाळ सर्वांगीं ॥ ३७ ॥ ऐकोनि गंगे आलें हांसें । काय बोलशी वांयसें । चराचार जें दिस तसें । तें तें असे मजमाजीं ॥ ३८ ॥ गंगे तूं जाशी सागरा पोटीं । हे प्रत्यक्ष जगु देख दिठी । पुराणीं ही त्याचीं गोठी । गंगा सागरगामिनी ॥ ३९ ॥ उमे तुझा खोटा भावो । गिरीसागर माझा देवो । शिवावाचोनि पहा हो । गमनागमन मज नाहीं ॥ ४० ॥ गौरी गंगेतें म्हणे धांगडी । येरी म्हणे घर रिगालीसी आवडीं । बापें बेल वहावया मिसें लाविली गोडी । तैसी फुडी मी नव्हे ॥ ४१ ॥ वमें क्रोध चढल्या क्रोधा । नारदु हांसतु खदखदां । भालिया मीनलो विनोदा । दोहींच्या शब्दा साक्षी तो ॥ ४२ ॥ तुज कुटिल जाणोनि मानसीं । शिव तारक ब्रह्म उपदेशी । भावो नाहीं त्या वचनासी । छळूं जासी श्रीरामा ॥ ४३ ॥ देववचनीं नाहीं भावो । तंववरी न तुटे देह संदेहो । कैसेनि राहे काम कलहो । न्याय अन्यायो न कळे ॥ ४४ ॥ तूं अविद्या सदा विन्मुख । यालागीं नेणसी निज सुख । जगाचे देखसी दोख । कामें सुख मानिसी ॥ ४५ ॥ आम्ही तंव शिववचनीं सन्मुख । अखंड आम्हा आत्मसुख । शिवावांचूनियां देख । आन नाहीं सर्वथा ॥ ४६ ॥ तुझा जावयासी द्वेष । कळे भांडण्याचें मिष । कलहो अंतीं उपजे सुख । परम निर्दोष त्या नांव ॥ ४७ ॥ पाहे पां मुळींच्या मिळणीं । आम्ही तुम्ही एकी दोघी जणी । शिणलिसी माय गे बाहिणी । द्वेषू मनीं न धरावा ॥ ४८ ॥ जें सांगितलें सदाशिवें । तें हृदयीं धरावें निजभावें । तेणें द्वेषाद्वेष न संभवें । पालट पावे वृत्तीशीं ॥ ४९ ॥ त्याची वृत्ति परतोनी पाही । देहीं प्रगटेल विदेही । मग देह विदेह दोन्ही नाहीं । निजतत्त्व ठायीं होऊनि ठासी ॥ ५० ॥ ऐकतां गंगेचें वचन । गिरिजे चालिले स्फुंदन । धावूनि दिधलें आलिंगन । समाधान पैं झालें ॥ ५१ ॥ ते वेळीं मिनले मनामन । उपनिषदा पडिलें मौन । देखणें ठेलें भिन्नाभिन्न । शिवचैतन्य अनुभवीं ॥ ५२ ॥ शिव तो निजरूप सकळ । गंगा सच्छक्ति निर्मळ । येरी अविद्या चपळ । नारदु केवळ निजबोधु ॥ ५३ ॥ दोही शक्तींचा फिटला भेदु । सकळीं सकळा शिवूचि श्रध्दु । एका जनार्दनीं बोधु । परमानंदु प्रगटला ॥

## रुक्मिणीस्वयंवर—हळदुली.

३४८७ काढिली हळदुली लखलखीत सोज्वळी । जन्म ब्रह्मचळीं झाली तिये ॥ १ ॥ अति सूक्ष्म सुगंध शोभवीत अंग । ज्यासी होय भाग्य त्यासीच लाभे ॥ २ ॥ शेष कूर्मासनीं सतुशास्त्रिपासुनी । भूमिका शोधूनि शुद्ध केली ॥ ३ ॥ तयावरी देख बहुलें सुरेख ।

देखतांचि सुख होय मनीं ॥४॥ उटिती वधूवरें हळदुली स्वानंदें। लाज मध्यें मध्यें परम प्रीती ॥५॥ नोवरा मेघश्याम बाहुला पुरुषोत्तम। उटणी या संभ्रम मूळ केलें ॥६॥ कृष्णमेचु अलंकार लेवूनि सनागर। बसली सुंदर वामभागीं ॥७॥ वराअंगीं भली नोवरी बिंबली। म्हणती प्रकाशली पुरुषोत्तमें ॥८॥ नोवरी शहाणी आपुला निजगुणी। वश्य चक्रपाणी करूनि ठेली ॥९॥ मुळे पाठविल्या आल्या बारा सोळा। करविली वेल्हाळा उन्मनीं चाले ॥१०॥ पदोपदीं त्याग करितसे अनेक। वराचें तें अंग टाकूनि आली ॥११॥ आणिक नवजनी आल्या वऱ्हाडिणी। जयाच्या वचनीं वरु वर्ते ॥१२॥ त्या हितगुजाचिया वरा निजाचिया। सदा यशाचिया काय समीप असती ॥१३॥ सकळांमाजीं वृद्ध शांती पैं प्रबुद्ध। ते म्हणे हा विध ऐसा आहे ॥१४॥ सर्व स्वयंवरा कुरवंडी करा। मग पाय धरा उटणीया ॥१५॥ उजळूनियां वाती अक्षता पैं देती। भीमकीये म्हणती वेगु करी ॥१६॥ तंव भवया देउनी गांठी न पाहे ते दिठी। सखी म्हणे गोठी कळली मज ॥१७॥ तंव शांती म्हणे सरा सांगेन ते करा। कुरवंडी या वरा ऐसी नोहे ॥१८॥ जया दीपमेळी नाहीं धूम काजळी। तो दीपु उजळी निरंजना ॥१९॥ ऐकोनि ते बोली भीमकी आनंदली। मनीं म्हणे भली साधु होसी ॥२०॥ मनोगत कळे ऐसे संवादि जे मिळे। तें दैवें न कळे काय वश्य झाली ॥२१॥ तेज बीज रूप प्रकाश अमूप। चिद्रत्नाचे दीप भीमकी लावी ॥२२॥ ते प्रकाशतां प्रभा सूर्य लोपे उभा। कोंदलेसे नभा लखलखीत ॥२३॥ तो पाहतां प्रकाश अवघा हृषिकेश। तंव तंव उल्हास भीमकीयेसी ॥२४॥ त्या प्रकाशावेगळी न निवडे ते बाळी। निजभावें वोवाळी प्राणनाथा ॥२५॥ धन्य तुझें दैव सिद्धी गेले भाव। घेऊनियां नांव पाय मागे ॥२६॥ येरी म्हणे पोटीं काय बोलो ओठीं। नावाची हे गोठी नाहीं यासी ॥२७॥ याच्या नामभेदा नेणवेचि वेदां। नेती म्हणोनि सदा परतला तो ॥२८॥ जेथें रूपाचा दुष्काळ नामाचा विटाळ। उच्चाराचा बळ केवि चळे ॥२९॥ म्हणे कळलें आतां गो इंद्रिया नियंता। गोवळा म्हणतां दोष नाहीं ॥३०॥ ऐसें विचारूनि बाळा न्याहाळी चरणकमळा। मग म्हणे गोवळा पाय देसी ॥३१॥ तंव पिटली टाल्या टाळी हांसीजे सकळीं। भीमकीया रांडोळी भली केली ॥३२॥ त्या वचना संतोषला देतुसे पाउला। वर्तती आंतुला खुणा दोघे ॥३३॥ कृष्ण बहु काळा उटी वेळोवेळां। उटूनी सोज्वळा करूं पाहे ॥३४॥ जें कृष्ण अंगीं लागे तें मागुतें न निघे। मळी लागवेगें निघेल कैंची ॥३५॥ मळी काढावयालागीं पाहे नख भागीं। अभिन्नत्व ते अंगीं देखियलें ॥३६॥ सहित रवि चंद्र आणि क्षीरसागर। बिंबले अरुवार नखामाजीं ॥३७॥ शेषाचिया बहुला श्रीकृष्ण नोवरा। उटणें सुंदरा करवी त्या ती ॥३८॥ येथें वऱ्हाडी हे देव बैसलेजी सर्व। अक्रूर उद्धव चवरे ढाळी ॥३९॥ देवकन्या वऱ्हाडिणी भोवल्या सवाशिणी। हळदी लावी चरणीं क्षीरात्मजा ॥४०॥ ऐसें कृष्णनखीं देखें एकाएकी। देखतां भीमकी मूर्च्छित झाली ॥४१॥ तेथें अभ्वासित गुरु म्हणे स्थिरु स्थिरु। निर्धारेसी धिरु धरी बाळे ॥४२॥ तंव बाष्प दाटे कंठीं स्वेद कंप जाली गोरटी। उन्मळितां दृष्टी होऊनी ठेली ॥४३॥ तंव धांविन्नलीं धाये म्हणे झाले काये। झणें तुज माये दिठीं लागे ॥४४॥ जें दृष्टी देखिलें तें न बोलवे बोले। धायें ते वरिलें संज्ञेनें ॥४५॥ कृष्ण ओहणींचें बिरडें फेडी आपुले चाडे। सुभद्रा हे लाडे बोलतीसे ॥४६॥ मेहुणे म्हणती जगजेठी जाणें हातवटी। यमुनेच्या तटीं अभ्यासू केला ॥४७॥ तंव यादव म्हणती कृष्णा उशिर कां येसणा। विराडिया फेसणा पाहूं आम्हां ॥४८॥ झुंजारा विराचें बिरडें फेडिलें। मग द्वये परणीलें राजबाळें ॥४९॥ कृष्ण पाहे दृष्टी तंव बिरडें सुटे गांठी। कांचोळी समदृष्टी द्वैताची फेडी ॥५०॥ पाहा गे नवल केलें डोळांचि उगविलें। बिरडें काढिले नयनबळें ॥५१॥ कृष्णदृष्टिपुढें फिटे संसारबिरडें। मग हें केवढें नवल यासी ॥५२॥ व्रत तप याग करिता न टिके अंग। परी भाग्य सभाग्य भीमकीचें ॥५३॥ मुखा मुख सन्मुखी बैसाविली भीमकी। लाजें अधोमुखी होउनी ठेली ॥५४॥ तंव तळीं कृष्णमुख देखिलें सन्मुख। पाठिमोरी देख होउनी ठेली ॥५५॥ मागाही ते मूर्ति सन्मुख श्रीपती। म्हणे मी केउती रिघो आतां ॥५६॥ दाम सव्य दिशा पडिला कृष्णठसा। लाज हृषिकेशा माजी नुर ॥५७॥ यापरी गोरटी कृष्ट लाजे भेटी। मग उपडियेली दृष्टी स्वरूप बळे ॥५८॥ सुभद्रा म्हणे चांग उटी इचे आंग। स्वलीला श्रीरंग हळदी घेती ॥५९॥ तंव रेवती म्हणे देवा आधीं घ्यावें नांवा।

हळदुली मग लावा उटा इसी ॥ ६० ॥ मज नांव घेतां लाज नाहीं आतां। सावधान चित्ता ऐका तुम्हीं ॥ ६१ ॥ नामा हे रूपाची गुणमयी गुणाची। प्रिया हे कोणाची कवण जाणे ॥ ६२ ॥ माझे येथें लक्ष वधुवरासी साक्ष। पुसा पां प्रत्यक्ष रुक्मिणीसी ॥ ६३॥ ऐकोनी तयां नांवा गहिंवरून उद्धवा। तटस्थ यादवा सुरवरासी ॥ ६४॥ कवण जाणे लीला आकळ याची कळा। हांसती सकळां वऱ्हाडिणी ॥ ६५ ॥ यावरी श्रीरंगें हळदी घेऊनि स्वांगें। उटीतु अष्टांगे रुक्मिणीची ॥ ६६ ॥ कृष्णकरयोगे सबाह्य निवो लागे। जाणतील अंगे अनुभवीये ॥६७॥ लाभु चरण-कमळा जाणें ब्रह्मबाळा। त्याचिया करतळा वैदरभी भोगी ॥ ६८ ॥ हा ईशू ब्रह्मादिकीं तो सेवक भीमकी। केलासे कवतीकीं हळदीमीसें ॥ ६९ ॥ दासाचाहि दासु साचा हृषिकेशु। भीमकीया उल्हासु देतु असे ॥ ७० ॥ जया जैसा भावो तया तैसा देवो। भक्तीचा निर्वाहो हाचि जाणें ॥ ७१ ॥ कृष्णचरणावरुता सुरंग अक्षता। भीमकीयें माथां ठेवी वेगीं ॥ ७२ ॥ येरी आनंदली रोमांचित जाली। कपाळा पैं आली दशा आजी ॥७३॥ तंव सखीया देखोनि दिठी लाज आली पोटीं। तोची भेदु दृष्टी आशंकेचा ॥ ७४॥ तेणें चुकविलें समचरण तत्वता न लगती अक्षता। नमस्कारी माथां भूमी लागे ॥ ७५ ॥ तंव अभिमानली बाळी धरी अंगुष्ठ करतळीं। नमन इये वेळीं चुको नेदी ॥ ७६ ॥ मस्तक जंव लोटी तंव पाया पडे फुटी। अभिमानें तुटी चरणकमळा ॥ ७७ ॥ नमस्कार भले मागुतें अवंगिलें। तंव समचरणीं पाउले दिसो नेदी ॥७८॥ अभिमानाचें बळ तें आलें पटळ। नेणें चरण-कमळ अंतरले ॥ ७९ ॥ उश्वासें निश्वासें स्फुंदे ते कामिनी। असुवें लोचनीं पूर्ण आली ॥ ८० ॥ मनीं ऐशी आस नमीन सावकाश। तें दैव उदास आजी जालें ॥ ८१ ॥ म्हणे कटकटा धात्रया विकटा। चरण लल्लाटा न भेटती ॥ ८२ ॥ आजि हें कपाळ जालें हें निर्फळ। कृष्णचरणकमळ नातळती ॥ ८३ ॥ चंड वातें केळी कांपे चळवळी। त्याहुनी वेगळी भीमकी दिसे ॥ ८४ ॥ गळती कांकणें अवस्था भूषणें। अव शेष प्राणें मूर्च्छित जाली ॥ ८५ ॥ देखोनि तो भाव गंहीवरें उद्धव। एकाएकी देव निष्ठूर जाले ॥ ८६ ॥ भीमकी आनंदमेळीं न संडे उकळी। उद्धव ते वेळीं वोसंडला ॥८७॥ नेत्रीं आनंदजळ वहातसे सोज्वळ। म्हणे धन्य बाळ भीमकाची ॥ ८८ ॥ धरुनी तिची वाहे म्हणे उठी माये। नमस्कारी पाये या वरिष्ठाचे ॥ ८९ ॥ सांडी लाज अभिमान निर्विकल्प मन। मस्तकीं श्रीचरण धरुनी ठेली ॥ ९० ॥ यापरी कामिनी घाली लोटांगणी। जडली कृष्णचरणीं उठवेना ॥ ९१ ॥ ते अभिनव सुख फिटले जन्मदुःख। विसरली निःशेख देहभावा ॥ ९२ ॥ तेथें सुखें वांकुलिया बोधाच्या गुतकुलीया। उसळती उकलीया आनंदाच्या ॥ ९३ ॥ अहं सोहं गांठी सुटल्या चरण-भेटी। आनंदुची सृष्टी हेलावतु ॥९४॥ सेव्य सेवक भावो नाठवे विवाहो। देवी आणि देवो एक जाली ॥ ९५ ॥ सच्चिद पाउली स्वानंद तळवटी। जाहली उठाउठी सहजी निज ॥ ९६ ॥ तेथें वाच्य वाचक मौन ना जल्पक। म्हणावें ते एक तंव म्हणतें नाहीं ॥ ९७ ॥ हरि म्हणे वेल्हाळ क्षणीं होय बरळ। करिती कोल्हाळ सोयरे या ॥ ९८ ॥ उपराटी विकडी देवासी सांकडी। सावध हे कुडी केवीं होय ॥ ९९ ॥ त्या सुखाचे अंतरीं प्रवेशले हरी। तंव विसरली सुंदरी सावध करूं ॥ १०० ॥ दोघां एक सुख लागली टक-मक। चेतविते देख कवणा कवण ॥ १०१ ॥ त्या सुखा वेगळी न निवडे ते बाळी। सुखेसी वेल्हाळीं उठविली ॥ १०२ ॥ त्या देहा जरी येणें तरी देह मी न म्हणे। अवघी कृष्णपणें रचली असे ॥ १०३ ॥ चराचर दिसे तें मजमाजींच असे। रचले मदांशे ब्रह्मगोळ ॥ १०४ ॥ ऐसी कृष्ण रुक्मिणी बैसली ऐक्य होउनी। तटस्थ अस्तानी काय सकळींकेसी ॥ १०५ ॥ तो सोहळा देखोनी एका जनार्दनीं। उल्हासु जनीं वनीं सांठवेना ॥ १०६ ॥ त्या आनंदाचा लोंढा न कळे उदंडा। तेणें सुखें झेंडा नाचतसे ॥ १०७ ॥ एका जनार्दनीं बोलतांची मौनी। हळदुली कैसेनी हातां आली ॥ १०८ ॥ पितामहाचा पिता सुभानु सत्त्वतां। हळदुली हे कथा येथुनी जाली ॥ १०९ ॥

## संतचरित्रें

### श्रीनिवृत्तिनाथांची स्तुति.

३४८८ विश्वाचा तो गुरु। स्वामी निवृत्ति दातारु ॥ १ ॥ आदिनाथापासून। परंपरा आली जाण ॥२॥ ज्ञानदेवा ज्ञान दिलें। चांगदेवातें बोधिलें ॥३॥ तोचि बोध माझे मनीं। राहो एका जनार्दनीं ॥ ४ ॥

३४८९ केला उपकार जगीं तारियेलें सर्व । निवृत्ति गुरु माझा जीव उद्धरिले सर्व ॥१॥ कायावाचामनें शरण निवृत्तिपायीं । देहभावें मीतूंपणा उरलाची नाहीं ॥२॥ ऐसा श्रीनिवृत्ति ज्ञानदेवें धरिला चित्तीं । चांगया प्रेम दिधलें गुरु वोळखिला चित्तीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण निवृत्तीप्रती । संसारा नुरेचि उरी निवृति म्हणतां चित्तीं ॥ ४ ॥

३४९० धन्य धन्य निवृत्तिदेवा । काय महिमा वर्णावा ॥ १ ॥ शिव अवतार तूंचि धरून । केलें त्रैलोक्य पावन ॥ २ ॥ समाधी त्र्यंबक शिखरीं । मागें शोभे ब्रह्मगिरी ॥३॥ निवृत्तिनाथाचे चरणीं । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

३४९१ समाधी निवृत्ति म्हणतां । हरे संसाराची व्यथा ॥ १ ॥ दृष्टीं पाहतां निवृत्तिनाथ । काय भय नाहीं तेथ ॥ २ ॥ समाधी पाहतांचि डोळां । काय सांगूं तो सोहळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं शरण । समाधी पाहतांचि जाण ॥ ४ ॥

३४९२ निवृत्ति निवृति । म्हणतां पाप नुरे चित्तीं ॥ १ ॥ निवृत्ति निवृत्ति नाम घेतां । जन्म सार्थक तत्त्वतां ॥ २ ॥ निवृत्ति निवृत्ति । संसाराची होय शांती ॥ ३ ॥ निवृत्तिनामाचा निजछंद । एका जनार्दनीं आनंद ॥ ४ ॥

३४९३ धन्य आजी डोळा । स्वामी निवृत्ति देखिला ॥१॥ कुशावर्ती करूं स्नान । घेऊं निवृत्तिदर्शन ॥२॥ प्रदक्षिणा ब्रह्मगिरी । चौऱ्यांयशींची चुकली फेरी ॥३॥ गंगाद्वारीं स्नान करितां । हरे पय पाप व्यथा ॥ ४ ॥ ऐसीं तीन अक्षरें । एका जनार्दनीं स्मरे ॥ ५ ॥

३४९४ निवृत्तिनाथ तीन अक्षरें । सदा जप करी निर्धारें ॥१॥ पूर्वज उद्धरती साचार । वेदशास्त्रीं हा निर्धार ॥ २ ॥ पुनरपि जन्माची । वार्ता नाहीं नाहीं साची ॥ ३ ॥ अनुभव धरावें वेगीं चित्तीं । एका जनार्दनीं करी विनंती ॥ ४ ॥

३४९५ नाम जपतां निवृत्ति । नयेचि तो पुनरावृत्ति ॥ १ ॥ ऐसा अनुभव जीवा । चराचरीं सर्व देवां ॥२॥ एका जनार्दनीं शरण । निवृत्ति म्हणतां पावन ॥ ३ ॥

३४९६ धन्य स्वामी माझा निवृत्ति । जडलासे चित्तवृत्तीं ॥१॥ अखंडित वाचे । नाम निवृत्ति हेंचि साचें ॥ २ ॥ नामें पावन निवृत्ति । धन्य धन्य तो निवृत्ति ॥३॥ एका जनार्दनीं वाचे । नाम श्रीनिवृत्तीचें ॥

३४९७ आजी धन्य दिन जाला । स्वामी निवृत्ति भेटला ॥ १ ॥ जन्म जरा मरण व्याधी । अवघी तुटली उपाधी ॥ २ ॥ मन इंद्रियासहित । पायीं जडियलें चित्त ॥ ३ ॥ समूळ अहंकार गेला । निवृत्तिनाथ पाहतां डोळां ॥ ४ ॥ एका विनवी जनार्दन । निवृत्तिनामें जालों पावन ॥ ५ ॥

३४९८ नाम निवृत्ति धन्य तो निवृत्ति । देह निवृत्ति पाहतां डोळां ॥१॥ संसार सारासार निवृत्ति । वेद निवृत्ति नाम गातां ॥२॥ शास्त्र निवृत्ति पुराणें निवृत्ति । अंतर्बाह्य कीर्ति निवृत्तिची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाहतांचि निवृत्ती । होय सर्व शांती निवृत्तिनामें ॥४॥

३४९९ कळा तो अभ्यास कासया करणें । निवृत्ति नाम घेणें धणीवरी ॥ १ ॥ धणीवरी नाम घेई पां अंतरीं । निवृत्ति बाह्यात्कारीं होईल तुझी ॥ २ ॥ व्यर्थ खटपट न करी पसार । निवृत्तिनामें साचार जप करीं ॥ ३ ॥ गुह्य गुह्य तुज सांगतों मना । निवृत्तिनाम जाणा हृदयीं धरीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं निवृत्ति नाम वाचे । संसाराचें साचें सार्थक जालें ॥

३५०० अहं सोहं कोहं सांडोनियां देई । निवृत्तीचे पायीं बुडी देखा ॥१॥ अकार उकार मकार निर्धार । सर्व चराचर निवृत्तिरूप ॥२॥ स्थूळ सूक्ष्म कारण महाकारण । तें निवृत्तिनामें जाण सत्य होय ॥ ३ ॥ शुद्ध बुद्ध नाम निवृत्तीचें वाचे । एका जनार्दनीं साचें स्मरे मनीं ॥ ४ ॥

३५०१ उच्चार नामाचा करी पां साचार । आळस निर्धार टाकून देईं ॥ १ ॥ तें नाम सोपें निवृत्तिचें जाणा । कायावाचामना जप करीं ॥ २ ॥ यातना तें कांहीं न पडे व्यसन । नाम उच्चारण निवृत्तिचें ॥३॥ निवृत्ति नामाचा लागलिया छंद । तुटे भवकंद नामें तोची ॥४॥ एका जनार्दनीं निवृत्तिनाम धणी । गाईन मी वाणी सदोदित ॥ ५ ॥

३५०२ साधन कासया श्रम ते करावे । निवृत्ति· नाम गावें सदोदित ॥१॥ तीर्थयात्रा कांहीं नाम मुखें गाई । निवृत्तिनाम डोहीं बुडी दे कां ॥ २ ॥ एका जनार्दनीं निवृत्ति नाम सार । करीं रे उच्चार वेळोवेळां ॥

३५०३ प्रपंच परमार्थ करी कां रे सुखाचा । निरंतर वाचा निवृत्तिनाम ॥ १ ॥ तुटेल बंधन खुंटेल पतन । निवृत्तिनाम जाण जपतांची ॥ २ ॥ योगयागादिक न लगे तीं साधनें । निवृत्तिनामें पेणें वैकुंठीचें ॥ ३ ॥

एका जनार्दनीं न करी साधन। निवृत्ति म्हणतां जाण सर्व जोडे ॥ ४ ॥

३५०४ माझ्या मना तूं करीं पां विचार। नाम निरंतर निवृत्ति जपें ॥ १ ॥ जपतां नामावळी आळस न करी। कोटि जन्म फेरी चुके तेणें ॥२॥ सुखरूप तूं होशील साचार। गर्भाचा उद्धार खुंटे साचा ॥३॥ एका जनार्दनीं सांगेन निर्धार। निवृत्ति उच्चार नाम करीं॥

३५०५ सदोदित मन निवृत्तिचे पायीं। मना आणिक ठायीं जाऊं नको ॥१॥ जपतप कांहीं न करीं साधन। तुटेल बंधन निवृत्तिनामें ॥ २ ॥ तीर्थ व्रत चाड न धरीं अहंकार। नामाचा उच्चार निवृत्ति करीं ॥३॥ तीर्थाचें हें तीर्थ निवृत्ति माहेर। एका जनार्दनीं निर्धार निवृत्तिपायीं ॥ ४ ॥

३५०६ त्र्यंबक शिखरीं जीवनमुक्त तुम्हीं। नाथाचे ते धामीं गुप्तरूप ॥ १ ॥ सर्वकाळ विठ्ठल विठ्ठल पैं वाचे। सार्थक देहाचें येणें करुनी ॥ २ ॥ अखंड नामोच्चार समाधी सोहळा। आणिक नये डोळां आड कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दन म्हणावा आपुला। आसनीं शयनीं त्याला विसरूं नका ॥ ४ ॥

## श्रीज्ञानदेवाची स्तुति.

३५०७ विश्रांतीचें स्थान संतांचें माहेर। तें या भूमीवर अलंकापूर ॥ १ ॥ तये स्थळीं माझा जीवाचा वो ठेवा। नमीन ज्ञानदेवा जाऊनियां ॥२॥ सिद्धेश्वर स्थान दरुशनें मुक्ती। ब्रह्मज्ञान प्राप्ती वटेश्वर ॥ ३॥ चौऱ्यांयशी सिद्धांचा सिद्ध भेटी मेळा। प्रत्यक्ष स्थापिला कल्पवृक्ष ॥ ४॥ तयासी नित्यतां घडतां प्रदक्षिणा। नाहीं पार पुण्य वास स्वर्गीं ॥ ५॥ अमृतमय वाहे पुढें इंद्रायणी। भागीरथी आदिकरूनि तीर्थराज ॥ ६ ॥ ऐशिया स्थळीं समाधी ज्ञानदेव। एका जनार्दनीं ठाव अलंकापूर ॥

३५०८ नमो ज्ञानराजा नमो ज्ञानराजा। निवृत्ति सहजा गुरूवर्या ॥ १ ॥ नमो सोपानदेवा मुक्ताई परेशा। ठाव त्या सर्वेशा कऱ्हातटीं ॥ २॥ समाधी वैभव पाहतां नयनीं। चुकतसे आयणी जन्मव्याधी ॥ ३॥ एका जनार्दनीं म्हणावा आपुला। अंकीत अंकिला दास तुमचा ॥ ४ ॥

३५०९ ज्ञानदेव ज्ञानदेव वदतां वाचे। नाहीं कळिकाळाचें भेव जीवां ॥ १ ॥ जातां अलंकापूर गांवीं। मोक्ष मुक्ति दावी वाट त्यासी ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान जोडोनियां हात। म्हणे मी तुमचा अंकीत ॥ ३ ॥ वाचे वदतां इंद्रायणी। यम वंदितो चरणीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भावें। ज्ञानदेवा आठवावें ॥ ५ ॥

३५१० तुम्हांलागीं हरिहर। येती सत्वर अलंकापुरीं ॥ १ ॥ ऐशी थोरी तुमची देवा। न कळे अनुभवावांचुनी ॥ २ ॥ माझें चित्त समाधान। जाहलें ध्यान धरिताची ॥ ३ ॥ आठवी तुमचे गुण। जाहलें खंडन जन्ममृत्यु ॥ ४ ॥ वारंवार क्षणक्षणा। माथा चरणां तुमाचिया ॥ ५ ॥ भाकितों करुणा वचनीं। शरण एका जनार्दनीं ॥ ६ ॥

३५११ मोक्ष मुक्ति ऋद्धिसिद्धी। पाहतां समाधी ज्ञानदेवा ॥ १ ॥ ऐसा लाभ सांगे देव। ऐके नामदेव आवडी ॥ २ ॥ दरुशनें नासे व्याधी पीडा। ऐसा सवंगडा ज्ञानदेव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मापारी। नाचतसे अलंकापुरीं ॥ ४ ॥

३५१२ जोडोनियां दोन्ही हात। जगीं जाणवितों मात ॥ १ ॥ एकदां जा रे अलंकापुरा। जन्म वेरझारा चुकवा ॥ २ ॥ आवडी सांगा जीवींचे आर्त। माउली पुरविती जाणोनी ॥ ३ ॥ ज्ञानराज माझी माउली। एका जनार्दनाची साउली ॥ ४ ॥

३५१३ जेथें न पुरे काळाचा हात। काय मात सांगूं त्याची ॥ १ ॥ यमधर्म जोडोनी हात। उभेचि तिष्ठत द्वारेंसी ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान लाळ घोटी। ऐशी कसवटी जयाची ॥ ३॥ शरण एका जनार्दनीं। लोळे ज्ञानदेवा चरणीं ॥ ४ ॥

३५१४ कृपाळु उदार माझा ज्ञानेश्वर। तया नमस्कार वारंवार ॥ १ ॥ न पाहे यातीकुळीचा विचार। भक्त करुणाकर ज्ञानाबाई ॥ २ ॥ भलतिया भावें शरण जातां भेटी। पाडितसे तुटी जन्मव्याधी ॥३॥ ज्ञानाबाई माझी अनाथांची माय। एका जनार्दनीं पाय वंदितसे ॥ ४ ॥

३५१५ धन्य जाहलों आतां। अवघी चिंता वारली ॥ १ ॥ आजी देखिलीं पाउलें। सुख जाहलें समाधान ॥ २ ॥ निवारला भाग शीण। पाहतां चरण गोमटे ॥ ३ ॥ भय निवारली खंती। दृष्टी मूर्ति पाहतां ॥४॥ समाधी सोहळा देखिला। एका जनार्दन सुखावला ॥ ५॥

३५१६ कैवल्याचा पुतळा। प्रगटला भूतळा। चैतन्याचा जिव्हाळा ज्ञानोबा माझा ॥ १ ॥ ज्ञानियाचा

शिरोमणी । वंद्य जो का पूज्यस्थानीं । सकळांसी शिरोमणी । ज्ञानोबा माझा ॥ २ ॥ चालविली जड भिंती । हरली चांग्याची भ्रांती । मोक्षमार्गाचा सांगाती । ज्ञानोबा माझा ॥ ३ ॥ रेड्यामुखीं वेद बोलविला । गर्व द्विजांचा हरविला । शांतिबिंब प्रगटला । ज्ञानोबा माझा ॥ ४ ॥ गुरुसेवेलागीं जाण । शरण एका जनार्दन । चैतन्याचें जीवन । ज्ञानोबा माझा ॥ ५ ॥

३५१७ ज्ञानदेव चतुराक्षरी जप हा करी तूं सर्वज्ञा। ज्ञानाज्ञानविरहित ब्रह्मप्रातीची संज्ञा । ज्ञाता ज्ञेय जागे होय ऐसी प्रतिज्ञा । ज्ञानाग्नीनें पापें जळती हे ज्याची आज्ञा ॥१॥ ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणतां ज्ञानदेव देतो । वासुदेव होतो अखंड वदनीं वदे तो ॥धृ. ॥ नररूपें विष्णु अवतरला हा भगवान । नदी नद वापी कूप पाहतां उदक नव्हे भिन्न । नवल हेंचि पशु म्हैसा करितो वेदाध्ययन । नमन करुनी सद्भावें जपतां होय विज्ञान ॥ २ ॥ देवाधीश देव भक्ताप्रति वर दे । देतां वर ब्रह्मांडीं ब्रह्मा आनंद कोंदे । देशिकराज दयानिधि अलंकापुरीं जो नांदे । देशभाषा ज्ञानदेवी गीतार्थ वदे ॥ ३ ॥ वक्ता श्रोता श्रवणेंपठणें पावती समभाव । वर्णू जातां अघटित महिमा होतो जीवशिव । वंदुनी अनन्य एका जनार्दनीं धरी दृढभाव । वर्षती निर्जर ज्ञानदेवनामें पुष्पांचा वर्षाव ॥ ४ ॥

३५१८ ॐनमो ज्ञानेश्वरा । करुणाकरा दयाळा ॥१॥ तुमचा अनुग्रह लाधलों । पावन झालों चराचरीं ॥२॥ मी कळा कुसरी कांहींच नेणें । बोलतों वचनें भाविकां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तुमचा दास । त्याची आस पुरवावी ॥ ४ ॥

३५१९ सर्व सुखाची लहरी । ज्ञानाबाई अलंकापुरी ॥ १ ॥ शिवपीठ हें जुनाट । ज्ञानाबाई तेथें मुगुट ॥ २ ॥ वेदशास्त्र देती ग्वाही । म्हणती ज्ञानाबाई आई ॥३॥ ज्ञानाबाईचे चरणीं । शरण एका जनार्दनीं ॥४॥

३५२० तुमचिया नामस्मरणीं । निशिदिनीं मति लागो ॥ १ ॥ आठव तो मज द्यावा । दुजा हेवा मी नेणें ॥ २ ॥ वारंवार नाम कीर्ती । आठवीन श्रीपति दयाळा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आपुला । पाहिजे सांभाळिला मायबापा ॥ ४ ॥

३५२१ समाधी घेतली आळंदीं । भोंवतीं शोभे सिद्ध मांदी ॥ १ ॥ सन्मुख पुढें अजानवृक्ष । देव येती तेथें साक्ष ॥ २ ॥ कीर्तनगजरीं । नामघोष चराचरीं ॥ ३ ॥ ऐसा सोहळा आनंद । एका जनार्दनीं नाहीं भेद ॥ ४ ॥

३५२२ माझी ऐकावी विनंती । ज्ञानदेवा श्रेष्ठमूर्ती ॥ १ ॥ तुम्ही बैसोनि अंतरीं । मज जागवा निर्धारीं ॥ २ ॥ तुम्ही सत्ताधारी । प्रपंच करावा बाहेरी ॥३॥ श्रेष्ठा ज्ञानदेवा । एका जनार्दनीं आठवा ॥ ४ ॥

३५२३ अहो दयाळे ज्ञानाबाई । आतें माझें तुझ्या पायीं ॥ १ ॥ इंद्रायणीचे तटीं । ज्ञानाबाई वो गोमटी ॥ २ ॥ सकळ मेळा हो सिद्धांचा । ज्ञानाबाई अनुग्रहाचा ॥ ३ ॥ पूर्व पश्चिम देवस्थान । मध्यें ज्ञानाबाई आपण ॥ ४ ॥ ऐसी ज्ञानाबाई ध्याऊं । एका जनार्दनीं शरण जाऊं ॥ ५ ॥

३५२४ श्रीज्ञानदेवें येउनी स्वप्नांत । सांगितली मात मजलागीं ॥ १ ॥ दिव्य तेजःपुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे ॥ २ ॥ अजानवृक्षाची मुळी कंठास लागली । येउनी आळंदी स्थळां काढ वेगीं ॥ ३ ॥ ऐसें स्वप्न होतां आलों अलंकापुरीं । तंव नदीमाझारी देखिलें द्वार ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पूर्वपुण्य फळलें । श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर ॥ ५ ॥

३५२५ आदिनाथ शंकरें केला उपकार । ठेवणें निर्धारें प्रगट केलें ॥ १ ॥ तोचि महाराज निवृत्ति अवतार । केला उपकार जयालागीं ॥ २ ॥ निवृत्तीनें गुज सांगितलें ज्ञानदेवा । होता जो ठेवा गुह्य कांहीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवें केले ठेवणें प्रगट । एका जनार्दनीं नीट मार्ग सोपा ॥ ४ ॥

३५२६ पडले मायावर्ती शुद्धि नाहीं जया । म्हणोनी अवतार तयां धरणें लागे ॥ १ ॥ धन्य गुरु माझा निवृत्ति दयाळ । दाखविलें सोज्वळ पद जेणें ॥ २ ॥ केला उपकार तारिले हे दीन । ज्ञाना ज्ञानांजन घालू नियां ॥ ३ ॥ नेणतीं जाणतीं पडलीं जी भुलीं । तयां शुद्धि केली त्रिअक्षरीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं त्रिभुवनीं प्रताप । उजळिला दीप ज्ञानदेवें ॥ ५ ॥

३५२७ अवतार शिवाचा । निवृत्ति साचा जप करा ॥ १ ॥ श्रीविष्णूचा अवतार । स्वामी माझा ज्ञानेश्वर ॥ २ ॥ सोपानदेव तो निर्धार । ब्रह्मयाचा अवतार ॥ ३ ॥ मुक्ताईचे चरणीं । शरण एका जनार्दनीं ॥४॥

३५२८ आणिक एक चमत्कार। जेव्हां उद्वस अलंकापूर। तेव्हां रंकासी आदर। ज्ञानेश्वरें केला ॥१॥ वाणी होऊनि आपण। प्रत्यक्ष मांडिलें दुकान। अन्न उदक तृप्त जाण। सर्वेही केलें ॥ २ ॥ ऐसें हें कौतुक। आश्चर्य मानिती लोक। एका जनार्दनाचा रंक। चरणारविंदाचा ॥ ३ ॥

३५२९ जाले ज्ञानदेव वाणी। आले सामुग्री घेऊनि ॥ १ ॥ पर्वकाळ द्वादशी। दिली सामुग्री आम्हासी ॥२॥ ज्ञानदेवाच्या चरणीं। शरण एका जनार्दनीं ॥३॥

३५३० उदार भक्त उदार भक्त। त्रैलोकीं मात जयाची ॥ १ ॥ केला भगवद्गीते अर्थ। ऐसे समर्थ तिहीं लोकीं ॥ २ ॥ बोलविला रेडा चालविली भिंती। चांगदेवातें उपदेशिती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं समर्थ ते भक्त। देव त्यांचा अंकीत दास होय ॥ ४ ॥

३५३१ संतांचा महिमा वर्णाया किती। अलक्ष मूर्ति ज्ञानोबा तो ॥ १ ॥ अर्जुना संकट पडतां जड-भारी। गीता सांगे हरि कुरुक्षेत्रीं ॥ २ ॥ तोचि अवतार धरी अलंकापुरीं। ज्ञानाबाई सुंदरी तारावया ॥३॥ गीता शोधोनियां अर्थ तो काढिला। ग्रंथ तो निर्मिला ज्ञानेश्वरी ॥४॥ जगाचा उद्धार ज्ञानाबाई नामें। साधन हें आणिक मेणें न करी कांहीं ॥ ५ ॥ एका जनार्दनीं ज्ञानाबाई नाम। पावेन निजधाम संतांचें तें ॥६॥

३५३२ श्रीज्ञानदेवाचरणीं। मस्तक असो दिवस-रजनीं ॥१॥ केला जगासी उपकार। तारियेले नारी-नर ॥ २ ॥ पातकी दुर्जन हीन याती। चार अक्षरें तयां मुक्ति ॥३॥ संस्कृताची भाषा। मऱ्हाठी निःशेष अर्थ केला ॥ ४ ॥ ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी। अनुभव दावी भाविकां ॥ ५ ॥ एका जनार्दनीं अनुभव। समाधी ठाव अलंकापुरीं ॥ ६ ॥

३५३३ भाव धरूनियां वाची ज्ञानेश्वरी। कृपा करी हरि तयावरी ॥१॥ स्वमुखें आपण सांगे तो श्रीविष्णु। श्रीगीता हा प्रश्नु अर्जुनेसी ॥ २ ॥ तेचि ज्ञानेश्वरी वाचें वदतां साचे। भय कळिकाळाचें नाहीं तयां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संशय सांडोनी। दृढ धरीं मनीं ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥

## श्रीसोपानदेवाची स्तुति.

३५३४ नमो अगणित गुणा देवाधिदेवा। माझ्या सोपानदेवा नमन तुज ॥ १ ॥ संवत्सर ग्राम कऱ्हा-तटीं उत्तम। पुण्यपावन नाम सोपानदेवा ॥ २ ॥ जग तारावया हरिलीला केली। प्रसिद्ध ती झाली सोपन देव ॥ ३ ॥ तुमचा प्रसाद द्यावा माझे हातीं। एका जनार्दनीं विनंति करीतसे ॥ ४ ॥

३५३५ देव आणि भक्त करिती जयजयकार। नाम घोष अंबर गर्जतसे ॥ १ ॥ आनंदें वैष्णव हरिकथा करिती। गाती नाचताती प्रेमछंदें ॥ २ ॥ नारद तुंबर भक्त पुंडलीक। वैष्णव आणिक नाम गाती ॥ ३ ॥ सोपान आनंदें समाधी बैसला। एका जनार्दनीं केला जयजयकार ॥ ४ ॥

३५३६ आनंद समाधी संत भक्त देव। करिती उत्साह संवत्सरीं ॥ १ ॥ गरुड हनुमंत भक्त ते मिळाले। जयजयकार केलें सुरवरी ॥ २ ॥ पुष्पांचा वर्षाव विमानांची दाटी। सोपानदेवा भेटीं येती देव ॥ ३ ॥ तो सुखसोहळा वर्णावया पार। नोहेचि निर्धार माझी मती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सोपान-चरणीं। मस्तक ठेवूनी निवांत राहीन ॥ ५ ॥

३५३७ मन माझें लागो सोपानचरणीं। मस्तक हें धणी पायांवरी ॥ १ ॥ सोपान सोपान जपेन हें नाम। अन्य न करी नेम दुजा कांहीं ॥ २ ॥ वारी पां सांकडे प्रपंच काबाड। घालूनियां आड नाम शस्त्र ॥ ३ ॥ जीवींच्या जीवना माझियां सोपाना। एका जनार्दना अभय द्यावें ॥ ४ ॥

३५३८ सोपानदेव नाम पावन परम। आणिक उत्तम जप नाहीं ॥१॥ माझ्या मना तूं करी कां रे लाहो। सोपान देव ध्यावो हृदयामाजीं ॥ २ ॥ ब्रह्मा अवतार नाम हें सोपान। केलेंसें पावन चराचर ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपानाच्या पायीं। ठेवितसे डोई काया वाचा ॥ ४ ॥

३५३९ मति माझी लागो सोपानचरणीं। रात्रं-दिवस चिंतनीं जप सदा ॥ १ ॥ आणिक न करी कांहीं दुजा नेम धर्म। सर्व सोपें वर्म सोपानदेवा ॥ २ ॥ वेदशास्त्रें भांडती ज्यालागीं कोडें। ते असे उघडे संवत्सर ग्रामीं ॥ ३ ॥ प्रत्यक्ष विष्णूमूर्ति श्री-विठ्ठल देव। समाधीचा गौरव करितसे ॥४॥ करूनी सोहळा समाधी बैसाविला। एका जनार्दनीं पाहिला पुढें मागें ॥ ५ ॥

## श्रीमुक्ताबाईची स्तुति.

३५४० जगत्रय जननी मुक्ताबाई माते। कृपा करी वरदहस्तें मजवरी ॥ १ ॥ आदिनाथें अनुग्रह नाथासी दिधला। नाथें हस्त ठेविला मस्तकीं तुमच्या ॥ २ ॥ बाळलीला केली जगीं विख्याती मिरविली। चांगयाची हरली चौसष्ठ कळा ॥ ३ ॥ कळा पासष्ठावी ज्ञानदेवें दाविली। चांगयाची विराली अहं ममता ॥ ४ ॥ चांगदेव शरण कायावाचामनें। एका जनार्दनीं म्हणे तैशापरी ॥ ५ ॥

३५४१ योगियांचें ध्यान पैं विश्रांति। आदिशक्ति म्हणती तुम्हांलागी ॥ १ ॥ नित्य मुक्त तुम्हीं सर्व जीवां बंध। आकार उकार मकार भेद मावळला ॥२॥ अहं सोहं कोहं तुमचा प्रकार। वेदशास्त्र सार तुम्ही जाणां ॥ ३ ॥ अनुग्रह कृपेचा मजलागी तो द्यावा। एका जनार्दनीं करावा कृपापात्र ॥४॥

३५४२ मुक्तपणें मुक्त श्रेष्ठपणें श्रेष्ठ। सर्वेत्रीं वरिष्ठ देशक्ती ॥ १ ॥ जगाच्या उद्धारा तुमचा अवतार। पावन हे साचार मूढ जन ॥२॥ अज्ञानासी बोध सज्ञानाची शुद्धी। तोडिली उपाधी सर्वत्रांची ॥३॥ लडिवाळ तान्हें एका जनार्दनें। कृपा असो देणें मजवरी ॥

३५४३ नाथाचें आश्रमीं समाधीरहित। मुक्तता मुक्त नाम तुम्हां ॥१॥ महाकल्पवरीं चिरंजीव शरीर। कीर्ति चराचर त्रिभुवनीं ॥ २ ॥ आनंदें समाधी सदा ती उघडी। नामस्मरण घडोघडीं मुखोद्गत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं तुमचें नाम गोड। त्रैलोकीं उघड नामकीर्ती ॥ ४ ॥

३५४४ अजानवृक्षांचीं पानें जाण। जो भक्षूण करील अनुष्ठान। त्यासी साध्य होईल ज्ञान। तेथें संशय नाहीं ॥ १ ॥ ज्ञानेश्वरीं तीन सप्तकें। जो श्रवण करील विवेकें। तो होय ज्ञानी अधिकें। तेथें संशय नाहीं ॥ २ ॥ मनकार्णिका भागिरथी। इंद्रायणीचें स्नान करिती। ते मोक्षपदासी जाती। येथें संशय नाहीं ॥ ३ ॥ अश्वत्थ सिद्धेश्वर। समाधीसी करी नमस्कार। तो पावे मोक्ष पैं सार। येथें संशय नाहीं ॥ ४ ॥ येथींचे वृक्षपाषाण। ते अवघे देव जाण। म्हणे एका जनार्दन। येथें संशय नाहीं ॥ ५ ॥

३५४५ तीन अक्षरें निवृत्ति। जो जप करी अहोरात्रीं। तया सायुज्यता मुक्ती। ब्रह्मस्थिति सर्वकाळ ॥१॥ चार अक्षरें ज्ञानदेव। जो जप करी धरील भाव। तया ब्रह्मपदीं ठाव। ऐसें शिवादि देव बोलिले ॥ २ ॥ सोपान हीं तीन अक्षरें। जो जप करील निर्धारें। तयास ब्रह्म साक्षात्कारें। ज्ञेय सत्वर जाणिजे ॥ ३ ॥ मुक्ताबाई चतुर्विधा। जो जप करील सदा। तो जाइल मोक्ष पदा। सायुज्य संपदा पावेल ॥ ४ ॥ ऐसी हीं चवदा अक्षरें। जो ऐके कर्णविवरें। कीं उच्चारीं मुखद्वारें। तया ज्ञानेश्वर प्रत्यक्ष भेटे ॥ ५ ॥ एका जनार्दनीं प्रेम। जो जप करील धरील नेम। तयास पुनः नाहीं जन्म। ऐसें पुरुषोत्तम बोलिले ॥ ६ ॥

## गीतामहात्म्य.

३५४६ गीतेचें महिमान ऐकावें श्रवणीं। सावधान सज्जनीं द्यावें आतां ॥ १ ॥ जयाचें अंतरीं वसे नित्य गीता। पावन तत्वतां ब्रह्मरूप ॥ २ ॥ गीता म्हणता ऐसें दोन्हींच अक्षरें। पाप तें निर्धारें दिशा लंघी ॥३॥ भगवद्‌गीता पठण सर्वकाळ ज्यासी। मोक्षाची तो राशी मूर्तिमंत ॥ ४ ॥ गीता म्हणता त्यासी काय पुण्य आहे। इतिहास पाहे पुराणींचा ॥५॥ पार्वतीयेप्रती शिवें सांगितलें। अध्यात्म बोलिलें ब्रह्मविद्या ॥ ६ ॥ ब्रह्मरूप त्याचें स्वयें चित्त झालें। बोलणें खुंटलें आहे नाहीं ॥ ७ ॥ नित्य म्हणतां गीता वाचेसी स्मरण। केलिया पठण पुण्य काय ॥ ८ ॥ दोषाचे पर्वत भस्म होती तेणें। गीतेचें पठण केलियानें ॥ ९ ॥ श्रवण पठण गीतेचें पूजन। सर्वही साधन कलियुगीं ॥ १० ॥ पद्मपुराणींचें सांगितलें सार। गीता आहे थोर ब्रह्मविद्या ॥ ११ ॥ सर्वहि पातकें जळोनिया जाती। अर्जुना श्रीपती बोलियला ॥ १२ ॥ गीता अभ्यासिता कळे सारासार। महिमा आहे थोर पठणाचा ॥ १३ ॥ गीता म्हणता आहे पापा प्रायश्चित्ता। मुक्ति सायुज्यता वरी त्यासी ॥१४॥ गीता म्हणता जाण भागिरथी स्नान। पृथ्वीची दान दिधली तेणें ॥ १५ ॥ गीता ध्याई नर सर्वदा तो सुची। सर्वही तीर्थांची महिमा तेथें ॥ १६ ॥ तीर्थक्षेत्रयात्रा देवाचें पूजन। यज्ञयाग दान उद्यापन ॥१७॥ धरणीं पारणीं नित्य उपोषण। पृथ्वीचें भ्रमण निराहारी ॥ १८ ॥ जप तप व्रत नित्य अनुष्ठान। कर्म आचरण उपासना ॥ १९ ॥ पुराण श्रवण वेदशास्त्रीं जाण। सर्वहि साधन घडे त्यासी ॥ २० ॥ ब्रह्मविद्या गीता सर्वांचें साधन। करी जो पठण नित्य काळीं

॥ २१ ॥ एका जनार्दनीं नित्य हेंचि ध्यान । पूर्ण समाधान घडे तेणें ॥ २२ ॥

३५४७ वेदशास्त्र पुराणें अनेक शब्दज्ञानें । भारताचे श्रवणें सर्वस्व जोडे ॥ १ ॥ ते सव्वालक्ष भारत जोडे पैं सुकृत । तेंचि गीते सातशतें प्राप्त होय ॥ २ ॥ ऐशी भगवद्गीता कृष्णार्जुनसंवादता । तेंचि श्रुति फळ लाभे वाचितां ऐक्यभावें ॥ ३ ॥ गीतेचें महानेमें करा श्रवण पठण । ऐसें एका जनार्दन सांगतसे ॥४॥

३५४८ गीतेचें आवर्तन त्याचें ऐका पुण्य । सावध अंतःकरण करूनियां ॥१॥ गीतेच्या सुकृता मौनावला विधाता । हरिहरां तत्त्वतां बोध जाला ॥२॥ वैकुंठापासूनि जाण तेणें बांधलें सदन । त्रैलोकींचें तीर्थाटन घडलें त्यासी ॥ ३ ॥ वाराणशी यात्रा तेणें केल्या अपारा । लक्षलक्षांतरा द्विजभोजनें ॥ ४ ॥ आणिक मेरुसमान वांटिलें सुवर्ण । कोट्यान् कोटी पूजन साधूचें केलें ॥ ५ ॥ एका जनार्दनीं जाण इतुकें घडे महा पुण्य । हें सत्य सत्य वचन गीता आवर्तनीं ॥६॥

३५४९ गीतेचें सुकृत ज्यासी जालें प्राप्त । त्याचे पितर मुक्त सहजचि जाले ॥१॥ नष्ट चांडाळ दुर्जन । परदारीं तस्कर मात्रागमन । त्यासी गीता आवर्तन । श्रवणें मोक्ष होय ॥ २ ॥ सुवर्णस्तेय सुरापान । भूत पिशाच्च राक्षसगण । मित्रद्रोही कृतघ्न । गीता आवर्तनें मोक्ष त्यासी ॥३॥ एका जनार्दनीं गीतार्थी । पठणें श्रवणें सर्वांसी मुक्ती । ऐसें पार्वतीप्रती । शंभु सांगे ॥ ४ ॥

३५५० गीता गीता गीता वाचे जे म्हणती । नाहीं पुनरावृत्ति तया नरां ॥ १ ॥ नित्य नेम वाचे वदतां अक्षरें । भवसिंधु तरे अर्धक्षणीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं जयाचा हा नेम । तया पुरुषोत्तम न विसंबे ॥ ३ ॥

## नामदेवचरित्र.

३५५१ पूर्वी हिरण्यकश्यपाचे कुळीं । नामा जन्मे भूमंडळीं ॥ १ ॥ तेथें हरिभक्ति करी । तेणें तोषला नरहरी ॥२॥ घेउनी अवतार । राखी भक्तासी सादर ॥३॥ भक्ताचा अंकीत । एका जनार्दनीं शरणांगत ॥४॥

३५५२ पुढलीये जन्मीं नामा तो अंगद । भक्तिभावें तोषविला राम सद्गद ॥ १ ॥ परंपरा भक्ति हेचि असे भाक । देऊनियां देवें केलें कौतुक ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्ताचे मनोरथ । स्वयें रमानाथ पुरवितसे ॥ ३ ॥

३५५३ तिसरे अवतारीं नामा उद्धव जन्मला । करुनी कृष्ण दास्यत्व मान्य पैं जाहला ॥ १ ॥ ज्ञान वैराग्य भक्ति कृष्ण सांगे तयासी । तेणें चुकविलें शापबंधासी ॥ २ ॥ भागवत मतितार्थ स्वयें सांगे आपण । कृष्णावेगळा न जाय अर्धक्षण ॥ ३ ॥ या परी दास्यत्व तेथें निकट केलें । एका जनार्दनीं म्हणे वंदू त्यांची पाउलें ॥ ४ ॥

३५५४ द्वारकेहुनी विठु पंढरीये आला । नामयाचा पूर्वज दामाशेटी वहिला ॥ १ ॥ दामा आणि गोणाई नवसी विठूसी । पुत्र देई आम्हा देवा भक्तराशी ॥ २ ॥ तोचि नामदेव जन्म शिंपियाचे कुळीं । भक्तातें पाहुनी वेधला वनमाळी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं परंपरा कथियेली । धन्य धन्य विठू अनाथाची माउली ॥

३५५५ पंच वरुषीं नामा जाहला । छंद विठूचा लागला ॥ १ ॥ जाउनियां राउळांत । तेथें सावकाश बैसत ॥२॥ विठ्ठल हरी वाचे छंद । विठ्ठलें लाविलासे वेध ॥३॥ एका जनार्दनीं सार । मंत्र जपे त्रिअक्षर ॥

३५५६ ऐसे बहु दिन लोटले । दामा नामयासी बोले ॥१॥ जाउनी बैससी राउळीं । सुखें सदा सर्वकाळीं ॥ २ ॥ नाहीं प्रपंचाची घोर । पुढें कैसा हे विचार ॥३॥ नको धरूं छंद मनीं । विनवी एका जनार्दनीं ॥

३५५७ विठूच्या छंदासी । पडतां आहे रे विवसी ॥ १ ॥ संसाराची वाताहात । नामया होसी तूं निवांत ॥ २ ॥ वडिलांची गोष्टी । नामा सांगे जगजेठी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वेधलें मन । ध्यानीं मनीं विठ्ठल पूर्ण ॥ ४ ॥

३५५८ नावडेचि आन । एका विठ्ठलावांचून ॥१॥ नावडे संसार सर्वथा । आवड बैसली पंढरीनाथा ॥२॥ नायके शिकविलें कोणाचें । विठ्ठल विठ्ठल वाचे साचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । विठ्ठलीं लागलेंसे ध्यान ॥

३५५९ दामा सांगे गोणाईसी । पोरें धरिलीसे विवसी ॥ १ ॥ न पाहे संसाराचा छंद । मनीं धरिला तो गोविंद ॥२॥ एका जनार्दनीं सांगे । पुत्र जन्मोजन्मीं न फिटे पांग ॥ ३ ॥

३५६० उभयतां काकुलती येती । नाम्या नको करूं फजिती ॥ १ ॥ आम्हा आलें वृद्धपण । कोण चालवी दुकान ॥ २ ॥ व्यापाराचा नाहीं धाक । सुखें

बैसली तूं देख ॥ ३ ॥ अन्नवस्त्र नाहीं घरीं । एका जनार्दनीं निर्धारीं ॥ ४ ॥

३५६१ कां रे नाम्या नायकशी । म्हणोनि ताडित तयासी ॥१॥ नको जाऊं राऊळास। म्हणोनि कोंडिती तयास ॥ २ ॥ अन्न उदकावीण पिडीती । परी तो विठू ध्याय चित्तीं ॥ ३ ॥ मनीं करितसे खेद । एका जनार्दनीं गोविंद ॥ ४ ॥

३५६२ नामा न जातां राउळासी । विठू जातसे घरासी ॥ १ ॥ अरे नाम्या म्हणोनि बाहे । शिव्या देती बापमाय ॥ २ ॥ आमुच्या पोरासी सवे । येणें लावियेली पाहे ॥ ३ ॥ करूं नेदी संसारकाम । एका जनार्दनीं हा निष्काम ॥ ४ ॥

३५६३ येणें आमुच्या पोरा लाविलासे चाळा । तो हा वेगळा उपाधीसी ॥ १ ॥ प्रपंचाचा धाक नाहीं याचे मागें । फिरतसे अंगें घरोघरीं ॥ २ ॥ घरीं कोंडोनियां ठेवितां नामयासी । आपण त्यापाशीं बैसतसे ॥ ३ ॥ जातो येतो कैसा न पडेचि दृष्टी । एका जनार्दनीं नाटी विठू ऐसा ॥ ४ ॥

३५६४ याचिया छंदा जे पैं लागले । निर्मूलन केलें त्यांचें येणें ॥ १ ॥ बापुडा नारदु लाविली लंगोटी । हिंडे दाटोदाटीं त्रैलोक्यांत ॥ २ ॥ हरिश्चंद्र शिब्री कोण यांची गती । आपण निवांत चित्तीं पाहतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं याचा छंद नाहीं बरा । मैंद हा खरा वाळुवंटीं ॥ ४ ॥

३५६५ घालूनियां फांसा वोढी आपणाकडे । न येतां सांकडें घाली बहु ॥ १ ॥ भजतियाचे निवारी आघात आपण । न भजतिया अकल्याण करी स्वयें ॥ २ ॥ ऐशी याची सवे मागाहुनी आली । एका जनार्दनीं बोली काय बोलों ॥ ३ ॥

३५६६ याचिये संगतीं दुःखाची विश्रांती । संसार वाताहाती होत असे ॥ १ ॥ आम्हीं प्रपंचीक करावा प्रपंच । हा तो निष्प्रपंच होउनी असे ॥ २ ॥ येणें आमुच्या पोरा लावियेला चाळा । आपण निराळा राहतुसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐशियाची माव । न येतां नामदेव कींव भाकीं ॥ ४ ॥

३५६७ म्हणे नामयासी क्षण एक न पहातां । होय माझ्या चित्ता कासाविशी ॥ १ ॥ तुमचा पुत्र तुम्हांसी जैसा प्रिय। तैसा मज होय नामदेव ॥३॥ क्षणोक्षणीं येणें पुरविली पाठी । लाविली लंगोटी आम्हांलागीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वारीतां नायके। येऊनियां सुखें बैसतो घरीं ॥ ४ ॥

३५६८ शिव्या देता यासी हांसतसे सुखें । न मानी कांहीं दुःखें नाम्यासाठीं ॥ १ ॥ ऐसें येणें मोहिलें आमुचिया बाळा । हा कोठोनि काळा आला येथें ॥ २ ॥ एका जनार्दनीं पुरविली पाठी । काय याची गोठी सांगावी ते ॥ ३ ॥

३५६९ आम्ही यासी नवस केला । शेखीं कामा बराच आला ॥ १ ॥ आम्ही पाहूं पुत्रमुख । हा तो दावितसे दुःख ॥ २ ॥ आमुचें जाईल दारिद्र्य जन्माचें । ऐसें मनीं होतें साचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कष्टी । येणें पुरविली पाठीं ॥ ४ ॥

३५७० आमुचिया पोरा नाहीं। बैसावया थारा ॥ १ ॥ ऐसा याचा पायगुण । न मिळे खावयासी अन्न ॥ २ ॥ हाटाबाजारासाठीं जातां । जाऊं नेदीं पैं सर्वथा ॥ ३ ॥ माझा नामा कोठें आहे । नामा नामा म्हणोनि बाहे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं सवें । येणें लावियेली देवें ॥ ५ ॥

३५७१ उठोनियां बैसतां घरीं । नाम्या म्हणोनि हांक मारी ॥ १ ॥ पाहो नेदी कांहीं धंदा । लावियेले आपुल्या छंदा ॥ २ ॥ हा तो जन्माचा भिकारी । सदा हिंडे दारोदारीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं म्हणे । आपुल्यासारिखें केलें येणें ॥ ४ ॥

३५७२ येणें आमुचे पोरा लावियेला चाळा । आपण वेगळा निराळाची ॥ १ ॥ याचें तो बिढार राउळींच असे । आम्हांसी कोपट नसे बैसावया ॥ २ ॥ एका जनार्दनीं किती यासी बोलूं । नायके विठ्ठलु आमुचें तो ॥ ३ ॥

३५७३ नाम्यासी सांगता नायके विचार। येणें फजितखोर केला नामा ॥ १ ॥ घेउनी जवळी बैसे एकांतासी । सुचूं नेदी त्यासी कामधाम ॥ २ ॥ शिकविलें नायकें व्यापारा न जाये । धरिलें मनीं पाय विठोबाचे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं यासी युक्ति काय । पुढें कार्य आहे नामयाचें ॥ ४ ॥

३५७४ मी तो दरिद्री नाहीं जवळी द्रव्य । कैसा तरणोपाय होय आतां ॥१॥ या नामयाचें कैसें होईल लग्न । कोण देईल धन आम्हांलागीं ॥ २ ॥ आमुचा घराचार येणें बुडविला । पोर फितविला काय करूं

॥ ३ ॥ या विठोबाचा येणें धरिलासे छंद । आमुचें जाहलें धिंद जगामाजीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कोणा सांगूं गुज । कोण आहे मज जीवलग ॥ ५ ॥

३५७५ कांताहि अबला नाहीं तिसी ज्ञान । माझें वृद्धपण जाहलें आतां ॥ १ ॥ नवस करुनी हा मागितला नामा । संसार विश्रामा होईल आम्हां ॥ २ ॥ येणें तो मनीं धरिला विठ्ठल । याजकडे नाहीं बोल प्रारब्धेंची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा होय कष्टी । तो दामाशेटी आपुलें मनीं ॥ ४ ॥

३५७६ रात्रंदिवस मनीं करीतसे चिंता । काय हें अनंता कर्म माझें ॥ १ ॥ माझिया अदृष्टीं नाहीं पुत्रसुख । नित्यानित्य दुःख आम्हांलागीं ॥ २ ॥ चालेना व्यापार मज न चले युक्ति । कैशी आतां गति नामयाची ॥ ३ ॥ येणें धरिला छंद विठ्ठलाचा मनीं । एका जनार्दनीं काय करूं ॥ ४ ॥

३५७७ लोकांचे हे पुत्र संसार करिती । आमुची फजिती होत जगीं ॥१॥ सांगतां नायके नाहीं कोणाचा धाक । पंढरीनायक धरिला मनीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं ऐसें ऐकोनि दुःख । मग तो नामा देख काय करी ॥

३५७८ येऊनि राऊळा सांगे विठोबासी । वडील आम्हांसी गांजिताती ॥ १ ॥ उदायिक कापड घेऊनि बाजारासी जातों । परतोनि येतों सवेंचि घरा ॥ २ ॥ व्यापार करावा तो कैसा मी नेणें । जन्मोनि पोसणें तुमचें देवा ॥ ३ ॥ आलें जें भागासी तें करणें लागे । एका जनार्दनीं सांगे गुज देवा ॥ ४ ॥

३५७९ ऐकोनियां देव नाम्यासी बोलत । बाजार करूनि त्वरित येई वेगीं ॥ १ ॥ तुज पाहिल्यावांचून मज नोहे समाधान । नाम्या तुझी आण वहातुसे ॥२॥ लवकरीं नामया यावें परतोनी । ऐसें चक्रपाणी बोलतसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसें बोलोनि सर्वथा । नामा तो तत्वतां घरीं आला ॥ ४ ॥

३५८० त्रिवर्ग भोजना बैसले ते जाण । गोणाई नाम्याकारण बोलतसे ॥१॥ नाम्या किती शिकवितां नायकसी बाळा । विठ्ठलाचा चाळा नको नाम्या ॥२॥ घेउनि कापड जाई बाजारासी । तेणें वडिलांसी समाधान ॥ ३ ॥ नामदेव म्हणे उदईक जाईन । एका जनार्दनीं आण वाहतुसे ॥ ४ ॥

३५८१ प्रातःकाळ झाला । स्नान करूनि नामा आला ॥ १ ॥ जाऊनियां राउळासी । घाली लोटांगण देवासी ॥ २ ॥ जेऊनियां जातों बाजारा । त्वरित येईन माघारा ॥ ३ ॥ ऐसें बोलोनि नामा आला । एका जनार्दनीं जेवला ॥ ४ ॥

३५८२ घेऊनि कापड निघे बाजारासी । आठवी देवासी वेळोवेळां ॥ १ ॥ व्यापार तो कैसा मज नाहीं ठावा । काय तो केशवा करूं आतां ॥ २ ॥ माझी हे फजिती होईल पांडुरंगा । काय या प्रसंगा करूं आतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा नामा कष्टी । होऊनि हिंपुटी चालिलासे ॥ ४ ॥

३५८३ जाऊनियां माळीं नामा तो बैसला । व्यापार तो केला पाषाणासी ॥ १ ॥ देऊनि कापड सुखें आला घरा । सर्व समाचारा विदित केलें ॥ २ ॥ धोंडोबा गणोबा आले ते व्यापारी । तयांचे पदरीं कापड दिलें ॥ ३ ॥ आठ दिवसां ऐवज घेऊनियां जावा । एका जनार्दनीं पहावा हस्त त्याचा ॥ ४ ॥

३५८४ आठ दिवसांची ऐवजाची बोली । आहे ते नेमिली नामा सांगे ॥ १ ॥ सांगोनियां नामा राउळासी आला । वृत्तांत सांगितला विठोबासी ॥ २ ॥ कापड विकिलें धोंडोबा गणोबांसी । ऐवज आठवे दिवशीं आपुला घ्यावा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सर्वांचा तो आत्मा । सांगतांचि नामा देव हांसे ॥ ४ ॥

३५८५ देव म्हणे नाम्या व्यापार बरवा केला । दामाशेटी तुला रागावती ॥ १ ॥ जाहले आठ दिवस जाई तूं लौकरी । द्रव्य घेउनी झडकरी यावें मागें ॥ २ ॥ वंदूनि श्रीविठ्ठला घरीं आला नामा । त्याला बोले दामा जाई आधीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं आठ दिन जाहले । नाम्या जाय वहिलें ऐवज आणी ॥४॥

३५८६ येउनी नामदेव बोले धोंडोबासी । ऐवज आमुचा आम्हांसी द्यावा आतां ॥ १ ॥ तुमचा तो करार जाहलासे पूर्ण । ऐवज आमुचा जाण आम्हां द्यावा ॥ २ ॥ परी तो प्रत्यक्ष धोंडोबा दगड । अचेतन मूढ जीव नाहीं ॥ ३ ॥ धोंडोबा गणोबा एके ठायीं केले । कांहीं तुम्हीं वहिलें बोलानाची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं घेउनी धोंडोबासी । आपुले घरासी नामा आला ॥ ५ ॥

३५८७ आणुनी धोंडोबा कोंडियला घरीं । मात सांगे हरीजवळी नामा ॥१॥ दामशेटी गेला आपुले कारणा । मागें आणिले जागा धोंडोबासी ॥ २ ॥

देव म्हणे नाम्या हें बरें नाहीं केलें । एका जनार्दनीं बोले काय तेव्हां ॥ ३ ॥

३५८८ धोंड्यासी व्यापार कोणी नाहीं केला । आज म्यां ऐकिला वृत्तांत तुझा ॥ १ ॥ उभयतां ऐशी बोलती पैं गोष्टी । तंव दामशेटी घरीं आला ॥ २ ॥ गोणाईनें सर्व सांगितलें त्यासी । पुत्र व्यापारासी उत्तम जाहला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐका त्याचा व्यापार । बुडविलें घर सर्व आपुलें ॥ ४ ॥

३५८९ ऐवजा निमित्त धोंड्यासी आणिलें । कोंडोनि घातिले घरामाजीं ॥ १ ॥ ऐकतांचि दामा क्रोधयुक्त जाहला । पुसे गोणाईला नाम्या कोठें ॥ २ ॥ बैसला जाउनी काळ्याचे शेजारीं । फजिती ती थोरी मांडिली तेणें । ३ ॥ एका जनार्दनीं ऐकोनियां मात । दामा आला धांवत राउळासी ॥ ४ ॥

३५९० येवोनियां रागें नाम्यासी बोलत । व्यापार बहुत निका केला ॥ १ ॥ चतुर व्यापारी जाहलासी सुजाण । आतां आम्हांकारण काय कमी ॥२॥ तुझिये व्यापारें भोपळा हा घ्यावा । भिकेसी बरवा उपाय असे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दामा बोले क्रोधें । नामा तो सद्‌वदें उत्तरें देत ॥ ४ ॥

३५९१ मालधनी घेउनी आलों असे घरा । तुम्हीं कां दातारा शिव्या देतां ॥ १ ॥ द्रव्याचा मालक आणूनियां घरीं । ठेविला निर्धारें काय भय ॥ २ ॥ चलावें घरासी घ्यावी द्रव्यराशी । न देतां गणोबासी घेऊन येतो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं दामा पुढें आला । नामा विठोबाला कींव भाकी ॥ ४ ॥

३५९२ जन्माचा पोसला तुझा मी पामर । काय आतां विचार केशिराजा ॥ १ ॥ घरासी पैं जातां ताडतील मज । आतां तुझी लाज तुज देवा ॥ २ ॥ देव म्हणे नाम्या न करी कांहीं चिंता । एका जनार्दनीं सर्वथा नुपेक्षी देव ॥ ३ ॥

३५९३ नाम्या झडकरी जाईं तूं घरासी । चिंता ती मानसीं करूं नको ॥१॥ तुझा छंद आहे माझिये मानसीं । तूं वेगीं घरासी जाय आतां ॥ २ ॥ एका जनार्दनीं वंदुनी चरण । नामा आला जाण घरालागीं ॥

३५९४ दामाशेटी म्हणे ऐवजाचा धनी । आणिला तो मजलागुनी दावी आतां ॥ १ ॥ वंदुनी चरण म्हणे चला आंत। जगीं हें प्रख्यात करूं नका ॥ २ ॥ एका जनार्दनीं बोलोनियां मात । धरियेला हात वडिलांचा ॥

३५९५ जाउनिया आंत धोंड्यासी दाविलें । सुवर्ण तें जाहलें अंतर्बाह्य ॥ १ ॥ तुमचें तें द्रव्य मोजोनियां घ्यावें । उरलें तें धाडावें गणोबासी ॥२॥ एका जनार्दनीं पाहूनियां दामा । आलिंगिला नामा सद्‌गदीत ॥

३५९६ नामयासी बोलतसे दामशेटी । कोणाचे कर्णीं गोठी सांगू नको ॥१॥ आपणासी देवें द्रव्य हें दिधलें । तूं कां म्हणसी वहिलें द्यावें तया ॥२॥ एका जनार्दनीं भक्ताचा महिमा । वाढवणें पुरुषोत्तमा आपुले काजा ॥ ३ ॥

३५९७ आपुल्या काजासाठीं । धांवें भक्तांचियां पाठीं ॥ १ ॥ ऐसा कृपाळु उदार । विटे उभा कटीं कर ॥ २ ॥ एका जनार्दनीं शरण । भक्तांचे मनोरथ पुरतीं जाण ॥ ३ ॥

३५९८ नाम्याचें कारण देवें नवल केलें । धोंडोबाचें जाहले सुवर्ण तें ॥ १ ॥ गोणाई दामाशेठीतें आनंद पैं जाहला । म्हणती भला भला नामा आमुचा ॥२॥ न कळे लाघव देवाचें सर्वथा । म्हणती नामा आमुचा कर्ता जाहला आतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं द्रव्याचिया आशा । विसरलें सर्वेशा पांडुरंगा ॥ ४ ॥

३५९९ घरचा वृत्तांत पाहुनी नयनीं । नामा तेचि क्षणीं राउळीं गेला ॥ १ ॥ पायांवर भाळ ठेवूनी तत्वतां । म्हणे पंढरीनाथा सांभाळिलें ॥ २ ॥ जन्मांचा पोसणा दास तुझा दीन । तें त्वां वचन सत्य केलें ॥३॥ एका जनार्दनीं दासाचें धांवणें । देवावीण कोण करील तें ॥ ४ ॥

३६०० मायबाप माझा सोयरा जिवलग । तूंचि पांडुरंग मजलागीं ॥ १ ॥ माझियाकारणें पुरविलें धन । केलें माझें संरक्षण मायबापा ॥२॥ म्हणोनिया डोई ठेवियली पायीं । प्रेमभरीत पाहीं नामा जाहला ॥३॥ एका जनार्दनीं देवाचा एकुलता । नामयापरतां कोणी नाहीं ॥ ४ ॥

३६०१ नामयाचें घर मोडलें एके दिनीं । मजूर तयालागुनीं मिळेचिना ॥ १ ॥ हिंडतां भागले मजूर न मिळे । आले ते सकळ गृहालागीं ॥२॥ पांडुरंग तेथें होऊनि मजूर । शाकारिलें घर नामयाचें ॥३॥ एका जनार्दनीं उणें नेदी भक्ता । आपण तत्त्वतां अंगें राबे ॥

३६०२ शाकारभारे मस्तकीं वाहिलें । घर शाकारिलें नामयाचें ॥१॥ दामशेटी पुसे कोठील तूं कोण । येरू म्हणे जाण वस्ती येथें ॥ २ ॥ बिऱ्हाड तरी माझें

राउळाभीतरीं । विठूजी निर्धारी नाम माझें ॥ ३ ॥ तुमच्या नामयाची ममता मज असे फार । एका जनार्दनीं निर्धारें ऋणी त्याचा ॥ ४ ॥

३६०३ तुम्हांसी कारण पडलिया सांगा । नाम्याचे प्रसंगा सेवा तुमची ॥ १ ॥ संदेह मानसी नका धरूं सर्वथा । माझी आण तत्त्वतां तुम्हांलागीं ॥२॥ नामयाचें सांकडे वारीन मी वेगें । तुम्हीं कांहीं अंगे शिणूं नका । एका जनार्दनीं वैकुंठीचा राणा । सांगतसे खुणा अंतरींच्या ॥ ४ ॥

३६०४ नाम्याचे लग्नासाठीं । चिंता करी दामाशेटी ॥ १ ॥ नाहीं आपुले जवळीं धन । कैसें होईल याचें लग्न ॥ २ ॥ रात्रंदिवस गोणाईसी । निद्रा न ये पैं नेत्रांसी ॥३॥ माझ्या नामयाचें लग्न । एका जनार्दनीं करील कोण ॥ ४ ॥

३६०५ सर्वांचा तो आत्मा कळली तया खूण । नामयाचें लग्न करावें तें ॥ १ ॥ जाऊनिया स्वयें देवें माव केली । सोयरीक आणिली नामयासी ॥ २ ॥ लग्नाचें कारण मेळविलें देखा । एका जनार्दनीं ऐका नवल चोज ॥ ३ ॥

३६०६ दामाशेटीचा कारकून । स्वयें झाला नारायण ॥ १ ॥ लग्नतिथि धरली निकी । नोहे कोणा पैं ओळखी ॥ २ ॥ विठ्ठलशेटी ऐसें नाम । एका जनार्दनीं प्रेम ॥ ३ ॥

३६०७ कोणासी न कळे हा पंढरीचा राणा । केली विवंचना लग्नाची ते ॥ १ ॥ सहपरिवार आपण निघाला । लग्नाचा सोहळा करीतसे ॥२॥ एका जनार्दनीं करूनि पाणिग्रहण । निघाला आपण तेथोनियां ॥

३६०८ प्रातःकाळ झालिया पाहती नरनारी । नोवरा आणि नोवरी व्याहीहीना ॥ १ ॥ विठ्ठलशेटी नाहीं परिवारासहित । राजाई मनांत शोक करी ॥ २ ॥ एका जनार्दनीं राजाईचा भाव । कां हो देवाधिदेव ठकाविलें ॥ ३ ॥

३६०९ न देतां दरुशन गेला चक्रपाणी । राजाई तो मनीं दुःख करी ॥ १ ॥ न कळे कवणासी अघटित करणी । करुनी चक्रपाणी कां हो गेला ॥२॥ एका जनार्दनीं राजाईचा हेत । नित्य आठवीत पांडुरंग ॥३॥

३६१० लग्नाचा सोहळा यथासांग जाहला । नामा वेगीं आला पंढरीसी ॥ १ ॥ येऊनियां सर्व पाहती संपदा । येथें तो आपदा न मिळे आन ॥ २ ॥ एका जनार्दनीं माता आणि पिता । राजाईचा तत्त्वतां शिण करिती ॥ ३ ॥

३६११ उभयतांचें समाधान राजाईनें केलें । माझें तो घडलें उत्तम कार्य ॥ १ ॥ मनासी तुम्ही नका करूं दुःख । विठ्ठलाचें सुख मज जाहलें ॥ २ ॥ एका जनार्दनीं राजाईची वाणी । ऐकतांचि मनीं संतोषले ॥

३६१२ ऐसे कांहीं दिन लोटलेसे जाण । परिसा कारण देवाचें तें ॥ १ ॥ नाम्यासी चौघे पुत्र पैं जाहले । नाम तें ठेविलें विठ्ठलरायें ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्ताचा सोहळा । दाखवितसे डोळा उघड ऐका ॥

३६१३ नारा महादा गोंदा विठा चवघे पुत्र जाहले । आनंदें लागले हरिभजनीं ॥ १ ॥ नित्यकाळ वाचे विठ्ठलाचा छंद । आठविती गोविंद वेळोवेळां ॥ २ ॥ एका जनार्दनीं काया वाचा मन । वेधलेसें जाण विठ्ठलचरणीं ॥ ३ ॥

३६१४ नामयाची आपदा संसारीं होत । परी न सोडीच हेत पांडुरंगीं ॥ १ ॥ म्हणोनिया प्रीय देवासी पैं जाहला । सांभाळीं वेळोवेळां नामयासी ॥ २ ॥ एका जनार्दनीं एकविधा भक्ती । तेथें राबे मुक्ति निशिदिनीं ॥ ३ ॥

३६१५ एकाविध वाचे नामयासी छंद । पैं नोहे भेद आन कांहीं ॥ १ ॥ संसारयातना दुःखाचे डोंगर । परी देवाचा विसर नाहीं मनीं ॥ २ ॥ म्हणोनियां देव धांवे मागें मागें । सुख त्याचेसंगे देवा होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्त सुखासाठीं । हिंडे पाठोपाठीं देवराव ॥ ४ ॥

३६१६ नामयाची जनी दासी पैं म्हणती । भावें तो श्रीपती वश केला ॥ १ ॥ दासीचा हा शब्द पूर्वापार आहे । पुराणीं हा पाहे निवाडा तो ॥ २ ॥ एका जनार्दनीं नामयाची दासी । प्रिय ते देवासी जाहली असे ॥ ३ ॥

३६१७ नामा आणि दामा बाप लेक दोन्ही । राजाई गोणाई सासु सुना ॥ १ ॥ नारा महादा गोंदा विठा चवघे पुत्र । जन्मले पवित्र हरिभक्त ॥ २ ॥ आउबाई लेकी नाउबाई बहिणी । तिहीं चक्रपाणी वेधियेला ॥ ३ ॥ लाडी आणि येसी गोहिना साकराई । एका जनार्दनीं पाही वंशावळी ॥ ४ ॥

३६१८ नामयाची कांता धुणें धुया गेली । परिसा भागवताची आली कन्या तेथें ॥ १ ॥ उभयतां बैसोनि केलासे एकांत । आपदा आमुची होत संसारांत ॥२॥ तुम्हासी तों देवेंद्रव्य दिले फार । वस्त्र अलंकार शोभताती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोलोनिया गोठी । होत असे कष्टी राजाई ते ॥ ४ ॥

३६१९ येऊनियां मातेपाशीं सांगे वृत्तांत । नामयाची होत आपदा घरीं ॥ १ ॥ आपुला परीस देऊं क्षणभरी । आपदांते बुरी करूं त्याची ॥ २ ॥ एका जनार्दनीं करूनि विचार । परीस तो साचार घेऊनि आली ॥ ३ ॥

३६२० येऊनियां घरा बोले राजाईस । या परिसें सुवर्णासी करी आतां ॥ १ ॥ आजाचिये दिन ठेवी आपुले घरीं । आपदा ती हरी प्रपंचाची ॥ २ ॥ सरलिया काम देई मजलागीं । म्हणोनियां वेगीं गृहां आली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं झाली ऐशी मात । नामयासी श्रुत केली नाहीं ॥ ४ ॥

३६२१ येऊनियां घरा नामदेव पाहे । आजी दिसताहे विपरीत ॥ १ ॥ राजाई तो पुढें येऊनियां बोले । देवें नवल केलें आपुले घरीं ॥ २ ॥ जातां चंद्रभागे परीस सांपडला । आपुला तो गेला दैन्यकाळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐकोनियां मात । क्रोधें पैं संतप्त मनीं नामा ॥ ४ ॥

३६२२ राजाईसी तेव्हां म्हणतसे नामा । दैन्य काळ आम्हां नाहीं नाहीं ॥ १ ॥ आम्हीं हरिदास कुबेर भांडारी । संपदा ती थोरी घरीं वसे ॥ २ ॥ कृपावंतें मज नाहीं उपेक्षिलें । आम्ही कां वहिले दैन्यवाणे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं बोलोनियां मात । गेला राउळांत तेव्हां नामा ॥ ४ ॥

३६२३ जातांना राउळीं परीस मागे नामा । पाहूं द्या तो आम्हां कैसा आहे ॥ १ ॥ राजाईनें त्वरें आणूनियां दिला । नाम्यानें घेतिला सव्य करीं ॥ २ ॥ जाऊनि चंद्रभागे टाकूनिया दिला । नामदेव आला राउळासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मस्तक चरणीं । ठेवूनि विनवणी करी नामा ॥ ४ ॥

३६२४ आमुचिये घरीं । परीस पाहिला श्रीहरी ॥ १ ॥ आवडीनें नामा सांगे । पांडुरंग हांसू लागे ॥ २ ॥ आमुचा दैन्यकाळ । गेला म्हणती सकळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मात । नामा देवासी सांगत ॥

३६२५ देव म्हणे नाम्या परीस कोठें आहे । पाहूं लवलाहि दावी मज ॥ १ ॥ हांसूनियां नामा पांडुरंगा सांगे । परीस चंद्रभागे टाकियेला ॥ २ ॥ ऐसे प्रेमभरीत बोलताती दोघे । तों राजाई ती मागे त्वरें आली ॥ ३ ॥ घालूनि दंडवत देवासी आदरें । नामयासी उत्तरें बोलतसे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मागावया परिस । परिसा घरास त्वरित आला ॥ ५ ॥

३६२६ येऊनियां परिसा बोले राजाईशी । आमुचा परीस मजसी देई बाई ॥ १ ॥ राजाई तंव म्हणे घेऊनि नामदेवें । गेले ते स्वभावें राउळासी ॥ २ ॥ तुम्ही बसा घरीं मी जातें राउळीं । म्हणोनियां वेगीं आली राउळासी ॥ ३ ॥ घालूनियां नामा दंडवत देवा । सांगितला भाव सर्व मनींचा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नामदेव बोले । परिसा टाकियेलें चंद्रभागें ॥५॥

३६२७ राजाई येऊनियां घरीं । नमस्कार करी नामदेवा ॥ १ ॥ परीस देणें झडकरी । परिसा उभा असे द्वारीं ॥ २ ॥ ऐकतांचि ऐशी मात । आले भीमेसी धांवत ॥ ३ ॥ पुंडलिकासी नमस्कार । केला जयजयकार नामघोष ॥ ४ ॥ एका जनार्दनीं स्नान । नामा करितसे जाण ॥ ५ ॥

३६२८ करूनियां स्नान नामा बाहेरी आला । परिसाचा मेळा घेउनि हातीं ॥ १ ॥ घेऊनि परीस सांगे परिसासी । तुझा निश्चयेसी वोळखून घेई ॥ २ ॥ ऐकतांचि ऐसें नामयाचें बोलणें । परिसा कर जोडून विनवीतसे ॥ ३ ॥ ऐसा आनंद सोहळा होतसे संपूर्ण। आनंद निमग्न जाहले ॥ ४ ॥ एका जनार्दनीं आनंद पैं जाहला । आनंदानें गेला परिसा घरीं ॥ ५ ॥

३६२९ धन्य धन्य नामदेव । सर्व वैष्णवांचा राव ॥ १ ॥ प्रत्यक्ष दाविली प्रचीत । वाळुवंटीं परीस सत्य ॥ २ ॥ कवित्व केलें शतकोटी तारिलें जीव कल्पकोटी ॥ ३ ॥ देव जेवीं सर्वे । ऐशी ज्याची देवासवें ॥ ४ ॥ धन्य धन्य नामदेवा । एका जनार्दनीं चरणीं ठेवा ॥ ५ ॥

३६३० जन्मकाळीं देवें प्रतिज्ञा पैं केली । शतकोटी लिहिली काव्यरचना ॥ १ ॥ चौदाजणी त्याचे काव्य तें केलें । निरभिमानें वंदिले संतजन ॥ २ ॥ लाडका तो नामा समाधी महाद्वारीं । समदृष्टी हरि वरी

त्याची ॥ ३ ॥ पाळोनियां लळा समाधी ठेविला । एका जनार्दनीं झाला आनंदमय ॥ ४ ॥

३६३१ लडिवाळ नामा विठोबाचा दास । तयाचे चरणां दंडवत ॥१॥ भक्त शिरोमणी लाडका डिंगर । आवडता फार विठोबाचा ॥ २ ॥ कवित्व करुनी तारिले सकळ । निरभिमानी निर्मळ सदोदित ॥३॥ नामयांवांचुनी कांहीं नेणे तो नामा । तयाचा तो प्रेमा पांडुरंगीं ॥ ४ ॥ ऐसिया संतांशीं नमन माझें भावें । एका जनार्दनीं जावें ओवाळुनी ॥ ५ ॥

३६३२ पूर्वीं जो प्रल्हाद तोचि जाणा अंगद । तोचि उद्धव प्रसिद्ध कृष्णावतारीं ॥ १ ॥ कलीमाजीं जाणा नामदेव म्हणती । लडिवाळ श्रीपती लळा पाळी ॥२॥ तीर्थयात्रा सर्व केल्या से उद्धार । सर्व त्याचा भार चालविला ॥३॥ लडिवाळ नामा विठ्ठलचरणीं । एका जनार्दनीं नमन त्यातें॥ ॥ ४ ॥

## गोराकुंभारचरित्र.

३६३३ सत्यपुरी ऐसें म्हणती तेरेसी । हरिभक्तराशी कुंभार गोरा ॥ १ ॥ नित्य वाचे नाम आठवी विठ्ठल । भक्तिभाव सबळ हृदयामाजीं ॥ २ ॥ उभयतांचा प्रपंच चालवी व्यापार । भाजनें अपार घडितसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐका सविस्तर । पुढील प्रकार आनंदानें ॥ ४ ॥

३६३४ प्रेमयुक्त भजन करी सर्वकाळ । विठ्ठल विठ्ठल बोल वाचे सदा ॥ १ ॥ मृत्तिका भिजवी भाजनाकारणें । प्रेमयुक्त नाचणें नाम मुखीं ॥ २ ॥ एके दिनीं कांता ठेवुनी जवळी बाळ । उदकालागीं उतावीळ जाती जाहली ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मूल तें रांगत । आलें असे त्वरित मृत्तिकेजवळी ॥ ४ ॥

३६३५ लाऊनियां नेत्र सदा समाधिस्त । आठवी अनंत हृदयामाजीं ॥ १ ॥ नाहीं देहावरी रूपीं जाहला मग्न । नाचे उडे पूर्ण विठ्ठलनामें ॥ २ ॥ अज्ञान तें बाळ धरीत ते पायां । चित्त देवराया समरसलें ॥३॥ एका जनार्दनीं नाचतां समरसें । बाळ पायांसरसें । चिखलीं आलें ॥ ४ ॥

३६३६ नेणवेचि बाळ कीं हे मृत्तिका । मन गुंतलेंसें देखा पांडुरंगीं ॥ १ ॥ मृत्तिकेसम जाहला असे गोळा । बाळ मिसळला मृत्तिकेंत ॥ २ ॥ रक्तमांस तेणें जाहला गोळा लाल । नेणवे तात्काळ गोरोबासी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उदक आणुनी कांता । पाहे तंव तत्त्वतां बाळ न दिसे ॥ ४ ॥

३६३७ येवोनियां जवळीं बोभाट तो केला । धरुनी हाताला पुसती जाहली ॥ १ ॥ ठेवूनियां बाळ जीवनालागीं गेलें । तुम्ही काय केलें बाळ माझें ॥२॥ परी तो समाधिस्थ नायकेचि बोल । वाचे गाय विठ्ठल प्रेमभरित ॥ ३ ॥ नाचे आनंदानें गाय नामावळी । एका जनार्दनीं बोली कोण मानी ॥ ४ ॥

३६३८ अट्टाहास्य शब्द करूनि कांता रडे । आहा मज येवढें बाळ होतें ॥ ५ ॥ जळो तें भजन आपुलेनि हातें । बाळ मृत्तिकेंत तुडविलें ॥२॥ ऐकोनियां शब्द जाहला पैं सावध । एका जनार्दनीं क्रोध आला मनीं॥

३३३९ अहा गे पापिष्टे भजन भंगिलें । ताडणालागीं घेतलें काष्ठ हातीं ॥ १ ॥ नेणवेचि बाळ आपण तुडविलें । भजनाचें वाटलें दुःख मनीं ॥ २ ॥ घेऊनियां काष्ठ तांतडी धांवला । कां गे त्वां भंगिला नेम माझा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मारूं जातां घाय । तेव्हां कांता बोले काय गोरोबासी ॥ ४ ॥

३६४० स्पर्श कराल मजसी तरी विठोबाचि आण । ऐकतांचि वचन मागें फिरे ॥ १ ॥ जनमुखें सर्व कळला समाचार । परी अंतरीं साचार व्यग्र नोहे ॥ २ ॥ हृदयीं ध्यातसे रखमाईचा पती । निवारिली भ्रांती संसाराची ॥ ३ ॥ एका जनार्दनीं चालविला नेम । परी पुरुषोत्तम नवलपरी ॥ ४ ॥

३६४१ संसाराचा हेत राहिला मागें । अंगसंग वेगें नोहे कां ते ॥१॥ एकांतीं राहाती परि न लिंपे कर्मा । वाउगाचि प्रेमा वरी दावी ॥ २ ॥ माझ्या विठोबाची घातलीसे आण । नहोचि संतान वंशासी या ॥३॥ एका जनार्दनीं ऐसें चालत आलें । परी स्त्रियेनें केलें नवल देखा ॥ ४ ॥

३६४२ आपुल्या पित्यासी तिनें बोलाविलें । जाहलें तें कथिलें वर्तमान ॥ १ ॥ पतीचा संकल्प नोहे अंगसंग । राहिला उद्योग प्रपंचाचा ॥ २ ॥ महाजन शेटे सर्व मेळविले । विचारी बैसले कुलाळ सर्व ॥ ३ ॥ धाकुटी ती मूल आपण पैं द्यावी । संतती चालवावी गोरोबाची ॥ ४ ॥ एका जनार्दनीं करुनी विचार । विवाह प्रकार केला दुजा ॥ ५ ॥

३६४३ विधियुक्त पाणिग्रहण पैं जाहलें । जामातालागीं वहिलें काय बोलें ॥ १ ॥ तुम्ही हरिभक्त

दुजा नाहीं भाव । चालवा गौरव उभयतां ॥ २ ॥ एक एकपणें न धरावें भिन्न । पाळावें वचन वडिलांचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सांगूनियां मात । घातली शपथ विठोबाची ॥ ४ ॥

३६४४ गोरियानें केला मनासी विचार । हाचि एक निर्धार बरा जाहला ॥ १ ॥ लिगाड तें आपोआप मावळलें । विषयांचें जाहलें तोंड काळें ॥ २ ॥ विठ्ठलें करुणा केली सर्व परी । तारियेलें भवपुरीं संसाराचे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं खुंटला व्यवहार । नाहीं आन विचार प्रपंचाचा ॥ ४ ॥

३६४५ उपवर ती कांता जाहली असे जाण । गोऱ्याची वासना नाहीं कामीं ॥ १ ॥ विठोबाची आन घालोनि निरविलें । उभयतां तें वहिलें पाळा तुम्ही ॥ २ ॥ सांगूनियां वृद्ध आपुल्या ग्रामा गेला । पुढें काय विचार जाहला परियेसा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सुखरूप तिघे । कामधाम वेगें करिताती ॥ ४ ॥

३६४६ ऐसे बहुत दिन तयांसी लोटले । उभयतां कळलें गुज त्यांचें ॥ १ ॥ स्त्रियेचें चरित्र न कळे ब्रह्मादिकां । उभयतां विचार देखा करिताती ॥ २ ॥ दोघी दो बाजूस करिती शयन । कर उचलोनि धरिती हृदयीं ॥ ३ ॥ सावध होउनी पाहे कर चोरी गेला । एका जनार्दनीं त्याला शिक्षा करूं ॥ ४ ॥

३६४७ चोरासी खंडन करावें हाचि धर्म । आणीक नाहीं वर्म दुजें कांहीं ॥ १ ॥ माझ्या विठोबाची आज्ञा पैं मोडिली । शपथ पाळिली नाहीं दुष्टे ॥ २ ॥ घेऊनियां शस्त्र केलें पैं ताडण । खंडिले कर जाण उभयतां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करितां सुपरीत । तों घडले विपरीत स्त्रियेसी हें ॥ ४ ॥

३६४८ कामाचिया आरो घडला प्रकार । राहिला वेव्हार प्रपंचाचा ॥ १ ॥ भाजन घडणें राहिलें सर्वथा । पडियेली चिंता अन्नवस्त्रा ॥ २ ॥ उदरानिमित्त कष्ट बहु करिती । निर्भय तो चित्तीं असे गोरा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं न सोडीच भजन । पाहूनि नारायण काय करी ॥ ४ ॥

३६४९ रुक्माईसी सांगे एकांतासी गोष्टी । गोऱ्याची कसवटी पांडुरंग ॥ १ ॥ माझिया कारणें कर तोडियेले । सांकडें पडिलें मज त्याचें ॥ २ ॥ माझिया भक्ताची मज राखणें लाज । म्हणोनियां गुज तुज सांगितलें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उभयतां निघाले । सांगातें घेतलें गरुडासी ॥ ४ ॥

३६५० वेष पालटोनी देव कुंभार पैं जाहले । गरुडासी केलें गाढव तेव्हां ॥ १ ॥ येऊनियां तेरें पुसतसे लोकां । कुलाळ तो देखा गोरा कोठें ॥ २ ॥ आम्हीं परदेशी जातीचे कुंभार । नाम विठु साचार मज म्हणती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं गोरियाचिया वाडा । आलासे उघडा देवराव ॥ ४ ॥

३६५१ पाहूनियां गोरा दंडवत घाली । म्हणे कोण स्थळीं वस्ती तुम्हां ॥ १ ॥ पंढरीसी राहतों परदेशी आम्हीं । नाम तरी स्वामी विठू माझें ॥ २ ॥ सांगतों कांता आहे बरोबरी । परिवार तरी एवढाची ॥ ३ ॥ ऐकोनियां मात गोरा संतोषला । रहावें कामाला माझे घरीं ॥ ४ ॥ विठु म्हणे हाचि हेतु धरुनी आलों । एका जनार्दनीं जाहलों निर्भय आतां ॥ ५ ॥

३६५२ राहिलासे हरि लक्ष्मीसहित घरीं । दैन्य सहपरिवारी पळोनी गेलें ॥ १ ॥ उठोनि पहाटे गरुडा खोगीर घाली । मृत्तिका वाहिली वरी आणि ॥ २ ॥ भाजनें तीं पात्रें नानापरी करी । नाटकी मुरारी चाळक जो ॥ ३ ॥ ऐसें सुखरूप राहिलें निर्धारें । न कळे विचार गोरोबासी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पुढें काय जाहलें । सर्व दैन्य गेलें गोरोबाचें ॥ ५ ॥

३६५३ आषाढीची यात्रा आला पर्वकाळ । निघाला संतमेळ पंढरीसी ॥ १ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई । आणीकहि अनुभवी संत बहु ॥ २ ॥ येतां त्याची मार्गें तेरेसी ते आले । तिहीं पुशियेलें गोरोबासी ॥ ३ ॥ गांवांतील जन सांगती प्रकार । गोऱ्याचा विचार जाहला सर्व ॥ ४ ॥ परदेशी कुंभार पंढरीचा विठा । राहिलासे वांटा करूनिया ॥ ५ ॥ ज्ञानदेवें खूण जाणितली मनीं । एका जनार्दनीं पाहूं त्यातें ॥ ६ ॥

३६५४ इकडे रुक्माईशी सांगे करुणाकर । चला पैं सत्वर पंढरीये ॥ १ ॥ गरुडासहित वेगें पैं निघाले । पूर्ववत आले पंढरीये ॥ २ ॥ एका जनार्दनीं भक्तांचा कैवारी । ऐसें करुनी हरि उभा विटे ॥ ३ ॥

३६५५ गोरियाच्या वाडा संत प्रवेशले । गोरियानें देखिले दृष्टी सर्व ॥ १ ॥ देउनी आसन बैसविलें संतां । तंव ज्ञानदेव पुढतां होउनी बोले ॥ २ ॥ कर ते तुटले प्रपंच चाले कवणे परी । येरू म्हणे वांटेकरी पंढरीचा ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणती तयासी बोलवा । तंव ते

लगबगा धांवे कांता ॥ ४ ॥ स्त्रियेसहित नाहीं तेथें कुंभकार विठा। एका जनार्दनीं वाटा गेला कवणें ॥५॥

३६५६ येऊनियां कांता सांगे गोरियासी। सहकुटुंबीं विठा नाहीं ॥ १ ॥ मृत्तिका आणायाची नाहीं जाहली वेळ। गेलासे समूळ न पडे दृष्टी ॥ २ ॥ ऐकतांचि पैशी ज्ञानदेवें गोष्टी। गोरियासी कंठीं धरियेलें ॥ ३ ॥ परदेशी नोहे पंढरीराणा। केलेसें कारणा कार्य तुझें ॥ ४ ॥ आमुतें न भेटे जाहला असे गुप्त। एका जनार्दनीं मात प्रगटली ॥ ५ ॥

३६५७ ज्ञानदेव म्हणे भाजनें आणवी। तंव तीं देखिलीं अवघीं दिव्यरूप ॥ १ ॥ उचलोनि करीं घेतलें भाजन। विठ्ठल विठ्ठल जाण शब्द निघे ॥ २ ॥ सकळ ते संत गोरियासी म्हणती। धन्य तुझी भक्ति त्रैलोक्यांत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाक सिद्ध जाहला। बैसलासे मेळा भोजनासी ॥ ४ ॥

३६५८ सारुनी भोजनें कीर्तनीं बैसले। थोरीव वर्णिले विठोबाचें ॥ १ ॥ प्रातःकाळीं स्त्रियांसहित तो गोरा। निघालासे त्वरा पंढरीये ॥ २ ॥ संतसमुदाव सवें पैं असती। पावले त्वरित भीमातीरीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करूनियां स्नान। घेतलें दरुशन पुंडलिकाचें ॥ ४ ॥

३६५९ संत ती मंडळी महाद्वारां आली। मूर्ति देखियेली विटेवरी ॥ १ ॥ चरणांवरी माथां ठेवितां भक्तजन। आनंदले लोचन पाहुनी भक्त ॥ २ ॥ महाद्वारीं नामा कीर्तनीं उभा ठेला। मिळालासे मेळा सकळ संत ॥ ३ ॥ सद्गदीत कंठ कीर्तन करितां। एका जनार्दनीं सर्वथा भक्त होती ॥ ४ ॥

३६६० कीर्तनाचा गजर होत आनंदानें। तंव नामा म्हणे उच्चारा नाम ॥ १ ॥ टाळी बाहूनी हातें मुखीं वंदा नाम। ऐकता सकाम भक्त जाहले ॥ २ ॥ गोरियाचे मना संकोच वाटला। कर नाहीं आपुल्याला टाळी वाहतां ॥ ३ ॥ वाटलेंसें दुःख नयनीं नीर आले। एका जनार्दनीं बोले नाममुखीं ॥ ४ ॥

३६६१ मुखीं नाम वदे करें बाहे टाळी। कीर्तनाचे मेळीं सद्गदीत ॥ १ ॥ भक्ताचा महिमा वाढवी श्रीपती। कीर्तनीं गोरयाप्रती कर आले ॥ २ ॥ टाळी पिटुनियां नामाचा उच्चार। करीत साचार गोरा तेव्हां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पुरला मनोरथ। मूळहि कीर्तनांत देखियेलें ॥ ४ ॥

३६६२ गोरियाची कांता आनंदली चित्तीं। वंदिली माता ती रुक्मादेवी ॥ १ ॥ रुक्मादेवी म्हणे न करा कांहीं चिंता। शपथ सर्वथा मुक्त केली ॥ २ ॥ ऐसें भक्तचरित्र ऐकतां कान। होतसे नाशन महापापा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पुरले मनोरथ। रामनाम गर्जत आनंदेसी ॥ ४ ॥

३६६३ कुलाळ वेशांत गोरा कुंभार। कीर्ति चराचर भरियेलें ॥१॥ प्रतिज्ञा करुनी कर कमळ तोडी। भाजनेंहि घडी श्रीविठ्ठल ॥ २ ॥ नाम निरंतर वदतसे वाचे। प्रेम मी तयाचें काय वानूं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्तांचा कैवारी। भाजनें तीं करी घरीं त्याच्या ॥ ४ ॥

## सांवतामाळीचरित्र.

३६६४ भक्ताचे मनोरथ पुरवी नारायण। अवतार म्हणोन धरी स्वयें ॥ १ ॥ नामदेवाप्रती जाहला अभिमान। लाडिकाचि पूर्ण मी तो भक्त ॥ २ ॥ कौतुक दावावया भाव देव करिती। नामदेवाप्रती काय बोले ॥ ३ ॥ एका जनार्दनीं परिसा सादर। देव भक्ताचा परिकर संवाद तो ॥ ४ ॥

३६६५ देव म्हणे नाम्या जातो मी पळोनी। काढी पां धुंडोनी मजलागीं ॥ १ ॥ ऐसें म्हणोनी देवें घातलीसें कास। निघे हृषिकेश पाहूनी नाम्या ॥ २ ॥ क्षणीं होय गुप्त क्षणीं तो प्रगट। पाठी लागे स्पष्ट नामदेव ॥ ३ ॥ दूर गेलिया देव माळा पुष्पें टाकी खूण। ती तें ओळखून नामा येत ॥४॥ एका जनार्दनीं भक्ताचा कैवारी। अभिमान बोहरी करीतसे ॥ ५ ॥

३६६६ संसारीं असोनि जीवन्मुक्त भक्त। आलासे धांवत तयां भेटी ॥१॥ समाधिसुखें तल्लीन वाचे नारायण। लाविले नयन उन्मळीत ॥२॥ माथां ठेवुनी हात केला सावधान। वदे नारायण सांवत्यासी ॥३॥ येतां तुझे भेटी चोर मागें आला। लपवीं मजला लवलाही ॥ ४ ॥ एका जनार्दनीं ऐकोनियां बोल। सांवत्यानें सखोल दृष्टि केली ॥ ५ ॥

३६६७ त्रिभुवनामाजीं चाले ज्याची सत्ता। तो म्हणे तत्त्वतां चोर आला ॥ १ ॥ तयाचिया भेणें पळोनियां आलों। बोलतां हे बोल नवल चोज ॥ २ ॥ एका जनार्दनीं दावूनी लाघव। सांवत्याचें वैभव प्रगट करी॥

३६६८ देव म्हणे सांवत्या लपवी मजला । उशीर बहु जाहला येईल चोर ॥ १ ॥ लपावया स्थान नसे दुजें आन । उदर फाडून लपविला ॥ २ ॥ भक्ताचे उदरीं बैसे नारायण । कृपेचें सिंहासन घालूनियां॥३॥ एका जनार्दनीं नामा तेथें आला । माग तो वहिला नाहीं कांहीं ॥ ४ ॥

३६६९ पाहुनी दशादिशा नामा रडूं लागे । कां बा पांडुरंगें ऐसें केलें ॥ १ ॥ चरणाचा माग येथवरी आला । येथें गुप्त जाहला करूं काय ॥ १ ॥ कां हो केशिराजा अवकृपा केली । माझी सांडी सांडिली देवराया ॥ ३ ॥ एका जनार्दनीं रडतां नामदेव । पाहि लेंसें तेव्हां सांवत्यानें ॥ ४ ॥

३६७० येवोनी जवळीं कुर्वाळिलें वदन । चालिलें स्फुंदन सद्गदीत ॥१॥ सांवता म्हणे नाम्या कां रे रड-तोसी। काय जाहलें तुजसी सांग मज॥१॥ नामा म्हणे देव पळोनियां आले । येथें गुप्त जाहले न कळे कांहीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं करितसे खेद । कां हो तो गोविंद दुरी गेला ॥ ४ ॥

३६७१ बैसोनी निकटीं सांवत्याजवळीं । कां हो वनमाळी न दिसे मज ॥१॥ कां हें कर्म आड आजीं आलेंसे वाड । न दिसे उघड विठू माझा ॥२॥ कोणत्या लिगाडें पाडिलीसे तुटी । कां हो जगजेठी अंतरला ॥३॥ मजवीण क्षण तयासी कंठेना । एका जनार्दनीं मना कठीण केलें ॥४॥

३६७२ आजी मी तयाचे न पाहतां चरण । देईन आपुला प्राण याचि क्षणीं ॥ १ ॥ जाणोनि निर्धार सांवता बोले त्यासी । हृदयनिवासी आत्माराम ॥२॥ अभिमानें नाडलें प्रपंचीं भागले । ते या श्रीविठ्ठलें उद्ध रिले ॥ ३॥ नामदेव तुज तंव नाहीं अभिमान । मग कळली खूण अंतरांत ॥४॥ एका जनार्दनीं सद्गद होउनी । मिठी घाली चरणीं सांवत्याच्या ॥५॥

३६७३ सर्व भावें तुज आलों मी शरण । भेटवी निधान वैकुंठींचें ॥ १ ॥ तयावीण प्राण कासावीस होती । भेटवी श्रीपती मजलागीं ॥ २ ॥ तुम्ही संत उदार सोइरे निजाचे । दरुशन तयाचें मज करवा॥३॥ एका जनार्दनीं ऐशी भाकी कींव । अभिमान सर्व दुरी गेला ॥४॥

३६७४ निरभिमानें नामयासी देखिलें। सांवत्यानें वहिलें धरिलें पोटीं ॥ १ ॥ सांवत्याचे अंतरीं झळके पीतांबर । नाम्यानें सत्वर ओळखिलें ॥ २ ॥ धरूनियां दशी काढिला बाहेर । जाहला जयजयकार तया वेळीं ॥३॥ एका जनार्दनीं पाहूनियां देव । मिठी घाली नामदेव चरणासी ॥ ४ ॥

३६७५ घालूनियां मिठी करीत स्फुंदन । न सोडी चरण विठोबाचे ॥१॥ कां रे मायबापा लावियली सवें । ऐशी त्वां कां माव केली आतां ॥ २॥ नामयासी देवें करें उचलिलें । प्रीतीनें आलिंगिलें तये वेळीं ॥३॥ एका जनार्दनीं सज्जनांचा दास । म्हणोनि चरित्रास कथियेलें ॥ ४ ॥

३६७६ माळियाचे वंशीं सांवता जन्मला । पावन तो केला वंश त्याचा ॥१ ॥ त्याजसवें हरी खुरपूं लागे अंगें । धांउनी त्याच्या मागें काम करी ॥ २ ॥ पीतां-बर कास खोवोनी माघारी । सर्व काम करी निजसंगें ॥३॥ एका जनार्दनीं सांवता तो धन्य । तयाचें महि-मान न कळे कांहीं ॥४॥

## चोखामेळा चरित्र.

३६७७ अमृतासी रोग स्वर्गीं जाहला पाही । अम-रनाथा तेंही गोड नसे ॥१॥ नारदातें प्रश्न करी अमर-नाथ । शुद्ध हें अमृत कोठें होय ॥ २ ॥ सांगे तये-वेळीं ऐका हें भूतळीं । सांगेन नव्हाळी तुम्हापाशीं ॥३॥ पंढरी वैकुंठ आहे भूमीवरी । पुंडलिकाचे द्वारीं देव उभा ॥ ४ ॥ अनाथाचा नाथ विटेवरी उभा । एका जनार्दनीं गाभा लावण्याचा ॥ ५ ॥

३६७८ पंढरीची मात सांगे नारद मुनी । संतांचे कीर्तनीं नाचे देव ॥ १ ॥ नामाच्या गजरें नाचताती संत । सुरवराचा तेथें काय पाड ॥ २ ॥ तिहीं लोकीं पाहतां ऐसें नाहीं कोठें । कैवल्याची पेठ पंढरीं देखा ॥ ३ ॥ ऐकोनि अमरनाथ संतोषला मनीं । एका जना-र्दनीं नारद सांगे ॥ ४ ॥

३६७९ तया ठायीं जातां शुद्ध होय अमृत । नारदें ही मात सांगितली ॥१॥ तेव्हां एकादशी आली सोम-वारीं । विमान पंढरीं उतरलें ॥ २ ॥ अमृताचे ताट घेउनी आला इंद्र । गर्जती सुरवर जयजयकारें ॥ ३ ॥ देव सुरवर आले पंढरीसी । नामा कीर्तनासी उभा असे ॥४॥ सुरवर देव बैसले समस्त । कीर्तनीं नाचत नामदेव ॥५॥ एका जनार्दनीं देव कीर्तनासी । सांडोनीं स्वर्गासी इंद्रराव ॥ ६ ॥

३६८० ऐसा समुदाव चंद्रभागे तीरीं । तेव्हां आपुले घरीं चोखा होता ॥ १ ॥ एकादशी व्रत करिती दोघे जण । उपवास जाग्रण निशीमाजीं ॥ २ ॥ तीन प्रहर जाहले उपवास जाग्रण । चोखा मेळा म्हणे स्त्रीरी तेव्हां ॥ ३ ॥ तुझिया घरासी येऊं पारण्यासी । सांगून मजशीं गेला देव ॥ ४ ॥ एका जनार्दनीं चोखा करी करुणा । तेव्हां नारायणा जाणवले ॥ ५ ॥

३६८१ चोखामेळियाची ऐकोनि करुणा । चालिले भोजना देवराव ॥ १ ॥ नामदेवासहित अवघे गण-गंधर्व । इंद्रादिक देव चालियले ॥ २ ॥ जाउनी नारद सांगे चोखियासी । तुझीया घरासी येती देव ॥ ३ ॥ ऋद्धिसिद्धि आल्या चोखियाचे घरीं । जाहली ते सामोग्री भोजनाची ॥ ४ ॥ रुक्मिणीसहित आला पंढरीनिवास । चोखियाचे घरास आलें वेगीं ॥ ५ ॥ चोखामेळा गेला पुढें लोटांगणीं । उचलोनि देवांनीं आलिंगिला ॥ ६ ॥ एका जनार्दनीं ऐसा चोखियाचा भाव । आणोनि आले देव भोजनासी ॥ ७ ॥

३६८२ चोख्याचे अंगणीं बैसल्या पंगती । स्त्री ते वाढिती चोखियाची ॥ १ ॥ अमृताचें ताट इंद्रें पुढें केलें । शुद्ध पाहिजे केलें नारायणा ॥ २ ॥ तेव्हां देवराय पाचारी चोखियासी । शुद्ध अमृतासी करी वेगीं ॥ ३ ॥ चोखामेळा म्हणे काय हें अमृत । नामा-पुढें मात काय याची ॥ ४ ॥ अमृताचें ताट घेउनी आला इंद्र । हे तु गा पवित्र करीं वेगीं ॥ ५ ॥ चोखि-याची स्त्री चोखा दोघेजण । शुद्ध अमृत तेणें केलें देखा ॥ ६ ॥ चोखियाच्या घरीं शुद्ध होय अमृत । एका जनार्दनीं मात काय सांगूं ॥ ७ ॥

३६८३ बैसल्या पंगती चोखियाचे अंगणीं । जेवी शारंगपाणी आनंदानें ॥ १ ॥ नामदेवासहित अवघे गणगंधर्व । इंद्रादिक देव नारद मुनी ॥ २ ॥ चोखा-मेळा म्हणे दोन्ही जोडोनि कर । मज दुर्बळा पवित्र केलें तुम्हीं ॥ ३ ॥ यातीहीन मी अमंगळ महार । कृपा मजवर केली तुम्हीं ॥ ४ ॥ पंढरीचे ब्राह्मण देखतील कोण्ही । बरें मजलागुनी न पाहती जन ॥ ५ ॥ ऐसें ऐकोनिया हांसती सकळ । आनंदें गोपाळ हास्य करी ॥ ६ ॥ विडे देऊनियां देवें बोळविलें । इंद्रादिक गेले स्वस्थानासी ॥ ७ ॥ पंढरीचे ब्राम्हणीं चोख्यासी छळिलें । तेंहि संपादिलें नारायणें ॥ ८ ॥ एका जनार्दनीं ऐशी चोखियाची मात । जेवी पंढरी-नाथ त्याचे घरीं ॥ ९ ॥

३६८४ चोखियाची भक्ति कैसी । प्रेमें आवड देवासी ॥ १ ॥ ढोरें वोढी त्याचे घरीं । नीच काम सर्व करी ॥ २ ॥ त्याचे स्त्रीचें बाळंतपण । स्वयें करी जनार्दन ॥ ३ ॥ ऐसी आवड भक्ताची देखा । देव भुलले तया सुखा ॥ ४ ॥ नीच याती न मनीं कांहीं । एका जनार्दनीं भुलला पाहीं ॥ ५ ॥

३६८५ दामाजीचा भाव पाहुनी श्रीहरी । अना-मिक निर्धारीं स्वयें जाला ॥ १ ॥ घेऊनिया द्रव्य निघाला तो हरी । जोहार जोहार करी बादशहातें ॥ २ ॥ द्रव्य देऊनियां रसीद घेतली । भक्ताची माउली विठाबाई ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भक्ताचिया-साठीं । धांवे पाठोपाठीं भक्तांचिया ॥ ४ ॥

भाग ] उपदेशपर रूपकें. [ ५ वा

## जोशी.

३६८६ मी परात्पर जोशी । होरा सांगेन संत-सभेसी । माझें वचन मानाल मानसीं । तरी दृढ निश्चयेसी परिसावें नाना ॥ १ ॥ ऐका ऐका राजेश्री । प्रजा मोकदम कारभारी । शेटे महाजन चौधरी । बरवी नगरी बसविली नाना ॥ २ ॥ राहाटकाटाचे दिवस आले । जागे सांडोनि फेरे केले । मागें कष्ट बहुत भोगिले । शेवटीं फळ आलें नरदेहासी नाना ॥ ३ ॥ या पांढरींत मागें बहुत आले । जोशी भविष्य सांगो गेले । त्यांचें तुम्ही नाहीं ऐकिलें । दंग झाले थोर थोर नाना ॥ ४ ॥ काळाचे फेरे होऊन गेले । थोर नगराचे संहार झाले । साच मान माझ्या बोलें । जोडी करा आत्मयुक्ति नाना ॥ ५ ॥ घेडा मांगाच्या मान्यता झाल्या । उत्तम योनी भिकेस लागल्या । तें ऐका मज जोशाच्या बोला । उत्तम ते पडले अधमा घरीं नाना ॥ ६ ॥ नांव काय पाटिलबुवाचें । पुढील भविष्य सांगेन साचें । वचन ऐक मज जोशाचें । तेणें तुझें समाधान होईल नाना ॥ ७ ॥ एका बाय-कोची संगत घडली । तेणें तुझी महिमा बुडाली । जुनी भाकर सरोनि गेली । गांठ पडली दरिद्राची नाना ॥ ८ ॥ तिचा संग टाकी दादा । बरवा चालेल तुझा धंदा । साच मानी माझ्या शब्दा । सदा सर्वदा सुखी होसी नाना ॥ ९ ॥ नांव काय आवाजीचें । कल्याण होईल बयाचें । पुढील भविष्य सांगेन साचें । तरी तुझें तेणें समाधान होईल बये ॥ १० ॥ बया

आणिक एक सांगतों मात । टाक कुबुद्धि पाहूं दे हात । फार बरेपणा दोघांत । स्त्रीपुरुषांत बहू गोडी बये ॥ ११ ॥ विघ्न दिसतें धरले आळीं । नाडूं पाहती थोर थोर बळी । पूर्वपुण्यें जाहली होळी । फेरेपाळी चुकेना गे बये ॥ १२ ॥ दहा लेंकुरें जाहली आई । परी तूं एकाचें सुक देखिलें नाहीं । आतां येथून पुढें पाही । सुख होईल तें ऐक बये ॥१३॥ एका लेकींची सासुरवाडी अपार सुख देखशील पुढी । माझें वचन नको मानूं लबाडी । सत्य तुजपुढें बोलतो बये ॥१४॥ कुबुद्धीची कांचोळी । लेऊं नको काळी चोळी । दुष्टगत झाली सगळी । ऐक नाम तुझें बये ॥ १५ ॥ विकल्प उडदांचा मेळावा । द्वैत तांब्याचा पाउड द्यावा । संदेह तेलाचा घट भरावा । ओवाळून द्यावा मज जोशाकारणें बये ॥ १६ ॥ विषम बुद्धीचें नाणें । ओंवाळून द्यावें मज जोशाकारणें । आपुलें निःशेष बरें करणें । तरी दाम करणें वेगेंसी बये ॥१७॥ साच मानी माझ्या बोला । येथूनिया तुझा शनैश्वर गेला । जन्मगुरूचा पालट जाला । संग घडला साधूसंतांचा बये ॥ १८॥ पूर्ण जोशी जनार्दन। सूर्यवंश रघुनंदन। तयासी अनन्य जातां शरण । वंश उद्धरण तयाचा बये॥

३६८७ संचित बरवें लिहिलें । भाग्यवंता भाग्य चांगलें । कन्यापुत्र पोट पिकलें । वेल मांडवा जाईल ॥ १ ॥ फार दैव दुणावेल । पोटभर दोंद सुटेल । गाईम्हशीनें वाडे भरतील । उत्कृष्ट दुभतें होईल ॥२॥ आहे सदैव तुमचा वाडा । रोग जाईल तुमची पीडा। सज्ज जोड्या बसावया घोडा । विघ्नें जातील देशोधडा ॥ ३ ॥ यांत भुलूं नका जाईल नेट । रामनाम भजे झटपट । आहार निद्रा काम लटपट । लोभाची भारी खटपट ॥ ४ ॥ मायेचा बाजार हाट । पुढें अवघड घाट नीट । दुरून आलों मी या पेठ । सांगतो तुम्हांला नीट । चित्त देऊनि ऐका खुणा गा ॥ ५ ॥ आया बाया सांगतों नाणीं । तुम्ही अवघिया धरा ध्यानीं। उठतां बैसतां शयनीं। कांडितां दळण कांडीना ॥ ६ ॥ माता पिता बंधु बहिणी। बाळ भ्रतार सुखाची मांडणी । अंतकाळीं येईना कोणी । एकले जावें स्वर्गासी ॥ ७॥ कोणी संत येतील घरा । त्यांचा आदरमान करा । अतीत अभ्यागत येती द्वारा । त्याला कांहीं तरी दान करा । हृदयीं आठवा पंढरीनाथा ॥ ८ ॥ लगबगा जलदीला मोल । देहगांवचा होरा जाईल । हे डोळे गांवीं दिवस मावळेल । कान पूरचे कपाडे लागतील ॥ ९ ॥ तोंडापूर ओस पडेल। दांतवाडीचा मार्ग मोडेल। नाक गांवीं गळती लागेल। सुरतीचा डौल बिघडेल ॥ १० ॥ मग सरेल अवघी हवा । कांहीं विचार आपुल्या जिवा । कांहीं घडली नाहीं सेवा । शुद्ध हरपेल गाळ वेडगांवा । बैसली जागा उठवेना ॥ ११ ॥ जेणें आंधळे भोळे अज्ञान । यांना गुरुसंत तो ज्ञान । दिला मंत्र तो घर बुडवून । आपुल्या स्वहिताकारणें । साठ सहस्र ऋषीजन दुर्वास श्रेष्ठ भोजन॥१२॥ ह्या कंसाचे घरीं। सहा महिने अवद भारी । मिष्टान्न नानापरी । अंतीं गेले यमपुरीं। सेवकिला दुर्योधना ॥ १३ ॥ महा संकटें आलीं थोर। यमपुरीची ऐका खबर । ऐशीं हजार कोस चौफेर। तेथें नरककुंड अघोर । भारी दुःखाचे डोंगर । समर्थ राजा इंद्र गरिबाचा पाड काय बरें ॥ १४ ॥ तळमळ व्यथा भोगिती । ऐकावयाची गती वडील करुणा भाकिती । वैश्य कल्याण चिंतिती । दया नाहीं उपाय चालेना गा ॥ १५ ॥ सांगतो अनुसंधान । हित होईल तुमचें कारण । संतांचे संगतीनें पंगती पवित्र पावन ॥ १६ ॥ द्वारीं तुळसीवृंदावन । एकादशी व्रत नेमानें। हरिदासाचे संगतीनें । हरिकथा पुराण श्रवणा ॥ १७ ॥ कोटी कुळ्या होतील पावन। वैकुंठीं त्यांचे पेण। एका जनार्दन सांगतो प्रसन्न । नाम श्रेष्ठ पतीतपावन गा॥

३६८८ माझा शकुन ऐका भाई । चार वेद देती ग्वाही । सहा शास्त्रें वदती पाही । तेचि धरुनी रहा ॥१॥ सावध नाना सावध नाना । समज कांहीं तरी धरी मना ॥ धृ० ॥ नका जाऊं आड वाटे । तेथें लागती चपेटे । दांत विचकूनी पडसी नेटें । उगेच पहा ॥ २ ॥ गेले सरले मागील फेरे । आतां दिवस आले बरे । विघ्न नाहींसें जाले सारें । सावध रहा ॥ ३ ॥ एका जनार्दनींचा जोशी । होरा सांगतो संतांसी । ऐकता जातील मोक्षपदासीं । नायकतां पडतील चौऱ्यांयशी । हेंवि पहा ॥ ४ ॥

३६८९ येथूनि पुढें बरें होईल। भक्ति सुखेल दोंद वाढेल । फेरा चौऱ्यांयशीचा चुकेल । धनमोकाशी ॥१॥ मी आलो रायाचा जोशी। होरा ऐका दादांनो ॥ धृ ॥ मनाजी पाटील देहगांवचा । विश्वास धरूं नका त्याचा । हा घात करील नेमाचा । पाडील फशीं ॥ २ ॥ वासना बायको शेजारीण । झगडा घाली मोठी दारुण । तिच्या पायीं नागवण । घर बुडविसी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कंगाल जोशी ।

होरा सांगतो लोकांशीं । जा शरण सद्गुरूसी । फेरा चुकवा चौऱ्यांयशी ॥ ४ ॥

३६९० आम्हीं अलक्षपूरचे जोशी । शकुन सांगूं निश्चयेंसी । तेणें चुकती चौऱ्यांयशी । मी निर्गुण-पुरींचा जोशी ॥ १ ॥ होरा ऐका दादांनो । होरा ऐका दादांनो ॥ धृ. ॥ नका जाऊं मना मागें । थोर थोरा जाहले दगे । मी बोलत नाहीं वाउगें । सावध रहा दादांनो ॥ २ ॥ वासना वाईट ही बा थोर । पुरविले लहान थोर । फिरती चौऱ्यांयशीं लक्ष घरें । पडाल फशी दादांनो ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जोशी । सांगेन शकुन सर्वत्रांसी । रामनाम वाचेसी । तेणें तरती विश्वासी दादांनो ॥ ४ ॥

## बाळ संतोष.

३६९१ अलक्ष लक्ष पाहवेना । तें कोणाचे ध्यानीं बैसेना । योगी ध्याती जया ध्याना । तें आणी पां रे आपुल्या मना ॥ १ ॥ बाबा बाळसंतोष । बाळसंतोष ॥ धृ. ॥ अनुहात शब्द निराळा । सोहं सोहं त्याची कळा । तें नये ध्यान मना सकळा । ऐशी अगम्य त्याची कळा ॥ २ ॥ जुनी टाका देहाची अंगीं । भाव धरा भक्तिसंगीं । विरेल देहपण अंगाचे अंगीं । मिथ्या प्रपंच जाईल भंगी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मागे दान । पूर्ण परिपूर्ण कळली खूण । सबाह्य कोंदला जनार्दन । देहींच विदेही जाहला पूर्ण ॥ ४ ॥

३६९२ आम्हीं परात्पर देशी । कोणी नोळखती आम्हांसी । टाकून आलों संतांपाशीं ॥ १ ॥ बाबा बाळसंतोष ॥ धृ. ॥ जीर्ण स्वरूपाचा शेला । विषय भोगितां विटला । तो मज द्यावा दाते वहिला ॥ २ ॥ ऐक्यत्वाचें बिरडे जोडी । त्रिगुणासी कसणी फेडी । जुनी कांचोळी रोकडी ॥ ३ ॥ पूर्णत्वाची पुरणपोळी । स्नेहावरील तेलवरी । प्रबोध लाडु तयावरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मागतां दान । जिताचे जाणें जीवपण । शेखी दिले शिवपण ॥ ५ ॥

३६९३ चौदेहांची घेउनी दीक्षा । आम्हीं मागूं कोरान्न भिक्षा । अलक्ष्य अनुलक्ष्या । प्रत्यक्ष जनार्दन आम्हां साक्षा ॥ १ ॥ बाबा बाळ संतोष ॥ धृ. ॥ देहीं असून होऊं विदेही । कामक्रोध बांधूं पायीं । आशा मनीषा करूं दिशा दाही । मद्मत्सर उडवूं भाई ॥ २ ॥ प्रपंचाची लावुनी राख । तोडूं जन्ममरणांचा पांग । एका जनार्दनीं अनुराग । अक्षय संग संतांचा ॥ ३ ॥

३६९४ चिन्मय चिद्रुप अक्षय डोळां । दिसे रूपें-रूप आगळा । आगमां निगमां न कळे कळा । तोचि लक्षालक्ष लक्षु निराळा ॥१॥ बाबा बाळसंतोष । बाळ-संतोष बाबा बाळसंतोष ॥ धृ. ॥ दृश्य अदृश्य आटलें । द्वैताद्वैत तें फिटलें । ज्ञेय ज्ञाता ज्ञानें भेटलें । सद्गुरुचरण लक्ष लक्षिलें ॥ २ ॥ दया क्षमा शांती विरक्ती । मावळली व्यक्ताव्यक्ती । उडोनि गेली सकळ भ्रांती । जाहली संसाराची शांती ॥ ३ ॥ दान दिधल्या नुरेची कर्म । निवारला भवभ्रम । जाहलों निःसंग निष्काम । एका जनार्दनीं विश्राम ॥४॥

३६९५ अद्वैत द्वैतातीत लक्ष । जीव शिव तेथें साक्ष । तें आम्हां दिसे प्रत्यक्ष । गेलें ध्येय ध्यान लक्ष ॥ १ ॥ बाबा बाळसंतोष बाळसंतोष० ॥ धृ. ॥ सोहं कोहं विराला नाद । गेला भेद तुटला छंद । अंगोअंगीं वेधला वेध । तेणें जाहलों बोधाबोध ॥२॥ नुरेची कर्मांची वासना । नाठवे द्वैताची भावना । छंदें छंद सद्गुरुचरणा । काया वाचा शरण जाणा ॥३॥ ध्यानें ध्यान अखंड जाहलें । भुक्तीमुक्तीचे फेरे खुंटले । एका जनार्दनीं ऐसें केलें । जन्ममरणाचें बीज भाजलें ॥ ४ ॥

३६९६ आम्ही परात्पर देशी । कोणी नोळखती आम्हांसी । टाकूनी आलों संतांपाशीं । वेगीं देई निजसेवेंसी ॥ १ ॥ गवरी बाळसंतोष ॥ धृ. ॥ दो हातांचें द्वैत दान । नेघे कोरडें कोरान्न । नमगे नमगे हें साधन । अविट न विटे तें देई परमान्य ॥ २ ॥ क्षीरसागरींची क्षीर धारी । विवेक गुळाची गुळवरी । पूर्ण परिपूर्ण देई पुरी । प्रबोध लाडू तयावरी ॥३ ॥ जीर्ण स्वरूपाचा शेला । कृपेनें दे का गा मजला । शुद्ध सत्वें निर्वाळिला । निजबोधें उपार्जिला ॥ ४ ॥ नव-खंडें खंडिली । जीवशिवेंवीण शिविलीं । दे वो भक्तीची काचोळी । अंगीं जीर्णत्वें बाणली ॥ ५ ॥ मोहममतेचें बिरडें फोडी । शुद्ध सत्त्वाची गांठ सोडी । त्रिगुणाची कसणी तोडी । जुनी काचोळी देई रोकडी ॥ ६ ॥ पंचतत्वांचे अंगुलें । विषय भोगितां विटलें । वासना कसा जें तुटलें । तें मज देई कां वहिलें ॥ ७ ॥ प्रपंच भोग गेले भंगी । तेचि दे गा अंगींचें अंगीं । यालागीं नाचतसे रंगीं । रंगीं रंगलो श्रीरंगीं ॥ ८ ॥ नाहीं नाहीं कीं म्हणसी येथें । आहे परिपूर्ण भरलें जळतें । मी वो ज्ञानार्थी क्षुधितें । अर्थें करी कां समर्थें ॥ ९ ॥ ज्ञान देता धन न

सरे । जो घे त्याचें दरिद्र विरे । मागत मागणें वोसरे । ऐसें धन दे कां हो निर्धारें ॥ १० ॥ एका जनार्दनीं मागत दान । तिथें नेलें जीवपण । शेखीं नेदीच शिवपण । केलें निज सुखसंपन्न ॥ ११ ॥ चिदानंदाचा निजस्वादु । नंदानंदाचा अनुवादु । निजनिजाचा उद्बोधु । एका जनार्दनीं प्रबोधु ॥ १२ ॥

३६९७ आम्हीं परात्पर भिकारी । वेगें आलों संतांद्वारीं । द्या मज भक्तिची भाकरी । म्हणोनी नाचतो नामगजरीं ॥ १ ॥ बाबा बाळसंतोष ॥धृ.॥ युगें अठ्ठाविसांचा जोगी । विभूति चर्चित सर्वांगीं । गळा अनुपम्य शैली शिंगी । वाजवी सोहं शब्द जगीं ॥२॥ त्राहे त्राहे त्राहे त्राहो । हे तो तुमगें मी कांहीं । एका जनार्दनाचे पायीं । काया वाचा मन राही ॥ ३ ॥

३६९८ अलक्ष लक्ष मी भिकारी । म्हणोनि आलो सद्गुरुद्वारीं । भिक्षा मागतों नानापरी । कोण्ही दाचें स्मरा मुरारी ॥ १ ॥ बाबा बाळसंतोष बाळसंतोष ॥ धृ. ॥ चार युगें करूनी फेरी । हिंडो सद्गुरुचे द्वारीं । भिक्षा मागों अलक्षपुरीं । तेणें तुटेल चौऱ्यांयशींची फेरी ॥ २ ॥ शरण एका जनार्दन । तुटलें देहाचें बंधन । कर्माकर्माचें आहलें खंडन । गेलें विलया जीवपण ॥ ३ ॥

## वासुदेव.

३६९९ धन्य जगीं तोचि एक हरिरंगीं नाचे । राम कृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचे ॥ १ ॥ सुखदुःख समान सकळ जीवांचा कृपाळ । ज्ञानाचा उद्बोध भक्तिप्रेमाचा कल्लोळ ॥ २ ॥ विषयीं विरक्त जया नाहीं आपपर । संतुष्ट सर्वदा स्वयें व्यापक निर्धार ॥ ३ ॥ जाणीव शहाणीव वोझें सांडोनियां दुरी । आपण वस्तीकर वर्ततसे संसारीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं नित्य हरीचें कीर्तन । आसनीं शयनीं सदा हरीचें चिंतन ॥ ४ ॥

३७०० जया परमार्थी चाड । तेणें सांडावें लिगाड । धरुनी भजनासी चाड । नित्य नेम आदरें ॥ १ ॥ सांडी मांडी परती टाकी । वासुदेव नाम घोकी । मोक्ष येईल सुखीं । नाम स्मरतां आदरें ॥२॥ रामकृष्ण वासुदेवा । धरीं हाचि दृढभावा । आणिकाचा देवा । दुरी करी आदरें ॥ ३ ॥ घाली संतांसी आसनें । पूजा करी कायावाचामनें । एका जनार्दनीं जाणें । इच्छिले ते पुरवी ॥ ४ ॥

३७०१ सुखें सेऊं ब्रह्मानंदा । गाऊं रामनाम सदा । नोहे मग बाधा । काळ दूत यमाची ॥ १ ॥ करूं वासुदेवस्मरण । तेणें तुटे रे बंधन । खंडेल कर्माचें वदन । वासुदेव जपतांचि ॥२॥ तीर्थयात्रे सुखें जाऊं । वाचे विठ्ठलनाम घेऊं । संतसंग सेऊं । वासुदेव धणीवरी ॥ ३ ॥ लोभ ममता दवडूं आशा । उदर व्यथेचा वोळसा । न करूं आणिक सायासा । वासुदेवावांचुनी ॥ ४ ॥ मुख्य धर्माचें हें वर्म । येणें साधे सकळ धर्म । एका जनार्दनीं नाम । वासुदेवा आवडी ॥

३७०२ वासुदेव स्मरणें तुटती जन्ममरण व्याधी । अहं सोहं कोहं मूळ ह्या सांडी उपाधी ॥१॥ रामकृष्ण वासुदेव गोपाळ वाचे आठवा । जन्मजरा तुटे वाचे आठवीत आंठवा ॥ २ ॥ चिपळ्या टाळ घुळघुळा शब्द नादे । तेणें ब्रह्मानंद हृदयीं आठवण नांदे ॥३॥ एका जनार्दनीं वासुदेव चिंतितां । यम काळ दूत पळती नाम ऐकतां ॥ ४ ॥

३७०३ विषय सेवितां गा जन्ममरणाचा बाधु । विवेक गुरुवाक्य छेदी भवबंधु ॥ १ ॥ रामकृष्ण वासुदेव हरि ब्रह्मानंदें गळती गा । रामकृष्ण वासुदेव हरि देहीं विदेहीं जाला गा ॥ २ ॥ गुरुवाक्य भावबळें निजबोधें पैं वुद्धी । तेणें बोधें पाहतां गा अखंड ते समाधी ॥ ३ ॥ जनीं वनीं निरंजनीं वासुदेव समान । एका जनार्दनीं चित्त चैतन्य घन ॥ ४ ॥

३७०४ वासुदेवस्मरण पापहरणाचें मूळ । तीर्थांचें माहेर ब्रह्म व्यापक निश्चळ । अघनाशी मुखीं स्मरतां वाचा जाली निर्मळ । त्रिविध ताप शापुनी रूपीं स्वरूपीं सुमंगळ ॥ १ ॥ ॐनमो भगवते रामकृष्ण वासुदेवा ॥ धृ. ॥ जप तप अनुष्ठान व्यर्थ कासया करणें । तीर्थ व्रत यम नेम नलगे दैवता धरणें । आसन मुद्रा ज्ञान ध्यान नलगे वाराणशीं मरणें । केशव माधव अच्युत वदतां होय पातक हरणें ॥२॥ शरीर शोषण प्राण निरोधन मनोजय हठयोग । गुदपीडन कुंडलिनी कलिमलदल भंग । ऊर्ध्व वायूचा श्वेत तोडोनी करि वो वनभंग । ब्रह्मरंध्रीं मिसळे परी मुमुक्षु दंग ॥ ३ ॥ मनोजय वासना तोडोनी केली बीमोडी । मनपूर नगर पाहतां दुर्गती मोडी । काम क्रोध मद मत्सर अहंकार सोडी । अखंड परमानंद

सेउनी उभवी गुढी ॥४॥ भेदभाव तोडोनियां घेतला प्रेमाचा गरळा। शुद्ध नाम श्रीहरीचें निजमुखीं लागला चाळा। हरिस्मरणाचेनी बळें अंकीत केलें कळिकाळा। एका जनार्दनीं अखंड सुखसोहळा ॥ ५ ॥

३७०५ मी वासुदेव नामें फोडितो नित्य टाहो। देखिले पाय आतां मागतो दान द्याहो। सांवळें रुप माझ्या मानसी नित्य राहो। पावन संतवृंदें सादरें दृष्टी पहा हो ॥ १ ॥ रामकृष्ण वासुदेवा। हरिराम कृष्ण वासुदेवा ॥ ध्रु.॥ सांडोनी सर्व चिंता संतपदीं लक्ष लागो। मुक्त मी सर्वसंगीं सर्वदा वृत्ति जागो। भाविक प्रेमळांच्या संगती चित्त लागो ॥ २ ॥ अद्वैतेची चालों अक्षयी भक्तियोग। स्वप्नीही मानसातें नातळों द्वैतसंग। अद्वयानंद वेधें नावडो अन्य भोग। अक्रियत्वची वावो सत्क्रियारुप बोध ॥ ३ ॥ पहातां विश्वमातें निजरूप दाखवी। सत्यकथा श्रवण कर्णीं पीयूष चाखवी। रसनें नाममंत्र सर्वदा प्रेम देई। तोषला देवराणा म्हणे बा रे घेई ॥४॥ हें दान पावलें सद्गुरु शांतिलिंगा। हें दान पावलें आत्मया पांडुरंगा। हें दान पावलें व्यापका अंतरंगा। हे दान पावलें एका जनार्दनीं दोष जाती भंगा ॥ ५ ॥

३७०६ कर जोडूनि विनवितो तुम्हां। तुम्ही वासु देव वासुदेव म्हणा। नको गुंतूं विषयकामा। तुम्ही आठवा मधुसूदना ॥ १ ॥ नरदेह दुर्लभ जाणा। शत वर्षाची गणना। त्यामध्यें दुःखयातना। तुम्ही आठवा मधुसूदना ॥२॥ नलगे तीर्थांचें भ्रमण। नलगे दंडण मुंडण। नलगे पंचाग्नी साधन। तुम्ही आठवा मधु सूदना ॥ ३ ॥ हेचि माझी विनवणी। जोडितो कर दोन्ही। शरण एका जनार्दनीं। तुम्ही वासुदेव म्हणा अनुदिनीं ॥ ४ ॥

## आंधळा.

३७०७ मार्ग बहु असती परी तयांची न कळे गती। म्हणोनि पडियेलों मायामोहभ्रांती। तेणें मी जाहलों अंध कोण धरील चित्तीं। मारितो हांका मोठ्यानें अहो उदार श्रीगुरुमूर्ति ॥ १ ॥ धांव धांव श्रीगुरुराया काढी देउनि हात। बुडतसे भवनदीमाजीं न कळे अंत। शिण बहु मज जाहला श्रमलों पहात पहात। यातुनी सोडी वेगीं तुम्ही श्रीगुरु समर्थ ॥ २ ॥ वाटे आडवाट दरी दरकुटे यमाजी गुंतले। कन्या पुत्र स्त्रीधन हें वर पडिलें जाळें। कवण उगवील कवणा शरण जाऊं तें न कळे। करितो चिंता हृदयीं तंव श्रीगुरु भेटले ॥ ३ ॥ मार्ग हा दाविला जेथें नाहीं गोवागुंती। श्रीगुरु प्रसन्न जाहले निवारली अवघी भ्रांती। एका शरण जनार्दनीं जाहली संतोषवृत्ती। अंधपण फिटलें निवारली पुनरावृत्ती ॥४॥

३७०८ आधीं देखत होतो सरळ। मग ही दृष्टी गेली आलें पडळ। चालता मार्ग न दिसे केवळ। आतां मज करा कृपा मी दीन तुम्ही दयाळ ॥ १ ॥ दाते हो दान करा तुम्ही संत उदार। चालता मार्ग दाखवा मज निर्धार। गुंतलो लोभ आशा कांहीं न कळे विचार। दृष्टीतें फिरवूनि द्या मुखीं नामाचा उच्चार ॥ २ ॥ त्रैलोक्यांत तुमची थोरी पुराणें वर्णिती साचार। वेदहि तुम्हां गाती तयां न कळे निर्धार। कीर्ति गाती सनकादिक तो दाखवा श्रीधर। म्हणोनि धरिला मार्ग नका करूं अव्हेर ॥ ३ ॥ अंधपण सर्व गेलें श्रीगुरुचा आधार। तेणें पंथें चालतांना फिटला मायामोह अंधार। एका जनार्दनीं देखिला परेपरता पर। श्रीगुरु जनार्दन कृपेनें दाविलें निजघर ॥ ४ ॥

३७०९ पंढरपूर पाटणीं गा महाराज सार्वभौम। पांडुरंग दीनबंधु जयाचें तें नाम ॥ १ ॥ अंधळ्या जीवींचे तो जाणतो धर्म। म्हणोनि आलों गा देई माझें मज वर्म ॥ ध्रु.॥ असोनि हातपाय डोळे जाहलों मी अंधळा। मुखीं नाम तुझें लागला वाचेसी चाळा ॥ २ ॥ देउनी दान मातें नाम सांगे ये काळीं। विठोबाचे दान आलें ऐसी देईन आरोळी ॥ ३ ॥ दान पावलें संतसंगें भक्तीचें। एका जनार्दनीं अखंड नाम वाचे ॥ ४ ॥

## पांगूळ.

३७१० मी माझे कल्पनेनें जाहलोसे पांगूळ। चालता न चलवेचि कोठें न मिळे स्थळ। हिंडलो दिशा दाही श्रम जाहला केवळ। कवण ही भ्रांती वारी कैं भेटेल गुरुदयाळ ॥१॥ धर्म जागो गुरुमहिमा देही दाविला देव। निवारुनी भवर जाळे अवघा निरसला भेव ॥ धृ. ॥ कर्म त्या अकर्मांच्या लागती वाटे ठेंचा। संपत्ती विपत्तीचा मानिला भरंवसा। कन्या पुत्र आप्त जन हा तो सहज वोळसा। या भ्रमडोहीं बुडालो धांवे गुरुराया सर्वेशा ॥ २ ॥ येउनी गुरुनाथें माथां ठेविला करु। अज्ञान तिमिर गेले शुद्ध

मार्गे साचारु। गर्जत चालियेलो फिटला अज्ञान अंधारु। एका जनार्दनीं माझा श्रीगुरु उदारू ॥३॥

३७११ मृत्युलोकीं एक नगर त्याचें नांव पंढरपूर। तेथील मोकाशी उभा असे विटेवर। पुंडलीक भक्तराज शोभे चंद्रभागातीर। बोलती साधुसंत जिवा वाटे हुरहूर ॥ १ ॥ तुम्ही संत मायबाप येवढा उपकार करा। न्या मज तेथवरी दाखवा दीनांचा सोयरा ॥ ध्रु. ॥ मज नाहीं हातपाय डोळां पडली झांपड। कर्ण बधिर झाले वाचा बोले बोबड। नाक मुख गळूं लागलें लाळ आणि शेंबुड। श्वानापरी गती जाली अवघे करिती हाडहाड ॥ २ ॥ साधूसंत मायबाप जे का दयेचे सागर। भावाचें मुख्य स्थान भक्तीचें माहेर। तिहीं केलें कृपादान मस्तकीं ठेविला कर। माया मोह निरसली शुद्ध जालें कलेवर ॥ ३ ॥ भाव दिला मजसांगातें मार्ग दाविला नीट। भ्रांती हें समूळ गेली दिसूं लागली वाट। नाचत प्रेमछंदें चालूं लागलों सपाट। एका जनार्दनीं पावलों पंढरी पेठ ॥ ४ ॥

३७१२ सहज पूरपाटणीं गा एक जनार्दन दाता। पांगुळा पाय देतो विश्रांती समस्तां ॥ १ ॥ यालागीं नाम त्याचें दुःख निरसी मनाचें। पांगुळा जीवीचें तोवि चालवी साचें ॥ २ ॥ जीवें जिता मी पांगुळ दिधला निज बोध ढवळा। त्यावरी बैसोनि क्रीडे सर्वत्र स्वलीला ॥ ३ ॥ एकाएकु परम दीन अंध पंगु अज्ञान। जनार्दनें कृपा करून करवी निजसत्ता चलन॥

## आंधळा—पांगळा.

३७१३ अंध पंगू दृढ जाहलों बांधलो संसारीं। मायामोह भरली नदीमाजीं दुस्तर मगरी। यांतून कोण सोडवील नानापरीचें दुःख भारी। दैवयोगें भेटला तो जनार्दन गुरू सत्वरीं ॥ १ ॥ धर्म जागो जनार्दनाचा तेणें निवारिला फेरा। चुकविल्या चौऱ्यांयशींच्या तयानें येरझारा। मोक्षप्राप्ती वाट जाहली दाविला सोयरा। जन्ममरण दुःख गेलें जाहलों सैराट मोकळा ॥ २ ॥ घातिलें अंजन डोळां दिसों लागली वाट। मोकळा मार्ग जाहला चालिलों सैराट। श्रीगुरु जनार्दन मुखीं नामाचा बोभाट। एका जनार्दनीं पावलों मूळची पेठ ॥ ३ ॥

३७१४ असोनियां दृष्टी जाहलों मी आंधळा। आपांगलें जिही जाहलों त्या वेगळा। मायबाप माझे म्हणती मज माझ्या बाळा। शेवटीं मोकलिती देती हातीं काळा ॥ १ ॥ संत तुम्ही मायबाप माझी राखा कांहीं दया। लागतों मी वारंवार तुमचीया पायां ॥ ध्रु. ॥ इंद्रियें माझीं न चलती क्षणभरी। गुंतलो मायामोहें या संसाराचे फेरी। अंथरुण घातलें तें इंगळाचे शेजेवरी। कैशी येईल निद्रा कोण सोडवील निर्धारी ॥ २ ॥ मायबाप तुम्ही संत उपकार करा। जगीं जो नांदतो जनीं एवढा जनार्दन तो खरा। तयाचिया चरणांवरी मस्तक निर्धारी। एका जनार्दनीं करी विनंती अवधारी ॥ ३ ॥

३७१५ ॐकार निज वृक्ष त्यावरी वेंघलों प्रत्यक्ष। दान मागों रामकृष्ण जनार्दना प्रत्यक्ष ॥ १ ॥ जालों मी अंध पंगु। माझा कोणी न धरिती संगु ॥ ध्रु. ॥ चालतां वाट मार्गी मज कांहीं दिसेना। उच्चारिती नाम संतमार्गे चालिलों जाणा ॥ २ ॥ पाहुनी पंढरी पेठ अंधपणा फिटलों। एका जनार्दनीं संतांपायीं लीन झालों ॥ ३ ॥

३७१६ दाते बहुत असती परी न देती साचार। मागत्याची आशा बहु तेणें न घडे विचार। सम घेणें या नाहीं प्रकार। लाजिरवाणें जिणें दोघांचे धर्म अवघा असार ॥ १ ॥ तैसा नोहे दाता माझा जनार्दन उदार। तुष्टला माझ्या देहीं दिधलें अक्षय अपार। न सरेचि कल्पांतीं माप लागलें निर्धार। मागतेपण हारपलें दैन्य गेलें साचार ॥ २ ॥ देउनी अक्षय दान पदीं बैसाविला अढळ। मायामोह तृष्णा हाचि चुकविला कोल्हाळ। एका जनार्दनीं एकपणें निर्मळ। शरण एका जनार्दना काया वाचा अढळ ॥ ३ ॥

## बहिरा.

३७१७ बहिरा झालों या जगीं ॥ ध्रु. ॥ नाहीं ऐकिलें हरिकीर्तन। नाहीं केलें पुराणश्रवण। नाहीं वेदशास्त्र पठण। गर्भी बधिरा झालों त्यागून ॥ १ ॥ नाहीं संतकीर्ति श्रवणीं आली। नाहीं साधुसेवा घडियेली। पितृवचनासी पाठ दिधली। तीर्थें व्रतें असोनि त्यागिली ॥ २ ॥ माता माउली पाचारितां। शब्द नाहीं दिला मागुता। बहिरा झालों नरदेहीं येतां। एका जनार्दनीं स्मरेन आतां ॥ ३ ॥

## मुका.

३७१८ मुका झालों वाचा गेली ॥ ध्रु. ॥ होतो पंडित महाज्ञानी। दशग्रंथ षड्शास्त्र पुराणीं। चारी

वेद मुखोद्गत वाणी । गर्वामध्यें झाली सर्व हानी ॥ १ ॥ जिव्हा लांचावली भोजना । दुग्ध घृत शर्करा पक्वान्ना । निंदिलें उपान्ना । तेणें पातला मुखबंधना ॥ २ ॥ साधुसंतांची निंदा केली । हरिभक्तांची स्तुती नाहीं केली । तेणें वाचा पंगु झाली । एका जनार्दनीं कृपा लाधली ॥ ३ ॥

## पिसा.

३७१९ मायराणी प्रकाशितां दिवा । याचिया जीवा लागलासे ॥ १ ॥ एका पिसाळला एका पिसाळला । मायराणीचा अभिलाष गेला ॥ २ ॥ नांवरूप नाहीं याचे पिसेपणीं । धांवोनि संतांचें पितों पायवणी ॥३॥ पिसें जालें सांगू मी काये । झोंबोनी संतांचें उच्छिष्ट खाये ॥ ४ ॥ उरफाटे झाले डोळे । एका जनार्दनीं देख तें न कळे ॥ ५ ॥

३७२० राम राम म्हणोनि सदा रडे । जें जें देखे त्याच्या पायां पडे ॥ १ ॥ देव देखत पिसें पाहीं । आपुलें पारखें नोळखे कांहीं ॥ २ ॥ बोलामाजीं घाली मौनाची मिठी । शून्याही वरील सांगतो गोष्टी ॥३॥ आपुलियां माथां आपण मारी । त्याच्या पिसेपणा कोण आवरी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पिसा झाला खरा । आपुल्या आपण नाशी शरीरा ॥ ५ ॥

## खेळिया.

३७२१ देव छिनालका छिनालका । खेळ खेळाडी बांका ॥१॥ छंद बडा सुरवर को वाटा । जाके झरुकेमें बैठा । बडा धरम का दाता । नहीं जात पात कुच नाता ॥२॥ एकनाथ का वाली । उसे कोण देवे गाली ॥

३७२२ जनीं वनीं एक जनार्दन दाता । त्यासी नमन करूं आतां रे । मन उन्मन जयासी पाहतां । त्याच्या चरणावरीं माथा रे ॥ १ ॥ नाचत पंढरीसी जाऊं रे । खेळिया । क्षरक्षरा गीत गाऊं रे । टाळ मृदंग मेळवूनि मेळा । गुरुवचनीं खेळ खेळा रे ॥ धृ. ॥ भक्ति वैराग्य कुंडलें श्रवणीं । ज्ञानांकुश मुगुटमणी रे । सप्रेम उटी अंगीं चंदनाची । सत्वाची कास निर्वाणीं रे ॥ २ ॥ अष्टभावें खेळिये खेळताती ठायीं । घागऱ्या वाजती पायीं रे । दया क्षमा दोन्ही चवऱ्या ढाळती । शांती सत्राची छाई रे ॥ ३ ॥ वाद निमाला शब्द खुंटला त्रिभुवनीं आनंद झाला रे । एका जनार्दनीं शरण गेला । तो एकपण विसरला रे ॥ ४ ॥

## शकुन.

३७२३ कैकाय कैकाय तुज सांगतें शकुन । येणें मार्गें गेले नाहीं आले परतून । आरता येई तुज सांगतें शकुन । वरल्या देशींची वस्तु एक निधान ॥१॥ हिंडत कैकाय तिचा घरीं भ्रतारु । सांवळा डोळस माथां दुडियाचा भारु । एकुलें एक तिचे कडीये लेंकरूं । भुरळ घालुनी भुलविलें नारी आणि नरु ॥२॥ भूरभंगी धूर धुमाळी । गेलीं चारी युगें । आतां येईल तुज एक निजखूण सांगे । चौऱ्यांशी सिद्ध गेले येणें मार्गें । नारद तुंबर ऋषि तेहि गेले भंगें ॥ ३ ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र तेहि काळें ग्रासिले । सीतापती पुरंदर चंद्र मावळले । सव्वा लक्ष घडामाड मायासूत्र खेळे । परिसा पाहतां पिंड ब्रह्मांड आगळें ॥ ४ ॥ बोलती कैकाय भूर होईल गा दादा । लटिकाची माया मोह लावियेला धंदा । लक्षामध्यें जाणे भेद विरळा एखादा । या लागीं चिंती दिनानिशीं परमानंदा ॥ ५ ॥ बोले कैकाय दादा उद्या होईल भूर । डोळियां पातें लवे ऐसा संसार । मुकियानें गूळ खादला न सांगवे विचार । एका जनार्दनीं तुम्हीं भजा हरिहर ॥ ६ ॥

३७२४ जें निर्गुण निराकार तेथें माझा वास । कांहीं सांगावया आले तुम्हांस । माझा शकुन ऐकती ब्रह्मा विष्णु महेश । ऐशी एक खूण सांगितली त्यांस ॥१॥ कैकाय कैकाय निर्गुणपुरीचा ठाव । सांगावया शकुन आलें ऐक्य भाव । एका माझा शकुन पुन्हां जन्मा न यावें । चाड जया असेल तेणें चित्त द्यावें ॥ २ ॥ शकुनाची खूण बाणे प्रल्हादा । त्याच्या पितीयानें केलीं बहु आपदा । मज तें न पहावे मी धांवले दादा । धरुनी हिरण्यकश्यपुसी केलासे चेंदा ॥ ३ ॥ शकुन सांगितला म्यां लंकाभुवनीं । परी तो नायके उन्मत्त बोले वाणी । धरुनी म्यां केला चेंदा रणांगणीं । स्थापियेला बिभीषण राज्यभुवनीं ॥ ४ ॥ बैसोनी अर्जुन रथीं सांगितलीं खूण । कौरव आणि पांडवांचें माजलें रण । अठरा दिवसांत करविलें कंदन । शेवटीं रक्षिले पंडूचे नंदन ॥ ५ ॥ शकुन सांगत आलें मी गोकुळाप्रती । अगवग चाणूर मारिले दुर्मती । वधियेला मामा कंसासुर पापमती । विष पाजूं आली मावशी तिसी सायुज्य मुक्ती ॥ ६ ॥ शकुन सांगत आलें भीवरा तीरा । तंव तेथें देखिला परात्पर सोयरा । मध्यस्थळीं शोभे पुंडलीक बरा । एका जनार्दनीं दरुशनें चुके जन्माचा फेरा ॥ ७ ॥

३७२५ निर्गुण निराकार दादा माहूर माझें गांव। शकुन सांगावया आलें यमाई माझें नांव। नये नगरी वस्ती केली मी तरी आले एकभावें। ऐसा माझा शकुन दादा चित्त देऊन ऐकावें ॥ १ ॥ कैकाय कैकाय बाबा दुरील माझा देश। शकुन सांगावया मी आलें कलियुगास। ब्रह्मा विष्णु महेश पुसती शकुन आम्हांस। ऐसें निदान आम्ही सांगतलें त्यांस ॥ २ ॥ धरित्री आकाश मज देखतां उत्पत्ती। चंद्र सूर्य दादा मज देखतां होती। ब्रह्मा विष्णु महेश मज देखतां उपजती। जेथें आहे शिव तेथें आदि शक्ती ॥ ३ ॥ दाही अवतार मज देखतां झाले। अकराहि रुद्र दादा होऊनियां गेले। अठ्यांयशी सहस्र ऋषी मज देखतां जन्मले। ब्रह्मादि तेहतीस कोटी देव खेळविले ॥ ४ ॥ अठ्ठावीस युगें झालीं चक्रवर्ती। कौरव पांडव गेले दादा नेणों किती। छपन्न कोटी यादव गेले दादा कोणे पंथीं। आम्ही तुम्ही जाऊं मागें कोणी न राहती ॥ ५ ॥ पृथ्वीमध्यें दादा एक विपरीत होईल। बहीण भावां दोघाजणांचा विवाह लागेल। पांचा वरुषांची बाळा भ्रतार मागेल। सहा वरुषांची नारी गर्भिण होईल ॥ ६ ॥ आणिक दादा माझा ऐकावा बोल। पृथ्वीवरुतां वारा थोर झुंजाट सुटेल। थोर थोर दादा पर्वत उडोनि जातील। अठराही जाती एके ठिकाणीं जेवतील ॥ ७ ॥ कलियुगाची दादा ऐकावी थोरी। पुत्र तो होईल पित्याचा वरी। भ्रतारा सोडोनी घरोघरीं फिरतील नारी। ऐसा माझा शकुन दादा ऐका निर्धारी ॥ ८ ॥ आणिक एक दादा माझें ऐका उत्तर। आकार जाईल अवघा होईल निराकार। जाती चंद्र सूर्य मग पडेल अंधःकार। धरित्री आकाश जाईल मग कैंचा दिनकर ॥ ९ ॥ आणिक एक शकुन माझा ऐकावा संतीं। तुम्ही मूळ पीठीं राहाणें नांव माझें आदिशक्ती। अंबेचा व्यवहार आहे आहे आदिमूर्ती। एका जनार्दनीं प्रसन्न झाली आदिशक्ती ॥

## सरोदा.

३७२६ डुग डुग डुग जाती ब्रह्मांड युग। अहो त्या अहं ममतेच्या पोटीं। नका कीं जी जाऊं राजांनो ॥ १ ॥ अहो त्या अहं ममतेच्या पोटीं। उद्भवल्या ब्रह्मांड कोटी। त्यांची समूळ सांगेन गोष्टी। माझें सरोद्याचे बोल चावटी न म्हणावें कीं जी राजांनो ॥ २ ॥ मी निजानंदपुरीचा रहिवाशी। धांवोनि आलों तुम्हां संतांपाशी। शकुन सांगेन निश्चयेंसी। ऐका श्रवणेंसी सादर कीं जी राजांनो ॥ ३ ॥ मीं जें बोलणें ते बोल। ते समुद्रापरीस खोल। धरी अबोलणें ते बोल। इंद्रिया बोल असूं द्या कीं जी राजांनो ॥ ४ ॥ आतां सांगतों एक वचन। सर्वांगासी करूनि कान। श्रोतीं व्हावें सावधान। निजात्म खूण पावोनि कीं जी राजांनो ॥ ५ ॥ मुळींची जे स्फुरली अहंता। ब्रह्मींची सांगेन समूळ वार्ता। अव्यक्त आलें व्यक्ता। माया तत्वता या नांव कीं जी राजांनो ॥ ६ ॥ अहो त्या मायेचिया कुशीं। उत्पत्ति झाली त्रिगुणांसी। ते विये अकार उकार मकारांसी। आउट ओंकार कीं जी राजांनो ॥ ७ ॥ अकार भूमिका विशेषता। उकारीं जाण गता यात्रा। मकारीं संश्लिष्टता। सुलीनता अर्धमात्रीं कीं जी राजांनो ॥ ८ ॥ अकारीं रजोगुणाची वस्ती। उकारीं तैजस म्हणती। मकारीं प्राज्ञ अभिमानी बोलती। प्रत्यगात्म्याची वस्ती अर्धमात्रींच कीं जी राजांनो ॥ ९ ॥ अकार तो ऋग्वेद जाण। उकार यजुर्वेद प्रमाण। मकारीं सामवेद ओळखण। अथर्वण वेद अर्धमात्री कीं जी राजांनो ॥ १० ॥ ऐसा ॐकाराचा विस्तार। सांगितला सविस्तर। जाणोनि अर्थसार। सुखी सुखरूप असावें कीं जी राजांनो ॥ ११ ॥ आतां सांगतो एक शकुन बरा। कांहीं मज सरवद्यास दान करा। दान द्यावयाची सोय धरा। चौऱ्यांयशी लक्ष फेरा चुकेल कीं जी राजांनो ॥ १२ ॥ वासनेचे काळें चिरगूट। मीपणाची बांधोनी मोट। विषयवासनेची सोडोनि गांठ। दान श्रेष्ठ मज करा कीं जी राजांनो ॥ १३ ॥ आकाशाची घेऊनि वाटी। त्रिगुण तेल भरूनि ताटीं। दान करितां उठाउठी। चोखटी पीडा टळेल कीं जी राजांनो ॥ १४ ॥ म्यां शकुन सांगितला जनकरायाप्रती। त्याची कैसी जाहली देहस्थिती। देहींच असोनी विदेहीं प्राप्ती। या शकुनाचेनि बोलें कीं जी राजांनो ॥ १५ ॥ आणखी ऋषेश्वर थोर थोर। वसिष्ठादि विश्वामित्र। सनकादिक पराशर। याच विचारें नांदले कीं जी राजांनो ॥ १६ ॥ आणखी संतमहंतादि पती। याच विचारें नांदले किती। अल्पही करितां त्यांची संगती। नपवे जन्ममृत्यूची गती कीं जी राजांनो ॥ १७ ॥ निवृत्ति सोपान ज्ञानदेव। ते आनंदले याचि वैभवें। खेचर विसोबा नामदेव। चांगा वटेश्वर कीं जी राजांनो ॥ १८ ॥ परसा भागवत गोरा कुंभार। चोखामेळा महार।

रोहिदास चांभार। जुल्हाई कबीर करिती विचार शकुनाचे कीं जी राजांनो ॥१९॥ परी एक बायकोचा संग खोटा। इने भुलविले श्रेष्ठश्रेष्ठां। थोर थोर पडिले आव्हाटा। भुलले वाटा स्वहिताच्या कीं जी राजांनो ॥ २० ॥ जो का सृष्टिकर्ता चतुरानन। इचा पदर लागतांचि जाण। स्वकन्येसी देखुनी आपण। तोचि जाण वेडावला कीं जी राजांनो ॥ २१ ॥ जो कां विष्णु सृष्टि पाळिता। त्याची कैशी झाली अवस्था। तोही झाला लोळता। वृंदेच्या स्मशानीं कीं जी राजांनो ॥ २२ ॥ जो कां श्रेष्ठ ईश्वर। तोही झाला मोहिनीचा किंकर। बायकोचा लागतां पदर। हरि हर ब्रह्मा वेडा झाला कीं जी राजांनो ॥ २३ ॥ या करितां संग नका करूं इचा। बोल ऐका मज सरवद्याचा। माझिया बोला विश्वास साचा। तो परब्रह्मींचा रहिवासी कीं जी राजांनो ॥२४॥ डाकुलता झाला चालता। परंतु न ये बोलाविता। निर्मळ पदी वास्तव्यता। झाला डाकुलता कीं जी राजांनो ॥२५॥ एका जनार्दनींचा एकुलता एका। शकुन गाठी बांधिले देखा। तेव्हां साधिली सत्वभूमिका। परमार्थ फुका आला हाता कीं जी राजांनो ॥ २६ ॥

३७२७ अगा ये परम शुभ ऐक। लाभ दिसे तो एक। नांदते धर्माचें घर। सद्विविकांचें विवर। विवरांत विश्रांती थोर। अपार सुख तें ॥१॥ ऐसा नरदेह परम सुखाचा। घे मज पिंगळ्याची वाचा। मी संदेह सांगेन साचा। ऐका गा राजकुमरहो ॥ २ । डुग डुग डुग शंभु महादेवा। काशी विश्वनाथा। पंढरीच्या विठोबा। कानड्या खंडेराया। दिगंबरा दत्तात्रया। इतुकें बोलतां ठाया। परी ते एकचि यती ॥ ३ ॥ लडबड लडबड। नवनाथ सोरटी सोमनाथ। श्रीहिंगळजा भगवती। वीणापुस्तक धारिणी। ये मूळ पीठींची। जिचेनी वस्तु महिमा साची। आदि अंत भरलें स्वतंत्र। म्हणोनी कारण वाचेसी अत्यंत बोलत आहे ॥४॥ नमो परम पुरूष। जो भास ना आभास। जो स्वयंप्रकाश अखिल मूर्ति ॥५॥ जो वर्ण व्यक्ति हीन। दृश्ये.दृष्य दरुशन जाण। जो आदिमायेचें आवरण। अनादिसिद्ध ॥ ६ ॥ धन्य धन्य तो सद्गुरु। जो साक्षात परब्रह्म अवतारु। नामस्मरणें जगदुद्धारु। करी सदा ॥ ७ ॥ आतां समस्ता नमीत स्वानंदें। देहीं स्फुरलें स्वात्सुख छंदें। डुलतां आपुलेनी आनंदें। सहजीं सहज ॥ ८ ॥ आधीं एकाग्र करुनी मन। सांडी बद्ध मुक्तीचा अनुमान। वृत्ती सदा समाधान। स्वरुपीं असावी ॥ ९ ॥ हजार गोष्टीचीये परी। मज सरोद्याचा विश्वास धरी। अंतीं बोलणें वचन वरी। गोड लागे ॥१०॥ एक खटपट। एक तळतळ। एक वळवळ। एक कळकळ। परी तो अवघाची कोल्हाळ। करिताती ॥ ११ ॥ तैसा नोहे मी पिंगळा। शब्दासहित बोध सकळां। एका अनेकीं नोहे वेगळा। शोधोनि पाहे ॥ १२ ॥ दिसे बावन्नाची कडसणी। एका सूत्रें वोविलें मणी। जैसें गंगेचें पाणी। निर्मळ वाहे सर्वदा ॥ १३ ॥ पूर्व उत्तर दोन प्रत्यक्ष। होते कां नेणा अक्ष ॥ १४ ॥ एक तृति व्हावया। आणिक ग्रारा घ्यावया। तरी ते आन ठाया। गेले न म्हण ॥१५॥ तरी त्याचें मुखें अर्थ कांहीं। ज्ञात्यासी सांगतां भरला नाहीं। विवेक संचूनी ठायीं। ऐका गा राजेनु ॥१६॥ नांव काय रायाचें। मेष कीं वृषभ कीं मिथुन कीं कर्क कीं सिंह कीं कन्या कीं तूळ कीं वृश्चिक कीं धन कीं मकर कीं कुंभ कीं मीन। ऐका गा राज कुमरहो ॥ १७ ॥ येवो मेष तो कैसा। हुरळक हुसके थैलतैसा। बुद्धिमंद विवेकलेशा। दैन्यवाणा सदाचा ॥ १८ ॥ आतां वृषभ बोलावा। प्रकृति बुद्धि आव्हा सवा। हानी लाभ नोहे ठावा। या गर्वराशी ॥ १९ ॥ माया ईश्वर मिळोनी। जैसे सुखावती दोन्हीं। तरंग तेंच पाणी। ज्ञानप्राप्ती मिथुन जाणावा ॥२०॥ अहं बुद्धीचे सर्वक। तोचि ओळखावा कर्क। देहाभिमाना गर्क। कुवृत्ती सदाचा ॥२१॥ मद गज वनांतरीं। धूर्त सिंहाचिये परी। मोहे महिमा निस्तारी। ऐसी कन्या जाणावी ॥२२॥ बुद्धि सत्त्वाची साम्यता। प्रपंच परमार्थ ऐक्यता। स्थूळधारी देखता। तो सत्त्वाचा वोतिला ॥२३॥ जो कुर्वाळील कृपा करी। विषयशक्ति नांगी मारी। फणका लागतां दुःख करी तो मळीन वृश्चिक जाणावा ॥ २४ ॥ शब्द कैसा तीक्ष्ण। हृदयीं जैसा लागे बाण। मोडी भलत्याचे समाधान। तोचि धन ओळखावा ॥ २५ ॥ एक होटीं एक पोटीं। सदा भोंवयासी घाली गाठी। मळीन देखे सर्व सृष्टी। तो मकर जाणावा ॥ २६ ॥ नुचंबळे पूर्ण कुंभ। जो आत्मसाक्षात्कार स्वयंभ। तो प्रत्यक्ष जाणावा थोंब। ऐशी वृत्ती जाणावी ॥ २७ ॥ सदा चंचळ चपळ स्थिती। दृष्टी झेपावे ती विवृत्ती। ऐसी मीनाची गती। आपुलेनि वर्ते ॥२८॥ एवं स्थिती मतिद्वयें। प्रेमळें मनीं ओळखुनि घ्यावे।

येके सत्यव्रती भावें। नांव काय रायाचें ॥२९॥ तुझिया बाळा देखो न शके काळा। भुरळ डोळ्याचा आंधळा। झडपोनी जातो त्याला। भिऊं नको घरीं येऊं देऊं नको। मन मुष्टीमाजीं धरी। मी सांगेन तैसेंची करीं रे राया ॥३०॥ एके वोवाळुनी देइ। साबण सरकी गाईचें शेण। तांबड्या गुंजा मुष्टिये एक लोन। तांबे नाणें कालवून। तिहीं ठायीं टाकी ॥ ३१ ॥ एकमती बोलून जातो। जळीं राख स्थळीं राख। आपुला शेजार राख। पाजार राख। आब्रह्मस्तंबपर्यंत। रखरक्ष हुं फट् स्वाहा ॥३२॥ ही नंददेशींची विद्या खरी। तुझ्या बाळाचें विघ्न निवारी। काळकंटक दूर करीं। मग नांदशील स्वानंदें ॥३३॥ आतां बाळाचें नांव सांगे स्पष्ट। तुझिया पोटींची आत्मनिष्ठ। जेव्हां झाली अप्रतिष्ठ। जांवाई तो सुलक्षणी साळंकृत। ॥३४॥ परी तो सत्त्व गुणाची राशी। सप्रेमता लावी रुची। निजवाक्यार्थ परम साची। महिमा इची देवगणीं ॥३५॥ देवगणी असे। प्रकृत गुणी विषमशामा नसे। राक्षस गणीं आशेषे। वोळखोनी घ्यावें ॥३६॥ आतां घरधन्याचें नांव काय। केशव कीं माधव कीं गोविंद। कीं विष्णु कीं प्रद्युम्न। कीं पुरुषोत्तम कीं अधोक्ष कीं रामु। देव बुद्धीसंगें घटवावा उतरलें नांव घरधन्याचें ॥३७॥ जरी तो म्हणूं काळानिळा। परी तो वर्णव्यक्ती वेगळा। दिठीचा चुकवोनी डोळा। दिसतो सोहळा घरधन्याचा ॥ ३८ ॥ नामें व्युत्पत्ति बोध। आपण घेतां शोध। उरला तो सोहं बोध। नामरूपें ॥३९॥ अगा बायको एक आहे। उगीच आदळी हातपाय। चोरूनी परघर जाये। ती मोठी जघभ्याड होई राया ॥४०॥ प्रसिद्ध जो अविवेक। तोचि जाण तिचा लेक। सरळ वाढलासे फोक। महाठकु ॥४१॥ चउथ पंचमीचे आइतवारी। एक हळदीचा मुटकुळा करी। वोवाळूनि टाकी बाहेरी। तिहींसांजा ॥४२॥ एक घरचा माणुस वाकडे पायाचा। पिचक्या डोळ्याचा लटक्या बोलाचा। त्यास क्षणीं पतकरशील तर ॥४३॥ बापुडा नारदु पाहिला। घडीमध्यें गाभणा केला। चंद्रासी कलंक लाविला। तयाचेनीं ॥४४॥ शंकराचा झाला वीर्यपात। रावणाचा करविला घात। विष्णु विचकुनी दांत। वृंदा वृंदा वोसणतसे ॥४५॥ ब्रह्मा धांवे सरस्वती मागं। इंद्र जाला सहस्र भगें। भस्मासूर भस्म जाला वेगें। वाली निमाला रामबाणें ॥४६॥ आतां धनघट दे कण। एक तोळा दे दान। दे मज नको करूं अनुमान। घे मज पिंगळ्याची वाचा ॥४७॥ काय देतील कुडे। रितें अवघेंचि उघडें। खोटें नाटें जटे मुटे। अविवेकी ॥४८॥ अतिताची आशा हरे। दात्यांचे तो दुणे भरे। जें दिधलें तें कल्पांतीं न सरे। ऐसें कांहीं देइजे ॥४९॥ आजी धन्य पावलों सभा। जीवीं जन्माची जाली शोभा। कर जोडोनि राहीन उभा। महाद्वारीं देवाचें ॥५०॥ एक छत्रांचें राणिव। मोक्ष मोकाशी दिला गांव। जगविख्यात विश्वासी नाम। नाचेन आवडी गाउनी ॥५१॥ एका जनार्दनीं संतांचा लाडिवाळ। पोटीं रिघोनि जाला बाळ। कृपा केली सर्वकाळ। अभय वर देउनी ॥ ५२ ॥

## दिवटा.

३७२८ जागे जागे या वाडियामध्यें जागे। या वाडिया बाहेर जागे। कितीएक तळमळ करीत गेले। हेंचि खिडाराचे खिंडार ॥ ध्रु. ॥ कोण्या गृहस्थाच्या वाड्या। कोण्या गृहस्थाच्या पेढ्या। लवकरी काढा बैसावया घोडा। करी या शब्दाचा आडा मोडा। तरीच लेंकुराचा खेळ कीं रे राया ॥१॥ पैल लंकेचा चोहटा। तेथें मी एक बोलिलों दिवटा। तो रांडेचा रावण म्हणे हा दिवटा खोटा। राक्षसावाणीच बोले ॥२॥ तेव्हां राम अवतरला त्यानें एकचि खांडें। दहा शिरांची मुंडें। विसा भुजांची खांडें। त्या लंकेपुढें घोष मांडिले। आणखी त्या बायकोच्या छंदें ॥३॥ हिरण्यकश्यपाला फुटला फांटा। तो रांडेचा म्हणे हा दिवटा खोटा। मी म्हणें मरण नाहीं मला। तो म्हणे जिवें मारीन तुला। इतक्यामध्यें नरसोबा म्हणे अवतरला। डोळे फिरवी गरगरां। दांत खाय करकरां। कोंभा चकचकवला। हळु गांड्याळीचे द्वारीं। दे दान मज दिवट्याला। नाहीं तरी नागवसी या बोलाला। आणखी दान देगांवच्या जोशाला॥४॥ तेणें विघ्न टळेल तुझें। मण पांच कणिकेचा दिवा। मध्यें मण पांच घृत। सोळा हात पासोडा। दीड तोळा सोन्याचा माकोडा। ऐसें द्यावया दान। एक दाता जनार्दन। इतर लंडी काय देऊं जाणें। एका जनार्दनाचा दिवटा। भक्तीच्या वसविल्या पेठा। सायुज्यताची नरदेहीं ॥ ५ ॥

## कोल्हाटी.

३७२९ आम्हीं कोलाटी कोलाटी। आमुचे उडी उलटी सुलटी। शून्य स्थावर दिधली गांठी। त्यास

जंगम केली उफराटी गा ॥ १ ॥ सोहं शब्द ढोलकें पिटी । आमचें वास्तव्य तिरपुटी । आमच्या खेळांत पडली मिठी । पहावी करूबाची आटाआटी गा ॥२॥ आली कोल्हाटी प्रेमळू । ब्रह्माविष्णु जयाचे बाळू । महाप्रपंच रोविला वेळू । खेळ केला त्यानें तुंबळू गा ॥३॥ आमुचा खेळ हा पाहून । सगुणासी लागलें ध्यान । त्यानें केलें निर्गुण । ऐसें बोले एका जनार्दन ॥ ४ ॥

३७३० सोहं सोहं वाजे ढोल । आमुचा युगायुगींचा खेळ । परब्रह्म भुललें अकळ । या खेळाचें गुरु आणें मूळ ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु शिवादि साचार । आधीं होते निराकार । माझे कोल्हाटीयाचा प्रकार ॥ २ ॥ खेळे परात्पर उपरी । चैतन्याचे महा शिखरीं । वेळू रोविला श्रीसोहंपुरीं । खेळे खेळले नानापरी ॥३॥ आमुचा खेळ पाहून । निर्गुण तें जाहलें सगुण । शरण एका जनार्दन । गेला तनु मन विसरून ॥ ४ ॥

## डोंबारी.

३७३१ लगे ढोल लगे ढोल । जरी तुझा वस्ताद खोल । तरीच मशीं बोल । नाहीं तरी वायां फोल । जाई जाई रे गव्हारा ॥१॥ मी निराकाराचा डोंबारी । तिहीं लोकीं माझी फेरी । चार युगांच्या खबरी । तुज सांगेन रे गव्हारा ॥ २ ॥ प्रथम खेळ कैलासगिरी । वेळू रोविला निर्धारीं । शंभु राजा राज्य करी । त्याचें उदारत्व भारी । तुज सांगेन रे गव्हारा ॥ ३ ॥ आत्म लिंग आणि पार्वती । ती दिधली दशकंधराप्रती । त्याच्या उदारत्वाची ख्याती । नाहीं नाहीं त्रिजगतीं । धन्य त्या शंभूची याद कर ॥ ४ ॥ दुसरा खेळ वैकुंठीं । श्रीमंत महाराज विष्णु जगजेठी । तेणें दैत्य मारिले कपटी । क्षीरसागर तटीं रहिवास केला । धन्य त्या विष्णूची याद कर ॥ ५ ॥ अवतार धरिले मच्छ कच्छ वराह नारसिंह वामन फरशधरा । तिसरा खेळ अयोध्यापुरा । धाक दरारा शत्रूशीं । धन्य त्या विष्णूची याद कर ॥ ६ ॥ सूर्यवंशीं राजे भले । शिब्रीनें मांस दान केलें । वैकुंठनाथा संतोष दिलें । नगर नेलें मोक्षाप्रती । धन्य त्या शिब्रीची याद कर ॥ ७ ॥ तैसाची हरिश्चंद्र राजा पुण्यराशी । राज्य देऊनी ब्राह्मणासी । आपण जाउनीं वाराणशी । पुत्रपत्नीशीं विकिलें । धन्य त्या हरिश्चंद्राची याद कर ॥ ८ ॥ दैत्यवंशीं राजा बळी । तेणें तप केला वनमाळी । देहदान देऊनि पाताळीं । देव आपणाजवळीं ठेविला । धन्य त्या बळीची याद कर ॥ ९ ॥ राजा अजपाल भगीरथ । दशरथवंशीं जन्मले रघुनाथ । त्याच्या औदार्याची मात । पहातां वेदशास्त्र शिणले । धन्य त्या रामाची याद कर ॥ १० ॥ त्या खेळाचा नवलाहो । देवा न कळे अभिप्रावो । वेदां श्रुतींशीं नवलावो । अगम्य पहाहो सनकादिकां । धन्य त्या श्रीकृष्णाची याद कर ॥११॥ ऐसा गुलाबराव महाबळी । तेणें भल्याभल्याशीं केली रळी । खेळ मांडिला गोकुळीं । कृष्ण वनमाळी खेळत । धन्य त्या कृष्णाची याद कर ॥ १२ ॥ तसरीपा दिधल्या अमूप । त्यासी नाहीं पुनरावृत्तीचें माप । आपण राहुनि साम्यप । रूपारूप मेळविलें । धन्य त्या महाराजाची याद कर ॥ १३ ॥ पुढें द्वापारयुगाचा उदयो । म्यां बरोबर घेतिला कामाजी गुलाबरावो । तेणें ठकविलें मोठे मोठे पहाहो । तुज सांगेन रे गव्हारा ॥ १४ ॥ नारदासी डोळा घातिला । विश्वामित्र फारच नागविला । पराशर वस्त्र टाकूनि पळाला । लबाडी नव्हे माझिया बोला । तुज सांगेन रे गव्हारा ॥ १५ ॥ ब्रह्मयाची घेतली लंगोटी । इंद्र पळाला कपाटीं । चंद्रासी काळोखी मोठी । अद्यापि जन दृष्टी । पहाती रे गव्हारा ॥ १६ ॥ पुढें कलीयुगा माझारीं । भूवैकुंठ श्रीक्षेत्र पंढरी । पुंडलीक पाटलाचे द्वारीं । खेळ जोडिला लवकरी । मागितला धन्य त्या पुंडलीक पाटलाची याद कर ॥ १७ ॥ नगरांत डोंबारी आले । उदंड खेळ खेळोनि गेले । परी पुंडलीक भाग्य श्री विठ्ठलें । न कळे ऐश्वर्य कोणासी । धन्य त्या पुंडलीक पाटलाची याद कर ॥ १८ ॥ खेळ खेळतां अंग हारपलें । चित्त मन उन्मन झालें । कीर्तनसुखें निवालें । एका जनार्दनीं ऐसें केलें । धन्य त्या श्रीविठ्ठलरायाची याद कर ॥ १९ ॥

## कैकाई.

३७३२ श्रीकृष्ण माया जी पाहे । तें मी झालें कैकाय । कैकाय देवाचें अंग । कैकाय झालें जग । कर्म ब्रह्म रे विभाग । त्यापासोनि कळों आम्या ॥ १ ॥ गोरी आई ओ आम्या । सावळाई ओ आम्या । बरव्या नामाची ओ आम्या । बरव्या रूपाची ओ आम्या । शूळगुळाई ओ आम्या ॥ २ ॥ मत्साई कत्साई वो । वराई वो नरसाई वो । वामनाई वो ठेंगणाई वो । परसाई वो रामाई वो । कृष्णाई वो बोधाई वो ।

काळकाई वो आम्या ॥ ३ ॥ गंगाई वो भागाई वो रेणुकाई वो गडबडाई वो। चांगुणाई वो तुकाई वो आम्या ॥ ४ ॥ काय तुझ्या भयाचें सदा पाहे। सांगणें बोलणें न चले वो माये। तुझ्या जीवींचें सांगेन। तूं जें पुससील तें सांगेन। तुझ्या मनींचें सांगेन। जें सप्त पाताळाखालीं तें तूंच तुजमाजीं। तेंच मजमाजीं। काय धमक घेऊनि बसलीस गे धमकटी। तुझ्या धन्याची आस करीन। कीं कांकडाची चाड धरीन। थुः तुझ्या तोंडावरी। थुः तुझ्या लोभावरी। शकुन सांगेन तें ऐक। काळीकाई वो आम्या ॥ ५ ॥ मागूं त्या वुरगुंडा। नीट केल्या बहुत रांडा। तैसी नव्हे मी कैकाय। निजज्ञान करंडा। काळीकाई वो आम्या ॥ ६ ॥ नमो कानडी भाषा। केळीव शीघ्रता। शकुन केळी शकुन केळी साइयो नमो आर। सीड बीड आशा। बीड ह्याळावा। गन्मोड होउंगे आम्या ॥७॥ गंदिनें धनाम्रे तमिन्ने गवीनें हाडव्याण। आडाव्याडा मोहो शाई तुडा। काळा आई ओ आम्या ॥ ८ ॥ नमो तैलंग दिशा कच्छ कच्छ भाषा। सरावें मुसळ ह्लोपे आम्या ॥ ९ ॥ मित्ति खन्नाळू कड्याळू। इन-याळू। सखठाये। काळी आई ओ आम्या ॥ १० ॥ कैकाय कैकाय। शकुन सांगेन ते ऐक। कैकाये कैकाये न कळे ब्रह्मादिकां। कैकाय वृत्ति खोटी। कैकाय कैकाय। सत्य सांगेन गोष्टी। जीवाशिवा पडली मिठी। एका जनार्दनाच्या कोटी। काळीकाई वो आम्या॥

## मानभाव.

३७३३ कामक्रोध आम्ही बांधोनियां पायीं। मत्सर भेद अहंकार अव्हेरिला वाई ॥ १ ॥ मानभाव बाई। आम्हा भिक्षा वाढा कांहीं ॥ धृ. ॥ आशा मनशा तृष्णा यांची केली पायमोडी। कल्पना आदि भ्रांती इच्छा पायीं घातली बेडी ॥ २ ॥ महादेवाच्या सात पिढी सांगूनिया देऊं। सोन्या रुप्याचे देव आम्ही ठेवोनियां खाऊं ॥३॥ भाव आणि भक्तीचा गडबड-गुंडा केला। एका जनार्दन पायीं मानभाव झाला ॥४॥

३७३४ आतां मानभाव झालों भिक्षा वाढा बाई। भिक्षा वाढा बाई ॥ धृ० ॥ मुळींचाचि मानभाव वस्त्रें काळीं केली। कोरके मागून झोळी भरली। उलटी काठी धरली ॥ १ ॥ सोन्यारुप्याचे देव आम्ही मोडू-नियां खाऊं। शेंदराचे देव आम्ही दृष्टी न पाहूं ॥२॥ एका जनार्दनीं मानभाव झाला। झोळीवरती झोळी ठेवूनि गडबडगुंडा केला ॥ ३ ॥

३७३५ जाहलों आम्ही मानभाव। आमच्या देहीं भोळा भाव ॥ १ ॥ आम्हां दुजेपणा नाहीं। हासूं खेळूं भलते ठायीं ॥२॥ जपूं सदा कृष्ण नाम। नाहीं आणि-काचें काम ॥ ३ ॥ करूं गडबडगुंडा। मारूं यमाचिया तोंडा ॥ ४ ॥ शेंदरे हेंदरे देव। तयां कोण पूजी वाव ॥५॥ एका जनार्दनीं ठाव। आम्ही झालों मानभाव ॥

## माळी.

३७३६ आत्माराम आपण धनमाळी वो। ज्ञान कुदळी घेउनि वाफे चाळी वो। जाई जुई लाविल्या दोन्ही ओळी वो। निज योगिनी शिंपिती वेळोवेळीं वो ॥ १ ॥ पूर्व पश्चिम उत्तर दक्षिण वो। या मळ्याचे सारिखे चारी कोन वो। रक्षण तेथें ठेविले पांचजण वो। प्राणापान व्यान उदान समान वो ॥ २ ॥ बावन पायऱ्या रे विहिर निर्धारी वो। सतत उपसा होतसे परोपरी वो। ऐसी विहीर ओळली क्षीरसागरीं वो ॥ ३ ॥ वोडवेचें चाक सत्राबी घडघडाट घो। सोहं दोर लाविला त्याला नीट वो। शांती क्षमेची रहातेस मोट वो। निजनयना चालविला पाट वो ॥४॥ हातीं खुरपें घेतलें विवेकाचें वो। समूळ मूळ खुरपिलें वासनेचें वो। प्रत्यक्ष फळ लाधलें आत्म साचें वो। एका जनार्दना माळी तेथें नाचे वो ॥५॥

## जंगम.

३७३७ भाव तोचि भगवा चिरा। मुळींचा तंतु शिव दोरा। आत्मलिंग पुजूं बरा। मी आलों तुझिया द्वारा बापांनो ॥१॥ गुरुधर्म कोरान्न भिक्षा। परात्पर आमची दीक्षा रे बापांनो ॥ धृ. ॥ देह दंड-काठी हातीं। आशा जाळूनी लाविल्या विभुती। दया क्षमा आणि शांती। आम्ही जंगम ऐशा रीती रे बापांनो ॥२॥ हरिनामाच्या घालोनि माळा। गुरुदीक्षेचा सोहळा। साधुसंत जाणती कळा। एका जनार्दनीं भोळा रे बापांनो ॥ ३ ॥

## बायला.

३७३८ बाय माझ्या बापाचा बायला झाला। गोड गोड लिंबच वांटून प्याला। अठरा मुलें झालीं त्याला ॥ १ ॥ बाय माझे बापानें पोट फाडिलें पोट फाडिलें ॥धृ.॥ माझा बाप करितो चाळे। गरवार झाला तिसरे

वेळे। बाळ मांडीवर खेळे ॥ २ ॥ माझा बापहि गुणकारी। सहा मुलें झालीसे उदरीं। टाकूनि गेला देशावरी ॥ ३ ॥ माझा बाप अविनाश। निर्गुण आला आकारास। एका शरण जनार्दनास ॥ ४ ॥

## दादला.

३६३९ मोडकेसें घर तुटकेसें छप्पर। देवाला देव-घर नाहीं ॥ १ ॥ मला दादला नलगे बाई ॥ धृ. ॥ फाटकेंच लुगडें तुटकीसी चोळी। शिवाया दोरा नाहीं ॥ २ ॥ जोंधळ्याची भाकर आंबाड्याची भाजी। वर तेलाची धार नाहीं ॥ ३ ॥ मोडका पलंग तुटकी नवार। नरम बिछाना नाहीं ॥ ४ ॥ सुरतीचे मोती गुळधाव सोनें। राज्यांत लेणें नाहीं। एका जनार्दनीं समरस झालें। तो रस येथें नाहीं ॥ ५ ॥

## पोर.

३७४० ऐक रे ब्राह्मणाच्या कारट्या। वलवल करूं नको पोरट्या। बोलणें अवघें वोखट्या। हित नाहीं ॥ १ ॥ आपुलें तूं हित पाहीं। वेदशास्त्रीं कांहीं नाहीं। पुराणें पढोनि केलें काई। हित नाहीं ॥२॥ कामक्रोधें शरीर भरलें। ज्ञान वैराग्य हारपलें। बोलसी विषयाच्या बोलें। हित नाहीं ॥ ३ ॥ आपुलें हित करी कांहीं। सद्गुरूसी शरण जाई। मीतूंपणा नुरे कांहीं। हित पाहे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पोर। केला सारासार विचार। पावला सद्गुरु द्वार। हित जालें ॥ ५ ॥

३७४१ आरता ये रे धाकुट्या मुला। कशानें थोरपण तुला। उलीसेंच कीं रे दिसतें पोर। ब्रह्मी नाहीं लहान थोर। तुला ब्रह्म ठाउकें आहे। सर्वां घटीं तेंचि पाहे। ब्रह्मीं नाहीं भेदाभेद। ऐसें बोलती चारी वेद। तुझा भेद गळाला। सद्गुरुनें बोध केला। भेद म्हणजे काय रे गड्या। आत्मस्वरूप पाहीं रे वेड्या। उलीसेंच पोर चावट मोठें। थोरपण असून चहाड खोटें। माझें मन चहाड झालें। ज्ञानामुळें गर्वासीं आलें। गर्व जाईल कैशापरी। सद्गुरुचें दास्य करी। सद्गुरुकृपा तुलाच झाली। भूतमात्रें भरूनि उरली। तरी काय एक एक नेलें। अविश्वास बुडूनि मेले। विश्वास काय साच केला। हा तो निश्चय पुराणीं झाला। सद्गुरुविना तरेना प्राणी। सांगे तरला आहे कोणी। भजन तरी करावें केव्हां। सोहं मंत्रीं नाहीं गोवा। जपावें तरी कोणे दिवशीं। नेम नाहीं दिवसनिशीं। सद्गुरुसी शरण जाईना तरी। चौऱ्यायंशीचे पडशील फेरीं। म्हातारपणीं भक्ति करूं। आयुष्य काय तुझें आज्ञाधारू। धाकटेपणीं भक्ति केली। सद्गुरूची संगत जाहली। संगतीनें कोण कोण तरले। महापातकी उद्धरिले। पहिलें तें कोळ्याचें पोर। अजामेळ चोखामहार। ऐसे तरले किती एक पोरा। भिती नाहीं रे गव्हारा। जाबास जाब फार देतोस। बोलूं नये तें बोलतोस। उगाच रहा नाहीं तर देईन दोन काठ्या। अहंकारा होशील खोट्या। तुझा माझा वाद झाला कीं रे फार। पांच पोरांनीं घेतलें घर। पांच पोरें कोणाची। आत्माराम गड्याची। सारा खेळ। त्याचाच काय रे। खेळ खेळून निराळाच कीं रे। हा खेळ तुला कशानें कळला। एका जनार्दन कृपें फळासी आला ॥ १ ॥

## भुत्या.

३७४२ भवानी मी तुझा भुत्या खरा ॥ धृ. ॥ अनुहात चवंडक वाजत डुगडुग। होतो घोष बरा ॥१॥ बोधाची परडी ज्ञानाचा संबळ। अज्ञान तो पोत खरा ॥ २ ॥ एका जनार्दनीं भुत्या मी जालों। तुझे पायीं मी खरा ॥ ३ ॥

## वाघ्या.

३७४३ अहं वाघा सोहं वाघा प्रेमनगारा वारी। सावध होऊनी भजनीं लागा देव करा कैवारी ॥१॥ मल्हारीची वारी माझ्या मल्हारीची वारी ॥ धृ. ॥ इच्छा मुरळीस पाहूं नका पडाल तर नरकद्वारीं। बोध बुधली ज्ञान दिवटी उजळा महाद्वारीं ॥ २ ॥ आत्मनिवेदन भरित रोडगा निवतील हारोहारीं। एका जनार्दनीं धन्य खंडेराव त्यावरी कुंचा वारी ॥ ३ ॥

## मल्हारीची वारी.

३७४४ वारी वो वारी। देई कां गा मल्हारी। त्रिपुरा हरी। तुझे वारीचा मी भिकारी ॥१॥ वाहन तुझें घोडयावरी। वरी बैसली म्हाळसा सुंदरी। वाघ्या मुरळी नाचती परोपरी। आवडी वेसी पाहीन जेजुरी ॥ २ ॥ ज्ञान कोटंबा घेउनी आलों द्वारीं। बोध भंडार लावीन परोपरी। एका जनार्दनीं विनवी श्रीहरी। वारी देउनी प्रसन्न मल्हारी ॥ ३ ॥

## संन्यासी.

३७४५ अहो तुम्ही संन्यासी जाला। कामक्रोध जवळीचा नाहीं गेला। व्यर्थ कां विनाश केला।

सावध होई ॥ १ ॥ संसार व्यर्थ सांडिला । मुला बाळा तुटि पाडिला । नारायण नाहीं जोडिला । सावध होई ॥ २ ॥ वर वर शेंडी बोडी । जानवें तोडुनी धोत्रें फाडी । हातीं घेउनी दंड लांकडी । सावध होई ॥ ३ ॥ वर वर म्हणसी नारायण । अंतरीं विषयावरी ध्यान । कासया संन्यास घेऊन । सावध होई ॥ ४ ॥ आतां एक विचार । धरीं तूं संतांचा आधार । एका जनार्दनीं तत्पर । सावध होई ॥

## चोपदार.

३७४६ चोपदार आला चोपदार आला ॥ धृ. ॥ माझे चोपदाराचें राहणें । आकाश स्वर्ग पाहणें । चतुर्मुख चकीत होऊन । निराकारीची वस्ती दिधली विष्णूनें ॥ १ ॥ शंख चक्र गदा घेऊन । महादेवीं शून्य द्वारपाळ जाण । कळिकाळा टाकीन छेदून । रंडी चंडी शक्ति टाकीन भेदून । चोपदार आहे मी जाण ॥ २ ॥ आम्हास नाहीं उपाय । आम्हास नाहीं बाप ना माय । खरी चाकरी कोठें करावी । एका जनार्दनीं दृढ धरावी ॥ ३ ॥

३७४७ चोपदार प्यारे । हम तो चोपदार प्यारे ॥ धृ. ॥ देखो सरकारनका दस्त । क्यौरे भाइ हुवा मदमस्त ॥ १ ॥ जब आइगी साहेबकी चिटी । जाब देना खुन है उलटी । बात बोलने लगे मिठी । चीटी लेगैरे ॥२॥ एका जनार्दनकी पायी । वो त्रैलोक्यनका साई । उनकी क्या कहूं बराई । वोही सबसे न्यारा ॥

## कोल्हाटीण.

३७४८ अनादी सद्‌गुरू पूर्ण परात्पर अभेद नामियेला । कायावाचामनें शरण गेलों मी त्याला । मूळचा सर्व ठाव तेणें मज दाखविला । ज्ञानांजन घालूनि प्रवृत्ति मार्ग खुंटविला । पूर्ण बोध पाठविला ॥ १ ॥ कोल्हाटीण झालें बाई मी कोल्हाटीण झालें ॥ धृ. ॥ प्रवृत्तीचें वस्त्र फेडुनी सुखा सुखी रिझलें । परात्पर पर पुरुष पाहूनि त्यापाशीं मी गेलें । अंगसंगती करून त्याचें सुख म्यां हरविलें । अधरामृत म्यां सेविलें । कोल्हाटीण झालें ॥ २ ॥ आशा मनशा तृष्णा ह्या तिन्ही मेळविल्या रांडा । भाव चोहटा वेळू तेथें लावियला झेंडा । करून उलट प्राणाचा क्रोध तो मारिला मेंढा । ब्रह्मरंध्रीं मिसाळिलें आला अमृत लोंढा । मग तो अहंकार मेंगा त्यांनीं या भुलाविलें सोंगा ॥को.॥ ॥३॥ मागें सारून कामें मारिली उफराटी उडी । भ्रांती लुगडें फिटुनि गेलें काया झाली उघडी । पूर्ण अनुभव कळुनी त्यासी मांडिली फुगडी । मदन मोहना दादुला घेऊन झाले ते हिजडी ॥को.॥ ॥४॥ परद्वार म्यां केलें जन्मसार्थक झालें । पंचवीस दादुले हातीं धरुनी उठविले । अंतरगृह सावलीत नेऊनि निश्चळ बैसलें । एका जनार्दनीं एकी एकपण मुरालें । जन्म जरा मरण हरलें ॥को.॥ ॥५॥

३७४९ सगुण गुण माया । आली कोल्हाटीण खेळाया ॥ धृ. ॥ प्रपंचाचा रोविला वेळू । चहूं शून्यांचा मांडिला खेळू । ब्रह्मा विष्णु जयाचें बाळू । लागती पायां ॥ १ ॥ आला मंड निर्गुणाचा कोल्हाटी । सोहं शब्दें ढोलगें पिटी । चैतन्याची उघडून दृष्टी । चला जाऊं पहाया ॥ २ ॥ कोल्हाटीण मारती ऐशी उडी । एकवीस स्वर्गांवरती माडी । देखे द्वार खिडकी उघडी । अगाध माया ॥३॥ कोल्हाटीण बसली असे डोळां । जाणे गुरुपुत्र विरळा । एका जनार्दनीं लीळा । जाती वर्णाया ॥ ४ ॥

## भटीण.

३७५० अगे ऐके भटणी । कां बोलसी चावटणी । जन्मांतरीं पाळिलें म्हणोनी । उपकार फेडिसी ॥१॥ काय बोललीस बोल । अवघा सारा फोल । अंगीं नाहीं भक्तीची वोल । भटणी तुझ्या ॥२॥ कामक्रोधें माजली । विषयानें भुलली । गुरुकृपा नाहीं जाली । भटणी तुजला ॥ ३॥ अहंकार सोडोनी देई । सद्‌गुरुसी शरण जाई । भक्तिसुखें तूं राहीं हो भटणी ॥ ४ ॥ भट बोलला बोली । भटणीची अहंता गेली । भटणी ती स्थिर जाली । एका जनार्दनाचे पायीं ॥५॥

३७५१ मी भटीणें आले रे भटा । नको करूं रिकाम्या चेष्टा । काय बोलतोसी चावटा । उगीच चेष्टा करूं नको ॥ १ ॥ म्यां भटणीनें तुज पाळिलें । पाळिल्याचें बरेच उपकार फेडिलें । माझें मज आणून दिलें । त्यांत तुझें काय गेलें रे भटा ॥ २ ॥ मजपासूनि वेद कीं रे झाले । ते म्यां तुझ्या हातीं दिधले । शंकासुरानें चोरून नेलें । माझ्याच भयानें ते परत आणिले रे भटा ॥ ३ ॥ त्याच्याच आधारानें मी बोलत आहे । काय रे मस्ती तुशी आली आहे । मस्ती तुझी भटा ठाउक आहे । आपलें अंतरीं शोधून पाहे रे भटा ॥ ४ ॥ लहानाचा थोर तुला म्यां कीं रे केला । नव

अवताराच्या हातीं भला। दहावा कलंकी राहिला। तोहि जाईल विलया रे भटा ॥ ५ ॥ एका जनार्दनीं कारण। भटाचे हारपलें मीपण। उगाच गेला मौन धरून। चैतन्यरूप पाहिलें रे भटा ॥ ६ ॥

## कुंटीण.

३७५२ सद्गुरुमाय कुंटीण झाली माझी। व्यभिचारा ठेविलें सये आजी ॥ ध्रु. ॥ अद्वैताचा मज पांघरविला शेला। एकांतासी तिनें चालविलें मला ॥ १ ॥ पर पुरुषाचे शेजेवरी नेउनी घातली। मागल्याची सोय सोडविती झाली ॥ २ ॥ भ्रांती पदर काढुनी ओढिती झाली। आलिंगन घ्यावया सरसावली ॥ ३ ॥ वासनेचे कंचुक सोडियेले। मायामय कुच हे मर्दियेले ॥ ४ ॥ जीव शीव मिठी घाली धरीं आवळून। करून ऐक्यता माझें चुंबील वदन ॥ ५ ॥ अलक्ष पदातीत घातलें आसन। देहातीत भोगिला भोग त्यानें ॥ ६ ॥ एका जनार्दनीं भोळी नारी। परपुरुष भोगी निरंतरीं ॥ ७ ॥

## जगझोडी.

३७५३ जग झोडी जग झोडी। नांव ठेविलें लाडी ॥१॥ पाल मांडिलें वेशीपाशीं। आला गेला भोगितो मशी ॥ २ ॥ नाहीं लागत अडका रूका। काम लाटा फुकाचें फुका ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जोडी। याची संगत मी न सोडीं ॥ ४ ॥

## कंजारीण.

३७५४ होहोरी होहोरी हो। लेवरे रसी। लेनेवाला हैं पर देनेवाला नहीं ॥ हो. ॥ देनेवाला हैं पर लेनेवाला नहीं ॥ हो. ॥ नीसंग आडती । केतान तोडा अकारी पडघा। आधा सान जोडा ॥ हो. ॥१॥ तेलंगी वाडवा। पुलान पुलवा। साधन करावा। मन आशा फेडवा ॥ हो. ॥ २ ॥ फुलवान नवरा। अडा तीन तंगी। नीतंग कोडता। तंगीन हाडी ॥ हो. ॥ ३ ॥ जनार्दनीं पडवा। कंजारीण लढवा। कोकनीक करवा। दातारु बरवा ॥ हो. ॥ ४ ॥

## शंखीण डंखीण.

३७५५ बहात्तर कोटी कात्यायनी। त्यांत या शांखिणी डांखिणी। तृष्णा वासना पापिणी। जन्मोजन्मीं गोविती ॥ १ ॥ मोहो कुंकुम कपाळीं लावूनी। विशाल स्वरुप अवगुण। लोकांलागीं भय दावून। भाविक जन भेडसावी ॥ २ ॥ तृष्णासन विशाळ। जग मोहियेलें अनुमाळ। घालूनियां मायाजाळ। जग थई थई नाचवी ॥३॥ जग पडलें भ्रांतीत। विसरलें आपुलें स्वहित। यांत आहे आपुला घात। हे तों कदा न समजती ॥४॥ वर बेगडाच्या रंगा। काय भुललासी जगा। होय गुरुपदीं जागा। याचलागीं प्रवृत्ती ॥५॥ एकनाथाचें विंदान। एका जनार्दनीं जोडे ज्ञान। त्यागुनी गुण अपमान। चरणीं ध्यान लाविलें ॥६॥

३७५६ हाट करूनी घरासी आणली बसली वसरीच्या काठीं रे। घरची बाईल बाहेर निघाली वस वसून लागे पाठीं रे ॥ १ ॥ शंखीण बाबा डंखीण त्या घरीं शंखीण बाबा डंखीण रे ॥ धृ. ॥ चौ शेरांचा वरण-भात केला वर भाजीचा गोळा रे। मोठे मोठे घास घेती भुरळ फिरवी डोळा रे ॥ २ ॥ आठ भाकरी बारा पोळ्या धिरडीं खादली सोळा रे। पाणी पिउनी ढेकर दिला मराठी तिचा मोळा रे ॥ ३ ॥ बारा सोळा लुगडीं नेसली येइना पाठिपोटीं रे। नव खणाची चोळी शिवली उराशी येईना गाठीं रे॥४॥ एका जनार्दनीं म्हणे बाबा ऐशी बाइल केली रे। तिच्या भयानें सर्व दैवतें पळुनियां गेली रे॥

## मुलगी.

३७५७ आरते येग धाकुटे मुली। हीच काय तुमची बोली ॥ १ ॥ घरादाराचे हितकर्ते। फुटक्या मडक्याचें भोंक बुजविते ॥ २ ॥ अटकमटक नऊ वाटा। येऊन बसे दहा दारवंटा ॥ ३ ॥ दहा दारवंटा तें कोण। तुझ्यांत गेले दोन ॥ ४ ॥ फटक माझे सवती। तुला सहाजण झोंबती ॥ ५ ॥ पडले षड्विकारांच्या हातीं। सद्गुरूचे पाय धर चित्तीं ॥६॥ सद्गुरु काय देईल ग मला। तन मन धन अर्पण करील त्याला ॥ ७ ॥ संसार जाईल सारा। उद्यां येईल काळाचा फेरा ॥ ८ ॥ आम्ही नर नारी पतिव्रता। विष्णुवर करूं सत्ता ॥ ९ ॥ एका जनार्दनीं केला संग। योगी खेळविला पांडुरंग ॥ १० ॥

## नकटी.

३७५८ अभावाचें नाक लावूनियां लोभें। वरदळ भक्ति तैशापरी शोभे ॥ १ ॥ नकटीचा गुण उपहास लोकां। दांभिक भक्ति तैशी तुम्ही देखा ॥ २ ॥ काजळ कुंकू माथां वेणी। नकटी सुंदर म्हणेल कोणी ॥ ३ ॥ नकटीचा संग करी तोचि साजे। दांभिक

भजनातें देवोचि लाजे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भावें-वणि । कुसरीचें भजन तें नकटेपण ॥ ५ ॥

## सौरी.

३७५९ हुली गाय हुली शिंगें वासरूं जालें कोसें । प्रकृतिपुरुषा भांडण जालें खाटलें जालें वोसें ॥ १ ॥ चाल रामराया । लागे तुझ्या पाया ॥ धृ. ॥ आनकाई वरिष्ठकाई त्यावरी बैसला खुभा । मिसकीन मामी फुसकून पादली जांवइ हागे उभा ॥ २ ॥ नाहीं नर नाही नारी नाहीं तेथें योनी । हुसकून गेलें सावलें तेथें परतले दोन्ही ॥ ३ ॥ वेणी फणी काजळ कुंकूं केला टाकमटीका । पाठीची बाईल प्रकृति भली संसार करी निका ॥ ४ ॥ चांग भांग करुनी गेली केतकी बनां । सोळाजणें लेकूरें जालीं दादुला नये मना ॥५॥ कार्यास्तव सौरी चाले डौर उजवे करी । मातापुरी यात्रा भरली उदो रेणागिरी ॥ ६ ॥ जाती वर्ण कूळ-धर्म नुरेचि आम्हा कांहीं । एका जनार्दनीं शरण तनु-मन तयापायीं ॥ ७ ॥

३७६० सहा दादुले केले परी म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला । काया वाचा रमलें त्याशीं परी म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ १ ॥ सौरी झालें सौरी सखे बाई झालें त्याची नवरी ॥ धृ. ॥ नग्न होउनी भोगिला पुरुष म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला । देतो गोड गोड खाया परी म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ २ ॥ केला संसार गोड परी म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला । याचे मनाची पुरविली खोड परी म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला ॥ ३ ॥ ऐसी सौरी झालें परी म्यां ऐसा नाहीं देखिला दादुला । एका जनार्दनीं नमिलें पायीं ऐसा नाहीं देखिला दादुला ॥४॥

३७६१ मी सुखाची कन्यका झालें वाढविली घरीं । देखतां पाहतां उचलून उचलून नेली चोरी ॥ १ ॥ सौरी झालें बाई आतां करूं तरी काई ॥ धृ. ॥ निसुगचा पुत्र झाला जावा नणंदा घरीं । पाहतां देखतां उचलून उचलून नेली चोरी ॥२॥ बारा सोळा मुले झालीं आले सुना नातू । कंबरे वरी हातू ॥ ३ ॥ कैंची बहीण कैंची माय अंतकाळीं देखा । निदानीचे वेळीं तुज देव मारी हांका ॥४॥ लेंकुरवाळी बाईल म्हणे तोंड याचें झांका । एका जनार्दनीं म्हणे भवीं भुलूं नका ॥ ५ ॥

३७६२ सौरी झालें बाई आतां करूं गत काई । बसवी झाले बाई आतां भिन्नभेद नाहीं ॥१॥ कासरा लावून सासरा मारला दादला टाकून आलें । आत्म-लिंग पाहूनियां मदमस्त झालें ॥ २ ॥ बांधून बुचडा उघडा माथा विभुतीचा पट्टा । आला गेला म्हटला नाहीं धरल्या चारी वाटा ॥ ३ ॥ उभी शिंदळ घाली गोंधळ हाचि लाभ मोठा । मागें पुढें पाहूं नका वेगीं काम लाटा ॥ ४ ॥ लहान थोर म्हटला नाहीं झालें मी वेडी । एका जनार्दनीं बसवी झालें परद्वार गोडी ॥५॥

३७६३ जातिभ्रष्ट झाली सौरी हिंडे दारोदारीं । सांवळें उचकुनी जगासी दावी डौर वाजवी करीं ॥ १ ॥ चाल सख्या रामा । सुख होईल आम्हा ॥ धृ. ॥ हागरा दादल्या पादरी बायकु जांवई देखोनी हांसे । घरची सून नागवी नाचे पोटीं पोर पिसे ॥ २ ॥ शेंबडा व्याही चिपडी विहीण दोघां प्रीत मोठी । विहीण लाजून हळूंच पाहे व्याही नाक चाटी ॥ ३ ॥ बाईल बाहीरख्याली दादला तिचा भोळा । पर पुरुष पाहूनिया खुणाविती डोळा ॥ ४ ॥ ऐसी सौरी गमजा करी डौर छंदें नाचे । एका जनार्दनीं पायीं अखंड नाम वाचे ॥ ५ ॥

३७६४ सांड रांड गमजा नको करूं बोल । भक्तीवीण ज्ञान गेलें किती करिसी फोल ॥ १ ॥ जन्मां आली व्यर्थ गेली भक्ति नाहीं केली । माझें माझें म्हणोनियां गुंतोनियां मेली ॥ २ ॥ टिळा टोपी घालुनी माळा म्हणती आम्ही संत । परस्त्री देखो-नियां चंचळ झालें चित्त ॥ ३ ॥ जगालागीं ज्ञान सांगे म्हणती आम्ही साधु । पोटीं दया धर्म नाहीं ते जाणावे भोंदु ॥ ४ ॥ संत म्हणतील निंदा केली निंदा नोहे भाई । शरण एका जनार्दनीं लागतसे पायीं ॥ ५ ॥

३७६५ न करीं वो चाळा स्वैरीचिया बोला । वेधला जीव निःसंगपणें खाती नवा गोळा ॥ १ ॥ ऐसें नव्हे भले कोणा मानवलें । जग जगीं हांसती मोडिताती डोळे ॥ २ ॥ फुकटचि संग स्वैरीयेचा बरा । दिवाण दारीं फजिती थोरी वहातसे वारा ॥ ३ ॥ पडलें मोकळें ढुंगण आतां कैसा संग । मागें पुढें फजिती झाली अठरा झाले दंग ॥ ४ ॥ एका जनार्दनीं स्वैरी झाली संतपाय धरा । नाहीं तरी उभ्या बाजारी फजितीचा थारा ॥ ५ ॥

३७६६ होउनी स्वैरी लुगडें फेडी भलत्यासवें हांसे । हांसत हांसत घर घेतलें कोण मज पुसे ॥ १ ॥ लागला मज चाळा कां हो घालतां डोळा । फजितीचा वाटा आला नित्य नवा गोळा ॥ २ ॥ मागें पुढें न

पाही कांहीं म्हणेल कोणी । एका जनार्दनीं शरण कायावाचामनीं ॥ ३ ॥

३७६७ भोळा दादुला बाई म्यां केला । संसार सारा नागविला ॥ १ ॥ सौरी होऊन गेलें सुख नाहीं झालें । पुनरपि संसारीं मी हो आलें ॥ २ ॥ चार पांच सहा अठरांसी रतलें । त्यांचे संगें मन चावट हो झालें ॥ ३ ॥ एकाएकीं संतसंग झाला । एका जनार्दनीं संसार तुटला ॥ ४ ॥

## सासुरवास.

३७६८ विषयाचें सासुरें दुश्चित बोळवण । भ्रांतीचें पांघरूण बुंथी मज ॥ १ ॥ अविवेक अबुला अहंकार सासुरा । अविद्येच्या घरामाजीं नेलें ॥ २ ॥ तेथें कल्पना हे सासु सदा सासुरवासु । घेऊं नेदी उमसु आठवण ॥३॥ आठवणे सर्वे आठवण आठवत । तेणें पैं फुटत हृदय माझें ॥४॥ कामक्रोध देख भावे आणि दीर । मज आटितातो थोर स्वभाव त्यांचे ॥५॥ मोह म्हातारा सदा द्वारीं असे । घडासी वो पिसे लावितसे ॥ ६ ॥ वरीवरी सावडा पोटींच पैं कुडा । दंभ घाली खोडा प्रलोभाचा ॥ ७ ॥ इच्छा आणि निंदा सासुरे दासटे । तें मज चिमटे घेपितातीं ॥ ८ ॥ ममता वोहिणी नंदुली चिंता । ती भेणें एकांता मज ठाव नाहीं ॥ ९ ॥ कामाहातीं मज नाहीं वो उगडु । निष्कामासी दडू क्रोध करी ॥१०॥ द्वेषाची जावणी सदा पैं खोचणी । कोणें घरीं पापिणी बोळविलें ॥११॥ माझा भोळा भावो त्यासी नाहीं ठावो । त्यापाठीं संदेहो श्वान लागे ॥ १२ ॥ त्याभेणें पळाला मागुता नाहीं आला । देशधडी जाला भावो माझा ॥ १३ ॥ सखी माझी भक्ति भावासवें जाती । कोणा काकूळती येऊं माये ॥१४॥ आर्तीचें निढळीं ठेउनी वाहुली । पहातसे वाटुली माहेराची ॥ १५ ॥ माहेराचे वाटे कोणी न भेटे । मावलीये पैठे कोण करी ॥ १६ ॥ अक्रूरा प्रल्हादा धांवरे उद्धवा । माझ्यासाठीं धांवा तुम्हीं करा ॥ १७ ॥ नारदा माझ्या धांव रे लवलाही । लागेन तुझ्या पायीं जीवेंभावें ॥ १८ ॥ सत्वर हनुमंता उडी घाली आतां । मजलागीं सर्वथा मूळ या वो ॥ १९ ॥ पृथु चक्रवर्ती जिवलग सांगाती । तुम्हीं या निश्चिती मज मूळ ॥ २० ॥ पैल पुंडलिकाजवळीं मायबापा । हर्षे नांदताहे भीमातीरीं ॥ २१ ॥ तेथींचें वारकरी त्यांचे पाय धरी । नेउनी घाला माहेरी पंढरीसी ॥ २२ ॥ एका जनार्दनीं सासुराचि केलें । तेंचि माहेर झालें गुरुकृपें ॥ २३ ॥

३७६९ वृद्धपणीं शांती धरा तुम्हीं सासुबाई । नरम गरम मागूं नका अंती सुख नाहीं ॥ १ ॥ रात्रंदिवस विचारितां जीव दिक् जाला । मायलेकी राहा तुम्हीं मज नेऊनि घाला ॥२॥ प्रपंचाचें ताक तुम्हीं सांचविलें घरीं । संचिताचें दुग्ध लोणी गमाविलें चोरी ॥ ३ ॥ वासनेच्या बिडालीका कोंडुनी बाहेर ठेवा । नवहि द्वारें गुप्त करा ज्ञानदीप लावा ॥ ४ ॥ प्राप्त भूमी चारी तुम्हीं हात करा वेगीं । कल्पनेची रहाटी होडा धन्य तोचि योगी ॥ ५ ॥ चारी मुक्ति त्याचें माथां काळ झेंप घाली । विश्वासानें जाऊं नका जीव मुक्ति झाली ॥ ६ ॥ अहेवमणी गळां तुम्हीं व्यर्थ बांधियेला । बारा सोळा पुत्र जाले दादला नाहीं केला ॥७॥ वांझ तुम्हीं पुत्र व्यालें तुमचें तुम्हां साजे । इतर स्त्रिया करूं म्हणती मरती लोकलाजे ॥ ८ ॥ क्षणीक तुम्हीं वृद्ध पहा क्षणिक तरुण बोले । एका जनार्दनीं शरण त्यानें रूप केलें ॥ ९ ॥

## हळदुली.

३७७० हळदुली वाटुनी वाटिला पाटा । अवगुणाचा नोवरा हळदुली उटा ॥ १ ॥ नागवा नोवरा नागवी नोवरी । दोघें बसली चराचरीं ॥ २ ॥ नागवा नवरा नवरी नेसला । नागव्या नवरीनें नवरा वेढिला ॥३॥ सभा मंडपीं तें दोघें । एका जनार्दनीं नाचती भोगें ॥

## लग्न.

३७७१ एका जनार्दनाचे लग्नसिद्धीसी । घटितार्थें पहावया मीनले चवदा भुवनांचे ज्योतिषी ॥ १ ॥ योग तोहि एक तीथ तीहि एक । राशी तेहि एक नक्षत्र तेहि एक । सद्गुरुचरणीं एकाएक तोहि जाला ॥ २ ॥ वर्ष तेंहि एक मास तोहि एक । बारा योग पाहतां एकाएक जाले ॥ ३ ॥ घटिका तेहि एक पळ तेंहि एक । शोधितां सूक्ष्म एकाएकचि जालें ॥ ४ ॥ पहातां जनीं जनार्दनीं जाली एक नाडी । म्हणवोनी एका जनार्दनीं उभाविली गुढी ॥५॥

## अष्टपदी.

३७७२ वांकडा म्हणे कृष्णजी बापा मी एक देखिलें भूत रे । त्याचे विष जळूनी गेलें शेष राहिलें किंचित् रे । देहावीण छळितो तेथेंचि पीडितो त्या ठायां असे

मळमूत्र रे। त्यांनीं जिंकिलें कोण कोण ते त्यासी जिंकील कोणता रे ॥१॥ धोंगडे माझें बोलणें कान्हो धोंगडे माझें बोलणें ॥ धृ.॥ जुनाट जोगडा काळाचा काकडा डोंगरीं रहातो भोंडा रे। झडपिला हांवे नागवाची धांवे पाठीसी लागला भिलबोंडा रे। कर्दळीं खोपा नेटका रूपा पाहूनि भुलला तोंडा रे । जग अंधारीं महा भ्यासुरी अपार चालिला वीर्याचा लोंढा रे ॥ २ ॥ कूलाळ हाडाचा बाप चाहाडाचा अखंड घडतो मडकी रे। त्यासी एक भूत संचार जाला हिमालयाच्या खडकी रे। भूत वेऱ्याची नोवरी पाहुनि जिवास भरली धडकी रे। कोणी एके वेळीं पाठीशीं लागला भेडसावीती लेक लाडकी रे ॥ ३ ॥ नंगाचे दंदी नंगाचि खांदी अति हाडाचा ढेंगा रे। त्यासी एक भूत संचार जाहला येउनि जडला अंगा रे। सुत अंधाचा परांगनेचा चिरे फेडितो कांगा रे। त्यासी एक वृक्ष पुढें भेटला डांगानें मोडिला टांगा रे ॥४॥ गंगामाझारीं संग ढीवरीसी रमला तपो गर्वे रे। त्यासी एक पुत्र जळीं जन्मला त्यानें केली अठरा पर्वे रे। तो एक साक्षात वेदो नारायण बोलणें त्याचें बरवें रे। कुरंगीचें पाडस दुवाकिलें अयुध्यापूर मिळविलें रे ॥ ५ ॥ डोळियाचे जळीं एक द्विज जन्मला तेंचि त्याचें वाहन रे। बापापरीस एका तोंडानें आगळा तारका केलें हनन रे। शैल्यात्मजेच्या सवतीचा तनय तुझ्या हातीं त्याचें दहन रे। दिवा आंधारीं जो कां रमला नातवंड त्याचें गहन रे ॥६॥ लंगोटबंद ढुंगासी शेपुट अञ्जुन जीत काळतोंडा रे। रात्रींतून ज्यानें शेपुट बांधोनि संकटीं आणिला धोंडा रे। त्रिभुवनासीं तो देवऋषी बाप जयाच्या तोंडा रे। सोळा सहस्र नारी भोगून ब्रह्मचारी तूं एक म्हणविसी लंडा रे ॥७॥ वाकड्यानें अहाणा घातला जाणा उकलील तो विरळागल रे। पदापदाचें अर्थ करी जो तो एक असे बहुश्रुत रे। आठा कडव्याची अष्टपदी गाइली तो एक जाणा अद्‌भूत रे। एका जनार्दनीं विनवीत असे भूत। नव्हे कान्होबाचा सूत रे ॥ ८ ॥

## गोपाळ.

३७७३ माझे वासनेची दृढ जाली। आंत विषयाची गुळपोळी। आम्हां निजवूनि बोधाचें पाळीं। ते त्वां गट केली रे वनमाळी ॥१॥ कान्होबा सांडीं पां आपुली खोडी। तुझें स्वरूपीं आमुची गोडी ॥ धृ.॥ माझ्या अवघ्या अकरा गाई। त्या बा ठेविल्या तुझ्या पायीं। आम्हां निजउनी निज वस्तु ठायीं। त्याचें दुभतें त्वां केलें काई रे ॥ २ ॥ जीवा बैसती माझी चौघडी। नेली चोरुन लिंगदेह घोंगडी। केली सबाह्य नग्न उघडी। तुझ्या संगतीची कोण गोडी रे ॥ ३ ॥ माझा सुंदर सुरस वेणु। त्याचा नाद त्वां नेला चोरुनु। गुणी निःशब्द केलासे गुणु। सखी वाचा नेली खुंटुनु रे ॥ ४ ॥ वेधी बांधलें आमुचें मन। त्वां चोरिलें जीवचैतन्य। एका पावला जनार्दन। तेणें खेळेमेळें समाधान रे ॥ ५ ॥

## वेणु.

३७७४ अधरीं धरुनी वेणु। वेणु वाजविला कोणी नेणुं ॥ १ ॥ प्रातःकाळीं तो वनमाळी। घेऊनि जातो धेनु ॥ २ ॥ उभी मी राहें वाट मी पाहें। केव्हां भेटेल मम कान्हु ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाजविला वेणु। ऐकतां मन जालें तल्लीनु

## कान्होबा.

३७७५ पहिलें कोठेंच नव्हतें कांहीं। चंद्र सूर्य तारा नाहीं। अवघें शून्यच होतें पाहीं। कान्होबा तें रे तें रे तें ॥१॥ तेथें एक ढालगज निर्माण झाली। तिनें पहा एवढी ख्याती केली। इंद्रादिकांस म्हणे बाहुली। अमरपुरीं तिची घरकुली ॥कान्होबा०॥२॥ ती मूळची कर्णकुमारी। तिचा बाप तो ब्रह्मचारी। तो जन्मला तियेचे उदरीं। ऐसी पाहतां नवलपरी ॥ कान्होबा० ॥ ॥ ३ ॥ तिनें बापची दादला केला। कोण वाईट म्हणे या बोला। अवघें तिच्याच बोलणें चाला। तरी कैवल्य-सुख तुम्हाला ॥ कान्होबा० ॥ ॥ ४ ॥ तो तियेसी शिवला नाहीं। वांझ गर्भिण झाली पाहीं। व्याली पांच पंचवीस पोरें तीही। ऐसें तियेचें नवल पाहीं ॥ कान्होबा० ॥ ॥ ५ ॥ ऐशी व्याली ते सकळ सृष्टी। न पडतां भ्रताराचे दृष्टी। एका जनार्दनीं या गोष्टी। विचारा सद्‌गुरुच्या मुखीं ॥ कान्होबा० ॥ ॥ ६ ॥

## पाखरूं.

३७७६ कृष्णा एक पाखरूं आहे। तें मुखावीण चारा खाये रे। डोळे नाहीं परी तें पाहे। वाचेवीण स्वयें गाय रे ॥ १ ॥ सख्या त्याचें नांव कान्होबा। कृष्ण म्हणती सर्व रे। त्याचें वास्तव्य कोठें आहे। पर नाहीं परी तें उडे रे ॥ २ ॥ तिहीं लोकीं हिंडतें। त्रिभुवन त्याला थोडें रे ॥ ३ ॥ त्याचे नखांत आकाश वुडे। तो सन्मुख चहूंकडे रे ॥ ४ ॥ अहो त्याला

मायबाप दोन्हीं नाहीं रे। एकपणेंवीण पहातीजनार्दनाचे पायीं रे ॥ ५ ॥

## पिंगळा.

३७७७ पिंगळा महाद्वारीं बोली बोलतो देखा। डौर फिरवितो डुगडुग ऐका ॥ धृ. ॥ वरल्या आळीला तुम्ही सावध रहावें। पाटीलबुवाला मग लावून सर्वे। चिठी येईल बा मग पडेल ठावें ॥ १ ॥ मधल्या आळीला एक बायको फिरे। तिजला तुम्ही साधा मग पडेल पुरें। नाहीं तरी पाटलोबा तिचीं पळतील गुरें ॥ २ ॥ आणीक बा रे सुटेल तांतडी। पाटीलबुवाची मग पडेल माडी। तिचीं पांच पोरें लागतील देशोधडीं ॥ ३ ॥ आणीक एक ऐका कैंचें नवल झालें। गांवच्या पांड्यांनीं पाटलास नागविलें। साऱ्या कागदाचें शून्य एकच केलें ॥ ४॥ हिंडतां फिरतांना एक शकुन सांगे। त्याच्या सत्तेनें ह्या आळीस वागे। संतां घरचा बा एक तुकडा मागे ॥ ५ ॥ हें जरी न ऐकाल तरी दुसरा येईल। सरते शेवटीं बा काळ बांधून नेईल। एका जनार्दनीं बा आमुचें काय जाईल ॥ ६ ॥

३७७८ पिंगळा महाद्वारीं। बोली बोलतो देखा। शकुन सांगतों तुम्हा हा एक ऐका ॥ १ ॥ डुग डुग ऐका डुग डुग ऐका ॥ धृ. ॥ पिंगळा बैसोनि कळसावरी। तेथोनि गर्जतो नानापरी। बोल बोलतो अति कुसरी। सावध ऐका ॥ २ ॥ किलबिल किलबिल। चिलबिल चिलबिल। तुलमिल तुलमिल। तुलबिल तुलबिल ॥ ३ ॥ तुमचे गांवींचा एक ठाणेदार। गांवच्या पाटलाची एक थोरली नार। तिशीं रतला तो करी विचार। एका जनार्दनीं बोले सारासार विचार ॥ ४ ॥

३७७९ वरल्या आळींच्यांनो दादा सावध ऐका। गांव हा पांचांचा यासी भुलूं नका। पिंगळा बोलतो बोला। तुम्ही सांडा गलबला ॥ १ ॥ डुग डुग डुग दादा। डुग डुग डुग दादा ॥ धृ. ॥ चिलबिल चिलबिल। बोली बोलतो बोल। अर्थ पहातां दिसे सखोल। ब्रह्मा विष्णु महेष भुलले सकळ ॥ २ ॥ चिल्यापिल्याच्या भारा। हाचि सांडा पसारा। गुंतले याची हावा धरूनी विचारा। तुलमिल तुलमिल करती नारी आणि नर ॥ ३ ॥ विचक्षण तोचि जाणे येथील अर्थ। येरा न कळे आपआपुला स्वार्थ। शरण एका जनार्दनीं न सांडी हा पंथ। तुटेल खुंटेल अवघें जाहलें एक येथ ॥ ४ ॥

३७८० डुग डुग डुग डुग। डुगडुगोनि गेले चार युग। कामक्रोधाचेनि लागवेगें। या मनामागें धांवत ॥ १ ॥ हित नोहे गा सर्वथा। गेले हरपोनी पाहतां। भुलले मायेनें सर्वथा। यमपंथासी जाती ॥ २ ॥जातां यमपुरीच्या वाटे। जीवासी आघात आहेत मोठे। संचित क्रियमाणाचे सांठे। ते वार्या जाऊं पाहे ॥ ३ ॥ जे भले सात्त्विक संत। जे निशिदीनीं हरिभक्त। त्यांसी माझा नमस्कार येत। गुरुसी शरण जा वेगी ॥ ४ ॥ गुरुसी गेलिया शरण। काय करील जन्ममरण। स्वरूपीं लागेल अनुसंधान। निज निधान प्रगट होय ॥ ५ ॥ आतां एक सांगतों शकुन मोठा। तुज लागला एक्या बायकोचा चपेटा। तिच्या चांगुलपणाला सुभटा। भुलूं नको सर्वथा ॥ ६ ॥ आणिक ऐक तिची करणी। विष्णूस लाविलें वृंदेच्या स्मशानीं। नारदाची नारदी करुनी। साठ पुत्र जन्मविले ॥ ७ ॥ यालागीं तिचा पदरू नोहे बरा। अंतीं दगा देईल सारा। अजून तरी हित विचारा। दान करा पीडा टळे ॥ ८ ॥ तिनें बहुतांसी दगा दिधला। ईश्वरासारिखा भुलविला। ब्रह्मयासी वेध लाविला। रत झाला कन्येशीं ॥ ९ ॥ नवा ठायीं फाटला झगा। तो नये उपयोगा। विषय भोगित अंगा। तो मज दान पिंगळिया ॥ १० ॥ काळीमीच काळें चिरगुट। पदरा बांधून मीतूंपणाचें मीठ। त्रिवर्ग करोनी रोकडें नीट। ओंवाळून टाकी आतां ॥ ११ ॥ तेणें टळेल तुझी पीडा। चुकेल मीतूंपणाचा झगडा। स्वरूपीं होईल आनंदगाढा। श्रीजनार्दन प्रसादें ॥ १२ ॥ एका जनार्दनीं प्रेमबोध। पिंगळा भाकितसे प्रबोध। प्रगट होय सोहं बोध। श्रीजनार्दन प्रसादें ॥ १३ ॥

## वटवाघूळ.

३७८१ पूर्वी पंक्तीस केला भेद। नाहीं अंतःकरण शुद्ध। झालें वटवाघूळ प्रसिद्ध ॥ १ ॥ वटवाघूळ झालें बाई। करावें काई। उपाय नाहीं ॥ धृ. ॥ वटवाघुळीचा जन्म घेऊन। घेतलें उरफाटे टांगून। तोंडीं नरक भरला चाण ॥२॥ वटवाघळीची यातना मोठी। भोगिल्या लक्ष चौऱ्यांयशी कोटी। जन्ममरणाच्या तुटल्या गांठी ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वटवाघूळ झालें। सद्गुरुला शरण गेलें। जन्ममरण चुकविलें ॥ ४ ॥

## टिटवी.

३७८२ एका ग्रामावरी जाऊन। एक नदीतीर पाहून। तेथें टिटवी करी शयन। दोन्ही पायांत खडा धरून गा ॥ १ ॥ टिटवी यमाची तराळीण। टिटाव टिटाव टिटाव टिटाव। तीड तीड तीड जाण गा ॥ ध्रु. ॥ मरेल चौगुल्याची सून। पाटलाचे चौघेजण। कुळकर्ण्याची लाडकी सून। आतां गांवांत राहिले कोण गा ॥२॥ देशमुख देशपांडे चौधरी जाण। शेटे महाजन नेईन। चौगुल्याचे जवळ मरण। आतां गावांत नाहीं कोण गा ॥ ३ ॥ नाईक चाऱ्यासी आतां धरी। शेलकी देशमुखाची पोरी। याची गणना कोण करी। आतां गांवांत नाहीं थोरी गा ॥ ४ ॥ आतां गांव वचनें हीन सारा। केवढा टिटवीचा दरारा। गांवांत हिंडतां चुकेल फेरा। महारां मांगांचा तुला आसरा गा ॥ ५ ॥ लव्हार सुतार बलुते बारा। माळी तेली वाण्यास दरारा। सुनेकरासी दिधला थारा। म्हणोनि हरिभजन करा गा ॥ ६ ॥ आतां नाहीं कोणासी कोण। शेवट मारीन मी नेऊन। माझे संगती मांगीण। एका जनार्दनीं लहान थोरपण गा ॥ ७ ॥

## पोपट.

३७८३ पढो माझ्या आत्मारामा। राधाकृष्णाचें हें ध्यान। पिंजऱ्यामध्यें गुंतलासी। तुज सोडवील कोण ॥ ध्रु. ॥ चौऱ्यांयशी लक्ष योनी। वनीं तूं तरी हिंडसी। प्रमदा विष फळीं अतित्वरें धांव घेशी। येऊनियां दोही पक्षी। पाहती तुज न्यावयासी ॥ १॥ पिंजरा घडविला पंचभूताचा कुसरी। नव द्वारें सोळा सांधे। प्रभा पडली भीतरीं। लाविली प्राचीनाची दोरी। बांधिला निज मंदिरीं ॥ २ ॥ हिरवा तुझा रंग। गुंज वर्ण दोनी डोळे। चोंच आहे तुझी लाल। बोल तुझा हा मंजुळ। राघवा तूं बोल माझ्या। सख्या अमोलिक बोल ॥ ३ ॥ अचळ तूं चंचल मोठा हिंडे तीनहि ताळ। तुला जपला काळ। बोका केव्हां घालील गळ। जरी जाशी उडोनियां। पूर्व सकृताचें फळ ॥ ४ ॥ सत्य गुरु दत्त दाता। तारक मंत्र तुज देई। तोच तुला सोडवील। यम करील काई। पावशील चिंतामणी। एका जनार्दनाचे पायीं ॥ ५॥

## सर्प.

३७८४ स्वरूपमंदिरीं होतें मी एकली। माया सांज घेळ अविद्येचें बिळीं। माझें तुझें चालतां पाउलीं। मोहो भुजंगें धरिली करांगुळी ॥१॥ लोभसर्प डंखला करूं काय। स्वार्थसंपत्तीनें जड झाला पाय। आशा-लहरी तापला माझा देह। तृप्ति वारा घाली वो गुरुमाय ॥ २ ॥ विषय निंब बहु गोडिये आला। भजनगूळ तो मज कडु झाला। वित्तहानीचा गळां झेंडु आला। असत्यअशुद्धाच्या येताती गुरुळा वो ॥ ३ ॥ कामिनीकामाचा डोळां आलें पित्त। रसस्तुतिनिंदा काळे झाले दांत। विकल्पवासनेच्या मुंग्या धांवत। स्त्रीपुत्रलोभें जीवा पडली भ्रांत ॥ ४ ॥ मीतूंपणाची थोर आली भुली। मी येथें कोण वोळखी मोडली। अहं विवेकें काया जड झाली। सद्‌गुरु गारुडी घोलवा माउली ॥ ५ ॥ गुरुगारुडी आला धांउनी। बोधवैराग्याचें पाजिलें पाणी। विवेकअंजन घातलें नयनीं। सोहं शब्द वाजवी नामध्वनी ॥६॥ मिथ्याभूतमय अवघी ब्रह्मस्थिती। अभयस्वरूपीं लाविली विभुतीं। उतरला सर्प निवारली भ्रांती। एका जनार्दनीं आलीसे प्रचीती ॥ ७ ॥

३७८५ वासुकी सर्प मोठा दारुण। क्रोधें बैसला बिळीं जाऊन। सहज मीं तेथें केलें गमन। तमोगुणें घातलें सारवण। तेथून नष्ट आला धांवून। त्यानें मजवर झडप घातली जाण ॥ १ ॥ साप चावला। अगागागा। अबाबावा। अताताता। अरेरे। साप चावला ॥२॥ याची जात मोठी कठीण। मायाभुली पडली येऊन। माझें जडावलें मन। गरगर गिरकी आली दारुण। साप चावला ॥ ३ ॥ या गिरकीचें नाहीं भय। मीं केले सहस्र अन्याय। ताचि दडपिला हा पाय। आतां कोण वांचवील ठाव। साप चावला ॥ ४ ॥ माझा देवावर हत्राला। प्राण जावो परतां गेला। एका जनार्दनीं म्हणे भला। आजिचा शेवट गोड झाला। साप चावला ॥ ५ ॥

## विंचू.

३७८६ सहजीं सहज स्वयें स्थिती। स्वभावें भावना आतंक आली स्थिती। अलक्ष लक्षणा विकार उत्पत्ती। हां हां मज विंचवें खादलें अवचिती ॥ १ ॥ अहं विंचवें खादलें करूं काय। किती मीपणा ब्रह्मांडीं भरला माय। अष्टांगीं चढला तेणें तळमळी होय। कर्म भोग आदळितो हात पाय ॥२॥ जीव सिवाचिये संधीमाजीं होता। तो मज झोंबला

मी काय करूं आतां । घरीं मारी तव रिघाला आतवता । कांहीं केलिया वो नुतरे सर्वथा ॥ ३ ॥ अति चिंतेच्या थोर येताती तिडका । वित्तहानीच्या वेगीं उठती भडका । द्वंद्वबाधेचा न साहे धडका । विषय विलोभाच्या आदळती थडका ॥ ४ ॥ बहुमान ते थोर तळमळ । कामिनीकामाची नित्य जळजळ । पुत्रलोभाची लागती इंगळ । लोकलाजेची अंगीं लागे कळ ॥ ५ ॥ नित्यनिंदेची खरस येत तोंडा । कर्मस्वेदाचा सर्वांगीं चाले लोंढा । याचा उतारु नव्हे नव्हे उदंडा । जेथें झोंबला ते तोडोनियां सांडा ॥६॥ उत्पत्ति स्थितिचे पैं नेती जे निधाना । माझी मज न साहे उदरवेदना । वेगीं पाचारा निजगुणीं जनार्दना । ज्याचे नामें निरसे व्यथा नाना ॥ ७ ॥ पोसिये अनुतापें तापली अनुदीन । भाव सद्गुरुजी पातला आपण । अनन्यगतीं धरितां तयाचे चरण । तेणें हस्तक मस्तकीं रक्षा केली पूर्ण ॥ ८ ॥ भावें लागतां गे मज त्याचिया पाया । त्यानें कळ सोडोनी मोकळी केली काया । ब्रह्माहमस्मि विंचु आणिला गे ठाया । थोर तळमळ माझी गेली विलया ॥ ९ ॥ विंचु उतरतां मीपणामाजीं ठक । तेणें सहित उतरिलें विषय विख । बंध मोक्ष अहं सोहं सुख दुःख । वेदनेसहित उत्तरविलें देख ॥ १० ॥ एका जनार्दनीं आला गे निजगुणी । विष उतरुनी तेणें केलें अगुणी । स्वानंद कोंदला आनंद गिळुनी । देह विदेह गेले विसरुनी ॥

३७८७ विंचू चावला वृश्चिक चावला । कामक्रोध विंचू चावला । तम घाम अंगासी आला ॥ धृ. ॥ पंचप्राण व्याकुळ झाला । त्यानें माझा प्राण चालिला । सर्वांगाचा दाह झाला ॥ १ ॥ मनुष्य इंगळी अति दारुण । मज नांगा मारिला तिनें । सर्वांगीं वेदना जाण । त्या इंगळीची ॥ २ ॥ ह्या विंचवाला उतारा । तमो गुण मागें सारा । सत्वगुण लावा अंगारा । विंचू इंगळी उतरे झरझरा ॥ ३ ॥ सत्व उतारा देऊन । अवघा सारिला तमोगुण । किंचित् राहिली फुणफुण । शांत केली जनार्दनें ॥ ४ ॥

## बैल.

३७८८ अरुता ये बैला । कां रे वेड्या बैला ॥१॥ काय बोले वेडी । कोण उपटितो पेंढी ॥ २ ॥ पेंढी उपटणार तूंचि जाला । पुरता विचार करुनी बोला ॥ ३ ॥ काय बोलतें पशु भांड । देवद्वारीं काय पुजिसी आंड ॥ ४ ॥ काय बेटा बेकूब ढोरगा । हा मोठा शहाणा पोरगा ॥ ५ ॥ असें ढोर नसावें घरीं । आम्हांवांचून तूं भिकारी ॥ ६ ॥ सभाग्यासी काय करावयाचे बैल । यात्रेला कशानें जाईल ॥ ७ ॥ आम्ही ब्राह्मण अनुष्ठानी । नित्य गांजा सुरापानी ॥ ८ ॥ आम्ही नित्य करितो स्नान । वरवर धुतों अंतरीं बकध्यान ॥९॥ तरी अधिक आमुचा महिमा । शेण सारवावया नाहीं तुम्हां ॥ १० ॥ उगा राहें नाहीं तरी हाणीन रागें । माझी तिखट आहेत शिंगे ॥ ११ ॥ उठोनी वोझें तुजवर घालीन । घोस रानांत नेऊन पाडीन ॥ १२ ॥ बैल तरी कवणाचा । पार्वती शंकराचा ॥ १३ ॥ एका जनार्दनीं भलें । तेणें आपुलें स्वहित केलें ॥ १४ ॥

## गाय.

३७८९ चहूं सडीं दुभे ब्रह्मियाचे मुंजी । बळीदान खुजी तीर्थ पायीं ॥ १ ॥ पैल मोहरी मोहरी । पैल मोहरी मोहरी ॥ २ ॥ सिंह वदन गाय प्रल्हादा घरीं । पंढरी पंढरी पुंडलीका ॥ ३ ॥ गुणागुण गुणी जनीं विजनीं । एका जनार्दनीं दुभतसे ॥ ४ ॥

३७९० संतनाम गाय संतनाम गाय । संतनाम गाय कामधेनु ॥ १ ॥ सदासर्वकाळ दुभे भक्तालागीं । उणें पहातां अंगीं धांव घाली ॥ २ ॥ नाममुख स्तना लागला पान्हावे । अभक्त न पाहे धांव पाठी ॥ ३ ॥ जनीं जनार्दन दुहिला आवडीं । उभाविली गुढी एकनाथें ॥ ४ ॥

## एडका.

३७९१ एडका मदन तो केवळ पंचानन ॥ धृ. ॥ धडक मारिली शंकरा । केला ब्रह्मयाचा मातेरा । इंद्र चंद्रासी दरारा । लाविला जेणें । तो केवळ पंचानन ॥ १ ॥ धडक मारिली नारदा । केला रावणाचा चेंदा । दुर्योधना मारिली गदा । घेतला प्राण । तो केवळ पंचानन ॥२॥ भस्मासुर मुकला प्राणासी । तेचि गती झाली वालीसी । विश्वामित्रासारिखा ऋषी । नाडिला जेणें । तो केवळ पंचानन ॥ ३ ॥ शुक देवानी ध्यान धरोनी । एडका आणिला आकळोनी । एका जनार्दनाचे चरणीं । बांधिला जेणें । तो केवळ पंचानन ॥ ४ ॥

## कुत्रें.

३७९२ ये रे कुत्तु ये । आम्हां विटाळ करूं नको । आपली भाकर घे । दे रे धन्या दे । विटाळ राहिला

तुजखालीं। आवरून आपला घे। आतां हें कुत्रें मातलें। मीच म्हणुनी गुंतलें। फार कूस मोठी केली। जीवा तुझी खोटी झाली। उपाशी मरतों पाहीं बरें। अमृताचें सारें। घर एक सकाळ काय खासी। तूंच मुद्दल कोठें राहसी। एवढें ज्ञान झालें कोठें। सद्गुरूचें देणें मोठें। सद्गुरु तुला आहे का रे। सर्वा घटीं तोंच कीं रे। आम्ही तर म्हणतो कुत्रा तुला। अविद्येनें धतोरा दिला। ब्राह्मणाशीं अविद्या म्हणसी। देहें ब्राह्मण कैसा होशी। श्रेष्ठ जन्म वेद बोलती। येवढें भले तरी कां मरती। हरिभक्ता अमर होती। तें कळे कैसें। आपण व्हावें तैसें। होईनासी कां रे। जात गोत पाहिनाशी कीं रे। हें तुला ज्ञान कशानें झालें। एका जनार्दन गुरुकृपें कळों आलें ॥ १ ॥

## बाजार.

३७९३ संसारनगरीं बाजार भरला भाई। काम क्रोध लोभ याचें गिऱ्हाईक पाहीं ॥ १ ॥ यांत सुख नाहीं त्यांत सुख नाहीं। या हाटाचें सुख कोठें नाहीं ॥ २ ॥ या हाटासी थोर मेले। नारद शुक भीष्म उमगले ॥ ३ ॥ आणिक संतीं बाजार पाहिला। व्यर्थ जाणोनि निराश भाविला ॥ ४ ॥ या बाजारीं सुख नाहीं भाई। माझें माझें म्हणोनि ओझें वाही ॥ ५ ॥ एका जनार्दनीं बाजार लटिका। संतसंगावांचुनी नोहे सुटका ॥ ६ ॥

## व्यापार.

३७९४ त्रैलोक्याचा स्वामी जनार्दन। केला व्यापार त्यापासून ॥ १ ॥ मोठा लागला व्यापार। रामनाम निरंतर ॥ २ ॥ सोहं कर्जखत दिधलें। तें म्यां मस्तकीं वंदिलें ॥ ३ ॥ महा प्रेमाचीं लुगडीं दिधलीं। निजमुक्तपणें प्राप्त झालीं ॥ ४ ॥ अनुभवाची तहसील समस्त। स्वामीस करुणा पाठविलें रिस्त ॥ ५ ॥ धर्मखर्डा जमा। खर्चीं घातले पूर्वकर्मा ॥ ६ ॥ संतांसंगें वसूल बाकी। भक्ताहूनि अति नेटकी ॥ ७ ॥ कैवल्यपुरीं बांधलें तोरण। चैतन्य चावडी बैसलों जाण ॥८॥ ऐसा व्यापार सिद्ध झाला। एका जनार्दनीं केला ॥

## मोतीं.

३७९५ धूर्तांचें मोतीं जळीं हरपलें सखोल मोठें पाणी। चला पाहूं सहा चार अठराजणी ॥ धृ. ॥ प्रपंच धोंडा मृगजल पाणी आपटीत होतें चोळी। विसरलें सुख घसरलें तळीं ॥ सखे मायेनें मोतीं दडविलें भवासिंधूच्या जळीं। होती गढे भ्रांती बहीण जवळी ॥ तिनेंच मजला गोष्टी विनविल्या वित्त गेलें भुलोनी ॥१॥ आठ जणींनीं मोतीं दडविलें वर ठेविला धोंडा। अशाच पहाती अवघ्या रांडा ॥ बारा सोळा तळीं उरल्या। त्यांनीं धरिला दांडा। ठाऊक सत्राविला झेंडा। त्यामध्यें मी गर्क झाल्यें एकलीच बाई वनीं ॥ २ ॥ चवर्घीजणी सत्वर मिळोनि डोळीं अंजन घाला। माझ्या मोत्याला प्रेमें न्याहाळा। ज्ञानबोधाची लावून दिवटी बरवी वात उजळा। माझे मोत्याला सर्व कळा ॥ प्रपंच पडदा फाडून गुरुपदीं लावा गे ठिकाणीं ॥ ३ ॥ चौघीजणी मोक्ष नाइका मजला धरा हातीं। उतरा सागर पैल पंथीं ॥ या मोत्याच्या साठीं मजला जाणे आहे सती। म्हणून मी येतें काकूळती ॥ एका जनार्दनीं चिन्मय मोती न मिळे गुरुवांचुनी ॥ ४ ॥

## थट्टा.

३७९६ अशी ही थट्टा। भल्याभल्यासी लाविला बट्टा ॥ धृ. ॥ ब्रह्मदेव त्रैलोक्याला शोधी। थट्टेनें हरविली बुद्धी। केली नारदाची नारदी। अशी ही थट्टा ॥ १ ॥ थट्टा दुर्योधनानें केली। पांचाळी सभेमाजीं आणिली। गदाघायें मांडी फोडिली। अशी ही थट्टा ॥ २ ॥ थट्टा गेली शंभोपाशीं। कलंक लाविला चंद्रासी। भगें पाडिली इंद्रासी। बरी नव्हे थट्टा ॥३॥ थट्टेनें मेला दुर्योधन। भस्मासूर गेला भस्म होऊन। वालीहि मुकला आपुला प्राण। अशी ही थट्टा ॥ ४॥ थट्टा रावणानें केली। नगरी सोन्याची बुडविली। थट्टा ज्याची त्यास भोंवली। बरी नव्हे थट्टा ॥ ५॥ अरण्यांत होता भृगु ऋषी। थट्टा गेली त्याचेपाशीं। भुलवूनी आणिला अयोध्येसी। बरी नव्हे थट्टा ॥६॥ विराटाचा मेहुणा। नाम तयाचें कीचक जाणा। त्याणें घेतले बहुतांचे प्राणा। बरी नव्हे थट्टा ॥ ७ ॥ थट्टेपासून सुटले चौघेजण। शुक भीष्म आणि हनुमान। चौथा कार्तिकस्वामी जाण। त्याला नाहीं बट्टा ॥८॥ एका जनार्दनीं म्हणे सर्वांला। थट्टेला भिउनी तुम्हीं चाला। नाहीं तर नेईल नरककुंडाला। अशी ही थट्टा ॥

## नीति.

३७९७ नीति सांगतो ऐका एक। दास सभेचा सेवक। मन टाळूं नका एक। कोणी एक ॥ धृ. ॥

सांडावरून जाऊं नये । लांच खाऊं नये । चोहट्यांत राहूं नये । कोणी एक ॥ १ ॥ अक्रीत घेऊं नये । इमान सोडूं नये । बैमान होऊं नये । कोणी एक ॥२॥ सज्जनाशीं विटूं नये । नीचालवें वाटूं नये । तस्कराशीं पुसूं नये । कोणी एक ॥ ३ ॥ भक्तिमार्ग खंडूं नये । कुभांड्यासी तंडूं नये । खळासंगें भांडूं नये । कोणी एक ॥ ४ ॥ सत्पुरुषाशीं छळूं नये । शिवेचा गुंडा ढाळूं नये । केला नेम टाळूं नये । कोणी एक । ॥ ५ ॥ सद्गुरुसेवा सोडूं नये । कुळधर्मासी मोडूं नये । पापद्रव्य जोडूं नये । कोणी एक ॥ ६ ॥ संपत्ति आलिया माजूं नये । अभिमाने फुगूं नये । सभा देखून लाजूं नये । कोणी एक ॥ ७ ॥ असत्य वाद करूं नये । खोटा संग धरूं नये । मोचकाशीं मैत्री करूं नये । कोणी एक ॥८॥ भलते भरीं पडूं नये । अनाचार करूं नये । कपट मनीं धरूं नये । कोणी एक ॥९॥ जन्मा आलिया स्वभावें । कांहीं सार्थक करावें । ऐसें मनीं विचारावें । कोणी एक ॥१०॥ एका जनार्दनीं भावें । संतचरणीं लीन व्हावें । सदा हरिनाम उच्चारावें । कोणी एक ॥ ११ ॥

### कहाणी.

३७९८ तुम्हा आम्हीं सांगतों कहाणी । सोळा बारा मिळोनी गडणी । कहाणी सांगती बैसोनी वनीं । जो ऐके तो परपुरुष धनी ॥ १ ॥ चित्त द्यावें आमुच्या बोला । सांडा वार्या गलबला । विसरुनी प्रपंचाच्या मुळा । शब्दांचा लागों द्या चाळा ॥ २ ॥ एक अघटित वर्तलें । एक नारीस पांच पती देखिलें । एका पुरुषा गुरूवार केलें । साठ पुत्र जन्मले वळे ॥ ३ ॥ एका ब्राह्मणें कुत्रें खादलें । ग्रामजोशा प्रायश्चित दिलें । एका नारीने कवसाल केलें । बापा भार्याशीं लग्न लाविलें ॥४॥ आई होऊनी करवली । लेक वांटितसे हळदुली । पती विठ्ठल म्हणोनी जाकळी । आमुच्या कहाणीची हे मुळी ॥५॥ कहाणी सांगे शिवशक्ति । तेणें एका जनार्दनीं तृप्ती । संत महंत आनंदती । अभाविका न कळे गती ॥ ६ ॥

### स्वप्न.

३७९९ बैसोनी स्वप्न सांगे लोकां । नवल आजी पाहलें तृषा लागली उदका । अग्नि जो खादाड न मिळे तया इंधन देखा । पवनु पालाणीं बांधिला देखा ॥ १ ॥ स्वप्नाचें नवल जागृतीं ऐका । जागृतीं स्वप्न दोन्हीं मिथ्या जाहलें देखा ॥धृ.॥ पंचभूताची मिळणी जाहली परस्परीं । विसरुनीं द्वैतभाव समरसलें एकसरीं । कर्दमीं रुतलें नवल विंदान परोपरी । काय सांगूं या स्वप्नाची नसे आज दुरी ॥ २ ॥ एक नारी एक पुरुष उभयतां देखिले । विवाहमंडप चौबारा घातलें । सोहळा औट प्रकार न दिसोनी देखिलें । वर्तन करूं सांगूं जातां जागृत मी जाहलें ॥ ३ ॥ ऐसें स्वप्न देखिलें जनार्दन दृष्टी । मिथ्यामय सर्व भासलें उघडली सृष्टी । एका जनार्दनीं पायीं पडली मिठी । अहंता ममता यांची सुटलीसे गांठी ॥ ४ ॥

### डोहो.

३८०० डोहो डोहो डोहो । कान्होबा डोहो । चला जाऊं डोहांत पोहो रे कान्होबा ॥ धृ. ॥ त्या डोहाचें अमूप जीवन । डोहो पाहतां अति गहन । तया नाहीं चळण वळण । सर्व जीवांचें निधान ॥ १ ॥ डोहो व्याला हें जीवन । डोहो व्यालासे पवन । डोहो गिळिला पवन । डोहो कार्य करी कारण ॥ २ ॥ डोहो न कळे साचार । डोहो क्षर ना अक्षर । एका जनार्दनीं निर्धार । तरीच पावाल पैलपार ॥ ३ ॥

### पाळणा.

३८०१ जो जो जो जो जो बाळा केंवि येवो । उन्मनीं निद्रा लागो तुज गीतीं गावो ॥ १ ॥ जाग जागतां निज पाहीं माझिया तान्हुलीया । निजीं निज निजूंनियां सावध रे कान्हया ॥ २ ॥ तुम्हा चवघींची कळवळ झणीं येथ कां करा । निजीं निजला कान्हा परतोनि जावें घरा ॥ ३ ॥ चवघी जणी वोसरल्या तेथें अनुहात गोष्टी । तया नादातें साधून परेपरत्या सृष्टी ॥ ४ ॥ तेथें उन्मनी निद्रा हारपलें चित्त । देह विदेह खुंटले सगुण गुणातीत ॥ ५ ॥ शब्द निशब्द खुंटले आतां बोलावें तें काय । निजीं निजला एका जनार्दन माय ॥ ६ ॥

३८०२ खर खर मुंडा आवरे फकीरा । पालखीं निजविला मोतिया हिरा ॥ १ ॥ हुलुलुलु गाई निज रे बाळा । मोठा जटाधारी गोसावी आला ॥ धृ. ॥ येरे येरे कोल्ह्या जाय रे लांडग्या । नको भेडसाऊं लेंकरा दांडग्या ॥ २ ॥ आळविला कान्हा पाजुनी प्रेमपान्हा । एका जनार्दनीं लाविला स्तनां ॥ ३ ॥

३८०३ जो जो जो जो रे रघुरामा । निज बाळा गुणधामा । योगी आलासे विश्राम । स्वामी दाधीन

तुम्हां ॥ धृ. ॥ जोगी दिसतसे विचित्र । त्याला तीन नेत्र । चर्मावेगळें नाहीं वस्त्र । म्हणवितो तुझा मित्र ॥ १ ॥ अंगीं लावूनियां विभुती । अर्धांगीं पार्वती । वृषभारूढ तो पशुपती । त्रिशूळ डमरू हातीं ॥ २ ॥ आणिक नवल दयाळा । कंठ दिसे निळा । मस्तकीं गंगा वाहे झुळझुळा । नेत्रीं अग्निज्वाळा ॥ ३ ॥ भस्म चर्चुनी सर्वांगीं । वेष्टिला भुजंगीं । भूतें मेळवूनियां बहु जगीं । आलासे प्रसंगीं ॥ ४ ॥ जोगी आलासे अंगणीं । तुळशी वृंदावनीं । तुजला देखोनियां नयनीं । घाली लोटांगणीं ॥५॥ गोकुळीं जन्मलें निधान । जगदीश तो जाण । त्याचे चरणीं शरण । एका जनार्दन ॥

३८०४ सद्गुरुवचनें जन्म जे झाले । मायाजठरींहुनी वेगळें केलें । अहंकाराचें गुल्म तात्काळ तोडिलें । वासना समूळ नाळ खांडिलें ॥ १ ॥ जो जो जो परियंदे सहज । रात्रंदिवस नित्य लागली निज ॥ धृ. ॥ पिटिलें जैगट अनुहात ध्वनी । शांती क्षमा दया बोलती कामिनी । आपरूपें झालें स्वयें लक्षणीं । टकमकां पाहे कोहं सोहंपणीं ॥ २ ॥ उपजत पायाळ पैं झाला देख । अक्षय ठेवणें लाधलें अशेख । अविद्या गर्भीचें हरपलें दुःख । नयन पुंजाळले अर्धोन्मिलित ॥ ३ ॥ अवलोकनालागीं जन आचार्य । अशेष अविद्येचा त्यागु केला । असमाय आनंद आनंदें न्हाला । उसळला बिंदु पूर्वज समूह मीनला ॥ ४ ॥ झाली दृष्टादृष्टी बाणलें निरुतें । पूर्ण चंद्रक्षीर सागरीं भलतें । यापरी आनंद कवळी नभातें । सबराभरीत कवण आवरितें ॥ ५ ॥ चिद्रत्नाच्या अंजुळी भरुनी वृत्तीच्या हातीं । स्वानंदाचा मध मुखीं घालिती । जनित जन्ममळ निषेध धुती । आपैआप नवल झाली प्रतीती ॥ ६ ॥ स्वानुभव ब्रह्मसूत्र देतां पैं झाला । अखंड अनुस्फुत मध्यें बांधला । सभोंवता आपवर्गु समूह निमाला । पर परमेष्ठी सुखें सुखावला ॥ ७ ॥ ज्योती च्याहि ज्योती उजळुनी आरती । ओवाळिला देखा अखंड दीप्ती । मध्यमा वैखरी परापश्यंती । एकेश्वरें चारी परतोनि गाती ॥ ८ ॥ तंतू सूक्ष्मदशे वासना होती । सद्युक्तीच्या वळियेल्या वाती । स्वरूपीं लाविला दीपु स्वयंभस्थिती । सहज जागोनिया निरसली सटवीची राती ॥९॥ दहा दिन चिळस वासने केलें । इतुकेनि स्पर्शाचें भय फिटलें । आपपरावेगीं सकळ शुद्धत्व आलें । ब्रह्मरस तेथें पारणें केलें ॥१०॥ क्रमुनी अकराहि पालख मुहूर्तें । स्थानु निर्वाळिला अक्षर अव्यक्त । निरालंब पाळणा लाविला तेथें । अनुभव शृंखळा आलिया उचित ॥ ११ ॥ माचवे शोभले पुरुषार्थ चारी । निष्काम पाटिया बाणल्या त्यावरी । सबाह्य विणियेली विवेकाची दोरी । त्यामाजीं पहुडला सुख निद्रेवरी ॥ १२ ॥ सानु सानु परियें देतु उन्नत उन्मनी । चिरायु तूं बा कुंज निरंजनीं । माझिये दृष्टी तुज लागे बा झणीं । स्वयें परतली इडापिडा घेउनि ॥ १३ ॥ निजीनिज सांडुनि अवस्थात्रया । लोण करूं गेली साक्षी आणि तूर्या । आपणिया आपण होउनिया तळिवरिया । सहजीं सहजपणें असणें सहज जया ॥१४॥ मौनामौन पडलें शब्द शिराणी । सहज स्थिति येथें धरियेली कानीं । पितामहाचा पिता सुभानु वंश वर्णनी । निजसुख घेतलें एका जनार्दनीं ॥ १५ ॥

## चौघडा.

३८०५ पंधरा सतरांचा हो मेळा । कारखाना झाला गोळा । वाजविती आपुलया कळा । प्रेमबळा आनंदें ॥ १ ॥ झडतो नामाचा चौघडा ॥धृ.॥ झडतो नामाचा चौघडा । ब्रह्मीं ब्रह्मरूपींचा हुडा । संत ऐकताती कोडा । प्रेमबळा आनंदें ॥ २ ॥ जनाबाई घड्याळ मोगरी । घटका भरतां टोला मारी । काळ व्यर्थचि गेला तरी । गजर करी आनंदें ॥३॥ नामा दामा दोनी काळु । नारा विठा दमामे फैलू । चौघी सुना चारी हेळु । कडकडा बोल उमटती ॥ ४ ॥ गोंदा महादा करणी करी । नामें दुमदुमली पंढरी । आउबाई तुतारी । मंजुळ स्वर उमटती ॥ ५ ॥ गोणाबाई नौबत पल्ला । नाद अंबरीं कोंदला । राजाई झांज मंजुळ बोला । मंजुळ स्वर उमटती ॥ ६ ॥ तेथें चौका बारीदार । काटवन विजन जाळीचे सार । अवघे झाडवणी महार । एका जनार्दनीं पार उतरला ॥ ७ ॥

## छापा.

३८०६ अजब है त्रिकुटका घाट । जोत लगी घनदाट । धुंडलेना ओहि बात । पलख जोत लगी ॥१॥ उडवत चवरंग गुलाल । झमकर हे जोत ही लाल । महाकारण महाल । बिचमे लाल चमकत है ॥२॥ चमक लगी दिनरात । नहीं कछु आदि अंत । समजलेना ओही बात । सहज रंग बतावे ॥ ३ ॥ खिजमत करले कछु काम । अजमत पावोगे राम । भ्रमर गुंफामें राम । रामनाम सुमरले ॥ ४ ॥ सुमरलेना नहीं मंत्र । छांड

दे सब तंत्र । अनुहात जंत्र धिमक मृदंग बजावे ॥५॥ बजावे घन् धन् धन् स्वरका बीन । भजन करले संगीन नयन । जागे रातदीन । ब्रह्मताल लगावे ॥ ६॥ लगावे तो है तयार । करले दिलमों करार । हो जा भवजाल पार । मेरे सद्गुरु साहेबकी ॥ ७ ॥ साहेब सद्गुरु जनार्दनके । प्रतिपाळ एकनाथ तुम्हारे । फकिरी में रहता है ॥ ८ ॥

## रहाट.

३८०७ हुंडगी निघाली बाजारा । बारिक माझा जुना ॥ धृ. ॥ दाराची गोधन कां तोडाना । मजला रहाट करून कां द्याना । माझे रहाटाकडे कां पहाना ॥ १ ॥ तुमचा बैल कां माराना । मजला तांत करून कां द्याना । माझे तातांकडे कां पहाना ॥ २ ॥ तुमची तरवार कां मोडाना । मजला चात करून कां द्याना । माझ्या चाताकडे कां पहाना ॥ ३ ॥ तुमचा टाळ कां मोडाना । मजला भिंगरी करून कां द्याना । माझ्या भिंगरीकडे कां पहाना ॥४॥ तुमची वस्त्रें कां फाडाना । मजला पिंजून पिंजून कां द्याना । माझ्या पिंजण्याकडे कां पहाना ॥ ५ ॥ पिंजून पिंजून केला पिळू । नव इंद्रियां खेळू । एका जनार्दनीं पिळू ॥ ६ ॥

## शिमगा.

३८०८ सत्व गांठी उमगा । तेणें सफळ होईल शिमगा । तुम्ही हेंच गाणें गा । तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥ १ ॥ भूत सभेची कारटीं । विषय गोवऱ्या चोरटीं । उतरा कुकर्मांची राहाटी । तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥२॥ जागो जागीं थांबा । अवघ्या मिळोनि मारा बोंबा । न जळे एरंडाच्या कोंबा । तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥ ३ ॥ गांवचा पाटील कोळी । काळोबाची पिकली पोळी । तुमची पाजळू द्या होळी । तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥ ४ ॥ ओटींत घेऊनि गुलाल । सख्या मेहुणीसंगें भुलाल । तिचा नवरा मोठा जलाल । तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥ ५ ॥ एका जनार्दनीं पोस्त । गाणें गातां हालमस्त । नाहीं तर भडवे समस्त । तुम्ही हंसूं नका हंसूं नका ॥ ६ ॥

## होळी.

३८०९ देह चतुष्टयाची रचोनि होळी । ज्ञानाग्नि घालूनि समूळ जाळी ॥ १ ॥ अझूनि कां उगलाची । बोंब पडो दे नामाची ॥ २ ॥ मांदी मेळवा संतांची । तुम्हा साची सोडवण्या ॥ ३ ॥ धांवण्या धांवती संत अंतरंग । संसार शिमगा सांग निरसती ॥ ४ ॥ एका जनार्दनीं मारिली बोंब । जन वन स्वयंभ एक जालें ॥

## कोडें.

३८१० कृष्णा नवल कैसी परी । तूं एक आत्मा चराचरीं । तेथें द्वेषेसीं कवणा हरी । कैसे मारिले दैत्य त्वां वैरी ॥ १ ॥ कान्होबा सांग पां माझें कोडें । तुझें पुसतों तुझिया पुढें ॥ धृ. ॥ देहीं नख शिख अवघें एक । देहा रुतती नखें तीख । त्याच्या छेदनीं आम्हां सुख । तैसे मारिले अधर्मी देख ॥ २ ॥ तुज भेद नाहीं नरनारीं । कैसे सोळा सहस्र तुझिया घरीं । तूं म्हणविसी बाळ ब्रह्मचारी । शेखीं जालासी कां परद्वारीं ॥ ३ ॥ हेम मृत्तिकेच्या घट श्रेणी । आंत भरले निर्मळ पाणी । त्यांत बिंबोनि आलिप्त तरणी । तैशा भोगुनी बहु कामिनी ॥४॥ जग अवघें तुझिया कुशी । रसना अंकीत नव्हे म्हणविसी । रसस्वाद केंवि जाणसी । शेखीं चोरूनि दूध कां पिसी ॥ ५ ॥ मी भुललों भक्तिप्रेमासी । चोऱ्या करितों भक्ति-भावासी । रस रसनातें मज अंशीं । रसस्वाद जाणे ज्ञानराशी ॥ ६ ॥ एका जनार्दनीं घेतिला थाया । तो संकल्पची नये आया । तेथें हरपली माझी माया । देहीं देहपण गेलें विलया ॥ ७ ॥

३८११ नाथाच्या घरची उलटी खूण । पाण्याला मोठी लागली तहान ॥ १ ॥ आंत घागर बाहीर पाणी । पाण्याला पाणी आले मिळोनी ॥ २ ॥ आजी म्यां एक नवल देखिलें । वळचणीचें पाणी आढ्या लागलें ॥ ३ ॥ शेतकऱ्यानें शेत पेरिलें । राखणदाराला तेणें गिळिलें ॥ ४ ॥ हांडी खादली भात टाकिला । बकऱ्यापुढें देव कापिला ॥ ५ ॥ एका जनार्दनीं मार्ग उलटा । जो जाणे तो गुरुचा बेटा ॥ ६ ॥

३८१२ आम्ही नवल देखिलें भाई । मुंगीनें हत्तीशीं केली लढाई । उंटाचा कान धरूनि चिमाई । घरो-घरीं खातसे ॥ १ ॥ सांगा आमुचें कोडें । लांडग्या-साठीं शेळी रडे । कोल्हे हांसतसे बापुडें । उंदीर रेडे खेळती ॥ २ ॥ वरले गांवींचा एक हत्ती । नित्य खातो प्रजापती । सिंह तया येतो काकुळती । हंस रुसे कागाप्रती ॥ ३ ॥ एका जनार्दनाचें कोडें । उगवी तोचि जाणा वेडे । शाहाणे त्यासी नुमगे गाढें । अर्थ पहातां चुके लिगाड ॥ ४ ॥

३८१३ अबाबाबा बायको मोठी। घेतलें मुसळ लागली पाठी ॥ १ ॥ अग बायको नको मारूं। तुझें वासरूं नेतूं चारूं ॥ २ ॥ बायकोनें दादला गरवार केला। मनाचा मनोरथ पूर्ण झाला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं हुडा। साही शास्त्रांचा केला चुराडा ॥४॥

३८१४ संत आले वरले दिंडी। हातीं खुरप्या काखेंत मुंडी ॥ १ ॥ पंढरपुरीं पडली होड। सुटक्या परीस धांगड गोड ॥२॥ आली वैष्णवांची मांदी। मेलें डुकर बांधलें खांदीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं अर्थ उलटा। जो जाणे तो गुरूचा बेटा ॥ ४ ॥

३८१५ मजूर राउळाचें घृत नेतां। तो तुरंगीं चढे मनोरथा ॥ १ ॥ सबळ वारुवांचे उड्डाण। म्हणोनि उडों जात आपण ॥ २ ॥ बळें उडाला माझा घोडा। परी स्मरण नाहीं धगडा ॥ ३ ॥ उडीसरसी घागरी पडे। एका जनार्दनीं पाहुनी रडे ॥ ४ ॥

३८१६ देऊळ बांधिलें कळस साधिलें। स्थापन तें केलें लिंगाप्रती ॥ १ ॥ पाया जो खांदला मध्येंचि भंगला। शब्द मावळला काय सांगों ॥ २ ॥ वरिल्या मंडपा मुंगीये धरिलें। त्रिभुवनीं व्यापिलें मकुड्यानें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मंडप उडाला। देवहि बुडाला देवळासहित ॥ ४ ॥

## नवल.

३८१७ एक नवल देखिलें। एका चोरानें गांव चोरिलें। त्याचे मागें धांवणें निघालें। चोर आणि गांव नाहींसे झालें ॥१॥ मुळींच गांवा नव्हता पाया। वरला गांवकूस गेला वायां। खांदून नेला मुळींचा पाया। उडाले देऊळ देव गेला वायां ॥ २ ॥ कळस उडाला स्वर्गावरी। पाया गेला पाताळविवरीं। भिंत हिंडे दारोदारीं। पेरी जहाली नवलपरी ॥ ३ ॥ देऊळ पाया आणि भिंती। अर्थ पहा उगवोनि गुंती। एका जनार्दनीं विश्रांती। देव देऊळ अवघा गुरुमूर्ती ॥

३८१८ मूळ नाहीं शेंडा। काय म्हणावें त्या गुंडा। वेद अनुवादती प्रचंडा। शास्त्रें भांडती खंड विखंडा ॥ १ ॥ नवल जहालें बाई नवल जहालें बाई। पाणि यानें विस्तव पेटला कोणा सांगावें काई ॥ धृ.॥ शून्य होतें आधीं तेथें जाहलें एक। एक पाहतां दोन जहालें अलक्ष लक्ष देख ॥२॥ पुरुष नाहीं स्त्री नाहीं नाहीं कांहीं आकार। पाहतां पाहणें बुडोनि गेलें तेथें कैंचा निराकार ॥ ३ ॥ ब्रह्मज्ञान घरोघरीं कोण तया पुसे। शरण एका जनार्दनीं नाम गातसे ॥ ४ ॥

३८१९ नसोनि नवल असती अबला। करिती गलबला वाउगाची ॥ १ ॥ ब्रह्मज्ञानीयासी स्त्रीनें खादलें। त्याच्या धांवण्या देव पातले ॥ २ ॥ येऊनि पाहतां देव नागवला। कांहीं नाहीं तेथें उगाचि ठेला ॥ ३ ॥ न बोलवे गोष्टी मुकियाची परी। खादला गूळ परी न सांगवे गोडी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं विपरीत देखिलें। ब्रह्मज्ञान पळालें घरोघरीं ॥ ५ ॥

३८२० मोकळी असोनि गुंतली खेळा। खेळ खेळतां झाली अवकळा ॥ १ ॥ सदैव नारी हिंडे दारोदारीं। विपरीत जहाली नवलाची परी ॥ २ ॥ असोनि पुत्र जाहलिसे वांझ। कोणासी सांगो अंतरीचें गुज ॥ ३ ॥ गुज जाणे तोचि ब्रह्मज्ञानी। एका शरण जनार्दनीं ॥४॥

३८२१ आम्ही नवल देखिलें। कान्होबा तुज लागे बोलें ॥ १ ॥ कैसी नवलाची मात। म्हातारी ती तरणी होत ॥ २ ॥ अमावस्येचे दिवशीं चंद्र देखिला। राहु केतु येउनि ग्रहणीं लागला ॥ ३ ॥ आपुलेंनि मनें आकाश पोळलें। अकस्मात जाऊनि समुद्रीं नाहालें ॥ ४ ॥ समुद्रांतील आटलें पाणी। एका जनार्दनीं जहाली कहाणी ॥ ५ ॥

३८२२ नवलाचें नवल आज म्यां देखिलें। सागराचें पाणी रांजणासी आलें ॥ १ ॥ नवल गे माये नवल गे माये। गंगा येउनि रांजणांत सामाये ॥ २ ॥ निर्मळ पाणी डहुळतें जहालें। डहुळलें पाणी रांजणांत आलें ॥ ३ ॥ मृगजळाचें नीर रांजणीं भरलें। एका जनार्दनीं नवलचि केलें ॥ ४ ॥

३८२३ एक नवल देखिलें दृष्टी। पाहतां पहाणें गिळिलें उठाउठी ॥ १ ॥ जें निजे चोजवेना जें निजे चोजवेना। अंधारें सूर्य गिळिला जाणा ॥२॥ कल्पनेविरहित पुत्र झाला। कल्पना गिळूनि आपणाचि धाला ॥ ३ ॥ स्त्री पुरुष नामें नटला प्राणी। एका जनार्दनीं प्रत्यक्ष देखो ॥ ४ ॥

## नवलाई.

३८२४ आतां झालें नवलाई। पुनः जन्मा येणें नाहीं ॥ १ ॥ बोधाचें कुंकूं कपाळीं लाविलें। भक्तीकाठी हातीं धरिलें ॥ २ ॥ ज्ञानाचा कुर्कुला घेतला काखें। प्रेमाचा खुळखुळा अनुहत वाजे ॥३॥ एका जनार्दनीं नवलाई झाला। संतापायीं खेळावया आला ॥ ४ ॥

## भूत.

३८२५ भूत जबर मोठें ग बाई । झाली झडपण करूं गत काई ॥१॥ खूप चाटूचें केलें देवऋषी । या भूतानें धरिलें केशीं ॥२॥ लिंबू नारळ कोंबडा उतारा । त्या भूतानें धरिला थारा ॥३॥ भूत लागलें नारदाला । साठ पोरें झाली त्याला ॥ ४ ॥ भूत लागलें ध्रुव बाळाला । उभा अरण्यांत ठेला ॥ ५॥ एका जनार्दनीं भूत । सर्वां ठायीं सदोदित ॥ ६ ॥

३८२६ पिता सांगे पुत्रासी । बाळा नको जाऊं पंढरीसी । तेथें आहे थोर विवशी । ती तुज गिळील समुळेंसी ॥ १ ॥ भूत दारुण खेचर मोठें । तें नांदे भीमातीरीं वाळुवंटें । तेणें झडपिलें मोठें मोठें । ते बा नये घरदार वाटे ॥ २ ॥ अंबरीष रुक्मांगदा ! मयूर ध्वजाची थोर आपदा । हनुमंता झाली थोर बाधा । तोचि नाचे समाधी सदा ॥ ३ ॥ भूत लागलें प्रल्हादासी । तेणें मारविलें आपुलें जनकासी । भूत लागलें त्या बळीसी । नेउनी घातियेला पाताळासी ॥ ४ ॥ भूत लागलें नारदमुनी । तो हिंडे त्रिभुवनीं । देह भ्रांती सांडोनी । गेला भूतामाजीं मिळोनी ॥ ५ ॥ धुरू लेंकरू कोडिसवाणें । त्याचें खुंटलें येणें जाणें । तोही झडपिला भूतें नेणें । आणिक थोर थोर घेतले प्राणें ॥ ६ ॥ भूतें झडपणी केली बहुतां । सिद्ध ऋषी मुनी समस्ता । तेही न धरिती मागुतां । अवघी भूतेंच होती सर्वथा ॥ ७ ॥ येणें मारिलें असंख्यात सहस्रार्जुन थोर बळिवंत । हिरण्यकश्यप असुरनाथ । रावण कुंभकर्ण समस्त ॥ ८ ॥ कंसासूर आणि पूतना । शिशुपाल वक्रदंत राणा । मगधादी काळ यवना । कौरवांची सकल सेना ॥ ९ ॥ नाहीं राहत एके स्थानीं । सध्या होतें गोवर्धनीं । ते बा पुंडलिकें मंत्रोनी । उभें केलें येथें आणोनी ॥ १० ॥ चंद्रभागा पुष्पावती । सायंकाळीं पद्मतीर्थी । करी रानामधीं वस्ती । नको धरूं त्याची संगती ॥११॥ ऐक सांगतों तुज विचारू । भूतें झडपिल्या तुज काय करूं । एका जनार्दनीं निर्धारू । तेणें केला भूतांचा अंगीकारू ॥

३८२७ दादा वरले माळी दिसतें । दोनी डोळे वटारितें । तें बा बहुत भेडसावितें । जवळीं गेल्या गिळूं पहातें ॥१॥ तें बा बहु दुःखदायक । तेणें शिणविलें सिद्ध साधक । तें बा भयानक । वेगीं गोंवी तिन्हीं लोक ॥ २ ॥ तेणें मुंगीचा मार्ग घेतिला । मुळीहुनी शेंडा चढला । शेंड्यापासुनी खालता आला । तो तेथोनी निसटोनी गेला ॥ ३ ॥ तें बा अचोज चोजवेना । जवळीं आहे परी दिसेना । तें बा झोंबिन्नलें कळेना । झाडितां परी झडेना ॥४॥ तनमनुधनें शरण । एकनिष्ठ जयाचें मन । एका जनार्दनीं शरण । त्यासी सहजिचि समाधान ॥ ५ ॥

## बाहुलें.

३८२८ शिळा तांब्याचें बाहुलें केलें । पाट मांडुनी वरी बसविलें । वस्त्र अलंकारीं गुंडाळिलें । मना आलें तें नाम ठेविलें ॥१॥ या जनासी लागलें वेड । ॥धृ.॥ शुद्ध पाण्यानें प्रक्षाळिलें । गंध फुलानें झांकोळिलें । धूप दाउनी दिपें उजाळिलें । पुढें अन्न ठेऊनि चाळविलें ॥२॥ घेरे घेउनि भोवंडिलें । आडवे पडोनी दंडवत केलें । आपपर नाहीं देखिलें । एका जनार्दनीं ओळखिलें ॥ ३ ॥

## जागर.

३८२९ हरिजागरणीं दिवस आनंदें सौरस । गावया उल्हास वैष्णवांसी ॥१॥ गातां पैं नाचतां तया जाला पैं बोधु । त्यामाजीं गोविंदु क्रीडतसे ॥ २ ॥ चला चला रे भाई हरिजागरा वेगीं । वैष्णव हे रंगीं नाचताती ॥ ३ ॥ स्वानंदें लवलाह्या उभवोनी सात्विका बाह्या । आलिंगू कान्हया अद्वभावीं ॥ ४ ॥ दुजेपणावीण खेंव पाडिलेंसे मिठी । सांगणें पुसणें गोष्टी हरपली ॥ ५ ॥ यापरी वैष्णव रंगीं करितानी आल्हाद । उसळला आनंद साठवेना ॥६॥ एकाएकीं हो मीनला जनार्दन । तेणें सुखें मना उमजु नाहीं ॥ ७ ॥

## धांवा.

३८३० द्रौणी अस्त्राहातीं । उत्तरा पीडितां सती । गर्भी राखिला परिक्षिती । तैसा पावे श्रीपती ॥ १ ॥ वेगीं ऐका श्रीहरी । धांव पाव मुरारी । चक्र घेऊनियां करी । भवभय निवारी ॥२॥ इंद्र वरुषे शिळा धारी । गोकुळ पीडितां भारी । राखिलें गोवर्धनधारी । तैसा पावे झडकरी ॥३॥ दुर्वास द्वादशी छळूं आला अंबऋषी । चक्रें पळवोनी त्यासी । दहा गर्भवास सोशिले ॥४॥ सभेंत वस्त्रहरण । पातिव्रता मरण । द्रौपदी लज्जारक्षण । अंबर जाला श्रीकृष्ण ॥५॥ पांडव लाक्षाजोहरी धडाग्नी पोळत भारी । साही जणी चिंतितां हरी । काढिले विवरद्वारीं ॥ ६ ॥ देखोनी गुरु तो गत ।

रणांगणीं भ्याला पार्थ । त्यासी सांगुनी गीतार्थ । संग्रामीं केला तुवां मुक्त ॥ ७ ॥ एका जनार्दनीं दत्त । सहाय्य जाला सतत । मोहें भवभय जेथ । तेथ केला नित्य मुक्त ॥ ८ ॥

३८३१ गांजिता प्रल्हादु । तुझा घेतला छंदु । त्याचा निरसिला बाधू । तैसा पावे तूं सन्निधु ॥ १ ॥ वेगीं येवो मुकुंदा । धांवे पावे गोविंदा । करीं घेवोनिया गदा । छेदीं सकाम बाधा ॥ २ ॥ दावाग्नी गोपाळ । वेढिले सकळ । ते त्वां गिळियले ज्वाळ । तैसा पावे तात्काळ ॥ ३ ॥ गरुडा सांडोनी मागें । उडी घातली श्रीरंगें । गज उद्धरिला अंगें । तैसा पावे लागवेगें ॥ ४ ॥ दुर्वास भोजनीं । आला रात्रीं माध्यानीं । धर्मशापाची बाधणी । निरसिली भेटी देउनी ॥५॥ भवशाभय अद्भुत । नामस्मरणें निरसे सत्य । एका जनार्दनीं प्रतीत । आम्हां नामस्मरणें ॥ ६ ॥

३८३२ कृष्णा धांव रे लवकरी । संकट पडलें भारी । हरि तूं आमुचा कैवारी । आलें विघ्न निवारी ॥ १ ॥ पांडव असतां वनवासीं । कळलें कौरवांसी । त्यानें पाठविलें ऋषीसी । सत्त्व हरावयासी ॥ २ ॥ साठी सहस्र खंड्या अन्न । दुर्वासा भोजन । सत्त्व जातील घेऊन । अंतर पडतां जाण ॥ ३ ॥ रात्र जाहली दोन प्रहर । आले ऋषेश्वर । भोजन मागती सत्वर । कैसा करूं विचार ॥ ४ ॥ आज कां निष्ठुर जाहलासी । होईल बा गति कैसी । अनाथ मी देवा परदेशीं । धांव तूं वेगेंसी ॥ ५ ॥ आतां न लावीं उशीर । अनर्थ करील हा फार । एवढा करी उपकार । दे दर्शन सत्वर ॥६॥ कंठ शोषला अनंता । प्राण जाईल आतां । पदर पसरते अच्च्युता । पावें रुक्मिणीकांता ॥ ७ ॥ ऐकूनि बहिणीची करुणा । आला यादवराणा । द्रौपदी लोळत हरिचरणा । एका जनार्दना ॥ ८ ॥

## आडबंग.

३८३३ आडबंग आडबंग । सदा विषयामध्यें दंग । मदमस्त डोले भुजंग । प्रेमकीर्तनाचा रंग । मोडूनि झाला निःसंग ॥ १ ॥ बैसे वेश्याघरीं जाऊन । तिशीं करी हास्यवदन । स्वकरें विडया देऊन । वेश्या करी त्याचें छळण गा ॥ २ ॥ ज्ञान नाहीं मूढ तो जन । स्वस्त्री टाकून । उकिरडा ओती रे रतिरेत जन । आपुली स्त्री नेली मांगान गा ॥ ३ ॥ त्याचें न पहावें काळें वदन । पशु गाढवा समान । नरतनु व्यर्थ बुडवून । नाहीं साधिले साधन गा ॥ ४ ॥ मागें केलें देई टाकून । करी हरिचे चिंतन । येणें साधलें बहु साधन । केला जामीन जनार्दन ॥ ५ ॥

## थाक.

३८३४ थाक रे थाक तुज नाहीं रे उंच नाक । तुझा देह करीन पाक । आपुली जन्ममरणाची गोष्टी झांक । सर सर मागें सर ॥ १ ॥ तुझा मायबाप ठाऊक आहे मला । माझ्या दासीच्या दासीपासून कीं रे झाला । गुरुगम्यें खूण नाहीं कळली तुला । कच्चें मडकें घेऊन जा आपुलें घराला ॥ २ ॥ पाठमोरा उभा कां राहसी । सन्मुख पाहिलें नाहीं मशीं । तरी उघड्या कर चारी वेशी । पळून जाशी कोणत्या दारीं रे ॥ ३ ॥ म्यां थाक कैकाशी दिधला । चंद्र सूर्य उभा केला । इंद्र आहे येसणीला । काय रे सांगूं मुला तुजला । भ्रांती पडळ झांकून कां नाहीं गेला रे ॥ ४ ॥ माझ्या मुलाचें एक मूल जाण । तूं ब्रह्मचारी होऊन । क्षणांत साठ पोरगे होऊन । एक कन्यादान रे ॥ ५ ॥ पाराशरासारखा ऋषेश्वर । दिवसाचे करून अंधकार । रतवी धीवरे नदीतीर । आगास्तिली लोपामुद्रा । हाहि खेळ म्यांच केला ॥६॥ अवघें जाणून प्रपंचसार । त्याला माझा कीं आधार । जे राहती निराकार । एका जनार्दनीं तत्पर ॥ ७॥

## टिळा.

३८३५ माझा टिळा माझा टिळा । धाक पडे कळिकाळा । चौघांचा करूनि गुंडाळा । शेष पाताळीं घातला कीं ॥ १ ॥ टिळ्यानें दाविला कैलास । केला गंधर्वाचा नाश । धाक दरारा इंद्रचंद्रास । सुख लागलें तेव्हां ध्रुवास ॥ २ ॥ हा टिळा कोणाचा जाणे । हा टिळा शुद्ध चैतन्यें नीतीनें । महंत विष्णु म्हणती जाणें । हा टिळा रेखिला यानें ॥ ३ ॥ माझ्या टिळ्यापासून । आकाश पाताळ कैलास । तत्पर असेल त्यांत कोण । सुंदर सगुण निरूपण ॥ ४ ॥ हा टिळा शोधून जातां । नये ब्रह्मादिकांच्या हातां । त्याला नाहीं मातापिता । मग कैंचा काका चुलता ॥ ५ ॥ ह्या टिळ्याची ऐका खूण । विरंची करी ध्यान । ज्यापासून झाला उत्पन्न । केलें वेदाचें खंडण । चारी मुक्ती साधिल्या त्यानें ॥ ६ ॥ टिळा तुला नाहीं

हात ना पाये । टिळा स्वरूपीं राहे । एका जनार्दनीं ध्याये । माझा टिळा ॥ ७ ॥

## किल्ला.

३८३६ धुम धुम बार उडविला । ऐसा गलिम कोण आला । त्यानें किल्ल्यासी वेढा दिला । तो आवाज ऐकिला ॥ १ ॥ राजा पुसे प्रधानाला । कां रे कशाचा आवाज झाला । वेढा फौजेचा पडला । कसा वांचविन जिवित्वाला ॥ २ ॥ फौजेचा आकार पाहिला । तोफा जडल्या रे किल्ल्याला । या रयतींत फितूर झाला । माझा संगती मिळाला त्याला ॥ ३ ॥ आतां कैसा राहिला किल्ला । या किल्ल्याचा आधार केला । मुजुमदारानेंच फितुर केला । आतां आश्रय कोण जाणिला ॥ ४ ॥ कोण वांचविल माझ्या प्राणाला । प्रधान विसंगीत होऊनि पडला । मानकऱ्याचा पहिला अबुला । विश्वासाचा हुजऱ्या मेला ॥ ५ ॥ कोण सांभाळील या किल्ल्याला । किल्ल्याचा पहिलाच पाया पडला । खबर नाहीं पायदळाला । तोफेचा म्होरेस्वार गेला ॥ ६ ॥ निदानीं आश्रा नाहीं किल्ल्याला । तोंडपूरचा दरवाजा पडला । धक्का लागला गांडियेसी । त्यानें मार्गेच अवघा मोडिला । अंतकाळ आला राजाला ॥ ७ ॥ तोफा लावून चाऱ्ही कोन । चाऱ्ही बुरूज गेले पडून । धुगधुगीत राजाचें मन । मग कशास हो हैराण ॥ ८ ॥ यम चोपदार नेत बांधोन । सहस्र अंगा लावोन । तप्त अर्गळा मुखीं घालून । तप्त भूमिवर चालवून ॥ ९ ॥ सुळीं दिला राजा जाण । केलें कर्मे झाडा देऊन । गेलें तसेंच उसनें देणें । राज्याच्या अंतीं नर्क जाण ॥१०॥ ऐसें बोलविती प्रजाजन । शेवटीं राजा गेला निर्गुण । सावध म्हणे जनार्दन । झोका झाला ॥ ११ ॥

## पाईक.

३८३७ काळ गणना कोण लेखे । जो या देखे विठ्ठला ॥ १ ॥ बळीवंत हरीचे दास । आहेती उदास जीवासी ॥ २ ॥ नेणती कांहीं भेदाभेद । अंतर शुद्ध निर्मळ ॥ ३ ॥ एका जनार्दनीं त्यांचा दास । पुरवा आस पायाची ॥ ४ ॥

३८३८ हरीचे दास जगीं बळीवंत । नाहीं भीत कळिकाळा ॥ १ ॥ मुखीं रामनाम शस्त्र । करुणा पात्र पोटीं बहु ॥ २ ॥ जातां कोणी आडवाटे । दाविती गोमटें रूप त्यासी ॥ ३ ॥ शरण एका जनार्दनीं । त्याची पायवणी वंदीन ॥ ४ ॥

३८३९ ऐसे बळी हरीचे दास । यम शरण तयास ॥ १ ॥ गाती सदा नामावळी । तेणें काळ कांपे चळी ॥ २ ॥ उदार धीर नामें जाहले । एकी जनार्दनीं पाईक भले ॥ ३ ॥

३८४० शूर धीर स्वामीपणें । पाईक पेणें शोभे त्या ॥ १ ॥ नेणेचि कधीं दुजा ठाव । एक भाव स्वामी काजीं ॥ २ ॥ जाईल तरी जावो प्राण । परी स्वामीस नये उणेपण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उदार । मिरविती बडिवार पाइकांचा ॥ ४ ॥

३८४१ याची सत्ता स्वामीवरी। ऐसे ते बळी पाईक ॥ १ ॥ उदार धीर एक मनें । स्वामीकार्या देह देणें ॥ २ ॥ न धरिती कांहीं आशा । म्हणोनी सर्वेशा पात्र होती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाईक । मुकुटमणी स्वामी एक ॥ ४ ॥

३८४२ कांहींच सांकडें न घालिती वायां । स्वामी सन्मुख पाया सरते होती ॥ १ ॥ ऐसे ते पाईक मुगुटमणी देहा । स्वामी त्यांची पदवी मानी जगीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं तया मोल नाहीं । स्वामी देतो कांहीं न घेतां तें ॥ ३ ॥

३८४३ शोभले उदार पाईकपणें देहीं । हेत दुजा नाहीं सवेवीण ॥१॥ स्वामीकाजीं एक न करी आळस । देहासी उदास सर्वभावें ॥ २ ॥ एका जनार्दनीं सर्वभावें प्रमाण । स्वामी आपुलें अधीन केला तिहीं ॥३॥

३८४४ नेणती जाणती होती आणि जाती । पाईकिची ज्योती ब्रह्मरूप ॥१॥ म्हणोनी जडलें सेवेलागीं मन । नव्हेचि उद्विग्न चित्त कधीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं प्रेमाचें भांडार । पाईकपणें उदार शोभे जनीं ॥३॥

३८४५ आणीक पाईक अनेक स्वामींचे । कार्य कारण साचें जाणती ते ॥ १ ॥ स्वामींचें जैसें मन तैशी पाईकांची सेवा । हें तों माझे जीवा नावडेची ॥ २ ॥ एका जनार्दनीं स्वामी माझा बळी । पाईकपणें रळी करीन मीची ॥ ३ ॥

३८४६ देहदान देउनी उदार मिरविले । स्वामीयासी केलें आपुलें घर ॥ १ ॥ घेउनी करवत आपुलेनी हातें । शरीर दोन भागातें केलें जिहीं ॥ २ ॥ देउनी राज्य धन जाहलेंसे भिकारी । भिक्षा निरंतरी

मागताती ॥ ३ ॥ एका जनार्दनीं पाईक ऐसे भले। स्वामीस मानलें सर्वभावें ॥ ४ ॥

३८४७ धन मान राज्य न धरितां आशा। तरीच स्वामीदशा पावती ते ॥ १ ॥ पाईकपण गेलें स्वामी होउनी ठेलें। परी नाहीं विसरलें सेवेलागीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं पाईका ठाव। देहींच तो देव हातीं लागे ॥

३८४८ एकपणें एक एकपणें एक। एकाचें अनेक मिरविती ॥ १ ॥ तया नाहीं ठाव दिसेना ती गती। पाईकपणें वस्ती कोठें नाहीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं गेले दोन्ही ठाव। स्वामी ना देव नाहीं तया ॥ ३ ॥

## आशिर्वादपत्र.

३८४९ चिरंजीव जीवाजीपंत ठाणेदार। वास्तव्य देहपूर। यासी आत्मारामपंत। यांचा आशिर्वाद। पत्र लिहिणें कारण जें॥ तुम्हासी देहगांवची सनद। शंभर वर्षांची देऊन पाठविलें। कलम तपशील। गांवची अबादी करावी ॥ क. ॥ १ ॥ कामक्रोध हे रयत त्यांचें ऐकूं नये ॥ क. ॥ २ ॥ आशा मनशा यांची संगत धरूं नये ॥ क. ॥ ३ ॥ सदा स्वकर्मे वागणूक ठेवणें ॥ क.॥ ४॥ शांती क्षमा दया असो देणें ॥ क.॥ ५॥ ज्ञान वैराग्य भजनपूजनीं आदर ठेवणें॥ क. ॥ ६॥ हीं कलमें कबूल होऊन तुम्हांस रवाना केलें। तुम्हीं तो तें विसरून सदरींचे कलमांस न अनुसरून। वाईट वागणूकीचा रस्ता काढला। तो तुम्हांस परिणामीं बाधक होईल। सावध राहणें। एका जनार्दनीं शरण। हें आशिर्वादपत्र ॥ १ ॥

## विनंतीपत्र.

३८५० श्रीमंत महाराज राजमान्य सकल गुण संपन्न। सकळ वेदसंपन्न। शास्त्रसंपन्न। आत्मारामपंत वास्तव्य देह शहर। चरण सेवेसी॥ जीवाजीचा साष्टांग नमस्कार। आपण कलमीं पत्र दर्शविलें त्याप्रमाणें गांवची वहिवाट चालूच आहे। मध्यंतरीं गांवची रयत नायकेल तर इलाज नाहीं। ज्याचे ते आपआपले धर्माप्रमाणें वागतात। पुराण श्रवण मनन। निदिध्यास अर्चन। वंदन। दास्यत्व। पादसेवन। हेही आपआपल्या धर्माप्रमाणें चालूं आहेत। यांत अधर्म कोणता होईल तो साहेबांस लिहून कळवूं। एका जनार्दनीं शरण हें विनंतिपत्र ॥ १ ॥

## अभयपत्र.

३८५१ अभयपत्र जिवाजीपंतास। कळावें कीं मौजे देहपूरची वागणूक उत्तम स्वधर्मयुक्त चालवूं। ऐशी तुम्हीं लिहून कळविली। तेणें करून धन्यास फार संतोष जाहला। जाणोन धन्यानें तुमचे गांवचे अबादी करितां। ज्ञानवैराग्यासह शांती क्षमा दया हे ताबडतोब रवाना केले। मौजे मजकुरीं पावतांच। यांचा अंगिकार करून वहिवाट सुरू करणें। या कामीं कोणाची हरकत धरूं नये। मागाहून स्वधर्मपंताची स्वारी येणार आहे। तुम्ही आपले हुशारीत राहणें। लिहिलेंप्रमाणें वर्तणूक ठेवणें। एका जनार्दनीं शरण हें अभयपत्र दिलें सही ॥ १ ॥

## अर्ज.

३८५२ अर्जदस्त अर्जदार। बंदगी बंदेनवाज। आलेकम् सलाम। साहेबाचे सेवेशीं। बंदे शरीराकार। जिवाजी शेकदार। बुधाजी कारकून। प्रगणे शरीरबाद। किल्ले कायापुरी। सरकार साहेबांची आज्ञा घेऊन स्वार जाहलों। तों परगणे मजकुरीं येऊन सरकार काम सुरू करावयास लागलों। तों परगणे मजकूरचे जमादार दंभाजी शेटे। कामाजी महाजन। मनीराम देशमुख। ममताई देशपांडीन। क्रोधाजी नाईकवाडी। ऐसे हरामजादे फार आहेत। ते सरकार कामाचा कयासा चालूं देत नाहींत। तमाम परगण्याची फितुरी करितात। दंभाजी शेट्या कचेरींत येऊन जोम धरून बसतो। मनीराम देशमुख आपलें परभारें काम करून घेतो। ममताई देशपांडी इनें तमाम परगणा जेरदस्त केला। क्रोधाजी नाईक यानें तमाम तफरका केला। तों साहेबांपासून जरासंघ चोपदार आला। त्यानें खबर केली कीं। मागून यमाजीपंताची तलब होणार। त्यास त्या धास्तीनें तमाम परगणा ओस जाहला। बीतपशील कलम। डोळसवाडीस मात्र कांहीं हुई हुई वस्ती राहिली। कानगांव तो बंद जाहले। दोनी वेशींचीं कवाडें लागलीं। नाकापुरास वाहव सुटलें। तोंडापूर तो तफरखा झालें। दंताळवाडी ओस पडली। दिवेलावणी देखील राहिली नाहीं। केंस गांवची पांढर जाहली। शीरापूरचे लोक दरोबस्त थरथरा कांपूं लागले। हातगांव कसाल्यानें जर्जर जाहले। त्यांच्यानें आतां कांहीं लावणी होत नाहीं। पायगांवचीं मेटें बसलीं। ढोपरपूरची राहटी राहिली।

वरणगांवची वाली सरली। गांडापूर वाहूं लागलें। लिंगस्थान भ्रष्ट जाहलें। उठूं पळूं लागलें। धीर धरवेना। ऐशीं परगण्याची कीर्ति बुडाली। यावर सरकार काम सुरू करीत होतों। तों यमाजीपंताची परवानगी आली कीं। हुजूर येणें आपणास साहेबाच्या कलमांना आश्रय आहे। एका जनार्दनाचा धंदा। बंदगी रोशन होय हे अर्जदस्त ॥ १ ॥

## अर्जदस्त.

३८५३ अर्जदस्त अर्जदार बंदगी। बंदेनवाज साहेब आलेकम् सलाम। कायापुरीकर जिवाजीपंत सुभेदार। बुधाजीपंत फडणीस। परगणे शरीराबाद। हकीगत। सरकारची रजा घेऊन निघाले। तों स्वार होऊन किल्ले कायापूर येथें दाखल जाहले। दरोबस्त अंमलदार सर्व सरकारकामास वाकब नव्हते। ऐशियास परगणे मजकूरचें कायापुरांतील उखडे रुजू झाले। सदरहु परगणा व जमातदार। सरकारचे पुढारी लोक यांचीं नांवें। पाटील कुळकर्णी। शेटे महाजन। देशमुख देशपांडे। यांचीं खालीं लिहिल्या प्रमाणें नांवें। दंभाजी शेटे। कामाजीराव महाजन। मनाजीराव देशमुख। ममताई देशमुखीण। रसनाई पाटलीण। केसाजीपंत कुलकर्णी। जराजीराव देशपांडे। हे फार हरामजादे आहेत। कचेरींत जोम धरून बसतात। सरकारचे काम सुरू होऊं देत नाहींत। दंभाजी शेटे यांनीं संतबाजारांतील भावाचा बिगाड केला। आयुष्य धान्याचें माप शुद्ध भरीत नाहींत। बाळपणांत क्रीडा। तारुण्यांत स्त्रीसंग। वृद्धपणीं चिंता। याप्रमाणें माया चालू केली। भस्म रुद्राक्ष माळा पादुका जटा वल्कलें कंथा दंडकमंडलु। यांचा मात्र सुकाळ केला। या योगानें खरा परमार्थ बुडाला। देह अभि‌मान वाढविला। कामाजीराव महाजन। यानें आपलें पांच बंधू आपण सरकारचे रिसाल्यावर ठेविले। त्यांतील भ्रम। हट्ट। द्वेष। अधैर्य। साहस। अविवेक। असत्य। कौटिल्य। परोत्कर्ष। सहनत्व। हे दहा बारगीर। हाताखालीं घेऊन। तपस्वी व्रतें नागविलें। विविकाचें ठाणें उठविलें। योग याग जप तप ध्यान आष्टो समाधी चतुर्विध पुरुषार्थ हे कायापुरींतून बाहेर घालविले। व्यभिचाराचा गोंधळ फार केला। मनाजीराव देशमुख आपले मतें परस्पर कारभार करितात। स्त्रीसुना मध्यें घूत धन याचा अंगिकार केला। त्यायोगानें प्रजा आपआपला धर्म विसरल्या। ममताई सरदेशमुखीण इनें आपल्या स्वपराक्रमानें संपूर्ण परगणा जर्जर केला। सर्व लोक मायाजाळांत गुंतविले। परमार्थाविषयीं एकासहि फडकूं देत नाहीं। रसनाई पाटलीण इनें खाण्यावर दृष्टी दिली आहे। केसोपंत काळे कुळकर्णी। जराजीराव देशपांडे। यांनीं आपल्या जातीत फितूर केला। काळ्याचे पांढरे झाले। आणि पांढरीचा वसूल करविला। ऐसे आम्ही थोड्या दिवसांत वाकब होऊन। सरकारचीं कामगिरी करीत होतो। तों तुमचा नवज्वर चोपदार आला। त्यानें अशी करणी केली कीं। यमाजी भास्कर सरसुभेदार। यांची मागून तलब येणार आहे। त्यांनीं त्रिदोषाची रवानगी केली। त्या धास्तीनें तमाम परगणा ओस पडला। सदरहु तपशील। शीरपूर थरथरां कापूं लागलें। डोळसवाडी उजाडी जाहली। नाकपूर वाहुं लागलें। कानपूर ओस पडलें। दिवेलावणी मोडली। मुख नगरांतील व्यापार बंद जाहले। रसनाई पाटलीण वाकडी पडली। तगादा करावा तर कांहींच बोलत नाहीं। दंताळवाडीची कचेरी बरखास्त जाहली। मानापुरांनी पड घेतली। उरगांव धडधड करितें। हातगांव उदरवाडीचे खसाल्यानें जेर जेर झालें। याच्यानें लावणी होत नाहीं। पायगांवाचे मेटे बसले। कंबरवाडी बसून राहिली। दोन गांवे तर पार उजाड झाली। त्याचा तपशीलवार। गांडापूर कर्जदार झालें। तें अखंड शंखनाद करी। त्याच्यानें अर्ध क्षण धीर धरवत नाहीं। लिंगपूर स्थान भ्रष्ट झालें। ऐशी परगण्याची कीर्द बुडाली। पुराण शणें ओस पडली। त्यांत नवज्वर चोपदार हुजूर न्यावयाची उतावीळ करितो। हुजूर यावें तर परगणे मजकूराचा कांहीं वसूल झाला नाहीं। यमाजीपंत कुरसीस करितील त्या धास्तीनें उगीच बसलों। आम्हांस तर सरकारच्या पाया वेगळा आश्रय नाहीं। हजार अन्यायी। याजवर बुधाजीपंताचा अर्ज कीं। रयत बिघाडल्यामुळे या त्रासानें जीवाजीपंत सुभेदार निघून जाण्याचे बेतांत आहेत। त्यास सरकारनें। त्याजवर कृपा करून। तत्वज्ञान पेन्शन देऊन। ब्रह्मपुरींत रहावयाला जागा द्यावी। बंदगी रोशन होय। एका जनार्दनीं अर्जदस्त ॥ १ ॥

## अर्जीचा जाब.

३८५४ क्षत्रीय कुळवंत। श्रीअयोध्याधीश। राजाराम छत्रपती अनंतब्रह्मांडनिवासी राजे। श्रीजिवाजीपंत शेकदार। मौजे देहगांव। तालुके अष्टपुरी। मामले पांचाळेश्वर। यासी आज्ञापत्र। मौजे मजकूराचा वाका लिहून कळविला। तेथें लिहिलें कीं मनाजीराव देशमुख। हे असुरी सेना पुंडपाळेगार मिळून गांव मारितात। वसाहत होऊं देत नाहींत। ब्रह्मपुरीचा मार्ग चालूं देत नाहींत। असें असल्या कारणानें तुम्हावर साहेबाची मेहेरबानी होऊन। मनाजी देशमुख याजला तबीब पोहोचावयास। सरकारांतून सुभे रवाना झाले। बितपशील कलम। आत्मा विवेक। प्रधान स्वानुभव। सैन्याधिपति प्रबोध। सरलष्कर इतरा वैर सनदा देऊन। तावडतोब रवाना केलें आहेत। तर हे मौजे मजकुरी पावतांच। अवघे पुंडपाळेगार ठार मारतील। ब्रह्मपुरीचा मार्ग चालूं लागेल। याजकरितां तुम्हीं आपली खातरजमा राखुन। साहेब कामास रुजूं राहणें। केलेली सेवा तुम्हांस मजूरा आहे। तर आपण हुजूर आल्यास। बंदमोक्षांतील इनाम दिला जाईल। आपणासह पूर्ण निजानंदी रंगून साहेब कामास तत्पर असणें। एका जनार्दनीं शरण। बहुत काय लिहिणें जाबचिठ्ठी ॥ १ ॥

## अभयपत्र.

३८५५ समस्त राजकार्य धुरंधर। विश्वासनिधी। राजमान्य राजश्री। गजानन पंडित। छिमत अपर्णाकांता। तालुके कैलासगिरी। तहाजी बाजी शेकदार। परगणे कर्म आचारण। सरकार ब्रह्मांड नगर। लोली प्रवाहे। अभयपत्र दिधलें कीं। तुमचे बाबे विवेक देसाई। येऊन हुजूर विदित केलें कीं। दक्षिणाधिपती राजश्री यमाजीपंत कमाविसदार। यांचे धास्तीनें तमाम गांवची कीर्द बुडाली। त्यास येरवी पूर्वी। संपूर्ण तीर्थव्रतें। जप अनुष्ठानें। दानादि केली। परंतु गांवची कीर्द अबादी होईना। यास्तव अभयपत्र सादर केलें कीं त्रिकुटाचल शिखरीं। भ्रमरगुंफा सिंहासनीं। श्रीगुरुराव आहेत। त्यासी शरण जाऊन। आतां ज्ञानाची विचारणा करावी। म्हणजे श्रीगुरुराव। नामाचे निशाण देतील। तें देहगांवचे मुख्य चौबारा उभारा। कामक्रोधाधिक षड्वैरी। आपणावर दगा कारितात। तरी त्यांची पाळद राखून। इकडे निरोप कळवावा। म्हणजे त्यांशी धरून आणून। यांचा शिरछेद करावयास येईल। परंतु लिहिल्याप्रमाणें वहिवाट करावी। आम्ही सरकारांत अर्ज करूं। ज्ञान वैराग्य हुजरे। आपले रखवालीस पाठवूं। कळावें एका जनार्दना शरण। हा आशीर्वाद। हें अभयपत्र ॥ १ ॥

## ताकीदपत्र.

३८५६ समस्त राज्यकर्ते धुरंधर। परगणे शरीराबाद सुभा। सुमातैन लोली प्रवाहे। ताकीदपत्र दिधलें कीं। कायापुरास जीवाजी नामें गृहस्थ। त्यास कौल देऊन। देहगांवची वस्ती। आबाद रक्षावया निमित्त। पाठविले आहेत। तर कोण्याहि गोष्टीचा ताप न लागेल। हरएक विषयीं साहित्य करावें। मनाजीराव सुभेदार। बुधाजीपंत फडणीस। चित्ताजीपंत चिटणीस। हे थोर मनुष्य असतात। अहंकाराजीपंत सबनीस। यांचे हवालीं सर्व देहगांवचा कारभार दिधला। त्याच्या पट्टघाच्या वरचे मुत्सद्दी घरीं नसून नवीन मुत्सद्दी कामगार उभे केले तेहि चांगले नव्हते। विकल्पाजी महाजन। मोहोजी शेटे। कामाजी कोतवाल। क्रोधाजी नाईकवाडी। द्वेषाजी जमेदार। विकारपंत जकातदार। लोभाजी पोतनीस। मत्सरजी मेहेत्रे। कुतर्काजी। गस्तदार। उन्मतजी पाटील। कुबुद्धी कुळकर्णी। भ्रमाजी शिपाई। मदाजी देशपांडे। दंभाजी देशमुख। प्रपंचपंत मुजुमदार। मुर्खाजी हुजुरे। स्वार्थाजी खिजमतगार। अविवेक पुराणीक। अज्ञान मशालजी। हे नवीन कामगार उभे केले। तेहि चांगले नव्हे। पहिल्या दासी। त्या नवविधा त्यामागून। दुसऱ्या दासी उभ्या केल्या। आशा मनीशा तृष्णा कल्पना ममता माया प्रीति मुक्ति भ्रांती इच्छा वासना भ्रमणा कुबुद्धि निंदा अहंता चिंता निद्रा मोहनी। ह्या कामकर्त्या वादी। अहंकारपंत सबनीस यांनीं उभ्या केल्या। त्यानें दरोबस्त परगणा बुडविला। आणि यमाजीपंत कमाविसदार। याचे घरीं एकांत स्थळ स्थापन केलें। त्याजवरून हें ताकीदपत्र। सादर केलें कीं। नवीन मसुदे व कामगार आहेत ते त्यागावे। सरकार हुजूरचे मुत्सद्दी कामगार आहेत। तर त्यांचे हातें काम घ्यावें। मुत्सद्दी तपशील। शुद्ध सत्त्व भाव विवेक वैराग्य बोध परमार्थ आनंद समाधान निर्वैर स्वानुभव धैर्य सत्त्व भजन पूजन हे कारभारी। कार्य-

कर्त्या । सुशीला सुबुद्धी उन्मनी प्रतिष्ठा । नवविधा मर्यादा । दया शांती क्षमा नम्रता समाधी । ह्या कार्यकर्त्या व ते मुत्सद्दी त्याचे हातीं काम घ्यावें । ह्याविषयीं सरकारांतून । ताकीद झाली आहे । तर लिहिल्याप्रमाणें वहिवाट करावी । सबनीस मजकूर यांचे मुत्सद्दी कामगार दरम्यान ह्या कामांत आल्यास । पारिपत्य केलें जाईल। स्पष्ट समजावें । सरकार कामगार उभे करावें । त्यांचे हातें काम घ्यावें । एका जनार्दनीं शरण । बहुत काय लिहिणें हें ताकीदपत्र ॥

## जाबचिठ्ठी

३८५७ सकलयुक्त प्रवीण जिवाजीपंत शेखदार । तुम्हांवर बाकी निघाली म्हणोन तुम्हांस देहेगांवास पाठविलें । तर देहेगांवीं राहून । विषय शेट व लोभाजी नाईक । यांचे बुद्धीस लागोन । भवसमुद्र तरावयाची भूल पडली । यामुळें कामाजी महाजन व मनीराम देशमुख तुम्हांस साह्य होऊन तुमच्या निजस्वार्थाची खराबी केली । बुधाजी पाटील मोकदम । मुफसल्लाकीर्द होऊन म्हणों लागले कीं । कानडखिंड व तोंडापूर हे दोन्ही मातबर असतात । श्रवण खरीप व कितेन रबी पिकावयाची होती । ती ममताई आवानें हातीं लागूं दिली नाहीं । यासी उपाय केला पाहिजे। खावंदापाशीं भागवतराव दिवाण। तो गिताबाईचा पुत्र राजयोगी । याची भेटावयाची तजवीज । वैराग्यस्वामी यांचे हातें व्हावी । प्रथम पश्चातापपंत । आपुले स्वाधीनच आहेत । त्यांजपाशीं येणें । ते तुझ्या वाणीचा हवाला घेतील । मग भागवतराव दिवाण यांचेकडे जाणें । ते तुम्हांस मोकळे करतील । पुन्हां देहेगांवास व गर्भपुरास पाठविणार नाहींत । त्वां लिहिलें जे तूर्तच यमाजीपंतांची तलफ होणार । त्याची कांहीं तलफ माघारी फिरत नाहीं । त्याजबरोबर हुजूरच्या सनदा आहेत । म्हणून सांगितल्याबरहुकूम करणें । गैर न करणें । एका जनार्दनीं शरण । हा आशिर्वाद जाबचिठ्ठी ॥ १ ॥

## कौलपत्र

३८५८ चिरंजीव जिवाजीपंत ठाणेदार । यासी आत्मारामपंत कमाविसदार । कसबे ब्रह्मपुरी । आशिर्वाद उप्परी । तुम्हांस देहगांवचे ठाणें दिल्हें आहे । तर ठाण्यांत सावधपणें वर्तणूक करणें । तेथें ममताई पाटलीण । तिनें लटिकेंच दंभ उभें केलें आहे। कामक्रोधादि षड्वैरी चाकर ठेवून । लोभमोहाचे फांसे सिद्ध करून ठेविले आहेत । म्हणून तुम्हांस सूचना मात्र लिहिली । विषयाचा लोभ न धरणें । निजहितासी अंतर न करणें। सत्य मिथ्या जाणोन। विचाराची वाट धरणें । अविचारपणा सोडून देणें । विवेक सद्भाव यांसी मित्रत्व विशेष असूं देणें। त्याचें बुद्धीनें गांवची लावणी करणें । उत्तम चार वर्णास कौल देऊन । धैर्याचा नांगर धरून । शेतामधील खडे काढून । वासनेच्या पालव्या तोडून । संशयाच्या काशा गोळा करून । भूमिका शुद्ध करून । मग भक्ति ज्ञान वैराग्य तिफनी करून । सद्गुरुमुखीं निजबीज पेरणें । तेथें शुद्धसत्वाचा मेघ वर्षेल। तेथें सत्याचा माळा घालून । कुतर्क पाखरूं उडवून देणें । जागोजागीं विश्वास रक्षण ठेवून । शेतांतील माल अवघाच गोळा करून। समस्त षड्गुण ऐश्वर्य बैल जुंपून । अवघा माल खळ्यांत आणून । पुष्कळ काढून । स्वानंदाची रास करणें । तेथें सिद्ध साधकें मागुतें येतील । त्याला भक्तीच्या पायलीनें । अवघाच माल मोजून देऊन । सहहुजूर ब्रह्मपुत्रास येणें । सांगितल्या गोष्टींत बाकी ठेवाल तर । चौऱ्यांयशी लक्ष योनी फिरणें लागेल । मग पुनरपी तुम्हांवर कोणाचा दस्त लादेल । खरें चालावें जन्ममरणाची वाट खुंटेल । म्हणून जनार्दन सद्गुरुकृपेचा सागर । तेणें एका जनार्दनीं आनंदमय समाधान झालें । द्वैताचा लेश उरला नाहीं । सच्चिदानंदरूप । प्रत्ययास येऊन । समाधान पावलें । हें कौलपत्र ॥ १ ॥

## कौल.

३८५९ हा कौल सावध ऐका । तत्त्वमसि धन्याचा शिक्का । सांडोनि अवघा धोका । शोकदुःखासहित ॥ १ ॥ दीनानाथ पतीतपावन । ऐसें धन्याचें नामाभिधान । वेद ज्यांचे बंदिजन । कीर्ति पावन लोकोत्तरीं ॥ २ ॥ याचा कौल अन्यथा नव्हे । सत्य जाणा मनोभावें । पतीत पापी अवघे यावें । सुखें नांदावें स्वानंदेंसी ॥ ३ ॥ संचित क्रियमान पुण्य पाप । इस्त काबिल तागाईत माप । शिल्लक बाकी त्रिविधताप । आपेआप माफ केली ॥ ४ ॥ दिवेलावणी करा घरीं । शिक्का रेखा धरोनि शिरीं । माफ केली बेठ बेगारी । घरोघरीं सुखें असा ॥५॥ कुलबाब कुलकानू । चिठ्ठा टिका ओघ मानूं । तुमचें तुम्हां देऊं प्रमाणूं । शंका मनीं धरूं नका ॥ ६ ॥ संतीं मार मात केली । कलियुग

देखूनि अवघीं भ्याली । हे प्रतिज्ञा कळों आली । तेचि लिहिली कौलांत ॥ ७ ॥ रकमेप्रमाणें नव्हे शासन । तेथें कैचें भक्तिसाधन । सदरेसि खालावूनि मान । कीर्तन सुखें नृत्य करा ॥ ८ ॥ यमनियम विधिनिषेध । हा तुम्हांसी न लगे बाध । नाम कीर्तनीं अगाध । सुखें स्वानंद भोगावा ॥ ९ ॥ विवेकाचा नांगर धरा । टाकवेल तितका कुणबावा करा । लहान थोर वाहवो बरा । कौल मस्तकीं धरुनीं ॥ १० ॥ आपली आपण सीमा पहा । पेंडोळा देखोनि उगीच राहा । अदृष्टें पिकेल तितुकें लाहा । कटकट हकाट करूं नका ॥ ११ ॥ बीज नसेल पेराया । तरी सद्गुरूचे पाय धराया । लागेल तितुकें न्याया । जिवें जीया धन्य चेनी ॥ १२ ॥ चारी वर्ण चारी आश्रम । याच देहीं उत्तम मध्यम । हृदयीं धरूनिया प्रेम । नामस्मरण करा रे ॥ १३ ॥ साळी माळी तेली तांबोळी । बारा बलोतें तराळ कोळी । चांभार कुंभार सर्वकाळीं । नामावळी गर्जा रे ॥ १४ ॥ स्त्रिया शूद्र बाळमती । अवघे नाम धरूनियां चित्तीं । हा कौल दिला श्रीगुरुमूर्ति । यश कीर्ति संपादका ॥ १५ ॥ शिक्का धरूनियां शिरीं । यमासी ठेवा धाब्यावरी । तुम्हांवरी करितां गहजोरी । त्यास शासन होईल ॥ १६ ॥ एका जनार्दनीं नामधार । त्याशींच आनंद निर्विकार । संतीं केला जयजयकार । कौल विचार जाणोनी ॥ १७ ॥

## पत्र.

३८६० माझें पत्र धन्याला वैकुंठवासी नांदतो त्याला । असा धनी माझा भला । माझ्या पूर्वजांचा उद्धार केला ॥ १ ॥ भक्त संकटा रक्षिला । मजवर फार उपकार केला । तडीतापडी धाऊन आला । पत्राचा मजकूर त्यानें पाहिला ॥ २ ॥ संकट पाहूनि भला बोध केला । चार खाणी नऊ दरवाजे । दश इंद्रिये हाच बोध केला ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ती शक्ति मजपाशीं ठेविल्या । ऐसे चार वेद वर्णी । एका जनार्दनीं वाणी ॥

## जमाखर्च

३८६१ ऐका जमाखर्चाची धणी । नरदेह मुद्दल जमा धरुनी । बाकी साल हल्लीं उगवणी । शून्य घालुनी संसारा ॥ १ ॥ सनवत चौऱ्यांएेशी लक्ष योनी । बाकी व्याज काया तेरीज मिळुनी । लक्ष लाउनी गुरुचरणीं । वसूल करावा नरदेहीं ॥ २ ॥ नरदेह साल मजकुर । रुजू साल गुदस्त पूर्वसंस्कार । सद्गुरुकृपा निर्विकार । सालें भरलीं उगविली ॥ ३ ॥ संचित क्रियामण विचार । पुण्यपाप स्वर्ग नरक द्वार । वेदशास्त्र पुराण निर्धार । स्वहित सार देखिलें ॥ ४ ॥ अहंभाव बाकी ठेविली । ती सद्बुद्धि नाहींशी केली । विवेक विचारानें पाहिली । वसूल केली नरदेहीं ॥ ५ ॥ जन्म जातक व्यवहार । हा संसृतीचा श्रृंगार । प्रेम पत्र हृदय सुंदर । अक्षय सार खतावणी ॥ ६ ॥ जातक जन्म मोफाई केली । सुखदुःख इच्छा फळें नेमिली । ऐशी शिल्लक चुकाविली । जन्मजन्मांतरींची ॥ ७ ॥ स्वधर्म खर्च केला । फलत्याग रुजू पाहिला । आला ब्रह्मार्पणीं मुजरा केला । फाटा ओढिला सुरनिसें ॥ ८ ॥ विचार सुरनीस नेमाचे । सावधान एकचित्ताचे । वर्म सुरू केलें सद्गुरूचें । नांव अविद्येचें पुशिलें ॥ ९ ॥ विवेक आत्मवर्म स्वामीचा । वडील बंधु सुरनीसाचा । झाडा पाहे प्रवृत्ती निवृत्तीचा । अंतर्यामीं विकासतो ॥ १० ॥ ध्यान पाख निशी स्वयें पाख । ज्ञानचक्षु होय सुरेख । निजरूपीं जाला उल्लेख । देखिलें देख स्वयं जालें ॥ ११ ॥ एवं नरदेह जमा झाडियासी आला । ज्ञान अज्ञान बाकी झाडा झाला । पुढें शिलकेशी चुकला । जमाखर्च केला स्वानंदें ॥ १२ ॥ ऐसा जमाखर्च संसार वावो । जैं जनार्दन कृपा करी तेहो । नाहीं बद्धमुक्त संदेहो । समूळ वावो गुरुकृपें ॥ १३ ॥ ऐसा हा विश्वरूप जनार्दन । एकी एका सेवक कारकून । प्रवृत्ति निवृत्ती रस देऊन । व्यापार केला अद्वैतीं ॥ १४ ॥

## जोहार.

३८६२ मी निर्गुणपुरीचा महार करितों जोहार ॥ १ ॥ पाटीलबाबा तुमचे वस्तींत । पाटलिणीनें केलें बदमस्त ॥ २ ॥ तुमची रयत फिरली सारी । गांवचे बदलले कारभारी ॥ ३ ॥ आतां तुमचे नाहीं बरें । चौऱ्यांयशी लक्ष फिराल फेरे ॥ ४ ॥ एका जनार्दनीं महार । पायापाशीं केला जोहार ॥ ५ ॥

३८६३ कां रे महारा मदमस्ता । कां हो ब्राह्मणबाबा भलतेंच बोलतां । तुझे बापाचें भय काय । मायबाप तुमचें आमचें एकच हाय । एक ऐसें बोलूं नको । निर्गुणापासून अवघे झालों । निर्गुण तुला काय ठावें । आत्मस्वरूपीं शोधून पहावें । आत्मस्वरूप आम्हा कळेना । नाहीं तरी संतांशीं शरण जाना । संतांशीं शरण गेल्यानें काय होतें । चौऱ्यां-

यशीचा फेरा चुकतो। हें ज्ञान तुला कोणापासून प्राप्त झालें। एका जनार्दनीं प्रसादें कळूं आलें ॥ १ ॥

३८६४ जोहार मायबाप जोहार। सकळ संतांशीं माझा जोहार। मी अयोध्यानगरीचा महार। रामजीबावाचे दरबारचा कीं जी मायबाप ॥ १ ॥ रामजीबावाचा कारभार। राज्य करी अयोध्यापूर मी। तेथील नफर सारासार। कारभार करितो कीं० ॥ २ ॥ सकाळीं समयीं उठतों। सीताबाईस जेवाया मागतों। झाडूनि दरबार काढतों। केर बाहेर टाकितों कीं० ॥३॥ सभेसी रामजीबाबा येतां। मी पुढें जाऊनि सांगे वार्ता। एका जनार्दनीं तत्वतां। जोहार करतों कीं जी मायबाप ॥ ४ ॥

३८६५ देहपूरचें दिलें ठाणें। जिवाजीस बोलावणें। मग पळूं लागले रानोरानें। कोण सोडवी त्याकारणें। कीं जी मायबाप जोहार ॥१॥ येईल यमाजीची पाळी। कोण तेथें कोणा सांभाळी। जिवाची पळतील गांवचे बळी। होईल फजिती सारी कीं० ॥२॥ अवघे राहतील घरचे घरीं। तुम्ही पडाल चौऱ्यांयशींच्या फेरी। किती जन्म किती वेरझारी। करा विचार याचा कीं० ॥३॥ शरण एका जनार्दनीं। मायबाप संत धनी। तेचि चुकवितील यातनीं। धरा विश्वास कीं जी मायबाप जोहार ॥ ४ ॥

३८६६ घ्या जोहार घ्या जोहार। मी निराकारीचा महार। संतसभेचा कारभार। मीच करितों कीं जी मायबाप ॥ १ ॥ मी धन्याचा आवडता फार। धन्याचा विश्वास मजवर। धन्याचे चाकरीवर। रुजु मी कीं० ॥ २ ॥ चार वेदां झाडितों। सहा शास्त्रांचा केर भरितो। पुराणें सर्व जमा करितों। संत पेठे आणितों कीं० ॥ ३ ॥ ऐशी करितां खटपट। संतसभेची सांपडेल वाट। तेणें मार्ग नीट। सांपडेल कीं० ॥ ४ ॥ मार्ग धरा पंढरीचा। एका विनवी जनार्दनाचा। राम नाम बोला वाचा। सावध होऊन कीं जी मायबाप ॥

३८६७ जोहार मायबाप जोहार। मी सकळ संतांचा महार। सांगतों दृढ विचार। तो ऐका की जी मायबाप ॥ १ ॥ माझा विचार नारदें ऐकिला। तो पुनरूपा नाहीं आला। भीष्म ध्रुव प्रल्हाद आगळा। या विचारें बोधिलें कीं० ॥ २ ॥ उपमन्यू बिभीषण। सर्वांमाजीं अर्जुन। आणिकहि ऋषी सांगेन। सावध ऐका की० ॥३॥ पराशर विश्वामित्रादि जाण। या विचारें पावलें समाधान। हरिश्चंद्र शिबी सुखसंपन्न। आले की० ॥ ४ ॥ ऐशा विचारें चालले। ते पुनरपि नाहीं आलें। एका जनार्दनीं भले। ऐक्यपण की जी मायबाप ॥ ५ ॥

३८६८ महार बोलतो बोला। तुम्ही सांडा गलबला। शत वर्षांचा नेम भरला। आतां हुशार राहा की जी मायबाप ॥ १ ॥ येईल यमाजीची चिठी। बोलूं नेदी जाल उठा उठी। ओंगळवाणी कराल दिठी। कोण सोडविणार की० ॥ २ ॥ कांहीं तरी हित करा। कामक्रोध परते सारा। नामस्मरणीं लक्ष धरा। हाचि विचार करा की० ॥ ३ ॥ मागील बाकी अवघी झाडा। नाहीं तरी पायीं पडेल खोडा। बसायाचा तुमचा घोडा। राहील घरचे घरीं की० ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं। मायबाप संत धनी। लक्ष लावा त्याचे चरणीं। हाचि विचार करा की जी मायबाप ॥ ५ ॥

३८६९ जोहार मायबाप जोहार। मी सद्गुरु साहेबांचा लेकवळा महार। त्याचे दरबारचा झाडाफेडीचा कारभार। मीच करितों की जी मायबाप ॥ १ ॥ सकाळीच मी उठतों। सारे रयतेची खबर घेतों। येउनी धन्यास सांगतों। ते ऐका की जी मायबाप॥२॥ रयतेंत कुलबाब जाहला। धन्याचें नांवचा बोलबाला। गांव अबादींत राहिला। धन्याचे सत्तेंने की ॥ ३ ॥ त्यांत जीवाजीचे आले ठाणें। गांव बिघडला सर्व तेणें। विसरलें धन्याचें ठाणें। केलें पेणें चौऱ्यांयशीचें की ॥ ४ ॥ म्हणोनि मारितों हाका। जीवाजीपंतास हा धक्का। एका जनार्दनीं चरणीं देखा। करी विनवणी की जी मायबाप ॥ ५ ॥

३८७० जोहार मायबाप जोहार। मी विठू पाटलाचा महार। हिशोब देतों ताबेदार। लंकेचा कारभार की जी मायबाप ॥ १ ॥ आवाजीकडून येतों। अर्धी भाकर मागून खातों। सारी रात्र गोंवरापाशीं जागतों। फरमासी करतों कीं जी मायबाप ॥ २ ॥ पाटलाचा नांगर शेट्याची तागडी। आईबाईची बांगडी। आंत माझी पांचाची घडामोडी। करितों की जी मायबाप ॥ ३ ॥ येथें कुलकर्णी स्वाधीन करा। गांवचा हिशोब पाहिजे बरा। धन्याची रजा तल्बेप्रमाणें मुशारा। ये चित्तांत की जी मायबाप ॥ ४ ॥ ब्रह्मानंदीं केला जोहार। एका जनार्दन बाजीचें उत्तर। माप केलें खरोखर। काय बोलिजे की जी मायबाप ॥ ५ ॥

३८७१ ऐका ऐका पाटीलबोवाजी । गांव बरा राखा राजी । उद्यां येतील यमाजी बाजी । फटफजिती होईल की जी मायबाप ॥ १ ॥ जोहार मायबाप धनी। उठा उठा झोंप सोडूनि । काळ भरला उरे ना कोण्ही । पुढें पडाल काळाचे वदनीं की जी मायबाप ॥ २ ॥ गांवांतील रयत स्वाधीन करा । कुळकर्णी आधीं हातीं धरा । तरीच तुमचा बरा थारा। मोडेल कोपट होईल चुरा की जी मायबाप॥३॥ कामाजी देशमुख मोठा मस्त । क्रोधाजी नाईक मिळाले त्यांत । मदाजीबोवा त्यासी शिकवित । मत्सर श्वान पुढें भुंकत की जी मायबाप ॥ ४ ॥ दंभाजीची भारी हांव। अहंकारपंतानें वोस केला गांव। जिवाजी तुम्ही विसरला धन्याचें नांव। या सहा जणांची हाव धरून की जी मायबाप ॥ ५ ॥ आतां तुम्हीं विचार करा । मूळचा मार्ग हळूहळू धरा । तेणें चुकेल तुमचा फेरा । एका जनार्दनीं तुटेल सारा दोरा की जी मायबाप ॥ ६ ॥

३८७२ जोहार मायबाप जोहार । मी निर्गुणपुरींचा महार । सांगतों सारासार विचार । तो ऐका की जी मायबाप ॥ १ ॥ कौल वर्षे शंभर । जिवाजीस दिले घर । जिवाजी तेथें मामलेदार । अवघा कारभार जिवाजीचा की० ॥ २ ॥ कौलांत लिहिली बोली । परंतु जिवाजी विसरले चाली । धन्याचे दरबारची शुद्धि नाहीं केली । मग पस्तावले की० ॥ ३ ॥ कौल भरला परिपूर्ण । यमाजीचें बैसले धरणें । जिवाजीचें उडालें ठाणें । मग दीनवदनें राहिले की० ॥ ४ ॥ यमाजीचे धरुनी नेलें । जिवाजी आपआपणा विसरले । धन्याची बाकी विसरले। मागुती जन्मासी आले की० ॥ ५ ॥ ऐसे जन्म लक्ष चौऱ्यांशी । फेरे जाहले जिवाजीसी । शरण एका जनार्दनाशीं । तरीच फेरे चुकती की जी मायबाप ॥ ६ ॥

३८७३ जोहार मायबाप जोहार । मी तो एकनाथ महार । लहानसा महाराचा पोर । माझे बोलण्याचा विचार । दुसरा नाहीं की जी मायबाप ॥ १ ॥ माझ्या बोला ऐकिजे । मोठ मोठे उमराव राजे । तुम्हीच का जिवाजी न जाणिजे । वेळेस संदेह धरितां की० ॥ २ ॥ चैतन्य चावडीचा महार । की जी मिरासी महार । जेव्हां नव्हता गांवचा आवार । मज ओळख नाहीं की० ॥ ३ ॥ कायापूरचा अचाट पाया । यमाजी झाले बेहया । त्यापुढें पाहती पळाया । मनाजी संगे मिळाले खाया । परी नाहीं वाट की० ॥ ४ ॥ दहा गुरें बाहेर दिसती । पांच गुरें अंतर असती । इतुकीं आवरीं अवचितीं । नाहीं तरी खोडा पडसी की० ॥ ५ ॥ बाराजणें फुगवितील गाल । शेवटीं तुम्हीच बांधिले जाल । तुमचे होतील बेताल । तेव्हां तुम्हांस कोण सोडवील की० ॥ ६ ॥ सारे कडेचे पोहणार । दहा आणि पांच पोर । एकनाथ करितो जोहार । अक्कल धरा की जी मायबाप ॥ ७ ॥

३८७४ जोहार मायबाप जोहार । मी निराकाराचा महार । सांगेन अवघा विचार । जिवाजीचा की जी मायबाप ॥ १ ॥ जिवाजीनें सारा गांव । बुडविण्याची धरली हांव । त्यासी मिळाले कमाजीराव । मग अन्याय सहजचि की० ॥ २ ॥ कामाजी बाजीस मिळाले। क्रोधाजी गांवांत सहज शिरले। लोभाजीचे ठाणें जोडलें । मग विसरले धन्यासी की० ॥ ३ ॥ मदाजी बाजी तो जाहले मस्त। त्यांनीं गांव पांगविला दरोबस्त। मत्सर बावा उन्मत्त । आपआपणांत मिळाले की० ॥ ४ ॥ दंभाजी म्हणविती चौधरी । सदा बैसती आपुले घरीं । धन्याची तलब आलियावरी । गांडीवरी टोले की० ॥ ५ ॥ अहंकार पोतनीस कारभारी । ते जीवाजीस ठेविती धाब्यावरी । आतां त्याची भरोभरी । कोण करील की० ॥ ६ ॥ याची नका धरूं संगती । तेणें तुमची न चुके पुनरावृत्ती । एका जनार्दनीं करी विनंती । संतीं ऐकावें की जी मायबाप ॥ ७ ॥

३८७५ मी संतां घरचा महार । करितों जोहार ॥ ध्रु० ॥ विवेक नाईक माझें नांव । मीपण आलें अहंभाव । पंचभूतांचा वसविला गांव । रस्ते चार ॥ १ ॥ आत्मा धनी पाटीलबावा । मनाजी पाटील चालवी गांवा । बुधोबा शेट्या बळकट रावा । घरांत बसली असे आवा । खेळवी पोर ॥ २ ॥ दहा इंद्रियें नऊ वेशी । राहातों दहावे खिडकीशीं । माझा मीच मूळ मिराशी । लक्ष संतांचें चरणापाशीं । सांगतों विचार ॥ ३ ॥ कौल शतवर्षांचें मूळ । कामाजी देशपांड्या खळ । क्रोध देशमुख सबळ । नेणे सरकार ॥ ४ ॥ हिशोब पडेल जमा सरकारीं । येईल यमाजीची स्वारी । जीवाजी धरुनी कारभारी । वोस पडेल नगरी सारी । देतील मार ॥ ५ ॥ शेवटीं नाहीं तुमचें धड । पडेल चौऱ्यायशींचें कोड । मी तो राहीन एकीकडे । जीवाजीवर पडेल साकडें । सांगतो सार ॥ ६ ॥

आवडी राखा मजवर हेत। मीच करीन तुमचें हित। नामस्मरणीं लावा चित्त। एका जनार्दनीं विठ्ठल विठ्ठल म्हणत। हाचि निर्धार ॥ ७ ॥

३८७६ जोहार मायबाप जोहार। मी अविद्या नगरीचा महार साचार। माझ्यानें हें नगर। आकाशासी आलें की जी मायबाप ॥ १ ॥ नगर तें रचिलें ब्रह्मियानें। आंत घर दिधलें बांधून। काम सांगितलें त्यानें। तेंच करीत आहें की० ॥ २ ॥ म्यां सहा चाकर ठेविले। ते माझ्या बळां वर्तती कुहिले। मला गांजिती बळें। अन्याय नसतां की० ॥ ३ ॥ तुम्ही अवघे एकत्र जाहला। माझें घर मोडावयाचा मनसोबा केला। जरी माझें अगत्य असेल धन्याला। तरीच मजला ठेवील की० ॥ ४ ॥ आतां कलियुगाचे ठायीं। मी माझें वसे सर्वांचे हृदयीं। माझें कामक्रोधाचें ठायीं। माझें मजपाशींच की० ॥ ५ ॥ त्यामाजीं संत सज्जन। रूपीं मिळाले परिपूर्ण। तें मानस मनरंजन। भक्त म्हणोनी की० ॥ ६ ॥ एका जनार्दनीं म्हणे देवा। अविद्येचा संग मज नसावा। जन्ममरणाचा ठेवा। तोडून टाकवा की जी मायबाप ॥ ७ ॥

३८७७ जोहार मायबाप जोहार। मी तो सूर्यवंशीं रामाजी बाजीचा महार। माझें नांव आत्मनाक महार। सारा कारभार धन्याचे रजेनें करितों की जी मायबाप ॥ १ ॥ खोपटामाजीं काय काय रहाय। हाडाचे खोड्यांत पडतील पाय। तोंड चुकवितां विज्जत जाय। मग वांचून करावें काय की जी मायबाप ॥ २ ॥ तलफ वाढवी फार। लक्ष चौऱ्यांयशी वरातदार। यमाजी हुजूरचा महालदार। त्याचा मार पुरे पुरे की जी मायबाप ॥ ३ ॥ जोहार पाटील बाजी। तुम्ही दरबारासी काय राजी। बाकी शेकली आजी। सांगूं आलें की जी मायबाप ॥ ४ ॥ मुदत जवळी आली। ताकीद पाहिजे केली। कित्येक मारीत झोडीत नेली। माझी साच बोली नोहे की जी मायबाप ॥ ५ ॥ टाकून देहेगांव। डोई बोलून पालटा नांव। घर सोडून देवळीं राहाव। हातीं काठी असूं द्यावी की जी मायबाप ॥६॥ एका जनार्दनीं महार। संतसभेसी केला जोहार। तेणें जन्ममरणाची वेरझार। चुकेल की जी मायबाप ॥ ७ ॥

३८७८ जोहार जिवाजीपंत ठाणेदार। तुमचे गांवची वस्ती खबरदार। पहावया वागणूक साचार। मज धन्यांनीं रवाना केलें की जी मायबाप ॥ १ ॥ धन्यांनीं सांगितलें मला। जीवाजीस आपण गांव दिला। तेणें गांवांतील वसूल बुडविला। ऐसें हें बरें नोहे की० ॥ २ ॥ गांवची आबादी तुम्ही करा। धन्याचा कौल पुरा करा। जमीन वजवून भरा सारा। पीक पिकवा भलीचें की० ॥ ३ ॥ पीक पिकेल अपार। तेथें मागते येतील निर्धार। त्यांसी दया शांतीचा विचार। करून दान द्या की० ॥ ४ ॥ या पिकाची पाखरें तोडा। कामक्रोध मूस झाडा। आशा मनीशा तृष्णांचा तिवडा। करूनि खळे शुद्ध करा की० ॥ ५ ॥ धन्याचे बाकी पुरतें द्यावें। बाकी फिटतां वजा आपण घ्यावें। हें मूळचें बोलणें आहे। धन्याचें की० ॥ ६ ॥ तुम्ही तो पीक पिकवून। केलें नाहीं बाकीचें खंडन। बाकी धन्याची ठेवून। तसेंच बसलां की० ॥ ७ ॥ ही वागणूक तुमची नाहीं बरी। धन्याची बाकी चुकवा सारी। एका जनार्दनीं निर्धारी। पीक पिके निर्धारी प्रेमाचें की जी मायबाप ॥ ८ ॥

३८७९ जोहार जी मायबाप जोहार। मी एकनाथ महार। सांगतो सारासार विचार। तो ऐका की जी मायबाप ॥ १ ॥ गांवामधीं कुळें पांच साचार। पंचवीस तयांचा विस्तार। जिवाजीचें ठाणें खबरदार। बैसलें की जी मायबाप ॥२॥ गांवास असती चवदा वेशी। खिडक्या शोभती बावीस त्यासी। बुरुज तेरा चौपीसी। राखी द्वारीं बैसले की० ॥३॥ पाचांचा हा विस्तार। पंचवीस प्रजेचा बडिवार। तेथें जिवाजी हुद्देदार। सारा कारभार करिती की० ॥ ४ ॥ जिवाजीनें करूनि विचार। घेतले हातीं सहा कामगार। दासीसह परिकर। काम करूं लागले की० ॥ ५ ॥ सहा जे ठेविले कामगार। त्यांनीं गांवाचा केला नाहीं विचार। जिवाजीस अष्टाधिकार देऊनि स्वाधीन केला की० ॥ ६ ॥ ऐसे जहाले सर्व एकाकार। पडला गांवांत अंधकार। शेटे महाजन सरदार। जाती निघून की० ॥ ७ ॥ एका जनार्दनीं म्हणे। जिवाजीचें वोस पडलें ठाणें। आलें यमाजीचें धावणें। नेलें धरून की जी मायबाप ॥८॥

३८८० जोहार मायबाप जोहार। वेसराख्याचा। धंदा। स्वरूपीं सावध होतो सदा। घरींहुनी फांकुं नका की जी मायबाप ॥ १ ॥ विषयाच्या गलबलीं गुंतूं नका। बहुत बाकी वाहूं नका। दांडोरा पिटिये सारखा। बाकी झाडा की जी मायबाप ॥२॥

भावभक्ति धरा कुळवाडी । चित्तांतून काढा अविद्येची पेंडी । नाहीं तर पडेल प्रपंचाची बेडी । तैं नंतर बहु दुःख होईल की जी मायबाप ॥३॥ तेणें दुःखें विवळूं लागाल । आपुले मायबापासी बोलावूं जाल । घरसंसार भोगूं लागाल । ऐसें बाकीचें फळ की जी मायबाप ॥ ४ ॥ महार बोले म्हणूनि जाल गर्वें । स्वहित होईल तें करा बरवें । बापांनो डोळे झांकूं नका की जी मायबाप ॥ ५ ॥ डोळे झांकून ठेवाल बाकी । तरी काळाची धरणी होईल निकी । जरी जाली माय सखी । तरी कोण सोडवील की जी मायबाप ॥ ६ ॥ जो वेसराख्याचे मिळणी असे । त्यासी दुजेपणाचा धाक नसे । सद्गुरुचरणीं विश्वासें । आपुलें मूळ टाकावें की जी मायबाप ॥ ७ ॥ एका जनार्दनीं वेसराखा । तेणें चुकविला जन्ममरणाचा आडाखा । जरी आत्माराम होय सखा । त्याचें चरणीं वस्ती की जी मायबाप ॥ ८ ॥

३८८१ जोहार मायबाप जोहार । कायापूर शहर तेथील मी महार । पाहूं जालों दरबार । धन्याचा की जी मायबाप ॥ १ ॥ पाटील जिवाजी अवधारी । जो कां ग्रामींचा सत्ताधारी । परी दिवसाच करितो चोरी की जी मायबाप ॥ २ ॥ आशा पाटलीण तोंडाळु फार । उगीच फिरती दारोदार । सांगे अक्षयासी व्यवहार । फजितखोर की जी मायबाप ॥ ३ ॥ मनाजीपंत कुलकर्णी । त्याचे हातीं खत लेखणी । त्याची जैशी जैशी करणी । तिकडे तिकडे कुळें जातीं की जी मायबाप ॥४॥ यमाजी बाबा हुजूरचा महालदार । त्याचे जिवावरील महार । त्यासी नाहीं पडला व्यवहार । दरबार शुद्ध करावा की जी मायबाप ॥५॥ मग जिवाजी राहविलें । मूळच्या शिवाजीस आणविलें । पाटीलकीचें वस्त्रदान दिधलें । ग्राम त्याजकडे लाविला की जी मायबाप ॥ ६ ॥ तेथील सांडबुद्धि वाटली भली । गांवामध्यें अक्षय नांदविली । नित्य नेहमीं बोलती जाहली । खरी केली हांक देऊनि की जी मायबाप ॥ ७ ॥ मज महाराची महारकी । फिरती असे अनेकीं । एका जनार्दनीं लौकिकी । दिला पोषाख यदुविरें की जी मायबाप ॥ ८ ॥

३८८२ जोहार मायबाप जोहार । याच गांवचा मी महार । सांगेन साऱ्या गांवचा विचार । सविस्तर परिसा की जी मायबाप ॥ १ ॥ गांवचे धनी मिरासदार । पाटलीण आवा खबरदार । तेथें पांच पोरांचें घर । बांधोनि रहाती की० ॥२॥ जोहार जी पाटीलबोवाजी । पाटलीण आवा करुनी राजी । सारे गांवची केली भाजी । परी धनी नाहीं ठेविले राजी । गुंतला पाहून आवाजीस की० ॥ ३ ॥ तुमची वागणूक पाहून बरी । धन्यानें गांवचे केले अधिकारी । गांवांतील जमीन वर्तवाल सारी । ती तुम्हीं केली पडीक भारी की० ॥४॥ शेत अवघें साडेतीन चाहूर । तुम्ही तेथील वतनदार । पीक पिकवावें सार असार । मुद्दल धन्याचा विचार करा की० ॥ ५ ॥ मुळींच केलें नाहीं पीक । पुढें बाकीसाठीं कराल काय एक । धन्याची बाकी टक्का एक । रहाणार नाहीं की० ॥६॥ बाकीची मुदत सरलियावरी । यमाजीची येईल स्वारी । ते पुढें घालूनियां निर्धारी । नेतील की० ॥७॥ धन्याची तुमची नाहीं भेट । यमाजीबोवा मारून करती कूट । मग तुम्ही तेथें बोभाट । कोणाचा कराल की० ॥ ८ ॥ शेत तुमचे हातीं आहे । तंव चोखट करुनी ठेवा भोय । एका जनार्दनाचे पाय । उगेच धरा की जी मायबाप ॥ ९ ॥

३८८३ जोहार मायबाप जोहार । माझें नांव विठनाक महार । सांगतों ऐका एक विचार । तो बळकट धरा की जी मायबाप ॥ १ ॥ गांव पांचा पाटलांचा । पंचवीस प्रजेचा । तेथें कारभार सहा जणांचा । तो ऐका कीं जी मायबाप ॥ २ ॥ ज्या धन्याचे पदरीं शेर । ज्यासी नाहीं कधी जोहार । अवघा आईजींचा कारभार । काम करितों की जी मायबाप ॥ ३ ॥ अबाजीनीं हवाली केला गांव । धन्याचें विसरला नांव । तलफ आल्यावरी ठाव । पळावया कैंचा कीं जी० ॥४॥ जेव्हां तलफ लागे बाकीची । तेव्हां तुम्हां आम्हा सद्बुद्ध कैंची । म्हणवूनियां सहा जणांची । भीड न धरूं की जी मायबाप ॥५॥ सहा जणें राएतील एकीकडे । गांठ तुम्हां आम्हासीच पडे । मग कोणीकडे तिकडे । हालों न देती की जी मायबाप ॥ ६ ॥ करा भक्तीची कुळवाडी । धरा हरिनामाची गोडी । नाहीं तरी चौऱ्यांयशीची बेडी । पायीं पडेल की जी मायबाप ॥७॥ तेथील मार्ग सपाट । विष्णुलोकीं वाजवा घांट । मग धुडधुडा वाट । धांवाल कीं जी मायबाप ॥ ८ ॥ एका जनार्दनीं कुळवाडी मोठा । तेणें बाकीस मारला फांटा । उघडा केला दारवंटा । कैलासाचा की जी मायबाप ॥ ९ ॥

३८८४ जोहार मायबाप जोहार । मी जनार्दनाचा एका महार । सांगतो तुमचे नगरींचा समाचार । तो ऐका की जी मायबाप ॥१॥ नगररचना केली । बारा वेशी तया ठेविली । नव खिडक्यांची चाली । तेथें ठेविली की० ॥ २ ॥ गांवची रचना जाहली पूर्ण । कळस आणि पाया एकचि जाण । जागोजाग वेशीला राखण । मज ठेविलें की० ॥३॥ जीवशिव अधिकारी । नगराचे मुख्य कारभारी । जीवाजी तेथें वहिवाट करी । शिवाजी उगेच पाहती की० ॥४॥ जीवाजीचे कारभारी । कामक्रोधादि अधिकारी । मना वाटेल तैशा परी । गांवांत नाचती की ० ॥ ५ ॥ जीवाजीचें न चले कांहीं । मनाजी देती ग्वाही । दंभाजीची भलभलाई । सहज जाहली की ० ॥ ६ ॥ मिळाले एकमेकांचे मिळणीं । गेले माझ्या धन्यास विसरुनी । शेवटीं परिणाम बरवेपणीं । न दिसे की० ॥७॥ येती यमाजीची चिठी । जीवाजीसी धरुनि उठाउठी । नेतील जेव्हां शेवटीं । मग दुःख वाटेल की० ॥ ८ ॥ हें अवघे राहती एकीकडे । जीवाजीसी पडेल कोडें । पायीं ठोकतील खोडे । मग रडो लागतील की० ॥९॥ एका जनार्दनीं म्हणे । सावधानपणें तुम्ही राहणें । जन्ममरणाचें पेणें । चुकवावें की जी मायबाप ॥१०॥

३८८५ जोहार मायबाप जोहार । देशमुख देसाई ठाणेदार । जीवाजीपंत हुद्देदार । करिती कारभार गांवचा कीं जी मायबाप ॥ १ ॥ गांव वसविला धन्यानें । दहा रस्ते पंचवीस ठाणें । सात खिडक्या गांव कोश पेणें । तेथें आहेत की० ॥ २ ॥ गांवची पांढर परिपूर्ण । नांदती शेटे आणि महाजन । जीवाजीस अभय देऊन । पाठविलें धन्यानें की० ॥ ३ ॥ जीवाजी आले गांवांत । गांव पाहिला दरोबस्त । कारभारी घेउनी आपुले हातांत । वागवूं लागले की० ॥ ४ ॥ जोंवरी नव्हती आवाजीची भेट । तोंवरी जीवाजीनें भरली पेठ । जाहला सर्व गांवचा बोभाट । आवाजीचें नांवें की० ॥ ५ ॥ आवाजीनें नाशिला गांव । मोडला धन्याच्या बाकीचा ठाव । शेवटीं जीवाजीचें वैभव । जाईल की० ॥ ६ ॥ जीवाजी तुमचे नाहीं धड । यमाजीबावाची होईल होड । तुम्हावर हें सांकड । येईल की० ॥ ७ ॥ आवाजीचें करा काळें तोंड । इवे पायीं तुम्हावर येईल बंड । शेवटीं यमाजीचा दंड । न चुके की० ॥ ८ ॥ आतां सांगतों तें करा । धन्याचा हिशोब चुकवा सारा । पडिकाचा सारा दोरा । ठेवूं नका की० ॥ ९ ॥ कांहीं ठेवाल धन्याची बाकी । तर सोडाल जागा होईल पारखी । एका जनार्दनीं वोळखी । धन्याची तुमची नोहे की जी मायबाप ॥ १० ॥

३८८६ जोहार मायबाप जोहार । पाटील पांडे जोहार । देसाई देशमुख जोहार । कीजीये सरदार । कोंडून राखिले की जी मायबाप ॥ १ ॥ उघडा उघडा नेत्रांची ब्रह्मकवाडें । ऐका धर्मरायाचे प्रमाण निवाडे । जेणें चुकेल जन्ममरणाचें सांकडें । इमारतींचीं लांकडें । रानोमाळ होतील की० ॥ २ ॥ खडी फरस धर्मराज खरा । तेणें कलुशा मारून केला चुरा । माझे धन्याचे घरां । कधीं मधीं येत जा कीं० ॥ ३ ॥ अकाबाई सावकारीण मोठी । कायापूर नगरी केली खोटी । तिनें तर पाडिली भलशाची तुटी । तेथें तुमचे काय चाले की० ॥४॥ ग्वाही जांवयासी म्हणे लेंकरा । त्यासी वाढितां तूप साखरा । मला देखून लपतां एसकरा । अंतकाळीं चाकर मीच की० ॥ ५ ॥ जांवयासी वाढी तूप लई । मला म्हणतां उरलें नाहीं । घर बुडालें याच पायीं । प्रत्यक्ष ग्वाही मीच की० ॥ ६ ॥ सकळ कोणी जाऊं नका । मागील बाकी ठेऊं नका । नाहाक एखादा धका । बसेल की० ॥ ७ ॥ अविद्ये खिडकी वाटे गेला । तो यमदूतें धरोनि नेला । लक्षचौर्‍यांयशी मारथीं मारथिला । आइका की० ॥ ८ ॥ झाडाल बाकी तर तुम्ही व्हाल सुखी । हे सत्य तिहीं लोकीं । झेंडा नौबद लावा निकी की० ॥ ९ ॥ एका जनार्दनीं महार बोले । म्हणून नका जाऊं गवें । मारितां अंग होईल हिरवें । सांगतों बरवें की जी मायबाप ॥ १० ॥

३८८७ जोहार मायबाप जोहार । मी सूर्यवंशीचा महार । सारा गांवचा करितों कारभार । सावध ऐका की जी मायबाप ॥१॥ गांव भारिला पांचांनीं । पंचवीस जाहले धनी । आपुलाले गुंतले व्यसनीं । गेले विसरुन धन्यासी की० ॥ २ ॥ धन्यानें हवाली गांव केला । विसर त्याचा त्यासी त्यास पडिला । शेवटीं यमाजीबावाचा टोला । गांडीवर बसेल की० ॥ ३ ॥ गांवांत वस्ती भरपूर आहे । तंववर तुम्ही हित आपुले पाहावें । जरा आलिया उपाय । कांहीं न चाले की० ॥ ४ ॥ डोळेगांवची लागती कवाडें । नाकापुरीं शेंबुड पडे । तोंडापूरची बत्तीस खेडें । वोस पडतील की० ॥ ५ ॥ मानगांव डगमगेल ।

पोटगांव पाठीस लागेल । ढोपरपूरचा मणका मोडेल । ऐशी फजिती होईल की० ॥ ६ ॥ दोन्ही टिऱ्या वाळून जातील । गांडापूर बदबदा वाहील । लिंगाची तों गडबड होईल । मेल्या कुतऱ्यासारखी की० ॥ ७ ॥ गुडघेगांवचे मेटे मोडती । पायगांव चालू रहाती । हातापुरे वाळून जाती । काय उपाय तेथें की० ॥ ८ ॥ ऐशी गांवची गडबड जाहली । ती पाहून मला दया आली । मग म्यां काढून रसायन वल्ली । आबादी केली गांवची की० ॥ ९ ॥ भक्तीचा करुनी काढा । तयासी दिधला धडफुडा । नामस्मरण निकाढा । उतारा दिला की० ॥ १० ॥ एका जनार्दनीं शरण । दिव्य उतरून रसायन । छेदूनियां भवाचें बंधन । वैकुंठीं वास करविला की जी मायबाप ॥ ११ ॥

३८८८ जोहार मायबाप जोहार । मी दामाजीचा लेकवळा महार । माझें नांव विठु साचार । सारा झाडफेडीचा कारभार । मी करितों की जी मायबाप ॥ १ ॥ मंगळवेढें ठाणें जाण । दामाजीस ठेविलें कारभारी नेमून । गांवचा वसूल सारा करून । मज नफरा पाठविलें की० ॥ २ ॥ जोहार जी जोहार । मी लेकवळा विठू महार । दामाजी मजवर प्यार आहे की० ॥ ३ ॥ दुष्काळ पडला जाणोन । शिल्लक पैवें दामाजीनें विकून । चिठ्ठी पैका घेउनी जाण । आलों की० ॥ ४ ॥ दामाजी परम स्नेहाळु । त्याचा मज कळवळु । चिठ्ठी घेउनी उतावेळु । आलों जवळ की० ॥ ५ ॥ आला वसूल खतावणी । जमा करा वसूल घेउनी । बाकी शून्य घालुनी । जाब द्यावा की० ॥ ६ ॥ वसूल सारा मेळवा । मज लेकवळ्या जाब द्यावा । पै बाकी न ठेवा । दामाजीकडे की० ॥ ७ ॥ मी विठानाक महार । राहतो पंढरीं निरंतर । पहावया आपुलें नगर । येथवर आलों की० ॥ ८ ॥ पैका पोंचल्याची रसद । मज लिहून द्यावी त्वरित । मी जातों जी येथून की० ॥ ९ ॥ म्हणोनि केला जोहार । निघाला विठनाक महार । इकडे दामाजीचा विचार । ऐका की जी माय० ॥ १० ॥ प्यादे येऊन जाण । दामाजीस धरती येऊन । बेदरा नेती लगबगें करून । तो नवल जालें की० ॥ ११ ॥ स्नान करूनि जाण । दामाजी बैसला देवतार्चन । नित्य नेम वाचितां जाण । रसद आंत देखिली की० ॥ १२ ॥ रसद देखिला पाहतां ते वेळीं । बादशहाची मुद्रा देखिली । विठु महारासवें रसद पाठविली । बाकी शून्य जाली की० ॥ १३ ॥ एका जनार्दनीं केला जोहार । मोडिला अविद्येचा थार । व्यापूनीयां चराचर । भजनीं सादर असावें की जी मायबाप ॥ १४ ॥

३८८९ जोहार मायबाप जोहार । मी विठोबा पाटलाचा महार । सांगतों सारासार विचार । ऐका की जी मायबाप ॥ १ ॥ गांव तों पांचा पाटलांचा । पंचवीस प्रजांचा । येथें सहाजणांचा । कारभार की० ॥ २ ॥ ज्या धन्याचें हें शहर । त्या धन्यासी नाहीं जोहार । अवघा ओढीत कारभार । ऐजीकडे की० ॥ ३ ॥ ऐजीची चाली फार । सारा ओढिताती कारभार । परी सहा जणांसी आधार । ऐजीचाच की० ॥ ४ ॥ बाप तुम्हीं धन्यासी राजी राखा । नाहीं तरी शेवटीं होईल वाखा । मग कोणी नाहीं सखा । सोडविता की जी मायबाप ॥ ५ ॥ कामाजी बाजी हुद्देदार । क्रोधाजी हा सरदार । यांचे वेगळाले विचार । ऐका की जी मायबाप ॥ ६ ॥ मदाजी बाजीचें वेगळें बंड । त्यासी मिळाला लोभ भावंड । अवघ्यानी मिळोनि थोतांड । रचिलें की जी मायबाप ॥ ७ ॥ गांव तो होता चांगला । परी या सहाजणांनींच नाश केला । तुम्हीहि त्यासीच मिळाला । हें बरें काय की जी मायबाप ॥ ८ ॥ परी ते राहतील एकीकडे । शेवटीं गांठ तुम्हांसीच पडे । मग इकडे ना तिकडे । हो ना की जी मायबाप ॥ ९ ॥ ऐजीने यांस कारभार दिला । यांनींच गांवाचा नाश केला । शेवटीं खाईल तुम्हांला । हें बरें की जी मायबाप ॥ १० ॥ गांवांतील तीन पांच थोर । पंचवीस त्यांचा विस्तार । घडी घडी त्यांचा समाचार । घेत जावा की जी मायबाप ॥ ११ ॥ रयतेचें फार हित करावें । धन्याचें कामासी रुजू असावें । धनीं सेवेसीं तत्पर व्हावें । लागतें की जी मायबाप ॥ १२ ॥ तुम्हांस धन्यानें दिला गांव । तुम्ही विसरला त्याचें नांव । तलब आलिया लपवाया ठाव । मग कैंचा की जी मायबाप ॥ १३ ॥ तुम्ही धन्यासी करिता चोरी । ऐजीकडे करितां येरझारी । परी या सहाजणांसी सारी दोरी । तुमचीच की जी मायबाप ॥ १४ ॥ परी जेव्हां होईल ठावें । तेव्हां कळो येईल स्वभावें । घडी घडी आपुलें हित करावें । लागतें की जी मायबाप ॥ १५ ॥ जेव्हां तलब होईल धन्याची । तेव्हां तुम्हां मुदत कैंची । म्हणोनी सहा जणांची । भीड धरूं नका की जी मायबाप ॥ १६ ॥ आतां ऐजीची आस्था सोडा । धन्याची बाकी हळूहळू झाडा । नाहींतरी

पायीं पडेल खोडा । प्रपंचाचा की जी मायबाप॥१७॥ आतां असो अवघी उपाधी । धन्याची भेट घ्यावी आधीं । ते मी सांगतों सुबुद्धी । ऐका की जी मायबाप ॥ १८ ॥ परि मी लहानसा दिसतो महार । मजवरी धन्याचा अखत्यार । बहुत धन्याचा प्यार । मज नफरावर की जी मायबाप ॥१९॥ सद्भाव शांतीसी घ्यावें । मज पाठीशी तुम्ही असावें । जेथें धणी तेथें घर ठावे । मज नफरास की जी मायबाप ॥ २० ॥ श्रवणाची धरावी वाट । कीर्तनाचा चढावा घाट । विष्णुस्मरणाचा संघाट । आहे की० ॥ २१ ॥ पुढें आहे विश्रांतीचें स्थान । सज्जनांचे पाद सेवन । दास्यत्व अर्चन वंदन । ध्यान मार्ग की० ॥ २२ ॥ तेथें जातां न लगे उशीर । समीप जनार्दन दातार । सख्य भक्तीचें मंदीर । आहे की० ॥२३॥ पुढें आहे धन्याचें घर । तेथें जाऊन करावा जोहार । मुखीं जपावा परात्पर । जवळींचा की० ॥ २४ ॥ जेव्हां भेटी होईल धन्याची । तंव नित्य दिवाळी सुखाची । मग सर्व सत्ता तुमची । होईल की० ॥ २५ ॥ जेथें आहेत धनी । तेथें जावें लोटांगणीं । मग स्वतांच होईल मिळणी । आत्मसुखाची की० ॥ २६ ॥ या मार्गें गेले थोर थोर । नारदादि शुकेश्वर । धन्याचे दरबारीं निरंतर । राहताती की० ॥ २७ ॥ जे जे या मार्गें गेले । ते धन्यासी रुजू झाले । जीवन्मुक्ति पावले । ऐका की० ॥ २८ ॥ जोहार मायबाप जोहार । गव्हाची रोटी तुपाची धार । धन्यांनीं पुरवावी अपार । मज नफरास की० ॥ २९ ॥ महार बोलतो म्हणोनि नका जाऊं गर्वे । नाहीं तरी शरीर राहील हिरवें । आपुलें स्वहित होईल बरवें । तें करावें कीं० ॥ ३० ॥ बाकी साठीं आपली मूळभुई सोडाल । परमुलखा जरी जाल । तरी बाकीचा निकाल । नाहीं की० ॥ ३१ ॥ धरा भावभक्तीची कुळवाडी । काढा शेतांतील पेंढी । नाहीं तरी पायीं पडेल बेडी । अविद्येची की० ॥ ३२ ॥ हे कायपूर नगरी । ब्रह्मयानें रचिली खरी । त्यां विवेकें जाणूनि बरी । आत्मरूपीं अर्पिली की० ॥ ३३ ॥ एका जनार्दनीं कुळवाडी मोठा । त्यानें बाकीस मारिला फांटा । अखंड कैलासींचा दारवंटा । मोकळा केला की० ॥ ३४ ॥ अखंड कैलासीं राहणें । गुरुजनाचें हेंच देणें । सुखसमाधी असणें । ऐका की जी मायबाप ॥ ३५ ॥

३८९० जोहार मायबाप जोहार । मी सूर्यवंशी रामजी पाटलाचा महार । त्याचे दरबारचा कारभार । मज नफराचें शिरीं की० ॥ १ ॥ काय सांगूं अयोध्यापट्टण । महास्थळ मनोहर जन । तेथें नांवतें कोण कोण । ते सकळ जन परिसा की जी मायबाप ॥ २ ॥ ते अयोध्येसी दिलपत राजा । त्याचे पोटीं दशरथ वोजा । त्याचे शकुनावरती फौजा । चालिल्यात की० ॥ ३ ॥ त्याचे पोटीं राम जगजेठी । कांबीट मोडली पणासाठीं । विन्मुख करुनी रायाच्या कोटी । तंव मुक्ताई पर्णिली की० ॥ ४ ॥ ती मुक्ताई आवा मोठी कनवाळा । तुकडा देती बाका शिळा । काय सांगते वेळोंवेळां । मज हरीख होतो की० ॥ ५ ॥ परी मी जातीचा महार । धन्याचे चाकरीस सादर । सालोबाद धन्याचे घरचा कारभार । मीच करीत आलों की० ॥ ६ ॥ मग जाऊनि विष्णुबा कुळकर्ण्याचे घरीं । हकीकत सांगितली सारी । मग देउनी शिळी पाकी न्याहारी । मज बैस म्हणितलें की० ॥ ७ ॥ गाढा विष्णुबा कुळकर्णी । साऱ्या कारभाऱ्यांचा तो धनी । चौऱ्यायंशी लाखांची वांटणी । तेणेंच केली की जी मायबाप ॥ ८ ॥ चौऱ्यायंशी लाख वानभरे । विष्णुबा कुळकर्ण्याचीं खिल्लारें । पोषीत पाळीत वोहरें । ऐसेंच की० ॥ ९ ॥ मग मृत्युलोकीं उभाविल्या पेठा । पूर्वीच्या निवृति दाविल्या वाटा । सोडोनियां जुनाट वाटा । या आडवाटा जाऊं नका की० ॥ १० ॥ मग मृत्युलोकीं केलें येणें । गोउनी पाडिलें मागिल्या रिणें । फिटल्यावांचून समाधान । होत नाहीं की० ॥ ११ ॥ अवघे पांच कोस शेत । पाडुनी केलें तन गवत । पडिकाचे पैसे बोभाट । होईल की जी मायबाप ॥ १२ ॥ सालोबाद मारितो हाका । वसुल करा दिवाणचा टका । तोंवर येणें जाणें धोका । न वारे की० ॥ १३ ॥ मग आरोळी देउनी घातली उडी । एका काढील लवडसवडीं । ऐका ते उत्तानीं उफडी । वाहवलें की० ॥ १४ ॥ एक पडिले खळाळ धारें । वरतें पाय खालतें शिरें । त्याचे हाल थोर थोर । देखिले की० ॥ १५ ॥ मग जाऊन जनार्दनबावाचे दरबारीं । बैसोनि एकनाथ पायरी । माप केलें खरोखरी । मागील भरोवरी चुकाविली की जी मायबाप ॥ १६ ॥

३८९१ जोहार मायबाप जोहार । सद्गुरु जनार्दनाचा एक महार । सांगतों ऐका कलियुगाचा विचार । सावधपणें की जी मायबाप ॥ १ ॥ चार युगामाजीं परम । कलियुग हें उत्तम । करावें हरीभजन

सत्कर्म । नामस्मरणें असावें की० ॥ २ ॥ नवविधा भक्ति करा । तेणें चुकेल चौर्‍यांयशीचा फेरा । माझे वचनीं विश्वास धरा । नाहीं तरी फसाल की० ॥ ३ ॥ द्वारीं असावें तुळशीवृंदावन । करावें अतिथींचें पूजन । संतांसी निघावें शरण । हें लक्षण भक्तीचें की० ॥ ४ ॥ तुळशीमाळा घालावी गळां । लावावा गोपिचंदन टिळा । मुखीं नामस्मरण माळा । असावी की० ॥ ५ ॥ व्रत करावें एकादशी । जागर करावा सारे निशी । द्वादशी क्षीरापति आवडेसी । आदरें सेवावी की० ॥ ६ ॥ ऐशीं वैष्णवभक्तीचीं लक्षणें । सांगितलीं सर्व खुणें । हें वर्म जो नेणे । अधर्म साधनें करिती की० ॥ ७ ॥ अठरा वर्ण याती । यांची सांगतों मती । सावधान ऐका निश्चितीं । रागाऊ नका की० ॥ ८ ॥ आम्ही ब्राह्मण म्हणती । स्नानसंध्या वेदपठण न करिती । अशौच कर्म जारणमारण जपती । मोहन स्तंभनादिक की० ॥९॥ जगीं म्हणती आम्ही साधिलें । साधन तें दूर राहिलें । परस्त्रीनें वित्त गोविलें । कुलुलुल की० ॥१०॥ झालों म्हणती संन्यासी । षड्वैरी हृदयीं अहर्निशीं । परद्रव्य परअन्नासी । रात्रंदिवस लक्षिती की० ॥ ११ ॥ सहांचा करावा नाश । तया म्हणिजे संन्यास । नारायणीं नाहीं आस । कासया नाश कायेचा की० ॥ १२ ॥ पोट भरावया फकीर झाला । अल्ला अल्ला म्हणतां जन्म गेला । नसोनि दोष अंगीं लाविला । हायदोस हायदोस म्हणती की० ॥ १३ ॥ झालों म्हणती आम्ही जोगी । राख लाविती वाउगी अंगीं । भोगी ना त्यागी ना योगी । वर्म नेणती जोगाचें कीं ॥१४॥ जोग साधावा उत्तम । न करावें संसारीक कर्म । साधावें उत्तमोत्तम । वाउगा श्रम करूं नये की० ॥ १५ ॥ आम्ही जंगम जालों म्हणती । शिव उपासना न करिती । पोटासाठीं भिक्षा मागती । शंख वाजविती भं भं भं भं की० ॥ १६ ॥ आलों म्हणती मानभाव । अंतरीं शुद्ध नाहीं भाव । वर मुंडिती मस्तक वाव । गुरुशिष्य भाव दाविती की० ॥ १७ ॥ गुरुशिष्य म्हणती । झोळीस झोळी लाविती । गडबडगुंडा झाला म्हणती । कृष्ण कृष्ण म्हणती की० ॥ १८ ॥ नसोनी काळेपणा लाविती अंगीं । उगेच सोंग मिरविती जगीं । देवाचा द्वेष करिती वाउगी । ही फजिती बरी की० ॥ १९ ॥ आम्ही संत जालों म्हणती । गळां माळा गोपीचंदन लाविती । दिवटी घेउनी हातीं । उदो उदो करिती की० ॥ २० ॥ पोट भरावया कीर्तन करिती । लोकां अर्थ सर्व दाविती । भोळे भोळे भोंदिती । आपण वर्म नेणती कीर्तनाचें की० ॥ २१ ॥ परद्रव्य परनारीसी । स्पर्श न करावा निश्चयेसी । ऐशी मर्यादा सांगती लोकांसी । आपण तेंचि कर्म करिती की० ॥ २२ ॥ एकविध भक्ति करावी म्हणती । ना ऐकावी आणिकांची स्तुती । काई व्यथा जालिया शरीराप्रती । मग देवऋषी पहाती की० ॥ २३ ॥ आणिती निंब नारळ ऊद सामान । मेंढरें कोंबडे मारिती जाण । वेताळ महिषासूर पूजन । नग्न होऊन करिती की० ॥ २४ ॥ म्हणती खंडेराव दैवत आमुचें । तें कोपलें वो साचें । कुळधर्म सांडिले वडिलांचे । म्हणोनि दुःख पावलों की० ॥ २५ ॥ मग गोपीचंदन टाकिती । आदरें भंडार लाविती । भरित रोडगे करिती । यळकोट यळकोट म्हणती की० ॥ २६ ॥ ऐकोनी कीर्तन श्रवण । गीता ज्ञानेश्वरी मनन । अश्विन मास आलिया जाण । शक्ती पूजन करिती की० ॥ २७ ॥ ऐशियासी एकनिष्ठ भाव । तयासी कायसें वैभव । उगेच सोंगाचें गौरव । वाढविती की० ॥ २८ ॥ एकविधा भक्ति करावी । वाट आणिकांची न पहावी । शुभाशुभ येती बरवी । ते प्रारब्धदशे प्रमाण की० ॥ २९ ॥ जैसें पतिव्रतेचें मन । सर्व पतीच प्रमाण । अपाय उपाय हे तों जाण । ईश्वर प्रमाण की० ॥ ३० ॥ एका शरण जनार्दन । मी बोलिलों सत्यवचन । अनुभउनी खूण । या पंथें जाऊं नका की जी मायबाप ॥ ३१ ॥

३८९२ जोहार मायबाप जोहार । माझें नांव आत्मनाक महार । माझा जालीम कारभार । धन्याचें रजेनें करतों की जी मायबाप ॥१॥ ममताई आवा पाटलीण मोठी । थोरा नायकाची बेटी । मनाची निर्मळ नोहे खोटी । लक्षलक्षापती येती तिचे भेटी की० ॥ २ ॥ मानभाव जती सती । तडी तापडी अपार मती । माझे धन्याचे घरा येती । धन्यावर जोर जती करूं पाहाती की० ॥ ३ ॥ दोघे कारभारी जोड यांची । मोकाशी म्हणविती सृष्टीची । तिहीं वस्ती केली वरच्या गांवींची । खबर घ्यावया खालील गांवठाण्याची । मज रवाना केलें की० ॥ ४ ॥ झकुनी पडली गळां । तुकडा दिला पाकाशिळा । याबद्दल तुमचे स्थळां । आलों की० ॥ ५ ॥ शिव शेटियासी जोहार । जिवाजी चौगुल्यासी जोहार । वैष्णव कुळकर्णी यासी जोहार । तुमचा कारभार जड दिसतो की० ॥ ६ ॥

सारी पांढर ओस पडली। थोर थोर कुळें दूर गेलीं। नवद्वारें कैसीं नागविलीं। संतति आपुलें पोटीं पुरती की० ॥ ७ ॥ हुजूर धन्यास राग जाईल फार। मोठे धाडतील वरातदार। इज्जत घेतील करतील कहार। मग वारंवार आठव होईल की० ॥ ८ ॥ नेऊन घालतील बंदीखानीं। तेथें सोडावया नाहीं कोणी। अविद्या मारील हालहाल करुनी। ही फजिती सरेना की० ॥ ९ ॥ यमाजी बाजी हुद्देदार। त्याचा तो जिवावरील मार। जों घडला नाहीं हा विचार। तो दरबार शुद्ध करा की० ॥ १० ॥ पंचवीस कुळें घरा बिगारी। गांवातील जमीन वजवा सारी। गजगिरी करा नवद्वारीं। धन्याची निशाणी लावा की० ॥११॥ महामूर करा पेठा चारी। चौमहाजनांसहीत श्रीपाद घ्या घरीं। धन्याचे नांवाचा कौल शिरीं। साच चढवा की० ॥ १२ ॥ अक्षय्य वास एक चित्त करा। फळावर फिटेल सारा दोरा। पहिल्या खतासी दूर करा। नाहीं तरी कानीं उबा पडेल की ॥ १३ ॥ ब्रह्माजी पाटील यासी सांगा जोहार। पाटलीण आवाचा बेजाजा जाला फार। अवघा गांवगुंडी कारभार। आवाजी करिती की० ॥१४॥ आवाजीची साच वेसन खोटी। राबती करा संदेह रोटी। सहज कारभाराची आटाआटी। मज नफरासी उजवे दिठी। पाहूं नका की० ॥१५॥ कामाधामाचा उलंघ करितों। आल्यागेल्यासी जबाब देतों। साऱ्या रयतेचीं घरें राखितों। हे कष्ट सान की जी मायबाप ॥ १६ ॥ कितिकांसी लांकडें द्यावीं। शिंग शिंगुटी म्यांच पुरवावी। फजिती राबणुकीची सोसावी। ही गोष्ट सान की० ॥ १७ ॥ मेखा पायबंद तोबरे माथां। जीव कष्टला बिगारी बहातां। चौऱ्यांयशी लक्ष गांवें हिंडतां। हें दुःख सान की० ॥ १८ ॥ कुळवाडी थोटपणाशीं आले। बलुते देईनासे झाले। पांढर टाकुनी पळाले। तरी मिराशीचे लिगाड की० ॥१९॥ न होईना मातीचा पेंडुळा। जनोबा खायाचा मायंदळा। रजा घेउनी पूर्वस्थळा। जाईन की० ॥ २० ॥ मिरास सर्वस्व कळली। पाटलीण आवा धनीण जाली। दिवाणदाराचीं तोंडें मारली। तेथें आमुचा पाड काय की० ॥ २१ ॥ मिरास सर्वस्व कळली सारी। हाक घेउनी जाईन गडावरी। रामजी बावाचे दरबारीं। हकीकत सारी सांगेन की० ॥ २२ ॥ कोणी म्हणती देऊं लांचा। मी नव्हे आजकालचा। झाला वृत्तांत साचा। तो वडिलासी सांगेन की० ॥ २३ ॥ खाली गांवीं पाटलीण आवा विवसी। ती आलिंगून दे साहेबासी। सारे म्हणती मोकासी। आम्हांस तिजपारशी कां धाडितां की० ॥ २४ ॥ पांचजण लहान लहान पोरें। ते अडकती पडती नवा द्वारें। साहेबाचें नाम सारें। स्वप्नीं न घेती की० ॥२५॥ दोघे तिघे ब्राह्मण मेळविली। तेणें परमुलखाची रांडोळी केली। धन्याचें नांवाची निशाणी उरूं दिली नाहीं की० ॥ २६ ॥ पाटीलबोवा स्वप्नीं गुंतले। कारभार टाकुनी लाजिरे जाले। जोगी मोकासी होउनि गेले। या ममताई आवाच्या भेणें की० ॥ २७ ॥ आणिक मेळविलें दैवतें। खबर सांगों आलों साहेबाते। घरोघर पूजिती भूतें। त्यांची नांवें ऐका की० ॥२८॥ वासना मांगीण मातंगिणी। कामना जळीं मायराणी। अभाव भांगड भूत जोगीनी। त्यासी नग्न पूजिती की० ॥२९॥ वीर झोटिंग नरसिंग वेडा। वेताळाचा पूजिती खोडा। शेंदूर माखोनियां धोंडा। शेळी बोकड जीव घेती कीं ॥ ३० ॥ मेल्या मनुष्यासी पूजिती। खोड सुपल्या पाळणे बांधिती। गळ टोंचोनि बगाडें घेती। ही फजिती सान की० ॥३१॥ जीवदान देऊं करिती। अवघीं दैवतें एकची म्हणती। मेंढरें बोकड मारिती। परतोनि आपणची खाती की० ॥३२॥ नैवेद्या नारळ नेउनी फोडिती। खोबरें एकमेकासी वांटिती। नुसती नरोटी देवापुढें ठेविती। लटिके धूप दाउनी चाळविती की० ॥ ३३ ॥ जाऊनी देवऋषी आणिती घरा। त्यातुन लाविती चुलींतील अंगारा। उफराटे पराचा कोंबडा खैरा। निंब नारळ उतारा की० ॥ ३४ ॥ आणिक खापराचे भदाडें। तें चुन्याचें पांढरें लाउनी चहूंकडे। दिवस मावळल्याचें पुढें। तिकटण्यावर ठेविती की० ॥ ३५ ॥ दावल मलकाची पूजिती गदा। वर्षातून फकीर होती एकदां। मग डोला होतां थंडा। खाती मलिदा हिंदु तुर्कांचे खरकटें कीं० ॥ ३६ ॥ भेणें भेणें साहेबाला स्मरती। त्याला पाटलीण आवाची द्वाही देती। ऐशी मुलखाची गती। तीं धन्याप्रती सांगों आलों कीं ॥३७॥ साहेबाचे हुकूमावर गेलों। प्रवेश पाहुन दंग जालों। वागवेना मग आलों। पायपुसा जवळ की० ॥ ३८ ॥ मग धन्यानें मज आत्मनाकाला। भाग भागला म्हणोनि हुंकार केला। येथें राहे म्हणती की० ॥ ३९ ॥ ऐशी निर्धारी केली। बांडी सान घोंगडी दिली। दिठी देउनी सांगितली। नजरेवेगळा

राहूं नको कीं० ॥ ४० ॥ जाउनी जनार्दनबावाचे दरबारीं । राहिलों एकनाथ परचारी । जुगानुजुगाची चाकरी । कोण्ही दूर करी ना की जी मायबाप ॥४१॥

३८९३ जोहार पाटील बाजी । चावडीवर चला ना कां जी । ऐसें सांगू आला आजी । बाकी बहुत सेकली की जी मायबाप ॥ १ ॥ कोपटामध्यें लपतां काई । हाडाचा खोडा पडेल पायीं । दांत विचकून इज्जत जाई । संसाराचांचून काई की जी मायबाप ॥ २ ॥ पाप दुराई बांधिती पदरीं । तुमचा प्राण वांचेल जरी । तोंड दाखवाना दरबारीं । सभेमाजीं संतांच्या की जी मायबाप ॥ ३ ॥ वरचे वर खातां पीक । धनी लावील तुम्हां सीक । मग मागवील भीक । तेव्हां साचें लटकें कळेल की जी मायबाप ॥ ४ ॥ शेत अवघें पांच कोस । तेंहि तुम्हीं पाडिलें ओस । ही पुंडाई किती दिवस । तुमचें तुम्हांस बरें वाटे की जी मायबाप ॥ ५ ॥ यंदां आली देवाची पाळी । कां जी तोंडें करितां काळीं । चावडीं चला एक वेळीं । शिव्यागाळी देऊं नका की जी मायबाप ॥ ६ ॥ आज कुळकर्णी स्वाधीन करा । आड खर्चाचा ताळा धरा । गायाळ मायाळ माप करा । तेणें निवांत व्हातु की जी मायबाप ॥ ७ ॥ आजी शेकदारी वरी करा । केल्या कमाईस नेऊं नका घरा । येईल हुजूर दरसाल करा । अव्वल साधण्या की जी मायबाप ॥ ८ ॥ उगीच कां कोंडितां गुरें । गांवींचें कां बुजवितां द्वारें । झाडा फाडा बरें जोरें । उणें पुरें चुके ना की जी मायबाप ॥ ९ ॥ बाप शुद्धी बाळी आली । फिकीर पाहिजे लौकर केली । कितीक मारीत झोडीत नेली । माझी बोली साच माना की जी मायबाप ॥ १० ॥ यम गचांडी धरी । तेव्हां तुमची फिर्याद कोण करी । डोळे फिरती वरच्या वरी । व्हा लवकरी सावध की जी मायबाप ॥ ११ ॥ बाकी शेकली फार । घरोघरीं आडावितां दार । घडिघडींतून बोला उत्तर । धन्याचे की जी मायबाप ॥१२॥ हें माझें ऐकाना कांहीं । धुन्याची तुम्हां देतां दुराई । वरते पाय खालतीं डोई होईल की जी मायबाप ॥ १३ ॥ लिहितच होती रोखे । गुरुवचनीं करविले शिके । गांड गुडघे खाल धक्के प्रपंच धाके की जी मायबाप ॥१४॥ यम जमाखर्च किती । ऐसें विचारा जी चित्तीं । कबुलायत करूनि नुस्ती । तीहि रीति बरी नव्हे की जी मायबाप ॥ १५ ॥ घातों जाया आली फार । कोण कोणाचा सोसला मार । टाकून द्यावा अहंकार भार । चला हुजूर एकाएकीं की जी मायबाप ॥ १६ ॥ लांच घेतां कानकोंडें । तेव्हां बोलाल कोण्या तोंडें । चहूंकडून पडतील धोंडे । श्वास कोंडे बोलतां की जी मायबाप ॥ १७ ॥ बाब शिल्लक वाढली फार । चौऱ्यायशीं लक्ष वरातदार । यमाजी बाजी हुजूरचा महालदार । त्याचा मार पुरे पुरे की जी मायबाप ॥ १८ ॥ हा टाकून द्यावा गांव । पैसे वांटून पालटा नांव । घर सोडून देवळाचा ठाव । हातीं काठी असो द्यावी की जी मायबाप ॥ १९ ॥ धरणें येईल एकाएकीं । तेव्हां अवघे परके लोकीं । माझें तेचि निजे मुखीं । पाटीलकी सोडून भोगाना की जी मायबाप ॥ २० ॥ ब्रह्मानंद करितों जोहार । जनार्दन बावाचा विचार । लाभ तुरुत काय बोलूं की जी मायबाप ॥ २१ ॥

३८९४ जोहार मायबाप जोहार । तूं कोण्या गांवींचा महार । पुसाल जरी साचार । तरी सादर परिसा की जी मायबाप ॥ १ ॥ निराकार माझा मूळचा ठिकाणा । भक्तांसाठीं सोडिला जाणा । वस्ती करूं कायापुरीच्या खुणा । सांगेन की जी मायबाप ॥ २ ॥ जोहार मायबाप जोहार । मी पार्वतीच्या गळ्याचा हार । ईश्वराचा कारभार । मज नफराचे शिरीं की जी मायबाप ॥ ३ ॥ अखंड दारीं पडला असतों । प्रेमाचा तुकडा मागून खातों । सारी रात्र गोंवरापाशीं जागतों । धन्याला दुवा देतों की जी मायबाप ॥ ४ ॥ तुम्हीं मुळींचा ठाव सोडूं नका । धन्याला तुम्ही विसरूं नका । विसरल्यास पावाल धक्का । अंतकाळीं की जी मायबाप ॥ ५ ॥ वस्तीकरू आम्ही साचे । समस्त कुळवाडी नगरीचे । पैके टाका धन्याचे । बाकी शेकूं नका की जी मायबाप ॥ ६ ॥ शेवटीं पट्टी झाली । आसामीवार द्वाही दिधली । मज नफरास आज्ञा केली । धांडोरा पिटीन की० ॥ ७ ॥ पैल तो मनासी फितवेखोर । येणें थोर लाविला घोर । और बुधाजीबावा आपुला पोर । नाहीं तरी धनी कोपतील की जी० ॥ ८ ॥ कामाजी बाजीनें काय बरवें केलें । आपआपणासी नाडिलें । नाहीं यासी विचारिलें । मागें पुढें की जी मायबाप ॥ ९ ॥ मदाजी बाजीचें तरी वेगळेंच थोंब । सारा देतां उगीच बोंब । धन्यासी कधीं सोम । जन्म नाहीं की जी मायबाप ॥ १० ॥ अंताजी महाजन तो आपुले ठायीं । नगर नागविलें याचे पायीं । पहातां

कथडी याचे पदरीं । नाहीं की जी मायबाप ॥ ११ ॥ पहा दंभाजी चौधरी। याची वेगळीच भरोवरी। आतां किती याचे घरीं । वेरझारी शिणावे की जी मायबाप ॥ १२ ॥ विकल्प शेट्या तरी सदाच घाण । अखंड पाहती आपुला मान । तोंडावरी बैसेल जेव्हां वहाण । मग डोळे पुसतील की जी मायबाप॥ १३ ॥ जिवाजी बाबा म्हणे । आम्ही त्यांत राहाणें । आतां कोण-कोणाची दुखवूं मनें । शेवटीं त्यांशींच पुसणें होईल की जी मायबाप ॥ १४ ॥ जिवाजीबावा म्हणे कशांत काय । तरी सर्वहि कारभार त्याचाचि हाय । त्यांवां-चून हालेल पान काय । तेंहि विचारा की जी मायबाप ॥ १५ ॥ तरी हे रज तम सात्त्विक वाजी । हा सकळ उभारा याचाच की जी । तरी हे दिलें राखावी राजी । सत्त्वाजी बाजी की जी मायबाप ॥१६॥ निवृत्तीपासून प्रवृत्ति जहाली । ही अनुभवाची खूण बाणली । साधुसंतांस की० ॥ १७ ॥ पैल ते वासना आवाजीनें फितूर केला । घरचा भेद बाहेर दिला । हा विचार माझ्या धन्यास कळला । धनी कोपेल की० ॥ १८ ॥ आशाई आवाजीचा मोठा चाळा । ज्यासी त्यासी घालिती डोळा । मागतसे नित्य नवा गोळा । परी सर्व जड जाईल की जी मायबाप ॥ १९ ॥ निंदाई आवाचें तोंड मोठें । मागें मागें मोडती बोटें । म्यां सांगितलें हट्ट टाकून बोलतीस नेटें । तूं कोण गे बुरसे की० ॥२० ॥ चिताईची तरी खालतीच मान । जेव्हां तेव्हां घालिती धोन । म्यां सांगितलें तुज पुसतें कोण । बोंगळ येथें कां बैसलीस की० ॥ २१ ॥ आतां हें घर माझ्यानें हिंडवेना । या बायकोचें कर्तव्य कळेना । जो यासी आवरी तो शहाणा । असे की० ॥२२ ॥ तुम्ही खाले रानीं सांगतां गोष्टी । येईल धन्याची चिठ्ठी । पैसे टके उठाउठी । बाकी ठेवूं नका की० ॥ २३ ॥ तुम्ही मागें मागें फार बोलतां । हें कळेल माझ्या धन्यास वार्ता। तरी दरबारासी जातां । मग मोठे कठीण की० ॥२४॥ तरी हा दहा पाटलांचा गांव । पंचवीस प्रजांची हाव । पन्ना-सांचें नांव । म्यां किती घ्यावें की० ॥ २५ ॥ जंववरी चालती भर वस्ती आहे। तंववरी कराल तितुकें होय । यांत डावाडोल झालिया कराल काय । सांगा की० ॥ २६ ॥ मग चालतां पायाचे वेंगडे वळती । जळत्या खांबासी बांधिती । तेथें मग आपुला सारथी । कोणी नाहीं की० ॥ २७॥ तरी पांच मिळून विचार करा । प्यादा जपादा हातीं धरा । नाहीं तरी पडेल फेरा । लक्ष चौऱ्यांयशीचा की० ॥ २८ ॥ आतां आम्हीं सांगतो तें ऐका । तुम्हीं डोळे झांकू नका । तुम्हांला जोडेल निजसखा। वैकुंठनाथ कीं० ॥ २९ ॥ मी नफर आहे गाढा । तोडीन यमाच्या दाढा । उघडीन वैकुंठीच्या पेठा । नाम कडाडा गर्जेन की० ॥ ३० ॥ मी नफर नोहे खोटा । विघ्न लावीन बारा वाटा । नित्य मुक्तीच्या चोहोटा । राहतो की० ॥ ३१ ॥ आजि होय होय होय । आधीं होतें एक । एकापासून जाहलें अनेक । शेवटीं कांहीं नाहीं देख । शून्याशून्य मिळालें की० ॥ ३२ ॥ एका जनार्दनीं जोहार । येणें केला सारासार विचार । मोडिला अविद्येचा थार । परब्रह्मीं वास करणें की जी मायबाप ॥ ३३ ॥

३८९५ जोहार मायबाप धनी । मनाजीबावा कुळ-कर्णी । गांवचे पाटील जीवाजी नेमुनी । माझे धन्यांनीं ठेविले की जी मायबाप ॥ १ ॥ जोहार मायबाप जोहार । जोहार मायबाप जोहार ॥ धृ. ॥ गांवचे देसाई ठाणेदार । सबनीस आणि शेखदार । करती रयतेचा कारभार । परी धन्याचा विचार । न करती की० ॥ २ ॥ खरीप रब्बी पिकाचे दाणे । सारा सारून भरा केणें । रुजू घेतील यमाजी संपूर्ण। बाकी निघतां नेती बांधून की० ॥ ३॥ नेउनी घाल-तील खोडाबेडी । बाकीची न चुकेची दमडी । मग काय तुमची गोडी । एका जनार्दनीं करा जोडी की जी मायबाप ॥ ४ ॥

३८९६ जोहार मायबाप जोहार । महार मी काया-पुरीचा । जन्मोजन्मीं वेसराख्या आहे या गांवींचा ॥ धृ. ॥ कायापूर कसबे लांबी साडेतीन गांव । तीनशें साठ पेठा तेथें नांदतो उमराव । चौदा चौक दहा रस्ते बसविले अपूर्व । दिधली धन्यानें सनद जीवाजी पंताचें नांवें ॥ १ ॥ शिवाजीपंतानें जिवाजी ठेविला दिवाण । साही षडविकार मिळालें त्यास-मान । तुम्ही सर्व ऐका तुम्हांसी सांगतो खूण । आप आपणामधीं मिळुनी खाती भोंदुन ॥ २ ॥ कामाजी कोतवाल यानें नागविलें बहुतासीं । हरिहराची अब्रू घेतो भय नाहीं त्यासी । जमदग्नि दुर्वास नाडिले महा महा ऋषी । क्रोधाजी फौजदार तोहि मिळाला त्यासी ॥ ३ ॥ लोभाजी चौधरी याला पैशांची हांव । अहंकार पाटील त्यासी कांपे सर्व गांव । दंभाजी नाईक सर्व करिती हावहाव । दया नाहीं रयतेवर

केला उजाडचि गांव ॥ ४ ॥ जिवाजीपंताचा हिशेब घ्या अवघा झाडा । नाहींतर त्याचे पायीं घाला अनुहात खोडा । तरीच मायबाप हा गांव नांदेल बरा । एका जनार्दनीं पाय सद्गुरुचे धरा ॥ ५ ॥

३८९७ जोहार मायबाप जोहार । माझी नकटी बायको गऱ्हवार । खावया मागती आंब्याच्या खार । आणुनी द्यावा की जी मायबाप ॥१॥ माझी बायको मोठी । तिची संगत पडली खोटी । तिनें घरोनी माझी हनुवटी । म्हणे ऐका की जी मायबाप ॥२॥ माझें एक मूल लहान । त्याचें तुम्ही करा पाळण । हे सांगतों वर्तमान । सावधान ऐका की जी मायबाप ॥३॥ माझी बायको राधाई । तिचे पंचमूर्ति जांवाई । म्हणोनी सर्वांसी सांगतों पाही । ऐका की जी मायबाप ॥४॥ एका जनार्दनाचा महार । सांगतो वर्तमान फार । माझा खोटा नव्हे समाचार । परब्रह्मीं वास कराल की जी मायबाप ॥ ५ ॥

३८९८ जोहार मायबाप जोहार । मी कसबे कायापुरीचा महार । या गांवचा कारभार । उठावणीस आणिला की जी मायबाप ॥ १ ॥ कसबे कायापूर शहर । शंभर खेडें दहा बाजार । परी या अहंकार पाटलाचा कारभार । कांहीं धड नाहीं की० ॥ २ ॥ मनाजीपंत कुलकर्णी गिरस्त । कामक्रोध देसाई जबरदस्त । धन्याशी पोचत नाहीं रस्त । मधींच वस्त लुटिती की० ॥ ३ ॥ बुधाई आवा पाटलीण जरा । देती टाकडा टुकडा चाराचुरा । परी या म्हातारीच्या कारभारा । कोण मानितो की० ॥ ४ ॥ एक धनी नाहीं मेले । जागो जागीं तकूब जाहले । भ्रमाजी बावा घाईस आले । कुडवाड रस्ते कीं० ॥ ५ ॥ हरिपंतानें कौल द्यावा । शिवाजी बाजीनें लूटून न्यावा । यमाजी कोतवाल यांनीं दंड घ्यावा की० ॥ ६ ॥ म्हणोनी मच्छरराव कूमेराव आले । वऱ्हावाजी दडाले । धरत्री बुडती की० ॥ ७ ॥ नरसोबा तापाड हिरण्यकश्यपा दिधली थोबाड । वामनोजी बुवा लहान वाड । परी थोरासी न गणिती की० ॥८॥ परसोजी बुवा रागांत शिरले । एकवीस वेळां क्षेत्र मारिले । अखेर अमोद विप्र बसविलें । रामाजी घुसले जग फिरूं की० ॥९॥ कृष्णाजीपंत कारकून भले । ते बायकामुलांनींच भुलविले । ख्याल तमाशे फार केले । अखेर आमदाणींतच गेले की० ॥ १० ॥ बोधाजीबुवा जंगली राजा । कलंकोजी बुवाचा मोठा आवाजा । त्यानें घोडा केला ताजा । फिराद दुरदुर केली की० ॥ ११ ॥ मनाजीपंत ठाणेदार जाड । मुलुख अवघा केला उजाड । दाही पेठ्याचा बाजार जड । उचापतीखालीं बेजार केला की० ॥ १२ ॥ चरणपेठ्याची हाल पैल मोडली । सुरा बाजीची चऊ उडाली । कर्णपुरी बधीर झाली । मार मारुनी की० ॥१३॥ निशक्त झाले चरणपूर । दाढापूर झाले चूर । नैनपेटा डोळसपूर । खालीं वदनूर की० ॥ १४ ॥ शेसफुल खालावले राट । मांड्यापुरास घांसन दाट । लींगपेटा भनभनाट । बोचरा केला की० ॥ १५ ॥ टेरपिवाडी टांचापूर । एके ठायीं न होती दूर । आतां गांडापुरानें टारटूर । करोनी काय होतें की० ॥ १६ ॥ दाढापूर बत्तीस पेट । कटकटीमुळें उपटलें बेट । गांवनाशापुर हनुवट । खलबता पळावया करीत की० ॥ १७ ॥ कंबर बाजीस दाटी भारी । हलकल्लोळ बकापुरीं । तळांत गांव टेक न धरी । कामीटगांव कमजोर झालें की० ॥ १८ ॥ सर्वांगानें केली पळनी। आपान पेठ्यास पडली वोढनी । धुरळे उडती की० ॥ १९ ॥ फरदापुरक निट पेट । टेके वाट झाली सपाट । गुडघापूर कोपरगांव नीट । कुठवर सोसेल की० ॥ २० ॥ वाटवाडी हालवली देठ । नागीन पेठ्याचे उकललें बेट । कंठ सरोवर राट । कांपे थरथरा की० ॥ २१ ॥ जीवन झरीस पडली आढ । वांचेगांवचे उकललें बेट । चांदपूर तीन वाट । पळावया खलबत करीत की० ॥ २२ ॥ येथें वसूल बाकीत राहिलें काय । हिशोबाचा नाहीं ठाय । जिवाजीपंतानें पसरले पाय । मज नफरासी बोल नाहीं की० ॥२३॥ एका जनार्दनीं जोहार । मी धन्याचा राबता महार । झाडीन साहेबाचा दरबार । निघालों खावून की जी मायबाप ॥ २४ ॥

## वेसकर.

३८९९ जोहार मायबाप जोहार । सर्व शरिराचा कारभार । मी आहे नफर साचार । मी वेसकर आलों ॥ १ ॥ मी निजानंदीचा रहिवाशी । धांवत आलों संतांपाशीं । सांगतों तें मानसीं । दृढ धरा ॥ २ ॥ माझा धनी मोठा थोर । त्यांचा मी आवडता फार । तेथील सारा कारभार । मीच करितों ॥ ३ ॥ माया ही धन्याची राणी । इची संगत नका धरूं कोणी । थोर थोरां पाडिलें व्यसनीं ॥४॥ विश्वामित्र पाराशर । नारदादि ऋषीश्वर । ब्रह्मा विष्णु शिव

साचार ॥ ५ ॥ इंद्र चंद्र महामती । पाडिले विषयावर्ती । एका जनार्दनीं धरा भक्ती । मी वेसकर आलों ॥

## महारीण.

३९०० महारीण हिंडे गांवांत । पाटीलबावा आहेत झोंपेंत । महारीण बहुती फिरत । पाटील झोंपेंत झाले मस्त ॥ १ ॥ मायबाप जोहार । मी सांगतें तें ऐका साचार । तुमची नगरी करा हुषार । आतां येतील यमाजी हुद्देदार ॥ २ ॥ झोंप सांडा आतां उठा उठी । पुढें आली यमाजीची चिठ्ठी । जाब देतां व्हाल हिंपुटी । मारील गांडीवरी जेव्हां काठी ॥ ३ ॥ मायबापाचें न चाले कांहीं । भाऊ बहिणी राहाती ठायींच्या ठायीं । सेजेची बायको पुसेना कांहीं । इष्ट मित्र कोणाचे भाई ॥ ४ ॥ जोंवरी तुमचें हातीं आहे। तोंवरी कराल तें होय । आयुष्य सरल्या कराल काय । भोयीं न टेकती पाय ॥ ५ ॥ म्हणोनी येतें काकुलती । धरा धरा सत्संगती । तेणें होईल तुम्हां विश्रांती । एका जनार्दनीं करील विनंती ॥ ६ ॥

३९०१ महारिणीच्या बोला । लक्ष द्या सांडोनी गलबला । जागे व्हा सांडोनी झोंपला । जवळचि उषा काळ आला ॥१॥ जोहार करतें धनी । पायां पडति महारिणी । विसरूं नका धन्याचे स्मरणीं । अंतीं यमाची जाचणी ॥२॥ मी महारीण नोहें लहान । ब्रह्मा विष्णु शिव आदिकरून । माझें त्यांच केलें सगुण। आधीं होतें तें निर्गुण ॥ ३ ॥ माझें मीच जागें करून। केलें सगुणाचें निर्गुण । शरण एका जनार्दन । महारीण सांगे जीवींची खूण ॥ ४ ॥

३९०२ पायां पडत्यें माहारीण आली ॥ धृ. ॥ महारिणीचे बोल ऐका । गांव वसाड पाडूं नका । हकनाक बसेल धक्का । इतुकें तुम्ही मनीं तर्का ॥१॥ ब्रह्मा विष्णु दोन्ही बाळ । महा काळाचे हे काळ । मज देखतां गोपाळ । ते मज महारिणीपासोनी ॥२॥ एका जनार्दनीं महारीण झालें । सद्‌गुरुला शरण गेलें । यानें आपुलें स्वहित केलें । जन्ममरण विसरलें ॥ ३ ॥

३९०३ महारीण करितें जोहार । पाटील बाजी तुम्ही हुशार । आले यमाजी हुद्देदार । त्यांचा जीवावरील मार । बरी गत नाहीं ॥ १ ॥ पायां पडतें महारीण आलें ॥ धृ. ॥ तुमची बाकी तुम्ही सारा। वाउगा कां घालितां चारा । तुमची रांडापोरें आवरुनी धरा । नका जाऊं दुसरे द्वारा । घडगत नाहीं ॥ २ ॥ गांवांची पाटलीण ओढाळ भारी । दिवसा नागवी रस्ते चारी । गांवांतील रयत पळाली सारी । वाउगी हाय धरितां भारी । पुढें बरें नाहीं ॥ ३ ॥ दिवा लावावया नाहीं कोणी । सारें खाऊनि जाहली रीती गोणी । शेवटीं टिपक्याचे तुम्ही धनी । माल खाऊनि केली धुळधाणी । विचार बरा नाहीं ॥४॥ तुम्ही बैसतां पलंगावरी । तुमच्या सेवेसी सहा चार नारी । त्याचें सुख तुम्हां वाटतें भारी । येईल यमाजीची स्वारी । पळाया वाट नाहीं ॥ ५ ॥ पुढें न दिसे तुमचें वरें । आले यमाजी बाजी हुजरे । धरती जिवाजी तुम्हास निर्धारें । तेथें कोण सोडवी पोरें । मोठें दुःख पाहीं ॥ ६ ॥ महारीण बोलते बोला । तुम्ही सांडा गर्वाचा चाळा । एका जनार्दनीं भेटला । एकपणें एक देखिला । आतां दुःख नाहीं ॥ ७ ॥

३९०४ जोहार मायबाप जोहार । मी निराकारीची महारीण साचार । सांगतें तुमचे नगरीचा विचार । ऐका कीं जी मायबाप ॥ १ ॥ माझ्या धन्यासी रुजु होउनी । जिवाजी जाहले गांवचे धनी । गांवची बुडविली लावणी । आतां केविलवाणी दिसती की० ॥२॥ गांवांत राहती बारा पंधरा । जिवाजी घेती त्यांचा सारा । परी धन्याचे कौल विचारा न करिती की० ॥ ३ ॥ शिवाजीसी सदा समाधी । जिवाजी नेमिले कारभारी मधीं । आधीं धन्याचे बाकीची संधी जवळ आली की० ॥ ४ ॥ मग तोंडा माखोनि काळें । जिवाजी रानोरान पळे । मागें धांवती यमाजी बळें। परी तलब न सुटे की० ॥५॥ तलब यमाजीची मोठी । जीवाजीस न मिळे लंगोटी । धन्याची बाकी शेवटीं थकली की० ॥ ६ ॥ बाकी थकली जिवाजीकडे । पायीं घालती जन्मांचें खोडें । मग जिवाजी धडधड रडे । परी बाकी न सुटे की० ॥ ७ ॥ एका जनार्दनीं विचार । करूनि महारणीचा जोहार । तेणें पावाल पैलपार । नाहीं तरी फेरा चौऱ्यांयशींचा की जी मायबाप ॥ ८ ॥

३९०५ पायां पडतें महारीण आली ॥ धृ. ॥ महारीण गेली वरच्या आळी । महारणीनें दिधली हारळी । जवळ आली काळाची फेरी ॥ १ ॥ माझें महारणीचें ऐका । जागे असा निजूं नका । काळ करीतसे लेखा गा ॥ २ ॥ एका जनार्दनीं महारीण । करा चंद्रभागे स्नान । घ्यावें पुंडलीक दर्शन । पहावें विठ्ठलचरण ॥३॥

३९०६ जोहार मायबाप जोहार धनी । मी निराकाराची महारिणी । माझ्या धन्याशीं निद्रा लागली म्हणोनी । संतसभेसी आलें की जी मायबाप ॥१॥ माझे धनी एकुलते एक होते । तंव त्यासीं करमत नव्हतें । मग मी येऊनियां तेथें । उभी ठाकले की० ॥ २ ॥ मग म्यां येऊनियां काय केलें । धन्यास थापटून निजविलें । एवढें जगडंबर उभें केलें । परी सत्ता त्याचीच की० ॥ ३ ॥ ते मज मागें टाकुनी । धन्याकडे जाय मोहे।रुनी । परी मी टांगेसी धरुनी । ओढोनि आणिले की० ॥४॥ ओढोनि आणिले कोण कोण सबळ । त्यांचीं नांवें तुम्ही ऐका सकळ । विश्वामित्रासारखे ढिसाळ । ओढोनि आणिले की० ॥५॥ सर्वांमाजीं ब्रह्मा प्रौढ । तेणें मांडिली मज सवें होड । त्यावर घालोनि कन्येचें लिगाड । तो पस्तावी पाडिला की० ॥ ६ ॥ ऋषीमाजीं पराशर । तो शास्त्रीं पुराणीं मज निर्भत्सी फार । परी दिवसाच करूनि अंधःकार । ढीवरेसी रतविला की० ॥ ७ ॥ देवऋषींमाजीं नारदु । तो मशीं कधींच नव्हता मरदु । त्याचा द्वारकेमध्यें उतरविला मदु । साठ पोरें व्याला की० ॥ ८ ॥ वायुसुत हनुमान । तो मजशीं जरी बहुत गुमान । परी मकरध्वजाचे वेळीं दांत विचकून । उभा ठाकला की० ॥ ९ ॥ म्यां छळिलें व्यासाचें शुकदेव पोर । त्यानें माझी निर्भत्सना केली फार । त्यानें काडोनि पायाची पैजार । मज तोंडावर मारिलें की जी मायबाप ॥१०॥ ऐशा ऐशियाच्या केल्या गती । येव्हवीं वायां गेलें नेणों किती । ते नागवे उघडे मज करूनि जिंकूं पाहती । त्यांचे तोंडा माती पडो की जी मायबाप ॥ ११ ॥ एका जनार्दनीं विनवी सर्वांपरी । जो करी पंढरीची वारी । तेथें बळ न चले निर्धारी । मग येरा झोडपीती की जी मायबाप ॥ १२ ॥

३९०७ स्वामींनीं मजवर पूर्ण कृपा केली । पंच हजार दौलत दिधली । म्हणोनि कायापुरीं वस्तीं केली । प्रिया राणी भेटली की जी मायबाप ॥ १ ॥ प्रिया महाराणी मीच महारीण । सकळ जमेदार माझे आधीन । माझेंपुढें न चले कवणाचें वचन । धर्मनगरीचे लोक गांजिलें की जी मायबाप ॥ २ ॥ माझेमुळें मसुदी मातले । गाइकवाडे लावालाव करूं लागले । शेटे महाजन उन्मत्त जाहले । मेहेत्रानें जन गांजिले । आत्म्यात की जी मायबाप ॥ ३ ॥ केसापुरचे लोक सांडिली उरी । बागाईत जिराईत नाहीं काळीवरी । उरली पांढरी सांगावी की जी मायबाप ॥ ४॥ नयिनाबाजीची दृष्टी गेली । येतां जातां भ्रमिष्ट झाली । भय हकिमाचे की जी मायबाप ॥ ५ ॥ नाके गांव धाकेंच पळालें । तोंडापूर लबलबा करूं लागलें । बत्तीस शिरांचे लोक पळाले । वसाड बाजार झाला की जी मायबाप ॥ ६ ॥ मग बहु बळ हातगांवीचें । पाठ पोट उदर गतीचें । मग तेणें खाणें दिजे दिवाळ हाकिमाचें । निघूं पाहे की जी माबयाप ॥७॥ शिश्णापूरचे लोक फळफळां मुतूं लागले । मुर्खुदाबादेचें सुख सांडलें । अखंड खिडकी मोकळी पडली । उठूं उठूं पळूं लागले धीर धरवेना की जी मायबाप ॥८॥ मांडवगड चढावयाची शक्ति राहिली । ढोंगळापुरचीं मेटें बसलीं । चरणगांवींची चाल राहिली की जी मायबाप ॥ ९ ॥ आतां दया करी गुरुराया । एका जनार्दनीं लागे पायां । पतना जातील लया । तुझे कृपेकरून की जी मायबाप ॥ १० ॥

३९०८ महाराज ऐका माझी मुखजबानीं । तुम्ही काळ्यांत पडला येउनी । बरें होता तये वनीं । हिशेब देणें लागेल की जी माय सखया ॥१॥ जिवाजी शेट्याचा पळपलाट । बुधाजी कारकून मोठा भाट । शरीराबाजीचा आटाआट । ऐसा आहे की जी माय सखया ॥२॥ तरी कायापुर अंकितात । परगणें मजकुरास आडवितात । हिशेब देणें लागेल की जी माय सखया ॥३॥ तुम्ही म्हणाल ही महारीण । या प्रसंगीं कुळ अखत्यारीण । जिवाजी पाटलाची प्राण मैत्रीण । लोभ मजवर फार आहे की जी माय सखया ॥ ४ ॥ आतां मी सांगतें तें करा । केली कमाई नेऊं नका घरा । एकांतीं नेऊन पाय धरा । विठुरायाचे की जी माय सखया ॥ ५ ॥ विठूरायाचा दूत । त्याचे फार अंकितात । आहे की जी माय सखया ॥६॥ तरी आतां व्हावें सावधान । विठ्ठलासी जावें शरण । गुरुकृपेचें ध्यान धरून । जिवलग पाहेन की जी माय सखया ॥ ७ ॥ राघवासी शरण जातां । यमाजीपंताचें न चले तत्वतां । एका जनार्दनीं विनविता । मुखजबानी की जी माय सखया ॥८॥

३९०९ जोहार मायबाप जोहार करितें । सकळ सभा स्तुति मायबापासी सांगतें । आपल्या घरचें गाऱ्हाणें देतें । ऐका की जी मायबाप ॥ १ ॥ तुम्हीं म्हणाल कोण कोठील काई । मी तो आहें अनादिसिद्ध दाई । माझें नांव तो असे सकाई । हा तो जांवई माझ्या

बापाचा । की जी मायबाप ॥२॥ हा तर फिरत फिरत आला । एकही नवरी नये याच्या मनाला । माझें स्वरूप पाहून बोलतां झाला । मम जनकासी की जी मायबाप ॥ ३ ॥ माझें स्वरूप देखिलें पहा नयनीं । मी तो केवळ लक्ष्मीची जेष्ठ भगिनी । दुसरी उपमा शूर्पनखेच्या वानी । शेखी आली लंकेहूनी । पतीभक्षणार्थ की जी मायबाप ॥४॥ माझें स्वरूप देखिलें जेव्हां का । यानें माझें बापास मोजिला पैका । एक ढबु पैसा वरी एक अडका । वीस कवड्या कीं जी मायबाप ॥५॥ आषाढमासी धरिलें लग्न । थीत अमावस्या पौर्णिमा पूर्ण । भद्रा व्यतिपात जाणून । कुयोगीं लग्न धरिलें की जी मायबाप ॥ ६ ॥ यानें लग्नांत करणी केली मोठी । माझे बापाशीं काळी ना जुनी लंगोटी । माझे आईस नाडीयाची आटी । मग कैंची की जी मायबाप ॥ ७ ॥ बहू रेलचेल याच्या बोलाची । डेंगुमेंगु दक्षणा कैंची । पहा गोष्टी कैशा करितो उंची । लुच्चावाणीं की जी मायबाप ॥ ८ ॥ लग्न करुनी घरासी आणिलें । घर पाहून बहुत संतोष झालें । चहूंकडून वारा भराभर चालें । ऐसें देखिलें की० ॥९॥ याचें घरांत मनुष्याची वस्ती भारी । पहातें तंव एकुलती एक म्हातारी । ती नित्य अन्न अन्न करी । लोकांचे घरीं तुकड्यासाठीं की जी मायबाप ॥१०॥ पायली भर धान्य आणावें जरी । तीन शेर ठेवावें यांच्या पायांवरी । शेरांत दोघींनीं कैशापरी । गुजराण करावी की जी मायबाप ॥११॥ हा तंव शेखाचा शेखपाळ । याच्या घरीं नांदती कडकडीत तिन्ही काळ । याच्या घरीं पैशाचा दुष्काळ । मग तेलामिठाचा विचार कैसा होईल की जी मायबाप ॥१२॥ कपाळ माझें कैसें फुटलें । तक्र पिऊन शरीर पुष्ट झालें । शिश्न पेलूं सारखे वाळलें । संततीचें मूळ खुंटलें की जी मायबाप ॥ १३ ॥ ऐसें बोलतां राग आला असेल मनीं । पहा कैसा दिसतो सूर्यसुत दंडपाणी । पहातो जैसा वक्र शनी । षडमासींचा की जी मायबाप ॥ १४ ॥ आतां असो हा संवाद । याचा आमचा जन्मोजन्मींचा संमंद । संतसभेसी केला विनोद । सहज रीतीनें की जी मायबाप ॥१५॥ एका जनार्दनीं जोहार । रात्र सरली सोंगें अहेत फार । संतांसी दंडवत वारंवार । मी करतें की जी मायबाप॥

## मांग.

३९१० हयात मायबाप हयात । गांव असतां वस पडलें । घर असतां जळून गेलें । जोडे असतां कांटे मोडले । ते माझ्या जाळींत सांपडले । हयात मायबाप हयात ॥ १ ॥ गांवचे पाटील मरूनी गेले । त्याचे नारीनें चुडे भरिलें । त्याचे वाड्याचे बुरूज ढासळले । तें पोर चोरींत सांपडलें । हयात मायबाप हयात ॥२॥ एका जनार्दनीं मांग । पाटील आपुले नारीला सांग । सांगितलें तर काम । नाहीं तर उफराट्या झाडासी टांग । हयात मायबाप हयात ॥ ३ ॥

## जागल्या.

३९११ मी जी जागतों गांव निजला सारा । कोणी हुषार नाहींत घरा । अवघे निजलें भ्रमले संसारा । कांहीं तरी पुढिलाची सोय धरा ॥ १ ॥ मी जागूनि जागवितों लोकां । निजेनें व्यापिलें काळ ग्रासील देखा । यांसी कोठवर मारूं तरी हांका । कैसे भुलले म्हणती माझे माझे देखा ॥ २ ॥ रात्र झाली दोन प्रहर सारी । आतां येईल बा चोराची फेरी । जिवाजीपंत तुम्ही जतन करा निर्धारी । नाहीं तरी हिरोनी नेतील गांठोडीं सारीं ॥ ३ ॥ तुमचें हित वो तुम्ही करा । जागाल तरी चुकेल फेरा । सुखे निजतांना चोर नागवतील घरा । एका जनार्दनीं सद्‌गुरुपाय धरा ॥

३९१२ रात्रंदिवस घोकितों तुम्ही सावध असा । तुमच्या नगरीचा आम्हां नाहीं भरंवसा । उजेड पडतांना गळा पडेल फासा ॥ १ ॥ उठा की जी मायबाप । कशी लागली झोंप । हुजूर जाऊनियां येवढी चुकवा खेंप ॥ धृ. ॥ ॥ २ ॥ तुमच्या नगरीची नाहीं नांदणुक बरी । तुमच्या सेजेला दोन लोभिष्ट नारी । त्यांच्या योगें दुःखें तुमच्या नगरांत भारी ॥ ३ ॥ हिंडतां देशांतरी चौऱ्यांयशीं जग । अजूनि सांपडला नाहीं नीट सुमार्ग । कोणतें हित केलें बापा सांग ॥ ४ ॥ जुन्या ठेवण्याचा तुम्ही पुर्जा काढा । त्याच्या आधारें बोलेन घडघडा । एका जनार्दनीं घरा बळकट मेढा । चाकर हुजूरचा घेईन अवघा झाडा ॥५॥

३९१३ उठा उठा मायबाप । नका येऊं देऊं झोंप । आली वो आली यमाजींची तलब ॥ १ ॥ तुमचे गावांत नाहीं पाटीलबावा । पाटलीण आवाचा मोठा दावा । घरचें घरकूल झांकून ठेवा ॥ २ ॥ तुमच्या सुनेची नाहीं वागणूक बरी । तिचे घरधनी मनाजी पाटील थोरी । त्यांच्यातील वाद साऱ्या गावांत भारी ॥ ३ ॥ पाटीलबावाची ऐकावी थोरी । सद्दा कारभार

करती घरीं । पांच तीं पोरें रडती दारोदारीं ॥ ४ ॥ आतां पाटीलबावा तुम्ही हुषारी धरा । यमाजीबाजी वो येतील घरां । इकडून तिकडे वो नाहीं पळाया थारा ॥५॥ एका जनार्दनीं कांहीं हित करा । आपला आपण चुकवा फेरा । जन्ममरणाच्या तोडा येरझारा ॥

## महालक्ष्मी.

३९१४ नमो आदि माया भगवती । अनादि सिद्ध मूळ प्रकृति । महालक्ष्मी त्रिजगतीं । बया दार उघड दार उघड ॥ १ ॥ हरिहर तुझें ध्यान करिती । चंद्र सूर्य कानीं तळपतीं । गगनाचें प्रावर्ण रुळती । तें तारांगणें भांगी भरिलें मोतीं ॥ बया० ॥ २ ॥ नवखंड पृथ्वी तुझी चोळी । सप्तपाताळीं पाउलें गेलीं । एकवीस स्वर्ग मुगुटीं झळाळी ॥ बया० ॥ ३ ॥ अलक्षपूर भवानी दार उघड बया । माहूर लक्ष्मी दार उघड बया । कोल्हापूर लक्ष्मी दार उघड बया । तैलंग लक्ष्मी दार उघड बया । तुळजापूर लक्ष्मी दार उघड बया । पाताळ लक्ष्मी दार उघड बया । कानाड लक्ष्मी दार उघड बया । अष्टभूज लक्ष्मी दार उघड बया । पंढरपूरनिवासिनी दार उघड बया । उदो उदो उदो उदो ॥ ४ ॥ चारी पुरुषार्थ गोंधळी । सनकादिक तेथें संबळी । तेहतीस कोटी भूतावळी । अठ्यांयशीं सहस्र ऋषिमंडळी । दिवट्या पाजळोनि तिष्ठती बया ॥ ५ ॥ वेताळ फेताळ खंकाळ । मेसको मारको मैराळ । जानाई जोखाई क्षेत्रपाळ । म्हैषासुर दैत्य मातला सबळ । अबबब पीडा गेली अंबे दार उघड ॥ ६ ॥ मच्छाई बया दार उघड । कच्छाई बया दार उघड । वऱ्हाई बया दार उघड । नरसाई बया दार उघड । वामनाई बया दार उघड । परसाई बया दार उघड । रामाई बया दार उघड । कृष्णाई बया दार उघड । बोधाई बया दार उघड । कलंकाई बया दार उघड । महालक्ष्मी बया दार उघड । उदो उदो उदो ऐसा शब्द गाजतो । कामक्रोध दैत्यावर कोरडा कडाडा वाजतो । ज्ञानपोत पाजळतो । बोध परडी हातीं घेतो । प्रेमाचा पाऊड पुढें ठेवितो । अहं शंकासुर दैत्य बळी देतो । बया दार उघड ॥७॥ हिरण्याक्ष हिरण्यकशिपु कोंबडे पिळी । बळीसी घालुनी पाताळीं । सहस्र अर्जुनासी हातोफळी । हनुमंत दिवटा महाबळी । अठरा पद्म घेउनी रणकल्लोळीं । सागर बांधोनियां शिळी । करी लंकेची होळी । रावण कुंभकर्ण मातले बळी । तेथें तूं खेळसी शिरांची चेन्डुफळी । बया दार उघड ॥ ८ ॥ शरण आला तुज बिभीषण । तयासी राज्यीं अक्षई स्थापून । प्रल्हाद उपमन्यु ध्रुवासी भातुकें देऊन । बुझाविसी कवतुकें बया दार उघड ॥ ९ ॥ आणिक एक अंबे नवलपरी । तुझी यात्रा कलियुगामाझारीं । अविगल द्रव्य परोपरी । निंब नारळ घेउनी करीं । हळदी कुंकुम अर्पिती । बया दार उघड ॥ १० ॥ वाहन तुझें सिंह केसरी । मोकळे केश त्रिशूळ शंख करीं । शिशुपाळ वक्रदंत दोन्ही बकरीं । आहुती घेसी जगदंबे । बया दार उघड ॥ ११ ॥ तेथून पुढें दसरा आला । अठरा दिवस घट मांडिला । कौरव पांडव सैन्य मेळ मिळाला । तेथें शोभसी विराजमान हो दुर्गे । बया दार उघड ॥ १२ ॥ जयजयाजी मूळ पीठेंद्र भवानी । पांडव कुळींची कुळस्वामिनी । अर्जुनरथीं स्वार होउनी । वागदोर हातीं धरुनी । रथ फिरविला कवतुकें । बया दार उघड ॥ १३ ॥ द्रौपदी बहिणीचेनी कैवारेंसी । होम करुनी कुरुक्षेत्रासी । तुझें साहित्यें पूर्णाहुतीसी । तें तुजप्रती अर्पिलें हो जगदंबे । बया दार उघड ॥ १४ ॥ रणवाद्य भम् भम् दण् दण् कड् कड् वाजती । तोची गोंधळ अंबे तुजप्रती । रणस्वाद पट स्थापिला मध्यवर्ती । प्रथम धूप घटाप्रती । भीमसुत बभ्रु अर्पिला । बया दार उघड ॥ १५ ॥ ऐसा रण उत्सव मांडिला । उदो उदो ऐसा शब्द झाला । तेव्हां अर्जुन भक्त झडपिला । संशय सूत्रें ते काळीं । महाशक्ति कृष्णाबाई । बया दार उघड ॥ १६ ॥ संशयभूत असे कठीण । हरि हर ब्रह्मासी नाटोपे जाण । चारी वेद सहा शास्त्रें अठरा पुराण । अठ्यांयशी सहस्र ऋषी शिणले जाण । मग त्वां बोध खंडा हातीं घेऊन । शिर छेदिलें भूतांचें । बया दार उघड ॥१७॥ बया त्वां रणकुंड जबडा पसरिला । आहुती घेसी दोन्ही दळा । रथ घोडे कुंजर तुला । नारळ तुला अर्पिला । बया दार उघड ॥ १८ ॥ भीष्म द्रोण ही कुळें । तीळ तांदूळ पायदळें । आणिकही वीर भले भले । निंबें कापुनी टाकिलीं । बया दार उघड ॥१९॥ रक्त वाहे भडभडा । तेंची तेल घृत जळे घडघडा । कौरव पतंग पडती गाढा । दुर्योधन हा लक्ष्मी तुझा रेडा । शेवटीं आहुती घेसी तयाची । बया दार उघड ॥ २० ॥ शिलंगण खेळसी नानापरी । कौरवकुळींची करुनी बोहरी । द्वारका लपवोनि समुद्रीं । यादवकुळ पाठविसी माहेरीं । निजधामा कारणें । बया दार उघड

॥२१॥ पुढें जंबुद्वीपभीतरी। अंबे तुझी न वर्णवे थोरी। खेळ खेळसी वैष्णवामाझारीं। पुंडलीक दिवटा महाभारी। पोत पाजाळूनी करी। ओवाळिसी महामाया। बया दार उघड ॥२२॥ मग जगदंबा प्रसन्न झाली। भक्तांचि कवाडें उघडी केली। शंख चक्रांकित शोभली। रुप सुंदर सावळी। कोटी चंद्र सूर्य प्रभा वळीं। बया दार उघड ॥२३॥ एका जनार्दनीं माउली। करी कृपेची साउली। भक्त जया कारणें। बया दार उघड ॥ २४ ॥

३९१५ नमो निर्गुण निराकार। आदि मूळ माया तूं आकार। महालक्ष्मी तूं साचार। उघडे दार ठेउनी बैसलीस बया ॥१॥ बया दार लाव। बया दार लाव ॥धृ.॥ घेउनी दहा अवतार। करिसी दुष्टांचा संव्हार। आकार सारुनी निराकार। काय बैसलीस। बया दार लाव ॥ २ ॥ बैसलीसे क्षीरसागरीं। शेषाचे पलंगावरीं। जय विजय द्वारीं। प्रेम दिवटे तिष्ठती। बया दार लाव ॥३॥ ते वेळीं देव आले। शंखासुर म्हणतीं पीडिलें। वेद चारी चोरुनि नेलें। ब्रह्मयाचे। बया दार लाव ॥ ४ ॥ त्वां मत्स्यरूप धरून। समुद्रांत बुडी देऊन। शंखासुरास वधून। वेद घेउनी आलीस। बया दार लाव ॥ ५ ॥ सुर असूर मिळाले। समुद्र घुसळावयास गेले। वासुकीचें दावे लाविलें। तेथें संकटी पडिले। बया दार लाव ॥६॥ तूं कूर्मरुप धरून। मंदराचळ पृष्ठी वाहून। चवदा रत्नें काढून। इंद्र सुखी केला। बया दार लाव ॥७॥ वरदें हिरण्याक्ष माजला। पृथ्वी काखेस घेउनी पळाला। चंद्र सूर्य घेउनी गेला। अंधःकार पडिला। बया दार लाव ॥८॥ त्वां वराहरूप धरून। दैत्यांस क्रोधें वधून। पृथ्वी दाढेवरी धरून। चंद्र सूर्य आणिला। बया दार लाव ॥९॥ दैत्यकुळीं हिरण्यकश्यपु जन्मला। तेणें तुझा भक्त गांजिला। तें तें न पहावें तुजला। त्वां उग्र रूप धरिलें। बया दार लाव ॥ १० ॥ त्वां क्रोधें स्तंभ फोडून। नारसिंह रूप धरून। दैत्यासी वधून। प्रल्हाद दिवटा रक्षिला। बया दार लाव ॥ ११ ॥ दैत्यकुळीं बळी जन्मला। तेणें पुण्याचा उत्कर्ष केला। देखोनी इंद्र घाबरला। शरण आला तुज बया। बया दार लाव ॥ १२ ॥ वामनरूप धरून। बळीस पाताळीं घालून। शुक्राचा एक नयन फोडिलास। बया दार लाव ॥ १३ ॥ सहस्रअर्जुनें पीडिलें। देवा तेणें गांजिलें। ऋषीचें याग खोळंबलें। हें न पहावें तुझेनी। बया दार लाव ॥१४॥ मग तूं परशुराम रूप धरून। सहस्रअर्जुनास वधून। मातेचें शिर छेदून। क्षत्रीय कुळ निवटिलें। बया दार लाव ॥ १५ ॥ शिव वरदें रावण कुंभकर्ण। तेहतीस कोटी बंदी घालून। नवग्रह पायरी करून। राज्य करी आनंदें। बया दार लाव ॥१६॥ सीतेचिनी कैवारें। रावण मारिला सहपरिवारें। अठरा पद्म वानरें। गोंधळ मांडिला लंकेसी। बया दार लाव ॥१७॥ कौरव पांडव मिळाले। कुरुक्षेत्रीं युद्ध मांडिलें। अठरा अक्षोहिणी दिवटे भले। नाचती रणकल्लोळीं। बया दार लाव ॥१८॥ बौद्ध अवतार घेऊन। विटे समचरण ठेवून। पुंडलीक दिवटा पाहून। तयाचे द्वारी गोंधळ मांडिला। बया दार लाव ॥ १९ ॥ आणिक दिवटे अपार। निवृत्ति ज्ञानदेव सोपाना खेचर। मुक्ताई जनाबाई विसोबा गोराकुंभार। रोहिदास चोखा सजन नाचती। बया दार लाव ॥ २० ॥ सांवता नामा दामा जाण। नारा म्हादा गोंदा विठा कबीर कमाल पूर्ण। सेना जनामित्र नरसी ब्राह्मण दिवटे तिष्ठती। बया दार लाव ॥ २१ ॥ आषाढी कार्तिकीं गोंधळ मांडिला। उदो उदो ऐसा शब्द झाला। कामक्रोधादिकां पळ सुटला। उदो शब्द ऐकोनी। बया दार लाव ॥२२॥ पुढें कलीचा प्रथम चरण। दैवतें राहिलीं लपून। तीर्थें सांडोनी महिमान। अठरा वर्ण एक झाले। बया दार लाव ॥ २३ ॥ म्लेंच्छें गांजिलें देवभक्तां। महिमा उच्छेदिला सर्वथा। न चले जप तप तत्वता। एकरूप सर्व झालें। बया दार लाव ॥२४॥ मत्स्याई बया दार लाव बया। कुर्माई बया दार लाव बया। वऱ्हाई बया दार लाव बया। नरसाई बया दार लाव बया। वामनाई बया दार लाव बया। परसाई बया दार लाव बया। रामाई बया दार लाव बया। कृष्णाई बया दार लाव बया। बौद्धाई बया दार लाव बया। कलंकाई बया दार लाव बया। महालक्ष्मी बया दार लाव बया ॥२५॥ उदे उदे उदे बया दार लाव ॥ २६ ॥ काम महिषासूर मातला। तेणें विषय गोंधळ मांडिला। अज्ञान पोत पाजळला। आशा संभळा लावूनी। बया दार लाव ॥२७॥ क्रोध वेताळ दारुण। मातलासे मदें करून। मत्सर मदें साह्य होऊन। भक्ति वैराग्य बुडविलें। बया दार लाव ॥ २८ ॥ दंभें झोटिंग महाबळी। अहंकार मुंजा छळी। आशा मनशा तृष्णा घेउनी गोंधळी। विषयकल्लोळीं नाचतु। बया दार लाव ॥ २९ ॥ कल्पना इच्छा वासना भूतावळी। औट कोटीया

मिळाली । नाचती विषयकल्लोळीं । भोग दिवटी घेउनी बया दार लाव ॥३०॥ ऐसें तुज न पहावें जाण । म्हणोनी बैसलीस मौन धरून । विटेवरी समचरण ठेऊन । निवांत रूपें बया दार लाव ॥ ३१ ॥ एका जनार्दनीं शरण । विठ्ठलनामें अंबा जाण । पुंडलीक दिवटा अवलोकुन। निवांत रूपें बैसली बया दार लाव ॥३२॥

## मरीआई.

३९१६ कनगुळी भानगुळी सूप टोपली । आदिमाया नमो भगवती । मानवी हो काय करून ठेविलीये । निवांत देखिलीये ॥ १ ॥ मरीआईचा कोरडा वाजतो । सिवेवरी कोरडा वाजतो । गाड्यावरी कोरडा वाजतो ॥धृ.॥ चारी पुरुषार्थ प्रसंगीं घालुनी । निरंजनीं पुंडलिकाचे द्वारीं बैसोनी । भक्ति पुरस्करोनी । निवांत देखिलीये । मच्छे कच्छे वराहे नारसिंह वामने परशरामे रामे कृष्णे बौध्ये कलंकिये सीत जान्हवीये ॥ ३ ॥ वैष्णव कुळाचा उद्धार करोनी । चौवर्णाचे मळवट भरोनी । अठराजणांची रांडोळी करूनी । गाढे दृढ दैत्यांची आहुती घेउनी । बळी बगाडें तुजला देउनी ॥ ४ ॥ अनुरुत ब्रह्मांड तुझा देव्हारा । म्हणून तुला अर्पिला माय तरुवरा । लिंबें घेउनी नारळें मारा ॥५॥ ऐसी पुजियेली नरतनू । भक्तांसी करिसी विनवणू । तैसें नव्हे रे ज्ञान अज्ञुनू। प्रसन्न होउनी यें खेळीं प्रपंचभानू ॥ ६ ॥ अंबा अंबिका प्रसन्न होऊनी । वैष्णवासी दर्शन देउनी । सावळे रूप प्रगटोनी । वैष्णवामाजीं गर्जोनी । सिंहनादे एका जनार्दनीं । भरूनी अंबा निवांत राहिलीये ॥ ७ ॥

## सटवाई.

३९१७ नमो आदिमाया भगवती । हरिहर ध्यानाची आकृती । चंद्र सूर्य कानीं लोळती । गळां वैजयंती शोभती । बया बैस ॥ १ ॥ आली आली रे सटवाई आली ॥ धृ० ॥ पांच दगड मांडुनी । वर शेंदूर आरादुनी । माथां मुगुट शोभुनी । दारवंटा पुजूनी । बया बैस ॥ २ ॥ लिंबें नारळांनीं । पूजा पूजी सटवाई म्हणुनी । नवसा पावेलची ती कर जोडुनी । बया बैस ॥ ३ ॥ चहूं वर्णांची याती । अठरा जन कपाळीं लाविती विभुती । निवद बोन करिती । वर पाळणा टांगिती । बया बैस ॥ ४ ॥ कामक्रोध बकरी मारुनी। कवैअमासीं होम करुनी । रावण कुंभकर्ण हिरण्यकश्यपुची आहुती देउनी । अंबा अष्टांग बसुनी । बया बैस ॥ ५ ॥ अष्ट गण दिक्पाळ । तेहतीस कोटी भूतावळ । अठ्यायशीं सहस्र मेळ । ज्ञान टेंबा पाजळोन। बया बैस ॥ ६ ॥ अंबेची वर्णावया कांती । घटां घट स्थान करिती । पुढें वेताळ भैरव नाचती । वैष्णवमेळीं कल्लोळ करिती । बया बैस ॥ ७ ॥ नऊ खंडें पृथ्वीवरी उभी राहुनी । नऊ अवतार नटुनी । शेवटीं प्रगट रूप धरोनी । कलंकीमाजीं समूळ नाश करुनी। बया बैस ॥ ८ ॥ उदो उदो शब्द गाजुनी । राउळीं भक्त हांक मारुनी । दारवंटा हात जोडुनी । अंबा स्तविली प्रीती करुनी । बया बैस ॥ ९ ॥ मग झाली अंबा प्रसन्न । सांवळे रूप प्रगटोन । एका जनार्दनीं नेम धरून । गेली संतांसी दर्शन देऊन । बैसविली स्वयंभुस्थानीं । बया बैस ॥ १० ॥

## यलमा.

३९१८ यलमा आली यलमा आली । मच्छरूपी यलमा आली । शंखासुराचे वधारी गेली । चारी वेद घेऊन आली । माता माझी यलमा भली ॥ १ ॥ धरारसातळासी चालली । कुर्मरूपें यलमा आली । माझे बयन धरली । जयदेवी अंबा स्थापिली ॥ २ ॥ अंबा वराहरूप होऊन । क्षिती दाढेवर धरून । दैत्य अघोर वधून । करिती भक्तांचें पालन ॥ ३ ॥ अंबा नारसिंह रूप होऊन । स्तंभामाजीं गुरुगुरून । हिरण्यकश्यपाचा घेतला प्राण । भक्त प्रल्हादाकारणें ॥४॥ अंबा झालीसे कृतघ्न । बया बैसली कपाट लावून । मंजुळ बोले हास्यवदन । अष्टभुजा सौभाग्य जाण । दार उघडून पाहे वदन ॥ ५ ॥ वामनरूपें अंबा होऊन। बसली पाताळीं घालून । द्वारपाळ पुन्हां राहून । शुक्र गुरूचा डोळा फोडून । दातृत्व भक्त जाण ॥६॥ अंबा परशराम होऊन । कामधेनु आली घेऊन । रेणुकेचा वध करून । आपल्या पितृची आज्ञा पाळून ॥ ७ ॥ अंबा झाली असे राम । लंका बिभीषणा स्थापून । इंद्रजिताचा घेतला प्राण । अंबा सुवेळे नाचून । अंबेनें केलें रणकंदन ॥ ८ ॥ देवकीचे उदरा जाऊन । गर्भवासी अंबा जाऊन । कंसाहातीं गेली निसटून । गोकुळीं केलें गमन । अंबा शेषावर करी शयन। करी यशोदेचें स्तनपान । करी कंसाचें छेदन ॥ ९ ॥ अविनाश पंढरी जाण । अंबेनें पाहिलें दिंडिरवन । भक्त पुंडलिकाकारण । समचरण करी ठेवून । हरि नामासी ठेवून । न्याहाळिती भक्तजन।

बौद्धरूप अंबा जाण ॥ १० ॥ अंबा दशभुजा नटली । दैत्य दानव मारून आली । कलीरूप प्रगट झाली । जळमय करूं गेली । चंद्र सूर्यासी आज्ञा दिली । वटपत्रीं शयनीं झालीं । त्रिविधताप अंबा माउली । एका जनार्दनीं अंबा पाहिली ॥ ११ ॥

## अंबा.

३९१९ नमो अनादि माय भगवती । मूळपीठनिवासिनी स्वयें ज्योति अविनाशिनी । जंगदंबे माये उभी राहे ॥१॥ तूं ते पहावया दृष्टी । हरिहर ब्रह्मा तप करिती । तरी त्यासी नव्हे तुझी प्राप्ती । तूं प्रत्यक्ष येथें प्रगट लिसी । बया उभी रहाये ॥ २ ॥ आली रे आली भवानी भवानी आली ॥ धृ. ॥ तिशी सिद्ध आसन देउनी । बरवी पूजा करुनी । वरी खेळणा पाळणा टांगोनी । पूजिली अविनाश भवानी ॥३॥ समसाम्य समान । अढळ तुझें सिंहासन । सच्चिदानंदासी गादी जाण । तेथें सुखासन पैं तुझें ॥४॥ पावावया तुझी प्राप्ती । साधनचतुष्टय संपत्ती । जोडोनियां याचक योजिती । प्रत्येका नीतिवेगिं योगें ॥ ५ ॥ जं मज होमिती साधनीं । ऐसे भक्त भजन देखुनी । तेणें भावार्थ योग संतोषोनी । निजपद दानीं तूं होसी ॥ ६ ॥ तूं ते करावया प्रगट । तें सर्वांहि झाले पोंचट । मग होती तो सर्व अदृष्ट । अंबा स्वयंभ प्रगटली ॥ ७ ॥ त्यास होमाची परी । सांगोनियां अवधारी । यज्ञमंडप कुसरी । अभिनव लहरी उठलीसे ॥ ८ ॥ तेथें विधान करावें दत्तात्रयाची । बाहेर मेखळा त्रिगुणाची । आंत मूर्ति जगदंबेची । आव्हानिली ॥ ९ ॥ येथें ॐकार षट्कार । बीजात्मक नाम मनोच्चार । द्रव्य अर्पी अपार । अति पवित्र अवदानी ॥ १० ॥ दश इंद्रियां आदि आहुती । मनासहित दिधली निश्चिती । अहंकार मेंढा बळी देऊनि पूर्ण आहुति । आई भवानी तोषविली ॥ ११ ॥ मोह महिषासुराचा करावया घात । अंबा कडाडोनि दांत खात । तो धाकचि निमाला निश्चित । पूर्णानंद प्रगटला ॥ १२ ॥ तुझा गोंधळी नेटका । बळीराम महा सखा । तेणें आत्मनिवेदन करूनी देखा । तुजलागीं मायें उभें केलें ॥ १३ ॥ एका जनार्दनीं निर्धारीं । अखंड पुंडलिकाचे द्वारीं । दोन्ही चरण विटेवरी । जोडोनि निर्धारीं उभी राहे ॥१४॥

३९२० सत्वर पाव गे मला । भवानीआई रोडगा वाहीन तुला ॥ १ ॥ सासरा माझा गांवी गेला । तिकडेच खपवी त्याला ॥ २ ॥ सासू माझी जाच करती । लवकर निर्दाळी तिला ॥ ३ ॥ जाऊ माझी फडफड बोलती । बोडकी कर ग तिला ॥ ४ ॥ नणंदचें पोर किरकिर करितें । खरूज होऊं दे त्याला ॥ ५ ॥ दादला मारून आहुती देईन । मोकळी कर गे मला ॥ ६ ॥ एका जनार्दनीं सगळेंचि जाऊं दे । एकटीच राहूं दे मला ॥ ७ ॥

३९२१ अयोध्येचा हो देव्हारा । आला अहंकाराचा वारा । डोळे फिरवी गरगरा ॥ १ ॥ मानवी रामाबाई मानवी कृष्णाबाई ॥ धृ. ॥ रामाबाईचा धरचारु । चौघाजणांचा व्यापारु । सहा अठराचा पडिभारु ॥२॥ रामाबाईचा वो शेला । ब्रह्म शेटीनें विणिला । तुजलागीं पांघुरविला ॥ ३ ॥ तेथोनि जालासे सोहळा । रामाबाईला वोवाळा । एका जनार्दनीं मुळा ॥ ४ ॥

## डाक.

३९२२ अनादि सिद्ध पंढरपूर । नांदे विठाई सुंदर । कर ठेवुनी कटावर । उभी राहसी निरंतर वो ॥ १ ॥ गोंधळा येवो जगदंबे । विठाबाई तूं मूळस्तंभे ॥ धृ. ॥ शुक सनकादिक गोंधळी । दिवटा भावें पोत पाजळी । मध्यें पुंडलीक दिवटा बळी ॥ २ ॥ ऐसा गोंधळ घाला निका । डाक वाजली तिहीं लोकां । शरण जनार्दनीं एका । गोंधळ गातां उदो उदो देखा ॥ ३ ॥

## गोंधळ.

३९२३ तुझी वाहीन मी दर्शनें शंखचक्रांकित भूषणें वो । निःशब्दाचें कुलुप तोडी दिवीं देहा उजळणें वो ॥१॥ उदो म्हणा उदो पांडुरंग माउलीचा वो । तुझियेनि नामें गोंधळ घालीन सत्त्वाचा वो ॥ धृ ॥ अधिष्ठानाचें रंगणीं देहावीण लोटांगणीं वो । पाहतां तुझें स्वरूप अवघी दिससी जनीं वनीं वो ॥ २ ॥ प्रकृति पुरुषाची चोखडी आव्हानिलिसी आवडी वो । अनुहात चंडके उभी नाचसी उघडी वो ॥ ३ ॥ नवल दिवीचा प्रकाश केला रजतमाचा नाश वो । स्वानंदा भाव लाजिले सत्त्वें केलासे विन्यास वो ॥ ४ ॥ एका जनार्दनीं भेटी हेंचि वारी करणें मोठी वो । पुनरपि यात्रा न घडे पडली संसारासी तुटी वो ॥ ५ ॥

३९२४ निर्गुण निराकारे आदिमाते मुळाधारे वो । अलक्ष सर्वेश्वरी चिदानंद अपरंपार वो । ब्रह्म तेजाकार महा कारण मकार वो । अंबरूपी केधारे नाम

संसाराचे तारू वो ॥ १ ॥ उदो बोला उदो उदो वैष्णवी माउलीचा वो ॥धृ.॥ शिवेवर दिधला असुर शंकासुर मातला वो । चतुरानन गांजिला वेद चारी घेऊनी गेला वो । सुरपती त्रासिला तो तुजला शरण आला वो । तो त्वां सिद्धी नेला मीनरूपीं वध केला वो ॥ २ ॥ उदो म्हणा उदो मच्छाई माउलीचा वो ॥धृ.॥ सुरासुराचे काळीं अवनी अहंकारे दाटली वो । शेषे पृथ्वी धरली तंव ती पाताळीं चालली वो । ऐसें त्वां देखतां अंबे तुज करुणा आली वो । तैं त्वां कच्छरूपें पृथ्वी पृष्ठीवरी वाहाली वो ॥ ३ ॥ उदो म्हणा उदो कुर्माई माउलीचा वो ॥ धृ. ॥ असुर कुळी मागुती मिळोनि केला अवनी भार वो । मगर कूर्म भागले जाणोनि घेसी तूं कैवार वो । अभिनव लीला तुझी केला सकळांचा संहार वो । तैं त्वां सुकर रूपें दाढा लावुनि दिधला धीर वो ॥ ४ ॥ उदो म्हणा उदो वऱ्हाई माउलीचा वो ॥धृ.॥ असुरकुळा जन्मला भक्त प्रल्हाद बोधिला वो । छंद तुझा लागला देखोनि पितयानें गांजिला वो । नामीं निर्भर झाला तैं त्वां स्तंभीं उद्भव केला वो । दैत्य जानुवरी हिरण्यकश्यपू विदारिला वो ॥ ५ ॥ उदो म्हणा उदो नरसाई माउलीचा वो ॥ धृ. ॥ भेदोनी सुरनर लोक असुर गर्वी झाला बळी वो । सुरपती शरण आला म्हणे राहे महीतळीं वो । तै त्वां वामन रूपें पृथ्वी तीन पदें व्यापिली वो । त्रिविक्रमाच्या रूपें त्वां बळी दडपिलें पाताळीं वो ॥ ६ ॥ उदो म्हणा उदो वामनाई माउलीचा वो ॥ धृ० ॥ भृगुऋषीचे कुळीं माते रेणुकेचे उदरीं वो । अवतार घेतला परशुराम तूं सुंदरी वो । सहस्रार्जुन मारिला तो मातेच्या कैवारी वो । पृथ्वी एकविस वेळा फिरूनी निःक्षत्रिय संहारी वो ॥ ७ ॥ उदो म्हणा उदो परसाई माउलीचा वो ॥ धृ. ॥ पहातां परात्पर पूर्ण रामाई अवतार वो । वनवासाच्या मिषें केला दुष्टांचा संहार वो । भानुकुळीं नांदसी नामे संसाराचे तारू वो । वधोनिया दशकंठ राज्यीं स्थापिलें किंकरु वो ॥ ८ ॥ उदो म्हणा उदो रामाई माऊलीचा वो ॥ धृ. ॥ नंद यशोदे घरीं गोंधळ गोकुळामाझारी वो । अनंत लीला खेळसी तूं कान्हाई सुंदरी वो । बाळपणीं मारिला मामा कंसासुर वैरी वो । पांडव करुनी पुढें भार पृथ्वीचा उतरविला वो ॥९॥ उदो म्हणा उदो कृष्णाई माउलीचा वो ॥धृ० ॥ बोधोनि सकळहि लोकां बोधें नेलें त्रिविधताप वो । बौद्धरूपें नांदसी बोलेविना बोलणें एक वो । साधक बाधक जेथें एकपणेंचि अनेक वो । बौद्ध अवतार तुझ्या बोधावीण बोधविसी वो ॥ १०॥ उदो म्हणा उदो बौधाई माउलीचा वो ॥ धृ. ॥ नाम कलंकी माता वेदा दावी साक्षेपता वो । भिन्नपणें भाविता भिन्नभिन्न चढे हातां वो । व्यापक जे भाविती मजमाजीची तत्त्वतां वो। कुटिलपणें खेळसी भुली घालुनी फिरवी मज चित्ता वो ॥ ११॥ उदो म्हणा उदो कलकाई माउलीचा वो ॥ धृ. ॥ एकाचि माउली दहा अवतार खेळली वो । पाहतां गुरुवचनीं मज माजीच बिंबली वो । हरुनी त्रिविधताप साधुजनाला उद्धरी वो । एका जनार्दनीं सहजीं सहजें ऐक्या आली वो । उदो म्हणा उदो दशविध माउलीचा वो ॥ धृ. ॥ ॥ १२ ॥

३९२५ अष्टधातूचे देवालय रचिलें वो । दिव्य तगट नवविधरत्नें जडविलें वो । चित्रविचित्र सुचित्र शोभा तें आणिलें वो । रंगमंडप पीठीं तुजलागीं स्थापिलें वो । ॥ १ ॥ पंढरपूरनिवासिनीं तुझा गोंधळ मांडिला वो । सारुनी कामक्रोधा वैराग्य दिवटा घातिला वो ॥ धृ. ॥ हरिजन सर्व मिळोनि आनंदें नाचती वो । भावें पूजन अर्चन सद्भावें करिती वो । धूप दीप नैवेद्य चतुर्विध अर्पिती वो । समर्पोनि पूजा विठ्ठलनामें गर्जती वो ॥ २ ॥ भीवरेमाझारीं गोंधळ मांडिला वो । पुंडलिक दिवटा मध्यभागीं स्थापिला वो । जेणें पाहिलें पंढरपूर न रुचे आणिक क्षेत्र त्याला वो । एका जनार्दनीं ऐसा ठावो स्थिर धरियेला वो ॥ धृ. ॥ ॥ ३ ॥

३९२६ माझे कुळींची कुलस्वामिनी । विठाई जगत्रय जननी । येई वो पंढरपूरनिवासिनी । ठेविले दोनी कर जघनीं । उभी सखीसजणी ॥१॥ येई पुंडलिक वरदायिनीं । विश्वजननी रंगा येई वो ॥धृ.॥ मध्ये सिंहासन घातलें । प्रमाण चौक हे साधिलें । ज्ञान कळसवरं ठेविलें । पूर्ण भरियलें । धुप दाविलें । सुत्रासें करुनी ॥ २ ॥ सभामंडप शोभला । भक्ति चांदवा दिधला । उदो उदो उदो शब्द गाजला । रंग माजला । वेद बोलिला । मूळची ध्वनी ॥ ३ ॥ शुकसनकादिक गोंधळी । जीव शीव घेउनी संबळी । गाती हरीची नामावळी । भातलें बळी । प्रेमकल्लोळीं । सुखाचें सदनीं ॥ ४ ॥ ऐसा गोंधळ घातिला । भला परमार्थ लुटिला । एका जनार्दनीं भला । ऐक्य साधिला । अघ आपुला । लाभ त्रिभुवनीं ॥ ५ ॥

३९२७ सुवेळ सुदिन तुझा गोंधळ मांडिला वो। ज्ञान वैराग्याचा वरती फुलवरा बांधिला वो। चंद्र सूर्य दोन्ही यांचा पोत पाजळिला वो। घालूनी सिंहासन वरुते घट स्थापियेला वो ॥१॥ उदो उदो बोला उदो उदो सद्गुरु माउलीचा वो ॥ धृ.॥ प्रवृत्तीनिवृत्तीचें घालुनी शुद्धासन वो। ध्येय ध्याता ध्यान। प्रक्षाळिलें चरण वो। कायावाचामनें एकविध केलें अर्चन वो। द्वैत अद्वैत भावें दिलें आचमन वो ॥२॥ भक्ति वैराग्य ज्ञान याहीं पुजियली अंबा वो। सद्रुप चिद्रुप पाहुनी प्रसन्न जगदंबा वो। एका जनार्दनीं शरण मुळकदंबा वो। आहे आहे अंबे तुझा दास आहे उभा वो ॥ ३ ॥

३९२८ करुनी शुद्ध मार्ग ठाय तो पुशिला। अज्ञान ज्योतिरूपें पोत पाजळिला। सज्ञान सद्भक्ति संबळ लाविला। त्रिभूवना माझारीं तुझा गोंधळ मांडिला वो ॥ १ ॥ रंगा येई वो। माझ्या कुळींचे कुळदैवते रंगा येई वो ॥ धृ. ॥ संकल्प विकल्प हे दोन्ही असुर। दया आणि शांती हीच जगदंबा थोर। अष्टादश पुराणें हे शोभती कर। सहा शास्त्रे तुझा वर्णिती बडिवार वो ॥ २ ॥ शुद्ध बुद्ध खंडा हातीं तेणें अंबा शोभती। अभाविक जे तयां नाहीं प्रचीती। पाहून एका जनार्दनीं जाहली तृप्ती। शरण शरण जगदंबे तुज ध्यातसे चित्तीं वो ॥ ३ ॥

३९२९ मंडळ कमळ शुद्ध पराग होंचि मुख ज्याचें वो। ओहं सोहं कोहं वाचे वदती अज्ञानपण त्याचें वो। परा आणि पश्यंती मध्यमा वैखरी सदा नाचे वो। तेचि विटेवरी अंबा उभा राहिली असे वो ॥१॥ जयजय जगदंबे माउली वो। जयजय जगदंबे माउली वो ॥ धृ. ॥ गोजिरे रूप सुंदर उभी भीमातीरीं वो। चतुर्भुजा शोभती शंख चक्र मिरवे करीं वो। कांसे पितांबर वैजयंती मिरवे हृदयावरी वो। पुंडलिकाकारणें तिष्ठे अठ्ठावीस युगें विटेवरी वो ॥२॥ चरणरजालागीं वंदित ब्रह्मादिक जाहले पिसे वो। विश्वविश्वाकार जनीं जनार्दन भासे वो। अष्टभुजा नटली भक्ताकारणें विटेवरी असे वो। एका जनार्दनीं आम्हा अनाथासी दिसे वो ॥ ३ ॥

३९३० अनादि अंबिका भगवती। बोध परडी घेउनी हातीं। पोत ज्ञानाचा पाजळती। उदो उदो भक्त नाचती ॥ १ ॥ गोंधळा येई वो जगदंबे मूळ पीठ अंबे ॥ धृ. ॥ व्यास वसिष्ठ शुक गोंधळी। नाचताती सोहंमेळीं। द्वैतभाव विसरूनी बळी। खेळती अंबे तुझे गोंधळी ॥२॥ मुगुटमणी पुंडलिक। तेहतीस कोटी देवनायक। गोंधळ घालिती कौतुक। एका जनार्दनीं नाचे देख ॥ ३ ॥

३९३१ स्वर्ग मृत्यु पाताळ त्याचा मंडप घातिला वो। चार वेदाचा फुलवरा बांधिला वो। शास्त्रे पुराणें अनुवादती तुझा गोंधळ मांडिला वो ॥ १ ॥ उदो बोला उदो बोला कृष्णाबाई माउलीचा वो ॥ धृ ॥ जीवशिव संबळ घेउनी आनंदें नाचती वो। अठ्यांयशी सहस्र ऋषी दिवटे तिष्ठती वो। तेहतीस कोटी देव चामुंडा। उदो उदो म्हणती वो ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी तुझ्या गोंधळाची दाटी वो। पुंडलीक दिवटा शोभे वाळुवंटीं वो। एका जनार्दनीं अंबा उभी कर ठेउनी कटीं वो ॥ ३॥

३९३२ अंबऋषीकारणें गर्भवास सोसिशी। वेद नेतां चोरुनी ब्रह्मया आणुनी देसी ॥ १ ॥ उदो बोला उदो कृष्णाबाई माउलीचा हो। उदो बोला उदो रामाबाई माउलीचा हो ॥ धृ ॥ हस्त लागतां शंखासुरा पूजापद देसी। मत्स्यरुपीया हरि सागर धुंडिसी ॥ २ ॥ रसातळां जातां पृथ्वी पाठीवरी घेसी। परोपकाराकारणें तळां कांसव जाहलासी ॥ ३ ॥ दाढे धरूनी अवनी वराहरूप घेसी। त्रिभुवन धुंडोनी चंद्रसूर्याते आणिसी ॥ ४ ॥ प्रल्हादाकारणें स्तंभीं गुरगुरसी। रक्षूनियां भक्तां हिरण्यकश्यपु वधिसी ॥ ५ ॥ सर्व समर्पण केलें म्हणोनि प्रसन्न होसी। त्रिमणें रूप धरूनि बळीचें द्वारपाळपण करिशी ॥ ६ ॥ सहस्र अर्जुनालागीं परशुराम होसी। वधोनि दैत्यांसी पृथ्वी ब्राह्मणां देशी ॥७॥ पितृवचनें करूनी वनवास वो करसी। सीतेचेनि कैवारें रावणकुंभकर्णा वधिसी ॥८॥ गोकुळीं नंदाघरीं रामकृष्ण तूं होशी। चोरूनि नवनीत खाउनी कंसासी वधिसी ॥ ९ ॥ धर्म लोपला अधर्म जाहला हें तूं न पाहसी। यालागीं बौद्धरूपें पंढरीं नांदसी ॥ १० ॥ कलंकी अवतार श्रीहरी पुढें तूं घेसी। एका जनार्दनीं शरण सर्व भावेंसी ॥ ११ ॥

३९३३ रंगीं नाचे क्षेत्रपाळ। आम्हा चैतन्या वेताळ। ब्रह्मानंदाचा गोंधळ। सुख सुकाळ माजविला ॥ १ ॥ सिद्धा जाग रे जगजोगी। सिद्धा जाग रे जगजोगी ॥ धृ. ॥ अनुहाताची डंबरी। बोध त्रिशूळ घेउनी करीं। नाचे चैतन्य चाचरीं। सुख साहाकारी बहिरव

॥२॥ चित्त चैतन्य योगिनी। मोह महिषासुर मर्दिनी। एका जनार्दनाचे चरणीं। भवभवानी नाचती ॥ ३ ॥

## मेसाई.

३९३४ मेसको मैराळे तूं मसणीचे आई ! धांव पाव वेगीं माझें नमन तुझे पायां ॥ १ ॥ पंढरीचा हनुमान याते कोण कोड घाली। जाळियेली लंका येणें तोंडें केली काळी ॥ २ ॥ दोंदील गण्या याते पाचारूनी काई। उंदरावर बैसोनि केव्हां धांवेल आई ॥ ३ ॥ कैलासीचा शंभु बाई आवडेना मला। लागला भिल्लीणीपाठीं कोठें पाहूं त्याला ॥ ४ ॥ लक्ष्मीचा वर खोटा आवडेना आम्हां। धरियेली माव तेणें मारियेला मामा ॥ ५ ॥ एक सेला एक मेला एक सिंदीचा धडा। घेउनियां आई आमुचें उकली तूं कोडा ॥ ६ ॥ इतुकें घेउनी आई पाव तूं आम्हासी। एका जनार्दनीं विनवितों तुजसी ॥ ७ ॥

## जोगवा.

३९३५ अनादि निर्गुण प्रगटली भवानी। मोह महिषासुर मर्दनालागुनी। त्रिविधतापाची कराया झाडणी। भक्तांलागोनी पावसी निर्वाणीं ॥ १ ॥ आईचा जोगवा जोगवा मागेन। द्वैत सारुनी माळ मी घालीन। हातीं बोधाचा झेंडा मी घेईन। भेदरहित वारीस जाईन ॥ २ ॥ नवविध भक्तीच्या करीन नवरात्रा। करुनी पोटीं मागेन ज्ञानपुत्रा। धरीन सद्भाव अंतरीच्या मित्रा। दंभ संसार सांडीन कुपात्रा ॥ ३ ॥ पूर्ण बोधाची भेईन परडी। आशा तृष्णेच्या पाडीन दरडी। मनोविकार करीन कुर्वंडी। अद्भुत रसाची भरीन दुरडी ॥ ४ ॥ आतां साजणी जालें मी निःसंग। विकल्प नवऱ्याचा सोडियला संग। कामक्रोध हे झोडियले मांग। केला मोकळा मारग सुरंग ॥ ५ ॥ ऐसा जोगवा मागुनी ठेविला। जाउनी महाद्वारीं नवस फेडिला। एकपणें जनार्दन देखिला। जन्ममरणाचा फेरा चुकविला ॥ ६ ॥

## डाका.

३९३६ सुंदरे चिद्घने माझे रंगा येई वो माते। वाजविली डाक सत्वर पावे दीनानाथे वो ॥ १ ॥ भरिला हृदयीं चौक भोग आनंदा घातला। सोहं सुमनमाळा घट पूर्णत्वें भरिला वो ॥ २ ॥ अहं धूप जाळोनी भावें केली धूपारती वो। लाउनी त्रिगुण वाती केली चिन्मय आरती वो ॥ ३ ॥ छेदुनी भेदघवन षड्रस पक्कानें वो। पूर्णपात्र भरून केलें आत्मनिवेदन वो ॥ ४ ॥ नाचती वैष्णव रंगीं करती जयजयकार वो। भावाचें दर्शन गळां तुळसीचे हार वो ॥ ५ ॥ ऐसें स्तवन करितां अंबा आलीसे रंगणीं वो। कायावाचामनें शरण एका जनार्दनीं वो ॥ ६ ॥

## फुलवरा.

३९३७ पिंडाण्ड ब्रह्मांड अंतरीं दैवत भिन्नाकृती वो। शोधोनी पहातां अवघें चराचर व्यापक घन संभुती वो। भेदभाव त्रिगुणाचा रज तम सत्त्वाची आरती वो। ऐसें जाणोनी केली उभवणी। द्वैत सारुनी परी तो मनीं। एक हरि अंकिला। तुज म्यां फुलवरा बांधिला ॥ १ ॥ जय जगदंबे। पूर्ण कदंबे। जगउद्बोधें। देह तुज अर्पिला। तुज म्यां फुलवरा बांधिला ॥ धृ. ॥ आई भवानी थोर जाणोनी तिज म्यां उपासिलें वो। हातीं देऊन परडी तिनें मज भिकेसी लाविलें वो। खुळा पांगुळा करुनी आपणा जवळीं बैसाविलें वो। उदो अस्तुचें भरे। गरगरा फिरे। भूत वावरे। तो मज व्यर्थ शीण वाटला ॥२॥ खंडोबासी नवस करुनी मुरळी होउनी बैसलें वो। आपुले जे कां सखे सज्जन ते विवंचुनी भरीं भरले वा। वारी मागतां पोट भरेना बहु श्रम पावलें वो ॥ श्वानाचिये परी। वृथा गुरगुरी। जाय चाचरी। परी तो हरि नाहीं देखिला ॥ ३ ॥ माझे घरीं पाहुणा भैरव येउनी बैसला वो। त्रिगुणाचा त्रिशूळ घेउनी प्रपंच विस्तारिला वो। जोगी बोलाउनी पतर भरुनी भराड म्यां घातिला वो। ऐशीं वरदळें सोशिलीं बळें। जाली निर्फळें। सुखाचा लेश नाहीं देखिला ॥ ४ ॥ मुंजाबाची डांक घालुनी मेसाई आळविली वो। त्रिगुणाची तिवई करुनी त्यावरी बैसाविली वो। धूप दीप नैवेद्य दाउनी पंचारती केली वो। तिनें मज नाडिलें। दुःख भोगिलें। सुख नासलें। मग म्यां ढकलून दिलें तिला ॥ ५ ॥ ऐशीं दैवतें केलीं अनंतें नवस बहु फेडिले वो। परी ते फलकट जालें शेवटीं गळां येउनी पडिले वो। बहु जाचिलें दुःख भोगिलें। चोहिंशीं व्यापिलें वो। जालें मी उदास। धरिली कास। सोडुनी आस। पंढरी पाहून जीव माझा हर्षला ॥ ६ ॥ वैकुंठाचें निधान त्याचे असती जे प्रियकर वो। त्याची गांठ पडली तेणे दिधला अभयकर वो। त्याचे संगती गेलें भक्तीनें देखीलें भीमातीर वो ॥ परात्पर

सोयरा । पुंडलीक बरा । दिधला थारा । तेणें मज बुडता हात दिधला ॥ ७ ॥ डोळा घालुनी अंजन घेउनी गेलें मज राउळीं वो । विटेवरी जगदंबा एकाएकी नयनीं देखिली वो । मनोभावें वरदळ वृत्ती देहाची खुंटली वो । एका जनार्दनीं भलें । द्वैत हरपलें । ऐक्य संचलें । जन्ममरणाचा पट फाटला ॥ ८ ॥

## गांवगुंड.

३९३८ अरे अरे गांवगुंडा । क्षीरसागरींच्या पुंडा । हातां घेऊं नको धोंडा । भुलविशील गांवच्या रांडा । तर तर उगाच राहीं रे गांवगुंडा ॥ १ ॥ देशोदेश देशांतरीं । आमची गारुड्याची थोरी । तुझ्याच गांवची नवरी । शेलकी मुसलमानाची पोरी । ती दासी करीन आपुल्या घरीं. रे गांवगुंडा ॥ २ ॥ गांवगुंड बोले रे चावटा । पोरी नेतां लावीन तुला तीन वाटा । तुझ्या कंबरेचा मोडीन कांटा । रिकामा नको आणूं रे थाट गांवगुंडा ॥ ३ ॥ अरे गारुड्याच्या पोरा । कारिका लावितोस दरारा । तुझ्या आईबापाला होता का थारा । म्यां सत्त्वगुण सोडिला वारा । म्हणून हा जडगडंबर पसारा । आवर कां रे गारुड्या ॥ ४ ॥ धेड मांग कितीएक आले । आणि येवोनियां कितीएक गेले । ते जन्ममरणा विन्मुख झाले । एका जनार्दनीं निवांत राहिले रे गारुड्या ॥ ५ ॥

३९३९ अरे अरे गांवगुंडा । तुझा बहुत ऐकतों झेंडा । जें येतें तें बोलतों तोंडा । हें मज गारुड्या पुढें चालणार नाहीं रे ॥ १ ॥ काय रे गारुड्या बोलला । तुझें आत्मज्ञान ठाउक आहे मला । तूं कोणत्या गुरुपाशीं खेळ खेळला । उगाच हांकारानें पिंवळा जोंधळा केला ॥ २ ॥ पिंवळा जोंधळा केलास जरी । तरी माझी विद्या पंचाक्षरी । जा जा ऐक फुक मारीन तरी तुझ्या काळजांत घालीन सुरी ॥ ३ ॥ तुझ्या सुरीचें पाणी करीन तरी । नाहीं तर तीच खुपसीन तुझ्या टिरीं । बोल बोलशील राहील उरीं गोष्ट पहा पां ॥ ४ ॥ गारुडी आम्हांस काय । आम्हीं दोघांचीं पोटें भरीत आहे । जी धर्मास देईल माय । ते खाऊन चाले उपाय । एका जनार्दनीं पाय । निवांत राही रे गारुड्या ॥ ५ ॥

## गारुड.

३९४० सद्गुरु विघ्नहरु ब्रह्म लंबोदरु भावें केला प्रणिपातु । भक्ति सरस्वती चैतन्य शक्ति तिचा मी झालों अंकितु । संत सज्जन जनीं जनार्दन अवधान त्यासी मागतु । गारुडाची गती गाईन तुम्हांप्रती सादर परिसा दृष्टांतु ॥ १ ॥ जा जा जा रे जा जा जा रे जा वादी वादका कायसा तुझा पाडू । तुजवरी बोधे दोबुक वाहील घेईन मागला सुड्ड ॥ धृ. ॥ अहं गांवगुंड वादक खरा परदेशी बोध दुसरा । संत सभेपाशीं गर्जत आलों आमुचा निवाड करा । बोधातें देखुनी वादक कैसा क्रोधें कांपे थरथरां । हा जीव हत्यारा येथें कोठें आला दांत खाय करकरां ॥ २ ॥ या या या रे या या या रे या मदगर्वी होभिऊं नका तुम्हीं पोटीं । केवळ ज्ञान तें विषयीं वेंचलें बोधाची कायसी गोष्टी ॥ धृ ॥ पंचभूतांमाजीं अहं गांवगुंड ब्रीदें वाहे वितंड । देहबळें कैसा सबळ जाला आकळिलें ब्रह्मांड । जो जो भेटे त्यासी पंचभूतें लावी जिंतिले वादी उदंड । त्यावरी बोधें विडा उचलिला ठेचिन तयाचें तोंड ॥ ३ ॥ जा जा जा० ॥ चैतन्याचा यावा आणूनि देहभावा बंदी म्यां घातलें जीवा । त्याचे सोडवणें थोर थोर आले न सुटे तयाच्या देवा । देवा दानवा दैत्यां मानवां न साहवे माझा यावा । विवेकासारखा बंदी म्यां घातिला बोधाचा कायसा केवा ॥ ४ ॥ या या या० ॥ विवेक बंदी हे मिथ्या उपाधी विवेकीं बोधिली बुद्धी । जीवा जीवत्व बंधन तें मिथ्या ज्ञान तें विवेक छेदी । इंद्रियांचें कर्म न कळे तुज वर्म विवेकीं विषयसिद्धी । अहो भुली तूं जालासी वादका जिंतिलासी त्रिशुद्धी ॥ ५ ॥ जा जा जा० ॥ विषयाची उंडी लावीन तोंडीं पाडीं त्याची मुरकुंडी । उंडी सगळी गिळी ऐसा बळी कोणी नाहीं ब्रह्मांडीं । इंद्र पराशर ब्रह्मादिशंकर लोळविली थोर थोर धेंडी । तेथें बोध तें बापुडें कायसे मजपुढें केंवि राहे पडिपाडी ॥ ६ ॥ या या या० ॥ कपिलें हनुमंतें भीष्में नारदें गट केली तुझी उंडी । राज्य करूनियां विदेही जनक उंडी केली तेणें मुंडी । शुक देवें तुज रंभे देखतां मारिलें तोंडीच्या तोंडी । एवढी मज बोधाचि ख्याती मा केंवि तुकसी तूं पडिपाडी ॥ ७ ॥ जा जा जा० ॥ कामाचा वेढा लावीन पुढा हालों नेदि मागा पुढा । समूळ काम गिळी ऐसा बळी कोणी नाहीं निधडा । संन्यासी वनवासीं दिगंबर तापसी भेणें रिघति गिरीकडां । तेथें स्वप्नदृष्टि खरकोटि लंगोटी वियोचा होतसे सडा ॥ ८ ॥ या या या० ॥ तुझ्या कामाची गोष्ट समूळ खोटी परतोनि पाहे पां

विठी । आत्मा आत्मीं मुळींच नाहीं काम क्रिया केवी उठी । विषयाचें गोडपण तेंचि ब्रह्म पूर्ण हें न कळे कामा कामाठी । कामाचा निजकाम जाला आत्माराम वेडा उपडिला ब्रह्मदृष्टी ॥ ९ ॥ जा जा जा० ॥ क्रोध म्हैसासूर करी गुरगुर लावीन तुझे पाठी । जिव्हारीं झोंबेल कवणा न सुटे मारियले जगजेठी । दुर्वास कपिल मुनि बळें घोळसिले सनकादिक वैकुंठीं । तया क्रोधापुढें सदा बोध दडे त्यासी कोण आणीं दृष्टी ॥ १० ॥ या या या० ॥ माझी शांती गाय तुझा क्रोध खाय त्याचें तूं बळ वानिसी । शांतीचेनि मंत्रें मंत्रोनियां कीं पंचाक्षरी केलें ऋषी। बाद्रिनारायणापुढें सदा क्रोध रडे तैं तूं काय झालासी। कामक्रोध जित भिक्षूनें धरिलें आतां तूं कोठें पळसी ॥११॥ जा जा जा०॥ ममता लाठी अत्यंत खोटी फोडीन तुझी घाटी । हे लाठी उपडी अथवा तोडी ऐसा नाहीं जगजेठी । माझें ज्ञान मोठें तुझें ज्ञान खोटें ममता ठाकिलें कोट्यानकोटी । ममतेपुढें बोध बापुडें पळाले उठाउठी ॥ १२ ॥ या या या० ॥ देहीं देहाची ममता माझें माझें म्हणतां कोण तूं नेणासि फुडें । देह तंव बापुडें अचेतन मढें माझें कोण म्हणें कुडें । मूळ मुळीं पाहतां देहीं देह मिथ्या ममता समूळ उडे । ममतेचें बळ पाडिलें पोकळ लाठी स्वयें उपडे ॥ १३ ॥ जा जा जा० ॥ मोहाचें खेडें पाहतां कुडें मरण आलें रोकडें । विवेकाचें बळ मोहेंचि सकळ आवरिलें धडफुडे । मोह विकल्पें गाढा लाविल्या फुडा बोध काय बापुडें । विकल्पाचा मारा बोध केला पुरा जैत आलें आम्हां गाढें ॥ १४ ॥ या या या० ॥ विकल्प बळें मोह सबळ सांगसी तयाचें रूप । हें बोलणें फुडे समूळ कूडे न कळे मोहो स्वरूप । संकल्प विकल्प मनाचें रूप मन तें स्वयें चिद्रुप । चिद्रुपा पुढा मोहाचा रगाडा खेडें मोडिलें सहित विकल्प ॥ १५ ॥ जा जा जा० ॥ असत्याची कढी लोभें कढ गोढी पाडितां पाडीन बुडी । सत्य वादी परम म्हणवितां हें धर्म त्यासीहि चढली फुडी । असत्याची गांठी बांधिली सृष्टी ते गांठी कवण सोडी । असत्याचे बळें जहालें प्रबळ बोधाचे दांत मीं पाडी ॥१६॥ या या या० ॥ आहे तें न देखे नाहीं तें देखे त्या नांव असत्य पाही । रज्जुसर्पें खादला कोण पां मेला हें समूळ मुळींच नाहीं । असत्याची गोठी समूळ सोडी तेणें तूं जिंकिसी कायी । सत्याचेनि बळें बोध प्रबळला जिवेंचि मारिला ठायीं ॥ १७ ॥ जा जा जा० ॥ दातेवीण नुसाधे प्रमदा व्याधि लावील अधोद्वारा । दृष्टिचि देखतां जिचें विख चढे भुलविलें सुरनरां । विखाची लहरी चढे घरोघरीं कांपताती थरथरा । व्याधीचेनी विखें जिंतिला देख बोध मारिला पुरा ॥ १८ ॥ या या या० ॥ प्रमदा व्याधी अधो संधि अधःपात्याते बाधी । देहावयव प्रमदा नांव हे आतमत्वीं नाहीं शुद्धी । प्रमदा बोध नाहीं प्रबुद्धां हें तंव वेद प्रसिद्धी । बोधे वादक तळासि आणिला मारिलासि त्रिशुद्धी ॥ १९ ॥ जा जा जा० ॥ बोधा तुझे बळ कळलें सकळ गुरुत्व तुझिये गांठीं । गुरुशिष्य म्यां धनलोभासाठीं जिंतिले कोट्यानकोटी । धनलोभावरी गुरूचें आसन शिष्य सोडी त्यांच्या गांठी । गुरुशिष्यामाजीं विकल्प नांदे बोध पळे उठाउठी ॥ २० ॥ या या या० । गुरुशिष्याचा भेद छेदी बोध धनलोभाचा छेदी कंद । धन मान प्रतिष्ठा केवळ विष्ठा हाही झाला प्रतिबोध । गुरु तो चैतन्य शिष्य तो चैतन्यघन दोहीं मुळींच नाहीं भेद । वादका विरुद्धें सोडविलीं रंगीं गजेत उभा बोध ॥२१॥ जा जा जा० ॥ मजपाशीं चांग अनंत एक नाग लावीन तुझे जिव्हारीं । तो झोंबल्यावरी सगळे गिळी आंत बाहेर नुरवी उरी याचेनि बळें वादक जिंकिलें विजयी झाला चराचरी । नाग देखोनियां वादक धाके भेणें कांपे थरथरी ॥२२॥ या या या ०॥ जिवित्व सांडूनि शिवत्वामाजीं वादकें लपणी केला थारा । अंग लपवूनि डोळा चुकवूनि दडोनि ठेला पुरा । तेथ सद्गुरु कृपा शोधूनि पाहतां धाके कांपे थरथरां । सबळ केवळ परदे तोडूनि देहा नागविला खरा ॥ २३ ॥ जा जा जा० ॥ वेदा वादाचा डफुक वाजत होता त्याचा त्यानेंचि सांडिला नादु । शब्द होता तो निःशब्द झाला सहजीं खुंटला अनुवादु । वादकाचा सखा जिवलग देखा जिवेंचि मारिला भेदु । साधनाच्या कोटी सरल्या आटाघाटी । विजयी झाला बोधु ॥ २४ ॥ जा जा रे जिंतिलें बोधें वादें बोधिला अद्वैत वदें । जीव शिव पदें जाणोनियां कीं आनंद कोंदें आनंदें ॥ धृ. ॥ अहं सोडोनियां सोहं भावें वादकें बोधाचे धरिले पाय । शरण आलो आतां मारूं नको केवळ तुसी मी गाय । गाय गारूड गाय त्यासी मी मस्तक वाहे । बोधा वादा दोघां ऐक्यता जाली समाधानें सुख होये ॥२५॥ जा जा रे जिंतिले । शरण आले

त्यासी नाहीं मरण बोधें आलिंगिला अहंभाव । संकल्प विकल्प जन्मदुःख दारिद्र केलें वाव । स्वराज्य देउनी स्वपदीं स्थापिला फिटला देह संदेह । एका जनार्दनीं ऐक्यता पावोन ब्रह्म झाला स्वयमेव ॥ २६ ॥ जा जा रे जितिले ॥

## गारुडी.

३९४१ संकासुरानें तप करून केलें ब्रह्मयाचें आराधन । तेथें वेद मूर्तिमंत जाण । संकासुरास नव्हतें मरण । आकाशीं जळीं काष्ठीं जाण । असा वर दिधला होता महान् परमेष्ठीनें ॥ १ ॥ अरे रे वेद नेले चोरून । संकासुराचा वध करून । चारी वेद आला घेऊन । गरगर चक्राकार भवंडी ॥२॥ अघोर दैत्य मातले जाण । धरा रसातळास नेऊन । कूर्मरूप घेतलें विष्णूनें । मेरुमांदार टाकिलें घुसळून । वासुकीची वराडी करून । चवदा रत्नें काढिलीं कोण कोण । आललल त्यांचीं नांवें भिन्न भिन्न ॥ ३ ॥ वराहरूप घेउनी हरी । क्षिती घेतली दाढेवरी । महा बलाढ्य वराह हरी । दैत्य दानवांचा संहार करी ॥४॥ गुरगुर धरा तारिली की यान । हिरण्यकश्यप मातले जाण । देश बांधून त्रिविधतापान । त्यासी नाहीं जन्ममरण । घरीं दारीं मृत्यु नाहीं म्हणून । जळीं काष्ठीं पाषाणीं जाण । प्रल्हाद पोटीं आला जाण । भूभार हरावया कारण स्तंभीं प्रगटला नारायण । अरे रे उदर टाकिलें चिरोन ॥५॥ पांचवा अवतार जाण ब्रह्मचारी । उभा राहिला बळिच्या द्वारीं । दान मागे श्रीहरी । बळी पाताळीं घातला द्वापारीं । बाण मारूनि वामनेत्र छेदिला । तर तरतरा माझा गारुडी धीरपुरा ॥ ६ ॥ सहावा अवतार झाला परशुराम । एकवीस वेळां निःक्षेत्रीं धरा जाण । केला माझ्या स्वामीनें । शीर मातेचें उडवून । साच केलें पितृवचन । कामधेनुसी आला घेऊन । पहा पहा कीर्तीनें भरलें त्रिभुवन ॥ ७ ॥ सातवा अवतार अजनंदन । त्याचा पुत्र रघुपती जाण । केलें अहिल्येचें उद्धरण । उदकावरी पाषाण तारून । कुंभकर्ण इंद्रजित जाण । अततता घेतला रावणाचा प्राण ॥ ८ ॥ आठवा वसुदेवाचा नंदन । त्याला कंसाचें बंधन । सात गर्भ वधिलें त्यानें । महामाया आठवी जाण । यशोदेचें उदरीं घालून । बंदीं उपजलें आपण जाण । द्वादश कळा छेदून । केलें नंदाचें मोचन । गोकुळीं आलया नेऊन । तेथील माया आणिली उचलून । अष्ट वर्षें निवांत जाण । तुम्हीं आतां सुखीं रहाणें । कंस चाणूर मारीन । शिशुपाळाचा घेईन प्राण । मग ठेवीन धनुष्यबाण । देवकी तुझ्या गळ्याची आण । आजपासून पांच वर्षांनें । एकदां भेट देईल जाण । तोंवरी स्थिर करा मन । आतां करतो तुमचें ध्यान ॥९॥ नववा उभा विटेवरी काय वर्णावी त्याची थोरी । मौनरूप धरून हरी । दोन्हीं कर कटावरी । दृष्टी नासाग्रीं ठेविली सारी । भक्तजनांस कृपा करी ॥१०॥ दहावा कलंकी होणार । अश्वगमन करील सार । चंद्र सूर्य बुडेल आकार । मग कैंचा चराचर । एका जनार्दनीं म्हणे कोण पाहणार ॥ ११ ॥

३९४२ यारो देखो रे देखो गयबी गारुडी आया । ॥ ध्रु. ॥ पाहिला पाहिला कछु नहीं देखे । निराकार निजरूपा । अलख हातमों पलख बतावे । माया सगुण रूपा ॥१॥ चल चल चल चल । री री री री गा गा गा गा । बा बा बा बा ॥ २ ॥ सात सैली उपर विवेक समला शम दम छोडा । ग्यान ध्यानसो बांधा रुमाल समला सबही जोडा ॥ ३ ॥ अनुभव नगर उपर गाजे बिद्या बेद पुराना । सोहं शब्दका बाजा बाजे नाग सुरस नाना ॥ ४ ॥ एक दो ती मिलाके पांच पचीस का बाणा । बत्तीस मिलाके तेहतीस होके उसका खाना खाना ॥ ५ ॥ क्षनका हुन्नर क्षनमोही लाया क्षन मोक्ष न जोडे । ऐसा हुन्नर कहे जनार्दन एकनाथकू थाडे ॥ ६ ॥

३९४३ बाजे घरख्याले । नजर करो मायबाप ॥१॥ भाव भगतसे खेल हमारा । तुम देखो सावकाश मीठा खेल मीठा खेल । लगा है निराधार । मीठा छोडकर पकरा संसार ॥३॥ एका जनार्दनका बंदा । हातमो काला साप बांधा ॥ ४ ॥

३९४४ अव्वल याद करो वस्तादकी । गुरु पीर पैगंबरकी । और याद करो करतारकी । जिने मडान पैदा किया है । अव्वल देखो ये कथा । उसे नाम नथा । नाम दरम्याने पैदा हुवा चल चल चल । अव्वल तो एक । एक सो दोन । दो सो तीन । ती सो चार । चार सो पांच । पांच सो पचीस । पचीस सो छत्तीस बनाया है । छत्तीस का बी एक हुया है । सो गुरु गारुडी कूं याद है । और देखो कैसा खल बनाया है । चल चल चल । क्रोध का बिच्छु बाहेर काढा । उसका बीख शिरकू चढा । जपी तपी संन्यासी की खोड तोडा । समजके देखो

भाई बिच्चूनें नांगी मारा रे मारा। छननननन कहने लगा। चल चल चल। ये देखो बाहेर निकाला। काम विषयका साप। तमाशा देखो मेरे बाप। बिनंदा तोसे काटे आपे आप। अरेरे रे रे। काटा रे काटा रे काटा रे। नजर ध्यान करो नजर करो। ध्यान सो साप दूर करे। चल चल चल। ये देखो ममता नागन आयी रे भाई आई। तिनें तो डंख मारा रे मारा। ठननननन। भागो रे भाई भागो। दवडो रे दवडो रे। गुरुके चरणपर दवडो। तो ऐसा करूं की गुरुके पांव खबीना छोडो। व्हां कोईका न चले। ममता नागनका जहर बुरा है। वो कैसी चलती है। सो बडे बडेसे लढते है। वो ना लढे ऐसी हिकमत बताऊं तुमकूं। सुनोरे भाई सुनो। गुरु पीरके हातका मोहरा। तुम्हारे हाथ चढे दुनेदारा। तो नागनका तुटे थारा। सो कबी आवने नहीं पावे। मना मनशा साप करो। शांती पेटारेमे वुसकु डारोरे भाई डारो। बाहेर तो विवेक शिका मारो। जीव और तन। ईस दोनो मुवेकु। ऐसा करुके गुरुके चरणपर। रात और दिन खेलो। जनार्दन गुरु गारुडीके पास। व्हां तुम करो खेल। खेलते खेलते हो ज्यायगा आलक्ष आपेल। एका हांडीबागकूं दिया खेल। सोहोगया आलक्ष खेल ॥१॥

३९४५ आदि पुरुष निर्गुण निराधारकी याद कर। मेरे गुरु परवर दिगारकी याद कर। जिने माया अज बनायी। उस वस्तादकी याद कर गैबी खजिना हमाना दिया उस साहेब की याद कर। संत महंतकी याद कर। गुणी गुणवंतकी याद कर। श्रीभगवंतकी याद कर। जोग जुगत का बांधा तोडा। शमदमका सीरपर समला छोडा। समता सोही सुहावे तुरा। गुरु गारुडी बीर पुरा। नैन चीरके पैन्ही मुद्रा। कान फारके खाये निद्रा। अनुहात ध्वनी धुमक बाजे। नाग सुर धुनुक गर्जे। चल चल चल चल। निरंजन जंगलके जिवडे। खेलना होय तो उलट दृष्टीसे खेल। आबी करूंगा तेरा तमाशा। पैल तेरी मुंडी काटुंगा। साप सब भुले बिचु किडे। प्रपंचके कोठरीमें आके दडे। बडे बडे जनावर पाले। हारे लाले सफेत उजडे काले पिले भले बे भला। हांडीबाग अभिमान जिवडे झुट मुठ विपीच लढे। नहीं कढूं तो ब्रह्मांड काटने दौरे। देखो मिया हाय हाय हाय। डंख मारा बे डंख मारा। सो बडे बडेकु नही उतारा। जब गुरुध्यानका लगाया मोहरा। जहर उतारा। देखो मिया बाजेगरी विद्या खेल। हांडीबाग बडा आलबेला। हात हालावे पांव हालावे। भाले भोले लोक भुलावे। आबे हांडीबाग। बाप बडा क्या बेटा बडा। बेटे आगे बाप खडा। गुरु बडा क्या चेला बडा। चेले आगे गुरु खडा। चेला तो प्रेम महेलपर चढा। धनी बडा क्या चाकर बडा। चाकर आगे धनी खडा। सास बडी क्या बहु बडी। बहु आगे सास खडी। बिबी बडी क्या बांदी बडी। बांदी आगे बिबी खडी। निराधारकी लेकर छडी। बिबी खसमके छातीपर चढी। तैं बडा क्या मै बडा। मेरे आगे तैं खडा। तैं नहीं मैं नहीं। आलम छाया मेरे गुरुकी। ध्यानीकु ध्यान लगाऊं। लोभे आंधेकु उडावु। फुक मारू तो जा जा जा जा॥ बोधके पहाडपर जा। बच्चा जाहां आना नहीं ताहां ज्या। मेरे सद्गुरु दाताकु शरन ज्या। मेरे सद्गुरु दाताकी इतनीसि लकरी। मूल मंतर हातमों पकरी। जीदर दौरा उदर दौरी। फेर देखे तो मेरी मेरे सात। देख अबी करूं गा खबूतरका तमाशा। विन परसे उडता है कैसा। खेल खेलते अविद्येके खलितेमें घुसा। बाहेर कैसा आवेगा। आवबे आव बाहेर आव। जिसे नहीं हात ना पाव। जिसे नहीं गांव ना ठाव। जिसे नहीं रूप रेखा नांव। भावना अभाव कछू नहीं। धीरे धीरे तेराबी मंतर बोलूं। लिंगदेहकी गांठ खोलूं। एकबार ऐसा खेल खेलूं। कीं मेरे बडे बडे खेलथे। हा तो एक। एकके दो। दोके तीन। तीनके चार। चारके पांच। पांचके पचीस। पचीसके छत्तीस। छत्तीसका एक। एकबी नहीं। तो एका जनार्दन देख ॥ १ ॥

३९४६ चल चल चल। निरंजन जंगलका आया खिलारी। लिया हातोमे खेल पेटारी। कालीकल वाहामो डारी। सबका मुसासाब घुसारी। हा हा हा हा। चुप बैठ चुप बैठ। हा नहीं हुं नहीं। कछूं नाद बिंदु कला जोती। आदी मदी अंती कछूं नहीं। चूप बैठ चुप बैठ। आपने जगा चुप बैठ। कहना तो कहना ममही बैठे आराम। आलखमों लखलखमो आलख। तो होना एक लख लख। ए हुन्नर मेरे गुरुपरवरनें बताया। आहां ब्रह्म मैदान छोटेमें बडा मारी। ओ बाजेगार खडा। ढो ढो ढो ढो। सोहो

सोहो। ढोल पीटते हैं। नाथ गारुडी बीर पुरा है। ओ खेलका वो खेल करते है। ओ प्रेम पोंगडा हांडीबाग बडा है। आवे हांडीबाग तूं क्या बता शिका है। बाबा मैने तो खेलका खेलगट करा है। आरे तेरे नानीका शीर काला। आरे हांडीबाग। तो आहाजी तूं क्या क्या खेल सिका है। और कछू खेल खेले गा। तो आहाजी। गुरु पीर पैगंबरकी याद कर। तो आहाजी। नजर कर नजर कर। ज्याके व्हां सबके आखर होत है। उसमें सबकी पैदास है चल चल चल। ये देख राधा मावशी तेरेसे नचत है। क्या क्या खेल तेरेसे करत है। ले इसेबे डारु। और ऐसा खेल खेलुके। हामारे बडे बडे खेलते है। ये देखो हीरेकी खानी निकालत है। आवल्ल फतरा। फेर हिरा। फेर देखो तो फतरा का फतरा। तीन लोककुं बुजे नहीं। समज पडके गत्या होने नहीं। सौंसारके बजारमें बडे बडे डुबते है। ये देखो रुपया बनते है। आधल एक। एकके दोन। दोनके तीन। तीनके चार। चारके पांच। पाचके पचीस बनाया। पांच पांच मिलगये। हाम आकेलाका आकेला रह्या। चल चल चल। निरंजन जंगलसे बडा आया। ब्रह्म भवजीवडा निखरत हैं। फडाके महजथमे घुस घुस फुस फुस करत है। ले इसेबे डारू और ऐसा खेल खेलू। ओ खेलकु बडे बडे दाता देखते है। चल चल चल चीपडीके पोंगडे। बड्या बड्या बाता करत है। बडे बडे तो भाग गये। तेराहि ब्रीद छीन लेउंगा। तेरे मूंपर मारूंगा। तेरी म्हातारी रोवेगी। येहु भेदर तो देख भला। आललल। सब जगोंमें उज्याला। मैं आप आपमेसे भूला। ये कछू नहीं देख। ये हुन्नेर तो सबसे अच्छा है। चल चल चल अव्वल एक। एकके दो। दोके तीन। तीनके चार। चारके पांच। पांचके पचीस। पचीसके छत्तीस। छत्तीसके चालीस। चालीसके ऐशीं। ए कछूं नहीं देख। एका जनार्दनके पाव पकडकर बैठा है। सदोदित नाम गावत है ॥ १ ॥

## हाथसी.

३९४७ ख्याल किया मच्छलीवाले वल्ले। दर्याव धुंडे गोविंद महंमद। खेल खिलाने आया महंमद ॥ १ ॥ सातोहि दर्याव एक भये। जब लावो चारो वेद महंमद। कच्छरूप सुहानवल्ले। चीप पकरी मिठी महंमद। जपतप जमीन दलमल वल्ले। उसे पिटकात किया महंमद ॥ २ ॥ मेरा दाता सुवर अगला वल्ले। जंगल जंगल फिरे महंमद। जब तव्व कछेहु बोली वल्ले। उसे मातबरा दात महंमद ॥ ३ ॥ देवम्याने नरसिंग बडा वल्ले। भेदा मरगजस्तंभ महंमद। हिरण्यकश्यप दैत्य मारा वल्ले। राखा भगवत प्रल्हाद महंमद ॥ ४ ॥ खुजी सुरत ठेंगणीं वल्ले। फेर फकेरी हाल महंमद। बलीराजा सत्व आगळा वल्ले। उसे राज दिया पाताळ महंमद ॥५॥ परशराम माको मारे वल्ले। फत्ते किया बापका बचन महंमद। एक अगरे बीस झगरे वल्ले। तब किया चकनाचूर महंमद ॥६॥ दशरथा राम राना वल्ले। देव छुडावे बंद महंमद। लंकापत रावण मारा वल्ले। राज्य दिया बिभीषण महंमद ॥ ७ ॥ नंदया घरका कान्हा वल्ले। खेले जमुनातीर महंमद। कंस मामाकू मारिये वल्ले। राज्य दिया उग्रसेन महंमद। आसके बार्जा ये कहे वल्ले। सात सुहान ग्वालना महंमद ॥८॥ मेरा दाता चुप बैठे वल्ले। उसे कहे सिद्ध साधक महंमद। उसका नाम जगन्नाथ वल्ले। सब घटमों विराजित महंमद ॥९॥ मेरा दाता घोडा चढे वल्ले। उसे लोक कहे कलंकी महंमद। एका जनार्दनीं यंघकर बोले। तेरे बिदारकी भूक महंमद। खेल खिलाने आये महंमद ॥१०॥

## फकीर.

३९४८ भला संतनका संग। खावे निजबोधन की भंग। सदा आनंदमो दंग। एसा मलंग फकीर ॥ १ ॥ ग्यानके मैदान खडे। शमदम आन लढे। बहोतांके तखत चढे। ऐसा मलंग फकीर ॥ २ ॥ किया संतनका दुमाल। मेरा तुटा बहु जंजाल। ऐसा एकनाथ कंगाल। ऐसा मलंग फकीर ॥ ३ ॥

३९४९ देखोरे सांई देखोरे सांई। विटपर खडा रहीया भाई ॥१॥ फकीर मौला सब दुनयाका नाम विठ्ठल सावा। बडे बडे भगत आवे बोलबाला बाच्या ॥२॥ सिद्धन साधन कोई नहीं जाणो जाणो विठ्ठल सांई। एका जनार्दन होरी पुकारे गांवो थांके पायीं ॥ ३ ॥

३९५० दिलमों याद करोरे। जनमका सारथक करोरे ॥१॥ सारे दीन करत पेटखातर धंदा। विठ्ठल नाम लेवत नहीं कैंवरे तु गद्धा ॥ २ ॥ जमका सोटा बाजे पिठपर कोई आवे नहीं सात। एका जनार्दन नाम पुकारे करो हरिनाम बात ॥ ३ ॥

३९५१ हजरत मौला मौला। सब दुनया पालनवाला ॥ १ ॥ सब घटमो सांई बिराजे। करत हय

बोलबाला ॥ २ ॥ नवाजे मैं गरीब तेरा । तेरे चरणकु रतवाला ॥३॥ आपना साती समजके लेना । सलील वोही अल्ला ॥ ४ ॥ जीन रूपसे है जगत पसारा । वोही सल्लाल अल्ला ॥ ५ ॥ एका जनार्दनीं निजवद अल्ला । आसल वोही विटपर अल्ला ॥ ६ ॥

३९५२ पंचतत्वका शोध करीयो । मूळबंद अंकुश खोचीयो । पांच पांचके पचीस पचीयो । ग्यान ध्यानसो धीर मच्याई ॥ १ ॥ फकीर हय भाई ॥ धृ. ॥ गलेमो सैली हातमो झोली । अनुहत लंकर नामकी पोली । गुरुग्यान मनसे झोली । अशा छांड धीर न छांडीयो ॥२॥ लकडा मैने जमान पकडा । कामक्रोधका तोडा झगडा । पंचतत्त्वका मारु भोसडा । अभिमानका धीर छोडा ॥ ३ ॥ दश दरवाजे कोंड करलीयो । सब इंद्रियें एकधीर धरियो । गुरुचरणा हमे सिरपर धरीयो । एका जनार्दनीं मन धीर करीयो ॥ ४ ॥

३९५३ दीलका हामने पछानावे । कायकु सोंग बतातावे ॥ १ ॥ जीदर उदर देखो भरीयो सबघटा । अल्लाअल्ला करकर खावत मागे मीठा ॥ २ ॥ एका जनार्दन पग धरत है । कहो विठ्ठल विठ्ठल अल्ला ॥३॥

३९५४ सफेत कलंदर फकीर । बाबा सफेत कलंदर फकीर ॥ धृ. ॥ कामक्रोध मदमत्सर काटो । उन्मनी ज्यावर बैठो । मारो आसन बैठो । त्रिकूटपर करनारकी जिकीर ॥ १ ॥ अंदर भगवा कियोरी बाबा । जोग जुगुत भरपाई । अडाके नामपर लागट लगाई । चुकी कलमपर लिखीर ॥ २ ॥ वेशी फकीरकी थोरी । बाबा जात कूल सब तारी । जनार्दनका एका कहत है साधो । सीताराम गुरु पीर ॥ ३ ॥

## दरवेश.

३९५५ अल्ला तुही तुहीरे । नबी तुही तुहीरे ॥ धृ. ॥ हमही मुंडा तुमही मुंडा मुंडा तेरा बाप । तेरे बापने गद्धा चोदा हमकूं लागे पाप ॥१॥ बगलम्याने तबल बाजे घरमें नही कोई । खाली हंडा चुवा बजावे । नाचत लागे डोई ॥२॥ सब देवनमे ब्रह्मा बडा पढता चारी वेद । सरस्वतीसे हाल हुवा जब ब्रह्मा बेटी चोद ॥३॥ धवळागिरी पर्वतम्याने शंभू करता तप । भिल्लीणीकी गांठ पडी जब तप हुवा गप ॥४॥ पाराशरकी नुर्नी उठी ढिवरन लगी मिठी । जमुनामे संग भयो जब व्यास व्यास कर उठी ॥५॥ नारद बडा जगद भारी औरत मागे दान । सात संवत्सरके लडके किये होगये दानादान ॥६॥ गोकुळम्याने राज करत है नाम रखा गिरिधारी । सोळा सहस्र लौंड्या भोगे होय ब्रह्मचारी ॥ ७ ॥ मेरे साहेब उंच माडी कपडा धुवान जाय । हातका साबण गिर गया तो फिरफिर गोते खाय ॥ ८ ॥ कपडा फाटे चमडा तुटे होगये सब सायास । एका जनार्दनका बंदा दिलका दरवेश ॥ ९ ॥

## हुषारी.

३९५६ हुशियार बंदा हुशियार । तेरा तन खबरदार । तुझे खिलावन एक नार । बतादेव सतरावी । घरपाई है ॥ १ ॥ बडे बडे साधुसंत । उनसे करले एकांत । सिद्धांत आदिअंत उनको ॥२॥ बडी तो सबसी बडी । जाडी तो धरतरीसे नाडी । एकवीस खन्नकी माडी । गगन बीचमें खडी है ॥ ३ ॥ दसवे द्वार झरोवा । देखले दिदार उनोका । नैन दोन लगावे ॥ ४ ॥ ब्रह्मा विष्णु बडे देव । अजब गुरुग्यानी महादेव । पाहिये उनोकी ठेव । बेठके जग झुलाई है ॥५॥ अलख पुरुषको धुनी । तुर्या चेत रही उन्मनी । नही आदिअंत पुरानी । पद्मी महाकारण रूप है ॥ ६ ॥ अहंनाद निःशब्दमों । सोस लगाईये चष्ममों । चुनक है मसुरमों । झकाझक झकाझक है ॥ ७ ॥ लखलखाट हिरेकी खान । चकचकाट को भान । निशिदिन करत ना ध्यान । ग्यान बहोत आयेगे ॥ ८ ॥ दिल रिझे तो करले धंदा । एका जनार्दनका बंदा । चुप सोनसो बताई है ॥ ९ ॥

## मुंडा.

३९५७ गुरूका मुंडा बडा गुंडा चीपकी कहे बात । सुननेवाले बहेरे बाबा दिनकी करे रात ॥ १ ॥ सोही एक मुंडा जेणें आपरूप धुंडा । और क्या कहूं जादा चारो बेद लुंडा ॥ २ ॥ आपनी आपनी राहा चले दिलकु करे पाख । तनक मनन सटोना मुंमें पडेगी खाक ॥ ३ ॥ खलक म्याने भरिये खुदा नई जुदा कोय । एका जनार्दनका बंदा जननमरन खोय ॥ ४ ॥

३९५८ दिलकी गाठ खोलो । यारो नाम बोलो ॥ १ ॥ कुइनई आवे सात । मुंडे कायकु करे बात ॥ २ ॥ जोरू लरके मावाप । सब पसारे हात ॥ ३ ॥ हत्ति घोडे पालख मेना । नहीं आवे सात ॥ ४ ॥ दो दीनका बजार यारो । कायकु करता बात ॥ ५ ॥ झुटी काया झुटी माया । झुटा सब दीन रात ॥ ६ ॥ एका जनार्दन बोले भाई । कोही नही आवे सात ॥७॥

३९५९ पखलम्यानें चार जुग ज्यावे। तनकी नही भाई बात ॥ १ ॥ देख मुंडे देख। आपना नफा मुंडे देख ॥धृ.॥ कृत त्रेत द्वापार कलयुगकी मोठा। चारा जुग मुफत गमावे आया मुद्लसे तोटा ॥ २ ॥ कल जुगमो रामबीना तरला कोई देखो। आलख आलख सब पुकारे आलख नही कुइ देखो ॥ ३ ॥ जपी तपी संन्यासी पेटखातर फिरते। आसन छांड आलख पुकारे पेटसे सब मरते ॥ ४ ॥ फकीर मौला ब्रह्मन गुंसाई सबही आलख पुकारे। आलखमें लख नही कैव आलख पुकारे ॥ ५ ॥ एका जनार्दन साच्या कहे आलख बिठ्ठल सार। देख मुंढे आपना नफा करो नामउच्चार ॥ ६ ॥

## बुलबुल.

३९६० लखो बुलबुल है। दावोजी मुबारखो ॥धृ.॥ झुटा तेरा जप भात रोटी गप। सद्गुरुमें छप। तुज काल करेगा गप ॥ १ ॥ लगो मुख लिया नाम। आंदर भरा है काम। ऐसा कैव हुवा बेफाम। तुज कहां मिलेगा राम ॥ २ ॥ मोकूं आंगकूं लगाया राख। दिलमों नापाक। ऐसा देखे लख। एका जनार्दनीं देख ॥ ३ ॥

## जोगी.

३९६१ हम तो जोगी रे बाबा संजोगी ॥ धृ. ॥ बहुत दीनके पुराणें। बिरला बुझे कोई लाखोंमें। गुरुसाहेब जाणे ॥ १ ॥ जपका जोगी तपका जोगी। ना जोगी जुगुजुगु जीवे। हातमो प्याला लिया। प्रेमका जोगी भरभर पीवे ॥ २ ॥ जोगीकू धुंडत जो गाया कीने लछी नही पाया। एका जनार्दन कृपासो जोगी पकरही लाया ॥ ३ ॥

## नानक.

३९६२ आलख निरंजन नानक आया। नेकी करना आछा है ॥ १ ॥ फेक पैसा फेक यारो। फेक पैसा फेक ॥ धृ ॥ माया झोली निरगुण सैली। नाम माला जपता है ॥ २ ॥ समकी टोपी दमकी कफनी। त्रिगुण बभूत चढाई है ॥ ३ ॥ जीव शीव दोनो कुंडल पेन्हे। अनुहत टिपरी बजावत है ॥ ४ ॥ कामक्रोधकी गर्दन मारी। बोध खंडा झळकत है ॥ ५ ॥ प्रेम कटारी लियी हातमों। लवंडी माया डरती है ॥ ६ ॥ वैराग्य भाला पडे उजाला। संसारमों तो फत्तर है ॥ ७ ॥ तो भवनमां सौदा बेचे। आशा मनशा धरता है ॥ ८ ॥ फेर चौऱ्यांयशी आयी यारो। मुपर जूता खाता है ॥ ९ ॥ चारो बरनोंमें ब्रह्मण बडा। घर घर कथा करता है ॥१०॥ नाम बेचकर दाम लेते। उसकी करनी हराम है ॥ ११ ॥ फकीर होकर फिकीर करिता। उसका मूं काला है ॥ १२ ॥ नाथपंथकी मुद्रा डाली। जगमें सिंगी बजावत है ॥ १३ ॥ सिंगी नादकुं औरत भूला। वोबी लवंडा झूटा है ॥ १४ ॥ संन्यास लिया आशा बढया। मीठा खाना मंगता है ॥ १५ ॥ भूलगया अल्लाका नाम यारो। ज्यमका सोटा बजाता है ॥ १६ ॥ शेटे सावकार माल खजीना। उनमें मगन रेहेता है ॥१७॥ जोरू लडके कोई नही साती। आखर मुमें मट्टी है ॥ १८ ॥ मानभाव बनेके काला पैने। छानकर पानी पीता है ॥१९॥ आत्म ध्यानकुं चोर लुटत है। वो बी सच्चा गद्धा है ॥२०॥ शंख बजावत जंगम आया। घर घर लेकर फिरता है ॥२१॥ पेटखातर शिवकू बेचे। वोबी लवंडा कुत्ता है ॥२२॥ गोसावी बडा भगवा जावे। जटा बढाकर रहेता है ॥२३॥ साहा चोरकू जगा देकर। उसमें फंदमें फिरता है ॥२४॥ साहा फेकेसो साधु बनेगा। नही तो यारो गव्हार है ॥२५॥ फेक आशा फेक मनशा। निंदा फेके सो जोगी है ॥ २६ ॥ परधन फेक दुजी औरत फेक। न फेके सो चांडाल है ॥ २७ ॥ दंभमान फेक। मीपण फेक न फेके सो नकटा आंधा है ॥ २८ ॥ साही शास्त्र अठरा पुराण। चारो वेद पढता है ॥ २९ ॥ माबाप तो कासी तीरथ। उसकु गाली देता है ॥ ३० ॥ साधुसंत घरकु आये। उसकूं तेडा बोलता है ॥ ३१ ॥ दिवाना उनका बाप यारो। हात जोडकर रहेता है ॥ ३२ ॥ नाम अल्लाका कथा सुन्नेकी। उव्हां मुरगीका सोता है ॥ ३३ ॥ कामका कुत्ता कसबीन घरमें। सारी रातदीन जागत रै ॥३४॥ इस दुनियामें आया बंदे। अल्ला नामका सौदा है ॥ ३५ ॥ एक दिन आना एक दिन जाना। दो दिनका सब बजार है ॥ ३६ ॥ इस नमगरीमें सेटे सावकार। बडे मतलबी रहेते है ॥ ३७ ॥ नामकी जोडी करले यारो। चौऱ्यांयशी बेडी तुटती है ॥ ३८ ॥ तेरे नगरीमें नानक आया। पैसा टका कुच मंगता नही है ॥ ३९ ॥ भक्ती रोटी भावका सालन। देना मेरेकू सच्चा है ॥ ४० ॥ एका जनार्दनीं शाही हमारा। नानक उनका बंदा है ॥ ४१ ॥ मोक्ष निशानी लियी हातमों। वैकुंठधाम पढता है ॥ ४२ ॥

३९६३ सिरमें टोपी गलेमे सैली । कफनी दाला देख ॥ १ ॥ फेक दाम फेक । मुजे फेक दाम फेक ॥ धृ. । निराकार नाम एक । हामने लिया भेक ॥२॥ सोहंकितो नौबाद बाजे । बिरला ज्याने एक ॥ ३ ॥ शमदमके तो सोट बाजे । कूफर भागा देख ॥ ४ ॥ बडानुग्रह देतां नही । नसकु फत्तर देख ॥ ५ ॥ बडा सुम बोले नही । जुता खडा देख ॥ ६ ॥ घुसा आया कपडा जलाया । आग लगी देख ॥ ७ ॥ ग्यानोबा ग्यानोका घर । गलेमो सिंगी सैली देख ॥ ८ ॥ पैठणमें तो मुजे वेद । रेडा बुलावें देख ॥ ९ ॥ पैठण होकर घरकूं चले । पुशुकु समाद दीया देख ॥ १० ॥ ग्यानोबा विष्णुका अवतार । दरबाजे सुन्नेका पिंपल देख ॥ ११ ॥ निवृत्ति अवतार बावा आदमका । पहाडमों समाद लिया देख ॥ १२ ॥ सोपानदेव तो ब्रह्मभया । भागिर्थि लाया देख ॥ १३ ॥ चांगदेव तो मिलने आया । दिवाल चलाया देख ॥ १४ ॥ और नानक नामा दरजी । देव भुलाया देख ॥ १५ ॥ और नानक कबीर हुआ । दुजा कमाल देख ॥ १६ ॥ बडे नानक सांवत माळी । पेट चिराया देख ॥ १७ ॥ और नानक सजन कसाई । भजनेकु साळीग्राम देख ॥१८॥ गोरोबा कुंभार नानक हुवा । हात तोडे देख ॥१९॥ नानका घर दादु पिंजारी । नाम जपता एक ॥ २० ॥ एक नानक प्रल्हाद हुवा । बापकु मरवाया देख ॥२१॥ नानका घर बिभीषण हुवा । कूल डुबाया देख ॥२२॥ और नानक विसोबा खेचर । तनके शाम देख ॥२३॥ बडे शहाणे नरहरी सोनार । सीरपर लिंग देख ॥ २४ ॥ रोहिदास चांभार सब कूच जाणे । कटोर गंगा देख ॥ २५ ॥ सेना नानक पूजा करितां । देवने धोकटी लिया देख ॥ २६ ॥ चोखोबाने दव बटलाया । दिवाल पडकी देख ॥ २७ ॥ ऐसें नानक बहुत हुवे । अंत न लगे देख ॥२८॥ ऐसें नानक नाम जपके । वैकुंठ जावें देख ॥२९॥ कासी गया प्रयाग गया । कर्वत लिया देख ॥ ३० ॥ मथुरा गया द्वारका गया । छापा लिया देख ॥ ३१ ॥ उसका नाम लेवे नही तो । दोष लागे देख ॥३२॥ उसके नाम जपके । वैकुंठ चढे देख ॥३३॥ एकनाथ तो एकही जाने । एका जनार्दनीं देख ॥३४॥

३९६४ अल्ला रखे गा वैसाभी रहना । मौला रखेगा वैसाभी रहेना ॥धृ.॥ कोई दिन सिरपर छतर उडावें । कोई दिन सिरपर घडा चढावे । कोई दिन तुरुंग उपर चढावे । कोई दिन पावस खासा चलावे ॥ अल्ला ॥ १ ॥ कोई दिन शक्कर दुध मलीदा । कोई दिन अल्ला मागत गदा । कोई दिन सेवक हात जोड खडे । कोई दिन नजीक न आवे धेडे ॥ अल्ला ॥ ॥ २ ॥ कोई दिन राजा बडा अधिकारी । एक दिन होये कंगाल भिकारी । एका जनार्दनीं करत करतारी । गाफल कैंव करतां मगरुरी ॥ ३ ॥

## चिरंजीवपद.

३९६५ चिरंजीवपद पावावयासी । अधिकार कैसा साधकासी । किंचित बोलेन निश्चयेसीं । कळावयासी साधका ॥ १ ॥ आधीं पाहिजे अनुताप । तयाचे कैसें स्वरूप । नित्य मृत्यु जाणे समीप । न मनीं अल्प देह सुख ॥ २ ॥ म्हणे नरदेहा किमर्थ निर्मिला । तो म्या विषयभोगी लाविला । थिता परमार्थ हातीचा गेला । करी वहिला विचार ॥ ३ ॥ ऐसा अनुताप वाहती चित्ता । वैराग्य ये त्याचिये हातां । त्या वैराग्याची कथा । किंचित आतां पैं बोले ॥ ४ ॥ तें वैराग्य बहुतांपरी । आहे गा तूं अवधारी । सात्विक राजस तामस त्रिप्रकारी । योगेश्वरी बोलिजे ॥ ५ ॥ राजस तामस त्याग । तेणें न कळे परमार्थ मार्ग । करावा सात्विक त्याग । सुख अव्यंग मग लाहे॥६॥ प्रथम राजस तामस दोन्ही । अल्प बोले उकलोनी । जें सात्विका लागोनी । अंतरीहुनी त्यागावा ॥७॥ नेणे वेदविधि विचार । नाहीं सत्संग सधर । कर्मभ्रष्ट सावार । तो अपवित्र तामस ॥ ८ ॥ त्याग केला पूज्यतेकारणें । सत्संग सोडूनि पूज्यता भोगणें । शिष्य ममता धरून राहणें । तो जाणणें राजस॥९॥ ऐसें वैराग्य राजस तामस । तो त्याग न माने संतांस । तेणें न भेटे कृष्ण परेश । अनर्थासी मूळ हें ॥ १० ॥ आतां वैराग्य शुद्ध सात्विक । जें जगद्वंद्य मानी यदुनायक । तें तूं सविस्तर ऐक । मनीं निष्टंक बैसावया ॥ ११ ॥ भांगेच्या विषयिक । ते तो सांडी सकळीक । प्रारब्धे प्राप्त होता देख । तेथूनी निष्टंक मन काढी ॥ १२ ॥ विषय पांच आहाती । ते अवश्य साधकां नाडिती । म्हणोनि लागो न द्यावी प्रीती । कोणे रीती ते ऐका ॥ १३ ॥ जेणें धरिला शुद्ध परमार्थ । त्यासी जनमान हा अनर्थ । तेणें वाढे विषयस्वार्थ । ऐका नेमस्त विचार ॥ १४ ॥ नैराश्य पुरुष देखुनी । त्याची स्तुती करिती जनीं । एक सन्मानें करुनी । पूजे लागूनि पैं नेती ॥ १५ ॥ तंव त्याचे वैराग्य कोमळ कंटक । नेट न धरी निष्टंक । देखोनि

मानस्तुती आलौकिक। भुलला देख पैं तेथें ॥ १६ ॥ जनस्तुती लागे मधुर। म्हणती हा उद्धरावया हरीचा अवतार। आम्हांलागी जाहला स्थीर। धरी अपार शब्दगोडी ॥ १७ ॥ हा पांच विषयामाजीं प्रथम। शब्द विषय उपक्रम। मग स्पर्श विषय संभ्रम। झोंबे परम त्या कैसा ॥ १८ ॥ नाना मृदु आसनें घालिती। विचित्र पर्यंक निद्रेप्रती। नरनारी आंगशुश्रुषा करिती। तेणें धरी प्रीती स्पर्शाची ॥ १९ ॥ रूप विषय कैसा गोवी। वस्त्रे भूषणें देती बरवीं। तेणें सौंदर्य करी जीवीं। देहभावे श्लाघ्यता ॥ २० ॥ रूप विषय ऐसा जडला। मग रस विषय कैसा झोंबला। जें जें आवडे तें तयाला। गोड गोड अर्पिती ॥२१॥ ते रस गोडी करितां। घडी न विसंबे धरी ममता। मग गंध विषय ओढिता। होय तत्वता त्या कैसा ॥ २२ ॥ आवडे सुमन चंदन। बुका केशर विलेपन। ऐसे पांचहि विषय संपूर्ण। जडले जाण सन्मानें ॥ २३ ॥ मग जे जे जन वंदिती। तेची त्यांची निंदा करिती। परी अनुताप नुपजे चित्तीं। ममता निश्चती पूजकाची ॥ २४ ॥ म्हणाल जो विवेकी आहे। त्यासी जनमान करील काय। हें बोलणें मूर्खांचें पाहे। तया चाड आहे मानाची ॥ २५ ॥ ज्ञात्यासी प्रारब्ध गती। मान झाला तरी नेघो म्हणती। परी तेथेंचि गुंतोनी ते राहती। उदास होती तात्काळ ॥ २६ ॥ यापरी साधकाच्या चित्ता। मान गोडी न सोडी सर्वथा। जरी कृपा उपजेल भगवंता। तरी होय मागुता विरक्त ॥२७॥ तो विरक्त कैसा म्हणाल। जो मानले सांडी स्थळ। सत्संगी राहे निश्चळ। न करी तळमळ मानाची ॥२८॥ ऐसा परमार्थ साधकासी। जन मान्यता विघ्न त्यासी। तेणें लुब्ध विषयासी। या चिन्हासी बोलिजे ॥२९॥ न मांडी स्वतंत्र फड। अंगीं अहंता येईल वाढ। धरुनी जीविकेची चाड। न बोले गोड मनधरणीं ॥३०॥ नावडे लौकीक परवडी। नावडे लेणीं लुगडीं। नावडे परान्न गोडी। द्रव्य जोडी नावडे ॥ ३१ ॥ नावडे प्रपंच जनीं बैसणें। नावडे कोणाचें बोलणें। नावडें योग्यता मिरविणें। बरवें खाणें नावडे ॥३२॥ नावडे स्त्रियात बोलणें। नावडे स्त्रियातें पाहणें नावडे स्त्रियाचें रगडणें। त्यांचा स्पर्श नावडे ॥३३॥ नको नको स्त्रियांचा सांगात। नको नको स्त्रियांचा एकांत। नको नको स्त्रियांचा परमार्थ। करिती आघात पुरुषासी ॥ ३४ ॥ म्हणती गृहस्थ सांघके। स्त्रिया सांडुनी जावेकें। येच अर्थी उत्तर निके। ऐक आतां सांगेन ॥३५॥ तरी स्वस्त्रीवांचुनी। नातळावी अन्य कामिनी। कोणे स्त्रियेसी सन्निध वाणी। आश्रय झणी न द्यावा ॥ ३६ ॥ स्वस्त्रिसहि कार्यापुरतें। पाचारावें स्पर्शावें निरुतें। परी आसक्त होऊं नये तेथें। अति सर्वथा न गुंतावें ॥३७॥ जरी स्त्रिया सेवा करिती। भक्ती ममता उपजविती। तरी त्यांच्या संगतीं। शुद्ध परमार्थी न बैसे ॥ ३८ ॥ अखंड एकांतीं बैसणें। प्रमदासंगें न राहणें। जो निसंगी निरभिमानें। त्या पैं बैसणें सर्वदा ॥ ३९ ॥ कुटुंब आहाराकारणें। अकल्पित न मिळे तरी कोरान्न करणें। ऐसे स्थिती जे वर्तणें। तें जाणणें शुद्ध वैराग्य ॥ ४० ॥ ऐशी स्थिति नाहीं ज्यासी। कृष्णप्राप्ती कैंची त्यासी। म्हणुनी कृष्णभक्तासी। ऐशी स्थिति असावी ॥ ४१ ॥ या स्थितींविगळा जाण। कृष्णीं मिळूं पाहे अज्ञान। सकळ मूर्खांचें तो अधिष्ठान। लटकें तरी आण देवाची ॥४२॥ हें बोलणें माझिये मतीचें। नव्हेचि गा साचें। कृष्णें सांगितलें उद्धवा हिताचें। तें मी साचें बोलिलों ॥४३॥ साच न मानी ज्याचें मन। तो विकल्पें न पवे कृष्णचरण। माझें काय जाईल जाण। मी बोलोन उतराई ॥ ४४ ॥ साधावया वैराग्य जाण। मनुष्यदेहीं करावा प्रयत्न। सांगे एका जनार्दन। आणिक प्रयत्न असेना ॥

## भांड.

३९६६ माया छांड सुनोजी। आछा भांड बनोजी ॥ ध्रु. ॥ ब्रह्मदेवनें वेद पढाया माया मीठी लगी। सरस्वतीके गले पडा उसकी करित भगी ॥ १ ॥ विष्णुके पीछे लगा है मायाका धंदा। खेळ करते फसल पडी मिठी लगी वृंदा ॥ २ ॥ महादेव बडा देव सब देवनका बावा। भिल्लीनीके पिछे लगा करता तोबा तोबा ॥३॥ अहिल्याके देखनेकूं इंद्र भूल मदे। गौतमनें गांड मारी आंगपर हुवे फोडे ॥४॥ सीताकी चोरी करी रावणकूं धक्का। हनुमाननें नंगी करके जलादिया लंका ॥ ५ ॥ हनुमान तो ब्रह्मचारी जपे रामनाम। स्त्रीराज्यमो बायका गाभन करता है बेफाम ॥ ६ ॥ विश्वामित्र तप करे भये अनुष्ठानी। मेनकासें वश भये हुवे धुळधानी ॥ ७ ॥ नारदानें किसनसे एक औरत मांगी। नारदकी नारदी भई पोंगडे जनन लागी ॥ ८ ॥ सोळा सहस्त्र नारी कान्हा गोकुळमें खेले। राधीकाकूं छोडके रीसनकूं

भुले ॥ ९ ॥ जनार्दन साई मेरा सब खेल खेला । एकनाथ भांड होके उनके चरण मिला ॥ १० ॥

३९६७ हुवा भांड माया छांड एक संग पकडा । जोरू लडके मायबाप सबकू बस करा ॥१॥ सबसे हुवा न्यारा मुजे एक लगा प्यारा ॥धृ.॥ खावे विदबुंदकी भंग मै तो मगन हुवा दंग । छटक फटक टाळी बाजे मुजे बाजे चंग ॥ २ ॥ उपरतले अंदर भीतर सज्जन भरा पुरा ॥ ३ ॥ चौक म्यानें आन खडे देखत है रहा । बडे बडे बेफाम घरोघर यारा ॥ ४ ॥ बेद नीती सब कोई जाने जाने किताब पुरा । मा बेटीकी सुद नहीं एक सीर मारा ॥ ५ ॥ हाम जपी हाम तपी चारो देश फिरा । जमुनामें लटापटी व्यास नाम धरा ॥ ६ ॥ बिसरा राम भरा काम मागन लगा औरत । दौडो यार किया जोर लरकी नरकी घेरा ॥ ७ ॥ बडे हट्टी अंगपर छाटी एक पग खडा । देख माया सुखासुखी डालन लागा घेरा ॥८ ॥ आप चल मकानकु विसारत करेकु । भरी मजलस हासाहासी उतार दिया कुरा ॥ ९ ॥ आप करते तप करते वोबी भूल पडा । इतर जनकी क्या बिशाद छेजनकू मारा ॥ १० ॥ आगे आगे देख करनी संग हुवा एका । जनार्दनकी मेहर हुवी माथे कर धरा ॥ ११ ॥

३९६८ देख माया जद लगी बाबा आदमके पिछे । कैलास छांडकर स्मशानमों बैठे ॥१॥ हाम तो भांड भई माया छांड देई ॥ धृ. ॥ विष्णुके पिछे मायनका धंदा । वृंदाबनमों घुसाघुसी मिठी लागी वृंदा ॥२॥ ब्रह्मा बडा ब्रह्म खडा चारी वेद पढा । अधर्मतसे रत हुवा एक सीर तोडा ॥ ३ ॥ जपी तपी जंगलमें बैठे उनसे डाले घेरा । कुत्ता कुत्ती होके सब मुलूख फिरा ॥ ५ ॥ बडे हाटी अंगपर छाटी एक पाव खडा । जद माया पिछे लगी किया तडातोडा ॥५॥ होकर भांड माया छांड जनार्दन पाव मिला । एका जनार्दनका स्वामी सब खेल खेला ॥ ६ ॥

## डौर.

३९६९ ऐका गाये साधु सज्जनहो । महंत महाजन हो । मननशील मुनिजन हो । योगी सज्ञान हो सावध ऐका ॥ १ ॥ वैकुंठराणें राज्यधर । चिन्मात्रैक राजकुमर । निजज्ञानी वेव्हारे थोर थोर । नित्य सादर ते आइका ॥ २ ॥ विनवी जनार्दनाचा एका । सेविती तुमच्या चरणपियुका । उजळल्या निजात्मसुखा । डौर वाऊनियां देखा । डौरकार पैं जाहले ॥ ३ ॥ उठूनियां ब्रह्ममुहूर्ती । काय करावें निश्चिती । तें ऐका तुम्हांप्रति । यथा निगुती सांगेन ॥ ४ ॥ डौरनाद ॥ खुडमुड ॥ कर्ममार्गी स्मृति ॥ श्लोक ॥ गृहितं शीश्नश्चोत्थाय जगाम् दिशं उत्तरं । कर्ममार्गी विधिती । शिश्न धरुनि डावे हातीं । दुर्वा घेउनि उजवे हातीं । उत्तर दिशेप्रती । हागो जावें ॥ ५ ॥ ऐसे मुहूर्तीच हागो लागले । ते हागणवटीसी अडकले । ब्राह्म मुहूर्तीं साधु भले । काय करूं लागले तें ऐका ॥६॥ ज्ञानमार्गी स्मृति ॥ श्लोक ॥ ब्राह्मे मुहुर्ते चोत्थाय चिंतयेदात्मनोहितं । आत्महित चिंतन । मज व्हावें धनधान्य । मज व्हावें मान्यतां मान्य । भूत भविष्य वर्तमान । हें ज्ञान मज व्हावें ॥७॥ मज व्हावें वस्त्र कलत्र । मज व्हावें वंशी पुत्र । हे चिंतन निरंतर । तें नव्हे साचार । आत्महित ॥ ८ ॥ डुगडुग ॥ हें चिंतन करुनी काये । थितें आयुष्य व्यर्थ जाये । जें चिंतावें तें अदृष्टीं आहे । हितचिंतन पाहे । आनचि असे ॥ ९ ॥ तें कैसें गा ये डौरकारा वाईक बोल । द्रव्य द्रष्टा दर्शन । ध्येय ध्याता ध्यान । ज्ञेय ज्ञाता ज्ञान । यांहिहुनी मी भिन्न । ऐसी चिंता गाये महानुभाव हो ॥ १० ॥ मी हाता पायापरता । मी गुणत्रया वरुता । चहुं वांचाहुनी तत्त्वता । अतीत तो सर्वथा । मीची मी स्वयें ॥११॥ कर्म धर्म इंद्रिय सत्ता । माझेनी चालली तत्त्वता । परी मी सर्व कर्मधर्मापरता । करूनि अकर्ता मीचि मी स्वयें ॥ १२ ॥ जीव शीवऐशी वार्ता । तें माझेंचि स्वरूप वस्तुता । जीव शीवा नाताळता । प्रकृती पुरुषा परता । मीचि मी स्वयें ॥ १३ ॥ देह जो का पावे मरण । त्यामाजीं मी न मरे तो आपण । जेथें नाहीं मीतूंपण । तें स्वरूप पूर्ण मीचि मी स्वयें ॥१४॥ ऐसें करी जो चिंतन । त्याच्या मरणासींच ये मरण । आंगीं न लगे जन्मबंधन । एका जनार्दन निजवाक्य ॥ १५ ॥ डौर नाद । सुख आनंद वर्तैल ये चोहटीं । धादांत वेदांत सिद्धांत । बोल बोलोनी गेले बहुत । आतां मी आलो भोगांत । माझा वचनार्थ सावध ऐका ॥ १६ ॥ धादांत वाईक डौरकाराचें । वेदांत वाईक पंडितांचे । सिद्धांत वाईक ज्योतिषाचे । आणि भोगांत वाईक माझें । सावध ऐका सज्ञान ज्ञाते हो ॥ १७ ॥ डौरकाराचे बोल । विचारिती खोलच खोल । तें आशेनें केले केवळ फोल । विश्वासाची वोल गेली तें हें ऐका ॥ १८ ॥ दाम

देतो मद्दा ग्वाड । नेदी तो मद्दा द्वाड । हें बोलणें अतिशय वाड । परी लुलू करी चाड तें मज दान द्यावें ॥ १९ ॥ तें लुलूनें काय केलें । बोलिलें तितुकें वार्या गेलें । वार्यां जाऊनि गोंविलें । डौरकारा दिधलें काळमुखपण ॥ २० ॥ डौर नाद डुगडुग । धरूनि प्रतिष्ठेचें बंड । बोल बोलती प्रचंड । आशा वाढविती वितंड । तेव्हांच त्याचें काळें तोंड । ऐसें काळतोंडे उदंड । जगीं फिरताती ॥ २१ ॥ ऐसी आम्हां डौरकाराची मती । काळमुखें जगीं भीक मागती । त्याच्या डौराची नादस्थिती । ऐका तुम्हांप्रती सांगेन ॥ २२ ॥ डौरनाद चुडमुख चुडमुख चुडमुख । दुकमुक दुकमुक दुकमुक । कुसकुस कुसकुस कुसकुस । तळमळ तळमळ तळमळ । खटपट खटपट खटपट । बुडबुड बुडबुड बुडबुड । खळबळ खळबळ खळबळ । फुसफुस फुसफुस फुसफुस । पटपट पटपट पटपट । भुंगभुंग भुंगभुंग भुंगभुंग । ऐशा नादाच्या कोटी । मग शंखनादें डौर उठी । हे नादाची मूळ गोष्टी । आतां वेदांत परिपाठीं । सादर परिसा ॥२३॥ झालीयां वेदांत व्युत्पत्ती । अवश्य व्हावी ब्रह्मप्राप्ती । तेथेंहि गुणदोष उठती । ज्ञानगर्वेस्थिती । नागवी नाचे ॥ २४ ॥ वाचूनिया वेदांत । पुढीलांसी म्हणती धादांत । आपण स्वयें अदत । गुणदोष पाहात सर्वांचे ॥ २५ ॥ पंडित पंडित देखोनि दिठी । क्रोधें गुरगुर पोटीं । करिती वरिवरि बोलती गोड गोष्टी । क्षुद्र दृष्टी ठेवुनी ॥ २६ ॥ वाग्वाद बांधोनिया गांठी । पक्षावलंबन करिती हाटीं । ज्ञान विकिती पोटा साठीं । ऐशीं वेदांत्याची गोष्टी । पंडित परिपाठीं । अन्योन्मुख जाली ॥ २७ ॥ आतां सिद्धांत परिपाठीं । ज्योतिषी सांगे जे जे गोष्टी । सांच दिसे परी ते खोटी । मिथ्या चाउटी ते ऐका ॥ २८ ॥ रवी सोम प्रती । मासांच्या अंतीं । मंगळ साम्य समत्वा येती । सूर्याआड चंद्राची गती । जाण निश्चिती दिनद्वय ॥२९॥ तें अमावस्येचे दिवशीं । जीवे जीता चंद्रासी । नष्टत्व स्थापिती ज्योतिषी । तें या लोकांसी सत्य माने ॥३०॥ दृष्टी चंद्रासी नवाळी बहू । नष्टचंद्रासी म्हणती कुहू । ऐसे मिथ्या बोलती बहू । करिती हा हा हु हु सिद्धांत वक्ते ॥३१॥ अष्टदे खावया नाहीं ज्यासी । ज्योतिषी सांगे ग्रहगती त्यासी । तेंचि राशीच्या नांदत्यासी । म्हणती नवग्रह तुम्हांसी । सुप्रसन्न सदा ॥३२॥ ज्याची देखती अवदशा । त्यासी म्हणती क्रूर ग्रहदशा । जेथें देखती लक्ष्मीविलासा । तेथें जन्म ग्रहदशा उंच म्हणती ॥ ३३ ॥ एवं वेदांत सिद्धांताचिया गती । मिथ्या वचन सत्य म्हणती । तेणेंचि सभेमाजीं श्लाध्यती । जीविका वृत्ती लक्षुनी ॥३४॥ एवं धादांत वेदांत सिद्धांत । तिहींचा दाविला मथितार्थ । आतां माझें बोलणें भोगांत । तें तंव या लोकांत रुचेना ॥३५॥ तरी कांहीं बोलें चावटी । ते ऐका सादर गोष्टी । सभा देखोनियां मोठी । जो तो उठी बोलावया ॥ ३६ ॥ परी मज भोगांताच्या वाईका । तुम्ही सादर होउनी आइका । धरुनी आपुलाला आवांका । निजात्मसुखा लागुनी ॥ ३७ ॥ ये खेपे आलें धरा गा ये राय हो । आले धराल तरी ढवळा धरा । ढवळा धराल तरी मासा धरा । मासा धराल तरी बांदी धरा । बांदी धराल तरी जातें धरा । जातें धरायाकारणें मेंढा धरा । मेंढा धरायाकारणें बेटकुळी धरा । हीं अवघीं धरायाकारणें । अवश्य धरावें ग्रहण । ग्रहण धराल तरी जीवेंभावें धरा । तेणेंचि ग्रहणें अर्धोदय करा । अगा सज्जन जन हो ॥ आतां आलें म्हणजे काय । मळी यावें आलें तें आलें धरावें । कीं नाणें आलें तें आलें धरावें । कीं केणें आलें तें आलें धरावें । कोणतें आलें धरावें । म्हणाल तरी सावधान ऐका गा ये बोधानिधि उदार चक्रवर्ती हो । मळियाचें आलें तें आलें नव्हे । केणें आलें तें आलें नव्हे । नाणें आलें तें आलें आलें नव्हे । तरी मनुष्यदेहीं जें आयुष्य आलें तें आलें । तें आलें आलें धरा गाये सज्ञान ज्ञाते हो । हें आलें धरितां । अलभ्य लाभ ये हातां । सुरनर वंदिती माथां । तीर्थातीर्थ मार्गी येती ॥ ३८ ॥ ऐसें हें आलें आलियावरी । घालूनि प्रपंच शिळेवरी । विषय चिंतेची मीठमोहरी । ठेंचा करी भलताची ॥ ३९ ॥ परी आल्याची एकी फोडी तरी । कोणी नेदी परमार्थावरी । यापरी आलें घरोघरीं । नरनारी नासिती ॥४०॥ डुग डुग । त्या आल्याच्या सात कातळी । उरल्या होत्या परिक्षिती जवळीं । त्या अर्पुनी परमार्थ मेळीं । सुखाच्या सुखकल्लोळीं सुखरूप जाला ॥ ४१ ॥ आपण मीनला सुखकल्लोळीं । जग निवविलें सुखसमेळीं । श्रीभागवताची पोहे घातली । हे ख्याती केली परिक्षितीनें ॥ ४२ ॥ खटवांगें आलें धरिलें । देउनी जन्मसार्थक केलें । जन्ममरणाचे ठाव पुसिले । निजरूपें केलें निजांगें ॥ ४३ ॥ हें दुर्लभ आलें आलिया घरा ।

जे घालिती देहममतेचा मातेरा। ठेवा करिती विषयद्वारां। त्याच्या जन्ममरण वेरझारा न सरती ॥ ४४॥ म्हणाल आलें धरावें कैसे रीती। तरी वैराग्य विवेकें घ्यावें हातीं। सदा भगद्भाव सर्वांभूतीं। एका जनार्दन धरितां चित्तीं। निज निश्चिती आले लाभे ॥४५॥ आलें धरिलें आतां ढवळा धरा गा ये सज्ञान ज्ञाते हो। ढवळा धरा जवळा। धरितां मार्ग प्रांजळा। धरितां ढवळ्याच्या कळा। आम्हीं कळिकाळा नागवों ॥ ४६॥ ज्या ढवळ्यावरी आलें चाले। ज्या ढवळ्यावरी आलें मोलावलें। ज्या ढवळेनि आलें सरतें झालें। तो ढवळा भावबळें जीवेंसीं धरा ॥४७॥ तरी ढवळा धरूं काय कापूस। कीं ढवळा धरूं राजहंस। कीं ढवळा धरूं पारिजाची खोट। कीं ढवळा धरूं काश्मिरीचा स्फटिक घट। कीं ढवळा कोण तो म्हणशील तरी। स्पष्ट सांगेन ऐका गा ये सज्ञान हो ज्ञाते। तरी ढवळा नव्हे रू कापूस। ढवळा नव्हे तो राजहंस। ढवळा नव्हे पारिजाचा खोट। ढवळा नव्हे काश्मिरीचा स्फटिक घट। तरी ढवळा जो निजधर्म चोखट। तिहीं लोकीं। निजधर्म जो सोज्वळा। त्यासीच बोलिजे शुद्ध ढवळा। जो भागवतीं वाखाणिला। स्वयें रक्षिला परीक्षितीनें ॥ ४८ ॥ एक ढवळा धरिला खोटा। एक ढवळा धरिती उफराटा। एक ढवळा धरिती अव्हांटा। ऐशा ढवळ्याच्या चेष्टा न कराव्या हो राया ॥ ४९॥ खोटा उफराटा आडवाटा। एक ढवळा धरिती पोटा। हे बोलिल्या खटपटा। सांगेन स्पष्ट सावधान ऐका॥ ५० ॥ कासीचा पोहा लुटिती। सत्त्विका ते नागविती। तेणें द्रव्य धर्म मिरविती। खोटा धर्म धरिती या नांव राया ॥ ५१॥ मारुनी धर्माच्या वाटा। लुटून दिन चोहटा। वाढविती धर्माचा फांटा। तो जाण खोटा धर्म राया ॥ ५२॥ यापरी धर्म खोटा। आतां ऐक धर्म उफराटा। धर्मचि लागे राया अधर्म वाटा। तेही निष्ठा अवधारी ॥५३॥ कन्याविक्रयें द्रव्य संचिती। गोविक्रय द्रव्य आर्जिती। हयविक्रयें द्रव्य जोडिती। तें धन निश्चिती अधर्म ॥ ५४॥ जेणें अधर्म धरूनि ताठा। मिरविती धर्माच्या खटपटा। या नांव धर्म उफराटा। तो धर्म लावी वाटा अधर्माचिया ॥ ५५॥ संन्यासी द्रव्य आर्जिती। तेणें द्रव्य धर्म करिती। देते घेते नरका जाती। तो धर्म निश्चिती अधर्म होय ॥ ५६॥ विवाह मुंजिका यज्ञ करिती। द्विजा धाराद ते द्रव्य संकाल्पिती। ते मागतां न देती। द्विजा निर्भांच्छिती धन मान दर्पे ॥५७॥ या परी धर्मनिष्ठा। करोनि धर्म करिती उफराटा। तो धर्म पडे आव्हांटा। त्याही चेष्टा अवधारा ॥ ५८॥ लौकिक वाढवावया महिमान। तुळा पुरुषें करिती दान। देहोविष्टा मूत्रावें परिपूर्ण। धन त्यासमान जोखिती ॥ ५९ ॥ यापरी धर्मरूप धनाचें जिणें। जोखुन विष्टा मूत्रप्राय करणें। परी परमार्थाकारणें। कवडी देणें न संभवे ॥ ६०॥ केवळ मिरवावया प्रतिष्ठा। धर्म मिरविती अनेक चेष्टा। तो धर्म बांधे वाचेचा चोहटा। यापरी आव्हांटा घालिती धर्म ॥ ६१ ॥ काम्य बळ धर्म करिती। जप करवूनि द्विजां मजुरी देती। तेही पुरती न देती। यापरी धर्मस्थिती। अव्हांटा सुती निजलाभे ॥६२॥ मातापित्याचें श्राद्धदिनीं। दक्षणा नांवें घालिती पाणी। मग मागतां नेदिती ब्राह्मणी। ते धर्माची निशाणीं अधर्मीं लागे ॥ ६३॥ खोटा आणि उफराटा। धर्म सांगितला आव्हांटा। जेणें धर्म वेंचे पोटा। तेही चेष्टा अवधारी राया ॥ ६४॥ आचाट मांडूनि धर्मस्थिति। तद्वारां द्रव्य उपार्जिती। सेखीं धर्मासी आंगोठा दाविती। द्रव्य वेंचिती उदरार्थ ॥ ६५॥ श्रीमंत यजमान आले देखती। तेव्हां अग्निहोत्रादी धूम्र काढिती। तेच काळीं अग्नि लाविती। येऱ्हवीं नांदती उंदीर तेथें ॥ ६६ ॥ यजमान पाठिमोरा जाल्या देख। मागें अग्निहोत्राची होय राख। यापरी सज्ञान लोक। उदरार्थ देख दाविती धर्म ॥ ६७॥ काशीयात्रेलागीं सबळ। नानापरी द्रव्य मेळविती पुष्कळ। तीर्थी लक्ष होय रुद्रांचें फळ। घेऊनियां फळ आर्जिती धन ॥ ६८ ॥ एवं उभय दोषी धन आर्जिती। तेही यजमाना देशवृद्धी देती। ऐसा पोटालागीं धर्म धरिती। जाण गा निश्चितीं सज्ञान हो ॥६९॥ ऐसी ऐसी धर्मचेष्टा। तो धर्म भरला सन्निपात फांटा। शुद्ध धर्माची जे निष्ठा। ते कदा निष्ठा उपजों नेदी॥ ७०॥ शुद्ध धर्म जो सोज्वळ। त्यातें श्रीभागवत म्हणे ढवळ। तो चतुष्पाद धरावा सकळ। या नांव प्रांजळ परमधर्म ॥ ७१ ॥ यांसी प्रथम पाद तें धन। द्वितीय पाद तें वचन। तृतीय पाद तें कायिक जाण। मानसिक संपूर्ण तो चतुष्पाद ॥ ७२ ॥ मानसीक धर्मापुढें। धन वचन काय बापुडें। मानसीक धर्माचें बळ गाढें। तोडी रोकडें भवबंधा ॥ ७३॥ मानसीक धर्मस्थिती। होय ब्रह्मज्ञानाची प्राप्ती। बाऱ्ही

मुक्ति पायां लागती । ऐसी धर्मस्थिति अगाध ॥७४॥ मानसीक धर्माची कोण स्थिती । जे भगवद्भाव सर्वांभूती । याहीवरुनी धर्माची गती । जाण निश्चिती असेना ॥ ७५ ॥ एका जनार्दनीं म्हणे । जनीं जनार्दन मनीं पाहणें । हेचि सकळ धर्मांचे निज जिणें । संसाराचें धरणें समूळ उठी ॥७६॥ आलें धरिलें । ढवळा धरिला । आतां मासा धरा गा । ये सज्ञान ज्ञाते हो । तरी मासा कोणता धरावा । काय जळींचा मासा तो मासा धरावा । कीं सोन्याचा मासा तो मासा धरावा । कीं रूप्याचा मासा तो मासा धरावा। दिवसाचा कीं मासा तो मासा धरावा । कोणता मासा धरावा म्हणाल तरी सावधान ऐका। जळींचा मासा तो मासा नव्हे । सोन्याचा मासा तो मासा नव्हे। रुप्याचा मासा तो मासा नव्हे । दिवसाचा मासा तो मासा नव्हे । जो अतिशय वळवळ । अत्यंत जो चपळ । धरितां न धरवे निश्चळ । तो मनोमासा केवळ । धरूनि राखा ॥ ७७ ॥ चतुर्भुजाच्या गळीं । कां हरिभक्तांच्या जळीं । भगवद्भाव करतळीं । विवेक महाबळी । मनोमासा धरिती ॥७८॥ हा मनोमासा धरिल्या पाठीं । धरा वैकुंठ स्वयें ये भेटी । अर्धोदयें कपिलाषष्ठी । चरणांगुष्ठी पावन ॥७९॥ मनोमासा लागल्या हातीं । जीवाशी वरी ब्रह्मप्राप्ती । एका जनार्दन धरितां चित्तीं । चारी मुक्ती वोळंगण्या ॥८०॥ आलें धरिलें । ढवळा धरिला । मासा धरिला । आतां बांदी धरा गा ये सज्ञान ज्ञाते हो । तरी बांदी कोणती धरावी म्हणाल । तरी सावध ऐका । काय तुरकाची बांदी धरावी । कीं रेशमाची बांदी धरावी । कीं पैवाची बांदी धरावी । की कडब्याची बांदी धरावी । कोणते बांदी धरावी म्हणाल तरी सावध ऐका । तरी तुरकाची बांदी ते बांदी नव्हे । रेशमाची बांदी ते बांदी नव्हे । पैवाची बांदी ते बांदी नव्हे । कडब्याची बांदी ते बांदी नव्हे । जे ज्यासी त्यास हात नेदी । ते धरा इच्छा बांदी । कामक्रोधलोभ संधी । तिघे त्रिशुद्धी लागलें धगड ॥ ८१ ॥ घरीं क्षणभरी न राहे । मना आलें त्या सवेंचि जाये । न खाये ते हटीची खाये । न रिघावें तेथें राहे । बळेंचि रिघोनी ॥ ८२ ॥ तरी इसी नैराश्येची घाली बेडी । आणि बोधाचे चाबुक वरी झोडी । निरपेक्षेनें दांत पाडी । तैंच पहिली खोडी सांडील ॥ ८३ ॥ मग ते इच्छा नैराश्यें उठी । परमानंदीं पाडी मिठी । एका जनार्दनाचे भेटी । ब्रह्मानंद सृष्टि हेलावे ॥ ८४ ॥ आलें धरिलें । ढवळा धरिला । मासा धरिला । बांदी धरिली । आतां जातें धरा गा ये सज्ञान ज्ञाते हो । जातें धरावें तें कोण । काय दाळितें जातें तें जातें धरावें । कीं दिनमान जातें तें जातें धरावें । कीं आभाळ जातें तें जातें धरावें । जातें धरावें तें कोण म्हणाल तरी ऐका गा राये हो । तरी दळितें जातें तें जातें नोहे । दिनमान जातें तें जातें नोहे । आभाळ जातें तें जातें नोहे । तरी मनुष्यदेहें आयुष्य जातें । तें जातें धरा गा सज्ञान ज्ञाते हो । या मनुष्यदेहाची एक घडी । न मिळे वेंचितां लक्ष कोडी । ते नासिती प्रपंचाचिये वोढी । ते जोडिली जोडी महामूर्खत्वें ॥ ८५ ॥ मनुष्यदेहें राखावा कैशा रीती । तरी सदा भगवद्भाव सर्वांभूतीं । तेणें तात्काळ ब्रह्मप्राप्ती । नाशे कल्पांती दिसेना ॥ ८६ ॥ एका जनार्दन म्हणे । मनुष्य देहाचेनि अनुसंधानें । ब्रह्म परिपूर्ण स्वयें होणें । जीणें मरणें त्या नाहीं ॥ ८७ ॥ आलें धरिलें । ढवळा धरिला । मासा धरिला । बांदी धरिली । जातें धरिलें । आतां मेंढा धरा गा ये सज्ञान ज्ञाते हो । मेंढा धरावा तो काय । शेळीचा मेंढा धरावा । कीं मेंढीचा मेंढा धरावा । कीं पाळिता मेंढा धरावा । कोणता मेंढा धरावा म्हणाल तरी सावधान ऐका । तरी शेळीचा मेंढा तो मेंढा नव्हे । मेंढीचा मेंढा तो मेंढा नव्हे । पाळिता मेंढा तो मेंढा नव्हे । तरी वोटीचा मेंढा तो मेंढा धरा गा सज्ञान ज्ञाते हो । जो काळ रात्रीचा एडका । शिंगेंवीण बोडका । आंधारीं हाणे थडका । तो एडका दृढ धरा ॥ ८८ ॥ धराल तरी मुंडी मुरगळून धरा । अहर्निशीं जतन करा । तेणें वैकुंठीचें राज्य येईल घरा । एका जनार्दनीं निर्धारा । सुरनरीं वंद्य तो होय ॥ ८९ ॥ आलें धरलें । ढवळा धरिला । मासा धरिला । बांदी धरिली । जातें धरिलें । मेंढा धरिला । आतां बेटकुळी धरा गा सज्ञान ज्ञाते हो । बेटकुळी धरावी ते कोण । काय नदीची बेटकुळी धरावी । कीं तळ्यांची बेटकुळी धरावी । कीं आडाची बेटकुळी धरावी । कोणती बेटकुळी धरावी । म्हणाल तरी सावधान ऐका । तरी नदीची बेटकुळी ती बेटकुळी नव्हे । तळ्याची बेटकुळी ती बेटकुळी नव्हे । आडाची बेटकुळी ती बेटकुळी नव्हे । तरी सेजेची बेटकुळी धरा । धराल तरी वेगळीच धरा । तिच्या पुटपुटेच्या झणत्कारा ।

भाळाल क्षणीं ॥ ९० ॥ ते बेटकुळी वेगळी धरितां । चारी मुक्ति येती हातां । एका जनार्दन धरितां । ब्रह्म सायुज्यता घर रिघे ॥ ९१ ॥ आलें धरिलें । ढवळा धरिला । मासा धरिला । बांदी धरिली । जातें धरिलें । मेंढा धरिला । बेटकुळी धरिली । आतां ग्रहण धरा गा ये अज्ञान ज्ञाते हो । तरी ग्रहण धरावें कोण । रवी ग्रहण कीं चंद्रग्रहण । अथवा धरावें ग्रहणीं ग्रहण । ग्रहण लक्षण तें कैसें । या तीहीं ग्रहणांहूनि भिन्न । धरी तें ग्रहण आहे आन । ग्रहणीं ग्रहण तें निंद्य पूर्ण । रवी चंद्र ग्रहण तें मिथ्या ॥ ९२ ॥ साठीं सहस्र राहूची सीमा । लक्ष भानु दोनी लक्ष चंद्रमा । तें मंडळ साम्य येती समा । ते राहू रवि सोमा स्पर्श नाहीं ॥ ९३ ॥ ज्योतिषी सांगे ग्रहण गोष्टी । ते गोष्टी समूळ खोटी । पर्व ग्रास देखिजे दृष्टी । तें चाली उफराटी लक्षवेना ॥ ९४ ॥ रवी राहुसी नाहीं भेटी । त्याच्या सर्व ग्रासाच्या शेवटीं । जोतिष्य सांगे मुख सपाटीं । तेणेंचि बोंब उठी जगामाजीं ॥ ९५ ॥ राहूची शाम प्रतीमा । ते कदा न दिसे माजी व्योमा । त्यासी प्रकाशी रवि चंद्रमा । विपरीत प्रेमा तेणें केला ॥ ९६ ॥ राहू गिळीता जैं सूर्यासी । तैं सूर्य जाळितां त्याच्या मुखासी । सूर्यें प्रकाशिलें राहुसी । म्हणोनी जगासी तो दिसे ॥ ९७ ॥ रवी चंद्रे प्रकाशिती राहुसी । तेणें गिळिलें म्हणती त्यासी । विपरीत सांगे ज्योतिष्य । तें या लोकांसी सत्य माने ॥ ९८ ॥ यापरी गा रवि-चंद्रग्रहण । विपरीतार्थे मिथ्या पूर्ण । तैसेंचि गा ग्रहणीं ग्रहण । त्याज्य जाण निंद्यत्वें ॥ ९९ ॥ आस्थी मांस रुधीर चर्म । विष्ठा मूत्र पूर्ण काम । स्त्री पाहतां निंद्य धर्म । परम अधर्म ग्रहणीं ग्रहण ॥ १०० ॥ रवी चंद्र ग्रहणीं मुक्त स्नान । करितां देख सकळ जन । ग्रहणीं ग्रहणें मुक्त स्नान । सहसा सज्ञान । न शकती करूं ॥ १ ॥ ग्रहणीं ग्रहणापासूनि सुटला । ऐसा न देखें दादुला । जो तो सर्वग्रासें मिळिला । जन नागवला ग्रहणीं ग्रहणें ॥ २ ॥ एवं ग्रहण त्रैलक्षण । तुज म्यां सांगितलें संपूर्ण । गुरुआज्ञा तें मुख्य ग्रहण । सर्वीं जाण धरावें ॥ ३ ॥ एका ग्रहण स्पर्श होय । एकाचें तें आंगोळ द्वय । एकाचें तें अंगुळ चतुष्टय । एकाचें पाहे पादमात्र ॥ ४ ॥ एकाचें तें अर्ध ग्रहण । एकाचें तें केवळ त्रिकोण । एकाचें तें बिंब पूर्ण । एकाचें जाण खग्रास ॥ ५ ॥ बिंब ग्रासुनी खग्रास केला । तोचि कर्माकर्मापासुनी सुटला । त्याचा भवपाश तुटला । पूर्ण विनटला गुरु-ग्रहणीं ॥ ६ ॥ गुरुग्रहणीं जो पूर्ण विनटला । तोचि ग्रहणीं ग्रहणापासून सुटला । तोचि काळाचे हातींहूनि निष्टला । तेणेंचि ग्रासिला कळिकाळ ॥ ७ ॥ गुरु-ग्रहणीं ज्याचा खग्रास झाला । तोचि ज्ञेय ज्ञाता वांचूनि विनटला । अहमात्मा गिळुनी ठेला । आंगें जाहला परब्रह्म ॥ ८ ॥ एका जनार्दन म्हणे । या परी गा गुरुग्रहणें । स्वयें आंगे परब्रह्म होणें । खत फाडणें विषयाचें ॥ ९ ॥ यापरी गुरुग्रहणीं जो खरा । तेणें अकार उकार मकारा । निरसुनी प्रणवाच्या विकारा । अर्ध मात्रा धरावी ॥ १० ॥ अर्धमात्रा अर्धोदयो । तेथें नाहीं उत्पत्तिस्थितीचा प्रलयो । ब्रह्मीं ब्रह्मत्वाचा लयो । पूर्ण अन्वयो अर्धोदयाचा ॥ ११ ॥ आइका अर्धोद-याची कथा । प्रपंच एक जाहला होता । हे समूळ मिथ्या वार्ता । पुढें होईल मागुता । हें कदा कल्पांती घडेना ॥ १२ ॥ अर्धोदयो अर्ध मात्रा । हा पुण्यकाळ परम पवित्रा । एका जनार्दनीं पूर्ण यात्रा । चिदचि-न्मात्रा प्रबोध ॥ १३ ॥ डेरा पाहिला गा ये राय हो । अंबेचे रंगणीं डेरा पाहिला । तरी त्या डेरियाची कथा । सावध ऐका आतां । जे पाहणें पाहते पाहतां । या तिही ते तत्वता पाहों जाणें ॥ १४ ॥ जे अनादि निजशक्ती मोहिनी । महामाया माय राणी । डेरा मांडिला तिचे रंगणीं । अती विचक्षणी ममाभिमानी ॥ १५ ॥ कर्ण कुमाराच्या हातीं । डेरिया आणिली आट वोली माती । संकल्प कुलाळाचे हातीं । डेरा अती निगुती । गुणाचा केला ॥ १६ ॥ कुंडीं घातला वैश्वदेवो । बुडीं कर्म काष्टें लाविती पाहावो । बुद्धीसी ठेउनीं ब्रह्मदेवो । डेरा निर्वाहो मांडिला ॥ १७ ॥ संकल्प विकल्पीं घातला चंद्र । ग्रहणीं घातलासी इंद्र । पळसासवें लाविला उपेंद्र । सर्वाभिमानी बैस-विला ॥ १८ ॥ वरुण ठेविला रस उत्पत्ती । प्रजा उत्पत्ती प्रजापती । यम ठेविला अधोगती । नरको-त्पती गुदद्वारीं ॥ १९ ॥ अश्विनीदेवें सोडिली घानी । ते येउनी बैसले घ्राणीं । डेरिया स्पर्शाचा स्पर्श मनीं । ते काया वारेनी धरिलीसे ॥ २० ॥ अन्नपानाचा पचनीं । जठरीं ठेविला जठराग्नी । प्राणापान भाते दोन्ही । फुंकिती अनुदिनीं अहोरात्र ॥ २१ ॥ पंचभूतांचे चोहटा । चारी भूतग्राम येती हाटा । जन्ममरणाचिया पेठा । वसती उद्भटा कर्माकर्में ॥ २२ ॥ रोम सुमनांचिया माळा । शोभती डेरियाच्या गळा । तिही अवस्था

सोहळा । वेळोवेळीं भोगिती ॥ २३ ॥ चहुं पुरुषार्थाचे शेले । चहुं मुक्तीचे ध्वज उफारिले । हरिभक्तीचे फरश बांधिले । डेरा तारूं लागले रामनामाचे ॥ २४ ॥ अनुहात डौराचा नाद । तेथें वेदांचे वेदानुवाद । सिद्धांत बोध त्याचे शब्द । डेरा प्रसिद्ध अवतरला ॥ २५ ॥ या डेरिया बाहेर जो निघाला । तोचि दादुल्याचा दादुला । डेरिया आत जो अडकला । तो तो गेला अधःपाता ॥ २६ ॥ जो रामनामाचें तारूं धरी । तो रिघे डेरिया बाहेरी । जो पडे निंदेच्या घरामाझारीं । तो आघोरीं पचिजेत ॥ २७ ॥ एका जनार्दन म्हणे । ऐसीं डेरियाचीं लक्षणें । डौरकार जालों या कारणें । डौर वाहुनी सांगणें निजहितार्थे ॥

## हिंदु-तुर्क-संवाद.

३९७० प्राती एक भजनविरुद्ध । दोहींचा संवाद परिसावा ॥ १ ॥ हिंदुकु तुरक कहे काफर । तो म्हणे विटाळ होईल परता सर । दोन्हींशीं लागली करकर । विवाद थोर मांडला ॥ २ ॥ सुनरे बम्हन मेरी बात । तेरा शास्तर सबकु फरात । खुदाकु कहते पाऊ हात । ऐसी जात नवाजे ॥ ३ ॥ ऐक तुर्का परम मूर्खा । सर्वाभूतीं देवो देखा । हा सिद्ध सांडूनि आवांका । शून्यवादका झालासी ॥ ४ ॥ सुनरे बम्हन पानखुडे । बडक्या मारे पान कुकडे । तुम्हारा शास्त्र जो कोई पढे । वो बडे नादान ॥ ५ ॥ कमाखलोको शास्त्र चलाया । खुदाकु कहते भीक मंगणे गया । बलीनें पकड द्वारपाल कीया । लोक भुलाया हिकाकतसे ॥ ६ ॥ तुम्हारा शास्त्र सबही ढिला । अल्लापर लेते हिल्ला । क्या भारुवलविल्ला । कम अकलोके ये बात ॥ ७ ॥ तुमची किताब तुम्हासी नाठवे । सुलखनमोमीन पढा देवे । प्रथम अबदुल्ला अल्ला हुवे । तो म्हणे भीक भिस्तके मेवे । ही भीक तुमचीया देवें उपदेशीली ॥ ८ ॥ फकर अबजुल्ला खुदाकु भावे । भीक देता लेता भिस्तकु जावे । भिक्षा पावन परप्रभवे । हे दीक्षा देवें दाविली ॥ ९ ॥ फकीर साक्ष बोलतो । फकर फजतारी खुदानें नवजा हे । फकर अकरीब खुदाकूं । फकर भावता खुदाकूं । फकरन्या खुदाकूं । फकर लाहिला खुदाकूं । फकर अल्ले खुदाकूं । फकर लोडे खुदाकूं ॥ १० ॥ बय तत्त्व कलिहा । जीयादार हाजरत । गाजाया दरगाज । मोकी दरभिस्तरल्फ । गाफील दरदोकुं जा । अल्ला येर खालीकी । गाफील दरदोगखी । फकीर मागतो भीक । अल्ला दोश नेला । अल्ला वलकलतातील तूं अल्ला । हार सीर मौजूद तूं अल्ला । खालीफ तूं अल्ला । नजर नाजीर तूं अल्ला । आकील आकिला तूं अल्ला । जीव जीवा तूं अल्ला । पोट भरावया भीक तूं अल्ला । दोष नेला । आणा तूपरोटी कानवला । अल्ला दुधभात दे मला । अल्ला मांडे पुरी घारी दे मला । अल्ला वडेवडुचे दे मला । अल्ला क्षीर साखर दे मला । ब्राह्मण श्लोक बोलतो । भिक्षा हारी निराहारो भिक्षानैव प्रतिग्रहः । असंतुष्टः सदा पापी संतोषी सोमपः स्मृतः । बळी खुदाचा खासा बंदा । त्याच्या भुलला भक्तिवादा । त्यापाशीं देव तिष्ठे सदा । तुम्ही कां निंदा करितसां ॥ ११ ॥ तुम्हारा ब्रह्मा बेटी चोद । वो पढे सब झुटे वेद । तुम्हारा शास्त्र वेद । ब्रह्म नाद लतीफ ॥ १२ ॥ झुटे लतिफें कैंव कैंव चलाये । खुदाकी औरत चोर लेयगे । उसे बांदरे मदत हुवे । ओ शास्त्र पढ पढ मुवे । गफलत खाय गुमार हो ॥ १३ ॥ जीस म्हणा बीबी आई । सोबन करा तीयो ठायीं । तुरकाची निष्ठाई पाही । ब्राह्मणाच्या ठायीं निंदिती ॥ १४ ॥ बाबा आदम माया हुवा जोडा । हे किताब तुम्ही पढा । आपुलें शास्त्र नेणा घडफुडा । आम्हासी झगडा कां करितां ॥ १५ ॥ बाबा अदम माया हवा जाली । त्यापासुनी दुनियां अदमी झाली । आदम नामें सांगा आपुली । बोलतां भुली तुमची तुम्हां ॥ १६ ॥ बाबा आदम माया हवा जाहली । ती म्हणतां तुम्ही सैतानें नेली । सीता रावणें चोरिली । ते का बोली उपहासा ॥ १७ ॥ तेव्हां फिरस्ते बैठे केले । जबराईल । ईजराईल । मनकाईल । नसकाईल । मितकाईल । फत्ते माया हवा घेउनी आले । रामे जुत्पती बोलविलें । सीताशुद्धी करावया ॥ १८ ॥ सुनरे बम्हन अकल गघडे । जबा दराजी जबा जोडे । तुम्हारा शास्त्र जो कोई पढे । ओ बडे गाफील ॥ १९ ॥ गाफिलो खुदा बंदखानो लाया । उसे कंसासूर मारणें आया । देवकीनें खुदा छुपाया । ओ शास्त्र भुलाया नादान ॥ २० ॥ छपे छपे बंद खुलास किया । इन्ने बातापर बोध लाया । खुदाकू कहे जेहेर पिलाया । या हिला या सालीम ॥ २१ ॥ आपने मुसे आप फजित होते । खुदाकू कहतें गोरुरखते । वो बाता सुन सुन रोते । खुदाकू कहते ढोरकी ॥ २२ ॥ काफरनें अक्कल छोडी । खुदाकी बढाई साली तोडी । क्या मारूंका थपडी । जबा जोडीभी करतां ॥ २३ ॥ तुमचे मुसाफ पहा बोलो कांहीं । खुदा मौजूद सर्वाठायीं । तो काय बंदखानीं नाहीं । हा

विरोध वाचा तुम्ही माना ॥ २४ ॥ जहां मनकी बढाई । तहां खुदा एकलासा नाहीं । गैबमो खुदा छपा भाई । हे फारसी पाही तुम्ही पढा ॥ २५ ॥ दील खुदाकु मुष्किल घरे । तो दिलम्यानें खुदा भरे । बंदका बंद खुलास करे । हे हादी पैगंबर बोले जे ॥ २६ ॥ आवलीया । आवलीया शहामोदीन आली । अपरसून बोली । गाय गज बांदरे । समस्त रक्षिजे परमेश्वरें । ही तुमचींये किताबे उत्तरें । तुम्ही त्या कारे मानाना ॥२७॥ कुत्ता कबूवा चुवडे चिचडे । वोही रक्षनें खुदाकडे । आपुलें शास्त्र नेणा धडफुडे । आम्हासी झगडे कां करितां ॥२८॥ तूं रहे रहे बह्मन जोकांडी । तूं क्या क्या हा हीकात मांडी । बंदगी करना सालीम लंडी । सीर दाढी मुंडी खुदानें ॥ २९ ॥ तुम्ही हिन्दु अस्सल बुरे । फत्तरके पुतले पूज करे । उसका नाम खुदा घरे । एक तारी करे उस जगा ॥ ३० ॥ उसके हुनूर पुराना पडे । औरत मर्द सब खडे । उसके आगे लिडीलिडी पडे । नव्हे बडे नादान ॥ ३१ ॥ जीस फत्तरपर शेंदूर चढे । उसके आगे औरता खडे । निंब पहेरनमें नंगे खडे । मागें पोंगडें उनके पास ॥ ३२ ॥ तुम्हारा वेद सबहि ढिला । तमाम बैता नामाकूला । पनर बंदगी करो गलबला । खुदा गाफील गफलती ॥ ३३ ॥ जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणी देव । हा तुमचे किताबाचा मुख्य भाव । तुमचें तुम्हांसी न कळे पहा हो । पूर्ण अभाव तुर्कांचा ॥ ३४ ॥ थिजलें विघुरलें तूप एक । तैसें सगुण निर्गुण एकत्र देख । तुम्ही प्रतिमेचा करितां द्वेष । परम मूर्ख अविवेकी ॥ ३५ ॥ जी जी नेत करी बंदा । ती ती पूर्ण करी खुदा । तुमचे किताबाची बाधा । तुमचे बोधा कां नये ॥ ३६ ॥ तुमचा अभाव तुम्हांसी प्रगट केला । जवळील खुदा दूर बोभाइला । एकबार अल्ला एकबार अल्ला । बाकी हैराण झाला । नाहीं भेटला अद्यापी ॥३७॥ दुरिलासी हांक मोठी । जवळिलासी कानगोष्टी । तुम्हांसी निकट झाली भेटी । ओरडोनि उठी मुख्य मुलांना ॥ ३८ ॥ खुदा माना पश्चिमेकडे । येर अवघे कां वोस पडे । मौजूद म्हणा चहूंकडे । हेंहि धडफुडें तुम्ही नेणां ॥ ३९ ॥ पांच बखत खुदाचे झाले । बाकी बखत काय चोरी नेले । तुमचें शास्त्र तुम्ही भुलले । देवासी केलें एकदिशीं ॥ ४० ॥ आम्हासी म्हणतां पूजितां फत्तरें । तुम्ही कां मुडद्यावर ठेवितां चिरे । दगडाचे पूजितां हाजीरे । पीर खरे ते माना ॥ ४१ ॥ केवळ जे का मेलें मढें । त्यांची जतन करितां हाडें । फुल गलफ फतारियावरी चढे । ऊदसो पुढें तुम्ही जाळा ॥ ४२ ॥ गंगा न्हावो तुम सबले पाक । तो कैंच करते जुदा । जुदा सैंपाक । बीटाल बीटाल कर मारे हाक । सब नापाक दोजखी ॥४३॥ कहो सर्वाभूतीं भगवद्भावो । बोले एकजगे खाना कोन खावो । एक एकीसकू हात न लावो । जुदा जुदा ठावो अलाहिदा ॥ ४४ ॥ खाना खाते उनका दाना उसपर चढे । तो उसकी नरडी लेने दवडे । आध किया मत छोडे । दोनो रौत खडे जमातमो ॥ ४५ ॥ औरत आपकी घर खाना खावे । उसे सैंपाकमे ती बाहेर करावे । रात ज्याकर उपसपास सोवे । तब नाकहे नापाक ॥ ४६ ॥ जीसकी बेटी लवंडी लावे । उस संबंधीके घर खाना न खाये । बेटी भावे खाना न भावे । बडे किताब बह्मनके ॥४७॥ आमचा सैंपाक परम निष्ठा । त्याचा सैंपाक परम खोटा । समंधीमे समांधिष्टा । शास्त्र झुटा तुम्हारा ॥ ४८ ॥ बेटी पाक बाप नापाक । तुम्हारे शास्त्र की हुवी राख । कर्म धर्मकू पडे खाक । हीला दोजक बह्मनकू ॥ ४९ ॥ तुम्ही तुरक परम मूर्ख । नेणां सदोष निर्दोष । प्राणी प्राण्यातें देतां दुःख । भिस्तीमुख तुम्हां कैचें ॥ ५० ॥ खुदा मारितो मुरदाड देख । तुम्ही मारा ते पवित्र चोख । खुदापरीस तुम्ही झालात पाक । यवन हाल्लक दोजकी ॥ ५१ ॥ जबे करूनी तुम्ही सांडा कुकडे । फडफडीत तुम्हांपुढें । येणें तुम्हांस काय सबब जोडे । पढत वेडा मुलाना सालीम ॥ ५२ ॥ जबे केलिया भिस्त पावे बकरा । तरी तुम्ही निजाम रोजे कां करा । आपली आपण कां न करा । भिस्तीच्या घरा जावया ॥ ५३ ॥ हजार जबे करी एकला । एक उठावितां तरी मुलाणा भला । भिस्ती श्रम व्यर्थ पडला । दोष पडला प्रत्यक्ष ॥५४॥ हिंदु मुसलमान दोई । खुदानें पैदा किया भाई । तुर्ककी निष्ठा पाई । हिंदुकू पकडकर मुसलमान करो ॥ ५५ ॥ हिंदूकरितां खुदा चुकला । त्याहूनि थोर तुमच्या अकला । हिंदूस मुसलमान केला । गुन्हा लाविला देवासी ॥५६॥ जबे करणारकू परम दोख । तुरक कहे वो सच्चा देख । गुना लाया इनें एक । झगडा नाहाकी करना ॥ ५७॥ जबे करितां मुलाना बेकत बोले । कभी उठावनकु जीभ न हाले । वो

खुदा बिगर किसका न चले । बह्मन बोले वो सहि-बाता ॥५८॥ नरडी काटे भिस्ती दस्त । वो आतका मगन मस्त । आगलेकु करितां खस्त । खुद शास्त करेगा ॥५९॥ ब्राह्मण म्हणे अहो जी स्वामी । वस्तुतां एक आम्ही तुम्ही । विवाद वाढला न्याति धर्मी । आतां परब्रह्मी असेना ॥ ६० ॥ तुरुक कहे वो बात सही । खुदाकु तो ज्यात नहीं । बंदे खुदाकु नहीं जुदाई । वो कह्या रसुल्लीला हाजरत परदे ॥ ६१ ॥ सर्व धर्म ज्याचा निमाला । मनोधर्मे तुरकें ऐकिला । आनंद परम जाहला । मंत्र केला उपदेश ॥ ६२ ॥ ते वेळीं केलें नमन । येरें आदरें दिधलें आलिंगन । दोघांसि जाहलें समाधान । आनंदें संपूर्ण निवालें ॥ ६३॥ आम्ही तुम्हीं केला झगडा । तो परमार्थाचा बोध उघडा । प्रबोधावया महा मूढा । कर्म जडा उद्बोध ॥ ६४ ॥ शब्दीं मीनला शब्दार्थे । दोहींसी बाणला परमार्थ । परमार्थ मनोरथ । झाले तृप्त दोहींसी ॥ ६५ ॥ ऐक्यवाद विवाद । विवादीं जाहला अनुवाद । एका जनार्दनीं निज बोध । परमानंद दोहींसी ॥६६॥

## बाजेगारी.

३९७१ संसार बाजेगिरी देख । दुरलग आंदेशा आकर देख । जो कुच होनारा सो कदा न चुके । बल्ले वस्तादकी पदनामी । आखर जमानी । यादी निकसो बुरे हाल होवेगे । दुनयामें बडा बडा तमाशा । बडे बडे हुन्नेर लगे । विद्या अविद्या बोलना एक । बल्ले वर्तणूक अनेक । इस काममें बडे बाजी । जीस अंत न पाया ॥ १ ॥ अरे देख देख देख देख । पीर पैगंबर अवलिया । सय्यद सादात विषयाकू झटे । वासना उटे ना हाटे । अरे देख देख । दौड दौड दौड । जब लग उजाडा तब लग दौड । अंधेरा पडेगा पीछे कछुर न चले । आपसु आप बाजींदे बुरे सटदेना धंदे । हरिदासके प्यारे । रघुनाथके बंदे । कह्या न भावे फाड फाड खावे । बांदरामे रान हुवे ॥ २ ॥ तमाशा देख तो अलमसुख होवे । दील बांदरा रज्या पाले तो मुखचना बाहेर मैले । उठे उठे उठे । बैठे बैठे बैठे । लेटे लेटे लेटे । कहुं तो चुपकाची लेटे । दील बांदरा रज्या तलब बाजेगारी येही खेले । तो मेरे नामकी पुछेगी बाता । तो मेरे नाम क्या है । अजबता । अवल मुझे नामचि नथा । दरम्यान पैदा हुवा । सलखन सुखाद बैठा । वांहा मुथी उठा नाठा ॥ ३ ॥ उसथे बैठा निरखनका मार चलाया । सलेखन उस देखती सलेखन बडे महाजन । राजद्वारीं कहने लगे । सलेखनका तमाशा देख । वसले मुजेले नीलखनका तमाशा देख । ज्या हा हा हा हा । आ बा बा बा बा । आ ल ल ल ल । आ त त त त वोही है वोही है । जोर है जोर है । लढेगा लढेगा लढेगा तो पडेगा । पडेगा तो चडेगा । हुशार भाई हुशार । भीतर तो हुशार तो सुखी । बोहरी ती हुशारी तो बहु हुशारी ॥ ४ ॥ गुरू बडा क्या चेला बडा । बाप बडा क्या बेटा बडा । बुढ्ढा बडा क्या जवान बडा । तो जवान बडा । कुत्ती ककवा चिटी विडी । उदभौकु भैमाने । गुरु बडा वा चेला बडा । तो चेला पनामें पडा । गुरुकें बडाईसें चेला बडा । बाप बडा वा बेटा बडा । तो बापका माम बेटा धरे । बेटेकी चाकरी बाप करे । बापके शीरपर बेटा चढे । उस बद्दल बेटा बडेपना घडे । जवान बडा या बुढ्ढा बडा । बुढ्ढा जागे मर जाये । जवान बहुत तवाना होये । बुढ्ढा पडे जवान चढे । इसबद्दल जवान बडे पनामें पडे ॥५॥ नजर कर नजर कर नजर कर । यारी हो नजर कर । नजर करेगा सो जीतेगा । न नजर करेगा सो हरेगा । हारीया देना जीता लेना । हुशार भाई हुशार । हुशार होकार समाल । मैं कैसी चोंदी ल्यावुंगा । मैंनें भले भलेकु चोंदी दिया । मैंनें बडे बडेकु चोंदी दिया । मनें बडे बडेकु वेडाल लाया ॥ ६ ॥ देख देख देख तमाशा मेरा । मैंनें बिभांडीकुं चोंदी दिया । वो मूर्गीके चोंदने लाया । ऋषीशृंगकु चोंदी दिया । वो नाचनीका दुमाला लाया । वो पाराशरकु चोंदी दिया । वो दुर्गंधीका ख्याल लाया । एक घडीमे तप गमाया । दुर्गांधासो सुगंधा किया । उसके जगामे व्यास नीफ-जाया । वो महादेवकुंबी चोंदी दिया । वो मोहनी कां दुमाला लाया । ब्रह्माकु चोंदी दिया । वो आपने बेटीका ख्याल लाया । मना कर्ता याद न पाया । वो सरस्वतीसे हायीयाल हुवा । तुमारे विष्णूकुबी चोंदी दिया । वो वृंदाके स्मशानने लढाया । आयारे नारद । उस नारदकुबी चोंदी दिया । आंगूल करते पेट बढाया । साठ बेटेका हुकूम जनाया । वो तुम्हारा अस्सल देव । जिसे नामरूप नहीं । उस बडे देवकूबी बतलाया । वो चोंदीमें जगत्र भुलाया ॥ ७ ॥ रहे रहे रहे । चीपरीके रहे ज्या । आपने जगोमे रहे ज्या । जगा छोडकर जायगा तो जान जायेगा । तो येतां

मार मारूं। मारत मारते मारलेंड पडेगा। डांगा उपर पिछ कुटेंगा। दांत निकसकर पसरेगा। डांगा तुमारे पेटमेकु जावेगा। इसबद्दल गुमरपना दूर कर मैजदकूं याव घर। विषयाकु मुसादलम बीसर। देख देख देख लढूं नको लढूं नको। चोंदीके जगा लढूं नको। वाहाली आपडूं नको। उस जगा लेंड पडेगा तो कालका फांसा पडेगा। ओ तुझे कैंच चुप छोडेगा। इसबद्दल बिसयाकुं लढूं नको ॥ ८ ॥ हमारा दाता कुच देता नही। इसबद्दल बिसयाकुं लढत है। व्हां बडे बडे जन राजद्वार बैठे है। कुच देना सो आज दिनेका दीन है। दिल चहासो देव। कुच तबी नाम बोले। दीलकी गांठ खोले। आख बतक काम आवेगा। उस खैरात पर हात चले। चुप बैठ मुंढी हालावे। कुच काम नही। जासो दिल देवेगे। तो निज मौजक पावेगे ॥ ९ ॥ सुख शांती सुख छायेगा। भीस्तीकेती मेवे खावेगा। बड्या बड्यासी बोले बढाई। ऐसा कुच देवो ना। चिप बैठ मुंढी हालावे। कुच काम नहीं। ऐसा कुच देवो ना जो खाते पीते भरे। भरीयासो कबहु ना सरे। पोंगड्या टिंगड्याकु खाना पुरे। सबलिया जमकु बस कर। ऐसा कुच देवोना। ए क्या देवेगे बिचारे। यितला दिया भीक माग नेकु गया। उसती दौलत कही हाकाले लंडीने लिया। ईगानी पर दुगानी। दुगानी पर तिगानी। जिसके तिसके घर दुगानी। परती रुका। ए क्या देवेगे बिचारे। तो मेरा दाता कैसा है। हा सो रातसा देखना। तो हमारा कुच नहीं। भोजराजा देशका नहीं। इंद्र देशका नहीं। कुबेर देशका। इतना देवे तो पेट भरा भर लेवे। ए क्या देवेगे बिचारे ॥१०॥ तो मेरा दाता कैसा है। उनके शतकथमे। मेरा जित मेरव चलता। उन्हे थीमें राजना बाक। उसकी खेळता। उनकी मेरा जीवता। उनकूं मग नावयाबाता। काठ सक्या। नजर कर नजर कर। यारोहों नजर करों। नजर करेगा सो जीतेगा। न नजर करेगा सो हारेगा। हारीया देना जीता लेना। अद्दल एक। एक के दो। दोके तीन। तीनके पांच। पांचके पचीस। गाफल कहते दस बारा पंधरा बीस। वल्ले सही जान पाचके पचीस। डालीका साप किया। भलेभलेकु बडेबडेकु। उन्ने लायी माया। बीन लढेगा उन्ने जगत्र भुलाया ॥ ११ ॥ गाफल कहते मेरी माया। गुरुबोध ऐसा पाया। ऐसी हमारी शांती गाये। वो क्रोध बागकू खाये। अहंकार साप लढेना चढे। मुबा जैसा चीपका चीप पडे। पर परका खबुतर। खबुतरकाबी घर। ये बाता सबही दूर कर। पंख-बिना हौस किया। उडे चढे बिन सत्यलोकक गया। सनकादिककी काढी माया। मुख्य मूळ ब्रह्म हुशार किया। उन्ने हौसनें बडा तमाशा किया। ब्रह्मासनती मूंड मुंडाया आपबी व्हा छपी खाया। हुषार देखे तो नजीक छुपाया एक एकमो अनेक। अनेकमो एक। येही देखनामे हुशारीमे देख। वांहा नही देखना दुःख येही खेळे खेळे तै समाधिसुख। एका जनार्दनीं जग समस्त। इसके बाजीमे भिस्त दस्त। देखो फेरिस्तो अजब बात। पैगंबर कहे सदर आमत। येहि तमाशा सिद्ध देखे। जो देखे सो जुदा नहीं देख। एका जना-र्दनीं। बैसक बाजेगारी। पेन लहक ॥ १२ ॥

३९७२ सरगमें बाजी पतालमें बाजी। जीत देखो उत बाजी। धीम धीम चलत। थय थय नाचत। ये दील बांदरा रज्या तल बुबके चने। बार बार उठ उठ लेट लेट। कहुं तो चुपीच लेट। तै मेरा नाम क्या पूछेगा भाई। नाम कहूं तो अजप। अवल मुजे नाम नथा। दरम्यान सो पैदा हुवा। आलेखनकु बाल पलटाया। सलेखनकु मार चलाया। तुटा फाटा न्हाये। उस शेहेरमे है पैटा। व्हावी बडे बडे महाजन बेटे है। कछु देवे कछु दिलावे। आजका दीन देनेका आजका दीन लेनेका। दील जाने सो देख। सरजा-बती सो देख। मुसो नाम बोल। दष्टीकी गांठ खोल तूं ग्यानी तूं ग्यानी। उगर दुगानी तीन दमडीया। तीन कवडीया। कीस लंडोने क्या देना। कीस लंडोने लेना। मेरा साहेब तो ऐसा है। दील दरीयाव। मह-जुत भरीयाव। उभे तो मेरी मागनेकी बाट। काट काट कर छाडी है। हारा देना जीता लेना। जो आंदर सोहंसारा। जो बाहेर सोहंसारा। फिर तेरे तै चोंदी कैसी देउंगा। चोंदी कहे तो बडेबडेकु दीयी है। भले भलेकु दीयी है। तेरे पराशरकुबी चोंदी दीयी है। जो दुरगंधासो ख्याल किया है। बेद व्यास पैदा हूवा है। तेरे नारदकुबी चोंदी दियी है। पल-खम्यानें नारदकी नारदी किया है। घूसल करते पेट बढाया है। हुकूम करते साठ पोंगडे जनया है। तेरे ब्रह्मेकु चोंदी दीयी है। जो सरस्वतीसे हैयाल हुवा है। तो ब्रह्मा बेटी चोंदक हला है। तेरे विष्णूकु चोंदी दीयी है। जो वृंदाके स्मशानमे रह्या है। तेरे महादेवकुबी

चोंदी दीयी है । जो जंगलमे मोहनीके सात हैया हुवा है । तेरे बडे देवकुबी चोंदी दियी है । जो आदि औरत आधा मर्द किया है । रहे रहे रहे मुर्गीके । आपने जगाच रहे । ज्यगा छोडकर जायगा तो । मारते मारते मार खायगा । उपर जबरोयल काटेंगा । दात नीकसकर पसरेंगा टांगा । फिर क्या माके पेठ आवेगा । इस बद्दल मगरुरपरना दूर कर । महजुदसो याद धर । धरेगा तो कैसी घर । धरेगा तो जूदा न कर । परका कबुतर कीया । टालीका साप बनाया । उडा ना उड जावे । सत्यलोककुबी न जावे । सनकादिककी काढी माया । कहे एका जनार्दन भक्ति दोज्यक सही बाजेगिरी अल्ला ही अल्ला ॥ १ ॥

## गारुड.

३९७३ चल चल चल । याद करो गुरु गारुडकी । और आदि पुरुषकी । संत महंतकी । गुणी गुणवंतकी । और बडे बडे महाजनकी । बडे बडे सरदारकी ॥ १ ॥ चल चल चल । ये देखो कैसा खेल होता है । नग्न कटारी निकाली । सप्त सागर उनके सेवेकूं लगाया है । उसमे पांच मुखका नाग देखो है । नागके फणी उपर ऋषेवर बैठे है । सो उनोनें व्हां होम किया है । उसके मुखमे एक निकला त्रिभुवन । सिरपर बैठी एक एक कामिनी ॥२॥ चल चल चल । नारीके मुखमें बहोत । बनचर व्यासनेकी इगनत । चार लक्ष नऊ हजार । एक एकके मुखमें लक्ष लक्ष घोडेस्वार । हाती घोडे बहोत निकाले । गिन्नत नही लगती है ॥ ३ ॥ चल चल चल । निर्गुण पुरसें मुंगी आई । सो सब खेल खागई । वो स्वरूप देखणे आये । सो मर गये ॥ ४ ॥ चल चल चल । मुंगीके मुखमें । ब्रह्मा विष्णु महादेव बैठे है । छोडा सब ये खेल । शून्यगिरीपरसे बडा नाम है । नामबिना कुछ नही ॥ ५ ॥ चल चल चल । हांडीबाग अवल खेल कैसा पाया है । गुरूके पावके प्रतापसे याद है । अवल क्या है । उसे नाम नही नाम नही । रूप रेखा कछु नहीं ॥६॥ चल चल चल । व्हासो धूणी पैदा हुयी है । सो ठकडी नाम पाई । भले भले खूटका कर गई । स्वर्ग मृत्यु पाताळ किसिकू छोडा नही । अरे हांडीबाग । और कूच याद होगया तो बोल । अवल तो ब्रह्मनाम था ॥ ७ ॥ चल चल चल । हा तो एक । एकके दो । दो के तीन । तीनके चार । चारके पांच । पांचके पचीस । पचीसके छत्तीस । छत्तीसके एक । सोही ब्रह्म नाम पाया है । सब खेल उसके पाससे हुवा है ॥ ८ ॥ चल चल चल । एक दो तीन त्रिगुण नाम पाया है । चार तो चार देह है । पांच तो पंचभूत आत्मा है । छे तो षड्विकार है । सात तो सप्त धातु है । आठ तो अष्ट पाकोळी है । नउ तो नऊनाडी नवविध भक्ति है । दस तो दस इंद्रियें है । चल चल चल । इन्होंने बडे बडे जपी तपी । संन्यासी जोगी दिगंबर । व्याघ्रांबर । और बहुत जनोकी खोडा तोडी है ॥ १० ॥ चल चल चल । दस पांच पंधरा । छे एकबीस साब्र अठ्ठाविस । आठ छत्तीस सो गुरुके याद है । गुरुनाम सबसे बडा है । उन्होंके प्रतापसे ये खेल पाया है ॥ ११ ॥ चल चल चल । छत्तीस उपर नऊ पंचेचाळीस । पांच दशक कहते है । दशका आकडा एक एक पांच उपर पांच है । आवल आख पंचाण्णवका सो बरोबर है । पांच पांच उड गये । सो कुछ नहीं रहा । पिछे रहा एक । उसे नाम नहीं । निर्गुण ब्रह्म कहते है । शून्य तो एक है । व्हांसे माया भयी । सो नामरूप माया है । शून्य नहीं तो माया एक नहीं । माया नाम तो रंग है ॥१२॥ चल चल चल । वो मायेकूं पूज लटका है । माया रंग तोड डाली है । सो कछू नहीं । सब खेल मायाका है । मायाके रंगमे सब बांध डाले है । कोइ छुटा रहा नहीं । ऐसी माया सबसी बडी है । कोई सब खेल करता है । उसबिन पान हाले । नहीं उसका झोला बहुत बुरा है । सो नजर नही आवे ॥ १३ ॥ चल चल चल । हांडीबाग । हाहाजी । मायासे पार कैसा पडेगा । चौर्‍यांयशीच्या लक्ष फेरी । कैसी चुकोंगी ॥ १४ ॥ चल चल चल । नाम अल्लाका बडा है । वो अल्ला ब्रह्म नाम बिटपर खडा है । सो पंढरपुरमें विठ्ठल ब्रह्म नाम है । सर्व साधु संत रात और दिन ध्यान करत है । इसे पार पडे गा । ये नामसे चौर्‍यांयशी लक्ष फेरी न आवेगी । इस आगे माया लवंडी है । ये नाम भूल जायगा तो । माया डांखिणी झोल मारेगी ॥ १५ ॥ चल चल चल । बा बा बा बा आलालाला । मायाका खेल बहुत बुरा है । सो कबी नजर न आवे ॥ १६ ॥ चल चल चल । बडे बडेसे लढत है । बडे बडे कीं पाव पडत है । सोई बडे आप एकसो सब एक । तुजा देखने गया सो मायेनें घेरलिया । एक रहा सो पार पड गया ।

वोही अलक्षनाम पाया । जनार्दन नाम एका पाया । सो विठ्ठल रूप हो गया ॥ १७ ॥

३९७४ सुनो संत सज्जन भाई । हम तो निराकारके गारुडी आया है । हमारे उप्पर संतकी नवाई । इस कलजुगमें पैदा हुवे ॥ १ ॥ ये देखो खेल खलते रस्तेमे । सब आलम दुनया देखत है । आबे चल अहां हांडीबाग । जरा प्रेमका ढोल बजाव। लग लग लग लग ॥ २ ॥ पहिले तो छे साप निकालु मैदानमें । बडे बडे अजगर उसके नाम बताउ। काम क्रोध मद मत्सर दंभ अहंकार ॥ ३ ॥ अबे चल ये सापनें बडे बडेकुं डंख मारा। भस्मासुर तो भसम कर दीया । पराशर तो ढीवरनके पिछे लगा। इंद्रकी तो भगांकित हो गई काया। महादेव तो भिल्लिनके पिछे लगा । विष्णु तो वृंदा देखकर घबराया। ब्रह्मदेव तो सरस्वतीपर ख्याल किया। ऐसे साप कठीण है ॥४॥ अ ब ब ब ब । अज्ञानके पेटीमें भरं है । निकालू सलाम बे डंख मारे गा । ये हात डाला ॥ ५ ॥ डंख माराबे डंख मारा । हाय हाय बडी वेदना होती है । आबी जान जाती है । तुजको क्या बताऊं । आबी उतारनेवाला कौन बुलाऊं । सुनो मेरे पास सद्‌गुरूका मोहरा है । प्रेमकी बनाऊ शान । बोधका बनाऊ पाणी । भक्तीके बैठु दरबारमें । आबी लगाऊं घसके। तो सबी जहर उतारू ॥६॥ आबी भक्ती नागीन निकालु । इस नागनसे बडे बडे खेल खेलते थे। शुक याज्ञवल्क्य दत्त कपिलमुनी । ऐसे खेल खेलते थे॥७॥ आबे हांडिबाग । आहाजी तेरेकु कूच याद है । हांजी ये देखो पहिले तो मारू फुक । आबी बनाऊ एक क्या है। एक तो निराकार भगवान है। दो क्या है। ब्रह्ममें माया । मायामें ब्रह्म । तीन क्या है तीन तो ब्रह्मा विष्णु महेश है । चारक्या है। चार तो वेद है। पांच क्या है। पांच तो पंचभूत आत्मा है। छे क्या है । छे तो शास्त्र है। सात क्या है। सात तो सप्तपाताल है। आठ क्या है । आठ तो आठ आठ प्रकृती है। नऊ क्या है। नऊ तो नवविधा भक्ती है । दस क्या है । दस तो दस अवतार है। ग्यारा क्या है। ग्यारा तो रुद्र है। बारा क्या है । बारा तो सूर्यका कला है । तेरा क्या है । तेरा तो कच्छवाक्या रान्या है । चवदा क्या है । चवदा तो तल है । पंधरा क्या है । पंधरा तो तिथी है । ऐसा एका जनार्दनीं खेल । भक्ती पुरःसर लगाया मेल ॥ ८ ॥

## अक्कल.

३९७५ तप साधन सुखे करना । दो मिलके गीत गाना । बहुत मिलके विद्या शिकना । भावबंदमे बरकस रहेना ॥ १ ॥ दुष्मान देखके तवाई धरना । खुदा मिलके बाट खाना । पांच मिलकर इन्साफ करना। इन्साफकी तो बात बोलना ॥ २ ॥ उस तलेके न्याय करना । गाफल होकर गम खाना । घोडेपर बैठकर उगे जाना । पावमे जोडा तगार रखना ॥ ३॥ पराये बेटीपर नजर नहीं रखना। बीरकी कमान ना खेचना । एका जमार्दनीं अक्कल वाहना । सद्‌गुरुके चरण पकरना ॥ ४ ॥

## संसार.

३९७६ सांगते तुम्हां वेगळे निघा । वेगळे निघून संसार बघा ॥१॥ संसार करितां शिणलें भारी । सासु सासरा घातला भरी ॥ २ ॥ संसार करितां शिणलें बहु । दादल्या विकुन आणले गहूं ॥ ३ ॥ गव्हाचे दिवसे जोवली मावशी । मजला वेडा म्हणतां कैशी ॥४॥ संसार करितां दगदगले मनीं । नंदा विकिल्या चौघीजणी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं संसार केला । काम क्रोध देशोधडी गेला ॥ ६ ॥

## वैदीण.

३९७७ अनादिसिद्ध नवलाई झालें। स्वानंद कुरकुला घेऊन शकून सांगूं आलें। प्रेमाचें कुंकू भाळीं लाविलें। सद्‌भक्ती बोराटी हातीं धरिलें ॥ १ ॥ बुरगुंडा होईल बुरगुंडा होईल ॥ ध्रु. ॥ चार युगांची काखे पोतडी । दशावतार खेळे परवडी। सोहं शब्द बोलती चोखडी। माझा शकून ऐके आवडी ॥ २॥ मच्छाईबया बुरगुंडा होईल। कर्माईबया०। वऱ्हाईबया०। नरसाईबया०। वामनाईबया०। परशाईबया०। रामाईबया०। कृष्णाईबया०। बोधाईबया०। कलंकाईबया०। शकून सांगूं आलें बुरगुंडा होईल ॥ ३ ॥ गंगाईबया०। भागाईबया०। यमुनाईबया०। कृष्णाईबया०। येमाईबया०। तुकाईबया०। लक्ष्मीआईबया० ॥ ४ ॥ मच्छ कच्छ वराह नारसिंह रूपिनी। भक्तालागी स्तंभ फोडुनी। दैत्यांचा अंत करुनी। प्रल्हाद कुरकुला राखिलासे ॥ ५ ॥ वामन परशुराम रूपिनी। हनुमंत कुरकुला सर्वे घेउनी। शकून सांगावया लंकाभुवनीं। सीतेकारणें गेलीस ॥ ६ ॥ कौरव पांडव सर्व मिळाले। शकून सांगावया तुज पाचारिलें। अर्जून रथीं बैस-

विलें । शकुन कुरकुला घेउनी ॥७॥ ज्ञानदेव निवृत्ति सोपान । नामदेवादि संतजन । हे कुरकुले सर्वे घेऊन । भीमातटीं आली असे ॥ ८ ॥ पुंडलीक कुरकुला पाहून । समचरण विटेवर ठेवून । भक्तालागीं अनुदिन । करकटीं राहिलासे ॥ ९ ॥ ऐसा शकून सांगितला । एका जनार्दनीं आनंद झाला । संतीं जयजयकार केला । शकून कुरकुला ऐकोनी ॥ १०॥

## वैदू.

३९७८ मच्छाई यो शंकासुर मारुनी चाऱ्ही वेद लाई ये । ब्रह्मासी सुख केलीये । तुझ्या रूपाची थोरी काय वर्णू ये । बुरगुंडाये माये बुरगुंडाये ॥ १ ॥ कच्छाई वो समुद्रमंथन केलीये । पाठन देउन महा मेरू तारियेले । दैत्यासी मारिलीये । देवासी रक्षिलीये । ऐसी तुझी थोरी जग वाखाणिये । तुझे स्वरूपाची ऐकून बहु सुख पावलीये । माये बुरगुडाये ॥२॥ वऱ्हाई वो पृथ्वी बुडिये । ते दाढे धरीये । विश्वजनासी तारिये । तुझे स्वरूपासी ब्रह्म वाखाणिये । न कळे तया सीमाईयो ॥ ३ ॥ नरसायीयो प्रल्हादकारणें । वैकुंठीहुनी प्रल्हाद रक्षिलीयो । तारिले भवभक्त तारिले प्रल्हादासी । हिरण्यकश्यपाकारणें आईयो ॥ ४ ॥ बळीराम दैत्य पृथ्वी माजलियो । त्या कारणें कैसी धावलीसे वामनरूप धरूनियो । तीन पाऊल पृथ्वी दान मागितलीयो । तिसरे पाउलीये बळी घालोनि पाताळींयो । बयाचे द्वारीं द्वारपाळ होउनी राहिलियो । भक्तिकारणें देणें तुझी थोरी झालीयो । आईयो बुरगुंडे ॥ ५ ॥ परशरामाईयो । पित्याचे वचना धांवलियो । रेणुके मातेचें शीर उडविलीयो । पहा तिचें नवल केयळ थोरीयो । पित्याचे वचनें चौघे उठविलीयो । भक्तिभाव देखोनि निःक्षेत्री पृथ्वी केलीयो ॥ ६ ॥ रामाईयो सीतेकारणें रामें रावण वधिलीयो । देव गणा सोडून सुखी केलीयो । धन्य तुझी एक वृत्ती । सकळ धर्म तारीयो ॥ ७ ॥ कृष्णाबाईयो । देवकी बंदीशाळे त्याकारणें धांवलीयो । धरून कृष्णलीला । कसामामासी मारलीयो । भाके कुबलेवी देखोनी तिसी भावे उध्दरलीयो ॥ ८ ॥ बोधाईयो भक्तिभाव देखुनी तिष्ठत भीमातीरीयो । पुंडलिकाकारणें सकळ जग उद्धरिलीयो ॥ ९ ॥ कलंकी अवतार धरुनी सकळ पृथ्वी बुडविलीयो । वटपत्रीं राहिलीयो । एका जनार्दनीं देखिलीयो । आई वैदीण प्रसन्न झालीयो । सकळ सुख देखिलीयो ॥ १० ॥

## फुगडी.

३९७९ तुम्हीं आम्हीं दोघीजणीं मिळुनीजी सखये । मन बुद्धि चित्त टाकी पिळुनी जी सखये । जीव शिव भेदभाव गिळुनी जी सखये ॥ १ ॥ फुगडी फू नको होऊं फू । फू फू फू फू फुगडी फू ॥ ध्रु. ॥ तुझा माझा हात धरुनी खेळूं जी सखये । पंचरंगी चुडे करी जडो जी सखये । पंचविस याची घडी जाळूं जी सखये ॥ २ ॥ नेट पाट दोघी उभी राहूं जी सखये । कंठीं हात ठेवूं हरि डोळां पाहूं जी सखये । अखंडित ब्रह्मानंदसुख लाहूं जी सखये ॥३॥ खेळतां खेळतां जाहला जी सखये । प्रवृत्ति निवृत्ति भेद खुंटला जी सखये । एका जनार्दनीं एकी एकसा जी सखये ॥ ४ ॥

३९८० फु फु फु फु फुगडी गे । दोघी घालूं झगडी गे । जाउनी महाद्वारीं गे । तेथें घालीन फुगडी गे ॥ १ ॥ दोन्ही हस्तक धरून गे । तेथें घालीन फुगडी गे ॥ ध्रु. ॥ विटेवरील पाऊल येऊं गे । राहो माझे हृदयीं गे । जेथें वैष्णवांचा भार गे । तेथें घालीन फुगडी गे ॥ २ ॥ जेथें नामघोष गे । तेथें करीन झगडी गे । एका जनार्दन पाहून गे । मन माझें धालें गे ॥३॥

## बेटकुळी.

३९८१ ऐका बेटकुळीचे महिमाना । सांगे सकळ लोका जनां । संतमहंतांच्या खुणा । ऐका वाचून त्या ॥ १ ॥ टराव टराव टराव मृगवट जाण गा ॥ धृ. ॥ इचे ग्रामीं आहे कोण । दंभ अहंकाराची खूण । शब्द करी नाना विंदान । इचे स्थानीं बैसविले जाण ॥२॥ रवीमंडळापासोन । सात विकाराचा मान । एकवीस स्वर्गाचिये ध्यान । साधु सज्जन करिती गायन ॥३॥ दशअवताराविण । राखी भृगूचा सन्मान । भक्तासाठीं जाला ध्यान । पाहे विठेवरी मौन्य ॥ ४ ॥ एका जनार्दनीं कुळीचें वर्म दिनीं । तळीं पाताळीं वितळा जनीं वनीं । सदगुरुपायीं मिठी घालुनी । लाधेल प्रासादिकु वाणी ॥ ५ ॥

३९८२ एक जटाधारी दिसत । एक डोळे वटारुनी पाहत । एक गुरकावूनी बोलत । एक गिळावयासी पाहत ग ग ग ग ग । कस करतय मी यैव मी यैव । सावळें बाळ तान्हुलें । कस करत० ॥ धृ. ॥ ॥ १ ॥ एक पाताळामधीं राहत । त्रिभुवनीं त्याचीच मात । एका डोळ्यामधीं चमकत । त्यामधीं जग

दिसत ॥२॥ एकनाथ साधु भला। जनार्दनासी शरण गेला। देहीं याचा देव केला। त्यानें रूप दाविलें त्याला ॥ ३ ॥

३९८३ नाहं जोगी नाहं भोगी नाहं जोशी संन्याशी। नाहं कर्मी नाहं धर्मी उदासीना घरवासी ॥१॥ बाबा अचिंत्य रे बाबा अचिंत्य रे। ब्रह्मीं स्फुरे सो माया। नाम नहीं ना रूप रेखा सो मै आम्हारी काया ॥धृ.॥ नाहं सिद्धा नाहं भेदा नाहं पंडित ज्ञानीं। नाहं जपी नाहं तपी नाहं ध्येय ध्यानीं ॥ २ ॥ नाहं पिंडा नाहं ब्रह्मांडा नाहं जीव शिव कोई। नाहं पुरूषा नाहं नारी नाहं देह विदेही ॥ ३ ॥ नाहं सद्रूप नाहं चिद्रूप नाहं आनंद भोगे। जनार्दन पुता अभिन्न एका निर्विकल्प भय अंगे ॥ ४ ॥

३९८४ ध्यान धरूं तो देव ना देवी नैवेद्य नहीना बोना। पूजा करूं तो भक्त ना गीती गाऊं तरी निःशब्द रे बाबा ॥ १ ॥ निराश भावूं निराश ध्याऊं शून्यमें शून्य खाऊं रे। घटमटके ज्यांहा विनाश भैले सो तत्त्व गुरुगम्य पाऊं रे बाबा ॥ २ ॥ दर्शन करूं तो रुप ना रूपा उपचार करूं तो धूप ना दीपा। चंद्र सुरीज दो मेले सोहं सोहं तो आपे आपरे बाबा ॥ ३ ॥ फाकट गाऊं फुकट ध्याऊं नयनविना निज-तेज लखाऊं। क्षुधा खाऊं तृषा पिऊं जीव मारूनि जिवूं रे ॥ ४ ॥ अहं सोहं जिव ना भाव काहां पाप काहां पुण्य। जनार्दन फुता अभिन्न एका सहजीं सहज निरशून्य रे बाबा ॥ ५ ॥

३९८५ तुमचें गुज तुम्हां बोले। आमुचें त्यांत काय गेले वरले। आळीस नवल देखिलें एका पुरुषानें कुत्रें खादलें ॥ १ ॥ नवल मोठें जाणा कान्होबा नवल मोठें जाणा। तुमच्या तुम्हीं जाणा खूणा ॥ धृ. ॥ ओस गांवचा एक मारुती। त्याचा बाप चोरी करी दिवसपती। त्यासी पंचावन सांगाती। गांवच्या कुळकर्ण्याची फजिती ॥ २ ॥ गंगे आला महापूर। वाहुन गेलें तेथें अंबर। चंद्रसूर्य दारोदार। हिंडों लागलीं पांच पोरें ॥ ३ ॥ त्याला साक्षी एक जांवई। सासूबाई देती ग्वाही। लेंक आमुची ढालगच पाहीं। एका शरण जनार्दन पायीं ॥ ४ ॥

३९८६ रात्रीमाजीं स्वप्न देखिलें। परपुरुषाचें घर पळालें। तेथें नागवें आडवें आलें। तेणें उघड्यासी गिळिलें ॥ १ ॥ नवल माझें तुम्ही पहा। उगवें नुगवतां उगेच रहा ॥ धृ. ॥ माझ्या नवलाची परी। खाली कुंभार वरतें चाक फेरी। लक्ष लागे तोचि येईना हरी। ऐशी नवलाची कोण परी ॥ २ ॥ नवल याहून बहु भ्यालें। या जगा[illegible] नाहीं आलें। ने स्वदेहासी मुकलें। ऐशापरी नरनारी ठकलें ॥ ३ ॥ या नवलासी गिळून। एक राहिला जनार्दन। एका जनार्दनीं शरण। तो नवली नाहीं भिन्न ॥ ४ ॥

३९८७ नका धरूं धरूं अनुमान। आलें मुसळासी कान। जतियाची पाळी करी रुदन। वेधियलें मन चाटुवाचें ॥ २ ॥ अर्थ करा माझे भाई। नका हिंडू दिशा दाही ॥ धृ. ॥ उठिला रागावूनि पाटा। येउनी बैसला दारवंटा। मोडिला काथवटीचा थाटा। वरवंटा नाचतसे ॥ २ ॥ चूल धांवुनी आली बाहेरी। रागावली घारींवरी। शिंके करी मारामारी। घरकुलासी भेडसावी ॥ ३ ॥ घर जाहलें जुनाट वाउगें। पाया निघाला लागवेगें। भिंत उडाली सवेगें। कोणी कोणा आवरीना ॥ ४ ॥ एका जनार्दनीं म्हणे। न कळे वेदांतीया बोलणें। मतवादीयांचे ठाणें। सहज गेलें उठोनी ॥

३९८८ गुरुकृपा अंजन पावो मेरे भाई। रामाविना कछु खाली नहीं ॥ १ ॥ अंदर राम भीतर राम। जा देखो व्हां रामही राम ॥ २ ॥ जागत राम सोवत राम। सपनोमे देखुं तो राजाराम ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावही निका। जो देखो सो राम सरीका ॥४॥



# आरत्या

३९८९ तपें तीर्थ व्रतें जयापायीं मिरवती । संत मुनीवृंदें जया सुखासी लाधती ॥ १ ॥ हरीच्या पायालागीं आरती करूं । कायावाचामनें चरण दृढ धरूं ॥ २ ॥ सुरासुर उभे नमना कर जोडोनी । प्रल्हाद नारद अखंड जयाचे ध्यानीं ॥ ३ ॥ एकाएकीं विनटला जनार्दन पायीं । आरती करितां देहीं देहभाव नाहीं ॥ ४ ॥

३९९० संत सनकादिक भक्त मिळाले आणिक । स्वानंदें गर्जती पाहूं आले कौतुक ॥ १ ॥ नवल होता हे आरती देवाधिदेवा । स्वर्गीहुनी सुरवर पाहूं येती केशवा ॥ २ ॥ नरनारी बाळा ठक पडिलें नयना । वोवाळितां श्रीमुख धणी न पुरे मना ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मंगल आरत्या गाती । मिळाले वैष्णव जयजयकारें गर्जती ॥ ४ ॥

३९९१ आरती अनंतभुजा विठू पंढरीराजा । न चलती उपचार मनें सारिली पूजा ॥ १ ॥ परेसी पार नाहीं न कळे निगमा ठायीं । भुलला भक्तिभावा लाहो घेतला देहीं ॥ २ ॥ अनिर्वाच्य शुद्ध बुद्ध उभा राहिला नीट । एका जनार्दनीं पायीं जडली वीट ॥३॥

३९९२ दीनदयाळ श्रीगोपाळ व्यापक घननीळा । तंव पदकमळ सेवितां कमला नेणे निजलीळा । धन्य भक्तवत्सला उद्धरिले गोकुळा । मुरलीनादें तारिल्या व्रज सुंदरी बाळा ॥ धृ० ॥ मारुनी बगळा अजगर सगळा धरिला भुजंग काळा । छंद गोपाळा लाउनी बरवा रचिसी नाना खेळा ॥ १ ॥ यशोदा वेल्हाळा बाहे म्हणे येरे कृष्णा बाळा । भुवनत्रय दाखविलें त्वां पसरूनि मुखकमळा ॥ २ ॥ पदीं विमळा वाद्य खळाळा वाकी शोभे बाळा । एका जनार्दनीं निजरूप पहातां वेधलेंसे डोळां ॥ ३ ॥

३९९३ चरणकमळ ज्याचे अति सुकुमार । ध्वजवज्रांकुशरेखा चरणीं ब्रीदाचा तोडर ॥१॥ ओवाळूं आरती मदन गोपाळा । श्यामसुंदर गळां वैजयंति माळा ॥ २ ॥ नाभीकमळीं ज्याचे ब्रह्मयाचे स्थान । हृदयीं पदक शोभे श्री वत्सलांछन ॥ ३ ॥ मुखकमळ ज्याचे पाहतां सुखाच्या कोटी । वेधलें मानस हारपली दृष्टी ॥ ४ ॥ एका जनार्दनीं देखियेलें रूप । रुपचि पाहतां अवघें झालें तद्रूप ॥ ५ ॥

## काकड आरती

३९९४ सहस्त्र दीपें दीप कैशी प्रकाशली प्रभा । उजळल्या दशदिशा गगना आलीसे शोभा ॥ १ ॥ काकड आरती माझ्या कृष्णा सभागीया । चराचर मोहरलें तुझी मूर्ति पहाया ॥ २ ॥ कोंदलेंसे तेज प्रभा जालीसे एक । नित्य नवा आनंद वोवाळितां श्रीमुख ॥३॥ आरती करितां तेज प्रकाशलें नयनीं । तेणें तेजें मीनला एकाएकीं जनार्दनीं ॥ ४ ॥

## शेज आरती

३९९५ हरि चला मंदिरा पेशा म्हणती गोपिका । भावें वोवाळिती यादवकुळटिळका ॥ १ ॥ एकीकडे राही एकीकडे रखुमाई । भावें वोवाळितां हरि जाला दो ठायीं ॥२॥ अष्टादिक सोळा सहस्त्र ज्याच्या सुंदरा । ज्या ज्यांनीं प्रार्थिला गेला तयांचिया घरा ॥३॥ एका जनार्दनीं हरि तूं लाघवी होसी । इतक्याहि भोगुनि ब्रह्मचारी म्हणविसी ॥ ४ ॥

## गणपतीची आरती

३९९६ सद्गुरूची चंद्र उदयो पै झाला । वाग्देवी वाक्य गणेश देखिला । चौथी भक्तिज्ञानें चौथीसी आला । गुरुज्ञानमूर्ति पूर्ण बिंबला ॥१॥ जयदेव जयदेव जय मंगलमूर्ति । कार्यसिद्धी व्रत संकट चतुर्थी ॥धृ.॥ शुद्ध पक्षीं ज्ञान वद्य पक्षीं सीध चौथी । कार्यसिद्धी तेथें सूर्याची स्थिती । मंत्रयुक्त पूजा अक्षदा हातीं । चिद्चैतन्य दुर्वा सद्बुद्ध विर्त्ती ॥ २ ॥ प्रेमाचें मोदक निर भावें क्षीर । प्रबोध लाडू गोड गोड साकर ॥ पंचभूताचे खाजे शोभती कर । महाप्रळयीं क्षुधेसी आहार ॥ ३ ॥ नवनीत निज घृताचि धार । नवविधा भक्ती पूजा उपचार । शुद्ध सुमनें ठेवा सायुज्य सार । निजभक्तीभावें करितों नमस्कार ॥ ४ ॥ देई देवा सद्गुरू मन उन्मन । सकाम निष्काम कामना पूर्ण । भुक्ती मुक्ती देवो प्रसन्न वदन । कृपा विश्वरूप एका जनार्दन ॥ ५ ॥

## हनुमंताची आरती

३९९७ जयदेवा हनुमंता । जयजय अंजनीसुता । आरती वोवाळीन । राया रामाच्या दूता ॥ धृ. ॥ वानरीरूपधारी ज्याची अंजनी माता । हिंडतां वनांतरीं । भेटी झाली रघुनाथा । धन्य तो रामभक्त । तेही मांडिली कथा ॥ १ ॥ सीतेचे शुद्धी सांगे । रामें दिधली आज्ञा । उलंघुनी समुद्रतीर । गेले लंकेच्या भुवना । शोधिलें अशोकवन । मुद्रा टाकिली खूण । सीतेसी दंडवत । दोन्हीं कर जोडून ॥ २ ॥ निकुंब बळे इंद्रजीत । होम करी आपण । तोहि तो विध्वंसिला । लघुशंका करून । देखुनी पळताती । भुतें महादारूण ॥ ३ ॥ देऊनी भुभुःकार । नरलोक आटले । रामहि लक्षुमण । जरी पाताळीं नेले । तयांचे शुद्धीसाठीं । जळीं प्रवेश केले । अहिरावण महिरावण । क्षणामाजीं निर्दाळिले ॥ ४ ॥ हनुमंता नाम तूंतें । किती वर्णूं मी दातारा । असती सर्व ठायीं । आजूबाजू आमरा । स्वामीसी सोडविलें । दिनानाथ माहेरा । एका जनार्दनीं । मुक्ति झाली संसारा ॥५॥

## देवीची आरती

३९९८ मोहो म्हैषासुर मारूनी बोध त्रिशुळ गळा । कामक्रोध चंड मुंडवो मर्दिले लीळा । लिंग देहे रक्तबिंदु रोशे शोषी सगळा । कर्माकर्मीं शुंभनिशुंभ निवटिले लीळा ॥ १ ॥ अनादि सिद्ध तूं वो अक्षरें अविनाश योगिनी । ब्रह्मादिका अगोचर ब्रह्मरूप ब्रह्मीणी । सहज तूं शिवशांभवे चैतन्य भवानी ॥धृ.॥ प्रकृतीचा आंगीं तूं खेळसी पर पुरूषपण । नित्य आरती उजळली उदो उदो म्हणोन । अनुहात चौन्डके वाजती तेणें येती स्फुरण । चौर्‍यांएेशी लक्ष भुतावळें नाचविशी तूं प्राण ॥ २ ॥ अभिन्नव तुझीं दरूशनें पाहणें मज । उरी सीरी बाहु भूषणें वैष्णव रज । निजतेजें दिवीं उजळूं वोवाळूं सहज । सच्चिदानंद गोंधळी नाचसी तूं भोज ॥ ३ ॥ दृश्य वो दृष्टा दोन्हीं सारुनि दरूशन देणें । देखत देखणें गिळुनी तुझें स्वरूप पाहणें । स्थावर जंगम तूंचि तूं एकलें एकपणें । जिवदान बळी दिधल्यापरी प्रसन्न होणें ॥ ४ ॥ प्रणव पिठीची त्रिपुटी मैदानी वरती । त्रिगुण गिळीले अव्यक्त व्यक्ती । स्वानंद घट भरोनि चैतन्य शक्ती । एका जनार्दन एकाएकी एकलेचि प्राप्ती ॥ ५ ॥

## तुळसीची आरती

३९९९ प्रातःकाळीं तुझें उत्तम रूप । दर्शन केलीया जाईल पाप । पूजन केलीया प्राप्त वैकुंठ । न कळे महिमा तुझी तूं माय श्रेष्ठ ॥ १ ॥ जयदेव जयदेव जयमाय तुळशी । कलीयुगीं तारक तूं एक होशी ॥धृ.॥ उत्तम रूप स्वरूप सुंदरी । तुझे अंगीं वेद असे पैं चारी । तुझी पूजा करिती पुष्पें नरनारी । त्यासी भुक्ति मुक्ति होती पैं चारी ॥ २ ॥ थोर तुझा महिमा कार्तिक मासीं । राधा दामोदर असती तुजपाशीं । तुळशी वृंदावनीं तूं हो राहासी । तुझा महिमा आहे समस्त देवासी ॥ ३ ॥ रामकृष्ण तुळशी नाहीं हो भेद । तुळशी वृंदावनीं असती गोविंद । तुळशी वृंदावनीं करिती आनंद । एका जनार्दनीं तुळशीची छंद ॥ ४ ॥

## दत्ताची आरती

४००० स्वानंदें आरती दत्त पाहूं गेले डोळां । तंव चराचर अवघा श्रीदत्त स्वलीला ॥ १ ॥ विस्मये दाटले आतां वोवाळूं कैसें । देखते देखणें श्रीदत्तची दिसे ॥ धृ. ॥ असे आणि नसे हा तो विकल्प जना । दत्तीं दत्तस्थिति जनीं देखुनी जनार्दना ॥ २ ॥ जनीं जनार्दनीं निजरूप दत्त । एका जनार्दनीं तेथें अद्वैत नित्य ॥ ३ ॥

### जनार्दनाची आरती

४००१ जयदेव जयदेव जय जनार्दना । परमार्थे आरती भावार्थे आरती अभिन्न भावना ॥ धृ. ॥ अवलोकितां जन न दिसे जनार्दन । भिन्नाभिन्न कैंचा दावी अभिन्न । अनेक एकत्व दिसे परिपूर्ण । थकली मन बुद्धि कैंचा गुण अवगुण ॥ १ ॥ ज्योतिचीया ज्योति उजळली दीप्ती । तेणें तेजें झाली सतेज आरती । पाहाणें तें पाहाणेंपण पहावया स्थिती । नुरेचि पैं वेगळा देहा नवी तृप्ती ॥२॥ उजाळितां उजळेना उजळावयालागीं । वेगळेपण कैंचे नुरेचि भागी । आंगवी अर्पिला आंगींचा अंगीं । जीवशीवपण गेलें हारपोनी वेगीं ॥ ३ ॥ पाठ ना पोट अवघा निघोट । सर्वांगीं देखणा सर्वां वरिष्ठ । विष्ट ना निष्ट गुप्त ना प्रगट । ओहं सोहं सगट भरियेला घोट ॥ ४ ॥ सर्वदा दिसे परी नाकळे मना । जें जें दिसे तें तें दर्शन जाणा । अभाव भावनेसी हरली भावना । अभिन्नव आरती एका जनार्दना ॥ ५ ॥

## भानुदासमहाराज यांच्या अभंगाची वर्णानुक्रमणिका

## जनार्दनमहाराज यांच्या अभंगाची वर्णानुक्रमणिका



## एकनाथमहाराज यांच्या अभंगाची वर्णानुक्रमणिका

भ.

म.

समाप्त


प्रकाशक :
ज. शं. आपटे
इंदिरा प्रकाशन
२७०, सदाशिव, पुणें २.

मुद्रक :
शं. त्र्यं. आपटे
इंदिरा प्रेस
२७०, सदाशिव, पुणें २.